## विषयानुक्रम

## इ. स. १९५० सालच्या आवृत्तीची

# प्रस्तावना

१. मराठी भाषेंत ज्यांना वेदवाणीप्रमाणे पूज्य मानतात, जे व्युत्पन्न पंडितां तसेंच भोळ्या भाविकांच्या मुखीं सारखेच खेळत असतात, समकालीन ब[illegible] तों आज तीनशें वर्षे ज्यांच्या 'अनुवादा'ने देशी-परदेशी लोकांचें चित्त नित्य झुरवि त्या तुकारामाच्या अभंगांची ही गाथा मुंबई सरकारतर्फे मराठी वाचकांस सादर के जात आहे.

२. तुकारामानें आपले अभंग लिहून ठेविले होते यांत कांहीं शंका नाही ; पण जनव चुकविण्यासाठीं अभंगांच्या ज्या वह्यांचे कागद देवाने उदकी तारिले असें खुद्द तुकार[illegible] लिहून ठेविले आहे, त्या वह्यांचें पुढें काय झाले हे सांगणें कठिण आहे. "कोर वह्या निघाल्या उदकीं । त्या तरी लुटूनि नेल्या भाविकीं । प्रख्यात लोकीं व्हावया अशी माहिती महिपतीने दिली आहे.[2] या "निवाड्याच्या" दिवसानंतर तो नि[illegible] भक्तीच्या व काव्याच्या माधुरीचा ज्यांत परिपाक उतरला होता असे अनेक अ तुकारामानें स्वहस्ते लिहून ठेविले असले पाहिजेत. त्या हस्तलिखितांचाही अद्यापि लागला नाहीं. खुद्द तुकारामाच्या घराण्यांत देहूस पूजेत ठेविलेली अशी त्याच्या [illegible] म्हणून जी वही दाखवितात तींत फक्त २४८ अभंगच आहेत. सारांश, तुक[illegible] हातचें समग्र लिखाण गेल्या शंभर वर्षांत तपास करून सुद्धां मिळालें नाहीं ; व [illegible] भविष्यकाळांत तें सांपडेल असा संभव दिसत नाहीं.

३. तुकारामाच्या हयातींतच त्याच्या टाळकरी अनुयायांनीं व तसेंच इतर [illegible] लोकांनीं त्याच्या अभंगांच्या प्रती तयार केल्या होत्या. तुकारामाच्या [illegible] थोडक्याच वर्षांनीं कचेश्वराला खेटकग्रामीं (म्हणजे 'खेड' गांवीं) अशी माहिती [illegible]

१ "तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्ध । त्यांचा अनुवाद चित्त झुरवी ॥" संत [illegible] गाथा (कोल्हारकर) पान ८, अभंग २१, चरण ६.

२ भक्तलीलामृत, अध्याय ३५, ओवी १६७.

कीं "अंबाजीचें घर । तेथें जावें ॥ सर्वेही संग्रह तुकोबाच्या वह्या । जावें लवलाहे तुम्ही तेथे[३] ॥." हा संग्रह अद्यापि कोणाच्या हातीं लागला नाहीं. टाळकऱ्यांत दोन प्रमुख लेखक होते ; एक कडूसचा ब्राह्मण गंगाधर मवाळ, व दुसरा चाकणचा संताजी तेली जगनाडे. गंगाधर मवाळ हा "तुकयाचा लेखक निरंतर । प्रासादिक उत्तर लिहितसे ।"; आणि "संताजी तेली बहुत प्रेमळ । अभंग लिहित बैसे जवळ ।" असे त्या दोघांचे महिपतीने वर्णन केले आहे.[४] कडूसास मवाळ घराण्यांतील मंदिरांत ६९९ पानांचे एक हस्तलिखित आहे. ते गंगाधर मवाळाच्या परंपरेवर आधारलेले आहे. "हस्तअक्षर संताजी तेली जगनाडे, कसबे चाकण" अशी तीन स्थळीं नोद असलेली एक वही उपलब्ध झाली आहे ; व जिला हस्ताक्षराच्या साम्यावरून त्याच लेखकाच्या हातची म्हणतां येईल अशी दुसरी एक वही मिळाली आहे.[५] महिपतीनें वर्णिल्याप्रमाणे इतरांनीं ज्या प्रती प्रेमाने उतरल्या होत्या त्या ठिकठिकाणीं महाराष्ट्रांत विखुरल्या आहेत. अनेक बाडांत फुटकळ अभंग किंवा प्रकरणे आहेत. समग्र गाथेसारखे संग्रह फार थोडे आहेत.

४. याप्रमाणें लोकांच्या मनावर ज्यांची कायमची छाप बसली होती व जे त्यांच्या मुखांत घोळत होते ते तुकारामाचे अभंग जेव्हां शिळा-खिळ्यांनीं छापावयास सुमारें शंभर वर्षांपूर्वी प्रारंभ झाला तेव्हां साहाजिकच हातीं लागलेल्या बाडांतील कांहीं प्रकरणांनीं सुरुवात केली गेली. पांडुरंग बापू जोशी पावसकर यांनीं मुंबईत सुरू केलेल्या 'ज्ञानचंद्रोदय' या मासिकांत शके १७६६ म्हणजे इ. स. १८४४ मध्ये (ग्रंथ ९, कागद ३६, ३७), ६९ "अभंग पत्रिकेचे तुकोबाचे" प्रसिद्ध झाले. तत्पूर्वी त्याच पांडुरंग जोशी पावसकर यानीं १८४१-४२ सालीं ज्ञानचंद्रोदयांतूनच 'गीतार्थबोधिनी' नामक पुस्तक क्रमशः प्रसिद्ध करून ते १८४२ सालीं संपूर्ण निराळे प्रसिद्ध केले. या पुस्तकांत तुकारामाचे भगवद्गीतेच्या भाषांतराचे अभंग प्रसिद्ध केले होते ; याचे मुख्य कारण हे असावें कीं, या भाषांतराची स्वतंत्र पोथी त्यावेळीं सहज उपलब्ध होती.[६] 'ज्ञानचंद्रोदय' मासिकांत १८४९ सालीं वस्त्रहरणाच्या २९ अभंगांचें प्रकरण प्रसिद्ध झाले. १८४२ ते १८६२ या वीस वर्षांत तुकारामाचे कांहीं निवडक, कांही फुटकळ, कांहीं लोकप्रिय प्रकरणात्मक, असे स्फुट अभंग निरनिराळ्या लोकांनीं प्रसिद्ध केलेले आढळतात. तुकारामाचे बरेचसे अभंग अलीकडे मुंबईत छापले आहेत अशी नोंद विल्सनसाहेबानें मोल्स्वर्थच्या कोशाच्या आरंभीं जोडलेल्या जून १८५७ सालीं लिहिलेल्या आपल्या निबंधांत केली आहे.

५. परंतु जिला समग्र गाथा म्हणतां येईल ती छापण्याचा पहिला उपक्रम माधव चंद्रोबा यांनीं केला. ही ३३२९ अभंगांची गाथा त्यांच्या 'सर्वसंग्रह' मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झाली. पहिला भाग १८६२ सालीं, दुसरा १८६४ सालीं, तिसरा १८६६ सालीं

---

३ कचेश्वरकृत आत्मचरित्र, भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त शके १८३५, पान २४१.

४ भक्तलीलामृत, अध्याय ३३, ओवी १२१ ; अध्याय ३६, ओवी ५१.

५ पहा—तुकारामबावाचा अस्सल गाथा, भाग १–२. विनायक लक्ष्मण भावे.

६ धुळ्याच्या समर्थवाग्देवतामंदिरातील संग्रहांत शके १७३४ (इ. स. १८१२) ची नोंद असलेली या भाषांतराची एक हस्तलिखित स्वतंत्र प्रत आहे.

व त्यानंतर पुढील दोन भाग मिळून पांच भागांत संपविलेली गाथा १८६८ साली स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली. कोणत्या हस्तलिखितांवर ही गाथा आधारलेली आहे याची माहिती मिळाली नाहीं. तथापि प्रस्तुत गाथेंतील पाठभेदांशीं तुलना करून पाहतां या "सर्वसंग्रही" गाथेचें मूळ हस्तलिखित पंढरपूर परंपरेतील होतें असें दिसतें. याच सुमारास रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या प्रेरणेनें पंढरपूरच्याच हस्तलिखितांवरून मुंबईतच गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत दुसरी एक गाथा छापली गेली. ही गाथा दोन भागांत शके १७८९ च्या (इ. स. १८६७) आषाढांत प्रसिद्ध झाली. प्रत्येक भागाच्या आरंभी खालील माहिती दिली आहे. "शके १७८६-८७ [इ. स. १८६४-६५] मध्यें क्षेत्र पंढरपुर एथे एका स्नेह्यानें उद्योग करून तुकारामबावाच्या गाथेची एक प्रत तयार करून पाठविली, व ती सुवाच्य अक्षरानें व चांगल्या शाईनें छापली असतां पुष्कळ वारकरी आदिकरून भाविक लोकांस तिचा उपयोग होईल असें कळविलें. नंतर दुसऱ्या प्रती मिळवून त्यांच्या आधारानें ग्रंथ साद्यंत पाहून, जेथे लेखकानें चुक्या केल्या होत्या असें दिसलें, त्या नीट करून सांप्रत हा ग्रंथ अत्यादरें सादर केला आहे." या दुसऱ्या प्रती कोठून मिळविल्या होत्या, व चुका कोणत्या तत्त्वांप्रमाणे नीट केल्या, याचा कांहींच खुलासा केला नाहीं. तथापि इतकें स्पष्ट दिसतें कीं गणपत कृष्णाजीची ही खिळ्यांनीं छापलेली आवृत्ति सुद्धां पंढरपूर परंपरेतीलच होती. प्रस्तुत गाथेत पं (छापी प्रत) म्हणून जिचा निर्देश केलेला आहे ती प्रत गणपत कृष्णाजीची आवृत्ति होय.

६. दरम्यान इंग्रजी मिशनऱ्याचें व सुसंस्कृत इंग्रजी अधिकाऱ्यांचे लक्ष तुकारामाकडे वेधलें होतें ; व त्यांनीं तुकारामाचा चांगला अभ्यासही केला होता. लोकांना "तुकारामनिर्मित सेतूवरुनी" "खिस्तचरणीं" नेतां येईल असा पुढे रे. नारायण वामन टिळकांप्रमाणे त्यांकाळींही मिशनऱ्यांचा समज झाला होता. कांहींची अंतर्यामी अशी खात्री होती की तुकारामांत रंगलेल्या मनाला खिस्ताकडे वळण्याची जरूरच भासणार नाही. कसेही असो, इंग्रजांनीं तुकारामाच्या अभंगांची व त्याच्या चरित्राची देखील भाषांतरें छापावयास सुरुवात केली होती. मरे मिचेल या महाराष्ट्रांत मुरलेल्या मिशनऱ्यानें महिपतीच्या तुकारामचरित्राचा इंग्रजी गोषवारा आपल्या प्रस्तावनेसह १८४९ सालीं मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या 'जर्नल'मध्यें छापिला. या मिशनऱ्याचा तुकारामाचा व्यासंग इतका गाढ होता कीं त्याला स्वतः मराठींत अभंग रचितां येऊं लागले. त्यानंतर त्यावेळचे डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन सर अलेक्झांडर ग्रँट या साहेबानें, जानेवारी १८६७ च्या 'फॉर्टनाइटलि रिव्ह्यू'मध्ये तुकारामावर एक निबंध प्रसिद्ध केला. इंग्रजांना तुकारामाची यथायोग्य ओळख करून द्यावी हा त्या निबंधाचा हेतु होता. निबंधांत ग्रँटसाहेबानें तुकारामाच्या कांहीं निवडक अभंगांची पद्यात्मक भाषांतरे दिली होतीं. ग्रँटसाहेबाची तुकारामावर किती भक्ति होती हे त्या निबंधातील खाली दिलेल्या एक दोन (भाषांतरित) वाक्यांवरून स्पष्ट होते. "तुकारामाच्या अभंगांची डेव्हिडच्या गीताशीं (Psalms) तुलना टाळता येणें शक्य नाही. हे अभंग म्हणजे देवाच्या सतत सानिध्यांत असलेल्या

हृदयाचे निरनिराळ्या प्रसंगीं आणि वेगवेगळ्या भावनांच्या आवेशात, पक्ष्यांच्या कूजिताप्रमाणें सहज गाइलेले उद्गार होत...........ज्यांच्या मुखीं तुकारामाची वाणी वसत आहे त्यांनां नैतिकदृष्ट्या ख्रिस्तीधर्म श्रेष्ठ आहे हे पटवून देणें दुरापास्त आहे."

७. सर बार्टल फ्रिअर हे मुंबईचे गव्हर्नर असतांना याच ग्रँटसाहेबाच्या प्रेरणेने त्या वेळच्या मुंबई सरकारने तुकारामाची संशोधित आवृत्ति तयार करून प्रसिद्ध करण्याचे ठरविलें. संपादनाचें काम संस्कृत व मराठी भाषांत पारंगत असलेले वे. शा. सं. विष्णु परशुराम शास्त्री पंडित[७] यांजवर सोपाविण्यांत आले; व संस्कृत-प्राकृत भाषांचे तज्ज्ञ, वैदिक विद्वान्, सुप्रसिद्ध पंडित, शंकर पांडुरंग पंडित, त्या वेळचे दाक्षिणा प्राइझ कमिटीचे चिटणीस, ह्यांची त्या संपादनावर देखरेख होती. ही गाथा इंदुप्रकाश छापखान्याच्या मालकांनीं मुंबई सरकारच्या आश्रयाने छापून दोन भागांत प्रसिद्ध केली. पहिला भाग १८६९ सालीं व दुसरा भाग १८७३ सालीं प्रसिद्ध झाला. या कार्याकरितां मुंबई सरकारने त्यावेळीं चोवीस हजार रुपये खर्च केले होते व त्याचा फार बोलबालाही झाला. त्याचा मासला म्हणून निबंधमालेंतील विष्णुशास्त्री चिपळुणकरांच्या लिखाणांतील खालील उतारा मोठा मनोरंजक वाटेल. "असे होतां होतां कांहीं काळाने...........जो बिचारा शूद्रकवि आपल्या लंगोटेबहादर व घोगडीवाल्या भक्तमंडळींतच काय तो रमायाचा, किंवा फार झाले तर हरदासांच्या कथाप्रसंगीं सत्कार पावायाचा, त्यास एकाएकीं आरबी गोष्टींतील अबू हसनासारखे मोठे ऐश्वर्य प्राप्त झाले! इंदुप्रकाश मुद्रणयंत्रालयांतील मुक्ताफळे आंगभर उधळलेलीं, महावस्त्रांत शरीर लपेटलेले, व युनिव्हर्सिटीचे शानदार झगे घातलेले तरुण विद्वान् डोक्यावर मोर्चेले उडवताहेत व चवऱ्या ढाळताहेत अशा थाटानें तुकाराम महाराज फारा दिवसांनीं आपल्या अभिधानाची सार्थता पावून विराजमान झाले. महाराष्ट्र देशाच्या पहिल्या अधिपतीनें पाठविलेले ऐश्वर्य परत लावून वरील कवीने जी आपली हानि करून घेतली होती, तिची भरपाई दोन शतकांनंतर त्याच देशाच्या परद्वीपस्थ प्रभूनें करण्याचे मनांत आणिले कीं काय कोण जाणे! असो; झाली ती गोष्ट बरीच झाली."[८]

८. ही गाथा "शंकरपांडुरंगी", "पंडितांची", "इंदुप्रकाश" किंवा "सरकारी" या नांवांनीं ओळखिली जाते. यापूर्वी प्रसिद्ध झालेले अभंग व गाथा ह्या मुख्यत्वें पंढरपुरांतील प्रचलित पाठाच्या परंपरेवर आधारलेल्या होत्या. पंडितांच्या गाथेंत प्रथमच तुकारामाच्या प्रदेशांतील म्हणजे देहूच्या परिसरांतील हस्तलिखिते तपासून संख्या, पाठ

---

७ विधवाविवाहाचे पुरस्कर्ते सुधारक म्हणून या शास्त्रीबोवांची थोर कीर्ति होती. तुकारामाच्या अभंगात तल्लीन होणाऱ्या न्यायमूर्ति रानड्याचे ते मित्र होते. त्यानी संस्कृत-मराठी धातुकोश व इंग्रजी-मराठी कोश असे दोन कोशही प्रसिद्ध केले होते. शास्त्रीबोवा त्या काळीं इंदुप्रकाश वर्तमानपत्राच्या संपादकमंडळात होते, व इंदुप्रकाश छापखान्याचे भागीदार होते; पुढें ते छापखान्याचे मालकही झाले. त्यामुळें गाथा त्या छापखान्यात छापिली गेली असावी शास्त्रीबोवांच्या विशेष माहितीकरिता श्रीधर सखाराम पंडित यानीं लिहिलेलें 'विष्णु परशुराम शास्त्री पंडित यांचें चरित्र' (१९३६) हें पुस्तक पहावें.

८ निबंधमाला, अंक ४५.

व क्रम ठरविण्यांत आले. देहू भागांतील व पंढरपूर परंपरेंतील असे दोन्ही पाठ तपासून गाथेचें संपादन केलें हेच या गाथेचें खरें वैशिष्ट्य होय. आजतागायत हा असा एकच प्रयत्न झाला कीं संपादकांनीं महत्त्वाच्या सर्व उपलब्ध हस्तलिखितांतील पाठक्रमादि तपासून संशोधित संहिता तयार केली. संपादकांनीं कोणतीं हस्तलिखितें तपासलीं, व कोणत्या पद्धतीला अनुसरून काम केलें, याचा थोडक्यांत गोषवारा[१] येथे दिला पाहिजे.

९. संपादकांपाशीं चार हस्तलिखितें होतीं. तीं येणेप्रमाणें:—(१) देहू प्रत; हिचा निर्देश "दे" या अक्षरानें केला आहे. ही प्रत खुद्द तुकारामाच्या घराण्यांतून मिळविली होती, व त्या घराण्यात वंशाचें धन म्हणून ती जतन करून ठेविली होती. तुकारामाचा ज्येष्ठ पुत्र महादेवबावा याच्या हातची ही प्रत होती असे संपादकांस सांगण्यांत आलें होतें व म्हणून (त्या वेळीं) ती दोनशे वर्षांपूर्वीची असावी असे त्यांस वाटलें. (२) तळेगांव प्रत; हिचा निर्देश "त" या अक्षराने केला आहे. ही त्रिंबक कासार याच्या हातची होती. या त्रिंबक कासाराने तुकारामाचे व इतर विठ्ठलभक्तांचे अभंग गोळा करून ते सुव्यवस्थित रीतीने लिहून काढण्यांत आपल्या आयुष्याचीं चाळीस वर्षें खर्चीं घातलीं होती. या प्रतींत १७०९ शकेची (इ. स. १७८७) नोंद होती. (३) पंढरपूर प्रत; हिचा "पं" या अक्षराने निर्देश केला आहे. पंढरपुरांतील एका मठाचे अधिपति गंगूतात्या यांनी ही प्रत स्वतः शुद्ध केली होती व इतर मठाधिपतींकडून ती आणखी शुद्ध करून घेतली होती. ही गाथेची आधुनिक प्रत होती. (४) कडूस प्रत; हिचा निर्देश "क" या अक्षराने केला आहे. कडूसचे ब्राह्मण घराणें मवाळ यांजकडून ही प्रत मिळविली होती, पण संपादकांना ती फार वेळ ठेवतां आली नाहीं. वर परिच्छेद ३ मध्ये उल्लेखिलेला तुकारामाचा टाळकरी लेखक गंगाधर मवाळ याच्या हातची ही प्रत होती असे संपादकांस सांगण्यांत आले होते.

१०. देहू आणि तळेगांव या प्रतींची मूळपीठिका एकच असे संपादकांस आढळून आलें. दोन्ही प्रतींत अभंगांचा क्रम एकच होता; व ज्या स्थळी तो मूळांत भिन्न होता त्या स्थळीं देहू प्रतींत दुरुस्ती करून तळेगांव प्रतीतील क्रम स्वीकारिला होता. असें असलें तरी देहू प्रत किंवा तळेगांव प्रत ह्या एकमेकींच्या नकला मात्र नव्हत्या. कडूस प्रतींतील क्रम आणि शुद्धलेखन इत्यादि देहू प्रतीप्रमाणेंच होतें. ज्या हस्ताक्षरांत कडूस प्रत बहुतांशीं लिहिलेली होती, तेच हस्ताक्षर कधींकधीं देहू प्रतींत आढळले; तर ज्या हस्ताक्षरांत देहू प्रत बहुतांशीं लिहिलेली होती तें हस्ताक्षर कधींकधीं कडूस प्रतींत आढळलें. या कारणांमुळे संपादकांस असे दिसून आले कीं देहू व कडूस प्रतींचे लेखक समकालीन असले पाहिजेत; व या प्रती अनुक्रमे महादेवबावा व गंगाधर मवाळ—जे दोघे समकालीन होते—यांनीं लिहिल्या होत्या ह्या परंपरागत माहितीला पुष्टि मिळाली. पंढरपूरच्या प्रतीची मूळपीठिका अगदी भिन्न होती. देहू व तळेगांव प्रतातील क्रमापेक्षां पंढरपूर

---

[१] मूळ इंग्रजी प्रस्तावनेचा ("Critical Preface"चा) हा गोषवारा आहे; ती संपूर्ण Preface प्रकाशलेखन पद्धतीनें पुनर्मुद्रित करून दुसऱ्या भागाच्या परिशिष्टात दिली आहे.

प्रतींतील अभंगांचा क्रम बराच भिन्न होता; व तिच्या पाठांतही पुष्कळ फेरफार आढळले. ती प्रत अगदीं अलीकडील होती; व मधूनमधून मूळच्या अभंगांना आधुनिक स्वरूप दिले होते. एकंदरींत देहू व तळेगाव प्रतींपेक्षा पंढरपूर प्रत कमी शुद्ध होती.

११. संपादकांनीं तळेगांव प्रतीचा अभंगक्रम स्वीकारिला; कारण तो त्यांना अस्सल वाटला व देहू प्रतींत सुद्धां दुरुस्त्या करून तोच क्रम आदरिला होता. कडूस प्रतींतील क्रम देखील देहू प्रतीसारखाच होता. पाठाचा निर्णय करितांना देहू, तळेगांव व पंढरपूर या तीन प्रतींपैकीं अधिक प्रतींत जो पाठ मिळाला तो शक्य तोवर संपादकांनीं स्वीकारिला; व जो स्वीकारिला नाही तो तळटीपेत नमूद करून ठेविला. जोंवर कडूस प्रत उपलब्ध होती तोवर पाठनिर्णयाकरितां तीही प्रत वापरण्यांत आली होती. क्वचित् स्थळीं एकाच प्रतींतला पाठ संपादकांना ग्राह्य वाटला; कारण इतर पाठ एक तर अर्थशून्य होते, किंवा ते लेखकाच्या हस्तदोषामुळे उद्भवले होते. तथापि हे न स्वीकारिलेले पाठ सुद्धां तळटीपांत नमूद करून ठेविले आहेत. वादग्रस्त स्थळीं निर्णय करतांना देहू प्रतीला जास्त महत्त्व देण्यांत आले; कारण पाठ आणि शुद्धलेखनाच्या बाबतींत ती सर्वांत अधिक शुद्ध होती. संपादकांनीं असा शेरा मारिला आहे कीं, जुनीं मराठी हस्तलिखिते एकंदरींत जीं अशुद्ध लिहिलेलीं असतात त्या मानाने देहूची प्रत बरीच शुद्ध होती. कित्येक स्थळी पंढरपूर प्रतीचे पाठ अर्थशून्य होते किंवा भलताच अर्थ प्रतीत करीत, तर देहू प्रतीतील पाठ अगदीं अन्वर्थक होते.

१२. शब्द तोडून व शुद्धलेखनाच्या सर्वमान्य नियमांना अनुसरून संपादकांनीं गाथा छापिली. देहू प्रत, व अभंग म्हणण्याची वारकऱ्यात मान्य झालेली "संहिता" पद्धति, ह्यांची शुद्धलेखनाला अनुकूलता होतीच असे संपादकांचे म्हणणें आहे. तरी पण तुकारामाचे विशिष्ट प्राकृत शब्द व संस्कृत शब्दांचे अपभ्रंश त्यांनीं जसेच्या तसेच ठेविले. सरतेशेवटीं संपादकांनी असे नमूद केले आहे की, शब्द किंवा अभंग जरी अश्लील भासला तरी तो न गाळतां तुकारामाचे लिखाण मूळाबरहुकूम छापावयाचें ठरले होते; व या बावतींत डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांची सल्ला घेतली जात असे, कारण शेवटचा निर्णय सरकारनें त्यांजवर सोपविला होता.

१३. येणेप्रमाणे उपलब्ध हस्तलिखितांवरून तारतम्यानें, पण तुकारामाच्या मूळ लिखाणांत ढवळाढवळ न करतां, गाथेची ही आवृत्ति तयार करण्यांत आली. अभंगांचा क्रम—ज्याला "ओळ" म्हणतात तो—देहू, तळेगांव व कडूस ह्या प्रतींत सारखाच होता, व म्हणून तो स्वीकारण्यांत आला. मूळाप्रमाणे अभंगांचे जेथें गट होते तेथें त्या गटांतील संख्या गटाच्या शेवटीं आंकडे घालून दर्शविली आहे. क्रम फिरवून विषयवारांप्रमाणें, कांहीं आधुनिक छापील गाथ्यांत केलें आहे त्याप्रमाणें, वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केला नाहीं. प्रतींच्या बहुमतानें, किंवा कांहीं स्थळीं सरस म्हणून, पाठ निवडलेले असले तरी यच्चयावत् पाठांची तळटीपांत नोंद आहे; म्हणजे अभ्यासकाला स्वतःची निवड करण्यास वाव ठेविला आहे. सर्व सांप्रदायिक परंपरांचा या गाथेंत समावेश झाला आहे. वारकऱ्यांतील

विशिष्ट फडाच्या किंवा संप्रदायाच्या सर्वच अभिमान्यांना ही शंभर टक्के मान्य होणे अर्थातच शक्य नव्हते ; तथापि त्या काळीं वारकऱ्यांत प्रमुख मानले जाणारे भाऊ रामचंद्र काटकर सोलापुरकर यांनीं ही गाथा देहू मुक्कामी पाहून ती शुद्ध आहे व सर्वांनी घेण्यास योग्य आहे असे स्वदस्तुरचें प्रमाणपत्र दिले होतें.[१०]

१४. अनाग्रही अभ्यासकांनी या गाथेचा आजवर गौरवच केला आहे. वानगीदाखल तीन-चार प्रातिनिधिक अवतरणे या ठिकाणी उद्धृत करणे अप्रस्तुत होणार नाही. सुप्रसिद्ध संशोधक श्री. दत्तो वामन पोतदार यांच्या मते "आज बाजारांत शंकरपांडुरंगी उर्फ जुनी इंदुप्रकाशी. नवी इंदुप्रकाशी, आवटी, सांप्रदायिक आर्यभूषणी, जोगी, माडगांवकरी, निर्णयसागरी वगैरे संहिता मिळतात. त्यांत शंकरपांडुरंगी प्रत सर्वांत वाखाणण्यासारखी आहे, व बाकीच्या संहिता या जुन्या इंदुप्रकाशी गाथ्याच्याच बहुंशीं नकला आहेत व राहिलेल्या कांहीं मात्र सांप्रदायिक आहेत.[११]" पांगारकरांनी आपल्या तुकारामचरित्राच्या प्रस्तावनेंत "छापील गाथ्यांत हाच गाथा सर्वोत्तम आहे" असे म्हटले आहे. तुकारामाच्या इंग्रज अभ्यासकांनी हीच गाथा प्रमाणभूत मानून तिचेंच भाषांतर केले. तुकारामाचा इंग्रजी चरित्रकार एड्वर्ड्साहेब याने या गाथेचे "सर्वजनमान्य" असे वर्णन केले आहे.[१२] सरतेशेवटी ज्यांनीं परिच्छेद ३ मध्ये वर्णिलेल्या संताजी तेली जगनाड्याच्या वहीवरहुकूम "तुकारामबुवांचा अस्सल गाथा" छापिला त्या साक्षेपी संशोधक श्री. विनायक लक्ष्मण भावे यांना या गाथेवर कठोर टीका करतांना सुद्धां असे कबूल करावे लागले कीं, एकंदरीच्या मानाने फार मेहनतीने, काळजीपूर्वक निरनिराळे पाठभेद देऊन ही गाथा तयार केली आहे.[१३]

१५. स्वत: छापिलेल्या गाथेच्या "अस्सलपणाच्या" अभिनिवेशाच्या भरांत भाव्यांनीं प्रस्तुत गाथेवर जी निराधार व बहुंशीं विपर्यस्त टीका केली आहे तिचे येथे निराकरण करणे क्रमप्राप्त आहे. कारण या गाथेविषयी त्यांनी निर्माण केलेले गैरसमज अवश्य दूर केले पाहिजेत. भाव्यांचे असे म्हणणे आहे कीं "प्रस्तावनेंत शेवटच्या वाक्यांत उल्लेखिलेल्या सरकारी सूचनेची म्हणजे faithfully to reproduce the text of Tukáráma and not to leave out any word or verse, even where it appeared indecent या इषारतीची खोच या संपादकांच्या मुळींच लक्षांत आलेली दिसत नाहीं. शक्य तो यत्न करून तुकारामाच्या कवनाचे अस्सल वळण, ते कसेंहि असले तरी, तसेच कायम ठेवावयाचे ही महत्त्वाची बाब लक्षांत न घेता, हातीं आलेल्या

---

१० हे प्रमाणपत्रही दुसऱ्या भागाच्या परिशिष्टात दिले आहे.

११ "तुकारामाची जगनाडी संहिता" द वा. पोतदार. भा. इ सं. मं. पंचम संमेलनवृत्त, शके १८३९, पान ७४, ७६.

१२ तुकारामबोवाचा सेतु—जे. एफ् एड्वर्ड्स् (१९३२), पान २१.

१३ तुकारामबुवाचा अस्सल गाथा, भाग १—२. विनायक लक्ष्मण भावे. प्रस्तावना, पान ३. यापुढें भाव्याच्या नावानें उद्धृत केलेला मजकूर याच प्रस्तावनेंतील आहे.

प्रती आपल्या अकलेप्रमाणे मखलाशी लढवून "शुद्ध करण्याच्या" भानगडींत हे संपादक पडले आहेत. या कारणाने अस्सलपणाच्या दृष्टीनें हा ग्रंथ किती कवडीमोल झाला आहे हें ज्याला शिवकालीन मराठी हस्तलेखांचा थोडासा तरी परिचय आहे त्याच्या सहज लक्षांत येईल." तसेच भावे पुढे म्हणतात कीं, "आतां ही गाथा ज्या रूपांत छापली गेली आहे त्याबद्दल इतकेच म्हणावयाचे आहे कीं, यांतील शब्द व शब्दांची रूपे पार पालटून अर्वाचीन केलीं गेलीं आहेत. तसेच या प्रतीच्या प्रकाशकांनीं मूळ अभंगांचे लेखनहि आपले समजुतीप्रमाणे सुधारून व दुरुस्त करून शुद्ध केले आहे." भावे जिला सरकारी सूचना किंवा इषारत म्हणतात ती तशी नसून सरकारनें ज्यांच्यावर निर्णय सोंपविला होता त्या डायरेक्टरांच्या सल्ल्याने संपादकांनींच ठरविलेले धोरण होतें हे मूळ वाक्यावरून स्पष्ट होते. या धोरणाची खरी "खोच" अश्लील समजल्या जाणाऱ्या भागाविषयीं होती. शंकर पांडुरंग पंडित हे कांही साधेसुधे पदवीधर नव्हते. हस्तलिखितांवरून संहिता कशी तयार करावयाची याची शास्त्रशुद्ध पद्धति त्या काळीं त्यांच्या इतकी फारच थोड्या विद्वानांना अवगत असेल हे त्यांनी संस्कृत, प्राकृत, वैदिक ग्रंथांच्या ज्या अनेक संहिता तयार केल्या त्यांवरून जगजाहीर झाले आहे. शिवाय ग्रँटसाहेबासारख्या तुकारामप्रेमी व्यासंगी अधिकाऱ्याने सरकारी "सूचनेचा" अनादर होऊं दिला नसता. हस्तलिखितांतले शब्द व रूपे पालटलीं, किंवा मूळ अभंगाचे लेखन आपल्या अकलेप्रमाणे मखलाशी लढवून सुधारून व दुरुस्त करून "शुद्ध" केलें असे संपादकांनी कोठेच म्हटले नाहीं; व मूळची हस्तलिखिते समोर नसल्यामुळें भाव्यांच्या ह्या विधानाला संपादकांच्या म्हणण्याखेरीज दुसरा आधार असणे शक्य नाहीं. मराठी मुखपृष्ठावरील "विष्णु परशुराम शास्त्री पंडित यांनी शंकर पांडुरंग पंडित यांच्या साह्याने शुद्ध करून छापण्याकारितां तयार केली" या मजकुरांतील "शुद्ध करून" या शब्दप्रयोगानें भाव्यांनीं आपला निष्कारण गैरसमज करून घेतला आहे. "शुद्ध करून छापण्याकारितां तयार केली" हा शब्दप्रयोग इंग्रजी मुखपृष्ठावरील "edited" या शब्दाचा समानार्थक म्हणून वापरिला आहे हे उघड आहे.[१४] ह्याचा अर्थ असा नव्हे की भाव्यांना वाटले त्या तऱ्हेच्या दुरुस्त्या, सुधारणा, फेरफारादि उलटापालटी संपादकांनीं केल्या. शब्द तोडले व सर्वमान्य शुद्धलेखनाचे नियम पाळले हे संपादकांनी जाहीर केलें आहे; व त्याचे कारणही त्यांनी दिले आहे तें हे की, देहू प्रत व वारकऱ्यातील प्रमुखांनी मान्य केलेली अभंग म्हणण्याची 'संहिता' पद्धति हीं दोनही शुद्धलेखनाच्या नियमांना अनुकूलच होती. तरी पण संपादकांनीं स्पष्ट खुलासा केला आहे की तुकारामाचे विशिष्ट प्राकृत शब्द व संस्कृत शब्दांचे अपभ्रंश जसेच्या तसेच ठेविले आहेत. तळटीपांकडे लक्ष दिले असतां हें सहज कळेल कीं संपादकांनीं बारीकसारीक सुद्धां फेरफार करण्याचें टाळलें आहे. संताजीच्या वहीतलें शुद्धलेखन म्हणजेच तुकारामाचें शुद्धलेखन, व तें शिवकालीन आदर्शलेखन, हीं समीकरणेच आधीं चुकीची आहेत; व तसल्या लेखनांच्या अभावीं संहिता कवडीमोल ठरवावयाची असेल तर आज प्रचलित असलेले एकनाथी भागवत, वामनी ग्रंथ, व बहुशीं रामदासी ग्रंथ हातांतच धरावयास नकोत.

---

१४ मूळचीं दोन्ही मुखपृष्ठें दुसऱ्या भागाच्या परिशिष्टात दिलीं आहेत.

तुकाराम अडाणी होता व त्याला शुद्ध लिहितां येत नसे म्हणून त्याचें अस्सल लिखाण शुद्धलेखनाला अनुसरून असणेंच असंभवनीय असें जर भाव्यांना सुचवावयाचे असेल तर गोष्ट निराळी. "घे गे वाइले लिहिले" इत्यादि अभंग व "बालबोध अक्षरें लिहावी पाही। हा मागें अभ्यास नव्हता कांहीं। कोऱ्या कागदांची करूनि वही। **स्वमती लिही आपुल्या।**" हे महिपतीचें अवतरण तळटीपांत देऊन सुद्धा "तुकारामास लिहितां येत होतें हे अगदीं निःसंशय आहे, परंतु स्वतःचेंच कवित्व तो लिहून ठेवीत असेल असे वाटत नाहीं," ह्या भाव्यांनीं काढिलेल्या निष्कर्षाएवढाच तुकारामाच्या शुद्धलेखनाविषयींचा त्याचा तर्क अप्रतिष्ठ आहे. अंव्रुत, नारायेण, काये, दरुपण इत्यादि रूपें तशींच न छापल्यामुळें शिवकालीन सोवळ्या पंक्तीत भ्रष्टाकार होतो असें वाटत नाहीं. परमाणूचा पर्वत करण्यासारखे हे कांहीं—पांगारकराचा शब्द योजावयाचा म्हणजे—"डोंगराएवढे" फेरफार नाहींत. शिवाय हे ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं तुकारामाचे अभंग कांहीं पढिक विद्वानांकरिता बंदिस्त पुस्तकांत बंदीत घालून ठेविलेले नव्हते. ते पाठ म्हणण्याची वारकऱ्यांत अखंड परंपरा होती. ह्या "संहिता" परंपरेचें महत्त्व ओळखून तिला अनुसरून शुद्धलेखन छापिलें यात संपादकांनीं संशोधनाचा अपराध केला असें म्हणतां येणार नाहीं. सारांश, प्रस्तुत गाथेत संपादकांनीं तुकारामाचीं अस्सल शब्द-रूपें अबाधित राखिलीं आहेत; व त्यांनी मूळ अभंगाचें लेखन सुधारिलें किंवा दुरुस्त केलें हा भाव्यांचा अवास्तव आरोप सर्वस्वी निराधार आहे.

१६. भाव्यांनी असेंही भासवावयाचा उठावदार प्रयत्न केला आहे कीं ज्या देहू, तळेगांव, व कडूस प्रतींवर ही गाथा आधारिली आहे त्या प्रतीच मुळीं अलीकडल्या होत्या. आपला नाहक गैरसमज करून घेतल्यामुळें त्यांना हा आभास झाला. देहू आणि तळेगांव या दोनही प्रती दुर्दैवानें आज उपलब्ध नसल्यामुळे त्या स्वतः तपासून अनुमानें काढणें अशक्य झालें आहे. "असें सांगतात," "असें दिसतें," इत्यादि सावधगिरीचे शब्द योजून शंकर पांडुरंग पंडितासारख्या संशोधकानें या प्रतीचें जे वर्णन केलें आहे तें यथातथ्य मानून आपण परमार्थानेंच घेतलें पाहिजे. भाव्यांच्या तर्कालाही त्या व्यतिरिक्त दुसरा आधार नव्हता. देहू प्रत ही तुकारामाच्या हयातीतच लिहिली होती असें विधान संपादकांनीं कोठेंच केलें नाहीं. महादेवबावाचें वय लक्षांत घेतां ती प्रत तुकारामाच्या निर्याणानंतरच केली असली पाहिजे हे उघड आहे. ती महादेवबावाच्या हातची नसून अगदीं अलीकडील व फार कमी दर्जाची होती हे शाबीत करण्याकरितां भाव्यांनी खालील कारणें दिलीं आहेत—(१) "महादेवबावाचा विशेष ओढा भक्तिमार्गाकडे होता असें दिसत नाहीं." (२) "महादेवबावानें तुकोबाचे अभंग लिहिलेले असते तर महिपतीला ही गोष्ट खास कळली असती, व तो तसा उल्लेख आपल्या ग्रंथांत अवश्य करता." (३) "या देहू प्रतीसंबंधीं संपादक आणखी असें लिहितात कीं, ही प्रत एकाच हस्ताक्षरानें लिहिलेली नसून हींत एकापेक्षां जास्त अशीं भिन्न भिन्न हस्ताक्षरें आढळतात. शिवाय या प्रतींतील शब्द तोडलेले आहेत (words have been separated by spaces) आणि हिचें लिखाण शुद्धलेखनाच्या (इ. स. १८६९ मधील?) सर्वमान्य

नियमांप्रमाणें बिनचूक आहे. मला वाटतें कीं, या वर लिहिलेल्या बाबी ही वही अगदीं अलीकडली आहे हे निभ्रांतपणे सिद्ध करण्यास पुरेशा आहेत." (४) "एकंदरींत ही देहूची हस्तलिखित प्रत एक-हाताने लिहिलेली नसून तींत एकापेक्षां जास्त वळणे आहेत, असे संपादक लिहितात. शिवाय या प्रतींत दुरुस्त्याहि केलेल्या आहेत. म्हणजे मूळ प्रत अगदीं निर्भेळ अस्सल व शुद्ध नसून तींत दुरुस्ती करणे हे त्या लेखकास अवश्य वाटले होते. या अशा अंत:स्थ बाबीवरून या गाथेच्या संपादकांस देहू येथें मिळालेली प्रत बावनकशी नसून फार कमी दर्जाची होती हे उघड दिसते."

१७. या चार मुद्द्यांपैकीं दोन केवळ वादाकरितां उपस्थित केलेले अतएव फोल, आणि दोन केवळ विपर्यस्त समजासुळे उद्भवलेले म्हणून गैरलागू आहेत. तुकारामाने मुलांना संपत्तीचा वारसा कांहीं ठेविला नव्हता. पण ज्या अमोलिक काव्यसंपत्तीची कीर्ति सगळ्या महाराष्ट्रभर पसरली होती तिचा "ज्येष्ठभाग" म्हणून तरी महादेवबावाने स्वत:ची प्रत तयार करणे यांत अस्वाभाविक असे काहीच नाहीं. भगवद्भक्तीपेक्षां पितृभक्तीच्याच प्रेरणेने हे कार्य कोणाही सुपुत्राने केले असते. या गोष्टीचा महिपतीने उल्लेख करावा अशी भाव्यांची अपेक्षा कां होती हे कळत नाहीं. तुकारामाच्या हयातीत टाळकरी व लेखक म्हणून जे त्याची सेवा करीत त्यांचाच महिपतीने उल्लेख केला आहे. महादेवबावा हा तुकारामाचा लेखक होता असे संपादकांचे, नव्हे कोणाचेच, म्हणणे नाही. तुकारामाच्या निर्याणानंतर त्याच्या लिखाणाच्या प्रती कोणी उतरून काढिल्या या विषयाकडे महिपतीला लक्ष देण्याचे प्रयोजनच नव्हते. भाव्यांनीं वर दिलेल्या तिसऱ्या मुद्द्याची उभारणी संपादकांच्या इंग्रजी निवेदनाच्या विपरीत समजावर केली आहे. देहू प्रतींत शब्द तोडलेले आहेत व तिचे लिखाण (संपादनकाळातील) प्रचलित शुद्धलेखनाच्या सर्वमान्य नियमांप्रमाणे बिनचूक आहे हे वर्णन संपादकांच्या अंगीं चिकटविण्यांत भाव्यांनी केवळ अन्याय केला असे म्हणण्यापेक्षां इंग्रजी वाक्यप्रणालीचा अर्थ त्यांच्या ध्यानीं आला नाहीं असे म्हणणे कदाचित् अधिक न्याय्य होईल. हे वर्णन गाथेच्या छपाईचे आहे, देहू प्रतीचें नव्हे, हे उघड आहे; व "देहू प्रत व अभंग म्हणण्याची वारकऱ्यांची 'संहिता'पद्धति ह्या दोहोंची शुद्धलेखनाला अनुकूलता होती" या लगेच पुढे आलेल्या वाक्याने ते आणखी स्पष्ट केले आहे. तसेच एकापेक्षां जास्त अशी भिन्न भिन्न अक्षरे देहू प्रतींत आढळतात हे विधान अतिव्याप्तीने दूषित झाले आहे. संपादकांनीं एवढेच नमूद केले आहे कीं, देहू प्रतीच्या लेखकाचे हस्ताक्षर कधींकधीं कडूस प्रतींत व कडूस प्रतीच्या लेखकाचे हस्ताक्षर कधींकधी देहू प्रतींत आढळतें. हस्ताक्षरांचा हा अन्योन्यसंबंध लेखकांचें समकालीनत्व दाखविण्यासाठीं सांगितला आहे. देहू प्रतींत अभंगांच्या क्रमात दुरुस्त्या केल्या आहेत त्या मूळ लेखकाच्या हस्ताक्षरांत आहेत किंवा कसें हें संपादकांनीं सांगितलें नाहीं. कदाचित् तळेगांव प्रतीला अनुसरून त्या मागाहून केल्या असे जरी गृहीत धरले तरी तेवढ्यानें मूळ लिखाणाच्या प्राचीनत्वाला बाध येत नाहीं. त्रिंबक कासारानें संशोधनाचे परिश्रम करून ठरविलेला अभंगक्रम देहू प्रत ज्यानीं जतन करून ठेविली होती त्यांना अधिक ग्राह्य वाटला असेल. आपण

तळेगांव प्रतीचा क्रम स्वीकारिला, व तो देहू प्रतीच्या मूळच्या क्रमापेक्षां कांहीं स्थळीं भिन्न होता, हे संपादकांनीं स्पष्ट केलें आहे. पण त्यामुळे देहू प्रतीचा अस्सलपणा गौण कसा होतो व तिचा दर्जा कमी कसा ठरतो हें समजत नाहीं. असो. संपादकांनीं ही प्रत नक्की महादेवबावाच्या हातचीच होती असा दावा छातीठोकपणे मांडला नाहीं. तुकारामाच्या वंशांत ती जतन करून ठेविली होती या गोष्टीचे महत्त्व आपण विसरतां कामा नये. निजधनाचा अभिमान धरणाऱ्यांनीं सुद्धां ती तुकारामाच्या नांवावर खपविण्याचा प्रयत्न केला नाही. सपादकांना गंगाधर मवाळाच्या प्रतीशी ती समकालीन दिसली. अशा परिस्थितींत कुळांत चालत आलेली परंपरा खोटी म्हणून दूर सारण्यास प्रबळ प्रमाणे पाहिजेत.

१८. कडूस प्रतीविषयीं सुद्धां भाव्यांनीं वरील प्रकारचींच चुकीचीं व संशयग्रस्त विधानें केली आहेत. ती प्रत गंगाधर मवाळाच्या हातची समजली जात असे हे पुरे माहीत असून सुद्धां "कडूस येथील कोणा मवाळ नांवाच्या ब्राह्मण कुटुंबांतील" असें आरंभींच तिचे वर्णन करून पहिल्या भेटीलाच ओळख न दाखवून तिची प्रतिष्ठा कमी करण्याचा भाव्यांनी प्रयत्न केला आहे. पुढे त्या प्रतीचा विस्ताराने विचार करतांना जी संशयखोर आणि मोठीं चमत्कारिक विधाने भाव्यांनीं केलीं आहेत, त्यांचा मुख्य हेतु हाच दिसतो कीं स्वत: पुरस्कृत केलेल्या संताजीपेक्षां तुकारामाचा लेखक म्हणून श्रेष्ठ मानला गेलेला जो गंगाधर मवाळ त्याच्या लिखाणाचा प्रस्तुत गाथेने थोडासा घेतलेला आधारही हिरावून घ्यावा. भावे म्हणतात:—"चौथी म्हणजे कडूस येथील प्रत. ही चौदा टाळकऱ्यांपैकी गंगारामबुवा मवाळ यांचे येथील प्रत होय. प्रत म्हणण्यापेक्षां "एक वही" असे म्हणणे सत्याला जास्त धरून होईल. कारण संपादकांना सर्व वह्या न मिळतां मवाळाकडून एकच वही, आणि तीहि कांहीं दिवस, मिळालेली दिसते. हिचा भाग १ पृ. ७४२ अभंग २२४७ या छापील गाथ्याच्या दोन्ही भागांत मिळून पृ. १२९ ते पृ. ३२४ म्हणजे सुमारे दोनशे पृष्ठांपुरताच मधून मधून कांहीं पाठभेद दाखल करण्यापुरता उपयोग केलेला दिसतो.[१५] पण संपादकाच्या म्हणण्याप्रमाणे त्यांना मिळालेल्या कडूस येथील वहींतील अक्षराचे वळण सर्वभर येथून तेथून एक नसून कांहीं ठिकाणीं भिन्न भिन्न आहे. म्हणजे हीहि प्रत गगाधरबुवा मवाळ यांचेच हातची अस्सल असेल असे दिसत नाहीं. मवाळांच्या येथे असलेल्या वहीला अजूनहि ते ओवळ्याने शिवूं देत नाहींत. तेव्हा त्यावेळीं तरी त्यांनी त्यांच्या येथील अस्सल प्रत या संपादकांचे स्वाधीन केली असेल असे मुळींच वाटत नाहीं. फार तर एखादी नक्कल त्यांनी कांहीं दिवस दिली असावी. कोणी सरकारी नोकरामार्फत हस्तलेख मिळविण्याचा यत्न केला असतां महाराष्ट्रांत काय काय प्रकार घडतात याचा अनुभव संशोधकांना आहेच. मवाळांच्या प्रतीसंबंधे पुढे थोडे लिहावयाचे आहेच. तेव्हा तूर्त इतकेच म्हणून ठेवतो की, मवाळांकडील अस्सल प्रत या गाथेच्या संपादकांस मिळालेली दिसत नाहीं; आणि कदाचित ती मिळाली असली तरी तिचे महत्त्व त्यांचे मनांत नीटसे उतरले नाहीं, व तिचा योग्य उपयोग त्यांनीं करूनहि घेतला नाहीं."

---

१५ मूळात हें वाक्य असेंच छापलेले आहे.

१९. सत्यदुष्ट आणि तर्कदुष्ट वादाचा असला दुसरा नमुना क्वचितच पाहावयास मिळेल. संपादकांना गंगाधर मवाळाची समग्र प्रत मिळाली नसून एकच वही मिळाली होती हे अजब "सत्य" भाव्यांना कोठे गवसले कोण जाणे ! मवाळ मंडळी पूजेतील प्रत बाहेर द्यावयास नाखूप असतात ही गोष्ट खरी ; म्हणूनच संपादकांस ती अधिक वेळ जवळ ठेवितां आली नाहीं. भावे सुचवितात त्याप्रमाणें जर संपादकांकडे नक्कलच दिली होती तर ती बेमुदत ठेवण्यास कांहींच हरकत नव्हती. पंढरपूरच्या गाथेची नक्कल मिळाली असे ज्यांनी प्रांजलपणें लिहिले त्यांनी मवाळाच्या प्रतीचीहि नक्कलच होती हे लपवून कां ठेवावे ? व असली सत्याची छपवेगिरी त्यांच्या पदरीं बांधावयास आधार काय ? विष्णुशास्त्री पंडित हे त्या काळीं सरकारी नोकर नव्हते हे भावे विसरलेले दिसतात. व सरकारी नोकरांनीं हस्तलिखितें मिळविण्याकरितां केलेल्या प्रयत्नांविषयींच्या वक्रोक्तीने या बाबतींत मवाळ घराण्याच्या सत्यनिष्ठेची व पंडितद्वयाच्या सुज्ञतेची विनाकारण टवाळी झाली आहे. संपादकांना या प्रतीचें महत्व नीटसे कळले नव्हते, व त्यांनीं तिचा योग्य उपयोग करून घेतला नाहीं ही टीका अगदीं असमर्थनीय आहे. गंगाधर मवाळाच्या हस्तलेखाचे महत्त्व संपादकांनीं पूर्णपणें जाणिले होते ; त्यांनीं ती प्रत काळजीपूर्वक तपासून अभंगांचा क्रम, लेखनपद्धति, हस्ताक्षर इत्यादि बाबींबद्दल आपली खात्री करून घेतली ; पण अधिक वेळ ती वापरावयास मिळाली नाहीं म्हणून त्यांचा निरुपाय झाला. दोनशे पृष्ठांत कडूस प्रतींतील पाठ किती ठिकाणी दिले आहेत हे वाचकांनीं स्वतः पहावे ; म्हणजे "अधून मधून कांहीं पाठभेद" देण्यापुरताच त्या प्रतीचा उपयोग केला हे भाव्यांचे विधान येथवर परामर्श घेतलेल्या त्यांच्या इतर कित्येक विधानांप्रमाणेच शब्दलाघवी आहे याची त्यांस खात्री पटेल.

२०. कडूस प्रतीच्या अस्सलपणाची व गुणावगुणांची चर्चा अन्यत्र विस्तारानें केली जाईल.[१६] या ठिकाणीं एवढेंच सांगितले म्हणजे पुरे कीं खुद्द भाव्यांनी या प्रतीतले कांहीं कांही पाठ चांगले आहेत हे कबूल केलें आहे. आज उपलब्ध असलेली कडूस प्रत जुन्या एखाद्या वहीवरून नकललेली असावी असे जरी त्यांचे मत असले तरी असल्या सर्व जुन्या नकला तुकारामबावांनी अभंग कोणत्या क्रमाने रचिले असावेत त्या क्रमासंबंधीं तर्क बांधण्यास फार उपयोगी आहेत हेही त्यांना मान्य आहे. कडूस प्रतीचा क्रम देहू प्रतीप्रमाणेच होता. तेव्हां क्रमाच्या बाबतींत तरी सर्वसाधारण जुनी परंपरा प्रस्तुत गाथेने स्वीकारिली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

२१. तळेगांव प्रतीत देखील बहुशः तोच क्रम सांपडला. "ती नीटनेटकी लिहिली असल्यामुळे तिचाच मुख्यत्वे उपयोग करणे संपादकांस फार सोयीचे, कमी मेहनतीचे, व साधारणपणे सोपे असे वाटले" हें भाव्यांचे निदान पंडितद्वयासारख्या विद्वज्जनांविषयी ऋजुता दर्शवीत नाहीं. त्रिंबक कासार हा तुकारामानंतर सुमारे शंभर वर्षांनीं (इ. सन १७५० च्या पुढे) साक्षेपी संशोधक म्हणून प्रसिद्धि पावलेला लेखक होता असे दिसतें. तो तळेगावचा असल्यामुळे, देहू व आसमंतातील प्रदेशांत उपलब्ध

१६ पुढे परिच्छेद २९ मध्यें उल्लेखिलेल्या तुकारामचरित्रात.

असलेली हस्तलिखितें त्याच्या अवलोकनात आलीं असली पाहिजेत. ज्यानें अभंग गोळा करण्यांत चाळीस वर्षे घालविलीं त्याने तुकारामाच्या लेखकांनीं तयार केलेल्या प्रती किंवा अबाजी सारख्याकडे असलेला संग्रह हे तपासून पाहिले नसतील हे संभवत नाही. "अर्थात्, अभंग मिळाले तसे उतरून न घेता त्रिंबकाने आपल्यास योग्य वाटली तशी ढवळाढवळ करून (तळेगांव) प्रत तयार केली" या भाव्यांच्या अनुमानाला दोषान्वेषणाशिवाय दुसरा आधार दिसत नाहीं. देहू भागात त्रिंबक कासाराची प्रतिष्ठा मोठी होती असे दिसते. त्रिंबक कासारानें शके १७११ मध्ये लिहिलेली ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाची एक प्रत देहूचे श्रीधर नथुराम गोसावी यांजपाशीं आहे. "यथा प्रत्यय तथा लिख्यतं" अशी प्रतिज्ञा त्याने लिहून ठेविली आहे. तेव्हां त्यानें अभंगांच्या मूळच्या क्रमात किंवा पाठांत मनमानेल तशी ढवळाढवळ केली असेल हे सहसा संभवत नाहीं. देहू प्रतीत त्याचा क्रम मागाहून स्वीकारण्यांत आला. देहू प्रत जर पुढेमागे उपलब्ध झाली तर अस्सल क्रम ठरविण्यात तिच्या मूळच्या क्रमाचा उपयोग करतां येईल. पाठनिर्णयाच्या वादग्रस्त स्थळीं देहू प्रतीलाच संपादकांनीं प्राधान्य दिले होतें.

२२. संपादकांचे निवेदन व भाव्यांनीं त्यावर घेतलेल्या आक्षेपांचे निराकरण यांतून निघणारा तात्पर्यार्थ आतां थोडक्यांत सांगतां येईल. जोवर (१) तुकारामाने स्वहस्तें लिहिलेली समग्र गाथा, किंवा (२) तुकारामाने स्वमुखे सांगितलेल्या काव्याची त्याच्या समक्ष लिहिलेली प्रत, किंवा (३) तुकारामाने पसंत करून मान्य केली होती असे लेखादि पुराव्यावरून निःसंशय शाबीत झालेली प्रत, या तिहींपैकीं कोणतेच साधन उपलब्ध नाहीं, तोवर जीं हस्तलिखिते तुकारामाच्या अधिकाधिक नजीक जाऊन पोचतात, व ज्याचे लेखक अस्सलाशीं प्रतारणा करण्याचा कमींतकमी संभव, अशा हस्तलिखितांवरच संशोधकांस विसंबून राहावे लागणार. प्रस्तुत गाथेला ज्यांचा आधार घेतला तीं तीन देहू, तळेगांव व कडूसचीं हस्तलिखिते या प्रकारच्या हस्तलिखितांतील सर्वोत्कृष्ट होती. पंढरपूर परंपरेच्या पाठादिकांचाहि या गाथेत परिपूर्ण अंतर्भाव केला आहे. तेव्हां या गाथेने तुकारामसंशोधनाचा भरभक्कम पाया घातला असेच म्हटले पाहिजे; पुढील संशोधनाची उभारणी याच पायावर करतां येईल. अभ्यासक्रमाला या गाथेवांचून कार्याचा आरंभच करतां यावयाचा नाहीं. विशेषतः देहू आणि तळेगांव या मूळ प्रती आज तरी उपलब्ध नसल्यामुळें त्यांचा उपयोग या गाथेमार्फतच काय तो करून घेतां येईल.

२३. पंडितांच्या या गाथेनंतर प्रसिद्ध झालेल्या गाथांत मूळ हस्तलिखितांवरून छापलेल्या अशा फक्त तीनच आढळतात. बाकी बहुतेक या गाथेवरच आधारलेल्या दिसतात. माडगांवकरांनीं मुंबईत १८८६ साली प्रसिद्ध केलेली गाथा यांपैकींच होय. सप्तऋषी व मोतीवाले (१८९६) यानीं "माडगांवकर व इंदुप्रकाशचे मालक याच्या गाथेच्या प्रतीचा वेळोवेळी उपयोग घडला" असे, व निर्णयसागर (१९०३) गाथेच्या संपादकांनीं "इंदुप्रकाशगाथेचा हे पुस्तक तपासताना फार उपयोग झाला" असे मान्य केले आहे. दामोदर सावळाराम आणि मंडळीने १९०२–३ सालीं याच इंदुप्रकाश गाथेंत दुबार झालेले अभंग कमी करून व त्यांत नसलेले इतर ठिकाणचे मिळवून एक

गाथा दोन भागांत छापिली. तुकाराम तात्यांनीं १८८९ सालीं मुंबईत दोन भागांत ८४४१ अभंगांची जी बृहत्-गाथा प्रसिद्ध केली तिला कोणत्या हस्तलिखिताचा आधार घेतला होता ते कळण्यास मार्ग नाहीं. प्रस्तावनेत त्यांनीं जे खालीलप्रमाणे निवेदन केलें आहे ते सारें मोघमच आहे:—"प्रस्तुत, पुष्कळ परिश्रम व शोध करून आम्हांस मिळालेल्या व पूर्वी कितीएक लहानमोठ्या पुस्तकांतून छापून प्रसिद्ध झालेल्या अभंगांचा या पुस्तकांत संग्रह केला आहे. अभंगांच्या जितक्या हस्तलिखित प्रती आम्हांस मिळाल्या त्यांत व वर लिहिल्याप्रमाणे पूर्वी छापून प्रसिद्ध झालेल्या अभंगसंग्रहात विषयाप्रमाणे निरनिराळी प्रकरणे पाडलेलीं नाहींत ..........." आवटे यांनी गाथापंचकांत छापिलेली गाथा "श्री नानामहाराज साखरे यांच्या संग्रहांतलि पुरातन हस्तलिखित वह्यांवरून पाठ दुरुस्त करून तयार केली" असे दिसते; पण ह्या पुरातन हस्तलिखितांचे वर्णन सांपडत नाहीं. विष्णुबोवा जोगानीं १९०१ सालीं तयार केलेली व आवटे यांनीं छापिलेली गाथा गणपत कृष्णाजीच्या गाथेवर आधारलेली दिसते. विष्णुबोवांनीं पुढे तयार केलेल्या आवृत्तींत सांप्रदायिक पाठांसंबंधाच्या राहिलेल्या चुका दुरुस्त केल्या; त्या अस्सल हस्तलिखितांच्या आधारे केल्या किंवा कसे याचा खुलासा सांपडत नाहीं.

२४. ज्या तीन गाथा मूळ हस्तलिखितांवरून छापिल्या त्यांतील एक आर्यभूषण छापखान्याने १९१३ सालीं पुण्यांत प्रसिद्ध केली. ही आवृत्ति हरिभक्तिपरायण बाबुराव हरि देवडीकर यांचे साहाय्याने पंढरपूर येथील गंगूकाका शिरवळकर यांच्यापाशीं असलेल्या प्रासादिक पोथीवरून तयार केलेली आहे. ही वही श्रीक्षेत्र पंढरपूर येथे प्रल्हादभाऊ बडवे यांच्याकडे होती. देवाने बडव्यांच्या स्वप्नांत येऊन सांगितल्याप्रमाणे गंगूकाका शिरवळकरांस मिळाली. (१९१३ साली) या गोष्टीस ८०–८५ वर्षे झालीं असे संपादकानीं निवेदन केले आहे. याच गंगूतात्यांनीं स्वतः शुद्ध केलेली व पंढरपूरच्या इतर मठाधिपतींकडून शुद्ध करून घेतलेली प्रत पंडितानीं वापरिली होती, व त्या प्रतीतील न स्वीकारिलेले सर्व पाठ तळटीपांत दिले आहेत, व अधिक अभंग शेवटीं छापिले आहेत. तेव्हां एका अर्थी आर्यभूषण गाथेचा प्रस्तुत गाथेत सर्वस्वीं अंतर्भाव झाला आहे असे म्हणतां येईल. देशमुख व दांडेकर यांनी संपादिलेल्या चित्रशाळेच्या गाथेत गंगूकाकांच्या पोथीचेच पाठ घेतलेले आहेत; पण अनुक्रमणिकेत माळ्यांच्या वहीवरून घेतलेले पाठही दिले आहेत. या माळ्यांच्या वहीवरून छापिलेली गाथा ही दुसरी सांप्रदायिक गाथा होय. ही १९१३ सालीं गोडबोले यांनी "ह. भ. प. देहूकर महाराज, भागवतबुवा बेलापुरकर, व वासकर यांच्या फडांतील वारकरी सांप्रदायिक ओवीची गाथा" या नावाने प्रसिद्ध केली. तुकारामाचे पंढरपूर येथील वंशज ह. भ. प. सोपानकाका देहूकर यांचेकडे हिचे मूळ आहे असे समजतें. अर्थात् ते हस्तलिखित देहू परंपरेतील असलें पाहिजे; व त्या परंपरेतील सर्वांत जुने हस्तलिखित हा तर पंडितांच्या गाथेचा मुख्य आधार होता.

२५. तिसरी गाथा "तुकारामबुवांची अस्सल गाथा" या नांवाने विनायक लक्ष्मण भावे यांनी शके १८४१–४२ (इ. स. १९१९–२०) सालीं दोन भागांत छापिली. तुकाराममहाराजांचे टाळकरी व लेखक संताजी तेली जगनाडे यांचे वहीवरहुकूम ही गाथा

छापिली असे श्री. भावे यांनी पुन्तपृष्ठावर नमूद केले आहे. या वह्या कशा लिहिल्या गेल्या असाव्यात याविषयी भाव्यांनी कांहीं तर्क सुचविले; पण निष्कर्ष असा काढला की "केव्हां तरी एकदम, थोडेच दिवसांचे मुदतीत, आणि तुकारामबुवांच्या मरणापूर्वी सुमारे तीन चार वर्षेच अगोदर, ह्या वह्या संताजीने लिहिल्या असाव्यात." ते पुढे म्हणतात कीं, "संताजी हा तुकारामाच्या प्रीतींतला, त्याचा आवडता टाळकरी, नेहमी त्याचे जवळ निकट सहवासात असणारा. यामुळे या वह्या तुकारामबुवांच्या नजरेखालूनहि गेल्या असल्या पाहिजेत हे उघड आहे. इतर टाळकऱ्यांनींहि त्या निःसंशय पाहिल्या असल्या पाहिजेत. आणि म्हणूनच तुकोबाच्या स्वदस्तुरच्या लेखाच्या अभावी या प्रतीस मी 'तुकारामबुवांची अस्सल गाथा' असे म्हटले आहे......" संताजीच्या शुद्धलेखनापेक्षां तुकारामाचें लिखाण कांहीं निराळें असेल असे भाव्यांना वाटत नव्हते. त्यांच्या मते, तुकाराम स्वमुखे बोलत असतां संताजीने या वह्या तयार केल्या असण्याचा संभव आहे.

२६. भाव्यांच्या या गाथेंत काही दुबार अभंग, कांहीं तुकयाबंधूचे इत्यादि अभंग जमेला धरून एकंदरीत १३२३ अभग आहेत. अर्थात् ही गाथा समग्र नाही हे सांगणे नकोच. संताजीच्या वह्यांची विस्ताराने चर्चा अन्यत्र केली जाईल. त्या चर्चेचा निष्कर्ष स्थूलमानाने सांगावयाचा तो असा:—(१) तुकारामाच्या मुखांतून निघत असलेली अभंगवाणी संताजीच्या या वह्यांत टिपून ठेविली असेल हे अगदी असंभवनीय आहे; (२) या दोनही वह्या तुकारामाच्या हयातींत समग्र लिहिल्या नसून त्याच्या निर्याणानंतर लिहिल्या गेल्या आहेत हेच अधिक संभवते. परिच्छेद २२ मध्ये वर्णिलेल्या अस्सल साधनांत ह्या वह्याचा समावेश करतां येणार नाही. पंडितांच्या प्रस्तुत गाथेस आधार मानिलेल्या साधनांप्रमाणे संताजीच्या वह्या हे एक दुय्यम साधन होय. शकाची नोंद असल्यामुळे इतर दुय्यम साधनांपेक्षां त्या वह्या तुकारामाच्या काळाला व परंपरेला जास्त जवळच्या असतील; व म्हणून तुकारामाची शुद्ध संहिता निश्चित करतांना या वह्यांतील क्रम व पाठ यांचा काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. या वह्यांप्रमाणे, तुकारामाच्या घराण्यांत पूजेत असलेली २४८ अभंगांची वही, पंढरपूरचे श्री. सख्या हरि वैकुंठे यांजपाशी असलेली वही, कडूसास मवाळ घराण्याच्या मंदिरांत असलेले हस्तलिखित, इत्यादि सर्व खासगी व सार्वजनिक संग्रहांत असलेलीं हस्तलिखिते तपासून, संख्या, क्रम व पाठ निश्चित करून पांगारकरांनी अपेक्षा केल्याप्रमाणे "सर्वजनमान्य होईल असा एक नवीन गाथा परंपरेच्या व संशोधनाच्या अशा दुहेरी दृष्टीने तयार झाला पाहिजे."[१७]

२७. अशी शुद्ध संहितेची गाथा सिद्ध करण्यासाठी प्रस्तुत पंडितांची गाथा उपलब्ध करून देणे अत्यावश्यक होते. कारण, ती आज कैक वर्षे दुर्मिळ झाली होती, व जुन्या पुस्तकांच्या बाजारात भारी किंमत देऊन सुद्धां मिळत नसे. तुकारामाच्या निर्याणाला तीनशे वर्षे पुरी झालीं त्या प्रसंगी ती पुनः छापून प्रसिद्ध करावी असे स्वराज्यांतील लोकशाही मुंबई सरकारने ठरविले. हे "बुनादीचे साचे उजवणे" करण्याचे श्रेय मुंबईचे पंतप्रधान व शिक्षणमंत्री नामदार श्री. बाळ गंगाधर खेर यास सर्वस्वीं दिले पाहिजे.

---

१७ श्रीतुकारामचरित्र. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर (१९२०), प्रस्तावना, पान ५.

२८. हं पुनर्मुद्रण मूळ गाथेबरहुकूम पानास पान या पद्धतीनें केलें आहे; याचें कारण हे कीं अनेक ग्रंथांत पानांचे उल्लेख दिले आहेत, ते पाहणें अभ्यासकांस सोपें जावें. मूळ गाथेत दिलेल्या अभंगांत ज्या केवळ छपाईच्या उघड दिसणाऱ्या चुका होत्या तेवढ्याच दुरुस्त केल्या आहेत; संहितेंत बाकी कोणतेही फेरफार केले नाहींत. कठीण शब्दांच्या कोशांत मूळांत अर्थ दिले नव्हते अशा कांहीं स्थळीं अर्थ दिले आहेत. अनुक्रमणिका अकारविल्ह्याप्रमाणे, मूळ गाथेंत अभंगांचे आंकडे देण्यांत पुष्कळ चुका झाल्या होत्या त्या सर्व नीट करून, संख्या निश्चित करून बिनचूक बनविली आहे. गाथेच्या या पुनर्मुद्रित आवृत्तींतील अभंगांचा हिशेब येणेंप्रमाणें :—४६०७ पर्यंत अभंगांचे आंकडे छापिले आहेत. शुद्धिपत्रांत दर्शविल्याप्रमाणे २२३१-अ आणि ४१९४-अ असे दोन आणखी अभंग जमेला धरले असतां एकंदर संख्या ४६०९ होते. देहू व तळेगांव या प्रतींत ज्यांचा आरंभ सारखा झालेला नाहीं असे पंढरपूरच्या प्रतींतील (दुसऱ्या भागाच्या शेवटीं छापलेले) अभंग ३७, आणि पहिल्या भागांत पान ३८० व पान ५४० वर दिलेले रामेश्वरभटाचे एकूण अभंग ५, हे आणखी जमेला धरले म्हणजे अनुक्रमणिकेत प्रविष्ट झालेल्या अभंगांची एकूण संख्या (४६०९+३७+५=) ४६५१ भरते. दुबार अभंग २० सांपडले[१८]; ते उणे करतां बाकी ४६३१ अभंग उरतात. यांतील रामेश्वरभटाचे ५, तुकयाबंधूचे (कान्होबाचे) ९२, ब्रह्मानंद तुक्याचे ३ (?), एकाजनार्दनाचा १, व वामनाचा १ इतके उणे करतां, देहू, तळेगांव व पंढरपूर या तीनही प्रतींतील मिळून तुकारामाचे असे ४५२९ अभंग या गाथेत छापिले आहेत. शुद्धिपत्राशिवाय गाथा छापतां आली पाहिजे होती. पण शुद्धिपत्र देतांना शुद्धाशुद्धाद्वैतवाद न स्वीकारितां अगदीं बारीकसारीक अशुद्धे सुद्धां सूक्ष्मदृष्टीने शोधून दिलीं आहेत; हेतु हा कीं तुकारामाच्या वाणींत वाचकांपुढे अपपाठ ठेवण्याच्या पापापासून पूर्णपणे अलिप्त राहावे.

२९. जनार्दन सखाराम गाडगीळ यांनीं लिहिलेलें तुकारामाचे इंग्रजी चरित्र व बहुधा त्यांनींच लिहिलेले एक मराठी चरित्र अशीं दोन चरित्रे मूळ गाथेला आरंभीं जोडिलीं होतीं. गेल्या ऐशीं वर्षांत तुकारामाच्या चरित्राला उपयुक्त असे बरेच लिखाण झाले आहे. त्याचा परामर्श घेऊन तुकारामाचे चरित्र, काव्य, शिकवणूक व अभ्यास यांची सांगोपांग चर्चा करणारा एक प्रबंध पहिल्या भागांत द्यावयाची मनीषा होती. पण विस्तार व विलंब फार होऊं नये म्हणून ते तुकारामचरित्र स्वतंत्र छापून या गाथेच्या ग्राहकांस गाथेचाच भाग म्हणून, निराळी किंमत न घेतां, द्यावयाचें ठरविले आहे. त्याप्रमाणे ते लवकरच प्रकाशित होईल. तुकारामानें दिलेली सुविचाराची, सदाचाराची व समतेची शिकवण लोकांस सहज मिळावी म्हणून (चरित्रासुद्धां) गाथेची किंमत स्वस्त ठेविली आहे. लोकशिक्षणाचा हा प्रयोग उपयुक्त होवो अशी प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितो.

**पुरुषोत्तम मंगेश लाड**

---

१८ यातील १९ अभंग अनुक्रमणिकेंत त्या त्या अभंगापुढें दाखविले आहेत. शिवाय ३७५२ हा अभंग ३९५६ अभंगाचा दुबार आहे.

# या आवृत्तीची प्रस्तावना

१. तुकारामाच्या निर्याणाला तीनशे वर्षे पुरीं झालीं त्या प्रसंगीं (इ. स. १९५० साली) दोन भागांत छापून प्रसिद्ध केलेल्या आवृत्तीच्या सर्व सात हजार प्रती स्वल्पावधींतच संपल्या. पंढरपुरास आषाढी एकादशीच्या पावन लोकयात्रेत एका दिवसांत एक हजार प्रती अक्षरशः हातोहात खपल्या. तुकारामाच्या लिखाणाचा पुरवठा मागणीपेक्षां सदैव कमी पडतो, तरी पण त्याची वाणी बहुजनांच्या मुखीं सारखी वाढतच राहाते, असे हे परमार्थशास्त्र दिसते.

२. अर्थात् दुसरी आवृत्ति काढणे क्रमप्राप्त झाले. किमत पूर्वीप्रमाणे माफक ठेवतां यावी या हेतूने या वेळीं गाथा अखंड क्रमाने छापून समग्र मजकूर एकाच पुस्तकांत सामावून घेतला आहे. शुद्धिपत्र कांहींसें आटोक्यांत आणतां आले, व दुबार अभंगांच्या आणखी नव्या ओळखी[1] झाल्या, यापेक्षां या पुनर्मुद्रणात नवे असे कांही नाहीं.

३. मनाची हांव कितीहि असली तरी गेल्या पांच वर्षांत लेखणीची प्रत्यक्ष धांव संकल्पित तुकारामचरित्राच्या पूर्वार्धापलीकडे जाऊं शकली नाही. हा पल्ला गांठला हीच देवाची कृपा होय. चरित्राच्या पूर्वार्धाचा हा भाग आतां या आवृत्तीच्या बरोबरच पण स्वतंत्रपणे प्रसिद्ध होत आहे. वाचकांची क्षमा तर अवश्य मागितलीच पाहिजे. पण त्याहीपेक्षां आतां उत्तरार्धाचा अंत गाठण्याची शक्ति, यापुढे आणखी अंत न पाहतां, द्यावी एवढेंच देवापाशीं मागणें आहे.

तुकारामबीज, शके १८७६.<br>
१० मार्च १९५५.

**पुरुषोत्तम मंगेश लाड**

---

१ कांहीं दुबार अभंग शेवटील अनुक्रमणिकेंत त्या त्या अभंगापुढें दाखविले आहेत; सर्वच तसे दाखविलेले नाहींत. तेव्हां सर्व दुबार अभंगाची संपूर्ण यादी एकत्र दिल्यास उपयुक्त होईल म्हणून अंकानुक्रमानें पुढील पानावर दिली आहे.

# दुबार अभंगांची यादी

(पं. = पंढरपुरच्या प्रतींतील अधिक ३७ अभंगांपैकीं)

६७६ = ३८८१
६८३ = ३८२९ = ४२९६
६८६ = ४२८७
६८८ = ३९१२
७०३ = ३८६२
८०६ = १६३३
१६३३ = ८०६
१८९४ = ३१२५
३१२५ = १८९४
३१२६ = ३४९९
३२२७ = ३८६०
३३०१ = ४४८७
३३३२ = ३५१२
३३३८ = पं. १०
३३६३ = ३८९०
३३७३ = ३८७३
३४९० = ३८४९
३४९९ = ३१२६
३५१२ = ३३३२
३५१८ = ३८५२
३५३९ = पं. २२
३५४० = प. ३१
३५८१ = ४०११
३६११ = पं. २१
३६६० = ३९७२
३६६६ = पं २६
३७१४ = पं. ३२
३७५२ = ३९५६
३८०९ = ४२७७
३८२५ = प. १७
३८२९ = ६८३ = ४२९६
३८४९ = ३४९०
३८५२ = ३५१८
३८६० = ३२२७
३८६२ = ७०३
३८७० = प. २०
३८७१ = ४३९३ = पं. ३०
३८७३ = ३३७३
३८८१ = ६७६

३८९० = ३३६३
३९१२ = ६८८
३९२८ = ४०९९
३९५६ = ३७५२
३९७२ = ३६६०
३९८० = ४०८१
४०११ = ३५८१
४०८१ = ३९८०
४०९९ = ३९२८
४१११ = ४२८६
४११४ = ४२९७
४१९५ = ४३००
४१९६ = पं. २
४२१० = ४४९०
४२६९ = ४३०६
४२७७ = ३८०९
४२८६ = ४१११
४२८७ = ६८६
४२९६ = ६८३ = ३८२९
४२९७ = ४११४
४३०० = ४१९५
४३०६ = ४२६९
४३१० = प. २३
४३८१ = ४४७९
४३९३ = ३८७१ = प ३०
४४७९ = ४३८१
४४८७ = ३३०१
४४९० = ४२१०
प. २ = ४१९६
प. १० = ३३३८
पं. १७ = ३८२५
प. २० = ३८७०
पं. २१ = ३६११
पं. २२ = ३५३९
प. २३ = ४३१०
प. २६ = ३६६६
पं. ३० = ३८७१ = ४३९३
प. ३१ = ३५४०
प. ३२ = ३७१४

# ॥ तुकारामाचे अभंग ॥

## ॥ श्रीविठ्ठलाय नमः ॥

॥ श्रीनिवृत्तिनाथाय नमः ॥ श्रीज्ञानेश्वराय नमः ॥

॥ श्रीराघवचैतन्यश्रीकेशवचैतन्य—॥

॥ श्रीबाबाचैतन्यसद्गुरुभ्यो नमः ॥

## मंगलाचरण—अभंग ६.

१. समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक न लगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त्त नको देवा ॥ छ्र ॥ ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चितें[1] म्हणी जडों देसी ॥ २ ॥ तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥ ३ ॥

२. सुंदर तें ध्यान उभें[2] विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुळसी[3]हार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर [4]तें चि रूप ॥ छ्र ॥ मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ २ ॥ तुका म्हणे माझें हें चि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ३ ॥

३. सदा माझे डोळे जडो तुझे मूर्तीं । रखुमाईच्या पती सोयरिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ छ्र ॥ विठो माउलिये हा चि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ २ ॥ तुका म्हणे कांहीं न मागें आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ ३ ॥

४. राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कस्तुरीमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ छ्र ॥ मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळ ही ॥ २ ॥ कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयानो ॥ ३ ॥ सकळ ही तुम्ही व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥ ४ ॥

---

१ पं. तेथें चित्त म्हणीं.–२ उभा विटेवरी असें बहुतांच्या म्हणण्यांत आहे, परंतु तसें कोणत्याही पुस्तकांत आढळत नाहीं.–३ दे. त. तुळसीचे हार.–गळां तुळसीहार हाही पाठ ऐकण्यांत आहे–४ प. आवडे निरंतर हेंचि ध्यान.–५ पं. येऊनियां.

५. कर कटावरी तुळसीच्या माळा। ऐसें रूप डोळां दावीं हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी। ऐसें रूप हरी दावीं डोळां ॥ ध्रु ॥ कटीं पीतांबर कास मिरवली। दाखवीं वाहिली ऐसी मूर्ती ॥ २ ॥ गरुडपारावरी उभा राहिलासी। आठवे मानसीं तें चि रूप ॥ ३ ॥ झुरोनी पांजरा होऊं पाहें आतां। येईं पंढरीनाथा भेटावया ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी पुरवावी आस। विनंती उदास करूं नये ॥ ५ ॥

६. गरुडाचें वारिकें कासे पीतांबर। सांवळें मनोहर कैं देखेन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवया बरवंटा घनमेघ सांवळा। वैजयंतीमाळा गळां शोभे ॥ ध्रु ॥ मुगुट माथां कोटि सूर्यांचा झळाळ। कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥ २ ॥ ओतींव श्रीमुख सुखाचें सकळ। वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ॥ ३ ॥ उद्धव अक्रूर उभे दोहींकडे। वर्णिती पवाडे सनकादिक ॥ ४ ॥ तुका ह्मणे नव्हे आणिकांसारिखा। तो चि माझा सखा पांडुरंग ॥ ५ ॥ ॥ ६ ॥

---

## विराण्या—अभंग २५.

७. वाळो जन मज ह्मणोत शिंदळी। परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥ सांडूनि लौकिक जालियें उदास। नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥ नाइकें वचन बोलतां या लोकां। ह्मणे जालों तुका हरिरता ॥ ३ ॥

८. आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा। ह्मणोनि व्यभिचारा टेकलियें ॥ १ ॥ रात्रंदिस मज पाहिजे जवळी। क्षण त्यो[1]निराळी न गमे घडी ॥ २ ॥ नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां। रातलें अनंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

९. हाचि नेम आतां न फिरें माघारी। बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥ घररिघी जालें पट्टराणी बळें। वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥ बळियाचा अंगसंग जाला आतां। नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

१०. नाहीं काम माझें काज तुह्मांसवें। होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ १ ॥ व्यभिचार माझा पडिला ठाउका। न सर ती लोकांमाजी जालें ॥ २ ॥ न धरावा लोभ कांहीं मजविशीं। जालें देवपिशी तुका ह्मणे ॥ ३ ॥

११. विसरलें कुळ आपुला आचार। पती भावे दीर घर सोय ॥ १ ॥ सांडिला लौकिक लाज भय चिंता। रातलें अनंता चित्त माझें ॥ २ ॥ मज आतां कोणी आळवाल झणी। तुका ह्मणे कानीं बहिरी जालें ॥ ३ ॥

---

१ पं. क्षण एक निराळी.

१२. न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥ सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ २ ॥ आळ आला होता आह्मी भांडखोरी । तुका ह्मणे खरी केली मात ॥ ३ ॥

१३. दुजा ऐसा कोण वळी आहे आतां । हरि या अनंता पासूनिया ॥ १ ॥ वळियाच्या आह्मी जालों व्रळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ ३ ॥

१४. क्षणभरी आह्मीं सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥ १ ॥ सांडी मांडी मागें केल्या भरोवरी । अधिक चि परी दुःखाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

१५. आह्मां आह्मी आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ॥ १ ॥ फावला एकांत एकविध भाव । हरि आह्मांसवें सर्व भोगी ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगसंग एके ठायीं । असों जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

१६. सर्व सुख आह्मी भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ १ ॥ याचसाठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरूषाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

१७. एका जिवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळीक कांहीं नव्हे आतां ॥ १ ॥ नारायणा आह्मां नाहीं वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥ तुका ह्मणे ज़ालें सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

१८. हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥ १ ॥ सेवासुखें करूं विनोदवचन । आह्मी नारायण एकाएकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी ज़ालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

१९. मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयानो ॥ १ ॥ न साहवे तुह्मां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे ज़ालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आह्मी ॥ ३ ॥

२०. शिकविलें तुह्मीं तें राहे तोंवरी । मज आणि हरी वियोग तों ॥ १ ॥ प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

२१. सांगतों तें तुह्मीं अइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥

---

१ त. आपुले.–२ पं. माजी.

जोंवरी या तुह्मां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वांयांविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

२२. आजिवरी तुह्मां आह्मां नेणपण । कौतुकें खेळणें संग होता ॥ १ ॥ आतां अनावर जालें अगुणाची । करूं नये तें चि करीं सुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥ ३ ॥

२३. सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावें चि ॥ १ ॥ सांडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ २ ॥ न व्हावी ते जाली आमुची भंडाई । तुका ह्मणे काई लाजों आतां ॥ ३ ॥

२४. मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥ आतां तुह्मी पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी भयाभीत नारी । कैसे संग सरी तुह्मां आह्मां ॥ ३ ॥

२५. परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥ संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनि मागुतें पाहूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपासोई[1] ॥ ३ ॥

२६. अइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडा या सोई भ्रताराची ॥ १ ॥ नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥ ३ ॥

२७. आहांच वाहांच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आह्मां तैशा ॥ १ ॥ भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा । आवरूनि मना वंद घ्यावा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं अभ्यासावांचुनी । नव्हे हे करणी भलतीची ॥ ३ ॥

२८. बहुतांच्या आह्मी न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ १ ॥ विचार करितां वांयां जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥ ३ ॥

२९. त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठिण हें जिवा तोंचिवरी ॥ १ ॥ मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हें संगा नेदी पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥ ३ ॥

३०. न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥ मानेल त्या तुह्मी अइका स्वभावें । मी तों माझ्याभावें अनुसरलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं फिरावें बहुतीं । माझी तों हे गती जाली आतां ॥ ३ ॥

---

१ पं. दीपावरी.

३१. न बोलतां तुह्मां कळों न ये गुज । ह्मणउनी लाज सांडियेली ॥ १ ॥ आतां तुह्मां पुढें जोडीतसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी वैसलों शेजारीं । करील तें हरी पाहों आतां ॥ ३ ॥ ॥ २५ ॥

---

३२. नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल । येइल तैसा बोल रामकृष्ण ॥ छ ॥ देवापाशीं मागें आवडीची भक्ति । विश्वासेंशीं प्रीति भावबळें ॥ २ ॥ तुका ह्मणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ॥ ३ ॥

३३. सावध जालों सावध जालों । हरिच्या आलों जागरणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें वैष्णवांचे भार । जयजयकार गर्जतसे ॥ छ ॥ पळोनियां गेली झोप । होतें पाप आड तें ॥ २ ॥ तुका ह्मणे तया ठाया । ओल छाया कृपेची ॥ ३ ॥

३४. आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कुळीं कन्यापुत्र होतीं जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ छ ॥ गीता भागवत करिती श्रवण । आणीक चिंतन विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥ ३ ॥

३५. अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ छ ॥ आपुल्या वैभवें । शृंगारावें निर्मळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जेवी सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ३ ॥

३६. सुखें वोळंव दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीचा मारिला वेडा । होय होय कैसा ह्मणे भिडा ॥ छ ॥ निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ॥ २ ॥ गेले वारीं तुह्मीं आणिली साकर । सातदी[2] गेली साडेदहा शेर ॥ ३ ॥ अखंड[1] मज पोटाची व्यथा । दुधभात साकर[3] तूप पथ्या ॥ ४ ॥ दों पाहरा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ॥ ५ ॥ नीज नये घाली फुलें । जवळीं न साहती मुलें ॥ ६ ॥ अंगीं चंदन लाविते भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ७ ॥ हाड गळोनि आलें मास । माझें दुःख तुह्मां नेणवे कैसें ॥ ८ ॥ तुका ह्मणे जिता गाढव केला । मेलियावरि नरका नेला ॥ ९ ॥

३७. पावलें पावलें तुझें आह्मां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें तेथें देखें तुझीं च पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥ छ ॥ भेदाभेदमतें भ्रमाचे संवाद । आह्मां नको वाद त्यांशीं देऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे अणु तुजविण नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥ ३ ॥

---

१ पं. अखंड.—२ पं. सात दिवसा दाहा शेर.—३ पं. साकर पथ्या.

३८. वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ अमुप हें गांठीं बांधूं भांडवल । अनाथा विठ्ठल आह्मां जोगा ॥ छ्र ॥ अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ २ ॥ जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ३ ॥ गेले पुढें त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आह्मी ॥ ४ ॥ तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ ५ ॥

३९. जेविले ते संत मागें उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करुनी झाडा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोवळ्या ओंवळ्या राहिलों निराळा । पासूनि सकळां अवघ्यां दुरी ॥ छ्र ॥ परें परतें मज न लगे सांगावें । हें तों देवें बरें शिकविलें ॥ २ ॥ दुसऱ्यातें आह्मी नाहीं आतळत । जाणोनि संकेत उभा असे ॥ ३ ॥ येथें कोणीं कांहीं न धरावी शंका । मज चाड एका भोजनाची ॥ ४ ॥ लांचावला तुका मारितसे झड । पुरविलें कोड नारायणें ॥ ५ ॥

४०. देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ छ्र ॥ अवघियां पुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ २ ॥ इच्छादानी येथें वळला समर्थ । अवघें चि आर्त पुरवितो ॥ ३ ॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाक लक्षुमीच्या हातें । कामारीसांगातें निरुपम ॥ ५ ॥

४१. अवगुणांचे हातीं । आहे अवघी फजीती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥ छ्र ॥ विष तांब्या वाटी । भरली लावूं नये होटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ३ ॥

४२. हरीच्या जागरणा । जातां कां रे नये मना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोठें पाहासील तुटी । आयुष्य वेचे फुकासाटीं ॥ छ्र ॥ ज्यांची तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वरा । लाभ काय तो विचारा ॥ ३ ॥

४३. धर्माची तूं मूर्ती । पाप पुण्य तुझे हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥ छ्र ॥ करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ २ ॥ जिवींच्या जीवना । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

४४. ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणे । वळिये आह्मी भले शरणागत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । जाला पद्मनाभ सेवाऋणी ॥ छ्र ॥

---

१ पं. पुढें गेले.—२ पं. केला.

कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचिये वाही वरुपावें ॥ २ ॥ बैसलिये ठायीं लागलें भरतें । त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ॥ ३ ॥ हरि नाहीं आह्मा विष्णुदासां जगीं । नारायण अंगीं विसावला ॥ ४ ॥ तुका ह्मणे बहु लाटे हें भोजन । नाहीं रिता कोण राहत राहों ॥ ५ ॥

४५. दुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरि ॥ आपणावाहेरी । न लगे ठाव धुंडावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इतुलें जाणावया जाणा । कोंडे तरी मनें मना ॥ पारधीच्या खुणा । जोणतें चि साधावें ॥ ६१ ॥ देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा ॥ वुजगावणें चोरा । रक्षणसें भासतें ॥ २ ॥ तुका करी जागा । नको वोसपूं वाउगा ॥ आहेसि तूं आगा । अंगीं डोळे उघडी ॥ ३ ॥

४६. विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम३ अमंगळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अइका जी तुह्मी भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ ६१ ॥ कोणा ही जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे एका देहाचे अवंयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ३ ॥

४७. आह्मी तरी आस । जालों टाकोनि उदास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ ६१ ॥ भलते ठायीं पडों । देह तुरंगीं हा चढो ॥ २ ॥ तुमचें तुह्मांपासीं । आह्मीं आहों जैसीं तैसीं ॥ ३ ॥ गेले मानामान । सुखदुःखाचें खंडन ॥ ४ ॥ तुका ह्मणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ॥ ५ ॥

४८. निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज हें ही नाहीं तें ही नाहीं । वेगळा दोहीं पासुनी ॥ ६१ ॥ देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें बरें ॥ २ ॥ अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुक्याचें ॥ ३ ॥

४९. जन विजन जालें आह्मां । विठ्ठलनामा प्रमाणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहें तिकडे बापमाय । विठ्ठल आहे रखुमाई ॥ ६१ ॥ वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता जाला ॥ २ ॥ आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कौतुकें ॥ ३ ॥

५०. हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥ ६१ ॥ मोहरा होय तोचि अंगें । सूत न जळे ज्याचे संगें ॥ २ ॥ तुका ह्मणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥ ३ ॥

५१. आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा संताचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ ६१ ॥ तीर्थें पर्वकाळ । अवघीं पायांपें सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ३ ॥

---

१ पं. जाणे तेणेंचि साधाव्या —२. दे. त. चाचपूं.—३ त. भेदाभेदश्रम.

५२. माझिया मीपणा । जाला यावरी उगाणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसाविलें अंग ॥ छ्र ॥ टाळिलें निमित्त । फार थोडें घात हित ॥ २ ॥ यावें कामावरी । तुका ह्मणे नाहीं उरी ॥ ३ ॥

५३. सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा ससूळ ॥ निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोक्षाचें तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें ॥ तीर्थांसी तीर्थ जाला तो चि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ छ्र ॥ मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळा भूषणांसी ॥ हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ २ ॥ तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥ तुका ह्मणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥ ३ ॥

५४. आहे तें सकळ कृष्णा चि अर्पण । न कळतां मन दुजें भावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी पाठी लागतील भूतें । येती गवसीत पांचजणें ॥ छ्र ॥ ज्याचें त्या वंचलें आठव न होतां । दंड या निमित्ताकारणें हा ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें चेंपियेला गळा । मी मी वेळोवेळा करीतसे ॥ ३ ॥

५५. महारासि सिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ छ्र ॥ नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥ २ ॥ ज्याचा संग चित्तीं । तुका ह्मणे तो त्या याती ॥ ३ ॥

५६. तेलनीशीं रुसला वेडा । रागें कोरडें खातो भिडा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलें हित आपण पाही । संकोच तो न धरी कांहीं ॥ छ्र ॥ नोवडे लोकां टाकिला गोहो । बोडिले डोकें सांडिला मोहो ॥ २ ॥ शेजारणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ॥ ३ ॥ पिसैरागें भाजिलें घर । नागविलें तें नेणे फार ॥ ४ ॥ तुका ह्मणे वांच्या रागें । फेडिलें सावलें देखिलें जगें ॥ ५ ॥

५७. मज दास करी त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ छ्र ॥ नीचद्वात्तिकाम । परी मुखीं तुझें नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवे । माझे संकल्प वेचावे ॥ ३ ॥

५८. सदा तळमळ । चित्ताचिये हळहळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचें दर्शन न व्हावें । शव असतां तो जिवे ॥ छ्र ॥ कुशब्दाची घाणी । अमंगळविली वाणी ॥ २ ॥ नेणे शब्द पर । तुका ह्मणे परउपकार ॥ ३ ॥

---

१ त. त्याच्या.–२ पं. नाडिलें.–३ पं. पिसाभेणें.

५९. जया नाहीं नेम एकादशीव्रत । जाणावें तें प्रेत शव लोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांचें वय नित्य काळ लेखीताहे । रागें दात खाय करकरा ॥ छ ॥ जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन । नाहीं तें स्मशान गृह जाणां ॥ २ ॥ जये कुळीं नाहीं एक ही वैष्णव । त्याचा बुडे भवनदीतापा ॥ ३ ॥ विठोबाचें नाम नुच्चारी जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड रजकाचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव जाय हरीचियां[3] ॥ ५ ॥

६०. आह्मी सदैव सुडके । जवळीं येतां चोर धाके ॥ जाऊं पुडी भिकें । कुतरीं घर राखती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नांदणूक ऐसी सांगा । नाहीं तरी वांयां भागा ॥ थोरपण अंगा । तरी ऐसें आणावें ॥ छ ॥ अक्षय साचार । केलें सायासांनीं घर ॥ एरंडासिंवार । दुजा भार न साहती ॥ २ ॥ धन कण घरोघरीं । पोट भरे भिकेवरी ॥ जतन तीं करी । कोण गुरें वासरें ॥ ३ ॥ जाली सकळ निश्चिंती । भांडवल शेण माती ॥ झळझळीत भिंती । वृंदावनें तुळसीचीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा । अवघा निरविला[4] हेवा ॥ कुटुंबाची सेवा । तो चि करी आमुच्या ॥ ५ ॥

६१. पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करितां परनिंदा परद्रव्य[5] अभिलाष । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ छ ॥ वैसलिये ठायीं ह्मणतां रामराम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥ २ ॥ संताचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ३ ॥ खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेचे यास ऐसें[6] सांगा ॥ ४ ॥ तुका ह्मणे देव जोडे याचसाटीं । आणीक ते आटी न लगे कांहीं ॥ ५ ॥

६२. शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुखीं अमृताची वाणी । देह वेचावा कारणीं ॥ छ ॥ सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । तांप दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

६३. चित्त समाधानें । तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वहु खोटा अतिशय । जाणां भले सांगों काय ॥ छ ॥ मनाच्या तळमळें । चंदनें ही अंग पोळे ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥ ३ ॥

---

१ पं. त्याचे दिवस.—२ पं. चर्मकाचें.—३ पं. हरीच्या जो.—४ पं. निरसला.—५ पं. द्रव्य. ६ पं. तुमचें.—७ पं. देवाचे.—८ त. तीच्या.

६४. परिमळ ह्मूण चोळूं नये फूल । खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥+ मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥ कर्मफळ ह्मणुनी इच्छूं नये काम । तुका ह्मणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

६५. माया तें चि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया । अंग आणि छाया तया परी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणांतळीं हारपते ॥ छ ॥ दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणिक ते आटी विचाराची ॥ २ ॥ तुका ह्मणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥ ३ ॥

६६. दुर्जनासि करी साहे । तो ही लोहे दंड हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिंदळीच्या कुंटणी वाटा । संग खोटा खोट्याचा ॥ छ ॥ येर येरा कांचणी भेटे । आगी उठे तेथूनी ॥ २ ॥ तुका ह्मणे कापूं नाकें । पुढें आणिकें शिकविती ॥ ३ ॥

६७. वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चितीं देव नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचें सार लाभ नाहीं ॥ छ ॥ देवपूजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ २ ॥ तुका ह्मणे फळ चिंतिती आदरें । लाघव हे चार शिंदळीचे ॥ ३ ॥

६८. पवित्र सोंवळीं । एक तीं च भूमंडळीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥ छ ॥ तीं च भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केल्या पावे सेवा ॥ ३ ॥

६९. आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥ छ ॥ भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ॥ २ ॥ तुका ह्मणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ॥ ३ ॥

७०. ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे ही बोल ते ही बोल । कोरडे फोल रुचीविण ॥ छ ॥ गव्हांचिया होती परी । फके वरी खाऊं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥ ३ ॥

७१. करावी ते पूजा मनें चि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळावें तयासि कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा अंगीं ॥ छ ॥ अतिशया अंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजा ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥ ३ ॥

---

+ "काय एक नव्हे धरितां अंतरीं । कासवीचे परी वेळोवेळां" ॥ हें कडवें पंढरपूरच्या प्रतींत अधिक आहे. १ दे. दंड हे लाहे.

७२. एकादशीव्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होईल नेणों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥ छ ॥ हरिहरां नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ३ ॥

७३. नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हा चि धंदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ छ ॥ रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे आत्महत्या रे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ३ ॥

७४. स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदूतां ॥ छ ॥ अपूज्य लिंग तेथें अतित न घे थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांची ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ठावी स्थिति मती । यमाची निश्चिंती कुळवाडी ॥ ३ ॥

७५. आहाकटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र जाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गळे चि ना गर्भ नव्हे चि कां वांज । माता त्याची लाजलावा पापी ॥ १ ॥ परपीडे परद्वारीं सावधान । सादर चि मन अभाग्याचें ॥ २ ॥ न मिळतां निंदा चाहडी उपवास । संग्रहावे दोष सकळ ही ॥ ३ ॥ परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचें तें कीडें दुग्धीं मरे ॥ ४ ॥ तुका ह्मणे विटाळाची च तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ॥ ५ ॥

७६. श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं भीड आणि धीर । उपदेश न जिरे क्षीर ॥ छ ॥ माणसांसि थुंके । विजातीनें घावे थुंके ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । मळिण करा तें फजित ॥ ३ ॥

७७. देखोनि हरखली अंड । पुत्र जाला ह्मणे रांड ॥ तंव तो जाला भांड । चाहाड चोर शिंदळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका ॥ थोर जाला चुका । वर कां नाहीं घातली ॥ छ ॥ भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें ॥ निष्ठुर उत्तरें[1] । पापदृष्टी मळिणचित्त ॥ २ ॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ ॥ तुका ह्मणे खळ । ह्मणोनियां निषिद्ध तो ॥ ३ ॥

७८. नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥ १ ॥ नेणें राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज चाड नाहीं जना । तुज नारायणा वांचूनिया ॥ ३ ॥

---

१ पं. बोले निष्ठुर उत्तरें.

७९. माझी पाठ करा कवी । उट लावी दारोदार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तंव तया पारखीं सिव । लाजे ठाव सांडितां ॥ छ ॥ उष्टावळी करूनि जमा । कुंथुनि प्रेमा आणितसे[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे बाहेरमुदी । आहा च गोविंदीं न सरती ॥ ३ ॥

८०. उपाधीच्या नांवें घेतला सिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काशासाठीं हात भरूनि धुवावे । चालतिया गोवे मारगासि ॥ छ ॥ काय नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपेंपर[2] बोळविले ॥ ३ ॥

८१. योगाचें तें भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा जालिया ॥ छ ॥ मिरासीचें ह्मूण सेत । नाहीं देत पीक उगें ॥ २ ॥ तुका ह्मणे उचित जाणां । उगीं सिणा काशाला ॥ ३ ॥

८२. न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥ छ ॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ३ ॥

८३. बाईल सवासिण आई । आपण पितरांचे ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोर वेच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥ छ ॥ विषयांचे चरवणीं[3] । केली आयुष्याची गाळणी ॥ २ ॥ तुका ह्मणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ३ ॥

८४. दानें कांपे हात । नावडे तेविशीं मात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कथी चावटीचे बोल । हिंग क्षीरीं मिथ्या फोल ॥ छ ॥ न वजती पाय । तीर्थां ह्मणे वेचूं काय ॥ २ ॥ तुका ह्मणे मनीं नाहीं । न ये आकारातें कांहीं ॥ ३ ॥

८५. वळितें जें गाई । त्यासि फार लागे काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निवे भावाच्या उत्तरीं । भलते एके धणी वरी ॥ छ ॥ न लगती प्रकार । कांहीं मानाचा आदर ॥ २ ॥ सांडी थोरपणा । तुका ह्मणे सवें दीना ॥ ३ ॥

८६. मैत्र केले महा बळी । कामा न येतीं[4] अंतकाळीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आधीं घे रे रामनाम । सामा भरीं हा उत्तम ॥ छ ॥ नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥ २ ॥ धन मेळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ३ ॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ४ ॥ तंववरि मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ५ ॥ तुका ह्मणे बापा । चुंकवी चौऱ्याशींच्या खेपा ॥ ६ ॥

---

१ पं. आणितो.–२ त. आप आणि पर.– ३ त. चरणीं.–४ त. ये.–५ त. जाच चुकवीं या खेपा.

८७. कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें मज नको करूं कमळापति । देईं या संगति सज्जनांची ॥ छ्रु ॥ तिनें पाचारिलें इल या ह्मणोन । येरु पळे आण जाली आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे येर येरा जें विच्छिन्न । तेथें वाढे सीण सुखा पोटीं ॥ ३ ॥

८८. सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वता एवढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरीं धरीं आठवण । मानीं संताचें वचन ॥ छ्रु ॥ नेलें रात्रीनें तें अर्धें । बाळपण जराव्याधें ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढा । घाणा जुंतीं जसी मूढा ॥ ३ ॥

८९. बोलायाचा त्यासीं । नको संबंध मानसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जया घडली संतनिंदा । तुज विसरूनि गोविंदा ॥ छ्रु ॥ जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भांड ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥ ३ ॥

९०. तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसे चि खळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे सिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥ छ्रु ॥ मौनदंभासाठीं[1] । केली अक्षरांची आटी ॥ २ ॥ तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ ३ ॥ वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ४ ॥ तुका ह्मणे चुकलें वर्म । केला अवघा चि अधर्म ॥ ५ ॥

९१. संवसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ छ्रु ॥ बहुतां जन्मींचा जालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ २ ॥ वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ३ ॥ बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दिवस जालों कासाविस ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीननाथा ॥ ५ ॥

९२. भक्तऋणी देव बोलती पुराणें । निर्धार वचनें साच केरीं[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें काय जाणों अइकिली वार्त्ता । कबिर सातें जातां घाडिया वांटी ॥ छ्रु ॥ माघारिया धन आणिलें घरासि । ने घे केला त्यासि त्याग तेणें ॥ २ ॥ नामदेवाचिया घरासि आणिलें । तेणें लुटविलें द्विजां हातीं ॥ ३ ॥ प्रत्यक्षासि काय द्यावें हें प्रमाण । व्यंकोबाचें[3] ऋण फेडियेलें ॥ ४ ॥ बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाहीं जयासि निर्धार । नाडला साचार तो चि एक ॥ ६ ॥

९३. भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगीं च अधर्म ॥ छ्रु ॥ देव अंतरे तें पाप । खोटे उगवा संकल्प ॥ २ ॥ तुका ह्मणे भीड खोटी । लाभ विचारावा[4] पोटीं ॥ ३ ॥

---

१ पं. मान दंभ पोटासाठीं.–२ त. पं खरीं –३ पं. एकोबाचें.–४ पं. विचाराच्या पोटीं.

९४. भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदि जगीं फांसे जैसे ॥ छ ॥ ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥ २ ॥ खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी तया साठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसा भला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ४ ॥

९५. गेली वीरसरी । मग त्यासि रांड मारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥ छ ॥ भंगलिया चित्ता । न ये काशानें सांदितां[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर । भंगलिया पाठीं कीरें ॥ ३ ॥

९६. युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देइल भेटी ॥ छ ॥ न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामाविण ॥ ३ ॥

९७. कंठीं कृष्णमणी । नाहीं अशुभ ते वाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हो का नरें[3] अथवा नारी । रांड तयें नावें खरी ॥ छ ॥ नाहीं हातीं दान । शूरपणाचें कांकण ॥ २ ॥ वाळियेली संतीं । केली बोडोनि फजिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ताळा । नाहीं त्याची अवकळा ॥ ४ ॥

९८. माया ब्रह्म ऐसें ह्मणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागविले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नाद्या होऊनि फिरे ॥ छ ॥ करुनी खातां पाक जिरे सुरण राई । करितां अतित्याई दुःख पावे ॥ २ ॥ औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ॥ ३ ॥ तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्यांचीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जयां पिंडाचें पाळण । न घडे नारायणभेट तयां ॥ ५ ॥

९९. मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥ छ ॥ संचित सांगातीं वोळवणें सवें । आचरलें द्यावें फळ तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे शेखी श्मशान तोंवरी । संबंध गोवरी अंगीं सवें ॥ ३ ॥

---

१ पं. सांधितां.–२ पं. (छापी प्रतींत) कर.–३ पं. पुरुष

१००. गौळियाची ताकपिरें । कोणें पोरें चांगलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥ छ ॥ काय उपास पडिले होते । कण्याभोंवते विदुराच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ३ ॥

१०१. आतां तरी पुढें हा चि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ छ ॥ हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥ ३ ॥

१०२. भक्ताविण देवा । कैंचें रूप घडे सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शोभविलें येर येरां । सोनें एके ठायीं हिरा ॥ छ ॥ देवाविण भक्ता । कोण देता निष्कामता ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥ ३ ॥

१०३. विश्वाचा जनिता । ह्मणे यशोदेसि माता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा भक्तांचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥ छ ॥ निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥ ३ ॥

१०४. काय दिनकरा । केला कोंबड्यानें खरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां हो ऐसा संत ठेवा । भार माझे माथां देवा ॥ छ ॥ आडविलें दासीं । तरि कां मरती उपवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥ ३ ॥

१०५. जेवितां ही धरी । नाक हागतिया परी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसियाचा कैंरी चाळा । आपुली च अवकळा ॥ छ ॥ सांडावें मांडावें । काय ऐसें नाहीं ठावें ॥ २ ॥ तुका ह्मणे करी । ताका दुधा एक सरी ॥ ३ ॥

१०६. हो का पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळों आलें खव्याळसें । शिवों नये लिंपों दोषें ॥ छ ॥ फोडावें मडकें । मेलें लेखीं घायें एकें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यागें । विण चुकीजेना भोगें ॥ ३ ॥

१०७. व्याल्याविण करी शोभनतांतडी । चार ते गधडी करीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ कासया पाल्हाळ आणिकांचे देखी । सांगतां नव्हे सुखी साखरेसि ॥ छ ॥ कुंथाच्या ढेकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कैंष्टी माळिण वरी ॥ १ ॥ तुका ह्मणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंविण नका वाव घेऊं ॥ ३ ॥

१०८. जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येर प्रिया पुत्र धना कोण लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु ॥ छ ॥ प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥ छ ॥ तुका ह्मणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ३ ॥

---

१ पं. काय.–२ पं. शुद्धभावें.–३ पं. हित.–४ पं. करितां.–५ पं. कुष्टी.

१०९. मान अपमान गोवे । अवघे गुंडूनी ठेवावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ छ्रु ॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ २ ॥ आली उर्मी साहे । तुका ह्मणे थोडें आहे ॥ ३ ॥

११०. थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरलें तें ॥ छ्रु ॥ अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥ २ ॥ तुका ह्मणे लटिकें पाहें । सांडीं देह अभिमान ॥ ३ ॥

१११. आतां उघडीं डोळे । जरी अद्यापि न कळे ॥ तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनुष्यदेहा ऐसा निध । साधिली ते साधे सिद्ध ॥ करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ छ्रु ॥ नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं ॥ कट धरूनियां करीं । उभाउभी पालवी ॥ २ ॥ तुका ह्मणे फुकासाठीं । पायीं घातली या मिठी ॥ होतो उठाउठी । लवकरी च उतार ॥ ३ ॥

११२. न केरीं[1] संग राहें रे निश्चळ । लागों नेदीं मळ ममतेचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या नांवें अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून वडबड ते ॥ छ्रु ॥ इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पों[2] ही न ये वरी मन ॥ २ ॥ तुका ह्मणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या थारा आनंदाचा ॥ ३ ॥

११३. पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ॥ छ्रु ॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पेठ । भूमिवरी हे वैकुंठ ॥ ३ ॥

११४. तिर्थीं धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मिळालिया संतसंग । समर्पितां भलें अंग ॥ छ्रु ॥ तीर्थीं भाव फळे । येथें आनाड तें वळे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥ ३ ॥

११५. घेऊनियां चक्र गदा । हा चि धंदा करी तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्ता राखे पायापासीं । दुर्जनासी संहारी ॥ छ्रु ॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ३ ॥

११६. देखोनि पुराणिकांची दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ छ्रु ॥ आवरितां नावरे । खुर आठवी नेवरे ॥ २ ॥ बोलों नयें मुखावाटां । ह्मणे होतां व्यांचा तोटा ॥ ३ ॥ दोन्हीं सिंगें चारी पाय । खुणा दावी ह्मणे होय ॥ ४ ॥ मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ५ ॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥ ७ ॥

---

१ पं. नकरीं रे संग.—२ पं. सकल्पा ही वरी न ये मन.

११७. दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी। देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अइका हो तुह्मी मात हे सज्जन। करूं संघट्टन नये बोलों ॥ ध्रु ॥ दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ। वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ २ ॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी। पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ३ ॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग। बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती सांगावें पृथक। अंग कुंभीपाक दुर्जनाचें ॥ ५ ॥

११८. अतिवादी नव्हे शुद्धया बीजाचा। ओळखा जातीचा अंत्यज तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण। श्रेष्ठाचें वचन न मानी जो ॥ ध्रु ॥ तुका ह्मणे मद्यपानाचें मिष्टान्न। तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ २ ॥

११९. शब्दा नाहीं धीर। ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचें न व्हावें दर्शन। खळा पंगती भोजन ॥ ध्रु ॥ संतास जो निंदी। अधम लोभासाठीं वंदी ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटीं। भाव अणीक जया होटीं ॥ ३ ॥

१२०. चोरें चोरातें करावा उपदेश। आपुला अभ्यास असेल तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिंदळीच्या मार्गे वेचितां पाउलें। होईल आपुलें तिच्या ऐसें ॥ ध्रु ॥ तुका ह्मणे भितों पुढिलिया दत्ता। ह्मणऊनि चिंता उपजली ॥ २ ॥

१२१. मांडवाच्या दारा। पुढें आणिला ह्मातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणे नवरी आणा रांड। जाळा नवऱ्याचें तोंड ॥ ध्रु ॥ समय न कळे। काय उपयोगीं ये वेळे ॥ २ ॥ तुका ह्मणे खरा। येथूनिया दूर करा ॥ ३ ॥

१२२. कांहीं नित्यनेमाविण। अन्न खाय तो चि[3] श्वान ॥ वांयां मनुष्यपण। भार वाहे तो वृषभ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा होय भूमी भार। नेणे यातीचा आचार ॥ जाला दावेदार। भोगवी अघोर पितरांसि ॥ ध्रु ॥ अखंड अशुभ वाणी। खरें न बोले चि स्वप्नीं[4] ॥ पापी तयाहुनी। आणीक नाहीं दुसरा ॥ २ ॥ पोट पोसी एकला। भूतीं दया नाहीं ज्याला ॥ पाठीं लागे आल्या। अतिताचे दाराशीं ॥ ३ ॥ कांहीं संतांचें पूजन। न घडे तीर्थांचें भ्रमण ॥ यमाचा आंदण। सीण थोर पावेल ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांनीं। मनुष्यपणा केली हानी। देवा विसरूनी। गेलीं ह्मणतां मी माझें ॥ ५ ॥

१२३. कन्या गो करी कथेचा विकरा। चांडाळ तो खरा तया नांवें ॥ १ ॥ गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण। यातिशीं कारण नाहीं देवा ॥ २ ॥* आशाबद्ध नये करूं तें करिती। तुका ह्मणे जातीनरकामधीं ॥ ३ ॥

---

१ पं. अधम.–२ पं. अंगणीं –३ त. दे. तो श्वान.–४ त. दे. न बोले स्वप्नीं.

*पं. " जे जैसें करिती ते तैसें पावती। भोग ते भोगिती केले कर्मीं" ॥ हें कडवें जास्ती आहे.

१२४. हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥ छ ॥ भेदकासी नाड । एक वेलांटी च आड ॥ २ ॥ उजवें वामांग । तुका ह्मणे एक चि अंग ॥ ३ ॥

१२५. वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन । श्रोता यति जाला जाण । तरी त्या नाहीं उचित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण । धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ॥ छ ॥ पट्टै पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी । प्रमाण सकळीं । ते मर्यादा करावी ॥ २ ॥ वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य । येर उपकरणें । सोनियाचीं परी तीं नीच ॥ ३ ॥ सोनियाचा पैंजण । मुगुटमणि केला हीण । जयाचें कारण । तया ठायीं अळंकार ॥ ४ ॥ सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन । तुका ह्मणे जाण । तुह्मी संत तदर्थीं ॥ ५ ॥

१२६. घरीं रांडा पोरें मरती उपवासीं । सांगे लोकांपासीं थोरपण ॥ १ ॥ नेऊनियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चुकावूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसे नहों ॥ ३ ॥

## जोहार–अभंग ३.

१२७. मायबाप जोहार । सारा साधावया आलों वेसकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागील पुढील करा झाडा । नाहीं तरी खोडा घालिती जी ॥ छ ॥ फांकूं नका रुजू जालिया वांचून । सांगा जी कोण धरीं तीं धण्या ॥ २ ॥ आजि मायबाप करा तडामोडी । उद्यां कोणी घडी राहेना हो ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न चले ते बोली । अखरते सालीं झाडा घेती ॥ ४ ॥

१२८. येऊं द्या जी कांहीं वेसकरास । आंतून बाहेर बोजेचा घास ॥ १ ॥ जों यावें तों हात चि रिता नाहीं । कधीं तरीं कांहीं द्यावें घ्यावें ॥ २ ॥ तुका ह्मणे उद्यां लावीन ह्मनेरा । जे हे दारोदारांभोंवतीं फिरा ॥ ३ ॥

१२९. देती घेती परज गेली । घर खालीं करूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवणियाचे न पडे हातीं । खादली राती काळोखी ॥ छ ॥ अवघियांचें अवघें नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥ २ ॥ सोंग संपादुनि दाविला भाव । गेला आधीं माव वरि होती ॥ ३ ॥ घराकडे पाहूं नये सें चि जालें । अमानत केलें दिवाणांत ॥ ४ ॥ आतां तुका कोणा न लगे चि हातीं । जाली ते निश्चिती बोलों नये ॥ ५ ॥ ॥ ३ ॥

---

१ त. अधिकार.–२ त. दे. पट्टपुत्रा सांभाळी –३ त. जोहार माय बाप जोहार. पं. मायबाप जोहार जी जोहार.–४ पं. धरितीं धण्या.–५ पं. मनेरा.

१३०. शुकसनकादिकीं उभारिला वाहो । परिक्षितीला हो दिसां सातां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उठाउठी करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥ छ्रू ॥ त्वरा जाली गरुड टाकियेला मार्गे । द्रौपदीच्या लागें नारायणें ॥ २ ॥ तुका ह्मणे करी बहु च तांतडी । प्रेमाची आवडी लोभ फार ॥ ३ ॥

१३१. बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाट दावी तया न लगे रुसोंवें । आतित्याई जींवें नाश पावे ॥ छ्रू ॥ निंब दिला रोग तुटाया अंतरीं । पोभाळितां वरि अंत चरे ॥ २ ॥ तुका ह्मणे हित देखण्यासि कळे । पडती आंधळे कूपा माजी ॥ ३ ॥

१३२. माकडें मुठीं धरिले फुटाणे । गुंतले ते नेणे हात तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तो तयाचा लेखावा अन्याय । हित नेणे काय आपुलें तें ॥ छ्रू ॥ शुकें नळिकेशीं गोवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे एक ऐसे पशुजीव । न चले उपाव कांहीं तेथें ॥ ३ ॥

१३३. हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण । नव्हे तें करिसी आन । कवणें नाहीं केलें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबाघरीं वोपविलीं ॥ छ्रू ॥ नळा दमयंतीचा योग । विघडिला त्यांचा संग । ऐसें जाणे जग । पुराणें हीं बोलती ॥ २ ॥ राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दया[3] भूतीं । तुळविलें अंतीं । तुळें मास तयाचें ॥ ३ ॥ कर्ण भिडतां समरंगणीं । बाणीं व्यों[4]पियेला रणीं । मागसी पाडोनी । तेथें दांत तयाचे ॥ ४ ॥ बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर । करूनि काहार । तो पाताळीं घातला ॥ ५ ॥ श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी । मारविलें करीं । त्याचें बाळ त्याहातीं ॥ ६ ॥ तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति । ठाव नाहीं पुढती । तुका ह्मणे करिसी तें ॥ ७ ॥

१३४. चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळीं वसे ॥ छ्रू ॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ॥ २ ॥ केलीं मागें नको राहों । तुज जमान आह्मी आहों ॥ ३ ॥ करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥ ४ ॥ तुका ह्मणे काळा । रीग नाहीं निघती ज्वाळा ॥ ५ ॥

---

१ पं. लोभापर. त. लोभपर.–२ पं. शिणावें.–३ पं. दयाळु भूतीं.–४ पं. त्रासियेला.

१३५. बाळ बापा ह्मणे काका । तरी तो कां निपराध ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ॥ छ ॥ साकरेसि ह्मणतां धोंडा । तरी कां तोंडा न रुचे ॥ २ ॥ तुका ह्मणे आरुष बोल । नव्हे वोल आहाच ॥ ३ ॥

१३६. चित्तीं नाहीं तें जवळीं असोनि काय । वत्स सांडी माय तेणें न्यायें ॥ १ ॥ प्रीतीचा तो वायु गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ॥ ३ ॥

१३७. काय काशी करिती गंगा । भीतरिं चांगा नाहीं तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अधणीं कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासि ॥ छ ॥ काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ॥ २ ॥ तुका ह्मणे प्रेमें विण । बोले भुंके अवघा शीण ॥ ३ ॥

१३८. शिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास । वाइल तो त्यास न विसंभे ॥ १ ॥ दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर । तो ह्मणे इतर लोक तैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे जया चित्तीं जे वासना । तयाची भावना तयापरी ॥ ३ ॥

## काला चेंडुफळी–अभंग १००.

१३९. झेला रे झेला वरचेवर झेला । हातिचें गमावी तो पाठीं साहे टोला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्रिगुणाचा चेंडू हातें झुगारी निराळा । वरिलिया मुखें मन लावी तेथें डोळा ॥ छ ॥ आगळा होऊनि धरी वरिचिया वरी । चपळ तो जिंके गांढ्या ठके येरझारीं ॥ २ ॥ हातीं सांपडलें उभें बैसों नेदी कोणी । सोरीमागें सोरी घेती ओणवें करूनि ॥ ३ ॥ डाई पडिलिया सोसी दुःखाचे डोंगर । पाठीवरी भार भोंवता ही उभा फेर ॥ ४ ॥ तुका ह्मणे सुख पाहे तयाचें आगळें । जिंकी तो हरवी कोणी एका तरी काळें ॥ ५ ॥

१४०. अझुनि कां थीर पोरा न ह्मणसी किर । धरुनियां धीर लाजे बुर निघाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोकळा होतासि कां रे पडिलासि डाई । वरिलांचा भार आतां उतरेसा नाहीं ॥ छ ॥ मेळवूनि मेळा एकाएकीं दिली मिटी । कवळिलें एक बहु बैसविलीं पाठीं ॥ २ ॥ तळील तें वरी वरील तें येतें तळा । न सुटे तोंवरी येथें गुंतलिया खेळा ॥ ३ ॥ सांडितां ठाव पुढें सईल धरी हात । चढेल तो पडेल ऐसी ऐका रे मात ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती आवरावे हात पाय । न खेळावें तोंच वरें वरी न ये डाय ॥ ५ ॥

---

१ पं. जिंकीतो हरिसी.

## कोडें—अभंग २.

१४१. कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनि फार राहे गुंतोनियां थोडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुसतसे सांगा मी हें माझें ऐसें काई ॥ रुसूं नका नुगवे तो झवे आपुली आई ॥ छ ॥ सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । जालें जीवो मेलें मरो प्रारब्धा हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अभिमान सांडावा सकळीं । नये अंगावरी वांयां येऊं देऊं कळी ॥ ३ ॥

१४२. नुगवे तें उगवून सांगितलें भाई । घालुनियां ताळा आतां शुद्ध राखा घाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कांहीं नाहीं राहिलें । ज्यां आपणा आपण पाहिलें ॥ छ ॥ कमाईस मोल येथें नका रीस मानूं । निवडूं नये मज कोणा येथें वानूं ॥ २ ॥ तुका ह्मणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयेजतं मग सेवटिला एक वेळीं ॥ ३ ॥

१४३. हेरुप आनंदाचा । घोष करा हरिनामाचा । कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुण्य पाहिजे वहुत । जन्मांतरींचें संचित । होईल करीत । आला अधिकारी तो ॥ छ ॥ काय पाहातां हे भाई । हरुषें नाचा धरा घाई । पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा ॥ २ ॥ जें सुख दृष्टी आहे । तें च अंतरीं जो लाहे । तुका ह्मणे काय । कळिकाळ तें वापुडें ॥ ३ ॥

१४४. अवघे गोपाळ ह्मणती या रे करूं काला । काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला । नका कांहीं मागें पुढें रे ठेवूं खरें[4] च बोला । वंची वंचला तो चि रे येथें भोवंडा त्याला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेतल्या वांचून झाडा रे नेदी आपुलें कांहीं । एकां एक ग्वाही वहुत देती मोकळें नाहीं । ताक सांडी येर येर रे काला भात भाकरी दहीं । आलें घेतो मध्यें वैसला नाहीं आणवीत तें ही ॥ छ ॥ एका नाहीं धीर तांतडी दिल्या सोडोनि मोटा । एक सोडितील गाठी रे एक चालती वाटा । एक उभा भार वाहोनि पाहे उगा चि खोटा । एक ते करूनि आराले आतां ऐसें चि घाटा ॥ २ ॥ एकीं स्थिराविल्या गाई रे एक वळत्या देती । एकांच्या फांकल्या वोढाळा फेरे भोंवतीं घेती । एकें चारावोरा गुंतलीं नाहीं जीवन चित्तीं । एक एका चला ह्मणती एक हुंबरी घेती ॥ ३ ॥ एकीं एकें वाटा लाविलीं भोळीं नेणतीं मुलें । आपण घरींच गुंतले माळा नासिलीं फुलें । गांठीचें तें सोडूं नावडे खाय आइतें दिलें । सांपडलें वेठी वोढी रे भार वाहातां मेलें ॥ ४ ॥ एक ते

---

१ दे. ज्यालें ज्यवो. त. ज्यालें जेवो.—२ दे. त. हारस.—३ दे. उरी कांहीं.—४ पं. तुझी खरें च वोला.

माया गुंतले घरीं बहुत काम । वार्ता ही नाहीं तयाची तया कांहीं च ठावें । जैसें होतें शिळें संचित तैसें लागलें खावें । हातोहातीं गेलें वेचुनि मग पडिलें ठावें ॥ ५ ॥ एकीं हातीं पायीं पेंटे रे अंगीं लाविल्या राखा । एक ते सोलिव बोडके केली सपाट शिखा । एक ते आळसी तळीं रे वरी वाढिल्या काखा । सिदोरी वांचून बुद्धि रे केला अवघ्यां वाखा ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां कान्होबा आह्मां वांटोनि द्यावें । आहे नाहीं आह्मांपाशीं तें तुज अवघें चि ठावें । मोकलितां तुह्मी शरण आह्मी कवणासि जावें । कृपावंतें कृपा केली रे पोट भरे तों खावें ॥ ७ ॥

१४५. बैसवुनि फेरी । गडियां मध्यभागीं हरी । अवघियांचे करी । समाधान सारिखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहे तो देखे समोर । भोगी अवघे प्रकार । हरुषें झेली कर । कवळ मुखीं देती ते ॥ छ ॥ बोले बोलतिया सवें । देतील तें त्यांचें घ्यावें । एक एका ठावें । येर येरा अदृश्य ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । बहु आवडीचा हेवा । कोणाचिया जीवा । वाटों नेदी विषम ॥ ३ ॥

१४६. आह्मां निकट वासें । कळों आलें जैसें तैसें । नाहीं अनारीसें । कान्होबाचे अंतरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पीडती आपुल्या भावना । जैसी जयाची वासना । कर्माचा देखणा । पाहे लीळा कौतुक ॥ छ ॥ खेळ खेळे न पडे डाईं । ज्याचा भार त्याच्या ठायीं । कोणी पडतील डाईं । कोणी कोडीं उगवीती ॥ २ ॥ तुका ह्मणे कवळ । हातीं घेऊनि गोपाळ । देतो ज्यांचें बळ । त्यांसि तैसा विभाग ॥ ३ ॥

१४७. काम सारूनि सकळ । आले अवघे गोपाळ । जाली आतां वेळ । ह्मणती आणा सिदोऱ्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देती आपुलाला झाडा । गाई बैसविल्या वाडां । दोंदिल बोबडा । वांकड्याचा हरि मेळीं ॥ छ ॥ आपुलालिये आवडी । मुदा बांधल्या परवडी । निवडूनियां गोडी । हरि मेळवी त्यांत तें ॥ २ ॥ भार वागविला खांदीं । नव्हती मिळाली जों मांदी । सकाळांचे संदी । वोझीं अवघीं उतरलीं ॥ ३ ॥ मागे जो तांतडी । त्यासि रागा येती गडी । तुह्मी कां रे कुडी । येथें मिथ्या भावना ॥ ४ ॥ एक एकाच्या संवादें । कैसे धाले ब्रह्मानंदें । तुका ह्मणे पदें । या रे वंदूं हरीचीं ॥ ५ ॥

१४८. यमुनें पाबळीं । गडियां बोले वनमाळी । आणा सिदोऱ्या सकळी । काला करूं आजी । अवघें एके ठायीं । करूनि स्वाद त्याचा पाहीं । मजपाशीं आहे तें ही । तुह्मामाजी देतों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणती बरवें गोपाळ । ह्मणती

---

१ पं. दे. पट.–२ पं. परमानदें.

वरवें गोपाळ । वाहाती सकळ । मोहरी पांवे आनंदें । खडकीं सोडियेल्या मोटा । अवघा केला एकवटा । काला करूनियां वांटा । गडियां देतो हरि ॥ ६१ ॥ एकापुढें एक । घाली हात पसरी मुख । गोळा पांवे तया सुख । अधिक चि वाटे । ह्मणती गोड जालें । ह्मणती गोड जालें । आणिक देईं । नाहीं पोट धालें ॥ २ ॥ हात नेतो मुखापासीं । एर आशा तोंड वासी । खाय आपण तयासी । दावी वांकुलिया । देऊनियां मिठी । पळे लागतील पाठीं । धरूनि काढितील ओठीं । मुखामाजी खाती ॥ ३ ॥ ह्मणती ठकडा रे कान्हा । लावी घांसा भरी राणा । ढुम करितो शहाणा । पाठोवाठीं तयाच्या । अवघियांचे खाय । कवळ कृष्णा माझी माय । सुरवर ह्मणती हाय हाय । सुखा अंतरलों ॥ ४ ॥ एक एका मारी । ढुंगा पाठीं तोंडावरी । गोळा न साहवे हरि । ह्मणे पुरे आतां । येतो काकुलती । गोळा न साहवे श्रीपती । ह्मणे खेळों आतां नीती । सांगों आदरिलें ॥ ५ ॥ आनंदाचे फेरी । माजी घालुनियां हरी । एक घालिती हुंबरी । वाती सिंगें पांवे । वांकडे वेवडे । खुडे मुडे एक लुडे । कृष्णा आवडती पुढें । बहु भाविक ते ॥ ६ ॥ करी कवतुक । त्यांचें देखोनियां मुख । हरी वाटतसे सुख । खदखदां हांसे । एक एकाचें उच्छिष्ट । खातां न मानिती वीट । केलीं लाजतां ही धीट । आपुलिया संगें ॥ ७ ॥ नाहीं ज्याची गेली भुक । त्याचें पसरावितो मुख । अवघियां देतो सुख । सारिखें चि हरी । ह्मणती भला भला हरी । तुझी संगती रे बरी । आतां चाळाविसी तरी । न वजों आणिकां सवें ॥ ८ ॥ गाई विसरल्या चार । पक्षी श्वापदांचे भार । जालें यमुनेचें स्थिर । जळ वाहों ठेलें । देव पाहाती सकळ । मुखें घोटूनियां लाळ । धन्य ह्मणती गोपाळ । धिग जालों आह्मी ॥ ९ ॥ ह्मणती कैसें करावें । ह्मणती कैसें करावें । यमुनाजळीं व्हावें । मत्स्य शेष घ्यावया । सुरवरांचे थाट । भरलें यमुनेचें तट । तंव अधिक ची होंट । मटमटां वाजवी ॥ १० ॥ आनंदें सहित । क्रीडा करी गोपीनाथ । ह्मणती यमुनेंत हात । नका धुऊं कोणी । ह्मणती जाणे जीवींचें । ह्मणती जाणे जीवींचें । लाजे त्यास येथें कैचें । शेष कृष्णाचें । लाभ थोरिवे ॥ ११ ॥ धन्य दिवस काळ । आजी पावला गोपाळ । ह्मणती धालों रे सकळ । तुझिया नि हातें । मानवले गडी । एक एकांचे आवडी । दहीं खादलें परवडी । धणीवरी आजी ॥ १२ ॥ तुझा संग बरवा । नित्य आह्मां द्यावा । ऐसें करूनि जीवा । नित्य देवा चालावें । तंव ह्मणे वनमाळी । घ्यारे काठिया कांवळी । आतां जाऊं खेळीमेळीं । गाई चारावया ॥ १३ ॥ तुका ह्मणे प्रेमें धालीं । कोणा न साहवे चाली । गाई गोपाळांसि केली । आपण यांसरी ॥ १४ ॥ आजि जाला आनंद । आजि जाला आनंद । चाले परमानंद । सवें आह्मांसहित ॥ १५ ॥

१ पं. आणीक दईं धालें ॥ नाहीं पोट आमुचें ॥

१४९. या हो या चला जाऊं सकळा । पाहों हा सोहळा आजि वृंदावनींचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाइला गोपाळें वेणुनाद पडे कानीं । धीर नव्हे मनीं चित्त जालें चंचळ ॥ ध्रु ॥ उरलें तें सांडा काम नका करूं गोवी । हे चि वेळ ठावी मज कृष्णभेटीची ॥ २ ॥ निवतील डोळे याचें श्रीमुख पाहातां । बोलती तें आतां घरचीं सोसूं वाईट ॥ ३ ॥ कृष्णभेटीआड कांहीं नावडे आणीक । लाज तरी लोक मन जालें उदास ॥ ४ ॥ एकाएकीं चालियेल्या सादावीत सर्वे । तुका ह्मणे देवें रूपें केल्या तन्मय ॥ ५ ॥

## फुगड्या—अभंग २.

१५०. फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे । लाज सांडोनि एक एकी पाहे ॥ १॥ ॥ ध्रु. ॥ फुगडी गे अवघें मोडी गे । तरीच गोडी गे संसार तोडी गे ॥ ध्रु ॥ मागें जें शिकली होतीस पोटीं । तें चि विचारूनि आतां उच्चारी ओठीं ॥ २ ॥ त्रिगुणांची वेणी तुझे उडते पाठीं । सावरूनि धरी घाली मूळबंदीं गांठी ॥ ३ ॥ आगळें पाउल जिंके एकाएक । पावसी मान हे मानवती तिन्ही लोक ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुजमजमध्यें एक भाव । सम तुकें बार घेऊं पावों उंच ठाव ॥ ५ ॥

१५१. फुगडी फू सवती माझे तूं । हागुनि भरलें धू तुझ्या ढुंगा तोंडावरि थू ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुगडी घेतां आली हरी । ऊठ जावो जगनोवरी ॥ ध्रु ॥ हात पाय वेंबळ जाती । ढुंगण घोळितां लागे माती ॥ २ ॥ सात पांच आणिल्या हरी । वांचुनी काय तगसी पोरी ॥ ३ ॥ सरला दम पांगले पाय । आझुनि वरी घोळिसी काय ॥ ४ ॥ तुका ह्मणे आझुन तरी । सांगितलें तें गधडी करी ॥ ५ ॥

॥ २ ॥

## लखोटा—अभंग १.

१५२. लये लये लखोटा । मूळबांदि कासोटा । भावा केलें साहें । आतां माझें पाहें ॥ १ ॥ हातोहातीं गुंतली । जीवपणा मुकली । धीर माझा निका । सांडीं बोल फिका ॥ २ ॥ अंगीकारी हरि । नको पडों फेरी । लाज धरीं भांडे । जग झोडी रांडे ॥ ३ ॥ बैस भावा पाठीं । ऐक माझ्या गोष्टी । केला सांडीं गोहो । येथें धरीं मोहो ॥ ४ ॥ पाठमोरा डोल । आवरी तें बोल । पांगलीस बाळा । पुढें अवकळा ॥ ५ ॥ आतां उभी ठायीं । उभाउभीं पाहीं । नको होऊं डुकरी । पुढें गाढव कुतरी ॥ ६ ॥ नामा केलें खरें । आपुलें म्या बरें । तुका ह्मणे येरी । पांगविल्या पोरी ॥ ७ ॥

१ पं. न साहे.

## हुंबरी—अभंग १.

१५३. तुशीं कोण घाली हुंबरी । साही पांगल्या अठरा चारी ॥ ध्रु ॥ सहस्र मुखावरी हरी । शेष शिणविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चेंडुवासवें घातली उडी । नाथिला काळिया देऊनि बुडी ॥ २ ॥ अशुद्ध पीतां करुणा नाहीं । तुवां माउशी ही मारियेली ॥ ३ ॥ रावणाचें घर बुडविलें सारें । त्याचीं रांडापोरें मारियेलीं ॥ ४ ॥ जाणों तो ठावा आहेसि आह्मां । तुवां आपुला मामा मारियेला ॥ ५ ॥ याशीं खेळतां नाश थोरू । तुकयास्वामी सारंगधरू ॥ ६ ॥ ॥ १ ॥

## हमामा—अभंग २.

१५४. मशीं पोरा घे रे वार । तुझें बुजीन खालील द्वार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोरा हमामा रे हमामा रे ॥ ध्रु ॥ मशीं हमामा तूं घालीं । पोरा वरी सांभाळीं खालीं ॥ २ ॥ तरी च मशीं बोल । पोरा जिव्हाळ्याची ओल ॥ ३ ॥ मशीं घेतां भास । जीवा मीतूंपणा नास ॥ ४ ॥ मज सर्वे खरा । पण जाऊं नेदी घरा ॥ ५ ॥ आमुचिये रंगीं । दुजें तगेना ये संगीं ॥ ६ ॥ तुक्यासवें भास । हरी जीवा करी नास ॥ ७ ॥

१५५. हमामा रे पोरा हमामा रे । हमामा घालितां ठकलें पोर । करी येरझार चौऱ्याशीची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पहिले पहारा रंगासि आलें । सोहं सोहं सें वार घेतलें । देखोनि गडी तें विसरलें । डाई पडिलें आपणची ॥ ध्रु ॥ दुसऱ्या पहारा महा आनंदें । हमामा घाली छंदछंदें । दिस वाढे तों गोड वाटे । परि पुढें नेणे पोर काय होतें तें ॥ २ ॥ तिसऱ्या पहारा घेतला वार । अहंपणें पाय न राहे स्थिर । सोस सोस करितां डाई पडसी । सत्य जाणें हा निर्धार ॥ ३ ॥ चौथ्या पहारा हमामा । घालिसी कांपविसी हातपाय । सुऱ्यापाटिलाचा पोर यम । त्याचे पडसील डाई ॥ ४ ॥ हमामा घालितां भ्याला तुका त्यानें सांडिली गड्याची सोई । यादवांचा मूल एक विठोबा त्यासवें चारितो गाई ॥ ५ ॥ ॥ २ ॥

## गाई—अभंग १.

१५६. आह्मां घरीं एक गाय दुभता हे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वान ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ ध्रु ॥ वत्स नाहीं माय भलत्या सवें जाय । कुर्वाळी तो लाहे भावभरणा ॥ २ ॥ चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धाले सनकादिक सिद्ध मुनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी भूक तेथें काय । जोगाविते माय तिन्ही लोकां ॥ ४ ॥ ॥ १ ॥

## कांडण—अभंग २.

१५७. सिद्ध करूनियां ठेविलें कांडण । मज सांगातीण शुद्ध बुद्धि गे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आठव हा धरीं मज जागें करीं । मागिले पाहारीं सेवटिचा गे ॥ ध्रु ॥ सम तुकें घाव घालीं वो साजणी । मी तुजमिळणी जंव मिळें ॥ २ ॥ एक कशी पाखडी दुसरी निवडी । निःशेप तिसडी ओज करी ॥ ३ ॥ सरलें कांडण पाकसिद्धि करी । मेळवण क्षिरीसाकरेचें ॥ ४ ॥ उद्धव अक्रूर बंधु दोघेजण । बाप नारायण जेवणार ॥ ५ ॥ तुका ह्मणे मज माहेरीं आवडी । ह्मणोनि तांतडी मूळ केलें ॥ ६ ॥

१५८. सावडीं कांडण ओवी नारायण । निवडे आपण भूस सार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुसळ आधारीं आवरूनि धरीं । सांवरोनि थिरीं घाव घालीं ॥ ध्रु ॥ वाजती कांकणें अनुहात गजरें । छंद माहियेरे गाऊं गीति ॥ २ ॥ कांडितां कांडण नव्हे भाग शीण । तुजमजपण निवडे तों ॥ ३ ॥ तुका ह्मणे रूप उमटे आरिसा । पाक त्या सरिसा शुद्ध जाला ॥ ४ ॥

॥ २ ॥

## आडसण दळण—अभंग १.

१५९. शुद्धीचें सारोनि भरियेली पाळी । भरडोनि वोंगळी नाम केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आडसोनि शुद्ध करीं वो साजणी । सिद्ध कां पापिणी नासियेलें ॥ ध्रु ॥ सुपीं तों चि पाहें धड उगटिलें । नव्हतां नासिलें जगझोडी ॥ २ ॥ सुपीं तों चि आहे तुज तें आधीन । दळिल्या जेवण जैसें तैसें ॥ ३ ॥ सुपीं तों चि संग घेईं धडफुडी । एकसा गधडी नास केला ॥ ४ ॥ दळितां आदळे तुज कां न कळे । काय गेले डोळे कान तुझे ॥ ५ ॥ सुपीं तों चि वोज न करितां सायास । पडसी सांदीस तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ १ ॥

## दळण—अभंग १.

१६०. शुद्ध दळणाचें सुख सांगों काई । मानवित सईबाई तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शुद्ध तें वळण लवकरी पावे । डोलवितां निवे अष्टांग तें ॥ ध्रु ॥ शुद्ध हें जेवितां तन निवे मन । अल्प त्या इंधन बुडा लागे ॥ २ ॥ शुद्ध त्याचा पाक सुचित चांगला । अविट तयाला नाश नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे शुद्ध आवडे सकळां । भ्रतार वेगळा न करी जीवें ॥ ४ ॥

॥ १ ॥

१६१. उपजोनियां पुढती येऊं । काला खाऊं दहींभात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वैकुंठीं तों ऐसें नाहीं । कवळ कांहीं काल्याचें ॥ छ ॥ एकमेकां देऊं मुखीं । सुखीं घालूं हुंबरी ॥ २ ॥ तुका ह्मणे वाळवंट । बरवें नीट उत्तम ॥ ३ ॥

१६२. याल तर या रे लागें । अवघे माझ्या मागें मागें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आजि देतों पोटभरी । पुरे ह्मणाल तोंवरी ॥ छ ॥ हळू हळू चला । कोणी कोणाशीं न बोला ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडा घाटे । तेणें नका भरूं पोटें ॥ ३ ॥

१६३. शिंकें लावियेलें दुरी । होतों तिघांचे मी वरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी व्हारे दोहींकडे । मुख पसरूनि गडे ॥ छ ॥ वाहाती त्या धारा । घ्यारे दोहींच्या कोंपरा ॥ २ ॥ तुका ह्मणे हातीं टोका । अधिक उणें नेदी एका ॥ ३ ॥

१६४. पळाले ते भ्याड । त्यांसि येथें जाला नाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीट घेती धणीवरी । शिंकीं उतरितो हरी ॥ छ ॥ आपुलिया मतीं । पडलीं विचारीं तीं रितीं ॥ २ ॥ तुका लागे घ्यारे पायां । कैं पावाल या ठाया ॥ ३ ॥

१६५. धालें मग पोट । केला गड्यांनीं बोभाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ये रे ये रे नारायणा । बोलों अबोलण्या खुणा ॥ छ ॥ खांद्यावरी भार । तीं शिणती बहु फार ॥ २ ॥ तुकयाच्या दातारें । नेलीं सुखी केलीं पोरें ॥ ३ ॥

१६६. पाहाती गौळणी । तंव पालथी दुधाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणती नंदाचिया पोरें । आजि चोरी केली खरें ॥ छ ॥ त्याविण हे नासी । नव्हे दुसरिया ऐसी ॥ २ ॥ सवें तुका मेळा । त्याणें अगुणा आणिला ॥ ३ ॥

१६७. आतां ऐसें करूं । दोघां धरूनियां मारूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग टाकिती हे खोडी । तोंडीं लागली ते गोडी ॥ छ ॥ कोंडूं घरामधीं । न बोलोनि जागों बुद्धी ॥ २ ॥ बोलाविता देवा । तुका गडियांचा मेळावा ॥ ३ ॥

१६८. गडी गेले रडी । कान्हो नेदीस तूं चढी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी न खेळों न खेळों । आला भाव तुझा कळों ॥ छ ॥ न साहावे भार । बहु लागतो उशीर ॥ २ ॥ तुका आला रागें । येऊं नेदी मागें मागें ॥ ३ ॥

## हाल–अभंग २.

१६९. यमुनेतटीं मांडिला खेळ । ह्मणे गोपाळ गडियांसि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हाल महाहाल मांडा । वाउगी सांडा मोकळी ॥ छ ॥ नांवें ठेवूनि वांटा गडी । न वजे रडी मग कोणी ॥ २ ॥ तुका ह्मणे कान्हो तिळतांदळ्या । जिंके तो करी आपुला खेळ्या ॥ ३ ॥

१७०. वळें हाई न पडे हरी । बुद्धि करी शाहणा तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोकळें देवा खेळों द्यावें । सम भावें सांपडावया ॥ छ्र ॥ येतो जातो वेळोवेळां । न कळे कळा सांपडती ॥ २ ॥ तुका ह्मणे धरा ठायींच्या ठायीं । मिठी जीवीं पायीं घालुनियां ॥ ३ ॥

॥ २ ॥

## सुतुतू–अभंग १.

१७१. जीवशिवाच्या मांडूनि हाला । अहं सोहं दोन्ही भेडती भला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घाली सुतुतू फिरोनि पाही आपुणासि । पाही वाळिया तो मागिला तुटी पुढिलासि ॥ छ्र ॥ खेळिया तो हाल सांभाळी । धुम घाली तो पडे पाताळीं ॥ २ ॥ वळिया गांढ्या तो चि खेळे । दम पुरे तो वेळोवेळां खेळे ॥ ३ ॥ हातीं पडे तो चि ढांग । दम पुरे तो खेळिया चांग ॥ ४ ॥ मागें पुढें पाहे तो जिंके । हातीं पडे तो चि आधार फिके ॥ ५ ॥ आपल्या वळें खळे रे भाई । गडियाची सांडोनि सोई ॥ ६ ॥ तुका ह्मणे मी खेळिया नव्हें । जिकडे पडें त्या चि सवें ॥ ७ ॥

॥ १ ॥

१७२. अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा वाळक नंदा घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नवल केव्हडें केव्हडें । न कळे कान्होवाचें कोडें ॥ छ्र ॥ पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासि यशोदा भोजन घाली ॥ २ ॥ विश्वव्यापक कमळापती । त्यासि गौळणी कडिये घेती ॥ ३ ॥ तुका ह्मणे नटधारी । भोग भोगून ब्रह्मचारी ॥ ४ ॥

१७३. कृष्ण गोकुळीं जन्मला । दुष्टां चळकांप सुटला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतां कृष्णाचा अवतार । आनंद करिती घरोघर ॥ छ्र ॥ प्रेमें नाम वाचें गाती । सदा आनंदें नाचती ॥ २ ॥ तुका ह्मणे हरती दोष । आनंदानें करिती घोष ॥ ३ ॥

१७४. मेळउनि सकळ गोपाळ । कांहीं करिती विचार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चला जाऊं चोरूं लोणी । आजि घेऊं चंद्रधणी । वेळ लावियेला अझुणी । एकाकरितां गडे हो ॥ छ्र ॥ वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळांची मांदी ॥ २ ॥ अवघा चि वावरे । कळों नेदी कोणा फिरे ॥ ३ ॥ घर पाहोनि एकांताचें । नवविधा नवनीताचें ॥ ४ ॥ रिघे आपण भीतरी । पुरवी माथुलियाच्या हरी ॥ ५ ॥ वोलों नेदी ह्मणे स्थीर । खुणा दावी खा रे क्षीर ॥ ६ ॥ जोगावल्यावरी । तुका करितो चाकरी ॥ ७ ॥

---

१ पं. सदा नाम वाचें गाती ॥ प्रेमें आनंदें नाचती.

१७५. धन्य त्या गौळणी इंद्राच्या पूजनीं । नैवेद्य हिरोनि खातो कृष्ण ॥ १ अरे कृष्णा इंद्र अमर इच्छिती । कोण तयांप्रति येइल आतां ॥ २ ॥ तुका ह्मण देव दाखवी विंदान । नैवेद्य खाऊन हांसों लागे ॥ ३ ॥

१७६. तुह्मी गोपी बाळा मज कैशा नेणा । इंद्र अमरराणा ग्यां कि केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इंद्र चंद्र सूर्य ब्रह्मा तिन्ही लोक । माझे सकळीक य धर्म ॥ ध्रु ॥ मजपासूनिया जाले जीव शिव । देवांचा ही देव मी च कृष्ण ॥ २ । तुका ह्मणे त्यांसी बोले नारायण । व्यर्थ मी पाषाण जन्मा आलों ॥ ३ ॥

१७७. कां रे गमाविल्या गाई । आली वळती तुझी जाई । मागें जालें काई एका तें का नेणसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केलास फजित । मागें पुढें ही बहुत लाज नाहीं नित्य । नित्य दंड पावतां ॥ ध्रु ॥ बोला खोडा खिळ गाढी ऐसा कोण तये काढी । धांवेल का पाडी । तुझी आधीं बोढाळा ॥ २ ॥ चाल धांवें । मी ही येतों तुजसवें । तुका ह्मणे जंव । तेथें नाहीं पावली ॥ ३ ॥

१७८. काय या संतांचे मानूं उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ । ॥ ध्रु. ॥ काय देवा यांसि व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ ध्रु । सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ २ ॥ तुका ह्मणे वत्स धेनुचिया चित्तीं । तैसें मज येती सांभाळित ॥ ३ ॥

१७९. कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥ १ ॥ ॥ ध्रु. । काला वांटूं एकमेकां । वैष्णवा निका संभ्रम ॥ ध्रु ॥ वांकुलिया ब्रह्मादिकां उत्तम लोकां दाखवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूमंडळीं । आह्मी बळी वीर गाढे ॥ ३ ।

१८०. कवळाचिया सुखें । परब्रह्म जालें गोरखें । हात गोऊनि खाय मुखें बोटासांदी लोणचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण जाणे तेथें । कोण लाभ कां तें ब्रह्मादिकां[1] दुर्लभ ॥ ध्रु ॥ घाली हमामा हुंबरी । पांवा वाजवी छंदें[2] मोहरी । गोपाळांचे फेरी । हरि छंदें नाचतसे ॥ २ ॥ काय नव्हतें त्या घरीं खावया । रिघे लोणी चोरावया । तुका ह्मणे सवें तया । आह्मी ही सोंकलों ॥ ३ ॥

१८१. कान्होबा आतां तुह्मी आह्मी च गडे । कोणाकडे जाऊं नेदूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाहीन तुझी भाराशिदोरी । वळतीवरी येऊं नेदीं ॥ ध्रु ॥ ढवळे गाईचें दूध काढूं । एकएकल्यां ठोंबे मारूं ॥ २ ॥ तुका ह्मणे टोकवूं त्यांला । जे तुझ्या बोला मानीत ना ॥ ३ ॥

---

१ त. ब्रह्मादिकातें दुर्लभ शेष येथींचें.–२ पं. पांवा वाजवी मोहरी.

१८२. वहु काळीं वहु काळीं । आह्मी देवाचीं गोवळीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं विटों देत भात । जेऊं बैसवी सांगातें ॥ छ्र ॥ वहु काळें वहु काळें । माझे पांघरे कांवळें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं नाहीं । त्याचें आमचें सें कांहीं ॥ ३ ॥

१८३. वहु वरा वहु वरा । यासांगातें मिळे चारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि जीवेंसाठीं । घेतली कान्होवाची पाठी ॥ छ्र ॥ वरवा वरवा दिसे । समागम याचा निमिषें ॥ २ ॥ पुढती पुढती तुका । सोंकला सोंकवितो लोकां ॥ ३ ॥

१८४. घेती पाण्यासी हुंवरी । त्यांचें समाधान करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशी गोपाळांची सवे । जाती तिकडे मागें धांवे ॥ छ्र ॥ स्थिरावली गंगा । पांगविली ह्मणे उगा ॥ २ ॥ मोहरी पांवा काठी । तुका ह्मणे याजसाठीं ॥ ३ ॥

१८५. वळी गाई धंवे घरा । आमच्या करी येरझारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नांव घेतां तो जवळी । वहु भला कान्हो वळी ॥ छ्र ॥ नेदी पडों उणें पुरें । ह्मणे अवघें चि वरें ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्ता । वाटे न व्हावा परता ॥ ३ ॥

१८६. ह्मणती घालों धणीवरी । आतां न लगे शिदोरी । नये क्षणभरी । आतां यासि विसंवों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाल चाल रे कान्होवा खेळ मांडूं रानीं । बैसवूं गोठणीं गाई जमा करूनि ॥ छ्र ॥ न लगे जावें घरा । चुकलिया येरझारा । सज्जन सोयरा । मायबाप तूं आह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे घालें पोट । आतां कशाचा वोभाट । पाहाणें ते वाट । मागें पुढें राहिली ॥ ३ ॥

१८७. तुझिये संगति । जाली आमुची निश्चिंति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं देखिलें तें मिळे । भोग सुखाचे सोहळे ॥ छ्र ॥ घरीं ताकाचें सरोवर । येथें नवनीताचे पूर ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मी न वजों दवडितां ॥ ३ ॥

१८८. कामें पीडिलों माया । वहु मारी नाहीं दया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझ्या राहिलों आधारें । जालें अवघें चि बरें ॥ छ्र ॥ तुझे लागलों संगती । आतां येतों काकुळती ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझ्या भिडा । कान्होबा हे गेली पीडा ॥ ३ ॥

## टिपरी—अभंग ७.

१८९. खेळ मांडियेला वाळवंटीं घाई । नाचती वैष्णव भाई रे । क्रोध अभिमान केला पावटणी । एक एका लागतील पायीं रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाचती आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी । कळिकाळावरि घातलीसे कास । एक एकाहुनी बळी रे ॥ छ्र ॥ गोपीचंदनउटी तुळसीच्या माळा । हार मिरवती

गळां । टाळ मृदंग घाई पुष्पवरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥ २ ॥ लुब्धलीं नादीं लागली समाधी । मूढ जन नर नारी लोकां । पंडित ज्ञानी योगी महानुभाव । एकचि सिद्धसाधकां रे ॥ ३ ॥ वर्णाभिमान विसरली याति । एकएकां लोटांगणीं जाती । निर्मळ चित्तें जालीं नवनीतें । पाषाणा पाझर सुटती रे ॥ ४ ॥ होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले हे वैष्णव वीर रे । तुका ह्मणे सोपी केली पायवाट । उतरावया भवसागर रे ॥ ५ ॥

१९०. एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकसील भाई रे । त्रिगुणांचे फेरी थोर कष्टी होसी । या चौघांची तरी धरीं सोई रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खेळ खेळोनियां निराळा चि राही । सांडी या विषयाची घाई रे । तेणें चि खेळें वसवंत होसी । ऐसें सत्य जाणें माझ्या भाई रे ॥ छ ॥ सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणें विठ्ठल वसवंत केला रे । आपुल्या संवगडिया सिकवूनि घाई । तेणें सतंतर फड जागविला रे । एक घाई खेळतां तो न चुके चि कोठें । तया संत जन मानवले रे ॥ २ ॥ ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे । कान्हो गोवारी त्यांनीं वसवंत केला । आपण भोंवतीं नाचती रे । सकळिकां मिळोनि एकी च घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ॥ ३ ॥ रामा वसवंत कबिर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे । पांचा संवगडियां एक चि घाई । तेथें नाद बरवा उमटला रे । ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं । तो ही खेळ निवडिला रे ॥ ४ ॥ ब्राह्मणाचा पोर खेळिया एका भला । तेणें जन खेळकर केला रे । जनार्दन वसवंत करूनियां । तेणें वैष्णवांचा मेळ मेळविला रे । एक चि घाई खेळतां खेळतो । आपण चि वसवंत जाला रे ॥ ५ ॥ आणीक खेळिये होउनियां गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे । तुका ह्मणे गडे हो हुशारुनि खेळा । पुढिलांची धरूनियां सोई रे । एक चि घाई खेळतां जो चुकला । तो पडेल संसारडाई रे ॥ ६ ॥

१९१. बाराही सोळा गडियांचा मेळा । सतरावा वसवंत खेळिया रे । जतिस पद राखों जेणें टिपरिया घाई । अनुहातें वायें मांदळा रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाचत पंढरिये जाऊं रे खेळिया । विठ्ठल रखुमाई पाहूं रे ॥ छ ॥ सा चहूं वेगळा अठराही निराळा । गाऊं वाजवूं एक चाळा रे । विसरती पक्षी चारा घेणें पाणी । तारुण्य देहभाव बाळा रे ॥ २ ॥ आनंद तेथिचा मुकियासि वाचा । बहिरे ऐकती कानीं रे । आंधळ्यांसि डोळे पांगळांसि पाय । तुका ह्मणे वृद्ध होती तरुणे रे ॥ ३ ॥

---

१ पं. लुब्धल्या.–२ पं. आठरा.–३ दे. त. तारुण्यें.

१९२. दोन्ही टिपरीं एक चि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे । कुसरी अंगें मोडितील परी । मेळविति एको छंदें रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं च न वजे वांयां रे । खेळिया एक चि वसवंत अवघियां रे । सम विषम तेथें होऊं च नेदी । जाणऊनि आगळिया रे ॥ छ्र ॥ संत महंत सिद्ध खेळतील घाईं । ते च सांभाळी माझ्या भाई रे । हात राखोन हाणिती टिपऱ्या । टिपरें मिळोनि जाय त्याची सेंइ रे ॥ २ ॥ वितोळाचें अवघें जाईल वांयां । काय ते शृंगारूनि काया रे । निवडूनि बाहेर काढिती निराळा । जो न मिळे संताचिया घाई रे ॥ ३ ॥ प्रकाराचें काज नाहीं सोडीं लाज । निःशंक होउनियां खेळें रे । नेणतीं नेणतीं च एकें पावलीं मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥ ४ ॥ रोमांच गुढिया डोलविती अंगें । भावबळें खेळविती सोंगें रे । तुका ह्मणे कंठ सद्गदित दाटे । या विठोबाच्या अंगसंगें रे ॥ ५ ॥

१९३. या रे गडे हो धरूं घाई जाणतां ही नेणतां । नाम गाऊं टाळी वाहूं आपुलिया हिता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फावलें तें घ्यारे आतां प्रेमदाता पांडुरंग । आजि दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥ छ्र ॥ हिंडती रानोरान भुजंगांत कांट्यावन । सुख तयांहून आह्मां गातां नाचतां रे ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा । आजि येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं ॥ ३ ॥

१९४. भीमातीरीं एक वसलें नगर । त्याचें नांव पंढरपुर रे । तेथील मोकासी चार भुजा त्यासी । वाइला सोळा हजार रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । सुख देईल विसावा रे । पुढें गेले ते निधाई जाले । वाणितील त्याची सीमा रे ॥ छ्र ॥ बळियां आगळा पाळी लोकपाळां । रीघ नाहीं कळिकाळा रे । पुंडलीक पाटील केली कुळवाडी । तो जाला भवदुःखा वेगळा रे ॥ २ ॥ संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जया जें पाहिजे तें आहे रे । भुक्तिमुक्ति[४] फुका च साठीं । कोणी तयाकडे न पाहे रे ॥ ३ ॥ दोन्ही च हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे । न वजों ह्मणती आह्मी वैकुंठा । जिहीं देखिली पंढरी रे ॥ ४ ॥ बहुत दिस होती मज आस । आजि घडलें सायासीं रे । तुका ह्मणे होय तुमचेनी पुण्यें । भेटी तया पायांसी रे ॥ ५ ॥

१९५. पंढरी चोहटा मांडियेला खेळ । वैष्णव मिळोनि सकळ रे । टाळ टिपरी मांदळे एक नाद रे । जाला बसवंत देवकीचा बाळ रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चला तें कवतुक भाई रे । पाहों डोळां कामीं गुंतलेति काई रे । भाग्यवंत कोणी गेले सांगाति । ऐसें सुख त्रिभुवनीं नाहीं रे ॥ छ्र ॥ आनंदाचे वाद सुखाचे

---

१ पं. एकाएकछंदें रे.–२ पं. छा. विटाळाचे.–३ पं. सुखा.–४ त. भुक्ति मुक्ति तेथें.

संवाद । एक एका दाखविती छंद रे । साही अठरा चारी घालुनियां घाई । नाचती फेरी टाळशुद्ध रे ॥ २ ॥ भक्ताचीं भूषणें मुद्रा आभरणें । शोभती चंदनाच्या उट्या रे । सत्व सुंदर कास घालूनि कुसरी । गर्जती नाम बोभाटीं रे ॥ ३ ॥ हरि हर ब्रह्मा तीर्थासहित भीमा । देव कोटी तेहतीस रे । विस्मित होऊनि ठाकले सकळ जन । अमरावती केली ओस रे ॥ ४ ॥ वाणितील थोरी वैकुंठिची परी । न पवे पंढरीची सरी रे । तुकयाचा दास ह्मणे नका आळस करूं । सांगतों नरनारींसें रे ॥ ५ ॥

॥ ७ ॥

१९६. ब्रह्मादिकां न कळे खोळ । ते हे आकळ धरिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोहरी पांवा वाहे काठी । धांवे पाठीं गाईचे ॥ ध्रु ॥ उच्छिष्ट न लभे देवा । तें हें सदैवां गोवळ्यां ॥ २ ॥ तुका ह्मणे जोड जाली । ते हे माउली आमुची ॥ ३ ॥

१९७. कान्होवा तूं आलगट । नाहीं लाज बहु धीट । पाहिलें वाईट । बोलोनियां खोटें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तूं न संडिसी खोडी । करिसी केली घडीघडी । पाडिसी रोकडी । तुटी माये आह्मांसी ॥ ध्रु ॥ तूं ठायींचा गोवळ । अविचारी अनर्गळ । चोरटा शिंदळ । ऐसा पिटूं डांगोरा ॥ २ ॥ जरी तुझी आई । आह्मी घालूं सर्वा ठायीं । तुका ह्मणे तें ही । तुज वाटे भूषण ॥ ३ ॥

१९८. भोजनाच्या काळीं । कान्हो मांडियेली आळी । काला करी वनमाळी । अन्न एकवटा । देईं निवडुनी । माते ह्मणतो जननी । हात पिटूनि मेदिनी । वरि अंग घाली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा आळी घेसी । नव्हे तें चि करविसी । घेईं दुसरें तयेसी । वारी ह्मणे नको ॥ ध्रु ॥ आतां काय करूं । नये यासि हाणूं मारूं । नव्हे बुझावितां स्थिरू । कांहीं करिना हा । त्वां चि केलें एके ठायीं । आतां निवडूनि खाईं । आह्मा जाचितोसि काई । हरिसि ह्मणे माता ॥ २ ॥ त्याचें तयाकुन । करवितां तुटे भान । तंव जालें समाधान । उठोनियां बैसे । माते बरें जाणविलें । अंग चोरूनि आपुलें । तोडियलें एका बोलें । कैसें सुखदुःख ॥ ३ ॥ ताट पालवें झाकिलें । होतें तैसें तेथें केलें । भिन्नाभिन्न निवडिलें । अन्नें वेगळालीं । विस्मित जननी । भाव देखोनियां मनीं । ह्मणे नाहीं ऐसा कोणी । तुज सारिखा रे ॥ ४ ॥ हरुषली माये । सुख अंगीं न समाये । कवळूनि वाहे । देती आलिंगन । आनंद भोजनीं । तेथें फिटलीसे धणी । तुका ह्मणे कोणी । सांडा शेष मज ॥ ५ ॥

---

१ त. नारीबाळांस—२ दे. आळ.—३ दे. तोंचि.

१९९. चला वळूं गाई । बैसों जेऊं एके ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु केली वणवण । पायपिटी जाला सिण ॥ ध्रु ॥ खांदीं भार पोटीं भुक । काय खेळायाचें सुख ॥ २ ॥ तुका ह्मणे धांवे । मग अवघें बरवें ॥ ३ ॥

२००. नेणों वेळा काळ । घालों तुझ्यानें सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं नाहीं रे कान्होबा भय आह्मापाशीं । वळूनि पुरविसी गाई पोटा खावया ॥ ध्रु ॥ तुजपाशीं भये । हें तों बोलों परी नये ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । आह्मा अनुभवें फोल ॥ ३ ॥

## विटूदांडू—अभंग १.

२०१. सारा विटूदांडू । आणीक कांहीं खेळ मांडूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु अंगा आले डाव । स्थिर नाहीं कोठें पाव ॥ ध्रु ॥ कोली हाणे टोला । झेली तेणें तो गोविला ॥ २ ॥ एकमेकां हाका मारी । सेल जाली एक घरी ॥ ३ ॥ राजी आलें नांव । फेरा न चुके चि धांव ॥ ४ ॥ पुढें एक पाटी । एक एकें दोघां आटी ॥ ५ ॥ एका सोस पोटीं । एक धांवे हात पिटी ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां । खेळ मोडावा परता ॥ ७ ॥

॥ १ ॥

२०२. पाहातां गोवळी । खाय त्यांची उष्टावळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती नामाचें चिंतन । गडी कान्होबाचें ध्यान ॥ ध्रु ॥ आली घावी डाई । धांवे वळत्या मागें गाई ॥ २ ॥ एके ठायीं काला । तुका ह्मणे भाविकाला ॥ ३ ॥

२०३. पैल आली आगी कान्हो काय रे करावें । न कळे तें कैसें आजि वांचों आह्मी जीवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांव रे हरी सांपडलों संधी । वोणव्याचे मधीं बुद्धि कांहीं करावी ॥ ध्रु ॥ अवचितां जाळ येतां देखियेला वरी । परतोनि पाहतां आधीं होतों पाठमोरी ॥ २ ॥ सभोंवता फेर रीग न पुरे पळतां । तुका ह्मणे जाणसी तें करावें अनंता ॥ ३ ॥

२०४. भिऊं नका बोले झाकुनियां राहा डोळे । चालवील देव घाक नाहीं येणें वेळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाप रे हा देवांचा ही देव कळों । नेदी माव काय करी करवी ते ॥ ध्रु ॥ पसरूनि मुख विश्वरूप खाय जाळ । सारूनियां संधी अवघे पाहाती गोपाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी मागें भ्यालों वांयांविण । कळों आलें आतां या सांगातें नाहीं शिण ॥ ३ ॥

२०५. नेणती तयांसि साच भाव दावी हरी । लाज नाहीं नाचे पांवा वाजवी मोहरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चला रे याच्या पायां लागों आतां । राखिलें जळतां महा आगीपासूनि ॥ छ्र ॥ कैसी रे कान्होवा एवढी गिळियेली आगी । न देखों पोळला तुज तोंडीं कोठें अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी कां रे करितां नवल । आमची सिदोरी खातो त्याचें आलें बळ ॥ ३ ॥

२०६. त्यांनीं धणीवरी संग केला हरीसवें । देऊनि आपुलें तो चि देईल तें खावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला । बहु दिवस संग हा चि निर्धार त्याला ॥ छ्र ॥ कान्होबा तूं जेवीं घासोघासीं ह्मणती । आरुष गोपाळें त्यांची बहु देवा प्रीती ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जाऊं आपुलिया घरा । तोय वांचविलें ऐसें सांगों रे दातारा ॥ ३ ॥

२०७. ध्या रे भोंकरें भाकरी । दहींभाताची सिदोरी । ताक सांडीं दुरी । असेल तें तयापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें द्यावें तैसें घ्यावें । थोडें परी निरें व्हावें । सांगतों हें[2] ठावें । असों द्या रे सकळां ॥ छ्र ॥ माझें आहे तैसें पाहे । नाहीं तरी घरा जाये । चोरोनियां माये । नवनीत आणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । माझें कोणी नाहीं हरी । नका करूं दुरी । मज पायां वेगळें ॥ ३ ॥

२०८. काल्याचिये आसे । देव जळीं जाले मासे । पुसोनियां हांसे टिरीसांगातें हात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाजे त्यासि वांटा नाहीं । जाणे अंतरींचें तें ही । दीन होतां कांहीं । होऊं नेदी वेगळें ॥ छ्र ॥ उपाय अपाय यापुढें । खोटे निवडितां कुडे । जोडुनियां पुढें । हात उभे नुपेक्षी ॥ २ ॥ तें ध्या रे सावकाशें । जया फावेल तो तैसें । तुका ह्मणे रसें । प्रेमाचिया आनंदें ॥ ३ ॥

२०९. गोपाळ ह्मणती कान्होबा या रे कांहीं मागों । आपुलाले आह्मी जीवींची तया आवडी सांगों । एक ह्मणती उगे रे उगे मागें चि लागों । निजों नका कोणी घरीं रे आजि अवघे चि जागों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणोनि नेणता हरि रे मध्यें उगा चि वैसे । नाइकोनि बोल अइके कोण कोणाचे कैसे । एक एकाच्या संवांदा[3] जाणे न मिळे ची ऐसें । [4]पोटीचें होटा आणवी देतो तयांसि तैसें ॥ छ्र ॥ एक ह्मणति बहु रे आह्मी पीडिलों माया । नेदी दहींभातसिदोरी ताक घालिवी पिया । तापलों वळितां गोधनें नाहीं जीवन छाया । आतां मागों पोटभरी रे याच्या लागोनि पायां ॥ २ ॥ एक ह्मणति तुमचें अरे

---

१ दे. पं. कान्होबा तूं जेवीं घासोघासीं.–२ पं. सांगतो रे.–३ पं. संवादें.–४ पं. पोटांतील.–
५ त. ह्मणती अरे तुमचें.

पोट तें किती । मागों गाई म्हैसी घोडे रे धन संपत्ति हत्ति । देव गडी कान्हो आमुचा आह्मां काय विपत्ति । कन्याकुमरें दासी रे वाजावरी सुपती ॥ ३ ॥ एक ह्मणती वेटे हो कोण करी जतन । गाढव तैसें चि घोडें रे कोण तयाचा मान । लागे भवरोग वाहतां खांदीं चवघे जण । हातीं काठ्या डोया वोडक्या हिंडों मोकळे राण ॥ ४ ॥ एक ह्मणती रानीं रे वहु सावजें फार । फाडफाडूं खाती डोळे रे पाय नेतील कर । राखोनि राखे आपणा ऐसा कइचा शूर । वैसोनि राहों घेरीं रे कोण करी हे चार ॥ ५ ॥ घरीं वैसलिया वहुतें वहु सांगती काम । रिकामें कोणासि नावडे ऐसें आह्मासि ठावें । चौघांमध्यें वरें दिसेसें तेथें नेमक व्हावें । लपोनि सहैज खेळतां भलें गाडियासवें ॥ ६ ॥ एक ह्मणती गडी ते भले मिळती मता । केली तयावरी चाली रे वरी आपुली सत्ता । नसावे ते तेथें तैसे रे खेळ हाणिती लाता । रडी एकाएकीं गेलिया गोंधळ उडती लाता ॥ ७ ॥ एक ह्मणती खेळतां उगीं राहतीं पोरें । ऐसें काय घडों शके रे कोणी लहान थोरें । अवघीं येती रागा रे एका ह्मणतां वरें । संगें वाढे कलॅह हरावा एकाएकीं च खरें ॥ ८ ॥ एक ह्मणती एकला रे तूं जासील कोठें । सांडी मांडी हें वाउगें तुझे बोल चि खोटे । ठायीं राहा उगे ठायीं च कां रे सिणसी वाटे । अवघियांची सिदोरी तुझे भरली मोटे ॥ ९ ॥ तुका ह्मणे कांय काहण्या अरे सांगाल गोष्टी । चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं । जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ तांटीं । घाले गडी तुका ढेकर देतो[६] विठ्ठल कंठीं ॥ १० ॥

२१०. आजि ओस अमरावती । काला पाहावया येती । देव विसरती । देहभाव आपुला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आनंद न समाये मेदिनी । चारा विसरल्या पाणी । तटस्थ त्या ध्यानीं । गाई जाल्या श्वापदें ॥ ध्रु ॥ जें या देवांचें दैवत । उभें आहे या रंगांत । गोपाळांसहित । क्रीडा करी कान्होबा ॥ २ ॥ तया सुखाची । शिराणी । तीं च पाउलें मेदिनी । तुका ह्मणे मुनी । धुंडितां न लाभती ॥ ३ ॥

२११. चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं । मांडियेला काला भोंवती गोपाळांची दाटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आनंदें कवळ देती एकामुखीं एक । न ह्मणती सान थोर अवघीं सकळिक ॥ ध्रु ॥ हमामा हुंबरी पांवा वाँजविती मोहरी । घेतलासे फेर माजी घालुनियां हरी ॥ २ ॥ लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती । विसरलीं

१ दे. हातिं.–२ पं. धीर.–३ पं. खेळतां सहज.–४ पं. सगे वाटे कल्ह करावा.–५ पं. अरे काहण्या काय.–६ पं. देती.–७ त. पावा वाती तल्ला लोरी । दे. पंढरपुराप्रमाणें होता तो तळेगांवाप्रमाणें मागून केला आहे.

देहभाव शंका नाहीं चित्तीं ॥ ३ ॥ पुष्पाचा वरुषाव जाली आरतियांची दाटी । तुळसी गुंफोनियां माळा घालितील कंठीं ॥ ४ ॥ यादवांचा राणा गोपीमनोहर कान्हा । तुका ह्मणे सुख वाटे देखोनियां मना ॥ ५ ॥

२१२. माझे गडी कोण कोण । निवडा भिन्न यांतुनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपआपणामध्यें मिळों । एक खेळों एकाशीं ॥ छ ॥ घाबरियांच्या मोडा काड्या । धाडा भाड्यां वळतियां ॥ २ ॥ तुका ह्मणे देवापाशीं । विटाळशी नसावी ॥ ३ ॥

२१३. हे चि अनुवाद सदा सर्वकाळ । करुनियां गोपाळकाला सेवूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोरसलें कामधेनूचें दुभतें । संपूर्ण आइतें गगनभरी ॥ छ ॥ संत सनकादिक गोमट्या परवडी । विभाग आवडी इच्छेचिये ॥ २ ॥ तुका ह्मणे मर्ध घालूं नारायण । मग नव्हे सीण कोणा खेळें ॥ ३ ॥

२१४. अधिकाचा मज कांटाळा । तुह्मां गोपाळां संगति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय नाहीं तुह्मापाशीं । सकळांविशीं संपन्न ॥ छ ॥ उद्योगाचा नेघें भार । लागल्या सार पुरतें ॥ २ ॥ तुका ह्मणे अधीर जिणें । नारायणें न करावें ॥ ३ ॥

२१५. जालों आतां एके ठायीं । न वंचूं कांहीं एकमेकां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरलों हेंगे देउनि मोट । कटकट काशाची ॥ छ ॥ सोडोनियां गांठीं पाहें । काय आहे त्यांत तें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों निराळा । आतां गोपाळा देऊं बोभा ॥ ३ ॥

२१६. या रे करूं गाई । जमा निजलेती काई । बोभाटानें आई । घरा गेल्या मारील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घाला घाला रे कुकारे । ज्याची तेणें चि मोहरे । एवढें चि पुरे । केलियानें सावध ॥ छ ॥ नेणोनियां खेळा । समय समयाच्या वेळा । दुश्चिताजवळा । मिळालेति दुश्चित ॥ २ ॥ तुका ह्मणे शीक । न धरितां लागे भीक । घरा सकळीक । मनेरी धांवा वळतियां ॥ ३ ॥

२१७. बोळलीचा दोहूं पान्हा । मज कान्हा सांगितला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्या जि हेंगे क्षीर हातीं । निगुतीनें वाढावें ॥ छ ॥ सांगितलें केलें काम । नव्हे धर्म सत्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नवें जुनें । ऐसें कोणें सोसावें ॥ ३ ॥

२१८. येइल तें घेइन भागा । नव्हे जोगा दुसरिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडी ते तुह्मी जाणा । बहु गुणांसारिखी ॥ छ ॥ मज घेती डांगवरी । सर्वे हरि नसलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे राबवा देवा । करीन सेवा सांगितली ॥ ३ ॥

---

१ पं. भ्याडां.

२१९. अंतरली कुटी भेटी । भय धरूनियां पोटीं । ह्मणतां जगजेठी । धांवें करुणाउत्तरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाप बळिया शिरोमणी । उतावीळ या वचनीं । पडलिया कानीं । धांवा न करी आळस ॥ छ ॥ बळ दुनी शरणागता । स्वामी वाहों नेदी चिंता । आइतें चि दाता । पंगतीस बैसवी ॥ २ ॥ वाहे खांदीं पाववी घरा । त्याच्या करी येरझारा । बोबड्या उत्तरा । स्वामी तुकया मानवे ॥ ३ ॥

२२०. धन्य तें गोधन कांबळी काष्ठिका । मोहरी पांवा निका ब्रीद बांकी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ । नर नारी सकळ धन्य जाल्या ॥ छ ॥ धन्य ते देवकी जसवंती दोहींचें । वसुदेवनंदाचें भाग्य जालें ॥ २ ॥ धन्य त्या गोपिका सोळा सहस्र बाळा । यादवां सकळां धन्य जालें ॥ ३ ॥ धन्य ह्मणे तुका जन्मा तीं चि आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ४ ॥

२२१. गौळणी वांधिती धारणासि गळा । खेळे त्या गोपाळांमाजी ब्रह्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवोनियां मागे यशोदे भोजन । हिंडे रानोरान गाईपाठीं ॥ छ ॥ तुका ह्मणे सर्व कळा ज्याचे अंगीं । भोळेपणालागीं भीक मागे ॥ २ ॥

२२२. देखिलासि माती खातां । दावियानें बांधी माता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाली घेउनि कांबळी काठी । गाई वळी वेणु पाठीं ॥ छ ॥ मोठें भावार्थीचें बळ । देव जाला त्याचें बाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तासाठीं । देव धांवे पाठोवाठीं ॥ ३ ॥

२२३. हा गे माझे हातीं । पाहा कवळ सांगाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवें दिला खातों भाग । कराल तर करा लाग ॥ छ ॥ धालें ऐसें पोट । वरी करूनियां बोट ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । मग कैंच्या या परी ॥ ३ ॥

२२४. अवघें अवघीकडे । दिलें पाहे मजकडे । अशा संवगडे । सहित थोरी लागली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे धरिला अबोला । माझा वांटा देईं मला । सिदोरीचा केला । झाडा आतां निवडे ना ॥ छ ॥ भूक लागली अनंता । कां रे नेणसी जाणतां । भागलों वळितां । गाई सैरा ओढाळा ॥ २ ॥ तुका करुणा भाकी । हरि पाहे गोळा टाकी । घेता जाला सुखी । भीतरी वांटी आणीका ॥ ३ ॥

२२५. आह्मी गोवळीं रानटें । नव्हों जनांतील धीटें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सिदोरीचा करूं काला । एक वांटितों एकाला ॥ छ ॥ खेळों आपआपणांसीं । आमचीं तीं आह्मांपासीं ॥ २ ॥ मिळालों नेणते । तुका कान्होवा भोंवते ॥ ३ ॥

---

१ दे. कैं जी.

२२६. "अवघियां दिला गोर। मजकरे पाहीना" ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुंदे गोपाळ डोळे चोळी। ढुंगा थापली हाणे तोंडा ॥ छ ॥ आवडती थोर मोटे। मी रे पोरटें दैन्यवाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणों भाव। जीविंचा देव बुझावी ॥ ३ ॥

## मृदंग पाट्या—अभंग.

२२७. मागें पुढें पाहें सांभाळूनि दोनी ठाय। चुकावूनि जाय गडी राखे गडियांसि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुरडे दंडा दोहीं तोंडें गडियां सावध करी। भेटतियासंगें तया हाल तुजवरी ॥ छ ॥ गडियां गडी वांटुनि देई। ज्याचा सोडी ते चि ठायीं ॥ २ ॥ अगळ्या बळें करील काय। तुज देणें लागे डोय ॥ ३ ॥ नवां घरीं पाडला करीं। सांपडे तो तेथें धरीं ॥ ४ ॥ जिंकोनि डाव करीं। टाहो सत्ता आणिकांवरी ॥ ५ ॥ सांपडोनि डाई बहु। काळ गुंतलासी ॥ ६ ॥ बळिया गडी फळी। फोडी न धरितां त्यांसी ॥ ७ ॥ चुकांडी जो खाय मिळोनि अंगीं जाय। गुंतलासी काय तुका ह्मणे अज्ञानी ॥ ८ ॥

२२८. पाहा रे तमासा तुमचा येथें नव्हे लाग। देईन तो भाग आलियाचा बाहेरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जागा रे गोपाळा नो ठायीं ठायीं जागा। चाहुलीनें भागा दूर मजपासूनि ॥ छ ॥ न रिघतां ठाव आह्मा ठावा पाळतियां। भयाभीत वांयां तेथें काय चांचपा[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे हातां चढे जीवाचिये साटीं। मिटक्या देतां गोड मग लागतें शेवटीं ॥ ३ ॥

२२९. डाई घालुनियां पोरें। त्यांचीं गुरें चुकवीलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खेळ खेळतां फोडिल्या डोया। आपण होय निराळा ॥ छ ॥ मारिती माया घेती जीव। नाहीं कीव अन्यायें ॥ २ ॥ तुका कान्होबा मागें। तया अंगें काळों आलें ॥ ३ ॥

२३०. आतां हें चि जेऊं हें चि जेऊं। सवें घेऊं सिदोरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिनामाचा खिचडा केला। प्रेमें मोहिला साधनें ॥ छ ॥ चवीं चवीं घेऊं घास। ब्रह्मरस आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे गोड लागे। तों तों मागे रसना ॥ ३ ॥

२३१. अवघें चि गोड जालें। मागीलये भरी आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साह्य जाला पांडुरंग। दिला अभ्यंतरीं संग ॥ छ ॥ थडिये पावतां तो वाव। मागें वाहावतां ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे गेलें। स्वप्नींचें जागें जालें ॥ ३ ॥

---

१ पं. चांचपाल.

२३२. तुजसवें येतों हरी। आह्मां लाज नाहीं तरी। उचलिला गिरी। चांग तई वांचलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोडा आतां खेळ। गाई गेल्या जाला वेळ। फांकल्या ओढाळ। नाहीं तो चि आवरा ॥ छ ॥ चांग दैवें यमुनेसी वांचलों बुडतां। निलाजिरीं आह्मी नाहीं भय धाक या अनंता ॥ २ ॥ खातों आगी माती। आतां पुरे हा सांगाती। भोंवतां भोंवेल। आह्मां वाटतें हें चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे उरी नाहीं तुजसवें। शोहाणिया दुरी छंद भोळियां सवें[1] ॥ ४ ॥

२३३. नको आह्मांसवें गोपाळा। येऊं ओढाळा तुझ्या गाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण धांवें त्यांच्या लागें। मागें मागें येरझारी ॥ छ ॥ न वैसती एके ठायीं। धांवती दाही दाहा वाटां ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं राख मनेरी। मग त्या येरी आह्मी जाणों ॥ ३ ॥

२३४. मागायास गेलों सिदोरी। तुझ्या मायाघरीं गांजियेलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजविणें ते नेदी कोणा। सांगतां खुणा जिवें गेलों ॥ छ ॥ वांयांविण केली येरझार। आतां पुरे घर तुझी माया ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं आह्मां वेगळा। राहें गोपाळा ह्मणउनी ॥ ३ ॥

२३५. काकुलती येतो हरी। क्षणभरी निवडितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमची मज लागली सवे। ठायींचे नवे नव्हों गडी ॥ छ ॥ आणीक बोलाविती फार। बहु थोर नावडती ॥ २ ॥ भाविकें त्यांची आवडी मोठी। तुका ह्मणे मिठी घाली जिवें ॥ ३ ॥

२३६. वरता वेंघोनि घातली उडी। कळंबावुडीं यमुनेसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरि बुडाला बोंब घाला। घरचीं त्यांला ठावा नाहीं ॥ छ ॥ भवनदीचा न कळे पार। काळिया माजी थोर विखार ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वाउग्या हाका। हातींचा गमावुनियां थिंका ॥ ३ ॥

२३७. अवघीं मिळोनि कोल्हाळ केला। आतां होता ह्मणती गेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपलिया रडती भावें। जयासवें जयापरी ॥ छ ॥ चुकलों आह्मी खेळतां खेळ। गेला गोपाळ हातींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे धांवती थडी। न घली उडी आंत कोणी ॥ ३ ॥

२३८. भ्यालीं जिवा चुकलीं देवा। नाहीं ठावा जवळीं तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहाकटा करिती हाय। हात डोकें पिटिती पाय ॥ छ ॥ जवळी होतां न कळे आह्मां। गेल्या सीमा नाहीं दुःखा ॥ २ ॥ तुका ह्मणे हा लाघवी मोटा। पाहे खोटा खरा भाव ॥ ३ ॥

---

[1] दे. शाहाणे या भावें दुरी छंद भोळ्यिा। पं. शाहाणे या दुरी। छंद भोळ्यिा भावें।

२३९. काळिया नाथूनि आला वरी। पैल हरी दाखविती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुसरिया भावें न कळे कोणा। होय नव्हेसा संदेह मना ॥ ध्रु ॥ रूपा भिन्न पालट जाला। गोरें सांवळेंसा पैं देखिला ॥ २ ॥ आश्वासीत आला करें। तुका खरें ह्मणे देव ॥ ३ ॥

२४०. हरि गोपाळांसवें सकळां। भेटे गळ्या गळा मेळवूनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाविकें त्यांची आवडी मोठी। सांगे गोष्टी जीविंचिया ॥ ध्रु ॥ योगियांच्या ध्याना जो नये। भाकरी त्यांच्या मागोनि खाये ॥ २ ॥ तुका ह्मणे असे शाहाणियां दुरी। वोवडियां दासें हाका मारी ॥ ३ ॥

२४१. धांव कान्होबा गेल्या गाई। न ह्मणे मी कोण ही काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलियांचें वचन देवा। गोड सेवा करीतसे ॥ ध्रु ॥ मागतां आधीं द्यावा डाव। वळिया मी तो नाहीं भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा सवें। अनुसरावें जीवेंभावें ॥ ३ ॥

२४२. धाकुट्याचे मुखीं घांस घाली माता। वरी करी सत्ता शाहाणियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें जाणपणें पडिलें अंतर। वाढे तों तों थोर अंतराय ॥ ध्रु ॥ दोन्ही उभयतां आपण चि व्याली। आवडीची चाली भिन्न भिन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगापासूनि निराळें। निवडिलें वळें रडतें स्तनीं ॥ ३ ॥

२४३. देवाचे ह्मणोनि देवीं अनादर। हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां येरा जना ह्मणावें तें काई। जया भार डोई संसाराचा ॥ ध्रु ॥ त्यजुनी संसार अभिमान सांटा। जुलूम हा मोटा दिसतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे अळस करूनियां साहे। वळें कैसे पाहें वांयां जाती ॥ ३ ॥

२४४. उपदेश तो भलत्या हातीं। जाला चित्तीं धरावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये जाऊं पात्रावरी। कवटी सारी नारळें ॥ ध्रु ॥ स्त्री पुत्र बंदीजन। नारायण स्मरविती ॥ २ ॥ तुका ह्मणे रत्नसार। परि उपकारें चिंधीचे ॥ ३ ॥

२४५. संताचे गुण दोष आणितां या मना। केलिया उगाणा सुकृताचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ। चिरोनि केळी केळ गाढव तो ॥ ध्रु ॥ तुका ह्मणे गंगे अग्नीसि विटाळ। लावी तो चांडाळ दुःख पावे ॥ २ ॥

२४६. चुंबळीचा करी चुंबळीशीं संग। अंगीं वसे रंग क्रियाहीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बीजा ऐसें फळ दावी परिपाकीं। परिमळ लौकिकीं जाती ऐसा ॥ ध्रु ॥ माकडाच्या गळां रत्न कुळांगना। सांडूनियां सुना विंदी धुंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा व्याली ते गाढवी। फजिती ते व्हावी आहे पुढें ॥ ३ ॥

---

१ दे. त. वोवडियां दास कामारी.–२ पं. परी आधार चिंधीचा.

२४७. सांपडला संदीं । मग बळिया पडे वंदीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी कोणी आहे वेळ । हातीं काळाच्या सकळ ॥ छ ॥ दाता मागे दान । जाय याचका शरण ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ३ ॥

२४८. सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आला डोळ्यांसि कवळ । तेणें मळलें उजळ ॥ छ ॥ अंगाचे भोंवडी । भोय ह्माड फिरती धोंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाड । पाप ठाके हिता आड ॥ ३ ॥

२४९. न देखोन कांहीं । म्या पाहिलें सकळ ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों अवघियांपरी । मी हें माझें ठेलें दुरी ॥ छ ॥ न घेतां घेतलें । हातें पायें उसंतिलें ॥ २ ॥ खादलें न खातां । रसना रस जाली घेतां ॥ ३ ॥ न बोलोनि बोलें । केलें प्रगट झांकिलें ॥ ४ ॥ नाइकिलें कांनीं । तुका ह्मणे आलें मनीं ॥ ५ ॥

## ब्रह्मचारी फिर्याद गेला—अभंग २.

२५०. काखे कडासन आड पडे । खडबड खडबडे हुसकलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दादकरा दादकरा । फजितखोरा लाज नाहीं ॥ छ ॥ अवघा जाला राम राम । कोणी कर्म आचरे ना ॥ २ ॥ हरिदासांच्या पडती पायां । ह्मणती तयां नागवावें ॥ ३ ॥ दोहीं ठायीं फजीत जालें । पारणें केलें अवकळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाश केला । विटंविला वेश जिंहीं ॥ ५ ॥

२५१. कुटुंबाचा केला त्याग । नाहीं राग जंव गेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भजन तें वोंगळवाणें । नरका जाणें चुके ना ॥ छ ॥ अक्षराची केली आटी । जरी पोटीं संतनिंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें पाय । तया जाय स्थळासि ॥ ३ ॥ ॥ २ ॥

२५२. तारतिम वरी लोंडा च पुरतें । अंतरा हें येतें अंतरीचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी काय वरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकीं सत्या ऐसें ॥ छ ॥ भोजनांत द्यावें विष कालवूनि । मोहचाळवणी मारावया ॥ २ ॥ तुका ह्मणे मैंदें देखों नेदी कुडें । आदरें चि पुढें सोंग दावी ॥ ३ ॥

२५३. ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवानावें मोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया घडली गुरुहत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥ छ ॥ सांगितलें कानीं । रूप आपुलें वाखाणी ॥ २ ॥ भूतांच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेलें चोरें ॥ ३ ॥ शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥ ४ ॥ निंदा स्तुति स्तवनीं । तुका ह्मणे वेंची वाणी ॥ ५ ॥

---

१ दे. फर्दी –२ पं. जाले.–३ त. पं. जिणें –४ त. देव.–५ दे. त. आदर –६ दे. ( नवीन फेर केला आहे. ) तुका ह्मणे वाणी । निंदा स्तुति लावी स्तवनीं ॥

२५४. इहलोकींचा हा देहे । देव इच्छितातो पाहें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य आह्मी जन्मा आलों । दास विठोबाचे जालों ॥ ध्रु ॥ आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे पावटणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥ ३ ॥

२५५. पंडित वाचक जरी जाला पुरता । तरी कृष्णकथा ऐके भावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षीर तुपा साकरे जालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥ ध्रु ॥ जाणोनियां लाभ घेईं हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा ॥ २ ॥ जाणिवेचें मूळ उपडोनी खोड । जरी तुज चाड आहे तुझी ॥ ३ ॥ नाना परिमळद्रव्य उपचार । अंगीं उटी सारेचंदनाची ॥ ४ ॥ जेविलियाविण शून्य ते शृंगार । तैसी गोडी हरिकथेविण ॥ ५ ॥ ज्याकारणें वेदश्रुति ही पुराणें । तें चि विठ्ठलनाणें तिष्ठे कथे ॥ ६ ॥ तुका ह्मणे येर दगडाचीं पेंवें । खळेंखळ आंधवें मूळ तेथें ॥ ७ ॥

२५६. आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती बेटे उसणवारी । यमपुरी भोगावया ॥ ध्रु ॥ सेंदराचें दैवत केलें । नवस बोले तयासि ॥ २ ॥ तुका ह्मणे नाचति पोरें । खोडितां येरें अंग दुखे ॥ ३ ॥

२५७. गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें चराचरीं त्याग केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गायत्री स्वमुखें भक्षीतसे मळ । मिळाल्या वाहाळ गंगाओघ ॥ ध्रु ॥ कागाचिये विष्ठे जन्म पिंपळासि । पांडवकुळासि पाहातां दोष ॥ २ ॥ शकुंतळा सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसि ॥ ३ ॥ गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहातां विचार पिंगळेचा ॥ ४ ॥ वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥ ५ ॥ न व्हावीं तीं जालीं कर्में नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ॥ ६ ॥ तुका ह्मणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नरक त्यासि ॥ ७ ॥

२५८. सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वाना लागीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥ ध्रु ॥ वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खुण काय जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें तो चि एक जाणे । भक्तीचें महिमान साधु जाणे ॥ ३ ॥

---

१ त. पार –२ पं. खळखळे चि.–३ दे. (जुना पाठ) आवघें –४ दे. (न. पा.) निंद्य.

२५९. ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ संसार करितां ह्मणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥ छ ॥ आचार करितां ह्मणती हा पसारा । नै करितां नरा निंदिताती ॥ २ ॥ संतसंग करितां ह्मणती हा उपदेशी । येरा अभाग्यासि ज्ञान नाहीं ॥ ३ ॥ धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा । समर्थासि ताठा लाविताती ॥ ४ ॥ बहु बोलों जातां ह्मणति हा वाचाळ । न बोलतां सकळ ह्मणती गर्वी ॥ ५ ॥ भेटिसि न वजातां ह्मणती हा निष्ठुर । येतां जातां घर बुडाविलें ॥ ६ ॥ लग्न करूं जातां ह्मणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ७ ॥ निपुत्रिका ह्मणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥ ८ ॥ लोक जैसा ओक धरितां धरवे ना । अभक्ता जिरे ना संतसंग ॥ ९ ॥ तुका ह्मणे आतां ऐकावें वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥ १० ॥

२६०. धर्म रक्षावया साठीं । करणें आटी आह्मांसि ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ वाचा बोलों वेदनीती । करूं संतीं केलें तें ॥ छ ॥ न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥ २ ॥ तुका ह्मणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ३ ॥

२६१. चवदा भुवनें जयाचिये पोटीं । तो चि आह्मीं कंठीं साठविला ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ काय एक उणें आम्हुचिये घरीं । बोळगती द्वारीं रिद्धिसिद्धी ॥ छ ॥ असुर जयानें घातले तोरडीं । तो आह्मांसि जोडी कर दोन्ही ॥ २ ॥ रूप नाहीं रेखा जयासि आकार । आह्मीं तो साकार भक्तीं केला ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आह्मासाठीं ॥ ४ ॥ * रिद्धिसिद्धी सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ ५ ॥ तुका ह्मणे आह्मी देवाहूनि बळी । जालों हे निराळी ठेवुनि आशा ॥ ६ ॥

२६२. केला मातीचा पशुपति । परि मातीसि काय ह्मणती । शिवपूजा शिवासी पावे । माती मातीमाजी सामावे ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ तैसे पूजिती आह्मां संत । पूजा घेतो भगवंत । आह्मी किंकर संतांचे दास । संतपदवी नको आह्मांस ॥ छ ॥ केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु । विष्णुपूजा विष्णुसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥ २ ॥ केली कांशाची जगदंबा । परि कांसें नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसें राहे कांसेंपणें ॥ ३ ॥ ब्रह्मानंद पूर्णामाजी । तुका ह्मणे केली कांजी । ज्याची पूजा त्याणें चि घेणें । आह्मीं पाषाणरूप राहणें ॥ ४ ॥

---

१ पं. न करी त्या.–२ पं. ह्मणताती.–३ दे. पं. तोडरीं  * हें कडवें पं. प्रतींत नाहीं.

२६३. ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरा मानी विधि पाळणापुरतें । देवाचीं तीं भूतें ह्मणोनियां ॥ ध्रु ॥ सर्वभावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांच्या आस उच्छिष्टाची ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसे मानती हरिदास । तैशी नाहीं आस आणिकांची ॥ ३ ॥

२६४. दया तिचें नांव भूतांचें पाळण । अणीक निर्दळण कंटकांचें ॥ १ ॥[1] पाप त्याचें नांव न विचारितां नीत । भलतें चि उन्मत्त करी सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे धर्म रक्षावया साठीं । देवास ही आटी जन्म घेणें ॥ ३ ॥

२६५. करावें गोमटें । वाळा माते तें उमटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलिया जीवाहूनी । असे वाल्हें तें जननी ॥ ध्रु ॥ वियोग तें तिस । त्याच्या उपचारें तें विष ॥ २ ॥[2] तुका ह्मणे पायें[3] । डोळा सुखावे ज्या न्यायें ॥ ३ ॥

२६६. कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥ ॥ ध्रु.॥ तैसें जालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ॥ ध्रु ॥ चुकलिया माये । वाळ हुरू हुरू पाहे ॥ २ ॥ जीवना वेगळी मासोळी । तैसा[4] तुका तळमळी ॥ ३ ॥

२६७. हातीं होन दावी वेना । करिती लेंकीच्या धारणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे धर्म जाले कळीं । पुण्य रंक पाप वळी ॥ ध्रु ॥ सांडिले आचार । द्विज चाहाड जाले चोर ॥ २ ॥ टिळे लपविती पातडीं । लेती विजारा कातडीं ॥ ३ ॥ वैसोनियां तक्तां । अन्नेंविण पिडिती लोकां ॥ ४ ॥ मुदबख लिहिणें । तेलतुपावरी[5] जिणें ॥ ५ ॥ नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥ ६ ॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥ ७ ॥ वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ ८ ॥ अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वैरी[6] सोंग ॥ ९ ॥ तुका ह्मणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥ १० ॥

२६८. साळंकृत कन्यादान । करितां पृथ्वीसमान[7] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तें न कळे या मूढा । येइल कळों भोग पुढां ॥ ध्रु ॥ आचरतां कर्म । भरे पोट राहे धर्म ॥ २ ॥ सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहें ॥ ३ ॥ अन्न मान धन । हें तों प्रारब्धा आधीन ॥ ४ ॥ तुका ह्मणे सोस । दुःख[8] आतां पुढें नास ॥ ५ ॥

---

१ धर्म नीतीचा तो ऐकुनी वेव्हार । निवडीलें सार असार ते ॥ ह येथें पंढरीच्या छापील प्रतींत आढळतें.–२ हरणी चुकली पाडसा । धुडाळी ती दाही दिशा ॥ रानीं हिंडों गेली गाय । घरीं वत्स वाट पाहे ॥ हीं दोन कडवीं पंढरपुरच्या छापील प्रतींत आढळतात.–३ पं. मायें.–४ दे. तुका ह्मणे तळमळी.–५ दे.–" तेल तुप सावण केणें ।" हा पाठ मागून घातला आहे.–६ पं. बाह्य.–७ दे. (नवीन शोध.) पृथ्वी दानाच्या समान.–८ दे. (नवीन शोध.) सुख.

२६९. दिवळ्या वाधें लावुनि खाणें । करूनि मंडण दिली हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नवरा नेई[1] नवरी घरा । पूजन वरा पाद्याचें ॥ छ्र ॥ गौरविली विहीण व्याही । घडिलें कांहीं ठेवूं नका ॥ २ ॥ करूं द्यावें न्हावें वरें । ठायींचें कां रे न कळे चि ॥ ३ ॥ वऱ्हाडियांचे लागे पाठीं । जैसी उटिका तेलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जोडिला थुंका । पुढें नरका सामग्री ॥ ५ ॥

२७०. ब्रह्महत्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुन्याचे ॥ छ्र ॥ नरमांस खादली भाडी । हाका मारी ह्मणोनि ॥ २ ॥ अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिळाषिलें ॥ ३ ॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांप सुटतसे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कोरान्न रांड । वेटा भांड मागे ना कां ॥ ५ ॥

२७१. याचा कोणी करी पक्ष । तो ही त्याशी समतुल्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुकासाठीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजांसि लाग निरयदंडीं ॥ छ्र ॥ ऐके राजा न करी दंड । जरि या लंड दुष्टासि ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें अन्न । मद्यपाना समान ॥ ३ ॥

२७२. कपट कांहीं एक । नेणें भुलवायाचें लोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचें करितों कीर्त्तन । गातों उत्तम ते गुण ॥ छ्र ॥ दाऊं नेणें जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥ २ ॥ नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥ ३ ॥ नव्हें मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥ ४ ॥ नाहीं देवार्चन । असे मांडिलें दुकान ॥ ५ ॥ नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाण खुण ॥ ६ ॥ नव्हें पुराणिक । करणें सांगणें आणीक ॥ ७ ॥ नेणें वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥ ८ ॥ नाहीं जाळीत भणदीं । उदो ह्मणोनि आनंदीं ॥ ९ ॥ नाहीं हालवीत माळा । भोंवतें मेळवुनि गबाळा ॥ १० ॥ आगमीचें कुडें नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें[2] ॥ ११ ॥ नव्हें यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १२ ॥

२७३. रडोनियां मान । कोण मागतां भूषण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥ छ्र ॥ लावितां लावणी । विके भीके केज्या दानी ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ३ ॥

२७४. पूज्या एकासनीं आसनीं आसैन[3] । वैसतां ममन मावेशीं तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगतों ते धर्म नीतीचे संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥ छ्र ॥ संतां ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनीं च वळसा सांपडला ॥ २ ॥ तुका ह्मणे एकाएकीं वरासनें[4] । दुजें तेथें भिन्न अशोभ्य तें ॥ ३ ॥

---

१ पं. नेईल.–२ पं. स्तंभ आणि उच्चाटणें.–३ पं. आसनें.–४ दे. पं. वरासनें.

२७५. जेणें मुखें स्तवी । तें चि निंदे पाठीं लावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी अधमाची याती । लोपी सोनें खाय माती ॥ छ्र ॥ गुदद्वारा वाटे । मिष्टान्नांचा नरक लोटे ॥ २ ॥ विंचु लाभाविण । तुका ह्मणे वाहे शीण ॥ ३ ॥

२७६. अधमाची यारी । रंग पतंगाचे परी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटे न लगतां क्षण । मोल जाय वांयां विण ॥ छ्र ॥ सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । मज झणी ऐसे दावा ॥ ३ ॥

२७७. आणिकांची स्तुति आह्मां ब्रह्महत्या । एका वांचूनि त्या पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां विष्णुदासां एकविध भाव । न ह्मणों या देव आणिकांसि ॥ छ्र ॥ शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आणिका संकल्पें । अवघीं च पापें घडतील ॥ ३ ॥

२७८. तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधी ॥ छ्र ॥ तूं तों उदाराचा राणा । माझी अल्प चि वासना ॥ २ ॥ कृपादृष्टीं पाहें । तुका ह्मणे होईं साहे ॥ ३ ॥

२७९. संताचा अतिक्रम । देवपूजा तो अधर्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येती दगड तैसे वरी[1] । मंत्रपुष्पें देवा शिरीं ॥ छ्र ॥ अतीतासि गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ताडण भेदकांची सेवा ॥ ३ ॥

२८०. करणें तें देवा । हे चि एक पावे सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें घडे येणें सांग । भक्त देवाचें तें अंग ॥ छ्र ॥ हें चि एक वर्म । काय बोलिला तो धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ३ ॥

२८१. मागें नेणपणें[2] घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरत ॥ छ्र ॥ उपदेशा वरी मन नाहीं हातीं । तो आह्मां पुढती पाहूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥ ३ ॥

२८२. आणिकांच्या घातें । ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते चि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥ छ्र ॥ कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ३ ॥

---

१ पं. येती दगड ते वरी.—२ पं. नेणतेपणें.

## हनुमंतस्तुति–अभंग ४.

२८३. शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ छ्र ॥ शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥ ३ ॥

२८४. केली सीताशुद्धी । मूळ रामायणा आधीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा प्रतापी गहन । सुरां सकळ[1] भक्तांचें भूषण ॥ छ्र ॥ जाऊनि पाताळा । केली देवाची अवकळा ॥ २ ॥ राम लक्षुमण । नेले आणिले चोरून ॥ ३ ॥ जोडूनियां कर । उभा सन्मुख समोर ॥ ४ ॥ तुका ह्मणे जपें । वायुसुता जाती पापें ॥ ५ ॥

२८५. काम घातला बांदोडी । काळ[2] केला देशधडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया माझें दंडवत । कपिकुळीं हनूमंत ॥ छ्र ॥ शरीर वज्रा ऐसें । कवळी ब्रह्मांड जो पुच्छें ॥ २ ॥ रामाच्या सेवका । शरण आलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

२८६. हनुमंत महाबळी । रावणाची दाढी जाळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्या माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ छ्र ॥ करोनी उड्डाण । केलें लंकेचें शोधन[3] ॥ २ ॥ जाळीयेली लंका । धन्य धन्य ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२८७. कुंभ अवघा एक आवा । पाकीं एकीं गुफे डावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे भिन्न भिन्न साटे । केले प्रारब्धानें वांटे ॥ छ्र ॥ हिरे दगड एक खाणी । कैचें विजातीसी पाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे शिरीं । एक एकाची पायरी ॥ ३ ॥

२८८. मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ छ्र ॥ बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुतोंडे जे वाचाळ । तेंग तें च मूळ लटिक्याचें ॥ ३ ॥

२८९. न लगे चंदना सांगावा[4] परिमळ । वनस्पतिमेळ हाकारुनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरीचें धांवे स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरे ना ॥ छ्र ॥ सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाश किरणा कर ह्मून ॥ २ ॥ तुका ह्मणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥ ३ ॥

---

१ प. सुरां सकळ मोहन.–२ दे. (नवीन पाठ.) काळ घातला तोरडीं ।.–३ दे. त. दहन.–
४ पं. पुसावा.

२९०. चंदनाचे हात पाय ही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥ ध्रु ॥ तुका ह्मणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळे चि ना ॥ २ ॥

२९१. मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥ ध्रु ॥ मन गुरू आणि शिष्य । करी आपुलें चि दास्य । प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥ २ ॥ साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं आनुदैवत । तुका ह्मणे दुसरें ॥ ३ ॥

२९२. मायबापें जरी सर्पीण बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ १ ॥ चंदनाचा शूळ सोनियाची वेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥ तुका ह्मणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ ३ ॥

२९३. शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥ १ ॥ पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी लांचासाठीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥ ३ ॥

२९४. प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा देव चि जाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥ ध्रु ॥ सत्वरजतमबाधा । न्हवे हरिभक्तांसि कदा ॥ २ ॥ खाय बोले करी । अवघा त्यांच्या अंगें हरी ॥ ३ ॥ देवभक्तपण । तुका ह्मणे नाहीं भिन्न ॥ ४ ॥

२९५. शास्त्राचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व जालें सांग नामें एका ॥ ध्रु ॥ सगुण निर्गुण जयाचीं[1] हीं अंगें । तो चि आह्मां संगें क्रीडा करी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले न्व्हों ॥ ३ ॥

२९६. ऐका महिमा आवडीचीं । बोरें खाय भिलटीचीं[3] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोर प्रेमाचा भुकेला । हा चि दुष्काळ तयाला । अष्टमा सिद्धींला । न मनी क्षीरसागराला ॥ ध्रु ॥ पव्हे सुदामदेवाचे । फके मारी कोरडे च ॥ २ ॥ न ह्मणे उच्छिष्ट अथवा थोडे । तुका ह्मणे भक्तीपुढें ॥ ३ ॥

२९७. कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिति त्वां थोर मानियेली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ ध्रु ॥

१ पं. आन.–२ दे. जयाचीं अंगें –३ पं. भिल्लणीचीं.

तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घांसील भूमीसी वदन यम ॥ २ ॥ कां रे नागवसी आयुष्य खातो काळ । दिसेंदिस बळ क्षीण होतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासि सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप ॥ ४ ॥

२९८. साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पाहवे ॥ १ ॥ साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कापती देखोनियां ॥ २ ॥ असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥ ३ ॥

२९९. आमचे गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥ दगडाची नाव आधीं च ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंगसंपादणी करिती परी ॥ ३ ॥

३००. मृगजळा काय करावा उतार । पाववया पार पैल थडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । कोण त्या वेव्हारें लाभ हाणि ॥ ध्रु ॥ मंगळदायक करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ २ ॥ स्वप्नींचें जें सुखदुःख जालें काहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ३ ॥ सारीं जालीं मेलीं लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका ह्मणे ॥ ४ ॥

३०१. माझें ह्मणतां याला कां रे नाहीं लाज । कन्या पुत्र भाज धन वित्त ॥ १ ॥ कोणी सोडवी ना काळाचे हातींचें । एकाविणें साचें नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे किती सांगावें चांडाळा । नेणे जीवंकळा कोण्या जीतो ॥ ३ ॥

३०२. आंधळ्यासि जन अवघे चि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥ रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

३०३. छळी विष्णुदासा कोणी । त्याची अमंगळ वाणी ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ येऊं न द्यावा समोर । अभागी तो दुराचार ॥ ध्रु ॥ नावडे हरिकथा । त्याची व्यभिचारीण माता ॥ २ ॥ तुका ह्मणे याति । भ्रष्ट तयाँची ते मति ॥ ३ ॥

३०४. बोलविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मिठेंविण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥ ध्रु ॥ संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूप हीन ॥ २ ॥ कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसी होते मज परी । न देखे अंतरीं प्रेमभाव ॥ ४ ॥

---

१ पं. आमची.–२ पं. तीर –३ पं. व्यापारें.–४ पं. कांहीं.–५ पं. जीवनकळा.–६ पं. सर्व.–७ पं. हो का तयाची भलती.–८ पं. पक्वान्न.

३०५. अंगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाचिये तोंडीं पडिली ते माती । अवघे ते खाती पोटभरी ॥ छ ॥ चारितां वळे येत असे दांतीं । मागोनियां घेती भाग्यवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे नसे संचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥ ३ ॥

३०६. धिग जीणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धिग जीणें ज्याचें लोभावरी मन । अतीतपूजन घडे चि ना ॥ छ ॥ धिग जीणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ २ ॥ धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं साधुपणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ४ ॥

३०७. अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूतकर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग कैचें हरिचें नाम । निजेलिया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥ छ ॥ विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट । तया तेचि वाट । अधोगती जावया ॥ २ ॥ अणीक एक कोड । नरका जावयाची चाड । तरी संतानिंदा गोड । करीं कवतुकें सदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें । मना लावी राम पिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठकोनी ॥ ४ ॥

३०८. अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पाषांडिया ॥ छ ॥ जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसि ॥ २ ॥ तुका ह्मणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला[1] देव ॥ ३ ॥

३०९. एक तटस्थ मानसीं । एक सहज चि आळसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोन्ही दिसती सारिखीं । वर्म जाणे तो पारखी ॥ छ ॥ एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोप ॥ २ ॥ एकां सर्वस्वाचा त्याग । एकां पोटासाठीं जोग ॥ ३ ॥ एकां भक्ति पोटासाठीं । एकां देवासवें गांठी ॥ ४ ॥ वर्म पोटीं एका । फळें दोन ह्मणे तुका ॥ ५ ॥

३१०. काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे नाहीं हें न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥ छ ॥ देखिलें तें दृष्टी । मागे घालूनियां मिठी ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । माझ्या मज समजावें ॥ ३ ॥

---

१ पं. दूषिलें देवां.

३११. भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनी वर्ते मन ॥ छ्रु ॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवें आस ॥ २ ॥ हें ना तें सें जालें । तुका ह्मणे वांयां गेलें ॥ ३ ॥

३१२. एकादशीस अन्न पान । जे नर करीती भोजन । श्वानविष्ठे समान । अधम जन तो एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ छ्रु ॥ अशुद्ध विटाळसीचें खळ । विडा भँक्षितां तांबूल । सांपडे सबळ । काळाहातीं न सुटे ॥ २ ॥ सेज बाज विलास भोग । करी कामिनीशीं संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥ ३ ॥ आपण न वजे हरिकीर्तना । अणिकां वारी जातां कोणा । त्याच्या पापें जाणा । ठेंगणा महा मेरु ॥ ४ ॥ तया दंडी यमदूत । जाले तयाचे अंकित । तुका ह्मणे व्रत । एकादशी चुकलीया ॥ ५ ॥

३१३. करवितां व्रत अर्धें पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शुद्धबुद्धि होर्ये दोघां एक मान । चोरासवें कोण जिवें राखे ॥ छ्रु ॥ आपुलें देऊनी आपुला चि घात । न करावा थीत जाणोनियां ॥ २ ॥ देऊनियां वेच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडूं नये ॥ ४ ॥

३१४. इनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघेंची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ छ्रु ॥ अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ३ ॥

३१५. वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एक सरे भवसिंधु ॥ छ्रु ॥ जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ २ ॥ तुका ह्मणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ३ ॥

३१६. विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ छ्रु ॥ बहु अतिशय खोटा । तर्के होती बहु वाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । कृपा करीजेते देवें ॥ ३ ॥

३१७. येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व साटा ते ठायीं ॥ छ्रु ॥ येथींचिया नाशवंतें । काय रितें चाळवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ३ ॥

---

१ पं. अतर्क्य तें –२ पं. त. जीवे आस –३ पं. भक्षितो.–४ पं. दोघां होय.

३१८. उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलविले बोल बोलें । धनीविठ्ठला सन्निध ॥ छ ॥ तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे नये आह्मां । पुढें कामा गवाळ ॥ ३ ॥

३१९. बोलावें तें धर्मा मिळे । बरे डोळे उघडूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काशासाठीं खावें शेण । जेणें जन थुंकी तें ॥ छ ॥ दुजें ऐसें काय बळी । जें या जाळी अग्नीसि ॥ २ ॥ तुका ह्मणे शूर रणीं । गांढे मनीं बुरबुरी ॥ ३ ॥

३२०. बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभेंचि असतों मेलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥ छ ॥ विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥ २ ॥ सेवा चुकतों संताची । नागवण हे फुकाची ॥ ३ ॥ गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥ ४ ॥ तुका ह्मणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥ ५ ॥

३२१. दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥ छ ॥ देखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥ २ ॥ तुका ह्मणे नाद । जाला अवघा गोविंद ॥ ३ ॥

३२२. कृपा करुनी देवा । मज साच तें दाखवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी दयावंत कैसे । कीर्ति जगामाजी वसे ॥ छ ॥ पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल काळा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझा करावा कुठावा[2] ॥ ३ ॥

३२३. ठायींची ओळखी । येइल टाकूं टाका सुखीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचा जाईल ईमान । माझे कपाळीं पतन ॥ छ ॥ ठेविला तो ठेवा । अभिळाषें बुडवावा ॥ २ ॥ मनीं न विचारा । तुका ह्मणे हे दातारा ॥ ३ ॥

३२४. तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूप कासवाचे परी । धरुनि रांहेन[3] अंतरीं ॥ छ ॥ नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ३ ॥

३२५. गहूं एकजाती । परी त्या पाधाणी नासिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥ छ ॥ कमाईच्या सारें । जाति दाविती प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥ ३ ॥

३२६. पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेघे माझे वाचे तुटी । महा लाभ फुकासाठीं ॥ छ ॥ विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे पापें । जाती संतांचिया जपें ॥ ३ ॥

---

१ प. असे.–२ पं. कुडावा–३ पं. राहिलो–४ पं. माझी वाचा.–५ दे. त. तुका ह्मणे जपें संतांचिया पापें.

३२७. देव होईजेतें देवाचे संगती । पतन पंगती जगांचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांटा आपुलाला ॥ ध्रु ॥ दाखविले परी नाहीं वर्जिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळबीजमात्र ॥ ३ ॥

३२८. शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु जाले तट ॥ ध्रु ॥ लौकिका वाहेरी । घाली रोंखीं जया धरी ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ३ ॥

३२९. वैद्य वाचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाणों कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ ध्रु ॥* नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ २ ॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ३ ॥

३३०. मारगीं बहुत । या चि गेले साधुसंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका जाऊं आडराणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ ध्रु ॥ चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ २ ॥ झळकती पताका । गरुड टके ह्मणे तुका ॥ ३ ॥

३३१. कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां । आलें वैकुंठ जवळां । संन्निध पंढरीये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । अवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥ ध्रु ॥ चालती स्थिर स्थिर । गरुड टकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ २ ॥ मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुलती । शूर उठावती । एका एक आगळे ॥ ३ ॥ नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ॥ ४ ॥ आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटीचें सुख । धन्य धन्य मृत्युलोक । ह्मणती भाग्याचे कैसे ॥ ५ ॥ मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी । उधार नाहीं पंढरीसि । पायापाशीं विठोबाच्या ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां । काय करणें आह्मां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥ ७ ॥

३३२. जया दोषां परीहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपुर देखिलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मातीर्थीं विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥ ध्रु ॥ सकळतीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥ २ ॥ नाहीं उपमा

---

१ पं. होईजेते–२ पं. देवाचिंया.–३ पं. घरी.–४ दे. त. वैद. * पं. "अंगीं दैवत संचरे । मग तेथे काय उरे" । हें कडवें जास्त आहे.–५ पं. ऐसी गर्जती पुराणें । नका जाऊ आड राणें.–६ पं. पढरीये सन्निध.–७ पं. डुलती.–८ पं. भाग्याचा कैसा.–९ पं. पद्माळेसी.–१० पं. वेणुनाद.

व्यावया । सम तुल्य आणिका ठाया । धन्य भाग्य जयां । जे पंढरपूर देखती ॥ ३ ॥ उपजोनि संसारीं । एक वेळ पांहें पा पंढरी । महा दोषां कैची उरी । देवभक्त देखिलिया ॥ ४ ॥ ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी । सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ५ ॥ तें सुख वर्णावया गति । एवढी कैची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ६ ॥ तुका ह्मणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । अधम जन्मांतरिचा । तया पंढरी नावडे ॥ ७ ॥

३३३. एक नेणतां नाडलीं । एकां जाणिवेची भुली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलों नेणें मुकें । वेडें वाचाळ काय निकें ॥ ध्रु ॥ दोहीं सवा नाड । विहीर एकीकडे आड ॥ २ ॥ तुका ह्मणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ॥ ३ ॥

३३४. ह्मणवितों दास । मज एवढी च आस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परी तें अंगीं नाहीं वर्म । करीं आपुला तूं धर्म ॥ ध्रु ॥ बडबडितों तोंडें । रितें भावेंविण धेंडें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । दावूं जाणतों पसारा ॥ ३ ॥

३३५. पूजा समाधनें । अतिशयें वाढे सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों जाणां तुह्मी संत । आहे बोलिली ते नीत ॥ ध्रु ॥ पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माथा । पायीं ठेवीं तुह्मां संतां ॥ ३ ॥

३३६. स्वप्नींचिया गोष्टी । मज धरिलें होतें वेठी । जालिया सेवटीं । जालें लटिकें सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वायां भाकिली करुणा । मूळ पावावया सिणा । राव रंक राणा । कैंचे स्थानावरि आहे ॥ ध्रु ॥ सोसिलें तें अंगें । खरें होतें नव्हतां जागें । अनुभव ही सांगे । दुःखें डोळे उघडीले ॥ २ ॥ तुका ह्मणे संतीं । सावचित केलें अंतीं । नाहीं तरि होती । टाळी बैसोनि राहिली ॥ ३ ॥

३३७. आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥ ध्रु ॥ काळकुट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंच अंग साक्षी देतें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरी जातीसवें भेटी । नवनीत पोटीं सांटविलें ॥ ३ ॥

३३८. बाळपणीं हरि । खेळे मथुरेमाझारी । पायीं घागरिया सरी । कडदोरा वांकी । मुख पाहे माता । सुख न माये चित्ता । धन्य मानव संचिता । वोडवलें आजि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो । ह्मणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें । जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥ ध्रु ॥ मिळोनियां

१ पं. पंढरी.–२ पं. पाहे पंढरी.–३ पं. एवढी च मज आस.–४ पं. समाधान.–५ पं. वाटे–६ पं. सेवटी.

याती । येती नारी कुमारी बहुती । नाहीं आठव त्या चित्तीं । देहभाव कांहीं । विसरल्या घरें । तान्हीं पारठीं लेकुरें । धाक सांडोनियां येरें । तान भूक नाहीं ॥ २ ॥ एकी असतील घरीं । चित्त तयापासीं परी । वेगीं करोनि वोसरी । तेथें जाऊं पाहे । लाज सांडियेली वोज । नाहीं फजितीचें काज । सुख सांडोनियां सेज । तेथें धाव घाली ॥ ३ ॥ वेधियेल्या बाळा । नर नारी या सकळा । बाळा खेळवी अवला । त्याहीं विसरल्या । कुमर कुमारी । नाभाव हा शरीरीं । दृष्टी न फिरे माघारीं । तया देखतां हे ॥ ४ ॥ वैरभाव नाहीं । आप पर कोणीं कांहीं । शोक मोह दुःख ठायीं । तया निरसलीं । तुका ह्मणे सुखी । केलीं आपणासारिखीं । स्वामी माझा कवतुकें । बाळवेषें खेळे ॥ ५ ॥

३३९. अशोकाच्यां वनीं सीता शोक करी । कांहो अंतरले रघुनाथ दुरी । येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी । कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगा वो त्रीजटे सखिये ऐसी मात । देईल कां नेदी भेटी रघुनाथ । मन उताविळ जाला दुरी पंथ । राहों न सके प्राण माझा कुडी आंत ॥ ध्रु ॥ काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें । तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगीलें । गाईवत्सा पत्नीपुरुषा विघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ॥ २ ॥ नाडियेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिलें रघुनाथा पाठिलागे तेणें । उलंघिली आज्ञा माव काय मी जाणें । देखुनी सूनाट घेउनि आलें सुनें ॥ ३ ॥ नाहीं मूळ मारग लाग अणीक सोये । एकाविण नामें रघुनाथाच्या माये । उपटी पक्षिया एक देउनि पाये । उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काये ॥ ४ ॥ जनकाची नंदिनी दुःखें ग्लानी थोरी । चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी ॥ संमोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी । घेइल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥ ५ ॥

३४०. वीट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजे ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी च तें गोड राहे । निरें पाहे स्वयंभ ॥ ध्रु ॥ आणिकां गुणां पोटीं वाव । दावी भाव आपुला ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥ ३ ॥

३४१. नव्हतों सावचित । तेणें अंतरलें हित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाडिला नामाचा विसर । वाढविला संवसार ॥ ध्रु ॥ लटिक्याचे पुरीं । वाहोनियां गेलों दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाव । आह्मां सांपडला भाव ॥ ३ ॥

३४२. अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलालें तुह्मी करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य राम राम ॥ ध्रु ॥

---

१ पं. त. वासुगीच्या.

देखोनि जीवन जरि जाय तान। तरि कां सांटवण घरोघरीं ॥ २ ॥ देखोनियां छाया सुख न पवीजे। जंव न वैसीजे तया तळीं ॥ ३ ॥ हितें तरी होय गातां अईकतां। जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे होसी भावें चि तूं मुक्त। काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ५ ॥

३४३. काय उणें आह्मां विठोबाचे पाईं। नाहीं ऐसें कांईं[1] येथें एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें[3] हें भोंवतालें ठायीं वांटूं मन। वराडी करून दारोदारीं ॥ ध्रु ॥ कोण वळी माझ्या विठोबा वेगळा। आणीक आगळा दुजा सांगा ॥ २ ॥ तुका ह्मणे मोक्ष विठोबाचे गांवीं। फुकाचीं लुटावीं भांडारें तीं ॥ ३ ॥

३४४. सेवितों[4] रस तो वांटितों आणिकां। घ्या रे होऊं नका राणभरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान। तो चि एक दानशूर दाता ॥ ध्रु ॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी। जरी राहे बुद्धी याचे पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज धाडिलें निरोपा। मारग हा सोपा सुखरूप ॥ ३ ॥

३४५. ऐसे ऐसियानें भेटती ते साधु। ज्याच्या दरशनें तुटे भवबंदु[5]। जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदु। जे कां मोक्षसिद्धी तीर्थें वंदूं रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाव सर्वकारण मूळ वंदु। सदा समबुद्धि नास्तिक्यभेदु[6]। भूतकृपा मोडीं द्वेषकंदु। शत्रु मित्र पुत्र सम करीं वंधु रे ॥ ध्रु ॥ मन बुद्धि काया वाचा शुद्ध करीं। रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं। लघुत्व सर्वभावें अंगीकारीं। सांडीमांडी मीतूंपण ऐसी थोरी रे ॥ २ ॥ अर्थकामचाड नाहीं चित्ता[7]। मानामान मोह माया मिथ्या। वर्ते समाधानीं जाणोनि नेणता। साधु भेट देती तया अवचिता रे ॥ ३ ॥ मनीं दृढ धरीं विश्वास। नाहीं सांडीमांडीचा सायास। साधुदर्शन नित्यकाळ त्यास। तुका ह्मणे जो विटला जाणीवेस रे ॥ ४ ॥

३४६. भवसागर तरतां। कां रे करीतसां चिंता। पैल उभा दाता। कटीं कर ठेवुनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचे पायीं घाला मिठी। मोल नेघे जगजेठी। भावा एका साठीं। खांदां वाहे आपुल्या ॥ ध्रु ॥ सुखें करावा संसार। परि न संडावे दोन्ही वार। दया क्षमा घर। चोजवीत येतील ॥ २ ॥ भुक्तिमुक्तीची चिंता। नाहीं दैन्य दरिद्रता। तुका ह्मणे दाता। पांडुरंग वोळगिल्या ॥ ३ ॥

३४७. जें[8] कां रंजलें गांजलें। त्यासि ह्मणे जो आपुलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो चि साधु ओळखावा। देव तेथें चि जाणावा ॥ ध्रु ॥ मृदु सबाह्य नवनीत।

---

१ पं. सुख.–२ पं. कांहीं.–३ पं. तों.–४ पं. सेवितो हा रस.–५ पं. बधु.–६ दे. नास्ति भेदु ७ दे. चिंता.–८ पं. जे का रंजले गांजले। त्यांसि ह्मणे जो आपुले ॥;

तैसें सज्जनाचें चित्त ॥ २ ॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो ह्रदयीं ॥ ३ ॥ दया करणें जें पुत्रासी । ते चि दासा आणि दासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । तो चि भगवंताची मूर्ती ॥ ५ ॥

३४८. याजसाठीं भक्ति । जगीं रूढवावया[1] ख्याति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलाया सहजें ॥ छ ॥ गौरव[2] यासाटीं । स्वामिसेवेची कसोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥ ३ ॥

३४९. अमंगळ वाणी । नये ऐकों ते कानीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जो हे दूषी हरिची कथा । त्यासि क्षयरोगव्यथा ॥ छ ॥ याति वर्ण श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ठ ॥ २ ॥ तुका ह्मणे पाप । माय नावडे ज्या बाप ॥ ३ ॥

३५०. कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाचे नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥ छ ॥ कैसा निरयगांवा । जाऊं न पवे विसावा ॥ २ ॥ तुका ह्मणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ३ ॥

३५१. आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वता भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करवी आणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ छ ॥ श्वानाचियापरी । मिष्टान्नासि विटाळ करी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । सटवे चि ना पांचा दिसां ॥ ३ ॥

३५२. गर्भाचे धारण । तिनें वागविला सिण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घली च तोंडा ॥ छ ॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ३ ॥

३५३. पतनासि जे नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विधीपुरतें कारण । बहु वारावें वचन ॥ छ ॥ सर्वस्वासि नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ २ ॥ तुका ह्मणे दुरी । राखतां हे तों ची बरी ॥ ३ ॥

३५४. देव आड जाला । तो भोगिता मी उगला । अवघा निवारला । शीण शुभाअशुभाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीवशिवाचें भातुकें । केलें क्रीडाया[3] कौतुकें । कैचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥ छ ॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ तयांचा* ॥ २ ॥ अवघी एकाची च वीर्णे[4] । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा[5] ॥ ३ ॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस । पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥ ४ ॥

---

१ पं. वाढवाया.–२ पं. गौरवावया.–३ पं. होतें कवतुकें.–४ पं. विईण–५ पं. निरोपी.–
* पं. हा शब्द नाहीं.

## मंबाजी गोसावी यांनीं स्वामीस पीडा केली–अभंग.

३५५. न सोडीं[1] न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥ छ्र ॥ शतखंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥ २ ॥ तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धी सावध ॥ ३ ॥

३५६. बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पोंहोनि[2] आंत क्षमा अंगीं कांटीवरी मारविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिव्या गाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे क्रोधा हातीं । सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

३५७. पावलों[3] पावलों । देवा पावलों रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवें संचित होतें तैसें जालें रे । आतां काय बोलों रे ॥ २ ॥ सोज्ज्वळ कंटकवाटा भावें क्रूं गेलों रे । तुका ह्मणे करूनि वेगळा केलों रे ॥ ३ ॥

३५८. कां होती कां होती । देवा एवढी फजीती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुळीं वर्म नसतों[4] चुकलों । तो मी ऐसें चित्तीं ॥ छ्र ॥ होणार होऊनि गेलें । मिथ्या आतां खेंती[5] रे ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरे आतां । दुर्जनाची संगती रे* ॥ ३ ॥

३५९. सोडवा[6] सोडवा । सोडवा हो अनंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजविण ऐसा । कोण दुजा प्राणदाता ॥ छ्र ॥ कोणा लाज नेणां ऐसें[7] । आणिकां शरण अह्मी[8] जातां ॥ २ ॥ तुका ह्मणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥ ३ ॥

३६०. पुत्राची वारतां[9] । शुभ ऐके जेवीं माता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥ छ्र ॥ नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥ ३ ॥

३६१. ध्यानी योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोवांठीं[10] तयांचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तान भुक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभाव ॥ छ्र ॥ कोण सखें तयां आणीक[11] सोयरें । असे त्यां दुसरें हरीविण ॥ २ ॥ कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ॥ ३ ॥ तुका ह्मणे विष अमृता समान । कृपा नारायण करितां होय ॥ ४ ॥

३६२. न व्हावें तें जालें [12]देखियेले पाय । आतां फिरूं काय मागें देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु दिस होतों करीत हे आस । तें आलें सायासें फळ आजि ॥ छ्र ॥ कोठवरि जिणें संसारांच्या[13] आशा । उगवो हा फांसा येथूनियां ॥ २ ॥ बुडालीं

---

१ पं. नसोडी न सोडी ।.–२ पं. पाहोनियां –३ त. पावलों पावलों पावलों.–४ पं. नसतें.–
५ पं. खती.–६ पं. सोडवा सोडवा हो अनता. । त. सोडवा सोडवा सोडवा । सोडवा हो अनता.–
७ पं. ऐसी.–८ पं. तुह्मी –९ दे. त. वार्ता.–१० पं. पाटोवाटी.–११ पं. सोइरें –१२ पं. देखिले हे.–
१३ पं. संसाराची.–* पं. हा शब्द नाहीं.

तयांचा मूळ ना मारग । लँगे तो लाग सांडूनियां ॥ ३ ॥ पुढें उलंघितां दुःखाचे डोंगर । नाहीं अंतपार गर्भवासा ॥ ४ ॥ तुका ह्मणे कास धरीन पीतांबरीं । तूं भवसागरीं तारूं देवा ॥ ५ ॥

३६३. वैकुंठा जावया तपाचे सायास । करणें जीवा नास न लगे कांहीं ॥ १ ॥ तया पुंडलिकें केला उपकार । फेडावया भार पृथीवीचा ॥ २ ॥ तुका ह्मणे सोपी केली पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

३६४. शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें केले नव्हे काई । लंडीपण खोटें भाई ॥ ध्रु ॥ करितां होया होय । परी नव्हे कोणी साह्य ॥ २ ॥ तुका ह्मणे घडी । साधिलिया एक थोडी ॥ ३ ॥

३६५. ह्मणउनी खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोणी दिशा वर्जीयेली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मांझिया गोतें हें वसलें सकळ । न देखिजे मूळ विटाळाचें ॥ ध्रु ॥ करूनि ओळखी दिली एकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं काळापाशीं गोवा । स्थिति मति देवा वांचूनियां ॥ ३ ॥

३६६. वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥ ध्रु ॥ पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे याती । हो का तयाची भलती ॥ ३ ॥

३६७. करोत तपादि साधनें । कोणी सांधो गोरांजनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी न वजों तया वाटा । नाचूं पंढरीचोहटां ॥ ध्रु ॥ पावोत आत्मस्थिति । कोणी ह्मणोत उत्तम मुक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे छंद । आह्मां हरिच्या दासां निंद्य ॥ ३ ॥

## ॥ स्वामीस सद्गुरूची कृपा जाली—अभंग ४.

३६८. सद्गुरुरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ ध्रु ॥ भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ २ ॥ कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनियां काय त्वरा जाली ॥ ३ ॥ राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खुण माळिकेची ॥ ४ ॥ बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥ ५ ॥ माघाशुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगीकार तुका ह्मणे ॥ ६ ॥

---

१ पं. लागला तो लाग सोडूनियां.—२ पं. हरावया.—३ पं. माझिया गोतें वसलें सकळ.—४ पं. निर्धारीं.—५ पं. साधोत.—६ पं. कोणी उत्तम ह्मणोत मुक्ति.—७ पं. आपण.

३६९. माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ ४ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपों कांहीं कोठें ॥ ७१ ॥ जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ २ ॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरु पांडुरंग ॥ ४ ॥

३७०. घालुनियां भार राहिलों निश्चितीं । निरविलें संतीं विठोबासि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लावूनियां हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ ७१ ॥ कटीं कर सम चरण साजिरे । राहिला भीवरे तीरीं उभा ॥ २ ॥ खुंटले सायास आणिकि या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ३ ॥ तुज वाटे आतां तें करीं अनंता । तुका ह्मणे संता लाज माझी ॥ ४ ॥

३७१. माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासि उदार जालों आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ ७१ ॥ ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ २ ॥ जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हें[४] चि आतां नाहीं लाज तुम्हां ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं घातला हावाला । न सोडीं विठला पाय आतां ॥ ४ ॥

॥ ४ ॥

३७२. देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव ॥ ७१ ॥ देवाची जतन । तया बाधूं न शके अग्न ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । प्रऱ्हादासि यत्न करी ॥ ३ ॥

३७३. भले ह्मणविता संतांचे सेवक । आइत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठसावितां बहु लागती सायास । चुकल्या घडे नास अल्प वर्म ॥ ७१ ॥ पाकासिद्धी लागे सांचित आइतें । घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ २ ॥ तुका ह्मणे वरे सांगतां चि गोष्टी । रणभूमि दृष्टी न पडे तों ॥ ३ ॥

३७४. संतसमागम एखादिया परी । राहावें त्याचे द्वारीं श्वानयाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ ७१ ॥ कामारी बटीक सेवेचे सेवक । दीनर्पण रंक तेथें भलें ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ३ ॥

---

१ पं. गुरुरावो.–२ पं. गुफा.–३ पं. आणीक.–४ पं. त. हे.–५ पं. तुझे.–६ दे. क. भणवितां.–
७ पं. घरीं.–८ पं. दीन तेथें रंकपण भलें.

३७५. एकली राणागोविंदा सर्वे । गेलें ठावें तें जालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज न ह्मणा न ह्मणा शिंदळी । नाहीं विषम जवळीं आतळलें ॥ ध्रु ॥ नव्हती देखिली म्यां वाट । ह्मणोनि हा धीट संग केला ॥ २ ॥ भेणें मिठी दिधली गळां । सेजे जवळ दडालें ॥ ३ ॥ सलगी धरी पयोधर । साहाती करमुर सर्वे ॥ ४ ॥ आहेव सी गर्भीणपणें । हें सांगणें कां लागे ॥ ५ ॥ तुका ह्मणे सेवटा नेलें । संपादिलें उभयतां ॥ ६ ॥

३७६. होतें बहुत हें दिवस मानसीं । आजि नवस हे फळले नवसीं । व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्थिर स्थिर मज चि साहे करा । वहु कष्ट सोसिलया येरझारा । येथें आड मज न साहावे वारा । देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो ॥ ध्रु ॥ मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळें होऊं एकी घडी । नाहीं लौकिक स्मरला आवडी । आतां येणें काळें या वो लोभें वेडी वो ॥ २ ॥ उदयीं उदय साधिला अवकाश । निश्चितीनें निश्चिती सावकाश । धरिये गोडी बहुत आला रस । तुका ह्मणे हा मागुता न ये दिवस वो ॥ ३ ॥

३७७. स्वयें सुखाचे जाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव । अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव । सर्वसाक्ष तेथें चि त्याचा जीव वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपआपणाशीं करिती नवल । परि वादावाद न संडिती बोल । एका मेघःशामें जलधर वोल । रसीं उतावीळ हृदय सखोल वो ॥ ध्रु ॥ एक विषय तो सकळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवडी इतेरीं[2] । अंध बहिर हे प्रेतलोकाचारी[3] । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥ २ ॥ स्तुति पराविया सुखें रुचिकर । प्रीतिपात्राच्या गौरवीं आदर । परस्परें हें सादरा सादर । योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥ ३ ॥ भक्तिवल्लभ न तुटे चराचरीं । आप्त अनाप्त हे ऐशी ठेवी उरी । दुरी जवळी संचिता ऐसें धरी । रंगा रंगा ऐसें होणें लागे हरि वो ॥ ४ ॥ तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन । आला बाहेरी प्रेमें वोसंडून । पडिलें कानीं त्या जीवाचें जतन । धरियेले एकाभावें हृदयीं चरण वो ॥ ५ ॥

३७८. आजि का वो तूं दिससी दुश्चिती । ह्मणी[4] एका मन लगे तुझ्या चित्तीं । दिलें ठेवूं तें विसरसी हातीं । नेणों काय वैसला हरि चित्तीं वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर सर परती जालीस आतां भांड । कैसें दाखविसी जगासी या तोंड । व्याली माय ते लाजविली रांड । नाहीं थार दो ठायीं जाला खंड वो ॥ ध्रु ॥

१ पं. मजसीं.–२ पं. इतरी.–३ दे. प्रेत लोका चारी.–४ पं. ह्मणे.

होतें तैसें तें उमटलें वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी । नाहीं मर्यादा निःसंग बावरी । मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥ २ ॥ नाहीं करीत उत्तर कोणासवें । पराधीन भोजन दिलें खावें । नाहीं अचळ सावरावा ठावे । देखों उदासीन तुज गे देहभावें वो ॥ ३ ॥ कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलकिल भोंवतीं बहुत । दोघे एकवाटा बोलावया गात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥ ४ ॥ करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भांडवी सासुसुना । परा भक्ति हे शुद्ध तुम्ही जाणा । तुका ह्मणे ऐसें कळों यावें जना वो ॥ ५ ॥

३७९. भरिला उलंडूनि रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट । चाले झडझडां उसंतूनि वाट । पाहे पाळतूनि उभा तो चि नीट वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाळा लावियेले[9] गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें । दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ ध्रु. ॥ मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनि आधार । उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥ २ ॥ धरिली खोडी दे टाकोनियां मागें । न ये विनोद हा कामा मशीं संगें । मिठी घालीन या जीवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें रे[10] ॥ ३ ॥ सुख अंतरींचें बाह्य ठसठसी । ह्मणे विनोद हा काय सोंग यासी । तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदानंदन या थोरपणें जासी[11] रे ॥ ४ ॥ करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जोना । मन मिनलें रे तुका ह्मणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥ ५ ॥

३८०. आजि नवल मी आलें येणें राणें । भेटी अवचिती नंदाचिया कान्हें । गोवी सांगती वो सकळ ही जन । होतें संचित आणियेलें तेणें वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गेलें होउनि न चले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं । अंगीं जडला मेंगें[12] उरलें तें कांई[13] । आतां राखतां गुमान भलें बाई वो ॥ ध्रु. ॥ बहुत कामें मज नाहीं आराणूक । एक सारितां तों पुढें उभें एक । आजि मी टाकोनि आलें सकळिक । तंव रचिलें आणिक कवतुक[14] वो ॥ २ ॥ चिंता करितां हरिली नारायणें । अंगसंगें मिनतां[15] दोघेजणें । सुखें निर्भर जालियें त्याच्या गुणें । तुका ह्मणे खुंटलें येणें जाणें वो ॥ ३ ॥

---

१ पं. होते तैसे उमटले वरी.–२ त. नि.शंक.–३ पं. मन हें गोविंदी काम करी वो.–४ दे. त. ठाव.–५ पं. देखोंसुदासीन.–६ दे. देहभावें –७ दे. सासा.–८ पं. हे.–९ पं. लावियेला –१० पं. वो –११ पं. जाणा.–१२ पं. मेग.–१३ पं. कांहीं.–१४ पं. कवतुक.–१५ पं. आतां.

३८१. मै भुली घरजानी बाट । गोरस बेचन आयें हाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कान्हा रे मनमोहन[1] लाल[2] । सब ही बिसरूं देखें गोपाल ॥ छ्रु ॥ काहां पग डारूं देख आनेरा । देखें तों सब वोहिन घेरा ॥ २ ॥ हुं तों थकित भैर तुका । भागा रे सब मनका धोका ॥ ३ ॥

३८२. हरिबिन रहियां न जाये जिहिरा । कबकी थाडी देखें राहा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्या मेरे लाले कवन चुकी भई । क्या मोहिपासिती बेर लगाई ॥ छ्रु ॥ कोई सखी हरी जावे बुलावन । बार हि डारूं उसपर तन ॥ २ ॥ तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं ॥ ३ ॥

३८३. भलो नंदाजीको डिकरो । लाज रांखीलीन[3] हमारो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आगळ आवो[4] देवजी कान्हा । मैं[5] घरछोडी आहे ह्मना ॥ छ्रु ॥ उनसुं कळना नव्हे[6] तो भला । खसम अहंकार दादुला ॥ २ ॥ तुकाप्रभु परबल[7] हरी । छपी आहे हुं जगाथी न्यारी ॥ ३ ॥

३८४. नका कांहीं उपचार माझ्या शरीरा । करूं[8] न साहती बहु होतो उबारा । मनोजन्य व्यथा वेध जाला अंतरा । लवकरी आणा नंदाचिया कुमरा[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सखिया वेशिया तुह्मी प्राणवल्लभा । निवेदिला भाव आर्तभूत या लोभा । उमटली अंगीं वो सांवळी प्रभा । साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा ॥ छ्रु ॥ नये[10] कळों नेदावी हे दुजियासि मात । घडावा तयासी उत्कंठा एकांत । एकाएकीं साक्षी येथें आपुलें चित्त । कोण्या काळें होईल* नेणों भाग्य उदितें[11] वो* ॥ २ ॥ स्वाद सीण देहभान निद्रा खंडन । पाहिले तटस्थ उन्मळित लोचन । अवघें वोसाऊन उरले ते चरण । तुका ह्मणे दर्शनापें आलें जीवनें[12] ॥ ३ ॥

३८५. पडिली भुली धांवतें सैराट । छंद गोविंदाचा चोजवितें वाट । मागें सांडोनि सकळ वोभाट । वंदीं पदांबुजें ठेवुनि ललाट वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणी सांगा या गोविंदाची शुद्धी । होतें[13] वहिलें लपाला आतां खांदीं । कोठें आड आली हे देहबुद्धी । धांवा आळवीं करुणा कृपानिधी वो ॥ छ्रु ॥ मागें बहुतांचा अंतरला संग । मुळें जयाचिया तेणें केला त्याग । पैंहिलें[14] पाहातां तें हरपलें अंग ।

---

१ पं. मोहन.–२ पं. जाल.–३ पं. राखलीन.–४ पं. आवे. दे. आवि –५ पं. मे घर छाडी आहे ह्मणा.–६ त. दे. उन्हसु कळना वेतो भला.–७ दे. पं. परवली.–८ पं. न साहावे मज वहु होतो उवारा –९ पं. कुमारा वो. १० पं. कळों नेदावी.–११ त. उदीत.–१२ पं. भावन वो.–१३ पं. होते वाईले लपाले.–१४ पं. पैल. * पं. हे शब्द नाहींत.

खुंटली वाट नाहींसें जालें जग वो ॥ २ ॥ शोकें वियोग घडला सकळांचा । गेल्या शरण हा अन्याय आमुचा । केला उच्चार[1] रे घडल्या दोषांचा । जाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥ ३ ॥

३८६. काय उणें कां करितोसि[2] चोरी । किती सांगों तुज नाइकसी हरी । परपरैता[3] तूं पळोनि जासी दुरी । अनावर या लौकिका बाहेरी वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माया करुणा हे कैरिते[4] बहुत । किती सोसूं या जनांचे[5] आघात । न पुरे अवसरु हें चि नित्यानित्य । तूं चि सोडवीं करूनि स्थिर चित्त वो ॥ ध्रु ॥ बहुत कामें मी गुंतलिये घरीं । जासी डोळा *तूं चुकावूनि हरी । करितां लाग न येसी च पळभरी । नाहीं सायासाची उरों दिली उरी वो ॥ २ ॥ तुज ह्मणीयें मी न संगें अनंता । नको जाऊं या डोळियां परता । न लगे जोडी हे तुजविण आतां । तुकयास्वामी कान्होबा गुणभरिता वो* ॥ ३ ॥

३८७. घाली कवाड टळली वाड राती । कामें व्यापिली कां पडिली दुश्चित्ती । कोणे लागला गे सदैवेचे हातीं । आजि शून्य [6]शेजे नाहीं दिसे पती वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोले दूतिकेशीं राधा हें वचन । मशीं लाघव दाखवी नारायण । ह्मणे कोमळ परी बहु गे निर्गुण । याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ॥ ध्रु ॥ धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । तैं पाचारिलें होउनि ये [7]वो सीता । लाजिनली[8] रूप न ये पालटितां । जाला भीमकी आपण राम सीता वो ॥ २ ॥ सत्यभामा दान करी नारदासी । तैं कळला वो मज हृषीकेशी । तुळे घालितां न ये कनक वो* रासी । सम तुके एक पान तुळसी वो ॥ ३ ॥ मज भुली पडली कैशापरी । आह्मां भोगूनि [9]ह्मणे मी* ब्रह्मचारी । दिली वाट यमुने माये खरी । तुह्मां आह्मां न कळे अद्यापवरी वो ॥ ४ ॥ जाणे जीवींचें सकळ नारायण । असे व्यापूनि तो न दिसे लपून । राधा संबोखिली प्रीती आलिंगून । तुका ह्मणे येथें भाव चि कारण वो ॥ ५ ॥

३८८. मिळोनि गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं । दहिं दुध तुप लोणीं शिंकां नुरे कांहीं । मेळवुनी पोरें तेथें रिघे एकसरें । वेगीं आणोनी सामोरें तेथें लोणी खाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरि सोंकला वो हरि सोंकला वो । सोंकला तो [10]वरीं तुज लाज नाहीं तरी । आम्हां सांपडतां उरी तुज मज नाहीं ॥ ध्रु ॥ तुज वाटतसे कोडें[11] यासि लागतसे गोड । काय ह सतेसी वेड तुज लागलें वो । आह्मी जाऊं तुजवरी

---

१ पं. उच्चार —२ त. दे. करिशील.—३ पं. परे परता.—४ पं. करिती —५ पं. जगाचे —६ पं. सेजेसी नाहीं —७ पं. येईं.—८ पं. त. लाजीनली.—९ पं. ह्मणवी.—१० पं. वरी —११ पं. कोहे.
* पं. हे शब्द नाहींत.

पोरें चाळविल्या पोरी । काय सांगों भांडखोरी लाज वाटे आह्मां ॥ २ ॥ मुख मळिण वदन उभा हाडतिये घोणे । तंव दसवंती ह्मणे आणा शीक लावूं । थोर आणिला कांटाळा घरीं दारीं लोकपाळां । डेरा रिघोनि गुसळा तेथें लोणी खाय ॥ ३ ॥ मिळोनि सकळा दावें लावूनियां गळां । कैशा बांधिती उखळा येथें राहे उगा । बरा सांपडलासी हरी आजिच्यानें करिसिल चोरी । डोळे घालुनियां येरी येरीकडे हांसे ॥ ४ ॥ फांकल्या सकळा उपडूनियां उखळा । मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही । उठिला गजर दसवंती नव्हे धीर । धांवे तुकयाचा दातार आळंगिला वेगीं ॥ ५ ॥

३८९. गोरस घेउनी सातें निघाल्या गौळणी । तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें । जाला पानसरा मिठी घातली पदरा । आधीं दान माझें सारा मग चाला पंथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरे जाऊं दे परता । मुळीं भेटलासी आतां । नाट लागलें संचिता । खेपा खुंटलिया ॥ ध्रु ॥ आसुडी पदरा धरी आणीक दुसरा । येरी झोंबतील करा काय वेडा होसी । आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा । सर परता गोवळा काय बोलतोसी ॥ २ ॥ आह्मी येथें अधिकारी मागें केली तुह्मी चोरी । आतां कळलियावरी मागें केलें त्याचें । बोलिल्या हांसुनी आह्मी सासुरवासिनी । कां रे झोंबसी दुरूनी करी मात कांहीं ॥ ३ ॥ वांयां परनारी कैशा धरिसी पदरीं । तयां कळलिया उरी तुज मज नाहीं । जडला जिव्हारीं फांकों नेदी तया नारी । जेथें वर्म तें धरी जाऊं पाहे तियेचें ॥ ४ ॥ तया हातीं सांपडल्या हाटीं पाटीं चुकाविल्या । कृष्णमिळणीं मिळाल्या त्याही न फिरती । तुका ह्मणे खंती वांयां न धरावी चित्तीं । होतें तुमच्या संचितीं बोडवलें आजि ॥ ५ ॥

३९०. हरी तुझी कांति रे सांवळी । मी रे गोरी चांपेकळी । तुझ्या दर्शनें होइन काळी । मग हें वाळी जन मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उगला राहें न करीं चाळा । तुज किती सांगों रे गोवळा । तुझा खडबड कांबळा । अरे नंदवाळा आलगटा ॥ ध्रु ॥ तुझिये अंगीं घुरट घाणी । बहु खासी दुध तुप लोणी । घरिचें बाहेरिल आणोनी । मी रे चांदणी सकुमार ॥ २ ॥ मज ते हांसतील जन । धिःकारिती मज देखोन । अंगीं तुझें देखोनि लक्षण । मग विटंबणा होइल रे ॥ ३ ॥ तुज लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पिशुन व्याही । आणीक मात बोलूं काहीं । कसी भीड नाहीं तुज माझी ॥ ४ ॥ वचन मोडी नेदी हात । कळलें न साहे ची मात । तुकयास्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करुनि भोगी ॥ ५ ॥

---

१ पं. सर जाऊं दे रे सर जाऊं दे परता.–२ पं. आणी.–३ पं. वेडा होसी.–४ पं. तयाचें.–५ त. दे. हांसइल.–६ पं. अगीनें.–७ पं. तुज तव.

३९१. सात पांच गौळणी आलिया मिळोनी यशोदे गाऱ्हाणें देती कैसें । काय व्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळें ची कैसें । दहिं दुध लोणी शिंकां नुरे चि कांहीं कवाड जैशाचें तैसें । चाळवूनि नाशिलीं कन्याकुमरें आमुच्या सुनांसि लाविलें पिसें गे वाइये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आझुनि तरी यासि सांगें वरव्या परी नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटी । मिळोनि सकळै जणी करूं वाखा सखीं तुज मज होईल तुटी गे वाइये ॥ ध्रु ॥ नेणे आपपर लौकिक वेव्हार भलते ठायीं भलतें करी । पाळतुनि घरीं आह्मी नसतां तेथें आपण संचार करी । सोगया चुंबन देतो आलिंगन लोळे सेजावाजावरी । शिंकीं कडा फोडी गोसाचे डेरे धरितां न सांपडे करीं गे वाइये ॥ २ ॥ आतां याची चाड नाहीं आह्मां भीड सांपतां कोड पुरवूं मनिचें । सोसिलें वहु दिस नव्हता केला निस ह्मणुनि एकुलतें तुमचें । चरण खांवीं जीवें वांधेनें[1] सरिसा जवें न चले कांहीं याचें । अर्थ प्राण देतां न सोडी सर्वथा भलतें हो या जिवाचें गे वाइये ॥ ३ ॥ घेउनी जननी हातीं चक्रपाणी देतिसे गौळणी वेळोवेळां । निष्ठुर वाद झणीं बोलाल सकळा क्षोभ जाइल माझ्या वाळा । जेथें लागे हात वाढतें नवनीत अमृताच्या कल्लोळा । देखोनि तुकयास्वामी देश देहभाव विसरल्या सकळा गे वाइये[2] ॥ ४ ॥

३९२. विरहतापें फुंदे छंद करिते जाती । हा गे तो गे सावधान सवें चि दुश्चिती । न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं । वेगळी च पडों पाहे कुळाहुनिया ती[3] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खुंटलीसी जाली येथें अवघियांची[5] गती । आपुलीं परावीं कोण नेणें भोंवतीं । [4]त्यांचीं नांवें वोभे अहो अहो श्रीपती । नवलाव हा येरां बाटोनियां हांसती ॥ ध्रु ॥ बाहेरी च धांवे रानां न धरी च घर । न कळे बंधना जाला तेणें संचार । विसरूनि गेली सासुरें कीं माहेर । एका अवलोकी एका पडिला विसर ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी अवघ्या राहा निश्चळा । न ये आतां येऊं येथें सर्वथा बळा । त्याचा त्याच्या मुखें अवघाची निराळा[6] । वहुतां मतें येथें तर्कवाद निराळीं ॥ ३ ॥

३९३. ये रे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें । मिळालिया बाळा एके ठायीं कवतुकें । कळों नेदी माया त्यांचें[7] त्यास ठाउकें । खेळतोंसें दावी लक्षलक्षापें धुर्के ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अखंडित चटे त्यांनीं लावियेला कान्हा । आवडे तया त्यां[8] वाहाती संकल्प मना । काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना ।

१ दे. क. त. वांधेन.—२ क. बाइगे.—३ पं. ती वो —४ पं. त्यांच्या नांवें वो वोभे घोभे आचो श्रीपती —५ पं. क. अवधियाचा.—६ पं. क. निराळा वो —७ पं. क. त्यास च तें.—८ पं. तया ते संकल्प वाहाती मना क. तया त्या संकल्प वाहाती मना.

*एकांताचें सुख जाती घेवोनियां राणी[1] ॥ध्रु॥ अवघियांचा जाणें जाला मेळास हरी । मिळोनियां जावें तेथें तया भीतरी । कळों नेदी घरिच्या करी गोवूनी चोरी । हातोहातीं नेती परपरत्या दुरी ॥ २ ॥ आनंदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील बाळा त्यजिलें पारिखें जन[2] । एकाएकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न । तुका ह्मणे एका नारायणा वांचून ॥ ३ ॥

३९४. खेळतां मुरारी जाय सरोवरा तिरीं । तंव नग्न[3] चि या नारी तेथें देखियेल्या । मांडिले विंदान ख्याल सुखाचें संधान । अंग लपवूनी मान पिलंगत चाले ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे । पायां पडतां रें न सोडी नेदी साउलां रे ॥ ध्रु ॥ साड्या सांडेलीं पातळें[4] गोंडे कसणिया चोळ्या । बुंथी घेउनी सकळा कळंबावरी पळे । खांदी[5] धरूनियां करीं दृष्टि घालोनि सामोरी । बैसे पाला वोढी वरी खदखदां हांसे ॥ २ ॥ आनंदें कल्लोळें[6] बाळा खेळती सकळें[7] देती उलटिया चपळें[8] । एकी एकीहूनि ह्मैस वेल सुर काडी । एकी उगविती[9] कोडीं । नाना परीच्या निकेंडी[10] खेळ मांडियेला ॥ ३ ॥ एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारी । ह्मणे नाहीं नेलें चोरीं[11] काय जाणों केव्हां । केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा । आतां ह्मणतील घरां जावें कैशा परी ॥ ४ ॥ तंव हांसे वनमाळी वरी पाहोनी सकळी । लाजे[12] रिघालिया जळीं मागें पुढें हात । लाज राखावी[13] गोपाळा आह्मांजणींची सकळां । काय मागसी ये वेळा देऊं गुळवाटी ॥ ५ ॥ जोडोनियां कर या गे सकळी समोर । वांयां न बोलावें फार वडबड कांहीं । भातुकें भूषण नाहीं चाड नेघें धन । करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥ ६ ॥ एक एकीकडे पाहे लाज सांडूनियां राहे । ह्मणे चला आतां सये जाऊं तयापाशीं । जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत । तुका ह्मणे केली मात लाज राखिली तयांची ॥ ७ ॥

३९५. धरिला पालव न सोडी माझा येणें । कांहीं करितां या नंदाचिया कान्हें । एकली न येतें मी ऐसें काय जाणें । कोठें भरलें अवघड या राणें रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोडीं पालव जाऊं दे मज हरी । वेळ लागलें[14] रे कोपतील घरीं । सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥ ध्रु ॥ सख्या[15] वशिया होत्या मजपाशीं । तुज फावलें रे फांकतां तयांसी । होतें अंतर तर सांपडतें कैसी ।

---

१ क. राना.–२ पं. त्यजिले पाविखे.–३ पं. क. नग्न ची.–४ पं. पातळा –५ पं. क. खादीं घालुनिया –६ पं. कल्लोळा –७ पं. सकळा.–८ पं. चपळा.–९ पं. नागविती.–१० त. क. विकडी –११ क. चोरीं.–१२ पं. क. लाजा –१३ क. राखिली.–१४ पं. लागल्या.–१५ त. दे. क. सखिया वेशिया होतिया.–* पं. हा चरण नाहीं –† पं हा शब्द नाहीं

एकाएकीं अंगीं जडलासी रे ॥ २ ॥ कैसी भागली हे करितां उत्तर । शक्ति मावळल्या आखुडितां कर । स्वामी तुकयाचा भोगिया चतुर । भोग भोगी त्यांचा रांखे[1] लोकाचार वो ॥ ३ ॥

३९६. गाई गोपाळ यमुनेचे तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेटी । चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं । चला चला ह्मणती पाहूं दृष्टी वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विठ्ठल[2] देखावया हरी । मिस पाणियाचें करितील घरीं । बारा सोळा मिळोनि परस्परीं वो ॥ ध्रु ॥ चिरें चोळिया त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ती । कोणा नाठवे[3] कोण कुळ याती । जालीं तटस्थ[4] सकळ नेत्रपातीं वो ॥ २ ॥ दंतधावनाचा मुखामाजी हात । वाद्यें वाजती नाइके जनमात । करी श्रवणें[5] कृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवील[6] मनोरथ वो ॥ ३ ॥

३९७. कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लावियेलें जग माझ्या पाठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥ ध्रु ॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ती । न देखें भोंवतीं मी ते माझी ॥ २ ॥ तुकयाचा स्वामी माझे जीवीं च बैसला । बोलीं[7] च अबोला करूनियां ॥ ३ ॥

३९८. गोड लागे परी सांगतां चि न ये । बैसे मिठी सये आवडीची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेधलें वो येणें श्रीरंगरंगें । मीमाजी[8] अंगें हारपलीं ॥ ध्रु ॥ परते चि ना दृष्टी बैसली ते ठायीं । विसावोनि पायीं ठेलें मन ॥ २ ॥ तुकयाच्या स्वामीसवें जाली भेटी । तेव्हां जाली तुटी मागिल्यांची[9] ॥ ३ ॥

३९९. पाहावया माजी नभा । दिसे शोभा चांगली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसला तो माझे मनीं । नका कोणी लाजवूं ॥ ध्रु ॥ जीवें[10] आवडे जीवाहूनि । नव्हे क्षण वेगळा ॥ २ ॥ जालें विश्वंभरा ऐसी । तुकया दासी स्वामीची ॥ ३ ॥

४००. कोणी एकी भुलली नारी । विकितां गोरस ह्मणे घ्या हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखिला डोळां बैसला मनीं । तो[11] वदनीं उच्चारी ॥ ध्रु ॥ आपुलियाचा विसर भोळा । गोविंद कळा कौतुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे हांसे जन । नाहीं कान ते ठायीं ॥ ३ ॥

---

१ पं. राखी –२ पं. विठ्ठल तें.–३ पं. नाठवे हे.–४ दे. त. क. तादस्त –५ त. श्रवण हा.– ६ पं. पुरवी.–७ पं. क. बोली –८ पं. मी हे माझी –९ पं. क. मागिलाची.–१० पं. क. जीवीं.– ११ पं. तो चि

४०१. करूनी आइत सत्यभामा मंदिरीं रे । वाट पाहे टळोनि गेली रात्री रे । न ये चि देव येतील[1] कामलहरी रे । पडिली दुश्चिती तंव तो कवाड टिमकारी रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर गा परता कळला तुझा भाव रे । कार्या पुरतें हें दाविसी लाघव रे । बोलतोसी[2] तें अवघी तुझी माव रे । जाणोनि आलासी उजडता समयो रे ॥ छ ॥ मी च वेडी तुजला[3] बोल नाहीं रे । दानावेळे विटंब्रणा जाली काय रे । मागुती रुद्रासि भेटी दिली तई रे । विश्वासें[4] तो तुझ्या बोला आझुनि तेरी रे ॥ २ ॥ भ्रम होता तो अवघा कळों आला रे । मानवत होतें मी* भला भला रे । नष्ट[6] क्रिया नाहीं मां तुझ्या बोला रे । तुकयाबंधु स्वामी कानड्या कौसाल्या रे ॥ ३ ॥

४०२. तंव तो हरि ह्मणे वो† निजांगने वो । लाइ नीच कां देसील[7] डोहणे वो । मजपें दुजें आलें तें देव जाणे वो । शब्द काय[8] हे बोलसी ते उणे वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा मनीं विचारुनी आधि वो । सांडूनि देई[9] भ्रांति करीं स्थिर बुद्धि वो । तंट[10] केलें हें माझें तुझें उपाधीं वो । उघडी डोळे आझुनि तरी धरीं शुद्धि वो ॥ छ ॥ कोठें तरी दुनियांत वर्तलें वो । स्त्रियांनीं भ्रतारीं[11] दानां दिलें वो । कैसा भैला[12] मी नव्हे तें सोसिलें वो । रुसतेसी[13] तूं उफराटें नवल जालें वो ॥ २ ॥ काय सांग स्यां दैन्य केली कैसी वो । तुझ्या गर्वें आणविलें हनुमंतासि वो । कष्टी केलें मज गरुडा भीमकीसि[14] वो । तुकयाबंधु ह्मणे खरें खोटें नव्हे यासि वो ॥ ३ ॥

४०३. तंव ते ह्मणे ऐकों[15] हृषीकेशी वो । नवाजिलें[16] तुह्मीं ह्मणां आपणांसि वो । तरी कां‡ वंचनुक सुमनासि वो । नट नाट्य बरें संपादूं जाणतोसि[17] वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर हो परता पैरता[18] हो आतां हरी । ह्मणे सत्राजिताची कुमरी । जाणतें मी या शब्दाच्या कुसरी । ऐसें च करून ठकविलें आजिवरी ॥ छ ॥ भावें गेलें ह्मूण न व्हावा वियोग । मनिचे आर्त जन्मांतरीं व्हावा संग । तों तों केलें हें* पाठमोरें जग । ऐसें काय जाणें हे तुझे रंग ॥ २ ॥ काय करूं या नागविलें कामें । लागलें तयास्तव इतुकें सोसावें[19] । नाहीं तरी कां नव्हती ठावीं वर्में । परद्वारीं ऐसा हाकलिती प्रसिद्धनांवें ॥ ३ ॥ काय किती सांगावे तुझे गुण । न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण ।

---

१ पं. येती.–२ पं. बोल बोलतोसी.–३ पं. तुज लागी.–४ पं. क. विश्वासतें –५ पं. नाहीं –६ पं. क. नष्टक्रिया.–७ पं. देसी –८ पं. काय बोलसी.–९ पं. क. देहे भ्राति.–१० पं. तंट केले हे माझे तुझे.–११ पं. भ्रतार दान – १२ पं. मी भला –१३ पं. रुसली तें क. रुससी तें.–१४ पं. भीमकी.–१५ पं. का.–१६ पं. नवाजीत होता आपणासी.–१७ पं. जागसी परी –१८ पं. आतां.–क हरी आता हो.–१९ पं. सोसावें नेमें

* पं. हा शब्द नाहीं.

† पं. हा शब्द नाहीं.–क. खोडला आहे

‡ पं. हा शब्द नाहीं.–क. काकेली.

आप पर न ह्मणसी माय वहीण । सासूसुनास लावुनि पाहासी भांडण ॥ ४ ॥ इतुकियावरी ह्मणे वैकुंठिंचा राणा । होऊन गेलें तें नये आणूं मना । आतां न करीं तैसें करी क्रिया आणा । भक्तवत्सल ह्मणे तुकयावंधु कान्हा ॥ ५ ॥

४०४. कान्हो एकली रे एकली रे । तुजसवें चुकलें रे । भय वाटे वैनीं मज अवळा धाकली रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निघतां घरीं आई बा वारी । तुजसवें कां आलियें हरी ॥ छ ॥ लोक वाटा सांगती खोटा । परी मी चटा लागलियें ॥ २ ॥ पिकल्या वोरी जालें सामोरी । काय जाणें कोठें राहिला हरी ॥ ३ ॥ आड खुंट जालिया जाळी । काय जाणों कान्हें मांडिली रळी ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाऊं आलिया वाटा । पाहों हरी पायीं न मोडे कांटा ॥ ५ ॥

४०५. वयाला मज आयो वारितेसी घरा । खेळतों सोकरा नंदाचा मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वहु दिसीं जाली यासीं मज भेटी । आतां वाटे तुटी न परावी ॥ छ ॥ कोवळें वोलतो मना आवरतें । डोळियाचें पातें ढापवेना ॥ २ ॥ आजि सकळांसी आलें चोलुनियां । कां गो पाठीं वांयां पुलविली ॥ ३ ॥ तुमचें तें काय खोळंवलें काज । वल्या कां गो मज कोंडा घरीं ॥ ४ ॥ तुकयाचा धनी गोकुळेंनायक । सरा कांहीं एक वोलतों मी ॥ ५ ॥

४०६. आतां न यें मागें । मी आलें याच्या रागें । काय माझें जगें । कोपोनियां करावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां गो कालित्यां कोल्हाल । तुह्मी भलत्या च सकल । वेचाल ते वोल । झुटे होती वोलिले ॥ छ ॥ याचे भेटी माझें मन । स्वरुपीं ठाकले लोचन । वेगळें तें क्षण आतां होऊं नावरे ॥ २ ॥ काज काम नको जालें । बीजें नावरे वोलिलें । याचिया भेदिलें । कामबाणीं अंतर ॥ ३ ॥ या वेगळें होणें । आतां जळो तैसें जिणें । घेतलें तें मनें । आतां मागें न फिरे ॥ ४ ॥ आतां मोटी वार । माझी नका धरूं चार । तुकयाचा दातार । शेजे तो मी सुतलों ॥ ५ ॥

४०७. हरिरता चपळा नारी । लागवरी न रिघती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम । भोगी काम भोगंता ॥ छ ॥ वाचा वाच्यत्वासि न ये । कोठें काय करावें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा ऐशा । देवपिशा उदारा ॥ ३ ॥

४०८. गौळणी आल्या वार्जे । ह्मणती या गे राखों आज । सांपडवुनी माज- । घरांत धरुनी कोंडूं । उघडें कवाड उभ्या काळोशाचे आड । साता पांचा एक भीड

१ पं. चुकली.–२ पं. जनी.–३ पं. मसी –४ पं. वैकुंठ नायक –५ पं. माजी.–६ त. सुतलें – ७ पं. पुरता –८ पं. क. वाजें.–९ पं. रे –१० क. घराधरु कोंडुनि.–११ पं. उभें.

मौनेंची ठेल्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नित्य सोंकवला नेदी । सांगों चित्त बोला । आतां सांपडतां याला कोण सोडी जीवें ॥ छ ॥ जाणोनियां हरी त्या च घरा आला चोरी । गडियां ठेवुनी बाहेरी पूर्वद्वारें शिरे । त्यांच्या भयाभीत चाले पिलंगत भोंवतालें । पाहे तंव देखियेलें नवनीत पुढें ॥ २ ॥ उतरोनि सिंकें । पाहे चाखोनियां निकें । गोड तें चि एका एकें । हातीं लांबवितो । जाणे राखती तयांसि । तेथें अधिक चि नासी । माग लावी हात पुसी । चोरी जाणावया ॥ ३ ॥ जाणोनियां नारी । मूळ वर्मद्वार धरी । माजे[1] कोंडूनी भीतरी । घरांत धरीयेला[2] । कां रे नागविसी । माझे सुळीं लागलासी । आणवीन तुजपासीं । मागें खादलें तें ॥ ४ ॥ दोही[3] संधी बाहे । धरूनि नेती माते पाहे । काय नासी केली आहे । घरामाजी येणें । तुका ह्मणे सुख । त्याचें वाढों नेदी दुःख । दसवंती कवतुक । करुनी रंजविल्या ॥ ५ ॥

४०९. आलियें धांवति धांवति भेट होइल ह्मण । तंव ते टळली वेळ वो माझा उरला सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय करूं सांग वो मज भेटेल कैसा । हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥ छ ॥ लाविला उशीर बहुतीं बहु ओढिती ओढा । सांभाळितां सांग असांग दुःख पावल्यें पीडा ॥ २ ॥ जळो आतां संसारु वो कई शेवट पुरे । तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥ ३ ॥

४१०. आणीक काय थोडीं । परि तीं[4] फार खोटीं कुडीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सदा मोकळीं च गुरें । होती फजीत तीं पोरें ॥ छ ॥ सदा घालिती हुंबरी । एक एकांचें न करी ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । माय वेळोवेळां मारी ॥ ३ ॥

४११. बहुतांचे संगती । बहु पावलों फजिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरें केलें नंदबाळें । मागिलांचें तोंड काळें ॥ छ ॥ माझा करितील तंटा । लपती आलिया बोभाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे काई । किती ह्मणों बाप आई ॥ ३ ॥

४१२. गाईन ते लीळा चरित्र पवाडे । राखिले संवगडे सहित गाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चोरिलें नवनीत बांधविला गळा । जे तुह्मीं गोपाळा छंद केले ॥ छ ॥ मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें । केली ते गोविंदें क्रीडा गाऊं ॥ २ ॥ मायबापा लाड दाखविलें कौतुक । तें या आणूं सुख अंतरासी ॥ ३ ॥ निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी । ऐसा ह्मणों बळी आमुचा स्वामी ॥ ४ ॥ तुका ह्मणे सरसी असों येणें बोधें । लागोनि संबंधें सर्वकाळ ॥ ५ ॥

---

१ दे. माजे क. मज पं. मग –२ पं. घरांत धरी एकला क. घरा धरियेला –३ क. देहि सदे बाहे. –४ दे. संदी –५ दे. क. ते.

## डांका—अभंग ८.

४१३. चौक भरियेला आसनीं पाचारिली कुळस्वामिनी। वैकुंठवासिनि ये धांवोनी झडकरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रंगा येई वो विठाई सांवळिये डोळसे। तुझें श्रीमुख साजिरें तें मी केधवां देखेन ॥ ध्रु ॥ रजतमधुपारती। पंचप्राणांची आरती। अवघी सारोनी आइती। ये धांवती झडकरी ॥ २ ॥ मन मारोनियां मेंढा। आशा मनसा तृष्णा सुटी[1]। भक्तिभाव नैवेद्य ताटीं। भरोनि केला हाकारा ॥ ३ ॥ डांका अनुहात गजरे। येऊनि अंगासी संचरे। आपुला घेउनी पुरस्कार। आरोग्य करीं तुकयासी ॥ ४ ॥

४१४. साच माझा देव्हारा। भाक ठेवा भाव खरा। त्रिगुणाचा फुलवरा। आणा विनति सांगतों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें दैवत हें रंगीं। नाचे वैष्णवांच्या संगीं। भरलें मग अंगीं। निवाड करी दोहींचा ॥ ध्रु ॥ तुझें आहे तुजपासीं। परि तूं जागा चुकलासी। चिवडुनियां नासी। तुझ्या घरिच्यांनीं केली ॥ २ ॥ आतां न पडे ठावें। वांचूनियां माझ्या देवें। अंधकार व्हावें। नासु ठाव शोधावा ॥ ३ ॥ आंधळ्यासी डोळे। देते पांगुळासी पाय। वांजा पुत्र फळे। नवस पुरविते विठाई ॥ ४ ॥ उगविलीं कोडीं। मागें कितेकांचीं बापुडीं। तुका ह्मणे घडी। न लगे नवस द्या आधीं ॥ ५ ॥

४१५. विनति घातली अवधारीं। मज देई वो अभय करीं। पीडिलों खेचरीं। आणीक वारी नांवांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रंगा येईं वो एकला रंग बोडवला। हरिनाम उठिला गजर केला हाकारा ॥ ध्रु ॥ देवांचे दैवते। तुज नमिलें आदिनाथे। ये वो कृपावंते। भोगा माझ्या धांवति ॥ २ ॥ न लवीं आतां वेळ। आइत सारिली सकळ। तुका ह्मणे कुळ। आमुचिये दैवते ॥ ३ ॥

४१६. माझा देव्हारा साचा। नाहीं आणीक कोणाचा। त्रिभुवनीं याचा। ठसा न लगे पुसावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या रे लोटांगणीं। कांहीं करा विनवणी। करील झाडणी। भूत काढी संसार ॥ ध्रु ॥ पडिले विषयांचे गोंधळीं। ते त्रिगुण आकळी। हरिनाम आरोळी। कानीं पडतां ते उठी ॥ २ ॥ घेतला अहंकारें[2]। काम क्रोध या मत्सरें। पळती प्रेमभरें। अवघे ठाव सांडुनी ॥ ३ ॥ घेतलासे पुरा। माया ममता आसरा। अवघ्या एक सरा। पळती रंग देखोनी ॥ ४ ॥ तुका ह्मणे द्यावा भाव। फिटेल मनिचा संदेह। आणीक न लगे ठाव। कांहीं कोठें हिंडावें ॥ ५ ॥

---

१ पं. तुटी क. सुटी —२ दे. क. अहंकार

४१७. पुढें येते देवी । तिची जैती चालों द्यावी । मागील झाडावी । झाडा मान आसडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकवीरा आली अंगा । आतां निवारील रोगा । माझ्या* भक्तापाशीं सांगा । पूजा भावें करावी ॥ छ ॥ मेंढा मारावा लोवाळ । पूजा पावली सकळ । तुह्मीं केलें बळ । मग मी ठायीं न पडें ॥ २ ॥ तुका ह्मणे मुळीं । लागली ते आली कुळीं । वंदुनी सकळीं । जीवें भावें ओवाळा ॥ ३ ॥

४१८. अवघ्या जेष्टादेवी कोण पूजनाचा ठाव । धरितां चि भाव कोठें नाहींसें जालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिसे सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें । तळीं गेलें देखें । वरी टोले[2] न साहाती ॥ छ ॥ पटें[3] एका शिरीं । यथाविधीनें त्या येरी । वसकोळ्या घागरी डेरे रांझण गाडगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माना । येथें कोणीं रुसावें ना । आपुलाल्या स्थानां । जेथें त्या चि शोभल्या ॥ ३ ॥

४१९. खेचर खडतर । काळ कांपती असुर । नांदे भीमातीर । पंढरपुरपाटणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां करी[4] कां रे हाकारा । सहस्र नामें एकसरा । दवडिते खेचरा । अंगसंगें धरूनी ॥ छ ॥ सीते जाली झडपणी । राहाणे वासुगीच्या[5] बनीं । पावली जननी । झोंटि मोकळिंया[6] केशी ॥ २ ॥ लाविलें कावरें । प्रल्हादा ह्मैसासुरें[7] । आली येकसरें । दांत खात रंगासी ॥ ३ ॥ वसुदेवाचीं बाळें । सात खादलीं ज्या काळें । आली भोगवेळे । तया कारणें तेथें ॥ ४ ॥ पांडवें वासुडीं । वांज[8] केलीं फिरती वेडीं । धांवोनियां काढी । अंगसंगें त्राहाविलीं ॥ ५ ॥ नामाचें चिंतन । तेथें धांवते आपण । न विचारितां हीण । भाव देखे जयाचा ॥ ६ ॥ कुळीची कुळदेवता । तुका ह्मणे आह्मां माता । काय भय भूतां । काळ यमदूताचें ॥ ७ ॥

४२०. देवी देव जाला[9] भोग सरला[10] यावरी । सांगाया दुसरी ऐसी[11] नाहीं उरली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिनाम देवनाम तुह्मी गाऊनियां जागा । पेंठवणी[12] मागा नका ठेवूं लिगाड ॥ छ ॥ शेवटीं सुताळी बरवी वाजवावी डांक । ताळा घाली एक सरलियाचे शेवटीं ॥ २ ॥ गुंडाळा देव्हारा मान देती मानकरी । तुका ह्मणे बरीं आजि कोडीं उगविलीं ॥ ३ ॥

॥ ८ ॥

४२१. जाली झडपणी खडतर देवता । संचरली आतां[13] निघों नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज उपचार झणी आतां करा । न साहे दुसरा भार कांहीं ॥ छ ॥

---

१ पं. जगति –२ त. टोले साहाती –३ पं. पट –४ क. करी –५ सर्व प्रतींत हाच शब्द आहे ; अभंग ३३९ यात मुळीं "वासुगीच्या" असें होतें त्याच्या जागीं "अशोकाच्या" असा शोध दे. क. या प्रतींत घातला आहे. परंतु येथें तसा शोध नाहीं. यावरून अशोकास वासुगी असें ह्मणत असतील असें वाटतें –६ त. मोकळा.–७ हिरण्यकशिपूसच ह्मैसासुर असें ह्मटलें असावें –८ पं. वांज.–९ पं. जाले – १० पं. सरले.–११ पं. उरी.–१२ पं. भाउटणी.–१३ पं. चिता रिघों नेणें * पं. हा शब्द नाहीं

नेऊनियां घाला चंद्रभागे तिरीं । जीवा नाहीं उरी कांहीं आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे कळों आलें वर्तमान । माझें तों वचन आच्छादलें ॥ ३ ॥

४२२. अंगीं देवी खेळे । कां रे तुह्मासी न कळे । कोणाचे हे चाळे सुख दुःख ने मनितां[१] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मीं तों आतां येथें नाहीं । ओळखी वचनाच्या ठायीं । पालटाचा घेईं । भाव खरें लोपे ना ॥ ध्रु ॥ आपुलाले तुह्मी पुसा । सोवा एव्याचे[२] सरिसा । स्थिरावल्या[३] कैसा काय जाणों विचार ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ । मग तैशी वेळ । कोठें जाते सांपडों ॥ ३ ॥

४२३. पांगुळ जालों देवा नाहीं हात ना पाय । बैसलों जयावरी सैराट तें जाय । खेटितां कुंप कांटी । खुंट दरडी न पाहे । आधार नाहीं मज कोणी । बाप ना माये[४] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दाते हो दान करा । जातें पंढरपुरा । न्या मज तेथवरी । अखमाचा सोयरा ॥ ध्रु ॥ हिंडतां गव्हानें गा । शिणलों दारोदारीं[५] । न मिळे चि दाता कोणी । जन्मदुःखातें वारी[६] । कीर्ति हे संतां मुखीं । तो चि दाखवा हरी । पांगळां पाय देतो । नांदे पंढरपुरीं ॥ २ ॥ या पोटाकारणें गा । जालों पांगीला जना । न सरे चि बापमाय । भीकें[७] नाहीं खंडणा । पुढारा ह्मणती एक । तया नाहीं करुणा । श्वान हें लागे पाठीं । आशा बहु दारुणा ॥ ३ ॥ काय मी चुकलों गा । मागें नेणवे[८] कांहीं । न कळे चि पाप पुण्य । तेथें आठव नाहीं । मी माजी भुललों गा । दीप पतंगासोयी । द्या मज जीवदान । संत महानुभाव कांहीं ॥ ४ ॥ दुरोनि आलों मी गा । दुःख जालें दारुण । यावया येथवरी । होतें हें चि कारण । दुर्लभ भेटी तुह्मां । पायीं जालें दरुषन । विनवितो तुका संतां । दोन्ही कर जोडून ॥ ५ ॥

४२४. देश वेष नव्हे माझा । सहज फिरत आलों । करूं सत्ता कवणावरी । कोठें स्थिर राहिलों । पाय डोळे ह्मणतां माझे । तींहीं[९] कैसा मोकलिलों । परदेशीं नाहीं कोणी । अंध पांगुळ जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझी करीं चिंता । दान देईं भगवंता । पाठीं पोटीं नाहीं कोणी । निरवीं सज्जन संता ॥ ध्रु ॥ चालतां वाट पुढें । भय वाटतें चित्तीं । बहुत जेनें[१०] गेलीं । नाहीं आलीं मागुतीं । न देखें काय जालें । कान तरी ऐकती । बैसलों संधिभागीं । तुज धरूनि चित्तीं ॥ २ ॥ भाकितों करुणा गा । जैसा सांडिला ठाव । न भरें पोट कधीं । नाहीं निश्चळ पाव । हिंडतां भागलों गा । लक्ष चौऱ्याशीं गांव । धरूनि राहिलों गा । हा चि वसता ठाव ॥ ३ ॥ भरवसा काय आतां । कोण आणि अवचिता । तैसी च जाली कीर्ति ।

---

१ पं. त. नेनिता —२ पं. येवाच.—३ दे. त. थिरावल्या.—४ पं. आधार नाहीं कोणी । मज बाप ना माय ॥—५ पं. येरझारीं.—६ पं. जन्मदुःख निवारी —७ पं. नाहीं भीक —८ पं. नेणवे चि — ९ त. दे. तोंही —१० पं. जेणें

तया मज बहुतां । ह्मणउनि मारीं हाका । सोयी पावें पुण्यवंता । लागली भूक थोरी । तूं चि कृपाळु दाता ॥ ४ ॥ संचित सांडवलें । कांहीं होतें जवळीं । वित्त गोत पुत माया । तुटली हे लागावळी । निष्काम जालों देवा । होतें माझे कपाळीं । तुका ह्मणे तूं चि आतां । माझा सर्वस्वें वळी ॥ ५ ॥

४२५. देखत होतों आधीं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टी गेली वरी आले पडळ । तिमिर कोंदलेंसें वाढे वाढतां प्रबळ । भीत मी जालों देवा । काय ज्याल्याचें फळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां मज दृष्टी देईं । पांडुरंगा मायबापा । शरण आलों आतां । निवारूनियां पापा । अंजन लेववुनी । करीं मारग सोपा । जाईन सिद्धपंथें । अवघ्या चुकती खेपा ॥ छ ॥ होतसे खेद चित्ता । कांहीं नाठवे विचार । जात होतों जना मागें । तोही सांडिला आधार । हा ना तोसा ठाव जाला । अवघा पडिला अंधार । फिरलीं माझीं मज । कोणी न देती आधार ॥ २ ॥ जोंवरि चळण गा । तोंवरि ह्मणती माझा । मानिती लहान थोर । देहसुखाच्या काजा । इंद्रियें मावळलीं । आला बागुल आजा । कैसा विपरीत जाला । तो चि देह नव्हे दुजा ॥ ३ ॥ गुंतलों या संसारें । कैसा झालोंसें अंध । मी माझें वाढवुनी । मायातृष्णेचा बाध । स्वहित न दिसे चि । केला आपुला वध । लागले काळ पाठीं । सवें काम हे क्रोध ॥ ४ ॥ लागती चालतां गा । गुणदोषाच्या ठेंसा । सांडिली वाट मग । जालों निराळा कैसा । पाहातों वास तुझी । थोरी करूनी आशा । तुका ह्मणे वैद्यराजा । पंढरीच्या निवासा ॥ ५ ॥

४२६. सहज मी आंधळा गा निजनिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति जाली जन न दिसे तेथें । मी माजी[1] हारपलें ठायीं जेथींचा तेथें । अदृश्य तें चि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखी मी निजलों गा शून्य सारूनि तेथें । त्रिकूटशिखरीं गा दान मिळे आइतें ॥ छ ॥ टाकिली पात्र झोळी धर्मअधर्म आशा । कोल्हाळ चुकविला त्रिगुणाचा वोळसा । न मागें मी भीक आतां हा चि जाला भरवसा । वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥ २ ॥ ऊर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद । अरूप जागविला दाता घेऊनि छंद । घेऊनि आला दान निजतत्व निजबोध । स्वरूपीं मेळविलें नांव ठेविला भेद ॥ ३ ॥ शब्द हा वहुसार उपकाराची राशी । ह्मणोनि चालविला मागें येतील त्यांसीं । मागोनि आली वाट सिद्धओळीचि तैसी । तरले तरले[2] गा आणीक ही विश्वासी ॥ ४ ॥ वर्म तें एक आहे दृढ धरावा भाव । जाणिवनागवण नेदी[3] लागो ठाव । ह्मणोनि संग टाकी सेवीं अद्वैत भाव । तुका ह्मणे हा चि संतीं मागें केला उपाव ॥ ५ ॥

---

१ पं. माजी –२ पं. थोर –३ पं. माझे.

४२७. आंधळ्यापांगळ्यांचा एक विठोबा दाता। प्रसन्नला विश्व तो चि सर्व होय जाणता। घडी मोडी हेळामात्रें पापपुण्यसंचिता। भवदुःख कोण वारी तुजवांचुनि चिंता॥ १॥ ॥ ध्रु.॥ धर्म गा जागो तुझा तूं चि कृपाळू राजा। जाणसी जीवींचें गा न सांगतां सहजा॥ छ्रु॥ घातली लोळणी गा पुंडलीकें वाळवंटीं। पंढरी पुण्य ठाव नीरे भीवरे तटीं। न देखें दुसरें गा। जाली अदृश्यदृष्टी। बोळला प्रेमदाता केली अमृतदृष्टी॥ २॥ आणीक उपमन्यु एक बाळ धाकुटें। न देखे न चलवे जना चालते वाटे। घातली लोळणी गा हरिनाम बोभाटे। पावला त्याकारणें धांव घातली नेटें॥ ३॥ बैसोनि खेळी शुक राहे गर्भे[1] आंधळा। शीणला येरझारी दुःख आठवी[2] वेळा। मागील सोसिलें तें ना भीं ह्मणे गोपाळा। पावला त्याकारणें। लाज राखिली कळा॥ ४॥ न देखे जो या जना तया दावी आपणा। वेगळा सुखदुःखा मोहो सांडवी घना। आपपर तें ही नाहीं बंधुवर्ग सज्जना। तुकया ते चि परी जाली पावें नारायणा॥ ५॥

४२८. भगवंता तुजकारणें मेलों जीता चि कैसी। निष्काम[3] बुद्धी ठेली चळण नाहीं तयासी। न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी। जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी॥ १॥ ॥ ध्रु.॥ विठोबा दान दे गा तुज्या सारिखें नामा[4]। कीर्ति हे वाखाणिली थोर वाढली सीमा॥ छ्रु॥ भुक्ति मुक्ति तूं चि एक होसि सिद्धीचा दाता। ह्मणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता। सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां। कृपादान देई देवा येउनि सामोरा आतां॥ २॥ संसारसागरु गा भवदुःखाचें मूळ। जनवाद अंथरुण माजी केले इंगळ। इंद्रियें[5] वज्रघातें तपे उष्ण वरी जाळ। सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ॥ ३[6]॥ तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा। वेंघलों वरि खोडा भाव धरूनि टेंका। जाणवी नरनारी जागो धरम लोकां। पावती पुण्यवंत सोई आमुचिये[7] हाका॥ ४॥ नाठवे आपपर आतां काय बा करूं। सारिखा सोईसवा हारपला विचारु। घातला योगक्षेम तुज आपुला भारु। तुकया शरणागता देई अभयकरु॥ ५॥

## वासुदेव—अभंग ६.

४२९. मनु राजा एक देहपुरी। असे नांदतु त्यासि दोघी[8] नारी। पुत्र पौत्र संपन्न भारी। तेणें कृपा केली आह्मांवरी गा॥ १॥ ॥ ध्रु.॥ ह्मणउनि आलों या देशा। होतों नाहीं तरी भुललों दिशा। दाता तो[9] मज भेटला इच्छा। [10]येउनि मारग दाविला सरिसा गा॥ छ्रु॥ सवें घेउनि चौघेजण। आला कुमर

१ पं. गर्भी—२ पं. नाटवी—३ पं. नि.काम.—४ प. नावा—५ पं. इद्रिय.—६ त. दुर्भर चांडाळें—७ पं. आमुच्चिया.—८ पं. दोही—९ पं. तो चि.—१० पं. देउनि

सुलक्षण। कडे चुकवुनि कांटवण। ऐका आणिलीं तीं कोण कोण गा ॥ २ ॥ पुढें भक्तीनें धरिलें हातीं। मागें ज्ञान वैराग्य *धर्म येती। स्थिर केलीं जीं आचपळें होतीं। सिद्ध आणुनि लाविलीं पंथीं *गा ॥ ३ ॥ केले उपकार सांगों काय। बाप न करी ऐसी माय। धर्में त्याच्या देखियेले पाय। दिलें अखय भय *वारुनि दान गा ॥ ४ ॥ होतों पीडत हिंडतां गांव। पोट भरेना राहावया ठाव। तो येणें अवघा संदेह। ह्मणे फेडियेला तुकेयाचा बंधव गा ॥ ५ ॥

४३०. गातों वासुदेव मीं ऐका। चित्त ठेवुनि ठायीं भावें एका। डोळे झाकुनि रात्र करूं नका। काळ करीत बैसलो लेखा गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम राम स्मरा आधीं। लाहो करा गांठ घाला मूळबंदीं। सांडावा उगीया उपाधी। लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥ ध्रु ॥ ऐसा अल्प मानवी देह। शत गणिलें अर्ध रात्र खाय। पुढें बालत्व पीडा रोग क्षय। काय भजनासि उरलें तें पाहें गा ॥ २ ॥ क्षणभंगुर नाहीं भरवसा। व्हा रे सावध सोडों माया आशा। न चळे बळ पडेल मग फासा। पुढें हुशार थोर आहे वोळसा गा ॥ ३ ॥ कांहीं थोडें बहुत लागपाठ। करा भक्ति भाव धरा बळकट। तन मन ध्यान लावुनियां नीट। जर असेल करणें गोड शेवट गा ॥ ४ ॥ विनवितों सकळां जनां। कर जोडुनि थोरां लाहनां। दान इतुलें द्या मज दीना। ह्मणे तुकयावंधु राम ह्मणा गा ॥ ५ ॥

४३१. गेले टळले पाहार तीन। काय निदसुरा अझून। जागे होउनि करा कांहीं दान। नका ऐकोनि झाकों लोचन गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरी राम कृष्ण वासुदेवा। जाणवितसें जना। चिपळ्या टाळ हातीं मुखीं घोष। नारायणा गा ॥ ध्रु ॥ जें टाकेल कोणा कांहीं। फळ पुष्प अथवा तोयें। द्या परी मीस घेऊं नका भाई। पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥ २ ॥ देवाकारणें भाव तस्मात। द्यावें न लगे फारसें वित्त। जालें एक चित्त तरी बहुत। तेवढ्यासाठीं नका करूं वाताहात गा ॥ ३ ॥ आलों येथवरी बहु सायासें। करितां दान हें चि मागावयास। नका भार घेऊं करूं निरास। धर्म सारफळ संसारास गा ॥ ४ ॥ आतां मागुता येईल फेरा। हें तों न घडे या नगरा। ह्मणे तुकयावंधु घरा। ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ५ ॥

४३२. राम राम दोनी अक्षरें। सुलभ आणि सोपारें। जागा मागिले पाहारें। सेवटिंचें गोड तें चि खरें गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम कृष्ण वासुदेवा। जाणवी

१ पं. तुक्या बांधव.—२ पं. बैसला असे.—३ पं. अल्प आयुष्य.—४ पं. गणिलें तें.—५ पं. तोटा—६ पं. ध्यान वा—७ पं. एकों झाकोनि—८ पं. नामनारायणा गा.—९ पं. तोहे—१० पं. येवढ्या.—११ पं. तुक्या बंधु राम म्हण.—१२ पं. जाणवीतसें. * पं. हा शब्द नाहीं.

जनासि । वाजवी चिपळिया । टाळ घागऱ्याघोषें गा* ॥ ध्रु ॥ गाय वासुदेव वासुदेवा । भिन्न नाहीं आणिका नांवा । दान जाणोनियां करीं आवा । न ठेवीं उरीं कांहीं ठेवा गा ॥ २ ॥ एक वेळा जाणविती । धरूनियां राहा चित्तीं । नेघें भार सांडीं कामा हातीं । नीज घेऊनि फिरती गा ॥ ३ ॥ सुपात्रीं सर्व भाव । मी तों सर्व वासुदेव । जाणती कृपाळु संत महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ४ ॥ शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर । कीर्ति वाढे चराचर । तुका ह्मणे तया नमस्कार गा ॥ ५ ॥

४३३. बोल बोले अबोलणे । जागें बाहेर आंत निजेलें । कैसें घरांत घरकुल केलें । नेणों आंधार ना उजेडलें गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वासुदेव करितों फेरा । वाडियांत बाहेर दारा । कोणी कांहीं तरी दान करा । जाव नेदा तरी जातों समोरा गा ॥ ध्रु ॥ हातीं टाळ दिंडी मुखीं गाणें । गजर होतो बहु मोल्यानें । नाहीं निवडिलीं थोरलाहानें । नका निजों भिकेच्या भेणें गा ॥ २ ॥ मी वासुदेव तत्वता । कळों येईल विचारितां । आहे ठाउका सभाग्या संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥ ३ ॥ काय जागाचि निजलासी । सुनें जागोन दारापासीं । तुझ्या हितांपाठीं करी व्यास व्यासी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥ ४ ॥ ऐसें जागविलें अवघें जन । होतें संचित तींहीं केलें दान । तुका ह्मणे दुबळीं कोणकोण । गेलीं वासुदेवा विसरून गा ॥ ५ ॥

४३४. रामकृष्ण गीती गात । टाळ चिपळ्या वाजवीत । छंदें आपुलिया नाचत । नीज घेऊनि फिरत गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जनीं वनीं हा अवघा देव । वासनेचा हा पुसावा ठाव । मग बोळगती वासुदेव । ऐसा मनीं वसू द्यावा भाव गा ॥ ध्रु ॥ निज दासाची थोर आवडी । वासुदेवासि लागली गोडी । मुखीं नाम उच्चारी घडोघडीं । ऐसी करा हे वासुदेवजोडी गा ॥ २ ॥ अवघा सारूनि सेवट जाला । प्रयत्न न चले कांहीं केला । जागा होई सांडुनि झोपेला । दान देई वासुदेवाला गा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रे धन्य त्याचें जिणें । [11]जींहीं घातलें वासुदेवा दान । त्याला न लगे येणें जाणें । जालें वासुदेवीं राहणें गा ॥ ४ ॥

॥ ६ ॥

## गांवगुंड—अभंग १.

४३५. आह्मी जालों गांवगुंड । अवघ्या पुंड भूतांसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुसरें

---

१ त. वेचावें.—२ पं. सर्वत्र.—३ पं. वाढे कीर्ति.—४ पं. द्वारा.—५ पं. दान पुण्य करा.—६ पं. माघारा.—७ पं. मुखीं नाम गाणें.—८ पं. होतो गजर.—९ पं. सुनें जागऊनि दारापासीं.—१० पं. हितालागीं करसी व्यास व्यासी.—११ पं. जिहीं वासुदेवा केलें दान. * पं. हा शब्द नाहीं.

तें खेळों आलें । एका बोलें तो मियां ॥ धृ ॥ अवघियांचा येऊं लाग । नेदूं अंग शिवाया ॥ २ ॥ तुका ह्मणे खुंटूं नाद । जिंतूं वाद सतींनें ॥ ३ ॥

॥ १ ॥

## जोगी–अभंग १.

४३६. जग जोगी जग जोगी । जागजागे बोलती ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ जागता जगदेव । राखा कांहीं भाव ॥ धृ ॥ अवघा क्षेत्रपाळ । पूजों सकळ ॥ २ ॥ पूजापत्र कांहीं । फल पुष्प तोयें ॥ ३ ॥ बहुतां दिसां फेरा । आला या नगरा ॥ ४ ॥ नका घेऊं भार । धर्म तो चि सार ॥ ५ ॥ तुका मागे दान । द्यों जी अनन्य ॥ ६ ॥

॥ १ ॥

## सरवदा–अभंग १.

४३७. एका गा ए भाई । सरवदा सांगतो काई । येथें नाडेल माई । दोघां पुत्रांची । ते करिती तिची विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना । एक न मारितां शाहाणा । तो जाणा सुख न पवे ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ आणीक ऐका गा ए । सरवदा सांगतो काय । खरें चि* बोले तो जाय । नरकामध्यें अधोगती । हें चौघांच्या मुखें । मना आणावें सुखें । अवघीं चुकती दुःखें । खोटें बोला नरनारी ॥ धृ ॥ आणीक नाडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन । जागें माझें ह्मणोन । पडिलें खान तया घरीं । ह्मणोन न ह्मणा माझें कांहीं । निजीं निजा सुखें ठायीं । यत्न होईल तई । चोराठायीं विश्वास ॥ २ ॥ आणीक एकी परी । सरवदा सांगतो थोरी । दुःख पावेल नारी । पतिव्रता यामधीं । पांचांनीं दिधली हातीं । ह्मणोनि न मनावी निश्चिती । परपुरुषीं होय रती । सुखगती ते पावे ॥ ३ ॥ आणीक एकी परी । सरवदा सांगतो तें करीं । दान देतां जो न वारी । नव्हे भला भला तो । तुका ह्मणे आई । येथें नांव काई । सांगसी तें ठायीं । मरो रांडेचें ॥ ४ ॥

॥ १ ॥

## मुंढा–अभंग ३.

४३८. संवाल यारा उपर तलें दोन्हो मारकी चोट । नजर करे सो ही राखे पैंश्या जावे लुट ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ प्यॉर खुदाई रे बाबा जिकिर खुदाई ॥ धृ ॥ उडे कुदे ढुंग नचावे आगल भुलन प्यार । लडवड खडवड कांहेकां खचलावत भार ॥ २ ॥ कहे तुका चॅलो एका हम जिन्हेंके सात । मिलावे तो उसे देना तो ही चढावे हात ॥ ३ ॥

---

१ पं. जागे जागे –२ पं. पूजावा.–३ पं. तोई –४ पं. द्यावें –५ पं. माझे चित –६ पं. पश्या – ७ पं. प्यार खुदाई प्यार खुदाई प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई –८ पं. सुनो * पं. हा शब्द नाहीं.

४३९. सव संवाल भ्याने लैंढे खडा केऊं गुंग। मदिरथी मेता हुवा भुलि पाडी भंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपसकुं संवाल आपसकुं संवाल। मुंढे खुब राख ताल। मुथिवोहि बोला नहीं तो करूंगा हाल ॥ ध्रु ॥ आवलका तो पीछें नहीं मुदल विसर जाय। फिरते नहीं लाज रंडी गधे गोते खाय ॥ २ ॥ जिन्हो खातिर इतना होता सो नहीं तुझे वेफॉम। उचा जोरो लिया तुंबा तुंबा बुरा काम ॥ ३ ॥ निकल जावे चिकल जोरो मुंढे दिलदारी। जबानीकी छोड दे बात फिर एक तारी ॥ ४ ॥ कहे तुका फिसल रुका मेरेकों दान देख। पकड धका गांडगुडघी मार चलाऊं आलेख ॥ ५ ॥

४४०. आवल नाम आल्ला वडा लेते भुल न जाये। इलाम त्याकालजमुपरताही तुंब बजाये ॥ १ ॥ आल्ला एक तुं नवी एक तुं ॥ ध्रु ॥ काटतें सिर पावों हात नहीं जीव उराये। आगले देखे पिछले बुझे। आपें हजुर आयें ॥ २ ॥ सब सबरी नचाव भ्याने। खडा आपनी सात। हात पावों रखते जबाब। नहीं आगली बात ॥ ३ ॥ सुनो भाई बजार नहीं। सब हि निरचे लाव। नन्हा बडा नहीं कोये एक ठेर मिलाव ॥ ४ ॥ एक तार नहीं प्यार। जीवतनकी आस। कहे तुका सो हि मुंढा। राखलिये पायेनपास ॥ ५ ॥

॥ ३ ॥

## डोई फोडा—अभंग १.

४४१. तम भज्याय ते बुरा जिकीर ते करे। सीर काटे ऊर कुटे ताहां सब डरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ताहां एक तु ही ताहां एक तु ही। ताहां एक तु ही रे बाबा हमें तुझें नहीं ॥ ध्रु ॥ दिदार देखो भुले नहीं किशे पछाने कोये। सचा नहीं पकडुं सके झुटा झुटे रोये ॥ २ ॥ किसे कहे मेरा किन्हे सात लिया भास। नहीं मेलो मिले जीवना झुटा किया नास ॥ ३ ॥ सुनो भाई कैसा तो ही। होय तैसा होय। बाट खाना आल्ला कहना एकबारां तो ही ॥ ४ ॥ भला लिया भेक मुंढे। आपना नफा देख। कहे तुका सो ही संका। हाक आल्ला एक ॥ ५ ॥

॥ १ ॥

## मलंग—अभंग १.

४४२. नजर करे सो हि* जिंके बाबा दुरथी तमासा देख। लकडी फांसा लेकर बैठा आगले ठकण भेख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काहे भुला एक देखत आंखो मार तडांगो बाजार ॥ ध्रु ॥ दमरी चमरी जो नर भुला। सोत आघो हि लत

१ पं. महा –२ त. अपसकु संवाल मुंढे खुब राख ताल –३ पं. आवल तो.–४ पं. वेकाम.– ५ पं. जोरा –६ पं. मेरेको तो. त. मेरेका. * पं. हा शब्द नाहीं.

खाये ॥ २ ॥ नहि बुलावत किसे बाबा आप हि मत जाये । कहे तुका उस असाके संग फिरफिर गोदे खाये ॥ ३ ॥

॥ १ ॥

## दरवेस—अभंग १.

४४३. अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज । गाउ वछरे तिस चलावे यारी बाघो न सात ॥ १ ॥ ख्याल मेरा साहेबका । बाबा हुवा करतार । व्हांटें आघे चढे पीठ । आपे हुवा असवार ॥ २ ॥ जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्यां अंदर भेस । कहे तुका जो नर बुझे सो हि भया दरवेस ॥ ३ ॥

॥ १ ॥

## वैद्यगोळी—अभंग १.

४४४. अल्ला देवे अल्ला दिलावे अल्ला दारु अल्ला खिलावे । अल्ला बगर नही कोये अल्ला करे सो हि होये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मर्द होये वो खडा फीर नामर्दकुं नहीं धीर । आपने दिलकुं करना खुसी तीन दामकी क्या खुमासी ॥ छ्र ॥ सब रसोंका किया मार । भजनगोली एक हि सार । इमॉन तो सब ही सखा । थोडी तो भी लेकर ज्या ॥ २ ॥ जिन्हो पास नीत सोये । वो हि बसकर तिरोवे । सांतो पांचो मार चलावे । उतार सों पीछे खावे ॥ ३ ॥ सब ज्वानी निकल जावे । पीछे गधडा मटी खावे । गांवढाळ सो क्या लेवे । हगवनि भरी नाहि धोवे ॥ ४ ॥ मेरी दारु जिन्हें खाया । दिदार दरगां सो हि पाया । तल्हे मुंढी घाल जावे । विगारी सोवे क्या लेवे ॥ ५ ॥ बजारका बुझे भाव । वो हि पुसता आवे ठाव । फुकट बाटु कहे तुका । लेवे सोहि लें हिर्सखा ॥ ६ ॥

॥ १ ॥

## गोंधळ—अभंग ३.

४४५. राजस सुंदर बाळा । पाहों आलिया सकळा वो । बिंबीं बिंबोनि ठेली । माझी परब्रह्म वेल्हाळा वो । कोटि रविशशि मांझी । परब्रह्म वेल्हाळा वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राजस विठाबाई । माझें ध्यान तुझे पायीं वो । त्यजुनियां चौघींसी । लावी आपुलिये सोई वो ॥ छ्र ॥ सकुमार साजिरी । कैसीं पाउलें गोजिरीं वो । कंठीं तुळसीमाळा । उभी भीवरेच्या तिरीं वो । दंत हिरया ज्योति । शंखचक्र मिरवे करीं वो ॥ २ ॥ निर्गुण निराकार । वेदां न कळे चि आकार वो । शेषादिक श्रमले ।

---

१ पं. गोते.–२ पं. शिरताज –३ दे. असुवार न. असिवार.–४ दे. त. खलावे –५ पं. क. इनाम. त. विमान.–६ पं. लगावे.–क. ललावे –७ त. तो.–८ त. पं. लेवे सखा.–९ पं. कोटि रविशशिप्रभा लोपल्या सकळा वो –१० पं. चौघासी.

श्रुती न कळे तुझा पार वो । उभारोनि बाहे । भक्तां देत अभयकर वो ॥ ३ ॥ येऊनि पंढरपुरा । अवतरली सारंगधरा वो । देखोनि भक्ति भाव । वोरसली अमृतधारा वो । देऊनि प्रेमपान्हा । तुकया स्वामीनें किंकरा वो ॥ ४ ॥

४४६. सुदिन सुवेळ । तुझा मांडिला गोंधळ वो । पंच प्राण दिवटे । दोनी नेत्रांचे हिलाल वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरपुरनिवासे । तुझे रंगीं[1] नाचत असें वो । नवस पुरवीं माझा । मनिंची जाणोनियां इच्छा वो ॥ ध्रु ॥ मांडिला देव्हारा । तुझा त्रिभुवनामाझारी वो । चौक साधियेला । नाभिकळस ठेविला वरी वो ॥ २ ॥ बैसली देवता । पुढें वैष्णवाचें गाणें वो । उद्गारें गर्जती । कंठीं तुळसीचीं भूषणें[2] वो ॥ ३ ॥ स्वानंदाचे ताटीं । धूप दीप पंचारती वो । ओवाळिली माता । विठाबाई पंचभूतीं वो ॥ ४ ॥ तुझें तुज पावलें । माझा नवस पुरवीं आतां वो । तुका ह्मणे राखें । आपुलिया शरणागता वो ॥ ५ ॥

४४७. सुंदर मुख साजिरें । कुंडलें मनोहर गोमटीं वो । नागर नाग खोपा । केशर कस्तुरी मळवटीं वो । विशाळ व्यंकट नेत्र । वैजयंती तळपे कंठीं वो । कास पीतांबराची । चंदन सुगंध साजे उटी वो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अतिबरवंटा बाळा । आली सुलक्षणीं[3] गोंधळा वो । राजस तेजोराशी । मिरवी शिरोमणी वेल्हाळा वो । कोटि रविशशिप्रभा लोपल्या सकळा वो । न कळे ब्रह्मादिकां । अनुपम्य इची लीळा वो ॥ ध्रु ॥ सावळी सकुमार । गोरी भुजा शोभती चारी वो । सखोल वक्षस्थळ । सुढाळ पदक झळके वरी वो । कटीं क्षुद्र घंटिका । शब्द करिताती माधुरी वो । गर्जत चरणीं वाकी । अभिनव संगीत नृत्य करी वो ॥ २ ॥ अष्टांगें[4] मंडित काय । वर्णावी रूपठेवणी वो । *शोधिव सुंदर रसाची ओतिली । सुगंध लावण्यखाणी वो । सर्वकळासंपन्न । मंजुळ बोले हास्यवदनीं वो । बहु रूपें नटली । आदिशक्ति नारायणी वो ॥ ३ ॥ घटस्थापना केली । पंढरपुरमहानगरीं वो । अस्मानी मंडप दिला । तिन्ही ताळांवरी वो । आरंभिला गोंधळ इनें । चंद्रभागेतिरीं वो । आली भक्तिकाजा । कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥ ४ ॥ तेहतिस कोटि देव । चामुंडा[5] अष्ट कोटि भैरव वो । आरत्या कुरवंड्या । करिती पुष्पांचा वरुषाव वो । नारद तुंबर गायन । ब्रह्मानंद[6] करिती गंधर्व वो । वंदी चरणरज तेथें । तुकयाचा बंधव वो ॥ ५ ॥

४४८. शंख करिशी ज्याच्या नांवें । त्याचें तुज नाहीं ठावें । ऐक सांगतों एका भावें । सांपडे घरीं तें जीवऊनि खावें । रे विठ्ठल ॥ १ ॥ दिले माळा करंडी सोंग । धरुनि चाळविलें जग । पसरी हात नाहीं त्याग । दावी दगड पुजी भैंग[7] । रे विठ्ठल ॥ २ ॥ राख लावुनि अंग मळी । वाये ठोके मी एक बळी । वासने हातीं

१ पं. रंगणीं.–२ पं. भूषण –३ पं. सुल्क्षणा. त. सुलक्षणी.–४ पं. अष्टांगीं.–५ दे. क. त. चौंडा.–
६ पं. ब्रह्मानंदें.–७ क. भगल. * पं. ही पंक्ती नाहीं.

बांधवी नळी । त्यासि येउनि गिळी । रे विठ्ठल ॥ ३ ॥ कोण तें राहडीचें सुख । वरते पाय हारतें मुख । करवी पीडा भोगवी दुःख । पडे नरकीं परी न पळे चि मूर्ख । रे विठ्ठल ॥ ४ ॥ सिकला फाक मारी हाका । रांडा पोरें मेळवी लोकां । विटंवी शरीर मागे रुका । केलें तें गेलें अवघें चि फुका । रे विठ्ठल ॥ ५ ॥ कळावें जनां मी एक बळी । उभा राहोनि मांडी फळी । फोडोनि गुडघे कोंपर चोळी । आपला घात करोनि आपण चि तळमळे । रे विठ्ठल ॥ ६ ॥ फुकट खेळें ठकलीं वांयां । धरुनि सोंग बोडक्या डोया । शिवों नये ती अंतरीं माया । संपादणीविण विटंबिली काया । रे विठ्ठल ॥ ७ ॥ धुळी माती कांहीं खेळों च नका । जवादी चंदन घ्यावा बुका । आपणा परिमळ आणिकां लोकां । मोलाची महिमा फजिती फुका । रे विठ्ठल ॥ ८ ॥ बहुत दुःखी जालियां खेळें । अंगीं बुद्धि नाहींत बळें । पाठीवरी तोबा तोंड काळें । रसना द्रवे उपस्थाच्या सुळें । रे विठ्ठल ॥ ९ ॥ काय सांगतो तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं अवघों च नका । चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका । धाल्यावरी बरा टाकमटिका । रे विठ्ठल ॥ १० ॥

४४९. ऐक बाई तुज वो कांहीं सांगतें शकुन । निजलिया भुर होसी जागें ह्मणउन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मान्य माझें केलें सांगतें एका बोलें । न येतां हे भलें कळों कोणा लोकांसि ॥ ध्रु ॥ सांगतें गुण जीवीची खुण ऐक माझी मात । बैस एका भावें माझे हातीं दे वो हात ॥ २ ॥ बरवा घरचार तुज सांपडला ठाव । फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥ ३ ॥ आहे तुझे हातीं एका नवसाचें फळ । भावा करीं साह्य चहूं अठरांच्या बळें ॥ ४ ॥ करीं लागपाठ चित्त वित्त नको पाहों । अखई तो चुडा तुज भोगईल ना हो ॥ ५ ॥ कुळींची हे मुळी तुझे लागलीसे देवी । पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ॥ ६ ॥ तुका ह्मणे नांद सुखें धरीं आठवण । माझ्या येतीं[2] कोणी त्यांचा राख बरा मान ॥ ७ ॥

## कावडे—अभंग ५.

४५०. आहा[3] रे भाई । प्रथम नमूं तो विनायक । ठेवुनि गुरुचरणीं मस्तक । वदेल प्रसादिक वाणी । हरिहरांचे पवाडे ॥ १ ॥ माझी ऐसी ब्रीदावळी । दासें दासत्वें आगळी । पान्हेरीनें मार्ग मळी । जीवन घ्या रे कापडि हो ॥ २ ॥ जें या सीतळाहुनि सीतळ । पातळाहुनि जें पातळ । प्रेमामृत रसाळ । तें हें सेवा अहो

१ पं. सागतों.—२ पं. येथील.—३ पं. या मुद्दा पुढील पाच अभगांत "आहा आहारे भाई." असा पाठ आहे. क. पांचही ठिकाणीं मुळीं नसतां नवीन "आहा" असा शब्द घातला आहे. त. दे. "आहारे भाई" असेंच सर्वत्र आहे. परंतु दे. ५१ व्या अभगाच्या आरंभींगात्र "आहा आहारे भाई" असें आहे.—४ पं. जें सीतळाहुनि सीतळ । पातळाहुनि पातळ । तें सेवा अहो भाग्याचे नो ॥

भाग्याचे ॥ ३ ॥ जिंकाल तरी जिंका रे अभिमान। दवडाल तरी दवडा लज्जा आणि मान। धराल ते धरा शंभूचे चरण। दावाल पण ऐसा दावा तो ॥ ४ ॥ काळा घेऊं नेदीं वाव। आला तो राखें घावडाव। शुद्ध सत्वीं राखोनि भाव। ह्मणा महादेव हरिहर वाणी गर्जो द्या ॥ ५ ॥ पराविया नारी माउली समान। परधनीं वाटों नेदीं मन। जीवित्व तें तृणासमान। स्वामिकाजीं जाण शूर ह्मणों तया ॥ ६ ॥ शक्ति वेचाविया परउपकारा। खोटें खोळ्याचा पसारा। सत्य तें भवनदीचा तारा। आळस तो न करा येथें अहो सांगतों[1] ॥ ७ ॥ व्रत करा एकादशी सोमवार। कथा पूजन हरिजागर। पुण्य तें असे गातां नाचतां बहु फार। पुन्हा बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥ ८ ॥ संग संतांचा करितां बरवा। उत्तमोत्तम कीर्तीचा ठेवा। पंथ तो सुपंथें चालावा। उगवा वासना लिगाड ॥ ९ ॥ तुका चालवितो कावडी। प्रवृत्ति निवृत्ति चोखडी। पुढती[2] पुढती अधिक गोडी। भरुनि कळस[3] भजन आवडी केशवदास नटतसे ॥ १० ॥

४५१. आहा आहा रे भाई। हें अन्नदानाचें सत्र। पव्हे घातली सर्वत्र। पंथीं अवघे पंथ मात्र। इच्छाभोजनाचें आर्त पुरवावया ॥ १ ॥ यावें तेणें घ्यावें। न सरेसें केलें सदाशिवें। पात्र शुद्ध पाहिजे बरवें। मंगळभावें सकळ हरि[4] ह्मणा रे ॥ २ ॥ नव्हे हें कांहीं मोकळें। साक्षी[5] चौघांचिया वेगळें। नेदी नाचों मताचिया बळें। अणु[6] अणोरणीया आगळें। महदि महदा साक्षित्वें हरि ह्मणा रे ॥ ३ ॥ हे हरि नामाची आंबिली। जगा पोटभरी केली। विश्रांति कल्पतरूची साउली। सकळां वर्णां सेवितां भली। ह्मणा हर हर महादेव ॥ ४ ॥ तुका हरिदास तराळ। अवघे हाकारी सकळ। या रे वंदूं शिखरातळ। चैत्रमास पर्वकाळ महादेवदर्शनें ॥ ५ ॥

४५२. आहा रे भाई। नमो उदासीन जाले देहभावा। आळविती देवा तया नमो ॥ १ ॥ नमो तीर्थपंथें चालती तयांसी। येती त्यांसी बोळविती[7] त्यां नमो ॥ २ ॥ नमो तयां संतवचनीं विश्वास। नमो भावें दास्य गुरुचें त्यां ॥ ३ ॥ नमो तया मातापित्यांचें पाळण। नमो त्या वचन सत्य वदे ॥ ४ ॥ नमो तया जाणे आणिकाचें सुखदुःख। राखे तान[8] भुक तया नमो ॥ ५ ॥ परोपकारी नमो पुण्यवंता। नमो त्या दमित्या[9] इंद्रियांसि ॥ ६ ॥ तुका ह्मणे नमो हरिचिया दासा। तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥ ७ ॥

---

१ दे. क. सागेतो.–२ पं. पुडती पुडती.–३ त. भजन कळस.–४ पं. हरिह्मणा रे हरिह्मणा.–
५ पं. साक्ष.–६ पं. आनु आणोरणीया.–७ पं. येती बोळवीत तयासि नमो.–८ पं. तहान–९ पं. दमी.

४५३. आहा रे भाई । तयावरी माझी ब्रीदावळी । भ्रष्ट ये कळी क्रियाहीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी । वाणिली ते थेरी दवडा वांयां बाहेरी ॥ ध्रु ॥ बाइलेचा दास पित्रांस उदास । भीक भिकाऱ्यास नये दारा ॥ २ ॥ विद्याबळें वाद सांगोनियां छळी । आणिकांसि फळी मांडोनियां ॥ ३ ॥ गांविंचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत घडे चि ना ॥ ४ ॥ [2]सदा सर्वकाळ करितो चि निंदा । स्वप्नीं ही गोविंदा आठवीना ॥ ५ ॥ खासेमध्यें धन पोटासि बंधन । नेणें ऐसा दानधर्म कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे नटे दावुनियां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥ ७ ॥

४५४. आहा रे भाई । गंगा नव्हे जळ । वृक्ष नव्हे वड पिंपळ । तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ । श्रेष्ठ तनु देवाचिया ॥ १ ॥ समुद्र नदी नव्हे पैं गा । पाषाण ह्मणों नये लिंगा । संत नव्हती जगा । मानसा त्या सारिखे ॥ २ ॥ काठी ह्मणों नये वेतु । अन्न ह्मणों नये सांतु । राम राम हे मातु । नये ह्मणों शब्द हे ॥ ३ ॥ चंद्र सूर्य नव्हती तारांगणें । मेरु तो* नव्हे पर्वता समान । शेष [3]वासुकी नव्हे सर्प जाण । विखाराच्या सारिखे ॥ ४ ॥ गरुड नव्हे पाखरूं । ढोर नव्हे नंदिकेश्वरू । झाड नव्हे कल्पतरू । कामधेनु गाय न ह्मणावी ॥ ५ ॥ कूर्म नव्हे कासव । डुकर नव्हे वराह । ब्रह्मा नव्हे जीव । स्त्री नव्हे लक्ष्मी ॥ ६ ॥ गवाक्ष नव्हे हाड । पाटाव नव्हे कापड । परीस नव्हे दगड । सगुण ते ईश्वरीचे ॥ ७ ॥ सोनें नव्हे धातु । मीठ नव्हे रेतु । नाहीं नाहीं चर्मांतु । कृष्णाजिन व्याघ्रांवर ॥ ८ ॥ मुक्ताफळें नव्हेति गारा । खड्याऐसा नव्हे हिरा । जीव नव्हे सोइरा । बोलवीजे स्वइच्छेनें ॥ ९ ॥ गांव नव्हे द्वारावती । रणसोड नव्हे मूर्ति । तीर्थ नव्हे गोमती । मोक्ष घडे दर्शनें ॥ १० ॥ कृष्ण नव्हे भोगी । शंकर नव्हे जोगी । तुका पांडुरंगीं । हा प्रसाद लाधला ॥ ११ ॥

॥ ५ ॥

## सौऱ्या-अभंग ११.

४५५. वेसन गेलें निष्काम जालें नर नव्हे नारी । आपल्या तुटी पारख्या भेटी सौरियांचे फेरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा वेध लागला छंद हरि गोविंद वेळोवेळां । आपुलेमागें हासत रागें सावळें घालिती गळां ॥ ध्रु ॥ जन वेपा भीतें तोंडा आमुच्या भांडपणा । कर कटीं भीमा तटीं पंढरीचा राणा ॥ २ ॥ वेगळ्या याति पडिलों खंतीं अवघ्या एका भावें । टाकियेली चाड देहभाव जीवें शिवें ॥ ३ ॥

१ पं. क. करुनियां.–२ पं. क. सर्व काळ करी संताचिया निंदा.–३ पं. वासुगी. * पं. हा शब्द नाहीं.

सकळांमधीं आगळी बुद्धि तिची करूं सेवा । वाय[1] तुंबामूढासवें भक्ती नाचों भावा ॥ ४ ॥ ह्मणे तुका टाक रुका नाचों निर्लज्जा । बहु जालें सुख कांम[2] चुकलों या काजा ॥ ५ ॥

४५६. आणिकां उपदेशूं नेणें नाचों आपण । मुंढा[3] वांयां मारगेली वांयां हांसे जन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा । पुढिलांच्या कळा कवतुक जाणोनी ॥ ध्रु ॥ बाहिरल्या वेषें आंत जसें तसें । झाकलें तों बरें पोट भरे तेणें मिसें ॥ २ ॥ तुका ह्मणे केला तरी करीं शुद्ध भाव । नाहीं तरी जासी वांयां हा ना तोसा ठाव ॥ ३ ॥

४५७. टाक रुका चाल रांडे कां गे केली गोवी । पुसोनियां आलें ठाव ह्मणोनि देतें सिवी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां येणें छंदें नाचों विनोदें । नाहीं या गोविंदें माझें मजसी केलें ॥ ध्रु ॥ कोरडे ते बोल कांगे वेचितेसी वांयां । वर्ते करूनि दावीं तुझ्या मुळींचिया ठाया ॥ २ ॥ याजसाठीं म्या डौर धरियेला हातीं । तुका ह्मणे तुह्मा गांठी सोडायाची खंती ॥ ३ ॥

४५८. मोकळी गुंते रिती कुंथे नाहीं भार दावें । धेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका बाई लाज नाहीं[4] आणिकां त्या गरतीची । समाधानीं उंच स्थानीं जोंणे[5] सेवा पतीची ॥ ध्रु ॥ न बोलतां करी चिंता न मारितां पळे । दादला सेज नावडे निजे जगझोडीचे चाळे ॥ २ ॥ देखत आंध बहिर कानीं बोल बोलतां मुकें । तुका ह्मणे पतन सोयरीं ऐसीं जालीं एकें ॥ ३ ॥

४५९. सातें चला काजळ घाला तेल फणी करा । दिवाणदारीं बैसले पारीं नाचों फेर धरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या साहेबाचें जालें देणें वेळोवेळां न लगे येणें । आतां हाटीं काशासाठीं हिंडों पाटी दुकानें ॥ ध्रु ॥ अवघ्या जणी मुंढा धणी नाचों एकें घाईं । सरसावलें सुख कैसा चाळा एके ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बोळगों एका तोड चिंता माया । देऊं उद्गार आतां जाऊं मुळींचिया ठाया ॥ ३ ॥

४६०. सौरी सुर जालें दुर डौर घेतला हातीं । माया मोह सांडवलें तीही लोकीं जालें सरती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाल विठाबाई अवघी पांज[6] देई । न धरीं गुज कांहीं वाळवंटीं सांपडतां ॥ ध्रु ॥ हिंडोनि चौऱ्याशी घरें आलें तुझ्या दारा । एक्या रुक्यासाठीं आंचवलें संसारा ॥ २ ॥ लाज मेली शंका गेली नाचों

१ पं. क. वायें.–२ पं. कामें चुकले.–३ पं. मुडा. क. मुढा.–४ पं. कांहीं.–५ पं. सेवा जाणे.–
६ पं. पाच.

महाद्वारीं । भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां कैची उरी ॥ ३ ॥ जालें भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड । घालीन चरणीं मिठी पुरविन जिवींचें तें कोड ॥ ४ ॥ तुका ह्मणे रुका करी संसारतुटी । आतां तुह्मां आह्मां कैसी जाली जीवें साटीं ॥ ५ ॥

४६१. सम सपाट वेसनकाट निःसंग जालें सौरी । कुडपीयेला देश आतां येऊं नेदीं दुसरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाऊं रघुरामा हें चि उरलें आह्मां । नाहीं जीवतमा वित्तगोतासहीत ॥ ध्रु० ॥ ठाव जाला रिता झाकुनि काय आतां । कोणासवें लाज कोण दुजा पाहता ॥ २ ॥ सौरीयांचा संग आह्मां दुरावलें जग । भिन्न जालें सुख भाव पालटला रंग ॥ ३ ॥ लाज भय ह्मणी नाहीं ताजियेलीं दोन्हीं । फिराविला वेष नव्हों कोणाचीं च कोणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे हा आह्मां वेष दिला जेणें । जनाप्रेंचित[1] सर्वे असों एकपणें ॥ ५ ॥

४६२. नव्हे नरनारी संवसारीं अंतरलों । निर्लज्ज निष्काम जना वेगळे चि ठेलों[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाल रघुरामा ने आपुल्या गांवा । तुजविण आह्मां कोण सोयरा सांगाती ॥ ध्रु० ॥ जनवाद लोकनिंद्य पिशुनाचे चेरे । सौंहूं[3] तुजसाठीं अंतरलीं सहोदरें ॥ २ ॥ बहुता पाठीं निरोप हाटीं पाठविला तुज । तुका ह्मणे आतां सांडुनि लौकिक लाज ॥ ३ ॥

४६३. नीट पाट करूनि थाट । दावीतसे तोरा । आपणाकडे पाहो कोणी । निघाली बाजारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते सौरी नव्हे निकी । भक्तीविण फिकी ॥ ध्रु० ॥ चांग भांग करूनि सोंग । दावी माळा मुदी । रुक्याची आस धरूनि । हालवी ती फुदी ॥ २ ॥ थोरे घरीं करी फेरी । तेथें नाचे बरी । जेथें निघे रुका । तेथें हालवी टिरी ॥ ३ ॥ आंत मांग बाहेर चांग । सौरी ती नव्हे तेग । तुका दास नटतसे । न करी त्याचा संग ॥ ४ ॥

४६४. चाल माझ्या राघो । डोंगरीं दिवा लागो ॥ ध्रु० ॥ घर केलें दार केलें । घरीं नाहीं वरो । सेजारणी पापिणीचीं पांच पोरें मरो ॥ १ ॥ घरीं पांच पोरें । तीं मजहुनि आहेत थोरें । पांचांच्या वळें । खादलीं बावन केळें ॥ २ ॥ घर केलें दार केलें । दुकान केला मोटा । पाटाची राणी धांगडधिंगा तिचा मोटा ॥ ३ ॥ दुकान केला मोटा । तर पदरीं रुका खोटा । हिजडा ह्मणसी जोगी । तर सोळा सहस्र भोगी । तुका ह्मणे वेगीं । तर हरि ह्मणा जगीं ॥ ४ ॥

४६५. जन्मा आलिया गेलिया परी । भक्ति नाहीं केली । माझें माझें ह्मणोनियां । गुंतगुंतों मेलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें कांहीं नाहीं । लव गुरूच्या पायीं ।

---

१ पं. जनाप्रति सर्वे —२ त. जालों —३ पं. साऊं

चाल रांडे टाकीं रुका । नको करूं बोल । गुरुविण मार्ग नाहीं । करिसी तें फोल ॥ २ ॥ खाउनी जेउनि लेउनि नेसुनि । ह्मणती आह्मी वऱ्या । साधु संत घरा आल्या । होती पाठमोऱ्या ॥ ३ ॥ वाचोनि पढोनि जाले शाहणे । ह्मणती आह्मी संत । परनारी देखोनि त्यांचें । चंचळ जालें चित्त ॥ ४ ॥ टिळा टोपी घालुनि माळा । ह्मणती आह्मी साधु । दयाधर्म चित्तीं नाहीं । ते जाणावे भोंदु ॥ ५ ॥ कलियुगीं घरोघरीं । संत जाले फार । वीतिभरी पोटासाठीं । हिंडती दारोदार ॥ ६ ॥ संत ह्मणती केली निंदा । निंदा नव्हे भाई । तुका असे अनन्यें भावें शरण संतां पायीं ॥ ७ ॥

॥ ११ ॥

## वाघा–अभंग १.

४६६. अनंत जुगाचा देव्हारा । निजबोधांचा घुमारा । अवचिता भरला वारा । या मल्लारी देवाचा ॥ १ ॥ शुद्धसत्त्वाचा कवडा मोठा । बोधबिरडें बांधला गांठा । गळां वैराग्याचा पट्टा । वाटा दावूं या भक्तीच्या ॥ २ ॥ हृदय कोटंबा सांगातें । घोळ वाजवूं अनुहातें । ज्ञानभंडाराचें पोतें । रितें नव्हे कल्पांतीं ॥ ३ ॥ लक्ष चौऱ्याशीं घरें चारी । या जन्माची केली वारी । प्रसन्न जाला देव मल्लारी । सोहंभावीं राहिलों ॥ ४ ॥ या देवाचें भरतां वारें । अंगीं प्रेमाचें फेंपरें । गुरुगुरु करी वेडे चारें । पाहा तुकें भुंकविलें[1] ॥ ५ ॥

॥ १ ॥

## लळित–अभंग ११.

४६७. आजी दिवस जाला । धन्य सोनियाचा भला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालें संताचे पंगती । बरवें भोजन निगुती ॥ ध्रु ॥ रामकृष्णनामें । बरवीं मोहियेलीं प्रेमें ॥ २ ॥ तुका ह्मणे आला । चवी रसाळ हा काला ॥ ३ ॥

४६८. तुह्मी तैरी[2] सांगा कांहीं । आह्मांविशीं रखुमाबाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं उरलें तें ठायीं । वेगीं पाठवुनी देईं ॥ ध्रु ॥ टोकत बैसलों देखा । इच्छीतसें ग्रासा एका ॥ २ ॥ प्रेम देउनि बहुडा जाला । तुका ह्मणे विठ्ठल बोला ॥ ३ ॥

४६९. वाट पाहें बाहे निडळीं ठेवुनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागलें चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कईं येतां देखें माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥ ध्रु ॥ डावा डोळा लवे उजवी स्फुरते बाहे । मन उतावीळ भाव सांडुनियां देहे ॥ २ ॥ सुखसेजे गोडचित्तीं न लगे आणीक । नाठवे घर दार

१ पं. तुका भुकविला. क. तुका भुकविलें –२ पं. तरी वो.

तीन पळाली भूक ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य दिवस ऐसा तो कोण । पंढरीचे वाटे येतां मूळ देखेन ॥ ४ ॥

४७०. तुझें दास्य करूं आणिका मागों खावया । धिग्[2] जालें जिणें माझें पंढरीराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय गा विठोबा तुज[3] ह्मणावें । थोरींच्या दैवें गोड शुभअशुभ ॥ ध्रु ॥ संसाराचा धाक निरंतर आह्मांसी । मरण भलें परि काय अवकळा तैसी ॥ २ ॥ तुझे शरणागत शरण जाऊं आणिकांसी । तुका ह्मणे कवणा लाज हें कां नेणसी ॥ ३ ॥

४७१. पुरविली आळी । जे जे केली ते ते काळीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माय तरी ऐसी सांगा । कृपाळुवा पांडुरंगा ॥ ध्रु ॥ घेतलें नुतरी उचलोनि कडियेवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

४७२. कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥ ध्रु ॥ आयुष्य करीं उणें । परी मज आवडो कीर्तन ॥ २ ॥ तुका ह्मणे हाणी । या वेगळी मना नाणीं ॥ ३ ॥

४७३. गळित जाली काया । हें चि लळित पंढरिराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलें अवसानापासीं । रूप राहिलें मानसीं ॥ ध्रु ॥ वाइला कळस । तेथें स्थिरावला रस ॥ २ ॥ तुका ह्मणे गोड जालें । नारायणीं पोट धालें ॥ ३ ॥

४७४. रत्नजडित सिंहासन । वरी बैसले आपण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळी रखुमाई राही ॥ ध्रु ॥ नाना उपचारीं । सिद्धि वोळगती कामारी ॥ २ ॥ हातीं घेऊनि पादुका । उभा बंदिजन तुका ॥ ३ ॥

४७५. हिरा शोभला कोंदणीं । जडित माणिकांची खाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥ ध्रु ॥ कोटि चंद्रलीळा । पूर्णिमेच्या पूर्णकळा ॥ २ ॥ तुका ह्मणे दृष्टि धाये । परतोनि माघारी ते न ये ॥ ३ ॥

४७६. पतित पतित । परी मी त्रिवाचा पतित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परी तूं आपुलिया सत्ता । मज करावें सरता ॥ ध्रु ॥ नाहीं चित्तशुद्धि । स्थिर पायांपाशीं बुद्धि ॥ २ ॥ अपराधाचा केलों । तुका ह्मणे किती बोलों ॥ ३ ॥

४७७. उभारिला हात । जगीं जाणविली मात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव बैसले सिंहासनीं । आल्या याचका होयें[11] धनी ॥ ध्रु ॥ एकाच्या कैवाडें । उगवे बहुतांचें कोडें ॥ २ ॥ दोहीं ठायीं तुका । नाहीं पडों देत चुका ॥ ३ ॥

॥ ११ ॥

---

१ पं. ताहान हारपली.—२ पं. धन्य जिणें जालें—३ पं. तुज आता.—४ पं. शुभाशुभ गोड तुह्मां थोरांच्या दैवें—५ पं. ऐसी.—६ पं. तुका ह्मणे लाज हे का कवणा नेणसी.—७ पं. त. सामोग्री. दे. सामुग्री.—८ पं. न आणी.—९ पं. राही रखुमाई.—१० पं. चंदकळा.—११ पं. पुरे.

## आशीर्वाद—अभंग ५.

४७८. जीवेंसाटीं यत्नभाव । त्याची नाव वळकट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पैल तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥ ध्रु. ॥ विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥ ३ ॥

४७९. आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कल्याण तें[1] असे क्षेम । वाढे प्रेम आगळें ॥ ध्रु. ॥ भक्तिभाग्यगांठी धन । त्या नमन जीवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥ ३ ॥

४८०. तया साटीं वेंचूं वाणी । अइकों कानीं बारता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षेम माझे हरिजन । समाधान पुसतां त्यां ॥ ध्रु. ॥ परत्रींचे जे[2] सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे धैर्यवंतें । निर्मळचित्तें सर्वीं[3] तीं ॥ ३ ॥

४८१. अभय उत्तर संतीं केलें दान । जालें समाधान चित्त तेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । द्यावें कृपादान नारायणा ॥ ध्रु. ॥ आलें जें उचित देहत्रिभागासी । तेणें पायांपासीं उभीं असों ॥ २ ॥ तुका ह्मणे करी पूजन वैखरी । वोवडा उत्तरीं गातों गीत ॥ ३ ॥

४८२. असो मंत्रहीन क्रिया । नैंका[4] चर्या विचारूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ ध्रु. ॥ विचारूनि ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥ २ ॥ आतां तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ३ ॥

॥ ५ ॥

४८३. ऐकें[5] वचन कमळापती । मज रंकाची विनंती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर जोडितों कथाकाळीं । आपण असावें जवळी ॥ ध्रु. ॥ घेईं[6] ऐसी भाक । मागेन जरि कांहीं आणिक ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे देवा । शब्द इतुका[7] राखावा ॥ ३ ॥

४८४. आली ललिताची वेळ । असा सावध सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाहो करा वेगीं स्मरा । टाळी वांउनि[8] विश्वंभरा ॥ ध्रु. ॥ जालिया अवसान । न संपडती चरण ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे थोडे[9] । अवधि उरली आहे पुढें ॥ ३ ॥

४८५. नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनेंसहित आलों शरण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं अंगीकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रिदें करावीं खरीं ॥ ध्रु. ॥ नेणें भक्तिभाव तुझा ह्मणवितों दास । जरि देसी अंतर

१ दे. त. ती असो.—२ पं. ते.—३ पं. तीं एक.—४ दे. त. नको.—५ पं. वचन ऐका.—६ घेईं घेईं माझी भाक। जरी कांहीं मागेन आणिक ॥.—७ पं. इतुका चि.—८ त. पं. वाहोनि.—९ दे. त. क. थोडें.

तरि लज्जा कोणास ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाये । आतां कोण दुजा ऐसा आह्मांसी आहे ॥ ३ ॥

४८६. तूं च मायबाप बंधु सखा आमचा । वित्त गोत जीवलग जीवाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥ ध्रु ॥ तूं च क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ । तूं च तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु कारिता कार्यता देवा । तूं च भाव भक्ति पूजा पुनस्कार[1] आघवा ॥ ३ ॥

४८७. करुनि उचित । प्रेम घालीं हृदयांत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलों दान मागायास । थोरी करूनियां आस ॥ ध्रु ॥ चिंतन समयीं । सेवा आपुली च देई ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भावा । मज निरवावें देवा ॥ ३ ॥

४८८. गाऊं वाऊं टाळी रंगीं नाचों उदास । सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बळियाचा बळी तो कैवारी आमुचा । भुक्तिमुक्तिदाता सकळां ही सिद्धींचा ॥ ध्रु ॥ मारूं शब्दशस्त्रबाण निःशंक अनिवार । कंटकांचा[2] चुर शिरें[3] फोडूं काळाचें ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ३ ॥

४८९. सांडूनि वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ॥ ध्रु ॥ पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनियां करीं ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥ ३ ॥

४९०. कृपाळु भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभा न पाचारितां दारीं । न सांगतां[4] काम करी ॥ ध्रु ॥ भाव देखोनि निर्मळ । रजां वोडवी कपाळ ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे *न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥ ३ ॥

४९१. केला अंगीकार पंढरीच्या देवें । आतां काय करितीं[5] काळ मशक मानवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यांनें[6] । वैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ॥ ध्रु ॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आह्मांसी ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु न लगे करावी चिंता । कोणेविशीं आतां वैसलों हस्तीवरी माथां ॥ ३ ॥

४९२. अगोचरी वोलिलों आज्ञेविण आगळें । परी तें आतां न संडावें[7] राउळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाईल रोकडा वोल न पुसतां आह्मां । तुझा तुझें ह्मणविलें

---

१ पं. छा.-पुरस्कार अवघा.–२ क. कटकाचा.–३ पं. फोडूं काळाचें शिर –४ दे. क. त. संगतां.–५ पं. करितील ६–पं. ज्याच्यानें.–७ पं. न सडावें कृपाळु राउळे. * पं. हा शब्द नाहीं.

पाहा पुरुषोत्तमा ॥ ध्रु ॥ न व्हावा न वजावा न कळतां अन्याय । न धरावें तें मनीं भलता करा उपाय ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु हीन मी ह्मणोनि लाजसी । वारा लागों पाहातोहे उंच्या झाडासी ॥ ३ ॥

४९३. जाली पाकसिद्धि वाट पाहे रखुमाई । उदक तापलें डेरां[2] चीकसा मर्दुनि पाईं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उठा पांडुरंगा उशीर जाला भोजनीं । उभ्या आंचवणा गोपी कळस घेउनी ॥ ध्रु ॥ अवघ्या सावचित्त सेवेलागीं सकळा । उद्धव अक्रूर आले पाचारूं मुळा ॥ २ ॥ सावरिली सेज सुमनयाति सुगंधा । रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥ ३ ॥ तुका विनंती करी पाहे पंढरीराणा । असा सावचित्त सांगे सकळा जना ॥ ४ ॥

४९४. उठा सकळ जन उठिले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ ध्रु ॥ जोडोनि[3] दोन्ही कर मुख पाहा सादर । पायावरी शिर ठेवूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे काय पंढियंतें[4] तें मागा । आपुलालें सांगा सुख दुःखें[5] ॥ ३ ॥

४९५. करूनी विनवणी पायीं[6] ठेवीं माथा । परिसावी विनवणी[7] माझी पंढरीनाथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अखंडित असावेंसें[8] वाटतें पायीं । साहोनि संकोच ठाव थोडासा देईं ॥ ध्रु ॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया । पाहें कृपादृष्टी मज पंढरीराया ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं तुझीं वेडीं वांकडीं । नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं ॥ ३ ॥

४९६. घडिया घालुनि तळीं चालती वनमाळी । उंमटती[9] कोमळीं कुंकुमाचीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वंदा चरणरज अवघे सकळ जन । तारियेले पाषाण उदकीं जेणें ॥ ध्रु ॥ पैस धरुनी चला ठाकत ठायीं ठायीं । मौन्य धरुनी कांहीं [10]नो बोलावें ॥ २ ॥ तुका अवसरु जाणवितो पुढें । उघडलीं महाल मंदिरें[11] कवाडें ॥ ३ ॥

४९७. भीतरी गेले हरी राहा क्षणभरी । होईल फळ धीर करावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करीं त्वरा ऐकें मात । क्षण एक निवांत बैसोवें[12] ॥ ध्रु ॥ करूनी मर्दन सारिलें पाणी । न्हाले देव अंग पुसी भवानी ॥ २ ॥ नेसला सोनसळा विनवी रखुमाई । वाढिलें आतां ठायीं चलावें जी ॥ ३ ॥ करुनियां भोजन घेतलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥ ४ ॥ तुका मात जाणवी आतां । सकळां बहुतां होती[13] ची ॥ ५ ॥

१ पं. तुक्याबधु ह्मगे –२ पं. डेरा चीकसा मर्दुया पायीं.–दे. मर्दुनि अई. त. मर्दुनि आई.–३ त पं. जोडुनिया कर.–४ त. पं. क. पडियतें.–५ पं. दु ख सकळ –६ पं. चरणीं.–७ पं. विनती.– ८ पं. असावें ऐसे.–९ पं. उठती.–१० पं. न.–११ पं. मदिर.–१२ पं. वैसोनी.–१३ पं. होती चित्तीं.

४९८. द्या जी आह्मां कांहीं सांगा जी रखुमाई । शेषें[1] उरलें ठायीं सनकादिकांचें ॥ १ ॥ टोकत बाहेरी बैसलों आशा । पुराया ग्रासा एकमेकां ॥ ध्रु. ॥ येथवरी आलों तुझिया नांवें । आस करुनी आह्मी दातारा ॥ २ ॥ प्रेम देउनियां बहुडा आतां दिलें[2] । तुका[3] ह्मणे आतां विठ्ठल बोला ॥ ३ ॥

४९९. बहुडाविलें जन मन जालें निश्चळ । चुकवूनी कोल्हाळ आला तुका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पर्यंकीं निद्रा करावें शयन । रखुमाई आपण समवेत ॥ ध्रु. ॥ घेउनियां आलों हातीं टाळ वीणा । सेवेसि चरणा स्वामीचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां पारिसावीं सादरें[4] । बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥ ३ ॥

५००. नाच गाणें माझा जवळील ठाव । निरोपीन भाव होईल तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां निद्रा मज आज्ञा ते स्वभावें । उतरूनि जीवें जाईनें लोण[5] ॥ ध्रु. ॥ एकाएकीं[6] बहु करीन सुस्वरें । मधुर उत्तरें आवडीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं जगदानी उदार । फेडशील भार एकीं वेळा ॥ ३ ॥

५०१. सिणलेती सेवकां देउनि इच्छादान । केला अभिमान अंगीकारा[7] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अहो दीनानाथा आनंदमूर्ती[8] । तुह्मांसि शोभती ब्रीदें ऐसीं ॥ ध्रु. ॥ बहुतांनीं विनविलें[9] बहुतां प्रकारीं । सकळां ठायीं हरी पुरलेती ॥ २ ॥ तुका ह्मणे अगा कुटुंबवत्सळा । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥ ३ ॥

५०२. उठा भागलेती उजगरा । जाला स्वामी निद्रा करा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक संवारुणी[10] ॥ ध्रु. ॥ केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ॥ २ ॥ लागतो चरणा । तुकयाबंधु नारायणा ॥ ३ ॥

५०३. पावला प्रसाद आतां उठोनि[11] जावें । आपला तो श्रम कळों येतसे जीवें[12] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां[13] स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा । पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ ध्रु. ॥ तुह्मांसि जागवूं आह्मी आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्में[14] दोष वारया[15] पीडा ॥ २ ॥ तुका ह्मणे दिलें उच्छिष्टाचें भोजन । आह्मां[16] आपुलिया नाहीं निवडिलें भिन्न ॥ ३ ॥

५०४. शब्दांचीं रत्नें करुनी अळंकार । तेणें विश्वंभर पूजियेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भावाचे उपचार करूनि भोजन । तेणें नारायण जेवविला ॥ ध्रु. ॥ संभारा हातीं दिलें आंचवण । मुखशुद्धी मन समर्पिलें ॥ २ ॥ रंगलीं[17] इंद्रियें सुरंग

१ पं. शेष उरलें ते ठायीं सनकादिका.–२ पं. जाला.–३ पं. तुका ह्मणे विठ्ठल बोला.–४ पं. सादर.–५ त. निंबलोण.–६ पं. क. एक वेळे.–७ पं. अंगीकार –८ पं. दे. क. मूर्ति.–९ पं. निरविलें –१० पं. सवारुनी.–११ दे. विठोनि.–१२ पं. भावें –१३ त. आता सुखे स्वामी.–१४ त. कर्म.–१५ पं. हाराया.–१६ पं. नाहीं निवडिलें आह्मा आपुल्या भिन्न.–१७ पं. रंगली इंद्रिय.

तांबूल । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥ ३ ॥ एकभावदीप करूनि निरांजन । देऊनि आसन देहाचें या ॥ ४ ॥ न बोलोनि तुका करी चरणसेवा । निजविलें देवा माजघरीं ॥ ५ ॥

५०५. उठोनियां तुका गेला निजस्थळा । उरले राउळा माजी देव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निउंल[1] जालें सेवका स्वामीचें । आज्ञे करुनी चित्त समाधान ॥ ध्रु ॥ पहुडलिया हरी अनंतशैनावरी[2] । तेथें नाहीं उरी कांहीं काम ॥ २ ॥ अवघी बाहेर घालूनि गेला तुका । सांगितलें लोकां निजले देव ॥ ३ ॥

## दसरा—अभंग १.

५०६. पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा । सांपडला तो साधा आजि मुहूर्त बरा । गर्जा जैयजयकार[3] हरि हृदयीं धरा । आळस नका करूं लाहानां सांगतों थोरां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या हो या हो बाइयानो निघाले हरी । सिलंगणा वेगीं[4] घेउनि आरत्या करीं । ओवाळूं श्रीमुख वंदूं पाउलें शिरीं । आह्मां दैव आलें येथें घरिच्या घरीं ॥ ध्रु ॥ अक्षय मुहूर्त औटांमध्यें[5] साधे तें । मग येरी गर्जे जैसें तैसें होतें[6] जातें । ह्मणोनि मागें पुढें कोणी न पाहावें येथें । सांडा परतें काम जाऊं हरी सांगातें ॥ २ ॥ बहुतां बहुतां रीतीं चित्तीं धरा हें मनीं । नका गै[7] करूं आइकाल ज्या कानीं । मग हें सुख कधीं न देखाल स्वप्नीं । उरेल हायहाय मागें होईल काहाणी ॥ ३ ॥ ऐसियास वंचती त्यांच्या अभाग्या पार । नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार । मग हे वेळ घटिका न ये अजरामर । कळलें असों द्या मग पडतील विचार ॥ ४ ॥ जयासाटीं ब्रह्मादिक जालेति पिसे । उच्छिष्टा कारणें देव जळीं जाले मासे । अर्द्धांगीं विश्वमाता लक्षुमी वसे । तो हा तुकयाबंधु ह्मणे आलें अनायासें ॥ ५ ॥

५०७. ओवाळूं आरती[8] पंढरीराया । सर्वभावें शरण आलों तुझिया पायां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व व्यापून कैसें रूप[9] आकळ । तो हा गौळ्या घरीं जाला कृष्ण बाळ ॥ ध्रु ॥ स्वरूप[10] गुणातीत जाला अवतारधारी । तो हा पांडुरंग उभा विटेवरी ॥ २ ॥ भक्तीचिया काजा कैसा रूपासि आला । ब्रिदाचा तोडर[11] चरणीं मिरविला ॥ ३ ॥ आरतें ओंरतीं[12] ओवाळिली । वाखाणितां कीर्त्ति वाचा परतली ॥ ४ ॥ भावभक्तिबळें होसी कृपाळु देवा । तुका[13] ह्मणे पांडुरंगा तुझ्या न कळती मावा ॥ ५ ॥

---

१ पं. नेउले.—२ पं. अनतसेनावरी.—३ दे. त. जेजेकार.—४ पं. घेउनि वेगीं.—५ दे. क. औठामध्यें.—६ क. होतें.—७ पं. गई.—८ पं. आरती माझ्या.—९ त. रूप कैसें.—१० पं. स्वरूप गुणातीत अवतार धरी.—११ त. तोरड. पं. तोडरु.—१२ पं. आरती कैसी.—१३ पं. तुका ह्मणे तुझ्या.

५०८. करूनि आरती । आतां ओवाळूं श्रीपती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आजि पुरले नवस । धन्य जाला हा दिवस ॥ छ ॥ पाहा वो सकळा । पुण्यवंता तुह्मी बाळा ॥ २ ॥ तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ॥ ३ ॥

५०९. घ्याल माळ जरी[1] पडेन मी पायां । दंडवत वांयां कोण वेची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलें तें हिशोबें अवघिया प्रमाण । द्यावें तरी दान मान होतो ॥ छ ॥ मोकळिया मनें घ्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी जालिया कृपण । नामाची जतन मग कैची ॥ ३ ॥

५१०. तुह्मीं जावें निजमंदिरा । आह्मी जातों आपुल्या घरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठोबा लोभ असों देईं । आह्मी असों तुमचें पाईं ॥ छ ॥ चित्त करी सेवा । आह्मी जातों आपुल्या गांवा ॥ २ ॥ तुका ह्मणे दिशा भुलों । फिरोन पायापाशीं आलों ॥ ३ ॥

५११. पाहें प्रसादाची वाट । द्यावें धोवोनियां ताट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शेष घेऊनि जाईन । तुमचें जालिया भोजन ॥ छ ॥ जालों एकसवा । तुह्मां आडुनियां देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । करूनि राहिलों निश्चिंत ॥ ३ ॥

५१२. केली कटकट गाऊं नाचों नेणतां । लाज नाहीं भय आह्मां पोटाची चिंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसा सिणलेती पाय रगडूं दातारा । जाणवूं द्या वारा उब जाली शरीरा ॥ छ ॥ उशिरा उशीर किती काय ह्मणावा । जननिये[3] बाळका कोप कांहीं न धरावा ॥ २ ॥ तुझिये संगतीं आह्मीं[4] करूं कोल्हाळ । तुका ह्मणे बाळें अवघीं[5] मिळोन गोपाळ ॥ ३ ॥

५१३. कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पीक पिकलें पिकलें । घन दाटोनियां[6] आलें ॥ छ ॥ शेवटीचें दान । भागा आला नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट । भरलें वारलें[7] बोभाट ॥ ३ ॥

५१४. आरुष शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं । लडिवाळ बाळकें तूं चि आमुची आई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देईं गे विठाबाई[8] प्रेमभातुकें । अवघियां कवतुकें लहानां थोरां सकळां ॥ छ ॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया । पाहे कृपादृष्टी आतां पंढरीराया ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तुझीं वेडीं वांकुडीं । नामें भवपाश आतां आपुलिया तोडीं ॥ ३ ॥

---

१ पं. तरी.–२ पं. क. ही शोभे.–३ पं. जननी या.–४ दे. क. येऊं.–५ पं. अवघे.–६ त. मोडोनियां.–७ पं. क. वारला.–८ पं. विठाई.

५१५. आडकलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥ ध्रु ॥ देवा लागलीसे निज । येथें उभ्या काय काज ॥ २ ॥ राग येतो[1] देवा । तुका ह्मणे नेघे सेवा ॥ ३ ॥

५१६. कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं । उतरी पैल पारु भवेनदीची ॥ ध्रु ॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा श्रीकृष्ण विसावा । वाटे न करावा परता जीवा ॥ ३ ॥

५१७. कृपा करावी भगवंतें । ऐसा शिष्य द्यावा मातें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें व्रत जो चालवी । त्यासि द्यावें त्वां पालवी ॥ ध्रु ॥ व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । तिहीं लोकीं ज्याचा झेंडा ॥ २ ॥ तुका तुका हाका मारी । माझ्या विठोबाच्या द्वारीं ॥ ३ ॥

५१८. जातो वाराणसी । निरवी गाई घोडे ह्मैसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मा[3]नावा भरवसा ॥ ध्रु ॥ नका काढूं माझीं पेवें । तुह्मीं वरळा भूस खावें ॥ २ ॥ भिकारियाचे पाठीं । तुह्मी घेउनि लागा काठी ॥ ३ ॥ सांगाल[4] जेवाया ब्राह्मण । तरी कोंपाल[5] माझी मान ॥ ४ ॥ वोकलिया वोका । म्यां खर्चिला नाहीं रुका ॥ ५ ॥ तुह्मीं खावें ताकपाणी । जतन करा तूपलोणी ॥ ६ ॥ नाहीं माझें मनीं । पोरें रांडा नागवणी ॥ ७ ॥ तुका ह्मणे नीट[6] । होतें तैसें बोले[7] स्पष्ट ॥ ८ ॥

५१९. कास घालोनी बळकट । झालों कळिकाळासी नीट । केली पायवाट । भवसिंधूवरूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या रे या रे लाहान थोर । याति भलते नारीनर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥ ध्रु ॥ कामीं[8] गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ २ ॥ एकंदर शिका । पाठविला इहलोका । आलों ह्मणे तुका । मी नामाचा धारक ॥ ३ ॥

५२०. आह्मी वैकुंठवासी । आलों या चि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्तावया[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ॥ ध्रु ॥ अर्थें लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषयें[10]लोभी मन । साधनें[11] बुडविलीं ॥ २ ॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका ह्मणे करा । जयजयकार[12] आनंदें ॥ ३ ॥

१ पं. येईल.–२ पं. भवनदी–३ त. माना हा.–४ दे. त. सांगा.–५ दे. त. कापा.–६ प. नष्ट–७ त. केलें–८ त. कामी गुंतलें रिकामें । जपी तपी येथें जमे । लाविलें दमामें । पं. कार्मी.–९ दे. क. वर्ताव्या पं. वर्ताया–१० त. लोभीं.–११ पं. साधन बुडविलें.–१२ दे. त. जेजेकार.

५२१. बळियाचे अंकित । आह्मी जालों बळिवंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाता हाणोनि संसारा । केला षड्रूर्मीचा मारा ॥ ध्रु ॥ जन धन तन । केलें तृणाही समान ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मी मुक्तीचिया माथां ॥ ३ ॥

५२२. मृत्युलोकीं आह्मां आवडती परी । नाहीं एका हरिनामें विण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन हें मनीं बैसलेंसे ॥ ध्रु ॥ सोनें रूपें आह्मां मृत्तिके समान । माणिकें पाषाण खडे तैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरी आह्मांपुढें ॥ ३ ॥

५२३. स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणमृत्तिकेच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरे ना ॥ ध्रु ॥ दृष्टिमुखें मरण इंद्रियाच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी अग्नि जाला साधु । पैरी पावे बाधूं संघट्टणें ॥ ३ ॥

५२४. पराविया नारी रखुमाईसमान । हें गेलें नेमून ठायींचें चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाईं वो तूं माते न करीं सायास । आह्मी विष्णुदास नव्हों तैसे ॥ ध्रु ॥ न साहावें मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज पाहिजे भ्रतार । तरी कांय नर थोडे जाले ॥ ३ ॥

५२५. भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सळे । विठ्ठले[१२] कृपाळे होसी माये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पडिला विसर माझा काय गुणें । कपाळ हें उणें काय करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देईं ॥ ३ ॥

५२६. तुजविण मज कोण वो[१३] सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगे ॥ १ ॥ लागलीसे आस पाहा तुझें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटीं ॥ २ ॥ काम गोड मज न लगे हा धंदा । तुका ह्मणे सदा हें चि ध्यान ॥ ३ ॥

५२७. [१४]पंढियंतें आह्मी तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाळसील लळे दीनि वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जननिये ॥ ध्रु ॥ जीव भाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूं चि सर्वा ठायीं एक आह्मां ॥ २ ॥ दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥ ३ ॥ सर्वसत्ता एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥ ४ ॥ ह्मणउनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां चोळी डोळे तुका ॥ ५ ॥

---

१ त. हला. पं. हणिला.–२ पं. त. संसार.–३ पं. पड्रूर्मीमार.–४ त. बैसलेंसे मनीं रामनाम.–५ पं. जैसे.–६ पं. अतरे.–७ पं. तरी.–८ पं. माउली.–९ त. पं. रखुमाई जन पांडुरंगे –१० पं. तैसे नव्हों.–११ पं. तरी का इतर लोक थोडे.–१२ त. पं. विठ्ठल –१३ त. हो –१४ पं. त. पटीयंतें –१५ त. जयापें.–१६ त. होसी माये.

५२८. कोण पर्वकाळ पहासील तर्थि । होतें माझें चित्त कासावीस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाठवीं भातुकें पेरीं[2] झडकरी । नको[3] राखों उरी पांडुरंगा ॥ ध्रु ॥ न धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्यायी ह्मणोनियां ॥ २ ॥ काय रडवीसी नेणतियां पोरां । जाणतियां थोरां याचिपरी ॥ ३ ॥ काय उभी कर ठेवुनियां कटीं । बुझावीं धाकुटीं लडिवाळें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां पदरासी पिळा । घालीन निराळा नव्हे मग ॥ ५ ॥

५२९. कां हो देवा कांहीं न बोला चि गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कंठीं प्राण पाहें वचनाची आस । तों दिसे उदास धरिलें ऐसें[4] ॥ ध्रु ॥ येगें काळें बुंथी घेतलीसे खोर्ले । कां नये विटाळ होऊं माझा ॥ २ ॥ लाज वाटे मज ह्मणवितां देवाचा । न पुससी फुकाचा तुका ह्मणे ॥ ३ ॥

५३०. उचित तें काय जाणावें दुर्बळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देतों हाका कोणी नाइकती द्वारीं । ओस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥ ध्रु ॥ आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेंचे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां साजे हें श्रीहरी । आह्मी निलाजिरीं नव्हों ऐसीं ॥ ३ ॥

५३१. आह्मी मागों ऐसें नाहीं तुजपाशीं । जरी तूं भीतोसि पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहें विचारूनि आहे तुज ठावें । आह्मी धालों नावें तुझ्या एका ॥ ध्रु ॥ ऋद्धिसिद्धि तुझें मुर्ख्य भांडवल । हें तों आह्मां फोल भक्तीपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं वैकुंठा चालत । बैसोनि निश्चिंतें सुख भोगूं ॥ ३ ॥

५३२. न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि यां ॥ ध्रु ॥ जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझे नाहीं मनीं मानसीं हीं[11] ॥ २ ॥ तुका ह्मणे नको रागेजों विठ्ठला । उठीं देई मला भेटी आतां ॥ ३ ॥

५३३. कमोदिनी[12] काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आह्मी च तें प्रेमसुख जाणों ॥ ध्रु ॥ माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्ताफळ शिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ३ ॥

५३४. काय सांगों तुझ्या चरणांच्या[13] सुखा । अनुभव ठाउका नाहीं तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलतां हें कैसें वाटे खरेपण । अमृताचे गुण अमृतासी ॥ ध्रु ॥ आह्मी

---

१ त. थीत.–२ प. प्रेमें.–३ पं. नका.–४ त. तुह्मीं.–५ पं. क. काळ बुथी.–६ पं. खोळ.–
७ दे. पं. नाहीं.–८ पं. मोक्ष.–९ क. निश्चित.–पं. निवांत.–१० पं. हे.–११ क. हे. पं. तें.–
१२ पं. कुमुदिनी.–१३ पं. चरणींच्या.

एकएका ग्वाही मायपुतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां मोक्षाचा कांटाळा । कां तुह्मी गोपाळा नेणां ऐसें ॥ ३ ॥

५३५. देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ ध्रु ॥ मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळी काळ ॥ ३ ॥

५३६. आतां येणेंविण नाहीं आह्मां चाड । कोण बडबड करी वांयां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख तें चि दुःख पुण्यपाप खरें । हें तों आह्मां बरें कळों आलें ॥ ध्रु ॥ तुका ह्मणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ २ ॥

५३७. बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जनि आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोगीं त्याग जाला संगीं च असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा ॥ ३ ॥

५३८. अधिकार तैसा दाविेयेले मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे रोग वैद्यांचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥ ३ ॥

५३९. संवसार तीहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्य दारा जया चित्तीं ॥ १ ॥ शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होउनि ठेला ॥ २ ॥ तुका ह्मणे देहें दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥ ३ ॥

५४०. देहबुद्धि वसे लोभ जयां चित्तीं । आपुलें जाणती परावें जे ॥ १ ॥ तयासि चालतां पाहिजे सिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥ २ ॥ तुका ह्मणे धर्म रक्षाया कारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ॥ ३ ॥

५४१. काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्तिसंहारघडमोडी ॥ १ ॥ बीज तो अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता सेवटीं एकाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें तैसें कळों नये ॥ ३ ॥

५४२. आणीक काळें न चले उपाय । धरावे यां पाय विठोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें चि पुण्य असे तया पोटीं । अवघिया तुटी होय पापा ॥ ध्रु ॥ अवघें मोकळें अवघिया काळें । उद्धरती कुळें नरनारी ॥ २ ॥ काळ वेळ नाहीं गर्भवासदुःखें । उच्चारितां मुखें नाम एक ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न लगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥ ४ ॥

---

१ त. तुष्य. दे. तुश.–२ त. पं. सकळ ही.–३ दे. क. वाईली.–४ त. पं. जनी (जनीं ?).–५ पं. विठोवासी.–६ त. पं. दाचियेला.–७ दे. त. वैदाचे.–८ पं. कैंपें.–९ पं. ते.

५४३. कां रे* माझा तुज न ये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥ ध्रु ॥ कां हें चित्त नाहीं पावलें विश्रांती । इंद्रियांची गति कुंटे[1] चि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे धरियेला कोप । पाप सरलें नेणों पांडुरंगा ॥ ३ ॥

५४४. दीनानाथा तुझीं ब्रिदें चराचर । घेसील कैवार शरणागता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आह्मां रोकडे कळों आले ॥ ध्रु ॥ आपुल्या दासांचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥ २ ॥ चक्र गदा हातीं आयुधें अपारें । न्यून तेथें[2] पुरें करूं धावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ४ ॥

५४५. वर्णूं महिमा ऐसी नाहीं[3] मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओवाळुनि काय सांडूं ॥ ध्रु ॥ नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तो ही तुझा ॥ २ ॥ मज माझें कांहीं न दिसे पाहातां । जें तुज अनंता समर्पावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥ ४ ॥

५४६. नाहीं[4] सुख मज न लगे हा मान । न राहे हें जन काय करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देहउपचारें पोळतसे अंग । विषतुल्य[5] चांग मिष्टान्न तें ॥ ध्रु ॥ नाइकवे स्तुति वाणितां[6] थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥ २ ॥ तुज पावे ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतूनि ॥ ४ ॥

५४७. न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हें चि सांगे ॥ ध्रु ॥ विटंबो शरीर होत कां विपत्ति । परि राहो चित्तीं नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे नासिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तें चि हित ॥ ३ ॥

५४८. पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचिया ॥ ध्रु ॥ क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ २ ॥ कर्वतिलीं[7] देहें कापियेलें मांस । गेले वनवासीं[8] शुकादिक ॥ ३ ॥ तुका ह्मणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाय जळे ॥ ४ ॥

१ क. खुटे.—२ पं. ते चि.—३ पं. मन नाहीं वाचा.—४ पं. नव्हे.—५ पं. विषातुल्य.—६ पं. क. वानिता.—७ पं. कर्वतिले देह.—८ त. वनवासास. * पं. हा शब्द नाहीं.

५४९. जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ ध्रु ॥ आणिकांची मात नाइकावी कानीं । आणीक नयनीं न पाहावें ॥ २ ॥ चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित । होउनी निश्चित एकविध ॥ ३ ॥ चला पायें हात हें चि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबाच्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुह्मां भय काय करी । आह्मुचा कैवारी नारायण ॥ ५ ॥

५५०. करिसी तें देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न ह्मणें संत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ॥ ध्रु ॥ जगदेव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ २ ॥ तुका ह्मणे भय न धरीं मानसीं । ऐसियाचे विशीं करितां दंड ॥ ३ ॥

५५१. ह्मणविती ऐसे आइकतों संत । न देखीजे होत डोळां कोणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसियांचा कोण मानितें विश्वास । निवडे तो रस घाईडाई ॥ ध्रु ॥ पर्जन्याचे काळीं वाहाळाचे नद । ओसरतां बुंद न थारे चि ॥ २ ॥ हिऱ्या ऐशा गारा दिसती दूरोन । तुका ह्मणे घनें न भेटे तों ॥ ३ ॥

५५२. अतिवाद लावी । एक बोट सोंग दावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ ध्रु ॥ प्रतिपादी वाळी । एक पुजी एका छळी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥ ३ ॥

५५३. पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयांचे भेद विषयरूप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अर्थी परमार्थ कैसा घडों सके । चित्त लोभी भीके सोंग वांयां ॥ ध्रु ॥ देवाचीं चरित्रें दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं राहे अभिळास । दोघां नरकवास सारिखा चि ॥ ३ ॥

५५४. भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण त्यांचें नये शिकों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं नये कांहीं साचें ॥ ध्रु ॥ होइल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांचें । पाप नाहीं ताडणाचें ॥ ३ ॥

५५५. जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको भोंवतालें जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥ ध्रु ॥ कुड्याची संगती । सदा भोजन. पंगती ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥ ३ ॥

५५६. कांहीं च मी नव्हें कोणिये गांवींचा । एकट ठायींचा ठायीं एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघें चि वांयांविण बोलें ॥ ध्रु ॥

---

१ पं. हात पाय.–२ क. पं. त. घण –३ क. अतिवादें.–४ त. भीकें.–५ पं. कांहीं मानूं नये साचें –६ क. त. पं. त्याचे.–७ पं. अवघेंचि वायां विण बोल.

नाहीं गज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥ २ ॥ नाहीं आह्मां ज्यावें गरावें लागत । आहों अखंडित जैसे तैसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नांवेंरूप नाहीं आह्मां । वेगळा ह्या कर्मा अकर्मासी ॥ ४ ॥

## लोहगांवास परचक्रवेढा पडला—अभंग ३.

५५७. न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुह्मी येथें नसालसें जालें । आह्मीं न देखिलें पाहिजे हें ॥ ध्रु ॥ परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । नँ देखिजेत देशें राहातिया ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥ ३ ॥

५५८. काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तरिजे सकळ जनीं ऐसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठला परचक्र ॥ ध्रु ॥ पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडें साक्ष आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥ ३ ॥

५५९. भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होतां जना न देखवे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुह्मी दातारा नेणां ऐसें ॥ ध्रु ॥ भजनीं विक्षेप तें चि पैं मरण । न वजावा क्षण एक वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाँव मागें ॥ ३ ॥

॥ ३ ॥

५६०. फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणमोल ॥ १ ॥ पायरी प्रतिमा एक चि पाषाण । परि तें महिमान वेगळालें ॥ २ ॥ तुका ह्मणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारिखिया ॥ ३ ॥

५६१. कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनांप्रति पावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझा श्रोता वक्ता तूं चि देवा । करावी ते सेवा तुझी च म्यां ॥ ध्रु ॥ कुशळ चतुर येथें न संरते । करितील रिते तर्क मतें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें पणें एके घरीं । मज आणि हरी तुह्मां गांठी ॥ ३ ॥

५६२. आमचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीण देखोवेखीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न कळे संतत हिताचा विचार । तों हे दारोदार खाती फेरे ॥ ध्रु ॥

१ त. नाम.—२ पं. देखिजे ते—३ पं कथेचें हें फळ.—४ पं. जन.—५ क. परचक्रे. (क्रें ?)—६ दे. क. साक्षसी.—७ त. ठेवीं मज.—८ क. प्रीति—९ दे. क. त. मां—१० पं. पवती. क. सरतें.—११ पं. करितील रीति तर्क मत. क. करितील रितें तर्क मतें.—१२ पं केणें जालें. त. जालें केणें.—१३ (स्वतंत्र ?) संतत हा शब्द कांहींसा वरा लागेल. ~ दे. त. हा शब्द नाहीं

वंदिलें वंदावें निंदिलें[1] निंदावें। एक गेलें जावें त्याचि वाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणी नाइके सांगतां। होती यमदूता वरपडे ॥ ३ ॥

५६३. दीप घेउनियां धुंडिती अंधार। भेटे हा विचार अघटित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विष्णुदास आह्मी न [2]भ्यों काळिकाळा। भुलों मृगजळा न घडे तें ॥ ध्रु ॥ उधाळितां माती रविकळा मळे। हें कैसें न कळे भाग्यहीना ॥ २ ॥ तुका ह्मणे तृणें झांके हुताशन। हें तंव वचन वाउगें चि ॥ ३ ॥

५६४. नटनां[3]व्यें अवघें संपादिलें सोंग। भेद दाऊं[4] रंग न पालटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मांडियेला खेळ कौतुक[5] बहुरूप। आपुलें स्वरूप जाणतसों ॥ ध्रु ॥ स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे। भाव दावी पिवळे लाल संगे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी या जनाविरहित। होउनि निश्चिंत[6] क्रीडा करूं ॥ ३ ॥

५६५. तुजविण वाणीं[7] आणिकांची[8] थोरी। तरी माझी हरी जिव्हा झडो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजविण चित्ता आवडे आणीक। तरी हा मस्तक भंगो माझा ॥ ध्रु ॥ नेत्रीं आणिकांसि पाहीन आवडी। जातु ते चि घडी चांडाळ हे[9] ॥ २ ॥ कथामृतपान न करिती श्रवण। काय प्रयोजन मग यांचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय वांचून कारण। तुज एक क्षण विसंबतां ॥ ४ ॥

## स्वामींचे स्त्रीनें स्वामींस कठिण उत्तरें केलीं–अभंग ७.

५६६. मज चि भोंवता केलें[10] येणें जोग। काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चालोनियां घरा सर्व सुखें येती। माझी तों फजीती चुके चि ना ॥ ध्रु ॥ कोणाची वाईल होऊनियां वोढूं। संवसारीं काढूं आपदा किती ॥ २ ॥ काय तरी देऊं तोंडितील पोरें। मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥ कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर। सारवावया ढोर शेण नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे रांड न करितां विचार। वाहुनियां भार कुंथे माथां ॥ ५ ॥

५६७. काय नेणों होता दावेदार मेला। वैर तो साधिला होउनि गोहो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती सर्वकाळ सोसावें हें दुःख। किती लोकां मुख वासूं तरीं ॥ ध्रु ॥ ह्मवे आपुली आई काय माझें केलें। धड या विठ्ठलें संसाराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती वाईले असंडे[11]। फुंदोनियां रडे हांसे कांहीं ॥ ३ ॥

---

१ पं. तो.–२ त. भों–३ पं. क. नटनाट्य.–४ पं. दावी–५ क. कौतुकें. पं. कवतुकें.–६ पं. निश्चित.–७ त. पं. क. याणी.–८ पं. आणिकाची.–९ त. हें.–१० त. येनलागे जोग.–११ पं. आसंडे.

५६८. गोणी आली घरा । द्राणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ छ्र ॥ खवळली पिसी । हाता झोंबे जैसी लांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥ ३ ॥

५६९. आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोचकें तिंबी घातल्या माळा । उद्गाचा सांडी चाळा ॥ छ्र ॥ आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार ॥ २ ॥ हातीं टाळ तोंड वासी । गाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥ आतां आह्मी करूं काय । न वसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां धीरी । आझुनि नाहीं जालें तरी ॥ ५ ॥

५७०. बरें जालें गेलें । आजी अवघें मिळालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां खाईन पोटभरी । ओल्या कोरड्या भाकरी ॥ छ्र ॥ किती तरी तोंड । याशीं वाजवूं मी रांड ॥ २ ॥ तुका वाइले मानवला । चीथू करूनियां बोला ॥ ३ ॥

५७१. न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उठिते तें कुंटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ छ्र ॥ जिवंत चि मेले । लाजा वाटुनियां प्याले ॥ २ ॥ संसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥ तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥ तुका ह्मणे बरें जालें । घे गे वाइले लीहिलें ॥ ५ ॥

५७२. कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवासाटीं जालें ब्रह्मांड सोइरें । कोमळ्या उत्तरें काय वेचे ॥ छ्र ॥ मानें पाचारितां नव्हे आराणुक । ऐसे येती लोक प्रीतीसाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रांडे नावडे भूषण । कांतिलेंसें श्वान लागे पाठीं ॥ ३ ॥

॥ ७ ॥

५७३. भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ छ्र ॥ काय करिल तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ २ ॥ तुका ह्मणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ३ ॥

५७४. इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ छ्र ॥ मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥ २ ॥ तुका ह्मणे काय बोलें । आतां भलें मौन्य ची ॥ ३ ॥

---

१ पं. लांसी जैसी.—२ पं. जाले नाही.—३ पं. कुटी.—४ पं. नाहीं—५ दे. पाठीं लागे.—६ दे. पुस. पं. पुस.—७ पं. भेदे.—८ त. खादल्या.

५७५. साधनें तरी हीं च दोन्ही । जरी कोणी साधील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परद्रव्य परनारी । याचा धरीं विटाळ ॥ ध्रु० ॥ देवभाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥ २ ॥ तुका ह्मणे तें शरीर । गृह भांडार देवाचें ॥ ३ ॥

५७६. आह्मासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोहें धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ ध्रु० ॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ २ ॥ सुख ठेवी आह्मासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ३ ॥ आह्मां घाली पाठीकडे । पुढें कळिकाळाशीं भिडे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कृपानीधी । आह्मां उतरीं नावेमधीं ॥ ५ ॥

५७७. रवि रश्मिकळा । नये काढितां निराळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा आह्मां जाला भाव । अंगीं जडोनि ठेला देव ॥ ध्रु० ॥ गोडी साकरेपासुनी । कैसी निवडती दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे नाद उठी । विरोनि जाय नभा पोटीं ॥ ३ ॥

५७८. थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥ ध्रु० ॥ चित्त ठेवीं ग्वाही । आणिकांशीं चाड नाहीं ॥ २ ॥ आपलें तें हित फार । तुका ह्मणे खरें सार ॥ ३ ॥

५७९. अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥ ध्रु० ॥ ऊंस कांदा एक आळां । स्वाद गोडीचा निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ३ ॥

५८०. शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघें ची दुःख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥ ध्रु० ॥ खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप ॥ ३ ॥

५८१. गोडीपणें जैसा गुळ । तैसा देव जाला सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां भजों कवणे परी । देव सबाह्य अंतरीं ॥ ध्रु० ॥ उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ २ ॥ हेम अळंकारा नामीं । तुका ह्मणे तैसे आह्मी ॥ ३ ॥

५८२. परमेष्टिपदा । तुच्छ करिती सर्वदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ ध्रु० ॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ २ ॥ सार्वभौमराज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ३ ॥ पाताळींचें आधिपत्य । ते तों मानिती विपत्य ॥ ४ ॥ योगसिद्धिसार । ज्यासि वाटे तें असार ॥ ५ ॥ मोक्षायेवढें सुख । सुख नव्हे चि तें दुःख ॥ ६ ॥ तुका ह्मणे हरीविण । त्यासि अवघा वाटे सिण ॥ ७ ॥

---

१ पं. आपण.–२ त. पं. पाहता.–३ पं. कोगे–४ त. तुच्य.

५८३. सांहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें ते[1] साक्ष ॥ ध्रु ॥ स्वर्सीचिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे खोडी । देवमनी[3] न देती दडी ॥ ३ ॥

५८४. सजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं सुख ॥ ध्रु ॥ येथें न सरे चार । हीण आणीक वेव्हार ॥ २ ॥ तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥ ३ ॥

५८५. भाव देवोंचें उचित । भाव तोचि भगवंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्यधन्य शुद्ध जाती । संदेश कैंचा तेथें चित्तीं ॥ ध्रु ॥ बहुत बराडी । देवेंजवळी आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे हें रोकडें । लाभ अधिक रिचो खडें ॥ ३ ॥

५८६. गौरव गौरवापुरतें । फळ सत्याँचे संकल्प ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कठिण योगाहुनि क्षेमँ । ओकलिया होतो श्रम ॥ ध्रु ॥ पावलें मरे सिवेपाशीं । क्लेश उरत ते क्लेशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वहु आणी । कठिण निघालिया रणीं ॥ ३ ॥

५८७. न संडी अवगुण । वेंगें मानीतसे सिण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोग देतां करिती काई । फुटतां यमंदंडें डोई ॥ ध्रु ॥ पापपुण्यझाडा । देतां तेथें मोटी पीडा ॥ २ ॥ तुका ह्मणे बोला । माझ्या सिणती विठ्ठला ॥ ३ ॥

५८८. पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥ ध्रु ॥ आइता च पाक । संयेगाचा सकळिक ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । सीमा राहिली होउनी ॥ ३ ॥

५८९. दुर्वळ हें अवघें जन । नारायणीं विमुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ झाडोनियां हात जाती । पात्र होतीं दंडासी ॥ ध्रु ॥ सिदोरी तें पापपुण्य । सर्वेसिण भिकेचा ॥ २ ॥ तुका ह्मणे पडिला वाहो । कैसा पोहा हो* लटिक्याचा ॥ ३ ॥

५९०. वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ॥ ध्रु ॥ काळा नाहीं वाव । परा श्रमा कोठें ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥ ३ ॥

५९१. झाड कल्पतरु । न करी याचकीं आव्हेरु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी सर्वां सर्वोत्तम । ऐसे विसरतां धर्म[13] ॥ ध्रु ॥ परिसा तुमचें देणें । तो त्या जागे अभिमानें ॥ २ ॥ गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारुनियां हाका ॥ ३ ॥

---

१ क. ते –२ पं. स्वर्सीचिया.–३ दे. क. देवमणी.–४ त. पं. ढेवाचे.–५ पं. ढेचावरी.– ६ पं. सत्यच सकल्पें.–७ दे. क्षम –८ पं. उतर ते –९ क. वर्म.–१० पं. यमदंड.–११ पं. विन्मुख – १२ पं. पाहो.–१३ त. पं. नाम.–* पं. हा शब्द नाहीं

५९२. वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥ ध्रु ॥ संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । अवघा गोविंदें सुकाळ ॥ ३ ॥

५९३. येथील हा ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घरीं देवाचे अबोला । त्यांसि[1] ते चि सवे त्याला ॥ ध्रु ॥ नाहीं पाहावें लागत । एकाएकीं च तें रितें[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे जन । तयामध्यें येवढें भिन्न ॥ ३ ॥

५९४. करितां देवार्चन । घरा आले संतजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवें[3] सारावे परते । संत पूजावे आरते ॥ ध्रु ॥ शाळिग्राम विष्णुमूर्ती । संत हो का भलते याती ॥ २ ॥ तुका ह्मणे संधी । अधिक वैष्णवांची मांदी ॥ ३ ॥

५९५. ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करितां स्वामीसवें वाढे[4] । अधिक अधिक आनंद ॥ ध्रु ॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥ २ ॥ वदे वाग्देवी । तुका विठ्ठली गौरवी ॥ ३ ॥

५९६. देवें जीव धाला । संसार तो कडू झाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते चि येतील ढेंकर । आनंदाचे हरिहर ॥ ध्रु ॥ वेधी आणिकांस । ऐसा जया अंगीं कस ॥ २ ॥ तुका ह्मणे भुक । येणें न लगे आणीक ॥ ३ ॥

५९७. नाम साराचें ही सार । शरणागत यमकिंकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उतमोउतम[5] । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ ध्रु ॥ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हाकोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥ ३ ॥

५९८. गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तूं पतितपावन । करीं साच हें वचन ॥ ध्रु ॥ मुखें ह्मणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥ २ ॥ तुका ह्मणे दावीं वेश । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥ ३ ॥

५९९. द्रव्य असतां धर्म न करी । नागविला राजद्वारीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माय त्यासि व्याली जेव्हां । रांडे[6] सटवी नव्हती तेव्हां ॥ ध्रु ॥ कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥ २ ॥ भोग स्त्रियेसि[7] देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाण । नर गाढवाहुनी हीन ॥ ४ ॥

६००. मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धनअभिमान[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशियाची करी[9] सेवा । काय सुख होय जीवा ॥ ध्रु ॥ पोटासाठीं संत । झाले कलींत वहुत ॥ २ ॥ विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ३ ॥

१ दे. त्याची.–२ दे. ते रित–३ त. पं. तरी ते–४ पं. पाद–५ पं. नाम उत्तम उत्तम. क. उत्तम उत्तम–६ त. राणसटवी दे. "रांड" असें असतां वर "रान" हा शोध घातला आहे.– ७ पं. देता स्त्रियेसि–८ त. आणि मान.–९ पं. करिता.

६०१. एक वेळ प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अहंकारा नांवें दोष । त्याचें ओस पाडिले ॥ ध्रु ॥ अनुतापें स्नानविधि । यज्ञसिद्धि देहहोम ॥ २ ॥ जीवशिवा होतां चुका । तेथें तुका विनटला ॥ ३ ॥

६०२. त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ ध्रु ॥ पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥ २ ॥ तुका ह्मणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ३ ॥

६०३. बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ सांग ॥ ध्रु ॥ टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेऊनि चेंपी घांटी ॥ २ ॥ तुका ह्मणे तो* केवळ पुंड । त्यांवरि[1] वाजती यमदंड ॥ ३ ॥

६०४. दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥ ध्रु ॥ तुह्मी पापा भीतां । आह्मां उपजावया चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥ ३ ॥

६०५. करा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वृत्ति राखा पायांपाशीं । वस्ती धरूनि मानसीं ॥ ध्रु ॥ पाळोनियां लळा । आतां पाववावें फळा ॥ २ ॥ तुका ह्मणे दीनें । त्यांचा हरतिया सीण ॥ ३ ॥

६०६. मी तों दीनाहूनि दीन । माझा तूज अभिमान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥ ध्रु ॥ दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । भलें नव्हे मोकलितां ॥ ३ ॥

६०७. सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे । प्रेम मिठी पडे वदनासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी । आला दुराचारी पारधी तो ॥ ध्रु ॥ वृक्षाचिया माथां सोडिला ससाना[3] । धनुष्यासि बाणा लावियेलें ॥ २ ॥ तये काळीं तुज पक्षी आठविती । धांवें गा श्रीपती मायबापा ॥ ३ ॥ उडोनियां जातां ससाना[4] मारील । बैसतां विंधील पारधी तो ॥ ४ ॥ ऐकोनियां धांवा तया पक्षियांचा । धरिला सर्पाचा वेश वेगीं ॥ ५ ॥ डंखोनि पारधी भुमीसि पाडिला । बाण तो[5] लागला ससान्यासी ॥ ६ ॥ ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा । होसील कोंवसा संकटींचा ॥ ७ ॥ तुका ह्मणे तुझी कीर्ति त्रिभुवना । वेदांचिये[6] वाणी वर्णवेना ॥ ८ ॥

---

१ दे. त्याजवरी यमदंड.–२ दे. नामें सकीर्तनें.–३ पं. ससाणा.–४ पं. ससाणा.–५ क. तों.–६ क. वेदासि जे वाणी. त. वेदाची ही वाणी.–* पं. "तो" हा शब्द नाहीं.

६०८. नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥ ध्रु ॥ भोगी भोगविता । बाळासवें तो चि पिता ॥ २ ॥ कर्म अकर्म जळालें । प्रौढें[1] तुका तें उरलें ॥ ३ ॥

## नाटाचे—अभंग ६३.

६०९. प्रथम नमन तुज एकदंता । रंगीं रसाळ वोडवीं कथा । मति सौरस करीं प्रबळता । जेणें[2] फिटे आतां अंधकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझिये कृपेचें भरितें । आणीक काय राहिलें तेथें । मारग सिद्धाच्यानि पंथें । पावविसी तेथें तूं चि एक ॥ ध्रु ॥ आरंभा आदि तुझें वंदन । सकळ करितां कारण । देव ऋषि मुनि आदिकरुन । ग्रंथ पुराण निर्माणी ॥ २ ॥ काय वर्णूं तुझी गती । एवढी कैंची मज मती । दिनानाथ तुज ह्मणती । करीं सत्य वचन हें चि आपुलें ॥ ३ ॥ मज वाहावतां मायेच्या पुरीं । बुडतां डोहीं भवसागरीं । तुज वांचुनि कोण तारी । पाव झडकरी तुका ह्मणे ॥ ४ ॥

६१०. प्रथमारंभीं लंबोदर । सकळ सिद्धींचा दातार । चतुर्भुज फरशधर । न कळे पार वर्णितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो देव नटला गौरीबाळ । पांयीं बांधोनि घागऱ्या घोळ । नारदतुंबरसहित मेळ । सुटला पळ विघ्नांसी ॥ २ ॥ नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग । सेंदुरविलेपनें[3] चांग । मुगुटीं नाग मिरविला ॥ ३ ॥ जया मानवती देव ऋषि मुनी । पाहातां न पुरे डोळियां धनी । असुर जयाच्या चरणीं । आदीं अवसानीं तो चि एक ॥ ४ ॥ सकळां सिद्धींचा दातार । जयाच्या रूपा नाहीं पार । तुका ह्मणे आम्हुचा दातार । भवसागर तारील हा ॥ ५ ॥

६११. विठ्ठल आमचें जीवन । आगमनिगमाचें स्थान । विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त । विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥ २ ॥ विठ्ठल विस्तारला जनीं । सप्त ही पाताळें भरूनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥ विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥ विठ्ठल बाप माय[4] चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता । विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका ह्मणे आतां[5] नाहीं दुसरें ॥ ५ ॥

६१२. बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिला चि ठाव । दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवा फळला शकुन । अवघा

१ पं. त. प्रौढ.—२ पं. तेणें फिटे आतां अंधकारु.—३ पं. सेंदुर विलेपन.—४ पं. माय बाप —५ पं. हा शब्द नाहीं.

निवारिला सिण। तुमचें जालिया दरुषण। जन्ममरण नाहीं आतां ॥ ध्रु ॥ बरवें जालें आलों या ठाया। होतें संचित ठायींचा पाया। देहभाव पालटली काया। पडली छाया ब्रह्मींची ॥ २ ॥ जोडिलें नें सरे हें धन। अविनाश आनंदघन। अमूर्तमूर्ति मधुसूदन। सम चरण देखियेले ॥ ३ ॥ जुनाट जुगादिचें नाणें। बहुता काळाचें ठेवणें। लोपलें होतें पारिखेपणें। ठावचळण चुकविला ॥ ४ ॥ आतां या जीवाचियासाठीं। न सुटे पडलिया मिठी। तुका ह्मणे सिणलों जगजेठी। न लवीं दिठी दुसऱ्याची ॥ ५ ॥

६१३. मी तंव अनाथ अपराधी। कर्महीन मतिमंदबुद्धी। तुज म्यां *पाठविलें नाहीं कधीं। वाचे कृपानीधी मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं ऐकिलें गाइलें गीत। धरिली लाज सांडिलें हित। नावडे पुराण बैसले संत। केली बहुत परनिंदा ॥ ध्रु ॥ केला करविला नाहीं उपकार। नाहीं दया आली पीडितां पर। करूं नये तो केला व्यापार। वाहिला भार कुटुंबाचा ॥ २ ॥ नाहीं केलें तीर्थाचें भ्रमण। पाळिला पिंड करचरण। नाहीं संतसेवा घडलें दान। पूजावलोकन मुर्तीचें ॥ ३ ॥ असंगसंग घडले अन्याय। बहुत अधर्म उपाय। न कळे हित करावें तें कार्य। नये बोलूं आठवूं तें ॥ ४ ॥ आप आपण्या घातकर। शत्रु जालों मी दावेदार। तूं तंव कृपेचा सागर। उतरीं पार तुका ह्मणे ॥ ५ ॥

६१४. आतां पावेन सकळ सुखें। खादलें कदा तें नखें। अवघें सरलें पारिखें। सकळ देखें माहियेरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जवळी विठ्ठल रखुमाई। बहिणी बंधु बाप आई। सकळ गोताची च साई। पारिखें काई ऐसें नेणिजे ॥ ध्रु ॥ जगदाकारीं जाली सत्ता। वारोनी गेली पराधीनता। अवघें आपुलें चि आतां। लाज आणि चिंता दुऱ्हावली ॥ २ ॥ वावरे इच्छा वसे घरीं। आपुले सत्तेचे माहेरीं। करवी तैसें आपण करीं। भीड न धरी चुकल्याची ॥ ३ ॥ सोसिला होता सासुरवास। बहुतांचा बहुत दिवस। बहु कामें पुरविला सोस। आतां उदास आपुल्यातें ॥ ४ ॥ करिती कवतुक लाडें। मज बोलविती कोडें। मायबाप उत्तरें गोडें। बोले बोबडें पुढें तुका ॥ ५ ॥

६१५. सर्वसुखाचिंया आशा जन्म गेला। क्षण मुक्ती यत्न नाहीं केला। हिंडतां दिशा सीण पावला। मायावेष्टिला जीव माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें स्वहित नेणती कोणी। कांहीं न करितां मजवांचुनी। सज्जन तंव सुखमांडणी। नेणती कोणी आदि अंत ॥ ध्रु ॥ काय सांगों गर्भींची यातना। मज भोगितां नारायणा।

---

१ दे. ठायींच.–२ पं. हें न सरे.–३ पं. समचरणीं.–४ पं. पुराणा.–५ पं. आप आपणिया.–६ दे. क. पावन.–७ पं. न देखें.–८ पं. माहियेरे.–९ पं. सर्व सुखाची. * "आठविलें" पाहिजे.

मांस मळ मूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यात असें[1] ॥ २ ॥ मज चालतां प्रयाणकाळीं । असतां न दिसती जवळी । मृत्तिके मृत्तिका कवळी । एकले मेळीं संचिताचे ॥ ३ ॥ आतां मज ऐसें करीं गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा । तुका विनवीतसे केशवा । चालवीं दावा संसारें ॥ ४ ॥

६१६. अगा ए सावळ्या सगुणा । गुणनिधिनाम नारायणा । आमची परिसा विज्ञापना । सांभाळी दीना आपुलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु या उदराचे कष्ट । आह्मांसि केलें कर्मभ्रष्ट । तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्यें ॥ ध्रु ॥ जालों पांगिला जनासी । संसाराची आंदणी दासी । न कळे कधीं सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥ २ ॥ येथें तों नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक नाहीं । पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसे चि* ना ॥ ३ ॥ जीवित्व वेचिलें[2] वियोगें । हिंडतां प्रवास वाउगें । कांहीं व्याधि पीडा रोगें । केलिया भोगें तडांतोडी[3] ॥ ४ ॥ माझा मीं च जालों शत्रु । कैंचा पुत्र दारा कैंचा मित्रु । कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका ह्मणे ॥ ५ ॥

६१७. आतां मज धरवावी शुद्धि । येथुनी परतवाची बुद्धि । घ्यावें सोडवुनि कृपानिधि । सांपडलों संधीं काळचक्रीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिसील तरि नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई । आपुले करुणेची खाई । करीं वो आई मजवरी ॥ ध्रु ॥ मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभावें त्या गुणें । नेणें आयुष्य जालें[4] उणें । पुढील पेणें अंतरलें ॥ २ ॥ आतां मज वाटतसे भय । दिवसेंदिवस चालत जाय । येथें म्या येउनि केलें काय । नाहीं तुझे पाय आठविले ॥ ३ ॥ करूनि अपराध क्षमा । होतील केले पुरुषोत्तमा । आपुले नामीं घ्यावा प्रेमा । सोडवीं भ्रमापासुनिया[5] ॥ ४ ॥ हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव हा पायांपें चरणीं । करूं हा[6] रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका ह्मणे ॥ ५ ॥

६१८. जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन । जगजीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जो या उभा* भीवरेच्या[7] तिरीं । कट धरूनियां करीं । पाउलें सम चि साजिरीं । अंतरीं धरोनि राहेन ॥ ध्रु ॥ जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ । खेळे हीं लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥ २ ॥ जो या गोपाळांच्या मेळीं । खेळ खेळे वनमाळी । रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥ ३ ॥ जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं

---

१ पं. ध्यातसें.—२ दे. क. त. वेचलों—३ पं. तडातडा तोडी.—४ पं. होतें.—५ पं. भवभ्रमापासुनि.—६ दे. त. कहा रस सेवन.—७ क. भीमरेच्या. * पं. हा शब्द नाहीं.

सकळ कळा । जयाचे गळां वैजयंतीमाळा । तया वेळोवेळां दंडवत ॥ ४ ॥ जयाचे नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसी जयाची दासी । तो[1] हा तेजःपुंज रासी । सर्वभावें त्यासि तुका शरण ॥ ५ ॥

६१९. काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण । ऐसें तुम्ही सांगा[2] संतजन । करा समाधान चित्त माझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय हें खंडईल कर्म । पारुपतील धर्माधर्म । कासयानें तें कळे वर्म । ह्मणउनी श्रम वाटतसे ॥ छ्र ॥ काय हो स्थिर राहेल बुद्धी । कांहीं अरिष्ट न[3] येल मधीं । धरिली[4] जाईल ते शुद्धी । शेवट कधीं तो मज न कळे ॥ २ ॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं । घालीन पायीं देवाचे मिठी । मज तो कुरवाळील[5] जगजेठी । दाटइन कंठीं सद्गदित ॥ ३ ॥ काय हे[6] निवतील डोळे । सुख तें देखोनी सोहळे । संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥ ४ ॥ ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ । रात्रिदिवस हे चि* तळमळ । तुका ह्मणे नाहीं आपुलें बळ । जेणें फळ पावे निश्चयेंसी ॥ ५ ॥

६२०. तूंचि अनाथाचा दाता । दुःख मोह नासावया चिंता । शरण आलों तुज आतां । तारीं कृपावंता मायबापा ॥ १ ॥ संतसंगति देईं चरणसेवा । जेणें[7] तुझा विसर न पडावा । हा च भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥ २ ॥ मज[8] भाव प्रेम देईं कीर्ती । गुण नाम वर्णावया स्तुती । विघ्नां सोडवूनि हातीं । विनंती माझी परिसावी हे ॥ ३ ॥ आणीक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्यचाड धनें[9] । सांकडें न पडे तुज जेणें । दुजें भक्तीविण मायबापा ॥ ४ ॥ जोडोनियां कर पायीं ठेवीं[10] माथा । तुका विनवी पंढरिनाथा । रंगीं वोडवावी रंगकथा । पुरवीं[11] व्यथा मायबापा ॥ ५ ॥

६२१. सेंदरीं[12] हें देवी दैवतें । कोण †तीं पुजी भुतेंकेतें । आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी । कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधरा[13] ॥ छ्र ॥ दासीचा पाहुनरउखतें[14] । धणी देईल आपुल्या हातें । करुणाभाषणउचितें । हें तों रितें सतंत शक्तिहीन ॥ २ ॥ काय तें थिल्लरीचें पाणी ।

---

१ दे. जो हा तेजोपुंज्यरासी. क. तो हा तेजो पुञ्जरासी –२ पं. सागाल तुह्मी सतजन.– ३ त. पं. न येलकीं मधीं.–४ त. पं. धरिले जाईल ते सिद्धी.–५ दे. त. कृवाळील.–६ त. ते.– ७ त. जेणें तुझा विसर न व्हावा पं. क. जेणें हा तुझा विसर न पडावा.–८ पं. मज भाव देईं परमप्रीति –९ त. धनें –१० पं. ठेवितों –११ पं. देवा मनोरथ.–१२ त. सेंदरीं हेंदरीं देवी दैवतें. पं. सेंदरीं हेंदरीं दैवतें.–१३ पं. अधीरा.–१४ त. पं. पाहुणेर उखीतें. *दे. क. "हे चि" हे शब्द नाहींत. † पं. हा शब्द नाहीं.

ओठ न भिजे न फिटे धणी । सीण तरीं आदीं आवसानीं । क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥ ३ ॥ विलेपनें बुजविती तोंड । भारे खोल वाहाती उदंड । करविती आपणयां दंड । ऐसियास भांड ह्मणे देव तो ॥ ४ ॥ तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन । तुका ह्मणे त्याचें करा चिंतन । वंदूं चरण येती सकळें ॥ ५ ॥

६२२. विषयओढीं भुलले जीव । आतां यांची कोण करील कींव । नुपजे नारायणीं भाव । पावोनि ठाव नरदेह ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण सुख धरोनि संसारीं । पडोनि काळाचे आहारीं । माप या लागलें शरीरीं । जालियावरी सळे ओढिती ॥ ध्रु ॥ बापुडीं होतील सेवटीं । आयुष्यासवें जालिया तुटी । भोगिले मागें पुढें ही कोटी । होईल भेटी जन्मासी ॥ २ ॥ जंतिली घाणां बांधोनि डोळे । मागें जोडी आर तेणेंही पोळे । चालिलों किती तें न कळे । दुःखें हारंबळे भूकतान ॥ ३ ॥ एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित । तें हें देह मानुनि अनित्य । न करिती नित्य नामस्मरण ॥ ४ ॥ तुका ह्मणे न वेंचतां मोल । तो हा यासि महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचे चि बोल । केवढें खोल अभागिया ॥ ५ ॥

६२३. आले हो संसारा तुह्मी एक करा । मुक्तिमारग हळू चि धरा । काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा देचकसी ना ॥ १ ॥ नाहीं त्या यमासि करुणा । बाहेर काढितां कुडी प्राणा । ओढाळ सांपडे जैं धान्या । चोर यातना धरिजेतां ॥ २ ॥ नाहीं दिलें पांवेल कैसा । चालतां पंथें तेणें वळसा । नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती वंद जैसा धरोनियां ॥ ३ ॥ क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं । ओढिती कांटवणा सोई । अग्निस्तंभीं बाही कवटाळविती ॥ ४ ॥ देखोनि अंगें कांपती । तये नदीमाजी चालविती । लागे ठाव न लगे बुडविती । वरि मारिती यमदंड ॥ ५ ॥ तानभूक न साहावे वेळ । तो राखिती कितीएक काळ । पिंड पाळूनि कैसा सीतळ । तो तप्तभूमीं ज्वाळ लोळविती ॥ ६ ॥ ह्मणउनी करा कांहीं सायास । व्हावेल तर व्हा रे उदास । करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका ह्मणे ॥ ७ ॥

६२४. न बोलसी तें ही कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा । तुज मी नाहीं घालीत गोवा । भींड केशवा कासयाची ॥ १ ॥ उतरीं आपुला हा पार । मजशीं बोलोनि उत्तर । माझा तुज नव्हे अंगीकार । मग विचार करीन मी ॥ २ ॥ दात्या आणि मागत्यासी । धर्मनीति तरी बोलिली ऐसी । यथानशक्ति टाकेल तैसी ।

---

१ क. भारखोल.–२ पं. जुतिले.–३ क. हारवळे. पं. आरंबळे –४ दे. क. देखसी ना.–५ पं. जैसे –६ दे. क. पं. पावइल.–७ त. पंथें.–८ दे. क. वोढितां –९ दे. त. दातया आणि मागतयासीं.

बाधी दोघांसी विन्मुखता ॥ ३ ॥ ह्मणोनि करितों मी आस । तुझिया वचनाची वास । धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ॥ ४ ॥ तुझें म्यां घेतल्या वांचून । न वेंजें एथूनि वचन । हा चि माझा नेम सत्य जाण । आहे नाहीं ह्मण तुका ह्मणे ॥ ५ ॥

६२५. आतां मी न पडें सायासीं । संसारदुःखाचिये पाशीं । शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ॥ १ ॥ न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधले पाय । आतां मज न विसंबें माय । मोकलूनि धाय विनवीतसें ॥ २ ॥ बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें । त्रिगुण येतील लहरें । तेणें दुःखें थोरें[3] आक्रंदलों ॥ ३ ॥ आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिती । न साहे पाषाण फुटती । भेंय चित्तीं कांप भरलासे ॥ ४ ॥ आतां मज न साहवे सर्वथा । संसारगंधीची हे* वार्ता । जालों वेडा असोनि जाणता । पावें अनंता तुका ह्मणे ॥ ५ ॥

६२६. आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरि तारीं मारीं । जवळी अथवा दुरी धरीं । घाली संसारीं अथवा नको ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहीं च नेणें । मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहुनी ॥ ध्रु ॥ मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरती । सकळ खुंटलिया युक्ती । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥ २ ॥ सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव । आतां करीं कळे तो उपाव । तूं चि सर्व ठाव माझा देवा ॥ ३ ॥ राहिलों धरूनि विश्वास । आधार नेटीं तुझी कास । आणीक नेणें मी सायास । तुका ह्मणे यास तुझें उचित ॥ ४ ॥

६२७. देवा तूं कृपाकरुणासिंधु । होसी मायबाप आमचा बंधु । जीवनसिद्धि साधनसिंधु । तोडिसी भवबंधु काळपाश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरणागता वज्रपंजर । अभयदाना तूं उदार । सकळां देवां तूं अगोचर । होसी अविकार अविनाश ॥ ध्रु ॥ भागली स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार । जाणावया तुझा हा विचार । नको अंतर देऊं आतां ॥ २ ॥ नेणें भाव परि ह्मणवीं तुझा । नेणें भक्ति परि करितों पूजा । आपुल्या नामाचिया काजा । तुज केशीराजा लागे धांवणें ॥ ३ ॥ तुझिया बळें पंढरीनाथा । जालों निर्भर तुटली व्यथा । घातला भार तुझिया माथां । नेंभीं सर्वथा तुका ह्मणे ॥ ४ ॥

---

१ पं. येथून न वजे वचन—२ दे क. त. लाधती—३ पं. थोर—४ पं. भय कांप चित्तीं भरलासे.—५ दे. देवां.—६ पं. भियें. * त. हा शब्द नाहीं.

६२८. कोण सुख धरोनि संसारीं । राहों सांग[1] मज वो हरी । अवघ्या नाशिवंतां परी । थितां[2] दुरी अंतरसी ॥ १ ॥ प्रथम केला गर्भी वास । काय ते सांगावे सायास । दुःख भोगिलें नव ही मास । आलों जन्मास येथवरी ॥ २ ॥ बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा । वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरें मागुता जन्म धरीं ॥ ३ ॥ क्षण एक तो ही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा । भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥ ४ ॥ आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनि राहेन द्वारीं । तुझा दास मी दीन कामारी । तुका ह्मणे करीं कृपा आतां ॥ ५ ॥

६२९. सुख या संतसमागमें । नित्य दुनांवे[3] तुझिया नामें । दहन होती सकळ कर्में । सर्वकाळ प्रेमें डुलेतसों[4] ॥ १ ॥ ह्मणोनि नाहीं कांहीं चिंता । तूं चि आमुचा मातापिता । बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ २ ॥ ऐसा हा कळला निर्धार । मांझा[5] तुज न पडे विसर । असती देऊनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळा ॥ ३ ॥ दुःख तें कैसें नये स्वप्नासी । भुक्तिमुक्ति जाल्या कामारी दासी । त्यांचें वर्म तूं आह्मांपाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥ ४ ॥ जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आह्मां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका ह्मणे ॥ ५ ॥

६३०. देवा तूं आमचा कृपाळ । भक्तिप्रतिपाळ[6] दीनवत्सळ । माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥ १ ॥ तुज लागली सकळ चिंता । राखणें लागे वांकडें जातां । पुंढती[7] निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥ २ ॥ आह्मां भय चिंता नाहीं धाक । जन्म मरण कांहीं एक । जाला इहलोकीं परलोक । आलें सकळैकवैकुंठ ॥ ३ ॥ न कळे दिवस कीं रांती[8] । अखंड लागलीसे ज्योती । आनंदलहरींची गती । वर्णूं कीर्ती[9] तया सुखा ॥ ४ ॥ तुझिया नामाचीं भूषणें । तों यें[10] मज लेवविलीं लेणें । तुका ह्मणे तुझियान[11] गुणें । काय तें उणें एक आह्मां ॥ ५ ॥

६३१. न पवे सन्निध वाटते चिंता । वरि यों[12] बहुतांची सत्ता । लुगवे पडत जातो गुंता । कर्मा[13] बळिवंता सांपडलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी । उघड्या नागविलों चोरीं । घरिच्याघरीं जाणजाणतां ॥ ७९ ॥

१ पं. बाहेरी.—२ पं. थिता दुरी तूह्मी अतरसी.—३ पं. दुणावे.—४ क. पं. डुलतसों.—५ दे. त. मा माझा तुज न पडे विसर.—६ पं. भक्तिपाळ.—७ दे. त. पुढती.—८ दे. त. रात्री.—९ पं. किती.—१० त. पं. तोये मज लेवविलें लेणें.—११ पं. तुझिया गुणें.—१२ क. वारियां; त. वरया; पं. वरीया.—१३ पं. कर्म.

तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां । जाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥ २ ॥ आति हा निकट समय । मग म्यां करावें तें काय । दिवस गेलिया ठाकईल छाय । उरईल हाय रातिकाळीं ॥ ३ ॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । बहुत चिंता प्रवर्तली ॥ ४ ॥ ऐसी या संकटाची संधी । धांव घालावी कृपानिधी । तुका ह्मणे माझी बळबुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥ ५ ॥

६३२. आतां धर्माधर्मीं कांहीं उचित । माझें विचारावें हित । तुज मी ठाउका पतित । शरणागत परि जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं । पावलों पाय भलत्या परी । मग बाहेरी न घालावें ॥ ध्रु ॥ ऐसें हें चालत आलें मागें । नाहीं मी बोलत वाउगें । आपुलिया पहिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वाणिजेते[1] ॥ २ ॥ घालोनियां माथां बैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार । आधीं हे विचारिली थार । अविनाश पर पद ऐसें ॥ ३ ॥ येथें एक वर्म पाहिजे धीर । परि म्यां लेखिलें असार । देह हें नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥ ४ ॥ केली आराणुक सकळां हातीं । धरावें धरिलें तें चित्तीं । तुका ह्मणे सांगितलें संतीं । देई अंतीं ठाव मज देवा ॥ ५ ॥

६३३. बरवें झालें आलों जन्मासी । जोड जोडिली मनुष्य देहा ऐसी । महा लाभाची उत्तम रासी । जेणें[3] सुखासी पात्र होइजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिलीं इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन । जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥ ध्रु ॥ तिळेंतीळ पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे । नाम तुझें वाचेसी आतुडे । समागम घडे संतांचा ॥ २ ॥ ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काई होऊं उतराई । येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ३ ॥ फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ । लावूनि स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ४ ॥ नाहीं या* आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा । आला आकारा आमुच्या चाडा । तुका ह्मणे भिडा भक्तीचिया[4] ॥ ५ ॥

६३४. अल्प भाव अल्प मती । अल्प आयुष्य नाहीं हातीं । अपराधाची वोळिलों मूर्ती । अहो वेदमूर्ती परियेसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें मळिलें अंतर । आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें[5] नाहीं ॥ ध्रु ॥ विविध कर्म चौऱ्याशी फेरा । त्रिविध भोग या शरीरा ।

---

१ पं. वहु.—२ क. वाखाणिजेते. पं. वाखाणिजे.—३ त. पं जेणें सर्व सुखासी.—४ पं. भक्ताचिया.—५ पं. नाहीं ऐसें. *पं. हा शब्द नाहीं.

कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरणसांटवण ॥ २ ॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये[1] भिन्न[2] पंच भूतें । रचतें खचतें संचितें[3] । असार रितें फलकट ॥ ३ ॥ पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर । मिळतां काष्ठें लोटतां पूर । आदळीं दूर होती खेंळाळीं[4] ॥ ४ ॥ ह्मणोनि नांसावें[5] अज्ञान । इतुलें करीं कृपादान । कृपाळु तूं जनार्दन । धरूनि चरण तुका विनवी ॥ ५ ॥

६३५. ऐसी हे गर्जवूं वैखरी । केशव मुकुंद[6] मुरारी । राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जनार्दना जगजीवना । विराटस्वरूपा वामना । महदादि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥ छ ॥ चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा । सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥ २ ॥ मदनमूर्ती मनमोहना । गोपाळगोपिकारमणा । नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥ ३ ॥ गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी आणि सर्वजाणा । करोनि अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ॥ ४ ॥ कासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पावें या देवा । वश्य तो नव्हे वांचुनि भावा । पाय जीवावेगळे न करी तुका ॥ ५ ॥

६३६. होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळले नवसीं । जोडिते नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरिले जीवीं न सोडीं पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ छ ॥ मज तों पडियेली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली वैरें[7] जालें ॥ २ ॥ आतां हा सिद्धि पावो भाव । मध्यें चांचल्यें[8] न व्हावा जीव । ऐसी तुह्मां भाकीतसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥ ३ ॥ कळों येते[9] आपुले बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं । केवढे[10] आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥ ४ ॥ कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी । प्रीति हे[11] लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ५ ॥

६३७. तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्प मति नारायणा । भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाणावें म्यां दीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें । धड तें तोंड धोऊं[12] नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥ छ ॥ न लवीं आणीक कांहीं पिसें । माझिया मना वांयां जाय ऐसें ।

---

१ दे. क. यें—२ पं. भिन्नभिन्न.—३ पं. त. सचतें.—४ दे. खलाळीं. त. पं. खळाळी.—५ क. नसावें.—६ त. पं. मुकुदा.—७ पं. वरवें—८ पं. चांचल्य—९ दे. त. क. येतें.—१० पं. येवढे.—११ त. ही.—१२ पं. धुऊ.

चालवीं आपुल्या प्रकाशें । हातीं सरिसें धरोनियां ॥ २ ॥ तुजे[1] समर्पिली काया । जीवें भावें पंढरीराया । सांभाळीं समविषम डाया । करीं छाया कृपेची ॥ ३ ॥ चतुर तरीं चतुरां रींव[2] । जाणता तरीं जीवांचा जीव । न्यून तो कोण एक ठाव । आरुष भाव परि माझा ॥ ४ ॥ होतें तें माझें भांडवल । पायांपें निवेदिले[3] बोल । आदरा ऐसें पाविजे मोल । तुका ह्मणे साच फोल तूं जाणसी ॥ ५ ॥

६३८. कां हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार । अनंत पाववीलीं उद्धार । नव्हे चि थार मज शेवटीं ॥ १ ॥ पाप बळिवंत गाढें । तुज ही राहों सकतें पुढें । मागील कांहीं राहिलें ओढें । नवल कोडें[4] देखियेलें ॥ २ ॥ काय मानिती संतजन । तुमचें हीनत्ववचन । कीं वृद्ध जाला नारायण । न चले पण आधील तो ॥ ३ ॥ आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरच्याघरीं । धरिलें दुरी तेव्हां धरिलें ॥ ४ ॥ नको चाळवूं अनंता । कासया होतोसि नेणता । काय तूं नाहीं धरीत सत्ता । तुका ह्मणे आतां होई प्रगट ॥ ५ ॥

६३९. मज ते हांसतील संत । जींहीं देखिलेती मूर्तिमंत । ह्मणोनि उद्वेगलें चित्त । ऑहा[5] च भक्त ऐसा दिसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ध्यानीं ध्या वर्णावेति कैसे । पुढें एकीं स्तुति केली असे । तेथूनि जीव निघत नसे । ऐसिये आंसे लागलोंसें ॥ छ ॥ कासया पाडिला जी धडा । उगा चि वेडा आणि वांकडा । आह्मां लेंकरांसि पीडा । एक मागें जोडा दुसऱ्याचा ॥ २ ॥ सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय । तूं तंव सम चि सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥ ३ ॥ नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेति नारायणा । वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावीं ॥ ४ ॥ बहुत दिवस केला बोभाट । पाहातां श्रमलों ते वाट । तुका ह्मणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥ ५ ॥

६४०. बरें जालें आजिवरी । नाहीं पडिलों मृत्याचे आहारीं । वांचोन आलों एथवरी । उरलें तें हरी तुह्मां समर्पण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिला या काळें अवकाश । नाहीं पावलें आयुष्य नाश[6] । कार्या कारण उरलें शेष । गेलें तें भूस जावो परतें ॥ छ ॥ बुडणें खोटें पावतां थडी । स्वप्नीं जाली ओढाओढी । नासली जागृतीची घडी । साच जोडी शेवटीं गोड घास ॥ २ ॥ तुह्मासि पावविली हाक । तेणें निरसला धाक । तुमचें भातें हें कवतुक । जे शरणागत लोक रक्षावे ॥ ३ ॥ रवीच्या नावें निशीचा

---

१ पं. तुज हे समर्पिली काया.—२ दे. क. पं. रावो.—३ दे. त. दिसे.—४ त. पं. केवढें.—५ त. आहां क. अहा.—६ दे. क. आश.

नाश। उदय होतां चि प्रकाश। अतां कैचा आह्मां दोष। तूं जगदीश कैवारी ॥ ४ ॥ आतां जळो देह सुख दंभ मान। न करीं याचें साधन। तूं जगदादि नारायण। आलों शरण तुका ह्मणे ॥ ५ ॥

६४१. आतां माझा नेणों[3] परतों भाव। विसावोनि पायीं ठेविला जीव। सकळां लाभांचा हा ठाव। ऐसा वाव जाला चित्ताठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भांडवल गांठी तरि विश्वास। जालों तों जालों निश्चय दास। न पाहें मागील ते वास। पुढती सोस सेवेचा ची ॥ ध्रु ॥ आहे तें निवेदिलें सर्व। मी* हें माझें मोडियला गर्व। अकाळीं काळ अवघें पर्व। जाला भरवसा कृपेलाभाचा ॥ २ ॥ वेव्हारीं वेव्हारा अनंत। नाहीं यावांचुनी जाणत। तरी हें समाधान चित्त। लाभहानी नाहीं येत अंतरा ॥ ३ ॥ करूनि नातळों संसारा। अंग भिन्न राखिला पसारा। कळवळा तो जीवनीं खरा। बीजाचा थारा दुरी आघात ॥ ४ ॥ वहुँ मतापासूनि निराळा। होऊनि राहिलों सोंवळा। बैसल्याँ रूपाचा कळवळा। तुका ह्मणे डोळां लेइलों तें ॥ ५ ॥

६४२. तुळसीमाळा घालुनी कंठीं। उभा विटेवरी जगजेठी। अवलोकोनि पुंडलीका दृष्टी। असे भीमातटीं पंढरीराय ॥ १ ॥ भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी। रिद्धिसिद्धि वोळगती द्वारीं। सुदर्शन घरटी करी। काळ कांपे दुरी धाकें तया ॥ २ ॥ जगज्जननी असे वाम भागीं। भीमकी शोभली अर्धांगीं। जैसी विद्युल्लता झमके मेघीं। दरुषणें भंगी महा दोष ॥ ३ ॥ सुखसागर परमानंदु। गोपींगोपाळां गोधनां छंदु। पाक्षिश्वापदां जयाचा वेधु। वाहे गोविंदु पांवा छंदें ॥ ४ ॥ मुखमंडित चतुर्भुजा। मॅनमोहन गरुडध्वजा। तुका ह्मणे स्वामी माझा। पावे भक्तिकाजा लवलाहीं ॥ ५ ॥

६४३. हातींचें न संडावें देवें। शरण आलों जीवें भावें। आपुलें ऐसें ह्मणावें। करितों जीवें निंबलोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसतां संतांचे पंगती[10]। कळों आलें कमळापती। आपुलीं कोणी च नव्हती। निश्चय चित्तीं दृढ जाला ॥ ध्रु ॥ येती तुझिया भजना आड। दाविती प्रपंचाचें कोड। कनिष्ठीं[11] रुचि ठेऊनि गोड। देखत नाड कळतसे ॥ २ ॥ मरती मेलीं नेणों किती। तो चि लाभ तयाचे संगती। ह्मणोनि येतों काकुलती। धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥ ३ ॥ सुखें

---

१ त. आह्मां कैंचा –२ क. पं. जगदीश –३ क. दे. नेणों.–४ पं. क. माझा.–५ पं. अकाळ.– ६ त. वहुत.–७ पं. क. बैसला.–८ त. क. पं. गोपी गोपाळा गोधना छंदु –९ दे. त. मनमोहना.– १० पं. क. संगती.–११ पं. क. कनिष्ठ. * पं. "मी हें" हे दोन शब्द नाहींत.

निंदोत हे जन । न करीं तयांशीं वचन । आदिपिता तूं नारायण । जोडी चरण तुमचे तें[1] ॥ ४ ॥ आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित । तरी मी नष्ट चि पतित । तुका ह्मणे मज संत हांसती ॥ ५ ॥

६४४. बरवें जालें लागलों कारणीं । तुमचे राहिलों[3] चरणीं । फेडीन संतसंगती धणी । गर्जाइल गुणीं वैखरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न वंचे[2] शरीर सेवेसी । काया वाचा आणि मनेसीं । जालों संताची अंदणी दासी । केला याविशीं निर्धार ॥ ध्रु ॥ जीवनीं राखिला जिव्हाळा । जालों मी मजसीं निराळा । पंचभूतांचा पुतळा । सहज लीळा वर्ततसे ॥ २ ॥ जयाचें जया होईल ठावें । लाहो या साधियेला भावें । ऐसें होतें राखियलें[4] जीवें । येथूनि देवें भोंवहुनी[5] ॥ ३ ॥ आस निरसली ये खेपे । अवघे पंथ जाले सोपे । तुमचे दीनबंधु कृपें । दुसरें कांपे सत्ताधाकें ॥ ४ ॥ अंकिले पणें आनंदरूप । आतळों नये पुण्यपाप । सारूनि ठेविले संकल्प । तुका ह्मणे आपें आप एकाएकीं ॥ ५ ॥

६४५. अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ती । प्रगटे हृदयींची मूर्ती । भावशुद्धि जाणोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळां कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळ ही ॥ ध्रु ॥ जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास । सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥ २ ॥ येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें । आपण चि येती तयांचे[6] गुण । जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥ ३ ॥ न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म । आणीक न करावे श्रम । एक पुरे नाम विठोबाचें ॥ ४ ॥ वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य । मुक्ता आत्मा परिपूर्ण । तुका ह्मणे सगुण भोळ्या आह्मां ॥ ५ ॥

६४६. श्रीअनंता मधुसूदना । पद्मनाभा नारायणा । जगव्यापका जनार्दना । आनंदघना अविनाशा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळदेवा[7] आदिदेवा । कृपाळुवा जी केशवा । [*]महा[8] महानुभवा[9] । सदाशिवा सहजरूपा ॥ ध्रु ॥ चक्रधरा विश्वंभरा । गरुडध्वजा करुणाकरा । सहस्रपादा सहस्रकरा । क्षीरसागरा शेषशयना ॥ २ ॥

---

१ पं. क. ते. 'जोडीं चरण तुमचे ते' असा पाठ असता तर हल्लींच्यापेक्षां चांगला अर्थ होता. पण 'जोडी' यावर अनुस्वार कोणत्याच प्रतींत नाहीं, व 'तें' असे दे. त. व क. या पुस्तकात आढळतें क. च्या प्रतींतील 'तें' वरचा अनुस्वार मागून खोडला आहे.–२ दे. वंचें.–३ पं. राहिला.–४ त. राखियलें होतें.–५ क. भोंवहूनि.–६ दे. क. त. तयाचा.–७ क. सकळ देवाधिदेवा.–८ पं. महानदा महानुभावा.–९ क. पं. महानुभावा. * दे. क. हा शब्द नाहीं.

कमलनयना कमलापती । कामिनीमोहना मदनमूर्ती । भवतारका धरित्या क्षिती । वामनमूर्ती त्रिविक्रमा ॥ ३ ॥ अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगज्जीवना । वसुदेवदेवकीनंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ॥ ४ ॥ तुका आला लोटांगणी । मज ठाव द्यावा जी चरणीं । हे चि करीतसें विनवणी । भवबंधनीं सोडवावें ॥ ५ ॥

६४७. आतां येणें बळें पंढरीनाथ । जवळी राहिला तिष्ठत । पाहातां न कळे जयाचा अंत । तो चि हृदयांत घालूं आतां ॥ १ ॥ विसरोनि आपुला देहपणभाव । नामें चि भुलविला पंढरीराव । न विचारी यांती कुळ नांव । लागावया पाव संतांचे ॥ २ ॥ वर्में वर्म आलें आम्हांचिया हातां । हिंडावें धुंडावें न लगतां । होय अविनाश सहाकारी दाता । चतुर्भुज संता परि धाकें ॥ ३ ॥ होय आवडी सानें थोर । रूप सुंदर मनोहर । भक्तिप्रिय लोभापर । करी आदर याचकपणें ॥ ४ ॥ तें वर्म आलें आम्हुच्या हाता । ह्मणोनि शरण निघालों संतां । तुका ह्मणे पंढरीनाथा । न सोडीं आतां जीवें भावें ॥ ५ ॥

६४८. माझा तंव खुंटला उपाव । जेणें तुझे आतुडती पाव । करूं भक्ति तरि नाहीं भाव । नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥ १ ॥ धर्म करूं तरि नाहीं चित्त । दान देऊं तरि नाहीं वित्त । नेणें पुजों ब्राह्मण अतीत । नाहीं भूतदया पोटा हातीं ॥ २ ॥ नेणें गुरुदास्य संतसेवन । जप तप अनुष्ठान । नव्हे वैराग्य वनसेवन । नव्हे दमन इंद्रियांसी ॥ ३ ॥ तीर्थ करूं तरि मन नये सवें । व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें । देव जरि आहे ह्मणों मजसवें । तरि आपपरावें न वंचे ॥ ४ ॥ ह्मणोनि जालों शरणागत । तुझा दास मी अंकित । यास कांहीं न लगे संचित । जालों निश्चित तुका ह्मणे ॥ ५ ॥

६४९. तरि म्यां आळवावें कोणा । कोण हे* पुरवील वासना । तुजवांचूनि नारायणा । लावीं स्तना कृपावंते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुला न विचारीं सिण । न धरीं अंगसंगें भिन्न । अंगीकारिलें राखें दीन । देई जीवदान आवडीचें ॥ ध्रु ॥ माझिया मनासिहे आस । नित्य सेवावा ब्रह्मरस । अखंड चरणींचा वास । पुरवीं आस याचकाची ॥ २ ॥ माझिया संचिताचा ठेवा । तेणें हे वाट दाविली देवा । एवढ्या आदराचा हेवा । मागें सेवादान आवडीनें ॥ ३ ॥ आळवीन करुणावचनीं । आणीक गोड न लगे मनीं । निद्रा जागृती आणि स्वप्नीं । धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥ ४ ॥ आतां भेट न भेटतां आहे । किंवा नाहीं ऐसें विचारूनि पाहें । लागला झरा अखंड आहे । तुका ह्मणे सोहे केलें अंतरीं ॥ ५ ॥

---

१ क. यातु कुळ ठाव.—२ दे. त. निश्चित.—३ पं. आवडीचें.—४ पं. साह्य. * पं. हा शब्द नाहीं.

६५०. हें चि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध । आणीक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा गोळा । पदर लागों नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥ ध्रु ॥ भोजना न द्यावें अन्न । जेणें चुके अनुपान । तरीं च घेतल्याचा गुण । होईल जाण सत्य भाव ॥ २ ॥ नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नये वारा । बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥ ३ ॥ पास तें एक द्यावें वरी । नवनीताची होईल[1] परी । होईल गुसळिलें तें निवारी । सार भीतरी नाहीं तया ॥ ४ ॥ न्हायें अनुतापीं पांघरें दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा । होसील मागें होतासि तैसा । तुका ह्मणे दशा भोगीं वैराग्य ॥ ५ ॥

६५१. मागुता हा चि जन्म पावसी । भोगिलें सुखदुःख जाणसी । हें तों न घडे रे सायासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥ १ ॥ लक्ष चौऱ्याशी न चुके फेरा । गर्भवासीं यातना थोरा । येऊनि पडसी संदेहपुरा । वोळसा थोरा मायाजाळीं ॥ २ ॥ पशु काय पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगिती । कांहीं एक उपजतां मरती । बैहिरीं[2] अंध होती पांगुळ मुकीं ॥ ३ ॥ नरदेह निधान लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गती । होइन देव चि ह्मणती ते होती । तरि कां चित्तीं न धरावें ॥ ४ ॥ क्षण एक मन स्थिर करूनी । सावधं[3] होईं डोळे उघडोनी । पाहें[4] वेद बोलिले पुराणीं । तुका विनवणी करीतसे ॥ ५ ॥

६५२. दास्य करी दासांचें । उणें न साहे तयांचें । वाढिलें ठायींचें । भांणें[5] टाकोनियां धांवे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीं कर । सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥ ध्रु ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचें[6] भूषण । नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लातेचें ॥ २ ॥ सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगीकारी । सेवकाच्या शिरीं । धरूनि चाले पादुका ॥ ३ ॥ राखे दारवंटा[7] बळीचा । सारथी[8] जाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥ ४ ॥ भिडा नो[9] बोलवे पुंडलिकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं । तुका ह्मणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥ ५ ॥

६५३. हरि तैसे हरीचे दास । नाहीं तयां भय मोह चिंता आस । होउनि राहाती उदास । बळकट कांस भक्तीची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरूनि पाय त्यजिलें[10] जन । न लगे मान मृत्तिकाधन । कंठीं नाम अमृताचें पान । न लगे आन ऐसें

---

१ पं. होइल—२ क. पं. वहिर.—३ दे. साव—४ त. पाहें वेदीं बोलिलें. क. पाहें वेद वालिलें.—
५ दे. भानें. पं. भाणे क. भाने.—६ त. पं. भक्तांचें.—७ पं. दारवंट.—८ दे. त. क. रथी.—
९ पं. त. न.—१० दे. त. तजिलें.

जालें ॥ ध्रु॥ वाव तरी उदंड च पोटीं । धीर सिंधु ऐसे जगजेठी । कामक्रोधा न सुटे मिठी । गिऱ्हे तरी वेठीं रात्रविती ॥ २ ॥ बळें तरि नागेंवती काळा । लीन तरि सकळांच्या तळा । उदार देहासी सकळा । जाणोनि कळा सर्व नेणते ॥ ३ ॥ संसार तो तयांचा दास । मोक्ष तें[3] पाहातसे वास । रिद्धिसिद्धि देशवेंटा त्रास । न शिवति यास वैष्णवजन ॥ ४ ॥ जन्ममृत्युस्वप्नांसारिखें । आप त्यां न दिसे पारखें । तुका ह्मणे अखंडित सुखें । वाणी वदे मुखें प्रेमामृताची ॥ ५ ॥

६५४. बहुत जाचलों संसारीं । वसें गर्भीं मातेच्या उदरीं । लक्ष चौऱ्याशी योनिद्वारीं । जालों भिकारी याचक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिणें पराधीन आणिकां हातीं । दृढ पाशीं बांधलों संचितीं । प्रारब्ध क्रियमाण सांगाती । भोवंडिती सत्ता आपुलिया ॥ ध्रु ॥ न भरे पोट नाहीं विसांवा । नाहीं नेम एक ठाव गांवा । नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा । लाँही जीवा खापरीं तडफडी ॥ २ ॥ काळ बहुत गेले ऐसिया रीती । आणीक पुंढें नेणों किती । खंडणा नाहीं पुनरावृत्ती । मज कल्पांतीं तरी वेगळें ॥ ३ ॥ ऐसें दुःख कोण हरील माझें । कोणा भार घालूं आपुलें ओझें । भवसिंधुतारक नाम तुझें । धांवसि काजें आडलिया ॥ ४ ॥ आतां धांव घालीं नारायणा । मजकारणें रंका दीना । गुण न विचारीं अवगुणा । तुका करुणा भाकीतसे ॥ ५ ॥

६५५. जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाये । तंव तूं आपुलें स्वहित पाहें । तीर्थयात्रे जायें चुकों नको ॥ १ ॥ जंव काळ असे दुरी ठेला । तंव तूं हरिगुण गायें आइक वहिला । मनीं भाव धरूनि भला । न वंचें त्याला चुकों नको ॥ २ ॥ जोडोनि धन न घंलीं माती । ब्रह्मवृंदें पूजन यंतीं । सत्य आचरण दया भूतीं । करीं सांगाती चुकों नको ॥ ३ ॥ दशा यौवनें बाणली अंगीं । पांगिला नव्हें विषयसंगीं । काम क्रोध लोभ मोह त्यागीं । राहें संतसंगीं चुकों नको ॥ ४ ॥ मग तेथें न चले कांहीं । सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं । पुढें संचित जाईल ग्वाही । तुका ह्मणे ते ही यमआज्ञा ॥ ५ ॥

६५६. ऐक पांडुरंगा एक मात । कांहीं बोलणें आहे एकांत । आह्मां जरी तारील संचित । तरी उचित काय तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उसनें फेडितां धर्म तो कोण । काय तया मानवेल जन । काय गा मिरवूनि भूषण । वांयां थोरपण

---

१ दे. त. वेठी तरी गिन्हे राववीती.–२ दे. क. नांगवती.–३ पं. तो.–४ दे. क. देशटा.–५ दे. प्रेमा अमृताची.–६ दे. क. लाहे.–७ पं. पुढें ही.–८ पं. घालीं.–९ दे. त. इति क. यिति.–१० त. यवोन.

जनांमध्यें ॥ ध्रु ॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान । उपकार तरी धनमंत्रीपणें । जरी देणेंघेणें नाहीं आशा ॥ २ ॥ शूर तों तयासी बोलिजे जाणा । पाठीशीं घालूनि राखे दीना । पार पुण्य नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥ ३ ॥ आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसी तरी च सही । वचन आपुलें सिद्धी नेई । तुका ह्मणे तई मज कळसी ॥ ४ ॥

६५७. चांगलें नाम गोमटें रूप । निवती डोळे हरती ताप । विठ्ठल विठ्ठल हा जप । प्रगट स्वल्प अति सार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शस्त्र हें[1] निर्वाणींचा बाण । निकट समय अवसान । कोठें योजेल दश दान । खंडी नारायण दुःख चिंतनें ॥ ध्रु ॥ सकळ श्रेष्ठांचें मत । पावे सिद्धी पाववी अनंत । ह्मणोनि व्हावें शरणागत । आहे उचित एवढें चि ॥ २ ॥ ह्मणोनि रुसलों संसारा । सर्प विखार[2] हा पांढरा । तुजशीं अंतर रे दातारा । या चि दावेदारानिमित्त[3] ॥ ३ ॥ येणें मज भोगविल्या खाणी । नसतां छंद लाविला मनीं । माजलों मी माझे भ्रमणीं । जाली बोडणी विटंबना ॥ ४ ॥ पावलों केलियाचा दंड । खाणी भोगिविल्या[4] उदंड । आतां केला पाहिजे खंड । तुका दंडवत घाली देवा ॥ ५ ॥

६५८. चांगला तरी पूर्णकाम । गोड तरी याचें चि नाम । दयाळु[5] तरी अवघा धर्म । भला तरी दासा श्रम होऊं नेदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदार तरी लक्ष्मीयेसी[6] । जुंझार तरी कळिकाळासी । चतुर तरी गुणांची च रासी । जाणता तयासी तो एक ॥ ध्रु ॥ जुनाट तरी वहु काळा । न कळे जयाची लीळा । नेणता गोवळीं गोवळा । लाघवी अवळाभुलवणा ॥ २ ॥ गांढ्या तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत । ओंगळ तरी कुब्जेशीं रत । भ्याड अनंत वहु पापा ॥ ३ ॥ खेळतो येणें चि खेळावा । नट तो येणें चि अवगावा[7] । लपोनि जीवीं न कळे जीवा । धरितां देवा नातुडेसी[8] ॥ ४ ॥ उंच तरी बहुत चि उंच । नीच तरी वहुत चि नीच । तुका ह्मणे बोलिलों साच । नाहीं अहाच[9] पूजा केली ॥ ५ ॥

६५९. काय आह्मी भक्ति करणें कैसी । काय एक वाहावें तुह्मांसी । अवघा भरोनि उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं[10] गंधीं ॥ १ ॥ कसें करूं इंद्रियां वंधन । पुण्यपापाचें खंडण । काय व्रत करूं आचरण । काय तुजविण उरलें तें ॥ २ ॥ काय डोळे झांकुनियां पाहूं । मंत्रजप काय ध्याऊं । कवणें ठायीं धरूनि भाव । काय तें वाव तुजविण ॥ ३ ॥ काय हिंडों कवण दिशा । कवणे ठायीं पाय ठेवूं

---

१ त. हा.–२ पं. हा विखार.–३ पं. निमित्य–४ त. पं. भोगिल्या.–५ दे. त. दयाळ.–६ त. लक्ष्मीयेसी.–७ दे. त. पं. आवगावा.–८ पं. त. नातुडसी.–९ त. पं. आहाच.–१० दे. क. रूपगधीं.

कैसा । काय तूं नव्हेसि न कळे तैसा[1] । काय मी कैसा पाहों आतां ॥ ४ ॥ तुझिया नामाची सकळ । पूजा अर्चन मंत्र माळ । धूप दीप नैवेद्य फळ तांबूल । घेऊं पुष्पांजुळ तुका ह्मणे ॥ ५ ॥

६६०. शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोंसुलें । शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥ ध्रु ॥ शरीर विटाळाचें आळें[2] । मायामोहपाशजाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ २ ॥ शरीर सकळ हें[3] शुद्ध । शरीर निधींचा ही निध । शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ३ ॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणाचा रांधा । शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं शुण सुदा[4] एक शरीरीं ॥ ४ ॥ शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख[5] न करीं त्याग । नव्हे वोखटें ना चांग । तुका ह्मणे वेग[6] करीं हरिभजनीं ॥ ५ ॥

६६१. इतुलें करीं भलत्या परी । परद्रव्य परनारी । सांडुनि अभिलाष अंतरीं । वर्ते[7] वेव्हारीं सुखरूप ॥ १ ॥ न करीं दंभाचा सायास । शांती राहें बहुवस । जिव्हे सेवीं सुगंधरस । न करीं आळस रामनामीं ॥ २ ॥ जनमित्र होईं सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा[8] दुर्जनाचा । करीं संतांचा सायास ॥ ३ ॥ करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी[9] ॥ ४ ॥ धरूनि विश्वास करीं धीर । करितां देव हा चि निर्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतरें[10] तुका ह्मणे ॥ ५ ॥

६६२. संसारसिंधु हा दुस्तर । नुलंघवे उलंघितां पार । बहुत वाहाविलें दूर । न लगे चि तीर पैल थडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती जन्म जाला फेरा । गणित नाहीं जी दातारा । पडिलों आवर्तीं भोंवरा । बहुता थोरा वोळसियां[11] ॥ ध्रु ॥ वाढलों परी नेणती बुद्धी । नाहीं परतली धरिली शुद्धि । मग त्यां विचारावें कधीं । ऐसी संधी सांडुनियां ॥ २ ॥ अनेक खाणीं आहार निद्रा । भयमैथुनाचा चि थारा । बाळत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ॥ ३ ॥ ऐसीं उलंघूनि आलों स्थळें । बहु भोवंडिलों काळें । आतां हें उगवावें जाळें । उजेडा[12] बळें दिवसाच्या ॥ ४ ॥ सांडीन[13] या संसाराची वाट । बहु येणें भोगविले कष्ट । दावी सत्या ऐसें नष्ट । तुका ह्मणे भ्रष्ट जालों देवद्रोही ॥ ५ ॥

---

१ पं. ऐसा.–२ दे. क. अळे.–३ त. पं. ही.–४ पं. सुधा.–५ त. न द्यावा.–६ दे. क. पं. सुख.–७ त. वेग हरी भजनीं.–८ त. धरीं.–९ पं. पावसी.–१० पं. अंतपार.–११ क. वोळखिया. १२ पं. उजेडाचे वळें. क. उजेडावें वळें.–१३ पं. सांडुनिया

६६३. विठ्ठल भीमातीरवासी। विठ्ठल पंढरीनिवासी। विठ्ठल पुंडलिकापासीं। कृपादानाविसीं उदार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल स्मरणा कोंवळा। विठ्ठल गौरवीं आगळा। आधार ब्रह्मांडा सकळा। विठ्ठल लीळाविग्रही ॥ ध्रु ॥ उभा चि परी न मनी सीण। नाहीं उद्धेरितां[1] भिन्न। समर्थाचे घरीं एक[2] अन्न। आर्तभूता क्षणोक्षणा सांभाळी ॥ २ ॥ रुचीचे प्रकार। आणिताती आदरें। कोठें ही न पडे अंतर। थोरां[3] थोर धाकुट्यां धाकुटा ॥ ३ ॥ करितां बळ धरितां नये। झोंबतां डोळे मनें च होय। आपुल्या उद्देशाची सोय। जाणे हृदयनिवासी ॥ ४ ॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें। तों नाहीं भरिलें रितें। करितों सेवन आइतें[4]। तुका ह्मणे चित्तें चित्त मेळवूनी ॥ ५ ॥

६६४. ताप हें हरण श्रीमुख। हरी भवरोगा ऐसें दुःख। अवलोकितां उपजे सुख। उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न पुरे डोळियांची धणी। सखोल कृपेची च खाणी। स्तवितां न पुरे वेदवाणी। तो हा समचरणी कृपानिधी ॥ ध्रु ॥ रामकृष्णध्यानं वामननारसिंहीं। उग्र आणि सौम्य कांहीं च नाहीं। सांपडे भरलीये वाही। भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ॥ २ ॥ गुणगंभीर चतुर सुजाण। शूर धीर उदार नारायण। व्यापक तरी त्रिभुवन। मनमोहन लावण्य हें ॥ ३ ॥ ठाण हें साजिरें सुंदर। अविनाश अविकार। अनंत आणि अपार[5]। तो हा कटीं* कर धरितोहे[6] ॥ ४ ॥ जयाची वाणी सुमनमाळा। परमामृतजिव्हाळा। अनंता अंगीं अनंत कळा। तुका जवळा चरणसेवक[7] ॥ ५ ॥

## कान्होबा॰नाट अभंग ७.

६६५. अगा ये वैकुंठनायका। अगा ये त्रैलोक्यतारका। अगा जनार्दना जगव्यापका। अगा पाळका भक्तांचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अगा ये वसुदेवदेवकीनंदना। अगा ये गोपिकारमणा। अगा बळिबंध वामना। अगा निधाना गुणनिधी ॥ ध्रु ॥ अगा ये द्रौपदीबांधवा। अगा ये सखया पांडवा। अगा जीवाचिये जीवा। अगा माधवा मधुसूदना ॥ २ ॥ अगा महेश्वरा महाराजा। अगा श्रीहरी गरुडध्वजा। अगा सुंदरा सहस्रभुजा। पार मी तुझा काय वर्णू ॥ ३ ॥ अगा अंबऋषिपरंपरा। निरालंबा निर्विकारा। अगा गोवर्धन धरणीधरा। अगा माहेरा दीनाचिया ॥ ४ ॥ अगा धर्मराया धर्मशीळा। कृपासिंधु कृपाळा। अगा प्रेमाचिया कल्लोळा। सकळकळाप्रवीणा ॥ ५ ॥ अगा चतुरा सुजाणा। मधुरागिरा सुलक्षणा। अगा उदारा असुरमर्दना। राखें शरणा तुकयाबंधु ॥ ६ ॥

---

१ पं. त. उद्धरिता.—२ पं. एक चि.—३ पं. थोरांस ही थोर.—४ पं आतें—५ त. पं. अपरांपार. ६ त. धरिताही.—७ दे. चरण सेवे.—८ दे. निलारभ त. निळारंभ. * पं. हा शब्द नाहीं.

६६६. उभा देखिला भीमातीरीं । कर मिरवले कटावरी । पाउलें तरी सम चि साजिरीं । नाम तरी अनंत अतिगोड ॥ १ ॥ शंखचक्रांकित भूषणें । जडितमेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपलीं तेणें रवितेजें ॥ २ ॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ । दंतओळी हिरे झळ.ळ । मुख निर्मळ सुखरासी ॥ ३ ॥ कडीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे[1] पदक गळां[2] । मृगनाभी रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ॥ ४ ॥ सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां । तुकयाबंधु ह्मणे रे अच्युता । धन्य ते मातापिता प्रसवली ॥ ५ ॥

६६७. एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको दुजी बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धी परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ॥ ध्रु ॥ मना येईल तो जन्म देईं । भलते कुळीं भलते ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहुनीं[3] तूं न वर्जे ॥ २ ॥ इतुलें करीं भलत्या परी । भलत्या भावें तुझे द्वारीं । राहेन दास होऊनि कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥ ३ ॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु ह्मणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ॥ ४ ॥

६६८. कईं देखतां होईन डोळीं । सकळां भूतीं मूर्ति सांवळी । जीवा नांव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडईन । होईल स्नान अनुतापीं ॥ ध्रु ॥ ऐसा कईं येईन दैवास । दृश्य नासोनि जाईल आस । सदा संतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष धणीवरी ॥ २ ॥ कईं नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वीजळ सागर । वाहाती पूर आनंदाचे ॥ ३ ॥ प्रसन्न दया क्षमा शांति । कईं नवविधा होईल भक्ति । भोगीन वैराग्यसंपत्ति । मनोरथ कळती तईं पुरले ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे सांग । नव्हे तुजविण निरसेना पांग । ह्मणोनि घातलें साष्टांग । पांडुरंगा वरी[4] चरणा ॥ ५ ॥

६६९. तूं बळिया शिरोमणी । आहेसि माजी ये त्रिभुवनीं । रिघालों पाठी तुझी ह्मणउनी । आतां करीन मी असेल तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं देवा प्रतापदिनकर । सुरा असुरांचा सुर । महावीरां वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ॥ ध्रु ॥ कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवाची बंदशाळ । संहारूनि राक्षसदळ । शरणागत राजीं स्थापिला ॥ २ ॥ उपक्रम[5] करावा वहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत । उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥ ३ ॥

---

१ त. बाहीवटे.–२ पं. माळा.–३ पं. तुवां न वजावें –४ पं. चरणावरी.–५ दे. त. क. उपक्रमें.

किती म्यां काय विनवावें । शरण आलों जीवें भावें । तुकयावंधु ह्मणे करावें । क्षेम अवघें येणें काळें ॥ ४ ॥

६७०. देवा मी चांडाळ चांडाळ । ह्मणतां लागताहे वेळ । नसे पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥ १ ॥ जन्मा उपजलियापासुनी । असत्य कर्मे तें अझुनी । सत्य आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥ २ ॥ भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहवे वार्ता । अखंड विषयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनी ॥ ३ ॥ काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर । यांचें तरी माहेरघर । परउपकार वैरी तैसा ॥ ४ ॥ निंदा द्वेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये [1]ते केले संतउपहास । अभेक्ष[2] तें ही भक्षिलें ॥ ५ ॥ पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलों नये घडलें ऐसें अन्योन्यविण[3] । दासीगमन आदिकरूनी ॥ ६ ॥ कायामनें वाचाइंद्रियांशीं । सकळ पापांची च राशी । तुकयावंधु ह्मणे ऐसियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ॥ ७ ॥

६७१. काय काय करितों या मना । परी नाइके नारायणा । करूं नये त्याची करी विरंचना । पैंतना नेऊं[4] आदरिलें ॥ १ ॥ भलेंतिया[5] सवें धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारी कुडें कांहीं कपट । घात बळकट मांडियेला ॥ २ ॥ न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्त ही पाताळ आकाशा । घाली उडी बळें चि देखोनि फांसा । केलों या देशा पाहुणा ॥ ३ ॥ चेतवूनि इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुराविली शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ॥ ४ ॥ आतां काय ऐसें करावें यासी । बहु जाचिलों केलों कासाविसी । तुकयावंधु ह्मणे हृषीकेशी । धांव मज ऐसी परी जाली ॥ ५ ॥

## नाटाचे अभंग समाप्त ६२.

---

*६७२. अखंडक्षीराब्धी भरितें आलें । अध्यात्मविद्येचें भांडार उघडिलें । सूर्यकोटीस तेज फांकलें । ध्यानीं प्रगटलें भक्तांचिया ॥ १ ॥ अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज । श्रवणीं अवचित पडिलें सहज । परमनिर्वाणाचें बीज । गुंडाळिलें निजसर्वभाग्यें ॥ २ ॥ मंत्र महामंत्र मंगळनिधी । सत्संगदर्शन प्रगटलें आधीं । वैराग्यविवेकाची बुद्धी । नामामृतसिद्धी साधिलें तें ॥ ३ ॥ क्षमादयाशांतीचें निजसुख । सच्चित्सुखें बोलला पुंडलीक । अनंतसुखाचा हारिख । उगवला देख

---

१ क. तें केलें—२ दे. त. क. अभक्ष भक्ष तें ही भक्षिलें—३ द. अनोविन. त. अणोविन.—४ क. पं. नेऊं पतना—५ दे. त. भलतिये सर्वा. क. भक्तियेसवा. * त. ६७२, ६७३, ६७४, ६७५ हे चार अभग जास्ती आहेत.

पंढरीये ॥ ४ ॥ नेणें भवभक्तीची निरपेक्षता । नेणें भूतदयेची ममता । तुका ह्मणे पंढरीनाथा । संग साधुसंतां देई आतां ॥ ५ ॥

६७३. क्षीराब्धिवासा शेषशयना । लीलाविग्रहा गोपिकारमणा । सगुणस्वरूप भक्तभूषणा । गुणनिधाना गुप्तरूपा ॥ १ ॥ अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया । अमरपाळका देवराया । हरीं भवभया भक्तांचिया ॥ २ ॥ सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा । भोळ्या भक्तांसि सौख्यदाता । तुजविण सर्वथा असे चि ना ॥ ३ ॥ चित्तचाळका चैतन्यघना । भक्तकैवारी असुरमर्दना । भक्तअभिमानी नारायणा । जगज्जीवना पांडुरंगा ॥ ४ ॥ ब्रह्मादिकांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता । अणुरेणुव्याप्यभरिता । पावन पतिता तुका ह्मणे ॥ ५ ॥

६७४. अखंडकर्मा कर्मप्रकाशका । मजसाटीं कां रे जालासि मुका । धर्मा धर्मप्रतिपाळका । सर्वचाळका सर्वातीता ॥ १ ॥ न देखसी वर्णाश्रममर्यादा । त्याचा सर्वस्वें करिसी कामधंदा । कधीं न लाजसी तूं गोविंदा । कां रे मुकुंदा बोल आतां ॥ २ ॥ मत्स्यकूर्मादिअवतारांसाठीं । श्रमले असतील जगजेठी । करितां घडमोड सृष्टी । जालासि कष्टी काय जाणें ॥ ३ ॥ किती म्यां विनवावें श्रीपती । पुन्हा पुन्हा यावें काकुलती । पुरे आतां तुझी संगती । करुणामूर्ती काय जालें ॥ ४ ॥ काय म्यां तुजसी करावें आतां । कां रे कोपलासी पंढरीनाथा । सकळ दुःख निवारिता । पावन पतिता तुका ह्मणे ॥ ५ ॥

६७५. वासुदेवा दिनानाथा । कमललोचना श्रीअच्युता । निजभक्तांसि सौख्यदाता । तुजविण सर्वथा असे चि ना ॥ १ ॥ विठ्ठला अनंता विश्वपती । विराट्स्वरूपा वामनमूर्ती । ब्रह्मादिकर्ता वैकुंठपती । अगम्यस्थिती वेदशास्त्रा ॥ २ ॥ अद्वैतअखंडभरिता । विश्वबाहु अपरिमिता । विश्वचक्षु विश्वदेवता । आदिपिता ब्रह्मयाचा ॥ ३ ॥ भक्ताधीना भवभयभंगा । परमपुरुषा पांडुरंगा । अनादि अखिलअंतरंगा । संगा असंगा वेगळा ची ॥ ४ ॥ हें विराट्स्वरूप भोळिया भक्तांसी । सर्वथा न कळे हृषीकेशी । सगुण रूप धरूनि त्यांसी । लावीं भजनासी तुका ह्मणे* ॥ ५ ॥

६७६. काय खावें आतां कोणीकडे जावें । गांवांत राहावें कोण्या बळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोपला पाटील गांवचे हे लोक । आतां घाली भीक कोण मज ॥ ध्रु ॥ आतां येणें चवी सांडिली ह्मणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ २ ॥ भल्या लोकीं यास सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥ ४ ॥

---

* त. येथें "नाट अभंग समास" असें आहे

६७७. संत मागे पाणी नेदी एक चूळ । दासीस आंघोळ ठेवी पाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतासी देखोनी होय पाठमोरा । दासीचिया पोरा चुंबन देतो ॥ छ ॥ संतासी देखोनि करितो ढवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ३ ॥

६७८. एक प्रेमगुज ऐकें जगजेठी । आठवली गोष्टी सांगतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक मृग दोन्ही पाडसांसहित । आनंदें चरत होती वनी ॥ छ ॥ अवचिता तेथें पारधी पावला । घेऊनियां आला श्वानें दोन्ही ॥ २ ॥ एकीकडे त्याणें चिरिल्या वाघुरा । ठेविलें श्वानपुत्रा एकीकडे ॥ ३ ॥ एकीकडे तेणें वोणवा लाविला । आपण राहिला एकीकडे ॥ ४ ॥ चहूंकडोनियां मृगें वेढियेलीं । स्मरों तें लागलीं नाम तुझें ॥ ५ ॥ रामा कृष्णा हरी गोविंदा केशवा । देवाचिया देवा पावें आतां ॥ ६ ॥ कोण रक्षी आतां[1] ऐसिये संकटीं । बापा जगजेठी तुजाविण ॥ ७ ॥ आइकोनि[2] तुह्मी तयांचीं वचनें । कृपाअंतःकरणें कळवळिलां ॥ ८ ॥ आज्ञा तये काळीं केली पर्जन्यासी । वेगीं पावकासी विझवावें ॥ ९ ॥ ससें एक तेथें उठवुनी[3] पळविलें । तया पाठीं गेलीं[4] श्वानें दोन्ही ॥ १० ॥ मृगें चमकोनी[5] सत्वर चाललीं । गोविंदें रक्षिलीं ह्मणोनियां ॥ ११ ॥ ऐसा तूं कृपाळु दयाळु आहेसी । आपुल्या भक्तांसी[6] जीवलग ॥ १२ ॥ ऐसी तुझी कीर्ती जीवीं आवडती । रखुमाईच्या पती तुका ह्मणे ॥ १३ ॥

६७९. आशाबद्ध वक्ता । धाक[7] श्रोतयाच्या चित्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांयां गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ॥ छ ॥ बहिर्मुख एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥ २ ॥ माप तैसी मोणी । तुका ह्मणे रितीं दोन्ही ॥ ३ ॥

६८०. विठ्ठला रे तूं उदाराचा राव । विठ्ठला तूं जीव या जगाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठला रे[8] तूं उदाराची रासी । विठ्ठला तुजपाशीं सकळसिद्धी ॥ छ ॥ विठ्ठला रे तुझें नाम बहु गोड । विठ्ठला रे कोड पुरविसी ॥ २ ॥ विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें । विठ्ठला लागलें ध्यान मनीं ॥ ३ ॥ विठ्ठला रे वाचे बोला बहुरस । विठ्ठला रे सोस घेतला जीवें ॥ ४ ॥ विठ्ठला रे शोक करीतसे तुका । विठ्ठला तूं ये[9] कां झडकरी ॥ ५ ॥

---

१ पं. आम्हां.–२ पं. ऐकोनियां.–३ पं. उठोनि चालिलें.–४ पं. गेले श्वान दोन्ही.–५ पं. चवकोनी.–६ पं. दासासी –७ पं. भय –८ पं. विठ्ठला रे तूं कोड पुरविसी.–९ पं. येगा ८ पं. ह्या शब्द नाहीं

६८१. बाहिर[1] पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासि जीवें वेटाळिलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकामध्यें[2] एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडीलें ॥ ध्रु ॥ जालीं दोनी नामें एका चि मथनीं । दुसरिया गुणीं वेगळालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे दाखविल्या मुक्ताफळीं । शिंपले[3] चि स्वस्थळीं खुंटलिया ॥ ३ ॥

६८२. बरवा[4] बरवा बरवा रे देवा तूं । जीवाहूनि आवडसी जीवा रे देवा तूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहातां वदन[5] संतुष्ट लोचनें । जाले आइकतां गुण श्रवण* रे देवा ॥ ध्रु ॥ अष्ट[6] अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण । वर्णितां लक्षण रे देवा ॥ २ ॥ मन जालें उन्मन अनुपम[7] ग्रहण । तुकयाबंधु ह्मणे महिमा नेणें रे ॥ ३ ॥

६८३. सोइरियासि करी पाहुणेरु[8] बरा । काढितो ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाईसि देखोनि वदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥ ध्रु ॥ पानफुल[9] वेश्येसी नेतसे उदंड । देखों[10] नेदी खांड ब्राह्मणासी ॥ २ ॥ बाइलेच्या गोता आवडिनें पोसी । माता पितियासी दवडितो ॥ ३ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

६८४. सोलीव जें सुख अतिसुखाहुनि । उभें[11] हें अंगणीं वैष्णवांच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वृंदावन सडे चौक रंग माळा । नाचे तो सोहोळा देखोनियां ॥ ध्रु ॥ भूषणमंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥ २ ॥ नामओघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हा वासना त्याची करी ॥ ४ ॥

६८५. तीर्थें केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पंढरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळो त्याचें ज्योलेंपण[12] । न देखे चि समचरण ॥ ध्रु ॥ योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडिलीं पाहीं ॥ ३ ॥

६८६. कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्यां तुज बळें कष्टवावें[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं जात जीव नाहीं होत हानी । सहज तें मनीं आठवलें ॥ ध्रु ॥ नाहीं कांहीं चिंता मरतों उपवासी । अथवा त्या हौसी गाई म्हाव्या ॥ २ ॥ हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लौकिक[14] वरी साच भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा नासिवंतासाटीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥ ४ ॥

---

१ त. वाहेरी –२ पं. एका मधीं –३ त. शिंपल्या –४ पं. बरवा बरवा देवा तू । जीवाहूनि आवडसी देवा तू –५ पं. वचन –६ दे. पं. अष्टै –७ पं. अनुपम्य गहन. –८ पं. पाहुणेर. –९ पं. फुलें पानें –१० पं. देवों –११ पं. तें –१२ पं. जालेंपण –१३ त. कष्टविलें –१४ पं. लापणीक.
* पं. हा शब्द नाहीं.

६८७. रामा अयोध्येच्या राया । दिनानाथा रे सखया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाप ताप विघ्न हरीं । दिनानाथा सुख करीं ॥ छ ॥ भिलटीचिया रे उच्छिष्टा । स्वीकारिसी[2] रे तूं भ्रष्टा ॥ २ ॥ मी तों सलगीचें मूळ । तुका ह्मणे तूं सखोल ॥ ३ ॥

६८८. आमिषाचिये[3] ओसे[4] गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥ १ ॥ मरणाचे वेळे[5] करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ २ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका ह्मणे सुखा पार नाहीं ॥ ३ ॥

६८९. तुजवरी ज्याचें मन । दरुर्शन[6] दे त्याचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा जाती शुद्ध भाव । हात पाव ना वृत्ती ॥ छ ॥ अवघियांचा करूनि मेळा । तुज डोळां रोखिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज आड । लपोनि कोड दावीं देवा ॥ ३ ॥

६९०. विश्वव्यापी माया । तिणें झाकुळिलें छाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्य गेलें भोळ्यावारी । अविद्येची चाली थोरी ॥ छ ॥ आपुलें चि मन । करवी आपणां बंधन ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुह्मी कोडीं हीं उगवा ॥ ३ ॥

६९१. पोटीं जन्मती रोग । तरि कां ह्मणावे आप्तवर्ग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रानीं वसती औषधी । तरि कां ह्मणाव्या निपराधी ॥ २ ॥ तैसें शरीराचें नातें । तुका ह्मणे सर्व आतें ॥ ३ ॥

६९२. नव्हे शब्द एक देशी । सांडी गवशी कोणाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाली माझी वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥ छ ॥ मोकलिलें जावें बाणें । भाता जेणें वाइलें ॥ २ ॥ आतां येथें कैचा तुका । बोले सिका स्वामीचा ॥ ३ ॥

६९३. गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥ छ ॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नाहीं उतार चढतें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । नांम अमृताची खाणी ॥ ३ ॥

६९४. माप ह्मणे* मी मवितें । भरी धणी ठेवी रितें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवा अभिमान नको । माझेठायीं देऊं संकों ॥ छ ॥ देशीं चाले सिका । रितें कोण लेखी रंका ॥ २ ॥ हातीं सूत्रदोरी । तुका ह्मणे त्याची थोरी ॥ ३ ॥

६९५. कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥ छ ॥ कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदाविता ॥ २ ॥ तुका ह्मणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥ ३ ॥

---

१ त. पं. भिल्लटिचिया.—२ पं. स्वीकारिसी तू रे भ्रष्टा.—३ दे. क. अविसाचिया. त. आविसाचिये.—४ दे. त. क. असे.—५ पं. वेळीं.—६ दे. त. दरुपण.—७ क. अवघेचि—८ त. भातें ९ पं. परम अमृताची खाणी ।. त. नामामृताची खाणी ।.—१० पं. शकों * त. हा शब्द नाहीं.

६९६. सकळिकांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अहो श्रोते वक्ते सकळ ही जन । बरें पारखुन बांधा गांठी ॥ छ ॥ फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तंव हामाल भारवाही ॥ २ ॥ तुका ह्मणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ३ ॥

६९७. कोण त्याचा पार पावला धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्या ही खुंटलिया ॥ छ ॥ फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ॥ २ ॥ दाविलें अनंतें अर्जुनासि पोटीं । आणीक त्या सृष्टि कृष्णलोक ॥ ३ ॥ तुका ह्मणे लागा संतांचिये कासे । ठाव घेतां कैसे वांचा जीवें ॥ ४ ॥

६९८. जें जें कांहीं करितों देवा । तें तें सेवा समर्पें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥ छ ॥ आह्मी दुजें नेणों कोणा । हें चि मना मन साक्ष ॥ २ ॥ तुका ह्मणे जगन्नाथा । हें अन्यथा नव्हे कीं ॥ ३ ॥

६९९. स्तुति करूं तरी नव्हे चि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥ छ ॥ रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा जाली नाहीं ॥ ३ ॥

७००. तुज वर्णी ऐसा तुज विण नाहीं । दुजा कोणी तींहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सहस्रमुखें शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ छ ॥ अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता । निर्गुणा सच्चिदा[1] नारायणा ॥ २ ॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी दाविसी आपणा । तरि च नारायणा कळों येसी ॥ ४ ॥

७०१. पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बांधूं विठ्ठलसांगडी । पोहुनि जाऊं पैल थडी । अवघे जन गडी । घाला उडी भाई नो ॥ छ ॥ हें तों नाहीं सर्वकाळ । अमुप अमृताचें[2] जळ ॥ २ ॥ तुका ह्मणे थोरा पुण्यें । ओघ आला पंथें येणें ॥ ३ ॥

७०२. आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें[3] या चित्तापासुनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंग मनीं पांडुरंग ध्यानीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ छ ॥ पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥ २ ॥ तुका ह्मणे नेत्रीं केलें ओळखण । साजिरें तें[4] ध्यान विटेवरी ॥ ३ ॥

---

१ त्र. सच्चिता.–२ क. अमृतजळ–३ क. न मिळे.–४ त. हें

७०३. मी तों सर्वभावें अनधिकारी । होइल कैसी परी नेणों देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुराणींचे अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥ छ ॥ इंद्रियांचीं[3] आह्मी पांगिलों अंकितें । त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसे ॥ २ ॥ एकाचें ही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज तारीं पंढरीराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥ ४ ॥

७०४. लक्षूनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आह्मांस दृष्टीपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर दोनी कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ छ ॥ व्यापूनि वेगळें राहिलेंसे दुरी । सकळां अंतरीं निर्विकार ॥ २ ॥ रूप नाहीं रेखा नाम ही जयासी । आपुल्या मानसीं शिव ध्याय ॥ ३ ॥ अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥ ४ ॥ अचेत चेतलें भक्ताचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका ह्मणे ॥ ५ ॥

७०५. कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसी भक्ति करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ छ ॥ कैसी कीर्ती वाणूं[6] कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवँणु कैसा तुज ॥ २ ॥ कैसा गाऊं गीतीं[8] कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावीं मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥ ४ ॥

७०६. निगमाचें वन । नका शोधूं करूं सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या रे गौळियांचे घरीं । बांधलें तें दावें वरी ॥ छ ॥ पीडलेती भ्रमें । वाट न कळतां वर्मे ॥ २ ॥ तुका ह्मणे भार । माया टाका अहंकार ॥ ३ ॥

७०७. मन वोळी मना । बुद्धि बुद्धी क्षण क्षणां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी च मज राखण जालों । ज्याणें तेथें चि धरिलों ॥ छ ॥ जें जें जेथें उठी । तें तें तया हातें कुंटीं[9] ॥ २ ॥ भांजिली[10] खांजेंनी[11] । तुका साक्ष उरला दोन्ही ॥ ३ ॥

७०८. ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्माअकर्मा वेगळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो चि एक तया जाणे । पावे अनुभविलें खुणें ॥ छ ॥ शौच अशौचाचे संधी । तन आला तना चि* मधीं ॥ २ ॥ पापपुण्यां नाहीं ठाव । तुका ह्मणे सहज भाव ॥ ३ ॥

७०९. काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी काय तेथें असती थोडीं । काय जोडी तयांसी ॥ छ ॥ रिघतां[12] धांवा पेंवामध्यें ।

---

१ त. मानसीं.–२ त. कासावीसी.–३ पं. इंद्रियाचे आह्मी पांगिलों अकित.–४ त. पांगिलीं.–५ दे. क. त. आपुला.–६ क. वानूं.–७ दे. कवण.–८ दे. किती. त. कीर्ती.–९ पं. त. कुटी.–१० पं. भाजिली.–११ क. खाजनी त. खाजणी.–१२ दे. पं. त. रिगतां. * पं. हा शब्द नाहीं.

जोडे सिद्धि ते ठायीं ॥ २ ॥ काय भस्म करील राख । अंतर पाक नाहीं तों ॥ ३ ॥ वर्णाआश्रमाचे धर्म । जाती श्रम जालिया ॥ ४ ॥ तुका ह्मणे सोंग पाश । निरसे आस तें हित ॥ ५ ॥

७१०. तें ही नव्हे जें करितां कांहीं । ध्यातां ध्यायीं तें ही नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें ही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तें[2] ही नव्हे ॥ ध्रु ॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तें ही नव्हे ॥ २ ॥ तें[3] ही नव्हे जें भोंवतें भोंवे । नागवें धांवे तें ही नव्हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे एक चि आहे । सहजि पाहें सहज ॥ ४ ॥

७११. बोलें बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥ ध्रु ॥ विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तो चि एक सोसी ॥ २ ॥ तुका ह्मणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥ ३ ॥

७१२. होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा चि माझा नेम धर्म । अवघें विठोबाचें नाम ॥ ध्रु ॥ हे चि माझी उपासना । लागेन संतांच्या चरणा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । करीन ते भोळी सेवा ॥ ३ ॥

७१३. सांटविला हरी । जींहीं हृदयमंदिरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांची सरली वेरझार । जाला सफळ व्यापार ॥ ध्रु ॥ हरी आला हाता । मग कैंचीं भय चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥ ३ ॥

७१४. मोक्ष तुमचा देवा । तुह्मी दुर्लभ तो ठेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ ध्रु ॥ आपल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । पुरे एक चि शेवटीं ॥ ३ ॥

७१५. नामपाठ मुक्ताफळांच्या ओवणी । हें सुख सगुणीं अभिनव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी आह्मी जालों उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥ ध्रु ॥ द्यावें घ्यावें ऐसा येथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां अभयदान करा । ह्मणा विश्वंभरा दिलें ऐसें ॥ ३ ॥

७१६. भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तारूं भला पांडुरंग । पाय भिजों नेदी अंग ॥ ध्रु ॥ मागें उतरिले बहुत । पैल तिरीं साधुसंत ॥ २ ॥ तुका ह्मणे लाग वेगें । जाऊं तयाचिया मागें ॥ ३ ॥

---

१ दे. त. क. पाख.–२ दे. तें नव्हे–३ पं. 'तें ही' याच्याबद्दल 'नाहीं'.–४ त. पं. बोल बोलतां सोपे–५ दे. त. न वटे.–६ दे. क. लागन.–७ क. त. सकळ.–८ दे. त. क. ऐसें.

७१७. नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असें तुमचा रजरेण । संतां पायींची वाहाण ॥ ध्रु ॥ नाहीं स्वरूपीं ओळखी । भक्तिभाव करीं देखीं ॥ २ ॥ नाहीं शून्याकारीं । क्षर ओळखी अक्षरीं ॥ ३ ॥ नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें* काई ॥ ४ ॥ कांहीं नव्हे तुका । पायां पडेने हें[1] ऐका ॥ ५ ॥

७१८. सत्य साच खरें । नाम विठोबाचें वरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें तुटती बंधनें । उभयलोकीं कीर्ति जेणें ॥ ध्रु ॥ भाव ज्याचे गांठी । त्यासी लाभ उठाउठी ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ॥ ३ ॥

७१९. सत्य तो आवडे । विकल्पानें भाव उडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी तुमच्या कृपादानें । जाणों शुद्ध मंद सोनें ॥ ध्रु ॥ आला भोग अंगा । न लवूं उसीर त्या त्यागा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । अंजन ते तुझी सेवा ॥ ३ ॥

७२०. करावें चिंतन । तें चि वरें न भेटून ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवा अंगीं राहे भाव । तेंग[2] तो चि जाणा देव ॥ ध्रु ॥ दर्शनाची[3] उरी । अवस्था चि अंग धरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । तेथें सकळ कारण ॥ ३ ॥

७२१. जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सहज पूजा या चि नांवें । गळित अभिमानें व्हावें ॥ ध्रु ॥ अवघें भोगितां गोसावी । आदीं आवसानीं जीवी ॥ २ ॥ तुका ह्मणे सिण । न धरितां नव्हे भिन्न ॥ ३ ॥

७२२. नसे तरी मनीं[4] नसो । परी वाचे तरी वसो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह पडो या चिंतनें । विठ्ठलनामसंकीर्तनें[5] ॥ ध्रु ॥ दंभास्थिती भलत्या भावें । मज हरिजन ह्मणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें तरी । मज सांभाळील हरी ॥ ३ ॥

७२३. नये जरी कांहीं । तरी भलतें चि वाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणविल्या दास । कोणी न धरी वेठीस ॥ ध्रु ॥ समर्थाच्या नांवें । भलतैसें विकावें ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । वरी असते बहुतां ॥ ३ ॥

७२४. न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी नारायणा । कींव भाकितों करुणा ॥ ध्रु ॥ नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अक्षर ॥ २ ॥ तुका ह्मणे थोडें । आयुष्य अवघें चि कोडें ॥ ३ ॥

---

१ त. पं. पडणें. दे. पडनें.—२ पं. तोगे.—३ दे. क. दर्शणाची —४ दे. क. मनो —५ दे. विठ्ठलनामें. * दे. त. हा शब्द नाहीं. † पं 'हे' हा शब्द नाहीं

७२५. एकांचीं उत्तरें । गोड अमृत मधुरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशा देवाच्या विभुती । भिन्न प्रारब्धाची गती ॥ छ्रु ॥ एकांचीं वचनें । कडु अत्यंत तीक्षणें ॥ २ ॥ प्रकाराचें तीन । तुका ह्मणे केलें जन ॥ ३ ॥

७२६. वॅचनें ही नाड । न बोले तें मुकें खोड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोहीं वेगॅळें तें हित । बोली अबोलणी नीत ॥ छ्रु ॥ अंधार प्रकाशी । जाय दिवस पावे निशी ॥ २ ॥ बीज पृथिवीच्या पोटीं । तुका ह्मणे दावी दृष्टी ॥ ३ ॥

७२७. विचारा वांचून । न पवीजे समाधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह त्रिगुणांचा बांधा । माजी नाहीं गुण सुदा ॥ छ्रु ॥ देवाचिये चाडे । देवा द्यावें जें जें घडे ॥ २ ॥ तुका ह्मणे होतें । बहु गोमटें उचितें ॥ ३ ॥

७२८. तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ छ्रु ॥ वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ २ ॥ तुका ह्मणे माया । होय दासी लागे पायां ॥ ३ ॥

७२९. मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकीं एक दृढ जालें । मुळा आपुलिया आलें ॥ छ्रु ॥ सागरीं थेंबुडा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे नवें । नव्हे जाणावें हें देवें ॥ ३ ॥

७३०. अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥ छ्रु ॥ हें चि प्रायश्चित । अनुतापीं न्हाय चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे पापा । शिवों नये अनुतापा ॥ ३ ॥

७३१. चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी नव्हे भोळी सेवा । एक भाव चि कारण देवा ॥ छ्रु ॥ तपें इंद्रियां आघात । क्षॅणें एका वाताहात ॥ २ ॥ मंत्र चळे थोडा । तरि धॅडे चि होय वेडा ॥ ३ ॥ व्रतें करितां सांग । तरी एक चुकतां भंग ॥ ४ ॥ धर्म सत्त्व चि कारण । नाहीं तरी केला सिण ॥ ५ ॥ भूतदयेसि आघात । उंचॅनीच वाताहात ॥ ६ ॥ तुका ह्मणे दुजें । विधिनिषेधाचें ओझें ॥ ७ ॥

७३२. सोडिला संसार । माया तयावरि फार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवत चाले मागें मागें । सुखदु:ख साहे अंगें ॥ छ्रु ॥ यानें घ्यावें नाम । तीसीकरणें त्याचें काम ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळी । विठ्ठलकृपेची कोंवळी ॥ ३ ॥

---

१ क. पं. वच्चन –२ क. वेगळ.–३ क. क्षणे एक. पं. क्षणा एका.–४ दे. क. वढे चि –५ क. उच निंच.

७३३. बैसों खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गाऊं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रामकृष्ण-नाममाळा । घालूं ओवुनियां गळां ॥ ध्रु ॥ विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मां जीवन शरणागतां ॥ ३ ॥

७३४. पाटीं पोटीं देव । कैचा हरिदासां भेव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करा आनंदें कीर्तन । नका आशंकितमन ॥ ध्रु ॥ एथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ २ ॥ तुका ह्मणे धनी । संपुरता[1] काय वाणी ॥ ३ ॥

७३५. मनोमय पूजा । हे चि पंढीयें[2] केशीराजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेतो कल्पनेचा भोग । न मानेती बाह्य रंग ॥ ध्रु ॥ अंतरींचें जाणे । आदिवर्तमान खुणे ॥ २ ॥ तुका ह्मणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥ ३ ॥

७३६. जाणे भक्तीचा जिव्हाळा । तो चि देवांचा[3] पुतळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक नये माझ्या मना । हो का पंडित शाहाणा ॥ ध्रु ॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ २ ॥ तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणे तो चि शुद्ध ॥ ३ ॥

७३७. याजसाटीं वनांतरा । जातों सांडुनियां घरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें दिठावेल प्रेम । बुद्धि होईल निष्काम ॥ ध्रु ॥ अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अहंब्रह्म । आड येऊं नेदीं भ्रम ॥ ३ ॥

७३८. बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको मानूं भार । पाहों[4] दोषांचे डोंगर ॥ ध्रु ॥ आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥ २ ॥ तुका ह्मणे दोषी । मी तों पातकांची राशी ॥ ३ ॥

७३९. अक्षई तें झालें । आतां न मोडे रचिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाया पडिला खोले ठायीं । तेथें पुढें चाली नाहीं ॥ ध्रु ॥ होतें विखुरलें । ताळा जमे झडती आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे बोली । पुढें कुंटित चि जाली ॥ ३ ॥

७४०. तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जपतपादि साधनें । मज चिंतवेना मनें ॥ ध्रु ॥ करुणावचनें । म्यां भाकावीं तुह्मां दीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे घेई । माझें थोडें फार ठायीं ॥ ३ ॥

७४१. लावुनि काहाळा । सुखें करितों सोहँळा[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सादवीत गेलों जना । भय नाहीं सत्य जाणां ॥ ध्रु ॥ गात नाचत विनोदें । टाळघागऱ्यांच्या छंदें ॥ २ ॥ तुका ह्मणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥ ३ ॥

---

१ क. संपुरतां. दे. सपुरतां.—२ पं. पंढरीये.—३ पं. दैवाचा.—४ त. पाहोन.—५ दे. त. सोहोळा.

७४२. मुक्त कासया ह्मणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें करितों कीर्तन । भय विसरलें मन ॥ छ ॥ देखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥ २ ॥ तुका ह्मणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ३ ॥

७४३. ओनाम्याच्या काळें[1] । खडे मांडिविले[2] बाळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें चि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥ छ ॥ रज्जु सर्प होता । तोंवरी चि न कळतां ॥ २ ॥ तुका ह्मणे साचें । भय नाहीं वागुलाचें ॥ ३ ॥

७४४. आतां पुढें धरीं । माझे आठव वैखरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको बडबडूं भांडे । कांहीं वाउगें तें रांडे ॥ छ ॥ विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडुनियां बोल ॥ २ ॥ तुका ह्मणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥ ३ ॥

७४५. काय नव्हे करितां तुज । आतां राखें माझी लाज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी तों अपराधाची राशी । शिखा अंगुष्ट तोंपाशीं ॥ छ ॥ त्राहें त्राहें त्राहें । मज कृपादृष्टी पाहें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥ ३ ॥

७४६. वंदीन मी भूतें । आतां अवघीं चि* समस्तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥ छ ॥ गाळुनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ २ ॥ तुका ह्मणे मग । नव्हे दुजयाचा संग ॥ ३ ॥

७४७. पूजा पुज्यमान । कथे उभे हरिजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्याची कीर्ती वाखाणिती । तेथें ओतली ते मुर्ती ॥ छ ॥ देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥ २ ॥ गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥ ३ ॥ शोक मोह चिंता । याची नेणती ते वार्ता ॥ ४ ॥ तुका ह्मणे सखे । विठोबा च ते सारिखे ॥ ५ ॥

७४८. भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवे जातीपाशीं जाती । खुण येरयेरां चित्तीं ॥ छ ॥ हिरा हिरकणी । काढी आंतुनि[3] अहिरणी ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें[4] । मन[5] शुद्ध हें चांगलें ॥ ३ ॥

७४९. वरि बोला रस । कथी ज्ञान माजी फोस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे लटिके जे ठक । तयां ईहं[6] ना पर लोक ॥ छ ॥ परिस एक सांगे । अंगा धुळी हे न लगे ॥ २ ॥ तुका ह्मणे हाडें । कुत्र्या लाविलें झगडें ॥ ३ ॥

७५०. हे चि तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघीं[7] तुझीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥ छ ॥ न वर्जितादिशा । जाय तेथें चि सरिसा ॥ २ ॥ नव्हे एकदेशी । तुका ह्मणे गुणदोषीं ॥ ३ ॥

---

१ पं. वेळे—२ त. मांडियेले. पं. माडवले.—३ त. दे. पं. आहिरणी.—४ त. पं. भलें.—५ त. मन शुद्ध जीहीं केलें पं. मन शुद्ध तीहीं केलें—६ दे. त. येहे.—७ क. द. अवघीं तुझींच हें पदें *त. पं. हा शब्द नाहीं.

७५१. आपलें तों कांहीं । येथें सांगिजेसें नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि हे वाणी वायचळ । छंद करविते बरळ ॥ धृ ॥ पंचभूतांचा हा मेळा । देह सत्यत्वें निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे शुळी । इच्छेच्या उफराट्या चाली ॥ ३ ॥

७५२. विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्या साटीं वाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥ धृ ॥ न पाहे सिदोरी । जाती कुळ न विचारी ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । हाका देतां उठाउठीं ॥ ३ ॥

७५३. कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ धृ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ३ ॥

७५४. नेणती वेद श्रुति कोणी । आह्मां भाविकां वांचुनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूप आवडे आह्मांशी । तैसी जोडी हृषीकेशी ॥ धृ ॥ आह्मीं भावें बळिवंत । तुज घालूं हृदयांत ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥ ३ ॥

७५५. मन गुंतलें लुलयां । जाय धांवोनि त्या ठाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें परतावी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥ धृ ॥ येऊनियां घाली घाला । नेणों काय होई[6] तुला ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें । बहु नाडिले शाहाणे ॥ ३ ॥

७५६. घेई[7] माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥ धृ ॥ तुह्मी ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ २ ॥ मना तेथें धांव घेई । राहें विठोबाचे पायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ४ ॥

७५७. धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥ धृ ॥ सर्वमंगळाचें सार । मुख सिद्धीचें भांडार ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ३ ॥

७५८. जरी मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा[8] येथ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥ धृ ॥ लोहो महिमान परिसा । नाहीं तरीं दगड जैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे याचकभावें । कल्पतरु मान[9] पावे ॥ ३ ॥

---

१ पं. इच्छी उफराटी चाली.–२ पं. याती.–३ पं. दीन.–४ पं. एक्या –५ दे. त. परती. पं. परतवी.–६ त. पं. होईल.–७ 'घेईंघेईं' असें लोकाच्या म्हणण्यांत आहे; पण तसें कोणत्याही प्रतींत आढळत नाहीं –८ पं. दगडा ऐसा.–९ पं. नाम

७५९. एक भाव चित्तीं । तरीं न लगे कांहीं युक्ती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥ छ ॥ आठव चि पुरे । सुख अवघें मोहो रे[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । पूजा इच्छी नारायण ॥ ३ ॥

७६०. मज संतांचा आधार । तूं एकलें निर्विकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा विचारूनि देवा । नको आह्मांसवें दावा ॥ छ ॥ तुज बोल न बोलवे । आह्मां भांडायाची सवे ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी । ऐक्यभाव उरे उरी[2] ॥ ३ ॥

७६१. तुज मागणें तें देवा । आह्मां तुझी चरणसेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आन नेघों देसी तरी । रिद्धि सिद्धि मुक्ति चारी ॥ छ ॥ संतसंगति सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥ ३ ॥

७६२. तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीकें[3] नेणें कांहीं हेवा । तुजवांचूनि केशवा ॥ छ ॥ हें चि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तन ॥ २ ॥ तुझ्या नामाचीं भूषणें । तुका म्हणे ल्यालों लेणें ॥ ३ ॥

७६३. उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसारासी तुटी ॥ छ ॥ आतां नव्हे बाधा । कोणेविशीं कांहीं कदा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥ ३ ॥

७६४. क्रियामतिहीन । एक मी गा तुझें दीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवा करावा सांभाळ । वारीं माझी तळमळ ॥ छ ॥ नको माझे ठायीं । गुणदोष घालूं[4] कांहीं ॥ २ ॥ अपराधाच्या कोटी । तुका ह्मणे घालीं पोटीं ॥ ३ ॥

७६५. नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ छ ॥ वृक्ष[5] न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥ २ ॥ वांजे न होती लेकरें । काय करावें भ्रतारें ॥ ३ ॥ नपुंसका पुरुषासी । काय करील वाइल त्यासी ॥ ४ ॥ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥ ५ ॥ तुका ह्मणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ६ ॥

७६६. नवां नवसांचीं । जालों तुह्मासी वाणीचीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण[6] तुझें नाम घेतें । देवा पिंडदान देतें ॥ छ ॥ कोण होतें मागें पुढें । दुजें बोलाया रोकडें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । कोणा घेतासि वो संगा ॥ ३ ॥

---

१ त. मोहोरें.—२ पं. एका भावेंन उरे उरी । त. ऐक माव उरे उरी.—३ पं. आणीक कांहीं नेणें देवा.—४ पं. घाला.—५ दे. वृक्षा.—६ पं. कोण.

७६७. एका बीजा केला नास । मग भोगेलें कणीस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळे सकळां हा भाव । लाहानथोरांवरी जीव ॥ छ्र ॥ लाभ नाहीं फुकासाटीं । केल्याविण जीवासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥ ३ ॥

७६८. आयुष्य गेलें वांयांविण । थोर झाली नागवण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां धांवें धांवें तरी । काय पाहातोसि हरी ॥ छ्र ॥ माझे तुझे या चि गती । दिवस गेले तोंडीं माती ॥ २ ॥ मन वाव घेऊं नेदी । बुडवूं पाहे भवनदी ॥ ३ ॥ पडिला विषयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥ ४ ॥ शरण आलों आतां धांवें । तुका ह्मणे मज पावें ॥ ५ ॥

७६९. सोसोनि विपत्ती । जोडी दिली तुझे हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा हा चि उपकार । अंतीं आह्मांशीं वेव्हार ॥ छ्र ॥ नामरूपा केला ठाव । तुज कोण ह्मणतें देव ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । तुज ठाव दिला घरीं ॥ ३ ॥

७७०. आपुलें मागतां । काय नाहीं आह्मां सत्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि या लौकिकाकारणें । उरीं [3]ठेविलें बोलणें ॥ छ्र ॥ ये चि आतां घडी । करूं बैसों ते ची फेंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे करितों तुला । ठाव नाहींसें विठ्ठला ॥ ३ ॥

७७१. असो आतां किती । तुज यावें काकुलती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें प्रारब्ध हें गाढें । तूं बापुडें तयापुढें ॥ छ्र ॥ सोडवीन आतां । ब्रीदें तुझीं पंढरीनाथा ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । तो गांढ्याचे कान पिळी ॥ ३ ॥

७७२. काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वसाधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ छ्र ॥ योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥ २ ॥ तुका ह्मणे जपा । मंत्र तीअक्षरी सोपा ॥ ३ ॥

७७३. हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ छ्र ॥ नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गीतीं ॥ २ ॥ करी अनाचार । वाचे हरिनामउच्चार ॥ ३ ॥ हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥ ४ ॥ ह्मणवी हरिचा दास । तुका ह्मणे धन्य त्यास ॥ ५ ॥

७७४. हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ छ्र ॥ करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ २ ॥ तुका ह्मणे गीती* गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ३ ॥

---

१ दे. भोगेल.—२ क. ऐसें. त. आविष्य. दे. ऐश.—३ दे. क. त. ठेविली.—४ क. फटी—५ त. त्रिअक्षरी. दे. क. तीं अक्षरीं.—६ पं. करो. * त. हा शब्द नाहीं.

७७५. लोह चुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा तूं चि आह्मांठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ॥ छ्र ॥ भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि वांचवी मोहरा ॥ २ ॥ तुका ह्मणे अधीलपणें । नेली लांकडें चंदनें ॥ ३ ॥

७७६. डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी ते नव्हति संतजन । तेथें नाहीं आतमखुण ॥ छ्र ॥ मेळवूनि नरनारी । शकुन सांगती नानापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ३ ॥

७७७. गाढवांचे[1] घोडे । आह्मी करूं दृष्टीपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चघळी वाहाणा । मायारिया बांडा सुना ॥ छ्र ॥ सोंगेंसंपादणी[2] । तरि करूं शुद्ध वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥ ३ ॥

७७८. बाईल मेली मुक्त जाली । देवें माया सोडविली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ छ्र ॥ पोर मेलें बरें जालें । देवें मायाविरहित केलें ॥ २ ॥ माता मेली मज देखतां । तुका ह्मणे हरली चिंता ॥ ३ ॥

७७९. योग तप या चि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करणें तें हें चि करा । सत्यें वरा व्यापार ॥ छ्र ॥ तरि खंडे येरझार । निघे भार देहाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे मानामान । हें बंधन नसावें ॥ ३ ॥

७८०. करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं[3] ॥ छ्र ॥ मजुराचें धन । विळा दोर चि जतन ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ॥ ३ ॥

७८१. वारवर घेउनि आलें । त्यासी तरवारिनें[4] हालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे आपुलें उचित । करुनि टाकावें फजित ॥ छ्र ॥ अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥ २ ॥ नपुंसकासाठीं । तुका ह्मणे न लगे जेठी ॥ ३ ॥

७८२. वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुंजला[5] तें नाहीं ठावें । जेणें अंगें चि ब्रह्म व्हावें ॥ छ्र ॥ जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ॥ २ ॥ गासी तान मान बंध । हाव भाव गीत छंद ॥ ३ ॥ जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ४ ॥ साधनाच्या[6] ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ५ ॥ तुका ह्मणे देहीं । संतें[7] जाहाले विदेही ॥ ६ ॥

---

१ त. गाढवाचें घोडें –२ दे. त. सोंगसपादनी.–३ पं. मनीं.–४ दे. त. तरवारेणें – ५ पं. त. परि त तुज नाहीं ठावें । जेणें अंगें ब्रह्म व्हावें ।–६ पं. साधनाच्या ओढाओढी .–७ पं. सत जाले ते विदेही

७८३. प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातों हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरीराया ॥ ध्रु ॥ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवी तैसें । आह्मी राहों त्याचे इच्छे ॥ ३ ॥

७८४. पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चिंता करी गंवसणी ॥ ध्रु ॥ पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥ २ ॥ तुका ह्मणे तंई । सिद्धि वोळगती पायीं ॥ ३ ॥

७८५. धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पूजी प्रतिमेचे देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ ध्रु ॥ विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरूनी चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ३ ॥

७८६. आधीं च आळशी । वरी गुरूचा उपदेशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥ ध्रु ॥ नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे ते गाढव । घेती मैनासवें धांव ॥ ३ ॥

७८७. नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ॥ ध्रु ॥ न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ॥ २ ॥ तुका ह्मणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ॥ ३ ॥

७८८. टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळें पोटासाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ॥ ध्रु ॥ कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंविण डोळे[4] गळताती ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे भावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

७८९. धन्य देहूं गांव पुण्य भूमि ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य क्षेत्रवासी लोकं ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ ध्रु ॥ कर कटी उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते[6] माता रखुमादेवी ॥ २ ॥ गरुड पारीं उभा जोडुनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ३ ॥ दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ४ ॥ लक्ष्मीनारायण वल्लाळाचें वन । तेथें आधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ५ ॥ विघ्नराज द्वारीं बहिरव वाहेरी । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥ ६ ॥ तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥ ७ ॥

---

१ त. मानी —२ पं. मनामागें —३ दे. त. वोंगळ.—४ पं. गळे दाटताती.—५ त. लोक हे दैवाचे. दे. क. लोक दइवाचे.—६ त. हे —७ पं. वलाळाचें.

## शाक्तावर—अभंग १३.

७९०. टवकारूनि दृष्टी लावुनियां रंग। दावी झगमग डोळ्यांपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणती शिष्यासी लागली समाधी। लटकी चि उपाधी झकविती ॥ छ ॥ दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज। उपदेश सांजरात्रीमाजी ॥ २ ॥ रांगोळिया चौक शृंगारुनी वोजा। आवरण पूजा यंत्र करी ॥ ३ ॥ पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं। बैसोनि आसनीं मुद्रा दावी ॥ ४ ॥ नैवेद्यासी ह्मणे करावें पक्कान्न। पात्रासी दिव्यान्न परवडी ॥ ५ ॥ जाला उपदेश कवळ घ्या रे सुखीं। आपोशन शेखीं बुडविलें ॥ ६ ॥ पाषांड करोनी मांडिली जीविका। बुडवी भाविकां लोकांप्रती ॥ ७ ॥ कायावाचामनें सोडवी संकल्प। गुरु गुरु जप प्रतिपादी ॥ ८ ॥ शुद्ध परमार्थ बुडविला तेणें। गुरुत्वभूषणें भोग भोगी ॥ ९ ॥ विधीचा ही लोप बुडविला वेद। शास्त्रांचा ही बोध हरविला ॥ १० ॥ योगाची धारणा नाहीं प्राणायाम। सांडी यम नेम नित्यादिक ॥ ११ ॥ वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप। वाढविलें पाप मतिलंडें ॥ १२ ॥ तुका ह्मणे गेलें गुरुत्व गुरवाडी। पूर्वजांसी धाडी नर्कवासा ॥ १३ ॥

७९१. शाक्त गधडा जये देशीं। तेथें राशी पापाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुकृताचा उदो केला। गोंधळ घाला इंद्रियें ॥ छ ॥ क्रोधरूपें वसे काम। तीचें नाम जपतसे ॥ २ ॥ मद्यभक्षण मांगिणजाती। विटाळ चित्तीं सांटविला ॥ ३ ॥ स्तवुनियां पूजी रांड। न लेंजे भांड दाढीसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे भगवती। नेइल अंतीं आपणापें ॥ ५ ॥

७९२. राजा प्रजा द्वाड देश। शाक्त वास करिती तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अधर्माचें उबडें पीक। धर्म रंक त्या गांवीं ॥ छ ॥ न पिके भूमि कांपे भारें। मेघ वारें पीतील ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघीं दुःखें। येती सुखें वस्तीसी ॥ ३ ॥

७९३. ऐसें[4] कलियुगाच्या मुळें। जालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडुनियां रामराम। ब्राह्मण ह्मणती दोमदोम ॥ छ ॥ शिवों नये तीं निळीं। वस्त्रें पांघरती काळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वृत्ति। सांडुनि गदा मागत जाती ॥ ३ ॥

७९४. अवघ्या पापें घडला एक। उपासक शक्तीचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा विटाळ नको अंगा। पांडुरंगा माझिया ॥ छ ॥ काम क्रोध मद्य अंगीं। रंगला रंगीं अवगुणी ॥ २ ॥ करितां पाप न धरी शंका। ह्मणे तुका कोणी ही ॥ ३ ॥

---

१ दे. शखीं.—२ पं. लगे.—३ पं. उबेड.—४ पं. ऐका.

७९५. वारितां बळें धरितां हातीं । जुलुमें जाती नरकामधीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रंडीदासामति कांहीं । उपदेश तो ही चालेना ॥ ध्रु ॥ जन्म केला वाताहात । थोर घात येठोर्यां ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरीनाथा । तुझी कथा दूषीती ॥ ३ ॥

७९६. शाक्तांची शूकरी माय । विष्ठा खाय विदीची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तिची त्या पडेली सवे । मागें धांवे ह्मणोनि ॥ ध्रु ॥ शाक्तांची गाढवी माय । थुंकत जाय वेसदारा ॥ २ ॥ तुका ह्मणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥ ३ ॥

७९७. हरिहर सांडुनि देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका त्यांची विटंबणा । देवपणा[3] भक्तांची ॥ ध्रु ॥ अंगीं कवडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं ॥ २ ॥ गळां गांठा हिंडे दारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ ३ ॥ माथां सेंदुर दांत खाती । जेंगट हातीं सटवीचें ॥ ४[4] ॥ पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥ ५ ॥ ऐशा छंदें चुकलीं वाटा । भाव खोटा भजन ॥ ६ ॥ तुका ह्मणे विष्णुशिवा । वांचुनि देवा भजती ते[6] ॥ ७ ॥

७९८. कांद्यासाटीं जालें ज्ञान । तेणें जन नाडिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काम क्रोध बुचबुची । थुंके पुची व्यालीची ॥ ध्रु ॥ पूजेलागीं द्रव्य मागे । काय सांगे शिष्यातें ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयांचा ॥ ३ ॥

७९९. सांडुनियां पंढरीराव । कवणातें ह्मणों देव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु लाज वाटे चित्ता । आणिकांतें देव ह्मणतां ॥ ध्रु ॥ सांडुनियां हिरा । कोणें वेचाव्या त्या गारा ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिहर । ऐसीं सांडुनियां धुर ॥ ३ ॥

८००. बहुतें गेलीं वांयां । न भजतां पंढरीराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती कामिकांची सेवा । लागोन मागोन खात्या देवा ॥ ध्रु ॥ अवघियांचा धनी । त्यासी गेलीं विसरोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । पडती यमाचिया हातीं ॥ ३ ॥

८०१. असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठवूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रक्षिता तूं होसी जरी । तरि काय येरीं करावें ॥ ध्रु ॥ काया वाचा मन पायीं । राहे ठायीं करूं तें ॥ २ ॥ तुका ह्मणे गाइन गीतीं । रूप चित्तीं धरूनियां ॥ ३ ॥

८०२. नाहीं आह्मी विष्णुदास । करीत आस कोणांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥ ध्रु ॥ असों भलते ठायीं मनें । समाधानें आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥ ३ ॥

॥ १३ ॥

---

१ पं. ते ठायीं.–२ पं. लागली.–३ त. देवपणा त्या भक्तांची.–४ पं. पूजिती विकट दोंद तोंड.–५ त. भाव खोटा तें भजन.–६ त. तें देहूच्या प्रतींत "तीं" असा पाठ होता तो चांगला होता, पण तो बदलून "ते" असा केला आहे.–७ पं. ऐसे

८०३. पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपुलें[2] भिकारी अर्थ नेणे ॥ छ॥ न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ॥ २ ॥ तुझ्या पांयांविण दुजें नेणें कांहीं । तूं चि सर्वांठायीं एक मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे खीळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडां वादकांशीं ॥ ४ ॥

८०४. कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहु जाले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें[3] बडबडी कोरडा चि ॥ छ॥ दंभें[4] करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥ २ ॥ वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती अलिप्त देहाहुनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे दंड साहील[5] यमाचे । न करी जो वाचे बोलें तैसें ॥ ४ ॥

८०५. विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥ छ॥ असिपत्रीं[6] तरुवरखैराचे इंगळ[7] । निघतील ज्वाळ तेलपाकीं ॥ २ ॥ तप्तभूमीवरि लोळविती[8] पाहीं । अग्निस्तंभ बाहीं कवळविती ॥ ३ ॥ ह्मणऊनि तुका येतो काकुलती । पुरे आतां याती गर्भवास ॥ ४ ॥

८०६. अल्प माझी मती । ह्मणोनि येतों काकुलती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दाखवा दाखवा । मज पाउलें केशवा ॥ छ॥ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ३ ॥

८०७. वाटुली पाहातां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं[9] वो डोळां ॥ १ ॥ तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या आंसावल्या[10] बाह्या । तुज क्षेम द्यावया[11] पांडुरंगा ॥ ३ ॥

८०८. देह हा सादर पाहावा[12] निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ छ॥ यजन याजन तप व्रतें[13] करिती । विकल्पें नागवती शुद्ध पुण्यें[14] ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकुनियां ॥ ३ ॥

८०९. तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौन्यपणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मौन्यपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ छ॥ रूप

१ पं. करू—२ पं. आपण.—३ पं. मुखीं बडबडी भलते चि.—४ दे. क. त. डव.—५ दे. साहिले.—६ पं. असिपत्र तरुवर.—७ दे. पं. त. विगळ—८ पं. चालविती पायीं—९ दे. त. कई—१० दे. असांवल्या.—११ क. देया पं. वेया.—१२ पं. पाहावया.—१३ क. त. व्रत.—१४ पं. पुण्यें.

तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हें झकवे ब्रह्मादिक ॥ २ ॥ ब्रह्मादिकां देवां कर्माची कचाटी । ह्मणोनि आटाटी फार त्यांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझें गुण नाम रूप । आहेसी अरूप वाणूं काई ॥ ४ ॥

८१०. मनवाचातीत तुझें हें स्वरूप । ह्मणोनियां माप भक्ति केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तीचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्वता न मोजवे ॥ छ ॥ योग याग तपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥ ३ ॥

८११. देवा ऐसा शिष्य देई । ब्रह्मज्ञानी निपुण पाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जो कां भावाचा आगळा । भक्तिप्रेमाचा पुतळा ॥ छ ॥ ऐशा युक्ति ज्याला बाणे । तेथें वैराग्याचें ठाणें ॥ २ ॥ ऐसा जाला हो शेरीरी । तुका लिंबलोण करी ॥ ३ ॥

८१२. जंववरी नाहीं देखिली पंढरी । तोंवरी वर्णिसी थोरी वैकुंठींची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप ॥ छ ॥ वृंदावन सडे चौक रंग माळा । अभिनंव सोहोळा घरोघरीं ॥ २ ॥ नामघोष कथापुराणकीर्तनीं । ओविया कांडणीं पांडुरंग ॥ ३ ॥ सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जें न साधे सायासें । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरि ॥ ५ ॥

८१३. दुःख वाटे ऐसी ऐकों[10] नये गोष्टी । जेणें घडे तुटी तुझ्या पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ॥ छ ॥ काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनि पुढती वाटे लावूं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज दावूं नको ऐसे । दृष्टीपुढें पिसे पांडुरंगा ॥ ३ ॥

८१४. शूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेवीं अभक्तांसी आवडे पाखांड । न लगे त्यां गोड परमार्थ ॥ छ ॥ श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरि ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्पा पाजिलिया क्षीर । वमितां विखार विष जालें ॥ ३ ॥

८१५. रासभ धुतला महा तीर्थामाजी । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेवीं खळा काय केला उपदेश । नव्हे चि मानस शुद्ध त्याचें ॥ छ ॥

---

१ दे क. त. ब्रह्मादिक –२ दे. क. पं. देवा.–३ पं. काय.–४ दे. क. सापडेसी.–५ दे. शरीरीं.–६ दे. त. जव नाहीं –७ पं. तववरि.–८ त. वर्णिसील.–९ दे. त. पं. अभिनव.–१० पं. ऐकोनियां. दे. एकोनियें क. ऐकोनिये.

सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥ २ ॥ तुका ह्मणे श्वाना क्षिरीचें भोजन । सवें चि वमन जेवी तया ॥ ३ ॥

८१६. जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषोतुल्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तयालागीं झाला सन्निपात ॥ ध्रु ॥ कामिनी जयाच्या जाहाली नेत्रासी । देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ २ ॥ तुका ह्मणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ३ ॥

८१७. आतां असों मना अभक्तांची कथा । न होईं दुश्चिता हरिनामीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नावें ॥ ध्रु ॥ प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्ताचें सर्वकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आठवूं मंगळ । जेणें सर्व काळ सुखरूप ॥ ३ ॥

८१८. नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांग ही गात्रीं प्रेम तुझें ॥ ध्रु ॥ सर्व ही शरीर वेचो या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतां पाईं ॥ ३ ॥

८१९. जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तो चि जाणे ॥ ध्रु ॥ शरणागता जेणें घातलें पाठीशीं । तो जाणे तोविशीं राखों तया ॥ २ ॥ कासे लागे तया न लगती सायास । पोहोणारा त्यास पार पावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तो चि जाणे ॥ ४ ॥

८२०. नका वांटूं मन विधिनिषेधांसी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खादलिया अन्ना मासी बोलों नये । अवघें चि जाये एका घांसें ॥ ध्रु ॥ जोडी होते परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें न मना विषाद । निवेंविण व्याध तुटों नये ॥ ३ ॥

८२१. नको होऊं देऊं भावीं अभावना । या चि नांवें जाणा बहु दोष ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥ ध्रु ॥ उत्तमा विभागें कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें बहु थोडें आहे । आपुलिया पाहें पुढें वरें ॥ ३ ॥

८२२. त्याग तंव मज न वजतां केला । कांहीं च विठ्ठला मनांतूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भागलिया आला उबग सहज । न धरितां काज जालें मनीं ॥ ध्रु ॥

---

१ त. विषतुल्य.–२ दे. "कामिण." असें नवीन केलें आहे.–३ त. आनंदाअश्रू.–४ पं. लागती.–५ दे. बोलों.–६ त. माना.–७ दे. जिव्हाळ्यां.

देह जड जालें ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे गेला आळसकिळस । अकर्तव्य दोष निवारले ॥ ३ ॥

८२३. मढें झांकुनियां करिती पेरणी । कुणबियाचे वाणी लवलाहें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयापरी करीं स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥ ध्रु ॥ ओटीच्या परिस मुठीचें तें वाढे । यापरि कैवाडें स्वहिताचें ॥ २ ॥ नाहीं काळसत्ता आपुलिये हातीं । जाणते हे गुंती उगविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहें आपुली सूचना । करितो शाहाणा मृत्युलोकीं ॥ ४ ॥

८२४. राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणी कोणा एथें न मनी जी फुका । कृपेविण एका देवाचिया ॥ ध्रु ॥ शृंगारिलें नाहीं तगोंयेत वरि । उमटे लौकरि जैसें तैसें[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं वसे नारायण । कृपेची ते खुण सांग्या येते ॥ ३ ॥

८२५. वत्स पळे धेनु धांवे पाठीलागीं । प्रीतीचा तो अंगीं ऑविर्भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिकविलें काय येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकांच्या ॥ ध्रु ॥ सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां । ह्मणऊनि लाता मागें सारी ॥ २ ॥ तुका ह्मणे आग्रह करावा न लगे । सांगतसे अंगें अनुभव ॥ ३ ॥

८२६. देवाच्या संबंधें विश्व चि सोयरें । सूत्र ओढे दोरें एका एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखें सामावलें ॥ ध्रु ॥ आणिकांचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जाती । शोभा चि पुढती विशेषता ॥ ३ ॥

८२७. अवघा वेंचलों इंद्रियांचे ओढी । जालें तें तें घडी निरोपिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतरिला ॥ ध्रु ॥ कायावाचामनें तो चि निजध्यास । एथें जालों ओस भक्तिभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं येईल धावणें । तरि नारायणें सांभाळावें ॥ ३ ॥

८२८. राहो आतां हें चि ध्यान । डोळां मन लंपटो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोंडकोंडुनि धरीन जीवें । देहभावें ओंवाळीन ॥ ध्रु ॥ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे गोजिरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ३ ॥

८२९. आदि मध्य अंत दाखविला दीपें । हा तों आपणापें यत्न वरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दासत्वें दाविलें धन्याचें भांडार । तेंतों नव्हे सार एथुनियां ॥ ध्रु ॥

१ त. ती.–२ दे. तैतें.–३ क. दिसों.–४ दे. पं. क. त. आयुर्भाव.–५ दे. क. त. दाशत्वें. पं. दास्यत्वें.

उपायानें सोस नासला सकळ । सत्ते सत्तावळ अंगा आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे दृष्टि सकळांचे शिरीं । वचन चि करी बैसोनियां ॥ ३ ॥

८३०. सोंटविले वाण । पैस घातला दुकान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्ध चि जवळी ॥ ध्रु ॥ निवाडिलें साचें । उत्तममध्यमकानिष्ठाचें ॥ २ ॥ तुका बैसला दुकानीं । दावी मोला ऐसी वाणी ॥ ३ ॥

८३१. लागलिया सुख स्तनां । घाली पान्हा माउली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभयतां आवडी लाडें । कोडें कोड पुरतसे ॥ ध्रु ॥ मेळवितां अंगें अंग । प्रेमें रंग वाढतो ॥ २ ॥ तुका ह्मणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥ ३ ॥

८३२. अवगुण तों कोणीं नाहीं प्रतिष्ठिले । मागें होत आले शिष्टाचार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा तों नव्हे बरा सत्यवाद ॥ ध्रु ॥ मद्य आणि मधु एकरासी नांवें । तरि कां तें खावें आधारें त्या ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद दृष्टिन्यायें ॥ ३ ॥

८३३. भूतीं भगवंत । हा* तों जाणतों संकेत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भारी मोकलितों बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥ ध्रु ॥ करावा उपदेश । निवडोनि तरि दोष ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे । चुकतां आडरानें कांटे ॥ ३ ॥

८३४. आह्मां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥ ध्रु ॥ अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ॥ ३ ॥

८३५. दर्पणासी नर्कटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुदें विपरीत ॥ ध्रु ॥ अंधळ्यास काय हिरा । गारा चि तो सारिखा ॥ २ ॥ तुका ह्मणे भुंके सुनें । ठाया नेणे ठाव तो ॥ ३ ॥

८३६. नावडे तरि कां येतील हे भांड । घेउनियां तोंड काळें येथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नासोनियां जाय रस यासंगती । खळाचे पंगती नारायणा ॥ ध्रु ॥ तोंडावाटा नर्क काढी अमंगळ । मिष्टान्ना विटाळ करी सुनें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं संतांची मर्यादा । निंदे तो चि निंदा मायझवा ॥ ३ ॥

---

१ त. सत्यें.–२ पं. साटविला वान–३ पं. मोला ऐसी दावी वानि–४ त. 'कोणीं नाहीं' यांच्यावद्दल 'नाहीं कोणी'. पं. कांहीं नाहीं.–५ क. त. तो.–६ त. पं. 'कां तें' यावद्दल 'तें का'.–७ दे. त. क. कवतुक.–८ पं. नकटें–९ दे. "सुणें" असें मागून केलें आहे * पं. हा शब्द नाहीं.

८३७. लेकरा आईतें पित्याची जतन । दावी निजधन सर्व जोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यापरि आमचा जालासे सांभाळ । देखिला चि काळ नाहीं आड ॥ ध्रु ॥ भुकेचे संनिध वसे स्तनपान । उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥ २ ॥ आळवूनि तुका उभा पैलथडी । घातली या उडी पांडुरंगें ॥ ३ ॥

८३८. शुद्ध चर्या हें चि* संताचें पूजन । लागत चि धन नाहीं वित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांती । आपण चि येती चोजवीत ॥ ध्रु ॥ कीर्तनीं[1] चि बोले कृपेचा वोरस । दुरीपणें वास संनिधता ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म सांगतों सेवगें । मन लावा लागें स्वहिताच्या ॥ ३ ॥

८३९. जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेंकड तें ओढी अमंगळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चित्ताच्या संकोचें कांहीं च न घडे । अतिशयें वेडे चार ते[3] चि ॥ ध्रु ॥ काळाविण कांहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे वचनें चांचणी । काय बोलवूनि वेळोवेळां ॥ ३ ॥

८४०. कामातुर चवी सांडी । वरळ तोंडीं वरळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रंगलें तें अंगीं दावी । विष देववी आसडे ॥ ध्रु ॥ धनसोसें लागे वेड । ते बडबड शमेना ॥ २ ॥ तुका ह्मणे वेसनें दोन्ही । नर्कखाणी भोगावया ॥ ३ ॥

८४१. कृष्णांजनें[4] जाले सोज्वळ लोचन । तेणें दिले वोंन[5] निवडुनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निरोपाच्या मापें करी[6] लडवड । त्याचें त्याँनें[7] गोड नारायणें ॥ ध्रु ॥ भाग्यवंतांघरीं करितां विश्वासें । कार्य[8] त्यासरिसें होईजेतें ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट भरे वरेवोजा । निज ठाव निजा निजस्थानीं ॥ ३ ॥

८४२. मैंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें नाडियलें जग । नेतो लागों नेदी माग ॥ ध्रु ॥ उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधीताहे ॥ २ ॥ वैकुंठीहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥ ३ ॥ पुंडलिकें थारा । देउनि आंणिलें[9] या चोरा ॥ ४ ॥ तुका ह्मणे चला । तुह्मी आह्मी धरूं त्याला ॥ ५ ॥

८४३. भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी माझी ह्मणे एकंएकां[10] मारी । हें तों नाहीं दुरी उभयतां ॥ ध्रु ॥ तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥ २ ॥ तुका ह्मणे एके ठायीं आहे वर्म । हें चि होय श्रम निवारितें ॥ ३ ॥

---

१ पं. कीर्तनेची.—२ त. सवग.—३ दे. तो—४ पं. कृष्णांजन.—५ पं. त. वाण.—६ पं. करील वडवड. दे. करीं.—७ पं. त. तेणे.—८ पं. काये—९ दे. क. आणिलें चोरा.—१० पं. एकमेका.

* पं. 'चि' हा शब्द नाहीं.

८४४. लटकियेंाची[1] आशा । होतों पडिलों वळसा । होउनियां दोषा । पात्र मिथ्या अभिमानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवी उघडली दृष्टी । नाहीं तरी होतों कष्टी । आक्रंदते सृष्टी । मात्र या चेष्टांनीं ॥ ध्रु० ॥ मरणाची नाहीं शुद्धी । लोभीं प्रवर्तली बुद्धी । परती तों कधीं । घडे चि ना माघारीं ॥ २ ॥ सांचूनि मरे धन । लावी पोरांसी भांडण । नाहीं नारायण । तुका ह्मणे स्मरीला ॥ ३ ॥

८४५. जवळी सुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासी काम ॥ ध्रु० ॥ सुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवा । कां हा न करी चि बरवा ॥ ३ ॥

८४६. बरवें देशांवर[3] जालें । काय बोलें बोलावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें[4] ॥ ध्रु० ॥ भाग्यें जाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥ २ ॥ तुका ह्मणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ३ ॥

८४७. सांगतां हें नये सुख । कीर्ती मुख न पुरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीनें सेवन करूं । जीवींचें धरूं जीवीं च ॥ ध्रु० ॥ उपमा या देतां लाभा । काशा शोभा सारिखी ॥ २ ॥ तुका ह्मणे नुचलीं डोई । ठेविली पायीं संतांचे ॥ ३ ॥

८४८. आपुलाला[5] ल्हो करूं । केणें भरूं हा विठ्ठल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्य पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥ ध्रु० ॥ पुढती[6] कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली जोडी । चरण घडी न विसंबें[7] ॥ ३ ॥

८४९. उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ ध्रु० ॥ संपुष्ट हीं[8] हृदयपेटी । करूनि पोटीं सांटवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ३ ॥

८५०. आह्मां[9] आपुलें नावडे संचित । चरफडे[10] चित्त कळवळ्यानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न कळतां जाला खोळंब[11] मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ॥ ध्रु० ॥ कळों आलें बरें उघडले डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ॥ ३ ॥

---

१ दे. लटिकियाच्या. पं. लटिक्याच्या.—२ दे. आहिर्णेसी. पं अहिर्णिसी. त. आहीर्णीसी.—३ दे. त. पं. देशाउर—४ दे. त. दरुषगें.—५ पं. आपुला लाहो—६ दे. त. पुडती—७ दे. क. विसंभें—८ पं. हे.—९ त. आह्मांसी आपुलें नावडे स्वहित—१० दे. त. पं. चरफडी.—११ पं. खोळ्या.

८५१. वरगासाठीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फजित तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥ छ्रु ॥ ओढाळाची ओंगळ ओढी । उगी खोडी नवजाय ॥ २ ॥ तुका फजीत करी बुच्या[1] । विसरे कुच्या खोडी तेणें ॥ ३ ॥

८५२. धांव घालीं आई । आतां पाहातेसी काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालें वियोगें हिंपुटी[2] ॥ छ्रु ॥ करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥ २ ॥ तुका ह्मणे डोई । कधीं ठेवीन हे पायीं ॥ ३ ॥

८५३. तुह्मां ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ॥ १ ॥ ध्रु. ॥ होती काशानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ॥ छ्रु ॥ नसतें सांभाळिलें । जरि तुह्मीं आश्वासिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपाळुवा । बरवा केला सावाधावा ॥ ३ ॥

८५४. देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहातां काशा तूं सारिखा । तिंहीं लोकांच्या जनका ॥ छ्रु ॥ आरुष हे वाणी । गोड करूनि घेतां कानीं ॥ २ ॥ आवडीनें खेळे । तुका पुरवावे[3] सोहाळे[4] ॥ ३ ॥

८५५. दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीव आला पायांपाशीं । येथें असें कलिवरेंसीं ॥ छ्रु ॥ कांहीं च नाठवे । ठायीं बैसलें तुंठवे[5] ॥ २ ॥ जीव असतां पाहीं । तुका ठकावला ठायीं ॥ ३ ॥

८५६. भोगावरि आह्मीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥ छ्रु ॥ काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरीं काय ठेवूं ॥ २ ॥ केला तरी उरे वाद चि कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वपनींची ॥ ३ ॥ आवघे चि वाण आले तुह्मां घरा । मजुरी मजुरा रोज कीर्दी[6] ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥ ५ ॥

८५७. कां हो एथें काळ आला आह्मां आड । तुह्मांपाशीं नाड करावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥ छ्रु ॥ कां हो उपजेना द्यावी ऐसी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥ २ ॥ पाप फार किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ॥ ३ ॥ काय जालें देणें[7] निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडुनियां ॥ ५ ॥

---

१ पं. वुका.–२ दे. हिपुटी.–३ पं. फुकाचे.–४ दे. पं. सोहाळे.–५ पं. नुठावे.–६ त. कीर्ती.–७ पं. नेणें.

८५८. काय देह घालूं करवती कमरी[1] । टाकूं या भितरी अग्नीमाजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सेवूं वन शीत उष्ण तीन[2] । साहों कीं मोहन[3] धरूनी बैसों ॥ ध्रु ॥ काय लावूं अंगीं भस्म उधळण । हिंडूं देश कोण खुंट चारी ॥ २ ॥ काय त्यजूं[4] अन्न करूनि उपास । काय करूं नास जीवित्वाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय करावा उपाव[5] । ऐसा देईं भाव पांडुरंगा ॥ ४ ॥

८५९. दंभें कीर्ति पोट भरे मानी जन । स्वहित कारण नव्हे कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरती तुझे पाय मज दुरी । धरितां हे थोरी जाणिवेची ॥ ध्रु ॥ पिंडाच्या पाळणें धांवती विकार । मज दावेदार मजमाजी ॥ २ ॥ कैसा करूं घात आपुला आपण । धरूनि गुमान लोकलाज ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज दावी तो सोहळा[6] । देखें पाय डोळां तुझे देवा ॥ ४ ॥

८६०. धिग जिणें[7] त्याचा स्वामी हीन वर । मरण तें वर[8] भलें मग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आइका[9] जी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥ ध्रु ॥ देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परि भलें ॥ २ ॥ तुका ह्मणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥ ३ ॥

८६१. आतां गाऊं[10] तुज ओविया मंगळी[11] । करूं गदारोळी हरिकथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होसि निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥ ध्रु ॥ भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहों ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी लाडिकीं लेंकरें । न राहों अंतरें[12] पायांविण ॥ ३ ॥

८६२. सर्व सुखें आजी एथें चि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥ १ ॥ सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाचा राहिली कुंटित । पुढें जालें चित्त समाधान ॥ ३ ॥

८६३. विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल या चित्तीं बैसलासे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे[13] छाया माझी मज ॥ ध्रु ॥ बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥ २ ॥ सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तें ही करी ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे या विठ्ठलासी[14] आतां । नये विसंवतां माझें मज ॥ ४ ॥

---

१ दे. करमरी.–२ पं. ताहान –३ पं. मौन.–४ दे. क. त. तजूं.–५ पं. उपाय.–६ दे. त. सोहोळा.–७ पं. त. जीणें.–८ दे. वर. पं. बरें.–९ दे. ऐका जी.–१० पं. तुज गाऊं –११ दे. मगळीं.–१२ दे. त. पं. अतरे.–१३ त. ही –१४ पं. तुका ह्मणे या हो विठऊसी आता. त. तुका ह्मणे या विठोबासी आतां.

८६४. होयें वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करावीं साधनें । फळ अवघें चि तेणें ॥ ध्रु ॥ अभिमान नुरे । कोड अवघें चि पुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे डोळां । विठो बैसला सांवळा ॥ ३ ॥

८६५. पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥ ध्रु ॥ न लगे धन मान । देहभावें उदासीन ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । नासी तात्काळ तें स्थळ ॥ ३ ॥

८६६. बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं जाला त्याग अंतरींचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासी हा ठावा समाचार ॥ ध्रु ॥ जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातों विसरुनि सकळ हें ॥ २ ॥ प्रपंचाबाहेरि नाहीं आलें चित्त । केले करी नित्य वेव्हसाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज भोरप्या चि परी । जालें सोंग वरी आंत तैसें ॥ ४ ॥

८६७. ह्मणवितों दास ते नाहीं करणी । आंत वरी दोन्ही भिन्न भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥ ध्रु ॥ पाविजे तें वर्म न कळे चि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥ २ ॥ भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांयां गेलों ऐसा दिसें । होईल या हांसें लौकिकाचें ॥ ४ ॥

८६८. न कळतां काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कई कासयानें ॥ ध्रु ॥ साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कैं गा देवा ॥ २ ॥ लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥ ४ ॥

८६९. चिंतिलें तें मनिंचें जाणें । पुरवी खुणे अंतरींचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥ ध्रु ॥ नवसियाचे नवें रस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सम चि देणें । समचरण उभा असे ॥ ३ ॥

८७०. उद्धाराचा संदेह नाहीं । याचा कांहीं सेवकां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंग अभिमानी । जीवदानी कोंवसा ॥ ध्रु ॥ बुडतां जळीं जळतां अंगीं । ते प्रसंगीं राखावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मांसाटीं । कृपा पोटीं वागवी ॥ ३ ॥

---

१ पं. होय होय. दे. होयें वारेकरी पांहें पांहें रे०.–२ पं. विठु त. विठल.–३ क. नाहीं.–
४ पं. वेवसाव.–५ पं. पुरवी नवस.–६ दे. त. क. उधाराचा.

८७१. काय विरक्ति[1] कळे आह्मां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाचों[2] सुखें वैष्णवमेळीं । टाळघोळीं आनंदें ॥ ध्रु ॥ शांति क्षमा दया मी काय जाणें । गोविंद कीर्तनेंवांचूनियां ॥ २ ॥ *कासया उदास असों देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥ ३ ॥ कासया एकांत सेवूं तया वना । आनंद तो जनामाजी असे ॥ ४ ॥ तुका[3] ह्मणे आह्मां ऐसा भरवसा । विठ्ठल सरसा चालतसे ॥ ५ ॥

८७२. जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे[4] यमापाशीं ॥ ध्रु ॥ गरुडटकयांच्या[5] भारें । भूमि गर्जे जयजयकारें[6] ॥ २ ॥ सहज तयां जनां छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ३ ॥ तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठसोहळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भेणें । काळ नये तेणें राणें ॥ ५ ॥

८७३. † माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपण चि देव होय गुरु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पढियें देहभावें पुरवितो वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ ध्रु ॥ मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥ २ ॥ योगक्षेम त्यांचें[7] जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनी ॥ ४ ॥

८७४. सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणीक तें वर्म नेणें कांहीं ॥ १ ॥ काय जाणों संतां निरविलें देवें । करिती या भावें कृपा मज ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळों यावा ॥ ३ ॥

८७५. उदंड शाहाणे होत[8] तर्कवंत । परि[9] या नेणवे अंत विठोबाचा ॥ १ ॥ उदंडीं[10] अक्षरां करोत भरोवरी । [11]परि ते नेणवे थोरी विठोबाची ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते[12] सिण रितें माप ॥ ३ ॥

८७६. आधारावांचुनी । काय सांगसी[13] काहाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठावा नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघें चि वाव ॥ ध्रु ॥ मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवा । जाणपण एक सवा ॥ ३ ॥

---

१ त. काय विरक्ति ते –२ क. नाचों सुख. पं. नाचों प्रेमसखें वैष्णवाचे मेळीं । दिंडी टाळघोळीं आनंदें यां ॥. त. नाचों पैं सुख वैष्णवमळीं । सदा टाळघोळीं आनदेंसी –३ पं. तुका ह्मणे मज आहे हा भरवसा ।.–४ त. सांगती.–५ पं. गरुड ठकियाच्या.–६ दे. त. जेजेकारें –७ दे. त्यांचें पं. त्यांचा – ८ पं. होती –९ पं. परी नेणवे चि०.–१० पं. उदंड अक्षरे.–११ पं. परी नेणवे चि० –१२ क. त. पं. तो–१३ क. सांगशील. * क. हें कडवें नाहीं, व पं. "कासया एकात" याच्या मागून आहे. † या व मागील अभंगांच्या मध्यें 'तुका सज्जन तिनसू कहिये । जीनथें प्रेम दुनाये । दुर्जन तेरा मुख काला । थीता प्रेम घटाये" हा दोहरा दे. क या दोन प्रतींत आहे.

८७७. अनाथांची तुह्मां दया । पंढरीराया येतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी ऐकोनियां कीर्ति । वहु विश्रांति पावलों ॥ छ ॥ अनाथांच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ॥ २ ॥ तुका ह्मणे सवघड हित । ठेवूं चित्त पायांपें ॥ ३ ॥

८७८. येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विषयांचे झणी व्हाल लोलिंगत । चेवलिया अंत न लगे मज ॥ छ ॥ वाहोनियां भार कुंथसील ओझे । तें चि माझें थीता त्याग ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥ ३ ॥

८७९. हीं च त्यांचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥ छ ॥ हा च काळ वर्तमान । साधन हीं संपत्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे दिवसरातीं । हें चि खाती अन्न ते ॥ ३ ॥

८८०. दीप न देखे अंधारा । आतां हें चि करा जतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायण नारायण । गांठी धन वळकट ॥ छ ॥ चिंतामणीपाशीं चिंता । तत्वता[1] हीं नयेल ॥ २ ॥ तुका ह्मणे उभयलोकीं । हे चि निकी सामग्री[2] ॥ ३ ॥

८८१. धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिली तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संदेहाची सुटली गांठी । जालें पोटीं शीतळ ॥ छ ॥ भवनदीचा जाला तारा । या उत्तरा[3] प्रसादें ॥ २ ॥ तुका ह्मणे मंगळ आतां । कोण दाता याहूनि ॥ ३ ॥

८८२. दिनरजनीं हा चि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संकलिपला देह देवा । सकळ हेवा तये ठायीं ॥ छ ॥ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रियां ॥ २ ॥ कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥ ३ ॥

८८३. खरें नानवट निक्षेपीचें[4] जुनें । काढिलें ठेवणें समर्थाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥ छ ॥ कुलालाच्या[5] हातें घटाच्या[6] उत्पत्ति । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवन तें नारायणीं । प्रभा जाते[7] कीर्णी प्रकाशाची ॥ ३ ॥

८८४. गंगेचिया अंतांविण[8] काय चाड । आपुलें तें कोड तृषेपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर । घालीं[9] निरंतर हृदयपुटीं ॥ छ ॥ कारण तें असे नवनीतापाशीं । गवाळ तें सोसी इतर कोण ॥ २ ॥ वाळाचे सोईतें घांस घाली माता । अट्टाहास[10] चिंता नाहीं तया ॥ ३ ॥ गाऊं नाचों करूं आनंदसोहळा ।

---

१ पं. सत्वता.–२ दे. त. पं. सामोग्री.–३ त. उतारा.–४ दे. त. निक्षुपीचें.–५ क. पं. कुलाळाच्या.–६ पं. घटाची.–७ क. "प्रभा जाते" याच्यावद्दल "प्रभाते".–८ पं. अंतेविण–९ पं. घालू–१० दे. त. आटाहास.

भाव चि ओंगळा नाहीं हातां ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघें जालें एकमय । परलोकींची काय चाड आतां ॥ ५ ॥

८८५. स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर आतिशय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥ छ ॥ येउनियां आड ठाके लोकलाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां जेथें जेथें गोवा । तेथें तुह्मीं देवा सांभाळावें ॥ ३ ॥

८८६. पडिलों भोवंनीं । होतों बहु चिंतवेंनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतों चुकलों मारग । लाहो केला लागें वेगें ॥ छ ॥ इंद्रियांचे संदी । होतों सांपडलों बंदीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥ ३ ॥

८८७. बरें जालें आलीं ज्याचीं त्याच्या घरा । चुकला पांन्हेरा ओढाळांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वहु केलें दुखी त्यांचिया सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें ॥ छ ॥ त्यांचिया अन्यायें भोगों माझें अंग । सकळ ही लाग द्यावा लागे ॥ २ ॥ नाहीं कोठें स्थिर राहों दिलें क्षण । आजिवरी सिण पावलों तो ॥ ३ ॥ वेगळाल्या खोडी केली तडातडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥ ४ ॥ निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार सांडवूनि ॥ ५ ॥

८८८. न करावी आतां पोटासाटीं चिंता । आहे त्या संचिता माप लावूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपायीं सिण जाला ॥ छ ॥ येथें तंव नाहीं घेइजेसें सवें । कांहीं नये जीवें वेचों मिथ्या ॥ २ ॥ खंडणें चि नव्हे उद्वेग वेरझारीं । बापुडे संसारीं सदा असों ॥ ३ ॥ शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां सकळांचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥ ५ ॥

८८९. आमच्या हें आलें भागा । जिन्हेंार या जगाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरूनियां ठेलों जीवें । वळकट भावें एकविध ॥ छ ॥ आणूनियां केला रूपा । उभा सोपा जवळी ॥ २ ॥ तुका ह्मणे अंकित केला । खालीं आला वचनें ॥ ३ ॥

८९०. खरें भांडवल सांपडलें गांठी । जेणें नये तुटी उदमासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [11]सैवंगाचें केणें सांपडलें घरीं । भरूनि वैखरी सांटविलें[12] ॥ छ ॥ घेतां देतां लाभ होतसे सकळां । [13]सदेवां दुर्वळा भाव तैसा ॥ २ ॥ फडा आलिया तो न

---

१ पं. वेगळा नाहीं आतां. त. नाहीं हातां.–२ दे. त. हाता. पं. सोडवण्या –३ दे. क. भोवर्णी.–४ दे. क. चितवणी.–५ पं. वेग –६ क. पान्हेरा –७ क. भोग –८ पं. उद्योग.–९ दे. नावेचें वैसनें क. नावचें वैमोनें –१० दे. क. त. जीऱ्हार.–११ दे. क. पं. संवगाचें –१२ त. पं. माप केलें.–१३ पं. सदैव. त. सदैवां दुर्वळा लाभ तैसा.

वजे निरासे । जरि कांहीं त्यास न कळतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां जालीसे निश्चिंती । आणीक तें चित्तीं न धरूं दुजें ॥ ४ ॥

८९१. पदोपदीं दिलें अंग । जालें सांग कारण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥ ध्रु ॥ पुढती चाली मनालाहो । वाढे देहो संतोष ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षरभागीं । जालों जगीं व्यापक ॥ ३ ॥

८९२. निवडुनि दिलें नवनीत । संचित ते भोगीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पुढें भावसार । जीवेंना थार पाहावया ॥ ध्रु ॥ पारखियाचे पैडिलें हातीं । चांचपती आंधळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥ ३ ॥

८९३. उचित न कळे इंद्रियाचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपण जाऊन न्यावीं नरकास । बळें बेताळीस कुळें जग ॥ ध्रु ॥ अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वांयां दंभासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥ ३ ॥

८९४. एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येई कैसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥ ध्रु ॥ आणिका संकल्पा नको गोऊं मन । तरी च कारण साध्य होय ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें जाणावें उचित । तरी सहज स्थित येईल कळों ॥ ३ ॥

८९५. गावे ह्मणउनि गीत । धरुनि राहे तैसें चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥ ध्रु ॥ ऐकावी ह्मुण कथा । राहे तैसें धरुनि चित्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । नव्हे जेविल्यावांचुनि ॥ ३ ॥

८९६. कळेल हे खुण । तरि दावी नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्य संतांपाशीं राहे । येरां भय आड आहे ॥ ध्रु ॥ अणुचिया ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥ २ ॥ इंद्रियांचें धनी । ते हे जाती समजूनि ॥ ३ ॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ॥ ५ ॥

८९७. जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा जालासे बेश्रम । लाज नाहीं न ह्मणे राम ॥ ध्रु ॥ पाहे वैरियाकडे । डोळे वासुनियां रडे ॥ २ ॥ बांधुनियां यमा हातीं । दिलीं नाहीं त्याची खंती ॥ ३ ॥ नाहीं यांपें काम । ऐसें जाणे तो अधम ॥ ४ ॥ अझुन तरि मुका । कां रे जालासि ह्मणे तुका ॥ ५ ॥

---

१ पं. भवसार —२ त. जीव थार.—३ त. पडिलों.—४ त. हा लाभ.—५ त. न्यावें आणिकांस. पं. न्यावें नरकाम.—६ त. प. येईल.—७ पं. ह्मणे.—८ पं. कळेल.—९ दे. त. अनुचिया.—१० पं. दिलें.

८९८. वांटा घेईं लवकरि । मागें अंतरसी दुरी । केली भरोवरी । सार नेती आणीक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती । समय नेणती । माथां भार वाहोनि ॥ छ ॥ नाहीं सारिलें तोंवरी । धांव घेईं वेग करीं । घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें ॥ २ ॥ फट लंडी ह्मणे तुका । एक न साहावे धक्का । तरि च या सुखा । मग कैसा पावसी ॥ ३ ॥

८९९. चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया । ऐकिल्या[3] वांयां वारता त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका जी वोजे पडतसें पायां । भावाचि तें जायावाट नव्हे ॥ छ ॥ व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव । सांगतां तो भाव येत नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे आरालें । बिंबीं निवळलें तरि भासे ॥ ३ ॥

९००. काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जया न फळे उपदेश । धस ऐसा त्या नांवें ॥ छ ॥ काय नाहीं असत जड । दगड तो अवोलणा ॥ २ ॥ तुका ह्मणे कुचर दाणा । तैसा ह्मणों ढेंग हा ॥ ३ ॥

९०१. देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्या ऐसी केवीं गारगोटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मर्यादा ते जाणं अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥ छ ॥ काय पडिलेंसी लटिक्याचे भरी । वोंवाळुनि थोरी परती सांडीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढें दिसतसे घात । करितों फजित ह्मणउनी ॥ ३ ॥

९०२. संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥ छ ॥ भिक्षा आणि वेवसाव । काला करितो गाढव ॥ २ ॥ करुनि वस्ती बाजारीं । ह्मणवी कासया निस्पृही ॥ ३ ॥ प्रसादा आडुनि कवी । केलें तुप पाणी तेवीं[10] ॥ ४ ॥ तुका ह्मणे होईं शूर । किंवा निसुर मजुर ॥ ५ ॥

९०३. तेज्या इशारती । तटा फोकें[12] वरी घेती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सांगावें त्याहुनी । ऐका रे धरा मनीं ॥ छ ॥ नव्हे भांडखोर । ओढूनि धरूं पदर ॥ २ ॥ तुका ह्मणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥ ३ ॥

९०४. मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आचारभ्रष्ट होतीं[13] लोक कळी । पुण्य क्षीण बळी जालें पाप ॥ छ ॥ वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ २ ॥ वेदाचे पाठक

---

१ दे. भांमावलीं.—२ पं. मिती.—३ त. पं. आइकिल्या.—४ पं. विंव.—५ जाणा.—६ पं. जाणें.—७ पं. ससाराच्या.—८ दे. भिक्षाणी वेवसाव ।.—९ पं. कैसा ह्मणवी निस्पृही ।.—१० त. पं. जेवीं.—११ दे. सुर.—१२ पं. फोकावरी.—१३ त. "होतीं लोक" याच्याबद्दल "लोक होतीं".

सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती करावे फजित । ते चि छंद नित्य बहु होती ॥ ४ ॥

९०५. अक्षरांचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियाचा तळ धरी । जीवा उरी नुरउनी ॥ छ्रु ॥ फळलें तें लवे भारें । पिक खरें आलें तईं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पुढें भाव सारावा ॥ ३ ॥

९०६. उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्तशुद्ध बुद्धी ठायीं स्थीर ॥ १ ॥ न घलावी धांव मनाचिये ओढी । वचन आवडी संताचिये ॥ २ ॥ अंतरीं या राहे वचनाचा विश्वास । न लगे उपदेश तुका ह्मणे ॥ ३ ॥

९०७. जीवन हे मुक्त नर जाले पावन । तजा हो दुर्जनसंगति ही ॥ १ ॥ बहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघें चि तेणें विष होय ॥ २ ॥ तुका ह्मणे जेणें आपलें स्वहित । तैसी करीं नीत विचारूनि ॥ ३ ॥

९०८. द्रव्याचा तो आह्मी धरितों विटाळ । तया पाठी काळ लाग करी ॥ १ ॥ करोनियां हें चि राहिलों जीवन । एक नारायण नाम ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि करुनि जतन । आलिया ही दान याचकासी ॥ ३ ॥

९०९. द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग । ह्मणोनियां संग खोटा त्याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निरयाचें मूळ घालुनियां मागें । मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥ छ्रु ॥ आजिच्या प्रसंगें हा चि लाभ घ्यावा । पुढील भार देवावरी घाला ॥ २ ॥ प्रालब्ध कांहीं न पालटे सोसें । तृष्णेचें हें पिसें वांयांविण ॥ ३ ॥ तुका ह्मणे घेईं राहे ऐसें धन । सादर श्रवण करोनियां ॥ ४ ॥

९१०. रडे अळंकार दैन्याचिये कांती । उतमा विपत्तिसंगें घडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाविण एक अशोभ्य दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ छ्रु ॥ रांधूं नेणे तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वांयां जाय ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंतामणि शेळी गळा । पावे अवकळा ह्मणउनी ॥ ३ ॥

९११. दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥ छ्रु ॥ भोग कळों येतो मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें झांकितील डोळे । भोग देतेवेळे येइल कळों ॥ ३ ॥

१ त. कळों.–२ त. भरलें.–३ पं. वरें.–४ त. पं. तुका ह्मणे हागे देव ।.–५ पं. घालावी.–६ पं. त्यजावे. त. तजा हे–७ त. राहिलें–८ दे. याच्यावर "विपत्तेचे संगती" असा पाठ घातला आहे.–९ त. संगें.–१० दे. अशोभ.

९१२. सदैव तुह्मां अवघें आहे । हातपाय चालाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुखीं वाणी कानीं कीर्ति । डोळे मूर्ती देखाया ॥ छ्र ॥ अंध बहिर ठकलीं किती । मुकीं होतीं पांगुळें ॥ २ ॥ घरास आगि लावुनि जागा । न पळे तो[1] गा वांचे ना ॥ ३ ॥ तुका ह्मणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥ ४ ॥

९१३. ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ म्हणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥ छ्र ॥ संचित प्रारब्ध गाढें । धांवे पुढें क्रियमाण ॥ २ ॥ तुका ह्मणे घुवडा ऐसें । जन्म सारिसें शुकराचें ॥ ३ ॥

९१४. सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडे एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संसाराची मज न साहे चि वार्ता । आणीक ह्मणतां माझें कोणी ॥ छ्र ॥ देहसुख कांहीं बोलिले उपचार । विष तें आदर बंदें[2] वाटे ॥ २ ॥ उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं आणीक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ॥ २ ॥

९१५. आणीक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भिन्न भेद हे भावनास्वभाव । नव्हे कांहीं देव एकविध ॥ छ्र ॥ गुण दोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म अकर्म तें ॥ २ ॥ तरि च भलें आतां न करावा संग । दुःखांचा[4] प्रसंग तोडावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुण गाईं या देवाचे । घेईं माझे वाचे हे चि धणी ॥ ४ ॥

९१६. आपुल्या विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलें स्वहित जाणती सकळें[5] । निरोधितां वळें दुःख वाटे ॥ छ्र ॥ आइको नाइको कथा कोणी तरी । जाऊनियां घरीं निजो सुखें ॥ २ ॥ माझी कोण वोज जाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लावूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥ ४ ॥

९१७. धाईं अंतरिंच्या सुखें । काय वडबड वाचा मुखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ॥ छ्र ॥ वाढे तळमळ उभयता । नाहीं देखिलें अनुभवितां ॥ २ ॥ अपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसेंतैसें ॥ ३ ॥ साधनाची सिद्धि । मौन[6] करा स्थिर बुद्धि ॥ ४ ॥ तुका ह्मणे वादें । वांयां गेलीं ब्रह्मवृंदें ॥ ५ ॥

---

१ पं. त.—२ पं. निःद्व.—३ पं. वंध—४ पं. दुखाचे.—५ दे. सकळ—६ त. मौन्य. दे. "मोन" असतां तें खोडून "मन" केलें आहे.

९१८. कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसी ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ छ्र ॥ भुस उपणुनि[1] केलें काय । हारपले दोन्ही ठाय ॥ २ ॥ तुका ह्मणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां[2] ॥ ३ ॥

९१९. संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥ छ्र ॥ करितों कवतुक बोबडा उत्तरीं । ह्मणी मजवरि कोप धरा ॥ २ ॥ काय माझी याति नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तो चि जाणे ॥ ४ ॥

९२०. चंदनाच्या वासें धरितील नाकें[3] । नावडे कनक न घडे हें ॥ १ ॥ साकरेची गोडी सारखी[4] सकळां । थोरां मोठ्यां बाळां धाकुटियां ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें चित्त शुद्ध होतें । तरि का निंदितें जन मज ॥ ३ ॥

९२१. तुज ऐसों[5] कोण उदाराची रासी । आपुलें चि देसी पद दासा ॥ १ ॥ शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥ २ ॥ भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्तांच्यां[6] परी नावडती ॥ ३ ॥ न वजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥ ५ ॥

९२२. तरि कां नेणते होते मागें ऋषी । तींहीं या जनासी दुराविलें ॥ १ ॥ वोळगती जया अष्ट[7] महासिद्धी । ते या जनबुद्धी नातळती ॥ २ ॥ कंदमूळें पाला धातूच्या पोषणा । खातील[8] वास राणां तरी केला ॥ ३ ॥ लावुनियां नेत्र उगे चि बैसले । न बोलत ठेले मौन्यमुद्रे[9] ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥ ५ ॥

९२३. कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देइल धीर माझ्या जीवा ॥ १ ॥ शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥ २ ॥ कलियुगीं वहु कुशळ हे जन । छळितील गुण [10]तुझे गातां ॥ ३ ॥ मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां दुरावितां जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ५ ॥

---

१ पं. उफणुनि.–२ पं. दे. गुसळितां.–३ त. दे. नाकें–४ त. दे. सारिखी.–५ त. पं. ऐसी.–६ त. दे. अभक्तांची परी नावडेती.–७ दे. अष्टमासिद्धि.–८ पं. खाती.–९ त. मौन्यरूप.–१० त. गातां तुझें.

९२४. काय उणें जालें तुज समर्थासी । ऐसा मजपाशीं कोण दोष ॥ १ ॥ जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥ २ ॥ तुजविण रत आणिकांचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही[1] दावीं मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय धरूनी गुमान । सांग उगवून पांडुरंगा ॥ ४ ॥

९२५. काय करूं आन[2] दैवतें । एका विण पंढरीनाथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरिता मिळाली सागरीं । आणिकां नांवां कैची उरी ॥ ध्रु ॥ अनेक दीपींचा प्रकाश । सूर्य उगवतां नाश ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें दुजें । एका विण पंढरीराजें ॥ ३ ॥

९२६. काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होसी नामा च सारिखा[3] । समजाविली नाहीं लेखा ॥ ध्रु ॥ नाहीं वेचावेच जाला । उरला आहेसी संचला ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । काय होईल तुह्मां ओझें ॥ ३ ॥

९२७. एकाएकीं हातोफळी । ठाया बळी पावले ते* ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी देवा शक्तिहीनें[4] । भाकूं तेणें करुणा ॥ ध्रु ॥ पावटणी केला काळ । जया बळ होतें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे वीर्यावीर । संतधीर समुद्र ॥ ३ ॥

९२८. पुढिलाचें इच्छी फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥ ध्रु ॥ ज्येष्ठांचीं कां आह्मां जोडी । परवडी न लभों ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं कोड । पुरवीं लाड आमुचा ॥ ३ ॥

९२९. कैवल्याच्या तुह्मां घरीं । रासी हरी उदंडें[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मजसाटीं कां जी वाणी । नव्हे[6] धणी विभागा ॥ ध्रु ॥ सर्वा गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । जालों सांगा सन्मुख ॥ ३ ॥

९३०. आपलाल्या तुह्मी रूपासी समजा । कांसया[7] वरजा आरसिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों नव्हे देहबुद्धीचें कारण । होइल नारायणें दान केलें ॥ ध्रु ॥ वस्त्रूचिया वाणें वर्मासि स्पर्शावें । हें तों नाहीं ठावें मोकलित्या ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु मुखें[8] या वचना । सत्याविण जाणा चाल नाहीं ॥ ३ ॥

९३१. न मनावी चिंता तुह्मीं संतजनीं । हिरा स्फटिकमणी कैंवि होय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पडिला प्रसंग स्थळा[9] त्या सारिखा । देखिला पारिखा भाव कांहीं ॥ ध्रु ॥ बहुतांसी भय एकाचिया दंडें । बहुतं[10] या तोंडें वचनासी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं वैखरी वा सर । करायाचे चार वेडे वेडे ॥ ३ ॥

---

१ दे. "ग्वाही" याचें "गोही" केलें आहे.–२ पं. आन–३ दे. त. सारिका.–४ त. पं. शक्तिहीणें.–५ पं. उदंडा.–६ पं. नहों.–७ पं. कामीया.–८ पं. मुख–९ दे. स्तळा.–१० पं. बहुता. * पं. हा शब्द नाहीं.

९३२. यथाविधि पूजा करी । सामोग्री[1] तोंवरि हे नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझा सर्व भार । तूं दातार चालविसी ॥ छ ॥ मंगळ तें तुह्मी[2] जाणां । नारायणा काय तें ॥ २ ॥ तुका ह्मणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥ ३ ॥

९३३. भवसिंधूचें हें तारूं । मज विचारूं पाहातां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चित्तीं तुझे धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥ छ ॥ माझ्या खुणा मनापाशीं । तें या रसीं बुडालें[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म आलें । हातां भलें हें[4] माझ्या ॥ ३ ॥

९३४. पाहातां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक न वजे माझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिव्हे गोडी तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥ छ ॥ श्रवणीची वाट चोखावली शुद्ध । गेले भेदाभेद वारोनियां[5] ॥ २ ॥ महामळें मन होतें जें गांदलें । शुद्ध चोखाळलें स्पटिक जैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ४ ॥

९३५. हा चि परमानंद आळंगीन बाहीं । क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलायासि मात मन निवे हर्षें[6] चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख[7] ॥ छ ॥ जनांत भूषण वैकुंठीं सर्ता[8] । फावलें स्वहिता सर्वभावें ॥ २ ॥ तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥ ३ ॥ तुका ह्मणे[9] हा विठ्ठल चि व्हावा । आणिकी[10] या जीवा चाड नाहीं ॥ ४ ॥

९३६. आमुची कृपाळु तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥ छ ॥ भूक तान दुःख वारीं नेदीं सीण । अंतरींचा गुण जाणोनियां ॥ २ ॥ आशा तृष्णा माया चिंता दवडीं दुरी । ठाव आह्मां करीं खेळावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे लावीं संताचा सांगात । जेथें न पवे हात कळिकाळाचा ॥ ४ ॥

९३७. जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें[11] संतसंगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पूर्व पुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ[12] नुपजे तेथें ॥ छ ॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास वरा संतांपायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हे चि करावी मिरासी । वळी संतांपाशीं द्यावा जीव ॥ ३ ॥

---

१ पं. सामुग्री.–२ पं. आम्ही जाणों.–३ पं. बुडालों.–४ पं. हें चि –५ पं. निवारुनि.–६ दे. हरषें. त. हर्षें. पं. हर्षे.–७ पं. प्रेमसुखें.–८ सरता ?–९ पं. ह्मणे तो हा.–१० पं. आणीक –११ त. पं. विशेष संतसगें.–१२ त. पं. अंतरायें मूळ

९३८. आतां कांहीं सोस न करीं आणीक[1]। धरीन तें एक हें चि दृढ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें भवसिंधु उतरिजे पार। तुटे हा दुस्तर गर्भवास ॥ छ्र ॥ जोडीन ते आतां देवाचे चरण। अविनाश धन परमार्थ ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा जोडला हा देह। म[2]नुष्यपणें इहलोका आलों ॥ ३ ॥

९३९. जतन करीन जीवें। शुद्धभावें करूनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल विठ्ठल हें धन। जीवै[3]न अंतकाळींचें ॥ छ्र ॥ वै[4]र्दळ हें संचित सारूं। बरवा करूं उदिम हा ॥ २ ॥ तुका ह्मणे हृदयपेटी। ये संपुटीं सांटवूं ॥ ३ ॥

९४०. एवढा प्रभु भावें। तेणें संपुष्टीं राहावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होय भक्तीं केला तैसा। पुरवी धरावी ते इच्छा ॥ छ्र ॥ एवढा जगदानी। मागे तुळसीदळ पाणी ॥ २ ॥ आला नांवा रूपा। तुका ह्मणे जाला सोपा ॥ ३ ॥

९४१. भाग्यें ऐसी जाली जोडी। आतां घडी विसंभेनों[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटेवरी समचरण। संतीं खुण सांगितली ॥ छ्र ॥ अवघें आतां काम सारूं। हा चि करूं कैवाड ॥ २ ॥ तुका ह्मणे खंडूं खेपा। पुढें पापापुण्याच्या ॥ ३ ॥

९४२. पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण। आह्मां नारायण तैशापै[6]री ॥ १ ॥ सर्वभावें लोभ्या आवडे हें धन। आह्मां नारायण तैशापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे एकविध जालें मन। विठ्ठला वांचून नेणे दुजें ॥ ३ ॥

९४३. विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा। विठ्ठल उभा पाहावा विटेवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनाथाचा बंधु विठ्ठल कृपासिंधु। तोडी भवबंधु यमपाश ॥ छ्र ॥ तो चि शरणागतां हा विठ्ठल मुक्तिदाता। विठ्ठल या संतांसमागमें ॥ २ ॥ विठ्ठल गुणनिधि विठ्ठल सर्व सिद्धि। लागली समाधि विठ्ठल-नामें ॥ ३ ॥ विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख। गोडावलें मुख तुका ह्मणे ॥ ४ ॥

९४४. विठो सांपडावया हातीं। ठावी जाली एकै[7] गती। न धरीं भय चित्तीं। बळ किती तयाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लागे आपण चि हातीं। किव भाकावी काकुलती। करी मग चित्तीं। असेल तें तर्या[8]चे ॥ छ्र ॥ एकलिया भावबळें। कैं सांपडे तो काळें। वैष्णवांच्या मेळें। उभा ठाके हाकेसी ॥ २ ॥ बांधा माझिया जीवासी। तुका ह्मणे प्रेमपाशीं। न सोडीं तयासी। सर्वस्वासी उदार ॥ ३ ॥

९४५. वाट वैकुंठीं पाहाती। भक्त कैं पां येथें येती। तयां जन्ममरणखंती। नाहीं चित्तीं परलोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्यधन्य हरिचे दास। तयां सुलभ

---

१ पं. पुढें.–२ त. पं. मनुष्यपणा.–३ त. अंत जीवन काळींचे–४ पं. वरदळ.–५ त. विसवेना. पं. विसंवों.–६ पं. तयापरी.–७ पं. एकी.–८ पं. तयापें. दे. त. तयाचें.

गर्भवास । ब्रह्मादिक करिती आस । तीर्थावास[1] भेटीची ॥ ध्रु. ॥ कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस । पाहे रात्रदिवस । वाट कर जोडोनियां ॥ २ ॥ रिद्धिसिद्धी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्तां । मोक्षसायुज्यता[2] । वाट पाहे भक्तांची ॥ ३ ॥ असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले । आणीक ही उद्धरिले । महादोषी चांडाळ ॥ ४ ॥ सकळ करिती त्यांची आस । सर्वभावें ते उदास । धन्यभाग्य त्यांस । तुका ह्मणे दरुषणें ॥ ५ ॥

९४६. सोनें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियाचे साटीं विकूं पाहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पारखी तो जाणे तयाचे जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥ ध्रु. ॥ क्षीरा नीरा कैसें होय एकपण । स्वादी[3] तो चि भिन्न भिन्न काढी ॥ २ ॥ तुका ह्मणे थीता नागवला[4] चि खोटा । अपमान मोटा पावईल[5] ॥ ३ ॥

९४७. फोडुनि सांगडी बांधली माजासी । पैल थडी कैसी पावे[6] सहजीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपला घात आपण चि करी । आणिकां[7] सांगतां नाइके तरी ॥ ध्रु. ॥ भुकेभेणें विष घेऊं[8] पाहे आतां । आपल्या[9] चि घाता करूं पाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे एक चालतील पुढें । तयांसी वांकडें जातां ठके ॥ ३ ॥

९४८. उपकारासाटीं बोलों[10] हे उपाय । येणेंविण काय आह्मां[11] चाड ॥ १ ॥ बुडतां हे जन न देखवे[12] डोळां । येतो कळवळा ह्मणउनि ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे देखतिल डोळे । भोग देते वेळे येईल कळों ॥ ३ ॥

९४९. आठवे देव तो करावा उपाव । येर तजीं वाव खटपटा[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होई बा जागा होई बा जागा । वाउगा[14] कां गा सिणसील ॥ ध्रु. ॥ जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडसी तों कांहीं[15] निघेसि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा पावसील भावें । जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ॥ ३ ॥

९५०. माझ्या मुखावाटा नयो[16] हें वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुंकाचा[17] विभाग पतनदुःखासी । दोहींमुळें त्यासी तें चि सोधे[18] ॥ ध्रु. ॥ नाइकावी[19] निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे देव असाध्य यामुळें । आशामोहजाळें गुंतलिया ॥ ३ ॥

९५१. चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनासी विचार तो चि साच भाव । व्यापक[20] हा देव अंतर्बाहीं ॥ ध्रु. ॥

---

१ त. तीर्था आस.–२ दे. त. पं. सायोज्यता.–३ दे. स्वादीं.–४ पं. आपण.–५ पं. पाववील.–६ पं. पावेल.–७ पं. आणीक –८ दे. त. देऊ –९ आपला चि घाता. त. आपला चि घात.–१० पं. बोलतों हे.–११ त. चाड आह्मां.–१२ पं. देखवे हें डोळां.–१३ पं. खटपट.–१४ पं. कां सिणसील.–१५ पं. कहीं.–१६ पं. नये.–१७ पं. सुखाचा.–१८ पं. साध्य.–१९ त. आइकावी.–२० पं. व्यापला.

शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिके ठायीं ॥ २ ॥ भोगित्यासी काज अंतरीचें गोड । बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव शुद्ध हें कारण । भाट नारायण होईल त्यांचा ॥ ४ ॥

९५२. नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं न धरावी खंती । हित होइल धरा चित्तीं ॥ छ ॥ खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥ २ ॥ ज्याचें तो चि जाणें । मी मापाडें तुका ह्मणे ॥ ३ ॥

९५३. वासनेच्या मुखीं अदळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या नांवें अंतरा आला नारायण । चित्तसमाधान खुण त्याची ॥ छ ॥ सर्वकाळ हा चि करणें विचार । विवेकीं सादर आत्मत्वाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे जों जों भजनासी वेळे । अंगें तों तों कळे सन्निधता ॥ ३ ॥

९५४. चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तें चि किती काळ वाढवावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ॥ छ ॥ *करूं आला तों तों केला लवलाहो । उरों च संदेहो दिला नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोह परते चि ना मागें । ह्मणउनि त्यागें त्याग जाला ॥ ३ ॥

९५५. निर्गुणाचे घ्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां आह्मां आतां न पडे यावरी । आहों तें चि बरी जेथें तेथें ॥ छ ॥ आपणापासुनी नसावें अंतर । वेचिलें उत्तर ह्मणउनि ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुह्मां ऐसी ॥ ३ ॥

९५६. तुज च पासाव जालोंसों निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असे चि ना ॥ छ ॥ ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बोलतसें स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुह्माऐसा ॥ ३ ॥

९५७. प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुह्मीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि कांहीं न ठेवीं चि उरी । आलों वर्मावरी एकाएकीं ॥ छ ॥ न देखों चि कांहीं पैरती माघारी । उरली ते उरी नाहीं मुळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आला अंतरासी खंड । तरि माझें तोंड खवळिलें ॥ ३ ॥

---

१ पं. शुद्ध भाव –२ त. पं. वोळे.–३ पं. आगें –४ पं. ऐशापरी.–५ दे. सदेहे.–६ पं. निगुर्णासी.– ७ दे. त. कठिन्यता.–८ त. पं. जालोंसे –९ दे. त. नुन्य. पं. न्युन्य.–१० पं. परतो.–११ त. संतरा. * पं. हे कडवें नाहीं.

९५८. लेंटिका ऐसा ह्मणतां देव । संदेहसा वाटतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें आलें अनुभवा । मज ही सेवा करितां ॥ ध्रु. ॥ शून्याकारी बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे ताळी नाहीं । एके ठायीं चपळत्वें ॥ ३ ॥

९५९. जैशासाटीं तैसें व्हावें । हें बरवें कळलेंसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदास तूं नारायणा । मी ही ह्मणा तुह्मी च ॥ ध्रु. ॥ ठका मैंहाठक जोडा । जो धडफुडा लागासी ॥ २ ॥ एकांगी च भांडे तुका । नाहीं धोका जीवित्वें ॥ ३ ॥

९६०. बहुतां रीती काकुलती । आलों चित्तीं न धरा च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काशासाटीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ ध्रु. ॥ तुह्मां आह्मां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥ २ ॥ तुका ह्मणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥ ३ ॥

९६१. आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मढ्यापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ ध्रु. ॥ न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ३ ॥

९६२. मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लटकियाची न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनि ॥ ध्रु. ॥ हिशोवें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ॥ ३ ॥

९६३. पाटेंवणें पडणें पायां । उद्धार वांयां काशाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घडलें तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळां ॥ ध्रु. ॥ न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोरड्या ॥ २ ॥ अबोल्यानें असे तुका । अंतर ऐका साक्षीतें ॥ ३ ॥

९६४. अभयाचें स्थळ । तें हें एक अचळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि धरिला विश्वास । ठेलों होउनियां दास ॥ ध्रु. ॥ पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसे प्रेम ॥ ३ ॥

९६५. संदेह निरसे तरि रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां नको मज खोट्यानें फटवूं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥ ध्रु. ॥ गेला तरि काय जीवाचें सांकडें । वांचउनि पुढें काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे कसीं निवडा जी बरें । केलीं तैसीं पोरें आळीपायीं ॥ ३ ॥

---

१ पं. लटिका देव ह्मणता ऐसा.–२ पं. उदार.–३ पं. महाठका.–४ दे. त आधर –५ पं. पाटवणें.–६ पं. एका.–७ दे. भरलें सप्रेम.

९६६. वदे वाणी परि दुर्लभ अनुभव[1] । चालीचा चि वाहो बहुतेक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी ऐसें कैसें राहावें निश्चळ । पोंठिलागा[2] काळ जिंतितसे ॥ ध्रु. ॥ वाढवितां पोट दंभाचे पसारे । येतील माघारे मुदला तोटे ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें जागवितां मना । तुमच्या नारायणा अभैयें[3] करें ॥ ३ ॥

९६७. उगें चि हें मन राहातें निश्चळ । तरि कां तळमळ सोंट[4] होती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुमचीं नेणों कवतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥ ध्रु. ॥ नानाछंदें आह्मां नाचवावें जीवां । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी आपुली प्रतिष्ठा । वाढवावया चेष्टा करीतसां ॥ ३ ॥

९६८. आह्मी बळकट जालों फिराउनी । तुमच्या वचनीं तुह्मां गोऊं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालें तेव्हां जालें मागील तें मागें । आतां वर्मलागें ठावीं जालीं ॥ ध्रु. ॥ तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध । शुद्धापाशीं शुद्ध बुद्ध व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां आत्मेत्वाची[5] सोय । आपण चि होय तैसा चि तूं ॥ ३ ॥

९६९. तुह्मी साच नुपेक्षाल हा भरवसा । मज जाणतसां अधीरसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा करकर वारूनियां ॥ ध्रु. ॥ सुटों नये ऐसें कळले निरुतें । कां घ्यावें मागुतें आळवूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी सभाग्य जी देवा । माझा तुह्मां केवा काय आला ॥ ३ ॥

९७०. तुह्मां होईल देवा पडिला विसर । आह्मीं तें उत्तर यैत्न[6] केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पतितपावन ब्रीदें मिरविसी । याचा काय देसी झाडा सांग ॥ ध्रु. ॥ आहाच मी नव्हें अर्थाचें भुकेलें । भलत्या एका बोलें वारेन त्या ॥ २ ॥ तुका ह्मणे देह देईन सांडणें । सहित अभिमानें ओवाळूनि ॥ ३ ॥

९७१. जडलों अंगाअंगीं । मग ठेवीं प्रसंगीं । कांहीं उरीजोगी । लोकीं आहे पुरती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवीं निवारुनि आधीं । अवकाश तो चि बुद्धी । सौंपडली[7] संधी । मग बळ कोणासी ॥ ध्रु. ॥ गळा बांधेन पायीं । हालों नेदीं ठायिचा ठायीं । निवाड तो तई । अवकळा केलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे ठावे । तुह्मी[8] असा जी बरवे । बोभाटाची सवे । मुळींहुनी विठोबा ॥ ३ ॥

९७२. आह्मी शक्तिहीनें । कैसें कराल तें नेणें । लिगाडाच्या गुणें । खोळंबला राहिलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें मज देईं देवा । असे[9] ठेविला तो ठेवा । नाहीं

---

१ पं. अनुभवो.–२ दे. पाठिलाग.–३ त. अभयकरें.–४ त. साठ.–५ पं. आत्मत्वीं.–६ पं. यत्नें.– ७ पं. सांपडलों.–८ पं. आह्मां.–९ पं. असेल तो ठेविला ठेवा.

करीत हेवा । कांहीं अधीक आगळा ॥ ध्रु ॥ नाहीं गळां पडलों झोंड । तुमचें तें चि माझें तोंड । चौघां चार खंड । लांवणी हे अनुचित ॥ २ ॥ नाहीं येत वळा । आतां तुह्मासी गोपाळा । तुका ह्मणे गळा । उगवा पांयां[1] लागतों ॥ ३ ॥

९७३. काय कृपेविण घालावें सांकडें । निश्चिंती निवाडें कोण्या एका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मों तैसीं पुढें असों दीनपणें । वेचूनि वचनें करुणेचीं ॥ ध्रु ॥ धरूं[2] भय आतां काय वाहों चिंता । काय करूं आतां आप्तपणें[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी भावहीन जीव । ह्मणउनी देव दुरे दुरी ॥ ३ ॥

९७४. नाहीं उल्लंघिलें कोणाचें वचन । मज कां नारायण दुरी जाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अशंकितें[4] मनें करीं आळवण । नाहीं समाधान निश्चितीचें ॥ ध्रु ॥ दासांचा विसर हें तों अनुचित । असे[5] सर्व नीत पायांपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां लाज येत नाहीं । आह्मां चिंताडोहीं बुडवितां ॥ ३ ॥

९७५. जीव जायवरी सांडी करी माता । हे तों आश्चर्यता बाळकाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून जालें ॥ ध्रु ॥ क्षणक्षणा माझा नें[6] घ्यावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं वचनांसी[7] रुचि । फळ कटवें चि तें तें होय ॥ ३ ॥

९७६. ह्मणउनी दास नव्हे ऐसा जालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मी च माझ्या वेचें अट्टाहासें[8] ॥ ध्रु ॥ कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीती कांहीं रस वांचुनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे अगा चतुरा शिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥ ३ ॥

९७७. काय आतां आह्मीं पोट चि भरावें । जग चाळवावें भक्त ह्मूण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा तरि एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ॥ ध्रु ॥ काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥ २ ॥ तुका ह्मणे काय गुंपोनि[9] दुकाना । राहों नारायणा करुनी घात ॥ ३ ॥

९७८. वर्म तरि आह्मां दावा । काय देवा जाणें मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ॥ ध्रु ॥ घाल जरि तुह्मी धीर । होईल स्थिर मन ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्तावळें । लडिवाळें राखावीं ॥ ३ ॥

---

१ त. पं. पायीं–२ पं. धरूनि–३ पं. आप्तपणें.–४ पं. आशंकित मनें. दे. शंकितमनें–५ पं. असो–६ दे. ने घावा.–७ पं. वचनाची–८ पं. अट्टहस्यें. त. आटाहास्यें.–९ पं. गुफोनि.

९७९. सांगों काय नेणा देवा । बोलाची त्या आवडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांयां मज चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥ छ्र ॥ आवडीच्या करा ऐसें । अंतर्वासें जाणतसां ॥ २ ॥ तुका ह्मणे समाधानें । होइन मनें मोकळा ॥ ३ ॥

९८०. निर्धाराचें अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसलिया भाव पायीं । बरा तई नाचेन ॥ छ्र ॥ स्वामी कळे सावधान । तरि मन उल्हासे ॥ २ ॥ तुका ह्मणे आश्वासावें । प्रेम द्यावें विठ्ठले ॥ ३ ॥

९८१. जाली तडातोडी । अवघीं पडिलों उघडीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हों कोणांची च कांहीं । तुझे भरलिया वाहीं ॥ छ्र ॥ पारुषेला संवसार । मोडली बैसण्याची थार ॥ २ ॥ आतां ह्मणे तुका । देवा अंतरें राखों नका ॥ ३ ॥

९८२. आधार तो व्हावा । ऐसी आस करीं देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मांपाशीं काय उणें । काय वेचे समाधानें ॥ छ्र ॥ सेवेच्या अभिलाषें । मन बहु जालें पिसें ॥ २ ॥ अरे भक्तपराधीना । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

९८३. तुमचा तुह्मीं केला गोवा । आतां चुकवितां देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणें ॥ छ्र ॥ कासया रूपा । नांवा आलेति गा बापा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । न सरे हवाले घालितां ॥ ३ ॥

९८४. माझी भक्ती भोळी । एकविध भावबळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी कां पडेन निराळा । ऐसा सांडूनि सोहळा ॥ छ्र ॥ आतां अनारिसा । येथें न व्हावें सहसा ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडुनि पाय । पुढें उगा उभा राहें ॥ ३ ॥

९८५. आहे तरि सत्ता । ऐशा करितों वारता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंगसंगाचीं उत्तरें । सलगीसेवेनें लेंकरें ॥ छ्र ॥ तरी निकटवासें । असों आशंकेच्या नासें ॥ २ ॥ तुका ह्मणे रुची । येथें भिन्नता कैची ॥ ३ ॥

९८६. काळ सारावा चिंतनें । एकांतवासीं गंगास्नानें । देवाचें पूजन । प्रदक्षणा तुळसीच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ युक्त आहार विहार । नेम इंद्रियांचा सार । नसावी वासर । निद्रा बहु भाषण ॥ छ्र ॥ परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावेया जतन । हे उपाय लाभाचे ॥ २ ॥ देह समर्पिजे देवा । भार कांहीं च न घ्यावा । होईल आघवा । तुका ह्मणे आनंद ॥ ३ ॥

---

१ पं. सांगों देवा नेणा काय । बोलाचिये आवडी ॥. २ त. विठ्ठलें—३ पं. पटिलीं.—४ दे. पारुशला.—५ दे. अभिळासें.—६ पं. आह्मी.—७ पं. कासया हो रूपा.—८ दे. पं. अशंकेच्या.—९ पं. तुळसीनी.—१० दे. वेहार त. वेव्हार.—११ पं. इंद्रियासीमार.—१२ त. करावया.

९८७. मऊ मेणांहून[1] आह्मी विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मेले जित असों निर्जोनियां[2] जागे । जो[3] जो जें जें मागे तें तें देऊं ॥ ध्रु. ॥ भले तरि देऊं गांडीची लंगोटी । [4]नाठ्याळा चि गांठी देऊं माथां ॥ २ ॥ मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ३ ॥ अमृत तें काय गोड आह्मांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी अवघे चि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचेपरि ॥ ५ ॥

९८८. गाढवाचें तानें । पालटलें क्षणक्षणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥ ध्रु. ॥ उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥ ३ ॥

९८९. विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुं[5]नि जो दुरी तो सोंवळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ग[6]द्यें पद्यें कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीन चि बुद्धि करुनी ठेवा ॥ ध्रु. ॥ विचाराचें कांहीं करावें स्वहित । पा[7]पपुण्यांचीत भांडवल ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखें चि ॥ ३ ॥

९९०. कल्पतरु रुया नव्हती बाभुळा । पुरविती फळा ई[8]च्छितिया ॥ १ ॥ उदंड त्या गाई ह्मैसी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनु ॥ २ ॥ तुका ह्मणे देव दाखवील दृष्टी । तया सवें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

९९१. जळो प्रेमा तैसा रंग । जाय उं[9]डोनि पतंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सासूसाटीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ ध्रु. ॥ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ २ ॥ जैसी वृंदावनकांती । उत्तम धं[10]रूं नये हातीं ॥ ३ ॥ बक ध्यान धरी । सोंग कं[11]रूनि मासे मारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥ ५ ॥

९९२. वेशा नाहीं बोल अवगुण दूषीले । ऐशा बोला भले [12]झणें क्षोभा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण नेणे अन्न जीवाचें जीवन । विषमेळवण विष होय ॥ ध्रु. ॥ सोनें शुद्ध नेणे कोण हा विचार । डांकें ही[13]नवर केलें त्यासी ॥ २ ॥ याती शुद्ध परि अधम लक्षण । वांयां गेलें तेणें [14]सोंगें ही तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर तो चि पावे मान । आणीक मंडण भार वाही ॥ ४ ॥

---

१ दे. मेनाहूनि.–२ त. निजेल्यिा.–३ दे. त. जो जो जो जें मागे.–४ त. नाठ्याळाचा. पं. नाटाळाचे काटी –५ पं. येथूनि दुरी तो सोवळा.–६ पं. गद्य पद्य.–७ त. पापपुण्याचीत. पं. पापपुण्याति.–८ पं. इच्छी तया.–९ दे. भुलोनि –१० दे. धरू ये हातीं.–११ पं. धरुनि.–१२ पं. झणी.–१३ पं. हीणवर.–१४ पं. सोंगहीत.

९९३. अणुरणीयां[1] थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गिळुनि सांडिलें कळिवर[2] । भव भ्रमाचा आकार ॥ छ ॥ सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ३ ॥

९९४. धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥ छ ॥ जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे आले घरा । तो चि दिवाळीदसरा ॥ ३ ॥

९९५. हें चि माझें धन । तुमचे वंदावे चरण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें भाग्यें असों जीत । एवढें समर्पूनी चित्त ॥ छ ॥ सांभाळिलें देवा । मज अनाथा जी जीवा ॥ २ ॥ जोडूनियां कर । तुका विनवितो किंकर ॥ ३ ॥

९९६. फजितखोरा मना किती तुज सांगों । नको कोणा लागों मागें मागें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्नेहवादें दुःख जडलेंसे[3] अंगीं । निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥ छ ॥ निंदास्तुति कोणी करो दयामाया[4] । नें धरीं चाड या सुखदुःखें[5] ॥ २ ॥ योगिराज कां रे न राहाती बैसोनी । एकिये आसनीं या चि गुणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मना पाहें विचारून । होईं रे कठिण वज्राऐसें[6] ॥ ४ ॥

९९७. जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं । आवडे हे विधि । निषेधीं चि चांगली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं स्वामी मी सेवक । उंचें[7] पद निंच एक । ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥ छ ॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलीया फळा । भोक्ता निराळा । तेणें गोडी निवाडिली ॥ २ ॥ हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें । एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥ ३ ॥ उष्णें छाये सुख वाटे । बाळें माते पान्हा फुटे । एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हित । हें चि मानी माझें चित्त । नव्हे आतां मुक्त । ऐसा जाला भरवसा ॥ ५ ॥

९९८. मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातीचें तें झुरे[8] येर येरासाटीं । वियोगें हीं[9] तुटी नेत्रे कधीं ॥ छ ॥ भेटीची अपेक्षा वारंता[10] आदर । पुसे नव्हे धीर मागुतालें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥ ३ ॥

---

१ पं अणुरेणुया.–२ पं कलीवर.–३ पं. जडलें हें आंगीं –४ दे. त. दयामया.–५ पं. न धरीं चाड तया सुखदुःखा –६ त. पं. वज्राऐसा.–७ पं. उचनिच पद एक –८ पं. झुरे येरा०.–९ पं. हे –१० दे. त. वरता आदर

९९९. नव्हे आराणूक परि मनीं वाहे । होईल त्या साहे पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरीसि जावें उद्वेगें मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥ छ्रु ॥ नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाकों नको ॥ २ ॥ तुका ह्मणे देह पडो या चिंतनें । पुढें[3] लागे येणें याजसाटीं ॥ ३ ॥

१०००. कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतें[4] दीन होतों तरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साधन ते सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाईन तें ॥ छ्रु ॥ न पुसतें कोणी कोठें ही असतां । समाधान चित्ताचिया सुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे जन अव्हेरितें मज । तरी केशीराज सांभाळिता ॥ ३ ॥

१००१. चतुर मी जालों आपुल्या भोंवता । भावेंविण रिता फुंजें[6] अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पुढें वांयां जावें हें तें काई । कामक्रोधें ठायीं वास केला ॥ छ्रु ॥ गुणदोष आले जगाचे अंतरा । भूताच्या मत्सरावरी बुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं उपदेश लोकां । नाहीं जालों एकां परता दोषा ॥ ३ ॥

१००२. धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें उपकारासाठीं । आले घर ज्यां वैकुंठीं[8] ॥ छ्रु ॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ २ ॥ मधुरा वाणी ओटीं । तुका ह्मणे बाव पोटीं ॥ ३ ॥

१००३. कुंटल्याविण नव्हे मांडा । अळसें धोंडा पडतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राग नको धरूं मनीं । गांडमैणी सांगतों ॥ छ्रु ॥ तरटापुढें बरें नाचे । सुतकाचें मुसळ ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठी[11] सार । करी फार शाहाणें ॥ ३ ॥

१००४. कळों येतें तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणतां चि होतो घात । परिसा मतें[12] देवा हें ॥ छ्रु ॥ [13]आंविसासाटीं फासा मान । पाडी धनइच्छा ते ॥ २ ॥ तुका ह्मणे होणार खोटें । कर्म मोटें बळिवंत ॥ ३ ॥

१००५. मोकळें मन रसाळ वाणी । या चि गुणीं संपन्न ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लक्ष्मी ते ऐशा नांवें । भाग्यें ज्यावें तरि त्यांनीं ॥ छ्रु ॥ नमन नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ३ ॥

१००६. शेवटीची विनवणी । संतजनीं परिसावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विसर तो न पडावा । माझा देवा तुह्मांसी ॥ छ्रु ॥ पुढें फार बोलों काई । अवघें पायीं विदित ॥ २ ॥ तुका ह्मणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥ ३ ॥

---

१ पं. साह्ये.–२ दे. उदेग. त. उधेग –३ पं. पुढतीलागे०.–४ पं. होतों.–५ पं. गाईजेतें.– ६ पं. स्फुद.–७ पं. एका दोषा परता –८ दे. वैकुंठीं–९ पं. कांडिल्या कुटिल्या होतो मांडा।.– १० त. गांडमनी –११ पं. काटी सार.–१२ पं. मात देवा हे.–१३ "आमिषासाटीं" असें असावें.

१००७. करितों कवित्व ह्मणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ छ॥ काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तें चि वदें ॥ २ ॥ निमित्त¹ मापासी बैसविलों आहें । मी तों कांहीं नव्हे स्वामिसत्ता ॥ ३ ॥ तुका ह्मणे आहें पाईक चि खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ॥ ४ ॥

१००८. आह्मीं गावें तुह्मीं कोणीं कांहीं न ह्मणावें । ऐसें तंव आह्मां सांगितलें नाहीं देवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणा रामराम टाळी वाजवा हातें । नाचा² डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥ छ॥ सहज घडे तया आळस करणें तें काई । अग्नीचें भातुकें हात पोळितां³ कां पायीं ॥ २ ॥ येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हांसे तया घडे ब्रह्महत्यापातक ॥ ३ ॥ जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताळविताळ या देवा ॥ ४ ॥ सदैव ज्यां कथा काळ घडे श्रवण । तुका ह्मणे येर जन्मा आले पाषाण ॥ ५ ॥

१००९. देव घ्या कोणी देव घ्या कोणी । आइता आला घर पुसोनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव न लगे देव न लगे । सांटवणेचे⁴ रुधले जागे ॥ छ॥ देव मंदला देव मंदला । भाव बुडाला काय करूं ॥ २ ॥ देव घ्या फुका देव घ्या फुका । न लगे रुका मोल कांहीं ॥ ३ ॥ दुबळा तुका भावेंविणें⁵ । उधारा देव घेतला रुणें ॥ ४ ॥

१०१०. विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वाहावे भार माथां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साधनें संकटें सर्वांलागीं सीण । व्हावा लागे क्षीण अहंमान⁶ ॥ छ॥ भाव हा कठीण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ⁷ ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म भजनें चि सांपडे । येरांसी तों पडे ओस दिशा ॥ ३ ॥

१०११. कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणी व्हा रे अधिकारी । त्यासी हरि देईल ॥ छ॥ वैराग्याचे बळें⁸ । साही खळ जिणावे ॥ २ ॥ उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ३ ॥

१०१२. कायावाचामन ठेविलें गाहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें आलें आंत पोटा पडिलें थीतें । सारूनि निश्चिंतें⁹ जालों देवा ॥ छ॥ द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा । आधील मवेशा तुज ठावी ॥ २ ॥ तुज्या

---

१ त. पं. निमित्य.—२ पं. ना नाचा.—३ त. पोळितां.—४ पं. सांटवणाचे.—५ पं. भावहीन.—६ त. अहंभाव.—७ त. मायाजाळा.—८ त. धळ.—९ पं. निश्चीत.

रिणें गेले वहुत बांधोन । जाले मजहून थोरथोर ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझें खतीं जें गुंतलें । करूनि आपुलें घेईं देवा ॥ ४ ॥

## धुवंक—अभंग २८.

१०१३. करिसी कीं न करिसी माझा अंगीकार । हा मज विचार पडिला देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देसी कीं न देसी पायांचें दर्शन । ह्मणऊनि मन स्थिर नाहीं ॥ ध्रु ॥ बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । ह्मणोनियां जीवा भय वाटे ॥ २ ॥ होईल कीं[1] न होय तुज माझा आठव । पडिला संदेह हा चि मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे[2] मी तों कमाईचें हीण । ह्मणऊनि सीण करीं देवा ॥ ४ ॥

१०१४. ऐसा माझा कोण आहे भीडभार । नांवाचा मी फार वांयां गेलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सेवा रुजु आहे सत्ताबळ । तें मज राउळ कृपा करी ॥ ध्रु ॥ काय याती शुद्ध आहे कुळ कर्म । तेणें पडे वर्म तुझे ठायीं ॥ २ ॥ कोण तपोनिध दानधर्मसीळ । अंगीं एक बळ आहे सत्ता ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांयां जालों भूमी भार । होईल विचार काय नेणों ॥ ४ ॥

१०१५. साच मज काय कळों नये देवा । काय तुझी सेवा काय[3] नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावें तें बरें जेणें[4] समाधान । सेवावें हें वन न बोलोवें[5] ॥ ध्रु ॥ शुद्ध माझा भाव होइल तुझे पायीं । तरि च हें देईं निवडूनि ॥ २ ॥ उचित अनुचित कळों आली गोष्टी । तुझे कृपादृष्टी पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज पायांसवें चाड । सांगसी तें गोड आहे मज ॥ ४ ॥

१०१६. नाहीं कंटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जन वन आह्मां समान चि जालें । कामक्रोध गेले[6] पावटणी ॥ ध्रु ॥ षडऊर्मी शत्रु जिंतिले[7] अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥ २ ॥ मुख्य धर्म आह्मां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावें तें ॥ ३ ॥ ह्मणऊनि तुका अवलोकुनी पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ४ ॥

१०१७. वांयांविण वाढविला हा लौकिक । आणिला लटिक वाद दोघां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं ऐसा जाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणे ॥ ध्रु ॥ शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं विंवे चि ना ॥ २ ॥ जालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मार्गें कळों येतें ऐसें । न घेतों हें दिसें लावूनियां ॥ ४ ॥

---

१ पं. कीं नव्हे तुज०—२ दे. मी कमाईचें. पं. कमाईचा.—३ दे. त. काहे.—४ त. जनसमाधान.—५ पं. वोलवे.—६ पं. केले.—७ पं. जिकिले.

१०१८. न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मती । परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आगमाचे भेद मी तों[1] काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें ॥ छ्रु ॥ कांहीं नेणें परि ह्मणवितों दास । होइल त्याचा त्यास अभिमान ॥ २ ॥ संसाराची सोय सांडिला मारग । दुराविलें जग एका घायें ॥ ३ ॥ मागिल्या लागाचें केलेंसे खंडण । एक्राएकीं मन राखियेलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे अगा रखुमादेवीवरा[2] । भक्तकरुणाकरा[3] सांभाळावें ॥ ५ ॥

१०१९. इतुलें करीं देवा ऐकें हें वचन । समूळ अभिमान जाळीं माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी । सर्व समदृष्टी तुज देखें ॥ छ्रु ॥ इतुलें करीं देवा विनवितों तुज । संतांचे[4] चरणरज वंदीं माथां ॥ २ ॥ इतुलें करीं देवा ऐकें हे मात । हृदयीं पंढरीनाथ दिवसेंरात्रीं[5] ॥ ३ ॥ भलतिया भावें तारीं पंढरीनाथा । तुका ह्मणे आतां शरण आलों ॥ ४ ॥

१०२०. तुझा दास ऐसा ह्मणती लोकपाळ । ह्मणऊनि सांभाळ करीं माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनाथाचा नाथ पतितपावन । हें आतां जतन करीं नाम ॥ छ्रु ॥ माझे गुण दोष पाहातां न लगे[6] अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ २ ॥ नेणें तुझी कैसी करावी हे[7] सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं[8] यां कृपेचा सिंधु । तोडीं भवबंधु माझा देवा ॥ ४ ॥

१०२१. जाणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हें चि सार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हें चि सार ॥ छ्रु ॥ बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हें चि सार ॥ २ ॥ जावें तें कोठें न[9] जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्या [10]मतें ॥ ४ ॥

१०२२. नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवीनें[11] चरणांवरी माथा ॥ छ्रु ॥ पाहोनि श्रीमुख देइन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥ २ ॥ पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी न लावीं उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥ ४ ॥

---

१ दे. मी काय०. त. मी ते काय०.–२ पं. रुक्मादेवीवरा.–३ पं. आतां करुणाकरा.–४ पं. संतचरणरज०.–५ पं. दिवसराती–६ पं. कळे.–७ पं. ते–८ पं. तू कृपेचा०.–९ दे. न वजावें आतां.–१० पं. मतीं.–११ पं. ठेवूं.

१०२३. मागें शरणागत तारिले बहुत । ह्मणती दीनानाथ तुज देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहिले अपराध नाहीं याती कुळ । तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥ ध्रु ॥ अढळपदीं बाळ बैसविला ध्रुरु । क्षीराचा सागरु उपमन्या[1] ॥ २ ॥ गजेंद्रपशु नाडियें[2] जळचरें[3] । भवसिंधुपार उतरिला ॥ ३ ॥ प्रल्हाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ४ ॥ पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ ५ ॥ तुका ह्मणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥ ६ ॥

१०२४. तुझा शरणागत जालों मी अंकित । करीं माझें हित पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पतितपावन तुझी ब्रीदावळी । ते आतां सांभाळीं मायबापा ॥ ध्रु ॥ अनाथाचा नाथ [4]बोलतील संत । ऐकोनियां मात विश्वासलों ॥ २ ॥ न करावी निरास न धरावें उदास । देईं याचकास कृपादान ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों पातकांची रासी । देईं पायापासीं ठाव देवा ॥ ४ ॥

१०२५. सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्यवादी कैरी[5] संसार सकळ । [6]अलिप्त कमळ जळीं [7]जैसें ॥ ध्रु ॥ घडे ज्या उपकार भूतांची[8] ते दया । आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥ २ ॥ नो[9] बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनि तो जनीं जनार्दन ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म जाणितल्याविण । पावे करितां सीण सांडीमांडी ॥ ४ ॥

१०२६. कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निधान हातीं चढे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [10]कुळधर्प भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्रांति पाववील ॥ ध्रु ॥ [11]कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचें ॥ २ ॥ [12]कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरीं होय ॥ ४ ॥

१०२७. पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणीक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्य तो चि धर्म असत्य तें कर्म । आणीक हें वर्म नाहीं दुजें ॥ ध्रु ॥ गति ते चि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण

१ दे. त. उपमन्ये.–२ पं नाडिला.–३ त. पं. जळत –४ पं. बोलती ते –५ पं. करितां –६ पं. अलिप्त तो जळकमळ जैसा.–७ त. तैसें.–८ त. भूताची हे दया. दे. भूताची दया.–९ पं. न. त. ना –१० त. पं. कुळधर्में भक्ति कुळधर्में गति –११ त. पं. कुळधर्में दया कुळधर्में उपकार.–१२ त. पं. कुळधर्में महत्त्व कुळधर्में मान.

विन्मुखता[1] ॥ २ ॥ संतांचा संगें[2] तो चि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळा[3] ॥ ३ ॥ तुका ह्मणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ४ ॥

१०२८. न वजे वांयां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वांयां न वजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न वजे वांयां कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वांयां न वजे ॥ ध्रु ॥ न वजे वांयां कांहीं केलिया तीर्थ[4] । अथवा कां व्रत[5] वांयां न वजे ॥ २ ॥ न वजे वांयां जालें संतांचें दर्शन । शुद्ध आचरण वांयां न वजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव असतां नसतां । सायास करितां वांयां न वजे ॥ ४ ॥

१०२९. चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार[6] । सकळ बिढार संपत्तीचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कंठीं धरिन *मी नाम अमृताची वल्ली । होईल राहिली शीतळ तनु ॥ ध्रु ॥ पाहेन श्रीमुख साजिरें सुंदर । सकळां अगर लावण्यांचें ॥ २ ॥ करिन अंगसंग बाळकाचे परी । बैसेन तों वरी नुतरीं[7] कडिये ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा केला तैसा होय । धरिली मनें सोय विठोबाची ॥ ४ ॥

१०३०. बाळ मातेपाशीं सांगे तानभूक । उपायाचें दुःख काय जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयापरी करीं पाळण हें माझें । घेउनियां ओझें सकळ भार ॥ ध्रु ॥ कासया गुणदोष आणिसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥ २ ॥ सेवाहीन दीन पातकांची रासी । आतां विचारिसी काय ऐसें ॥ ३ ॥ जेणें काळें पायीं अनुसरलें[8] चित्त । निर्धार हें हित जालें ऐसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुह्मी तारिलें वहुतां । माझी कांहीं चिंता असों दे वो[9] ॥ ५ ॥

१०३१. जीवनावांचूनि तळमळी मासा । प्रकार हा तैसा होतो जीवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न संपडे जालें भूमिगत धन । चरफडी मन तयापरी ॥ ध्रु ॥ मातेचा वियोग जालियां हो बाळा[10] । तो कळवळा जाणा देवा ॥ २ ॥ सांगावे ते किती तुह्मांसी प्रकार । सकळांचें सार पाय दावीं ॥ ३ ॥ ये चि चिंते माझा करपला भीतर । कां नेणों विसर पाडिला मांझा[11] ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं हें जाणसी सकळ । यावरि कृपाळ होईं देवा ॥ ५ ॥

१०३२. शरण[12] आलें त्यासी न दावीं हे पाठी । ऐका जगजेठी विज्ञापना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अळविती तयांसी उत्तर झडकरी । द्यावें परिसा हरी विज्ञापना ॥ ध्रु ॥

---

१ दे. त. विन्मुखते.–२ त सागात –३ पं. अनर्गळ –४ पं. केलियाही तीर्थ. त. केल्या तीर्थें.–५ त. व्रतें.–६ दे. त. सकुमारें –७ पं. नुतरे त. नुतरें.–८ पं. अनुसलें.–९ असों द्यावी – १० पं. जाहालिया बाळा । होतो कळवळा.–११ पं. देवा.–१२ पं. शरण आली त्यासी न दावी पाटी. त. न द्यावी. * पं. "मी" हा शब्द नाहीं.

गांजिलियाचें करावें धांवणें । विनंती नारायणें परिसावी हे ॥ २ ॥ भागलियाचा होई रे विसांवा । परिसावी केशवा विज्ञापना ॥ ३ ॥ अंकिताचा भार वागवावा माथां । परिसावी अनंता विज्ञापना ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मां विसरावें ना देवा । परिसावी हे देवा विज्ञापना ॥ ५ ॥

१०३३. कोण आह्मां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणापाशीं आह्मीं सांगावें सुखदुःख । कोण तानभूक निवारील ॥ ध्रु ॥ कोण या तापाचा करील परिहार । उतरील पार कोण दुजा ॥ २ ॥ कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥ ३ ॥ कोणावरी आह्मीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥ ४ ॥ तुका ह्मणे अगा स्वामी सर्व जाणां । दंडवत चरणां तुमच्या देवा ॥ ५ ॥

१०३४. तेव्हां धालें पोट बैसलों पंगती । आतां आह्मां मुक्तिपांग काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवा केला आतां येई वो[6] धांवोन । येथें काई करणें न लगे संदेह ॥ ध्रु ॥ गायनाचा आतां कोठें उरला काळ । आनंदें सकळ भरी आलें ॥ २ ॥ देवाच्या सख्यत्वें विषमासी ठाव । मध्यें कोठें वाव राहों सके ॥ ३ ॥ तेव्हां जाली अवघी बाधा वाताहात । प्रेम हृदयांत प्रवेशलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मीं जिंतिलें भरवसा । देव कोठें दासा मोकलितो ॥ ५ ॥

१०३५. तरि कां पवाडे गर्जती पुराणें । असता नारायण शक्तिहीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कीर्तीविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीत ना ॥ ध्रु ॥ तरि च ह्मणा तो आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखीं गुण ॥ २ ॥ चांगलेंपण हें निरुपमता अंगीं । बाणलें श्रीरंगीं ह्मणऊनि ॥ ३ ॥ तरि च हा थोर सांगितलें करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तरि करिती याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडें ॥ ५ ॥

१०३६. अविट हें क्षीर हरिकथा माउली । सेवितो सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥ ध्रु ॥ पतित पातकी पावनपंगती । चतुर्भुज होती देवाऐसे ॥ २ ॥ सर्व सुखें तया मोहोरंती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥ ३ ॥ [11]निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत ।

---

१ पं. देवा.–२ पं. परिसावी केशवा.–३ पं. सांगों–४ पं. ताहान.–५ भार.–६ दे. होईल धांवणें । तया कायी करणें लागे सध्या ॥. त. तया काई करणे लागे संदेह ॥.–७ पं. आनंद.–८ त. दे. निरुपायता.–९ पं. सेवितां सेविली.– १० पं. मोहरती. त. मोहोरली.–११ त. निर्गुण आकार झाला गुणवत. पं. हें कडवें नाहीं.

धरूनियां प्रीत गाये नाचे ॥ ४ ॥ तुका ह्मणे केलीं साधनें गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनि ठेला ॥ ५ ॥

१०३७. संसारसोहळे भोगितां सकळ । भक्तां[1] त्याचें बळ विटोबाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भय चिंता[2] धाक न मनिती मनीं । भक्तां चक्रपाणि सांभाळीत ॥ ध्रु॰ ॥ पापपुण्य त्यांचें[3] धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्वभावें ॥ २ ॥ नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव भक्तां भार सर्व वाहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देव भक्तां वेळाइत । भक्त तें[4] निश्चिंत त्याचियानें ॥ ४ ॥

१०३८. देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ ध्रु॰ ॥ देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥ २ ॥ एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तो चि देव देव भक्त ॥ ४ ॥

१०३९. हुंबरती गाये तयांकडे कान । कैवल्यनिधान देउनि ठाके ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणें वनमाळी सुखावला ॥ ध्रु॰ ॥ चोरोनियां खाये दुध दहीं लोणी । भावें चक्रपाणि गोविला तो ॥ २ ॥ निष्काम तो जाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहात बैसे ॥ ३ ॥ जगदानी इच्छी तुळसीएकदळ । भावाचा सकळ विकिला तो ॥ ४ ॥ तुका ह्मणे हें चि चैतन्य[5] सावळें । व्यापुनि निराळें राहिलेंसे ॥ ५ ॥

१०४०. समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सर्व[6] सिद्ध घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आदराचे ठायीं बहु च आदर । मागितलें फार तेथें[7] वाढी ॥ ध्रु॰ ॥ न ह्मणे सोइरा सुहृद[8] आवश्यक । राजा आणि रंक सारिखा[9] चि ॥ २ ॥ भाव देखे तेथें करी लँडंवड[10] । जडा राखे जड निराळें चि ॥ ३ ॥ कोणी[11] न विसंभे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥ ४ ॥ तुका ह्मणे पोट भरुनी उरवी । धालें[12] ऐसें दावी अनुभवें[13] ॥ ५ ॥

१०४१. आलें भरा केणें । येरझार[14] चुके जेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभें केलें विटेवरी । पेंठ इनाम पंढरी ॥ ध्रु॰ ॥ वाहाती मारग । अवघें मोहोरलें जग ॥ २ ॥ तुका ह्मणे माप । खरें आणा माझे बाप ॥ ३ ॥

---

१ त. भक्तांसी तें बळ विटोबाचें.–२ त. चित्तीं.–३ त्यांचा –४ त. हे निश्चीत –५ दे. चैतन्ये –६ पं. सिद्ध सर्व –७ पं. तें तें.–८ सुहृद सोइरा दे. सुहृद.–९ पं. सारिखे चि.–१० त. वदवड.–११ पं. कोणा.–१२ त. पं. आलें.–१३ न. अनुभव पं. अनुभवा.–१४ दे. पं. वेरझार.

१०४२. लक्ष्मीवल्लभा । दिनानाथा पद्मनाभा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं ते[1] चि ठायीं ॥ छ्र ॥ माझी अल्प* हे वासना । तूं तो उदाराचा राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥ ३ ॥

१०४३. करीं ऐसें जागें । वेळोवेळां पायां लागें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेम झोंदो[2] कंठीं । देह धरणिये लोटीं ॥ छ्र ॥ राहे लोकाचार । पडे अवघा विसर ॥ २ ॥ तुका ह्मणे ध्यावें । तुज व्यभिचारभावें[3] ॥ ३ ॥

१०४४. टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते† सांगाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाल तरी कोणी जा गा । करा सिदोरी ते वेगा ॥ छ्र ॥ जाती सादावीत । तेथें असों द्यावें चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥ ३ ॥

१०४५. वांयां जातों देवा । नेणें भक्ती करूं सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥ छ्र ॥ करावें तें काय । न कळे अवलोकितों पाय ॥ २ ॥ तुका ह्मणे दान । दिलें पदरीं घेईन ॥ ३ ॥

१०४६. जीव खादला दैवतें[4] । माझा येणें महाभूतें । झोंबले निरुतें । कांहीं करितों[5] न सुटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां करूं काय । न चले करितां उपाय । तुह्मां आह्मां संये[6] । विघडाविघड[7] केली ॥ छ्र ॥ बोलतां दुश्चिती । मी वो पडियेलें भ्रांती । आठव[8] हा चित्तीं । न ये ह्मणतां मी माझें ॥ २ ॥ भलतें चि चावळे । जना अवघिया वेगळे । नाठवती बाळें । आपपर सारिखें ॥ ३ ॥ नका बोलों संये[9] । मज वचन न साहे । बैसोनि[10] त्या राहें । उग्या वाचा खुंटोनी ॥ ४ ॥ तुह्मां आह्मां भेटी । नाहीं जाली जीवेंसाटीं । तुका ह्मणे दृष्टी । पाहा जवळी आहे तों ॥ ५ ॥

१०४७. जीवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां विठ्ठल एक देव । येर अवघे चि वाव ॥ छ्र ॥ पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं । वाहूं रखुमाईचा पती ॥ ३ ॥

१०४८. माझें आराधन । पंढरपुरींचें[11] निधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया एकाविण‡ दुजें । कांहीं नेणें पंढरीराजें ॥ छ्र ॥ दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥ ३ ॥

---

१ पं. "ते चि" याबद्दल "तये."—२ पं. झोंवे.—३ त. दे. विभीचारभावें.—४ दे. त. देवत.—५ पं. केल्या.—६ दे. सय. पं. सय्य.—७ पं. विघडाविघडी.—८ पं. "आठव हा" याबद्दल "आठवण."—९ पं. सय्य—१० पं. वैसल्या.—११ दे. पढरपुरचें. * पं. "अल्प" शब्द नाहीं. † दे. "ते" शब्द नाहीं. ‡ पं. "एका" शब्द नाहीं.

१०४९. आतां आह्मां हें चि काम । नें विसंभावें तुझें नाम । वाहुनियां टाळी । प्रेमसुखें नाचावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघी जाली आराणूक । मागें पुढें सकळिक । त्रिपुटीचें दुःख । प्रारब्ध सारिलें ॥ छ ॥ गोदातटें निर्मळें । देव देवांचीं देवळें । संत महंत मेळें । दिवस जाय सुखाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरीनाथा । आणिक नाहीं मज चिंता । योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥ ३ ॥

१०५०. चोरटें सुनें मारिलें टाळे । केंउं करी परि न संडी चाळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ॥ छ ॥ नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कर्म वळिसंत गाढें । नेदी तया पुढेंमागें सरों ॥ ३ ॥

१०५१. मुनि मुक्त जाले भेणें गर्भवासा । आह्मां विष्णुदासां सुलभ तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा चि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप ह्मणोनियां ॥ छ ॥ पुराणीं उपदेश साधन उद्धट । आंह्मां सोपी वाट वैकुंठींची ॥ २ ॥ तुका ह्मणे जनां सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥ २ ॥

१०५२. न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥ १ ॥ भारें भवनदी नुतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ॥ २ ॥ तुका ह्मणे गर्वे पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ ३ ॥

१०५३. तुमचिये दासींचा दास करूनि ठेवा । आशीर्वाद द्यावा हा चि मज ॥ १ ॥ नवाविधा काय बोलिली जे भक्ती । घ्यावी माझ्या हातीं संतजनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥ ३ ॥

१०५४. चोर टेंकाचे निघाले चोरी । आपलें तैसें पारखे घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥ छ ॥ बुद्धिहीन नेये कांहीं चि कारणा । तयासवें जाणा तें चि सुख ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ठाउकें वर्म । तयांसी कर्म वोडवलें ॥ ३ ॥

१०५५. समर्थाचें बाळ कीविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥ अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जालों तुझा ॥ ३ ॥

---

१ पं. वाचे गोऊं तुझें नाम.–२ पं. "प्रेमसुखें" याबद्दल "सुखें आनंदें".–३ पं. प्रारब्धें. ४ पं. आह्मी.–५ पं. बैसोनि निवांत सुख भोगूं.–६ पं. यावी.–७ पं. घरी.–८ पं. नाहीं कांहीं नफा०.–९ पं. नव्हे.–१० त. तयासी तें कर्म०.–११ पं. दास

१०५६. गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें[1] भेटी केली तेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सहेज[2] गुण जयांचे[3] देहीं । पालट[4] कांहीं नव्हे तया ॥ ध्रु० ॥ मांकडाचे[5] गळां मोलाचा मणि । घातला चावुनी टाकी थुंकोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे खळा नावडे[6] हित । अविद्या वाढवी आपुलें[7] मत ॥ ३ ॥

१०५७. नेणे सुनें चोर पाहुणा गागता । देखून भलता भुंकतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिकविलें कांहीं न[8] चळे तया । बोलियेले वांयां बोल जाती ॥ ध्रु० ॥ क्षीर ओकुनियां खाय अमंगळ । आपुली ते ढाळ जाऊं नेदी ॥ २ ॥ वंदूं[9] निंदूं काय दुराचार[10] । खळाचा विचार तुका ह्मणे ॥ ३ ॥

१०५८. जन मानवलें[11] वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी पंढरीनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥ ध्रु० ॥ संतां ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों आपणांसी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥ ३ ॥

१०५९. काम क्रोध माझे जीताती शरीरीं । कोरडें तें वरी बोलतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा[12] सरतां जालों तुझ्या पायीं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥ ध्रु० ॥ पुराणींची ग्वाही वदतील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आणूनि अनुभवा । दाखवीं हें देवा साच खरें ॥ ३ ॥

१०६०. स्तुति करीं जैसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचें[13] मी दास संतांचें दुर्बळ । करूनि सांभाळ राखा पायीं ॥ ध्रु० ॥ रामकृष्णहरि मंत्र उच्चारणा । आवडी चरणां विठोबाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । क्षमा करीं धीट होऊनियां ॥ ३ ॥

१०६१. बहु दूरवरी । वेठी[14] ओझें होतें शिरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां उतरला भार । तुह्मीं केला अंगीकार ॥ ध्रु० ॥ बहु काकुलती । आलों[15] मागें किती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आजि सफळ जाली सेवा ॥ ३ ॥

---

१ दे. राख तया तेणें केलीसे भेटी.—२ पं. सहज तो गुण०.—३ त. जयाचा.—४ पं. पालटतो कांहीं०.—५ माकडाचिया गळां मोलाचा तो मणि ॥ घातला ओवुनि थुंकुनि टाकी ॥.—६ पं. नावडे तें हित.—७ पं. मत आपलें तें.—८ पं. न चले तें तया.—९ पं. वंदूं निंदूं संतां काय० —१० त. दुराचारी थोर.—११ दे. त. मानविलें.—१२ त. कइसा०. पं. कैसा मी सरता०.—१३ पं. तुमचा.—१४ पं. वेठी.—१५ पं. आलों असें मागें.

## पाईक—अभंग ११.

१०६२. पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूरें धरी मात वचन चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाइकावांचून नव्हे कधीं सुख । प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा ॥ छ्र ॥ तरि व्हावें पाईक जिवाचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥ २ ॥ पाइकीचें सुख जयां नाहीं ठावें । धिग त्यांनीं ज्यावें वांयांविण ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका क्षणांचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥ ४ ॥

१०६३. पाइकीचें सुख पाइकासी ठावें । ह्मणोनियां जीवें केली साटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येतां गोळ्या बाण साहिले भडमार । वर्षातां अपार वृष्टि वरी ॥ छ्र ॥ स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण । मग त्या मंडन शोभा दावी ॥ २ ॥ पाइकांनीं सुख भोगिलें अपार । शुद्ध आणि धीर अंतर्बाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे या सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शाहाणा करी तो भोगी ॥ ४ ॥

१०६४. पाईक जो जाणे पाइकीचा भाव । लोंग पगें ठाव चोरवाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपणा राखोनि ठकावें आणीक । घ्यावें सकळीक हरूनियां ॥ छ्र ॥ येऊं नेदी लाग लागों नेदी माग । पाईक त्या जग स्वामी मानी ॥ २ ॥ ऐसें जन केलें पाइकें पाईक । जया कोणी भीक न घलिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाइक त्रैलोकींचा ॥ ४ ॥

१०६५. पाइकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांटा मोडोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पारखिये ठायीं घेउनियां खोणें । आपलें तें जन राखियेलें ॥ छ्र ॥ आधारेंविण जें बोलतां चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ॥ २ ॥ सांडितां मारग मारिती पाईक । आणिकांसी शीक लागावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे विश्वा घेऊनि विश्वास । पाईक तयास सुख देती ॥ ४ ॥

१०६६. पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो एक पाईक पाइकां नाईक । भाव सकळीक स्वामिकाजीं ॥ छ्र ॥ तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाइका त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ २ ॥ विश्वासावांचूनि पाइकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोलिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे नये स्वामी उणेपण । पाइका जतन करी त्यासी ॥ ४ ॥

१०६७. धनी ज्या पाइका मानितो आपण । तया भितें जन सकळीक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिवाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणि ॥ छ्र ॥

---

१ पं. पाईक ह्मणे.—२ दे. सुर. पं. त. शुर—३ पं. तरीच पाईक.—४ दे. जिवाचा—५ पं. लाग वग टाव०.—६ पं. त्रैलोकीचे.—७ त. खाण.—८ त. पं. दृष्टा.

आपुलियां सत्ता स्वामीचें वैभव । भोगिती गौरव सकळ सुख ॥ २ ॥ कमाइचीं हीणें पडिलीं उदंडें । नाहीं तयां खंड येती जाती ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरि पाइकी च भली । थोडीबहुत केली स्वामिसेवा ॥ ४ ॥

१०६८. पाइकपणें[1] खरा मुशारा । पाईक तो खरा पाइकीनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाईक[2] जाणें मारितें अंग । पाइकासी भंग नाहीं तया ॥ ध्रु ॥ ऐके[3] दोहीं घरीं घेतलें खाणें । पाईक तो पणें निवडला ॥ २ ॥ करूनि कारण[4] स्वामी यश द्यावें । पाइका त्या नांवें[5] खरेपण ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठाव पाइकां निराळा । नाहीं स्वामी स्खळा गेल्याविण ॥ ४ ॥

१०६९. उंच निंच कैसी पाइकाची ओळी[6] । कोण गांढे[7] बळी निवडिले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्वामिकाजीं एक सर्वस्वें तत्पर । एक ते कुचर आशाबद्ध[8] ॥ ध्रु ॥ प्रसंगावांचूनि आणिती आविर्भाव[9] । पाईक तो नांव मिरवी वांयां ॥ २ ॥ गणतीचे एक उंच निंच फार । तयांमध्यें शूर विरळा थोडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वामी जाणे त्यांचा मान । पाईक पाहोनं मोल करी ॥ ४ ॥

१०७०. एका च स्वामीचे पाईक सकळ । जैसें[10] बळ तैसें मोल तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्वामिपदीं एकां ठाव उंच स्थळीं । एकें[11] तीं निराळीं जवळी दुरी ॥ ध्रु ॥ हीन कमाईचा हीन आन ठाव । उंचा सर्व भाव उंच पद ॥ २ ॥ पाइकपणें तो सर्वत्र सरता । चांग तरी परता गांढ्या ठाव[12] ॥ ३ ॥ तुका ह्मणे मरण आहे या सकळां । भेणें अवकळा अभयें मोल ॥ ४ ॥

१०७१. प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाटीं एकें जैशीं तैशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आगळें पाऊल आणिकांसी तरी । पळती माघारीं तोडिजेती ॥ ध्रु ॥ पाठीवरी घाय[13] ह्मणती फटमर । धडा अंगें[14] शूर मान पावे ॥ २ ॥ घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळीक सर्व हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नव्हे बोलाचें कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥ ४ ॥

१०७२. जातीचा पाईक ओळखे पाइका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरितील पोटासाटीं हतियेरें[15] । कळती तीं खरें[16] वेठीचीसीं[17] ॥ ध्रु ॥ जातीचें[18] तें असे खरें घायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥ २ ॥ तुका ह्मणे नमूं देव ह्मूण[19] जना । जालियांच्या खुणा जाणतसों ॥ ३ ॥ ॥ ११ ॥

१ पं. पाइकपणे तो खरा०.–२ पं. पाईक तो जाणे ०–३ पं. एक दोही.–४ त. पारण –५ त. पं. नांवें –६ पं. वोली (दे. त. वोळी).–७ त. गाढे.–८ पं. आशा वहु.–९ दे. त. पं. आयुर्भाव – १० त. पं. जैसें तैसें वळ मोल०.–११ पं. एक ते नि० त. एकें ते नि०.–१२ पं. वाव – १३ त. धाव.–१४ दे. पं. अंग.–१५ पं. हातियेर. त. हातीयेरें.–१६ त. येरें.–१७ पं. वेटीसीची.– १८ पं. जातीचे असे खरे डाये घाये। सारखिया काय पासी लोपे ।.–१९ पं. म्हण.

१०७३. बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता नाहीं मनुष्यदेह ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुल्या हिताचे [1]नें होती सायास । गृहदाराआसधनवित्त ॥ छ ॥ [2]अवचितें निधान लागलें हें हातीं । भोगावी विपत्ती गर्भवास ॥ २ ॥ यावें जावें पुढें ऐसें चि कारण । भोगावें पतन नरकवास ॥ ३ ॥ तुका ह्मणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरि कांहीं वरें नव्हे ॥ ४ ॥

१०७४. आह्मीं पतितांनीं घालावें सांकडें । तुह्मां [3]लागे कोडें उगवणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुह्मां हातीं ॥ छ ॥ न घेतां कवडी करावा [4]कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥ २ ॥ दयासिंधु नाम पतितपावन । हें आह्मां वचन सांपडलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तूं चि देवा ॥ ४ ॥

१०७५. जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें । भवसिंधू सुखें । उतरी कासे लावूनि ॥ छ ॥ थोर भक्तांची आस । पाहे भोंवताली वास ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥ ३ ॥

१०७६. अखंड [5]तुझी जया प्रीति । मज दे त्यांची संगति । मग मी कमळापति । [6]तुज नाणीं कांटाळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पडोन राहेन ते ठायीं । उगा चि संतांचिये पायीं । न मगें न करीं कांहीं । तुझी [7]आण विठोबा ॥ छ ॥ तुह्मी आह्मी पीडों [8]ज्यानें । दोन्ही [9]वारती एकानें । बैसलों धरणें । हाका देत [10]दारेशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला । न पाहिजे केला । [11]अवघा माझा आव्हेर ॥ ३ ॥

१०७७. पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यांपुढें शुभ होउनियां [12]ठाके ॥ छ ॥ प्रेमसुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ३ ॥

---

१ दे. नव्हती.–२ पं. अवचिता निधान लागलें से हातीं.–३ पं. लागीं –४ पं. कुडावा.–५ पं. जया तुझी.–६ पं. तुज वा नाणी कंटाळा०. दे. तुज नानीं.–७ पं. आण गा विठोवा.–८ पं. जन –९ पं. वारतील कान–१० पं. द्वारासीं.–११ पं. आतां.–१२ दे. 'ठाके' याच्यापुढें 'गाढें' असा शोध घातला आहे.

१०७८. जैन देव तरी पायां चि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥ अग्नीचें सौजन्य शीतनिवारण । पालवीं बांधोनि नेतां नये ॥ २ ॥ तुका ह्मणे विंचु सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ ३ ॥*

१०७९. भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हें तों भाग्यहीन त्यांची जोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें [1]प्रारब्धें ॥ छ ॥ जगरूढीसाटीं [2]घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे हा हो [3]प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ३ ॥

---

१ पं. जग.—२ त. परारब्धें.—३ दे. त. घातला.—४ त. परपच०. प. प्रपंच चि गाढा.
* याच्यापुढे 'भक्तभागवत०', 'पंडित वैदिक०', 'माझी मज०' व 'वैष्णवांची याती०', हे चार अभंग तळेगांवच्या प्रतींत रामेश्वर भटाचे आहेत. देहूच्या व पंढरपूरच्या प्रतींत 'भक्तभागवत०', हा मात्र आहे. यांपैकीं प्रत्येक अभंगांत तुकारामाची प्रशसा इ० आहे, त्याच्या शेवटच्या कडव्यांत "ह्मणे रामेश्वर" असें आहे यांवर तळेगावच्या प्रतींत "रामेश्वर भ० अ० ४" असें सदर आहे इत्यादि कारणांवरून ते चार अभग रामेश्वर भट याचेच आहेत असें खचित समजतें; ह्मणून ते येथें फक्त टिपेंत दाखल केले आहेत:—

### रामेश्वरभट याचे अभंग ४.

१०७९. भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं । ऐसिया अनंतामाजी तूं अनंत । लीलावेश होत जगत्राता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥ छ ॥ शास्त्रा श्रेष्टाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली । देऊनि तिळाजुळी काम्य निषिद्धासी । विधित्रिण योगेशी ब्रह्मार्पण ॥ २ ॥ संत ग्रहमेळीं जगधंद्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका । सत वृंदें तीर्थ गौतमी हरिकथा । तुकया नर सिंहस्ता भेटों आली ॥ ३ ॥ शांति पतिव्रते जाले परि नयन । काम संतर्पण निष्कामता । क्षमा क्षमापणें प्रसिद्ध प्रथा जगीं । तें तीं तुझ्या अंगीं मूर्तिमंत ॥ ४ ॥ दया दिनानाथा तुवा जीवविली । त्रिश्वीं विस्तारली कीर्ति तुझी । वेदवाक्यबाहु उभारिला ध्वज । पूजिले देव द्विज सर्वभूतें ॥ ५ ॥ अधर्म क्षयव्याधि धर्माशीं स्पर्शला । तो त्वा उपचारिला अनन्यभक्ति । ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सपळ केलीं वेदविहितें ॥ ६ ॥ देहबुद्धि जात्या अभिमानें वंचलों । तो मी उपेक्षिलों न पाहिजे । न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार । मागे रामेश्वर रामचंद्र ॥ ७ ॥

१०८०. पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची । शास्त्र ही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर्म अभिमानें वर्ण अभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ छ ॥ तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे । अमृताची वाणी वरुषला शुद्र । करी त्या अशुद्र ऐसा कोण ॥ २ ॥ चहूं वेदाचे हें केलें विवरण । अर्थ ही गहन करूनियां । उत्तम मध्यम

## ॥ घोंगड्याचे अभंग—॥ १२ ॥

१०८०. ठकिलें काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पेंघुरलों बहु काळें । घोंगडें बळें सांडवलें ॥ ध्रु ॥ नये ऐसों लाग वरी । परतें दुरी लैंपालें ॥ २ ॥ तुका ह्मणे आड सेवा । लाविला हेवा धांदली ॥ ३ ॥

१०८१. घोंगडियांचा पालट केला । मुलांमुलां आपुल्यांत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कान्होबा तो मी च दिसें । लाविलें पिसें संवगडियां ॥ ध्रु ॥ तो बोले मी उगाच वैसें । आनारिसें न दिसे ॥ २ ॥ तुका ह्मणे दिलें सोंग । नेदीं व्यंग जाऊं देऊं ॥ ३ ॥

---

१ पं. पांघरलों.–२ पं. ऐशा –३ पं. लपालो –४ पं. नेदी व्यग जाउ देवा. दे. त. वेंग.

---

(१९१ पृष्ठावरील टीप.)

कनिष्ठ वेगळे । करुनी निराळे ठेविले ते ॥ ३ ॥ भक्तिज्ञानें आणि वैराग्ये आगळा । ऐसा नाहीं डोळा देखियेला । जप तप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करुनिया ॥ ४ ॥ मार्गे कवीश्वर जाले थोर थोर । नेले कलिवर कोणें सागा । ह्मणे रामेश्वर सकळा पुसोनि । गेला तो विमानी बैसोनिया ॥ ५ ॥

१०८१. माझी मज आली रोकडी प्रचित । होऊनि फजित दुःख पावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काही द्वेष त्याचा करिता अतरीं । व्यथा या शरीरीं बहुत जाली ॥ ध्रु ॥ ज्ञानेश्वरे मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सागितले ॥ २ ॥ तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आह्मा थोर । कां जे अवतार नामयाचा ॥ ३ ॥ त्याची तुज काहीं घडली रे निंदा । ह्मणोनि हे बाधा घडली तुज ॥ ४ ॥ आता एक करीं सागेन तें तुला । शरण जाईं त्याला निश्चयेशी ॥ ५ ॥ दर्शनें चि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥ ६ ॥ तो चि हा विश्वास धरूनि मानसीं । जाय कीर्त्तनासी नित्य काळ ॥ ७ ॥ ह्मणे रामेश्वर त्याच्या समागमें । जालें हे आराम देह माझे ॥ ८ ॥

१०८२. वैष्णवाची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशी वेद श्रुति बोलती पुराणें । नाहीं तें दुषण हरिभक्ता ॥ ध्रु ॥ उंच निंच वर्ण न ह्मणावा कोणी । जें कां नारायणीं प्रिय जाले ॥ २ ॥ चहूं वर्णासी हा असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥ ३ ॥ जैसा शालिग्राम न ह्मणावा पाषाण । होय पूज्यमान सर्वत्रासी ॥ ४ ॥ गुरु परब्रह्म देवाचा तो देव । त्यासी तो मानव ह्मणूं नये ॥ ५ ॥ ह्मणे रामेश्वर नामीं जे रंगले । स्वयें चि ते जाले देवरूप ॥ ६ ॥

१०८२. खेळों लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कान्होबाचे पडिलों गळां । घेई गोपाळा देई झाडा ॥ छ ॥ मी तों हागे उघडा जालों । अवघ्या आलों बाहेरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बुद्धि काची । नाहीं ठायींची मजपाशीं ॥ ३ ॥

१०८३. घोंगडियांची एकी राशी । त्याचपाशीं तें ही होतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझियाचा भाग दावा । केला गोवा उगवों द्या ॥ छ ॥ व्हावें ऐसें निरंतान । घेईन आन तुजपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे लाहाण मोठा । सांडा ताठा हा देवा ॥ ३ ॥

१०८४. नाहीं तुझे उगा पडत गळां । पुढें गोपाळा जाऊं नको ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाहाड तुझे दाविन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥ छ ॥ तुह्मां आह्मां पडदा होता । सरला आतां सरोबरी ॥ २ ॥ तुका ह्मणे उरती गोठी । पडिली मिठी न सुटे ॥ ३ ॥

१०८५. तुह्मां आह्मां उरी तोंवरी । जनाचारीं ऐसें[5] तैसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें घोंगडें टाकुन देई । एके ठायीं मग असों ॥ छ ॥ विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं जाणता हरी । मज वेव्हारीं बोलविसी ॥ ३ ॥

१०८६. झुळींचा तुह्मां लागला चाळा । तो गोपाळा न संडा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावें त्याचें देणें चि नाहीं । ये चि वांहीं देखतसों ॥ छ ॥ माझी तरी घोंगडी मोठी । गांडीची लंगोटी सोडिस ना ॥ २ ॥ तुका ह्मणे ग्यां सांडिली आशा । हुंगिला फांसा येथुनियां ॥ ३ ॥

१०८७. घोंगडियास घातली मिठी । न सोडी साटी केली जीवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा गे चोर धरा धांवा कोणी । घरांत राहाटे चहूं कोणी ॥ छ ॥ नोळखवे ग्यां धरिला हातीं । देहीं दीप माय लाविली वाती ॥ २ ॥ नें[10] पावे धांवणें मारितो हाका । जनाचारीं तुका नागवला ॥ ३ ॥

१०८८. आतां मी देवा पांघरों काई । भिकेचें तें ही उरे चि ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सदैव[11] दुबळें नेणें चोर । देखोनि सुनाट फोडितो घर ॥ छ ॥ नाहीं मजपाशीं फुटकी फोडी । पांचांनी[12] घोंगडी दिली होती ॥ २ ॥ तुका ह्मणे जना वेगळें जालें । एक चि नेलें एकल्याचें ॥ ३ ॥

---

१ प. लागली.–२ पं. उगउ द्या.–३ पं. देयी.–४ पं. मांडवा.–५ दे. ऐसें. पं. आ॰.–६ पं. वाहि दे. वाहिं–७ पं. हुगला–८ पं. कोनि–९ दे. देह्यादिप॰.–१० पं. न पवे मारितो॰.– ११ दे. सदैव त. सदैव–१२ पं. पांचा घोंगडी.

१०८९. मी माझें करित होतों जतन । भीतरिलया चोरें घेतलें खानें[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज आल्याविण आधीं च होता । मज न कळतां मजे माजी[2] ॥ छ्रु ॥ घोंगडें नेलें घोंगडें नेलें । उघडें केलें उँघडें[3] चि ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरटा चि जाला साव । सहज[4] चि न्याय नाहीं तेथें ॥ ३ ॥

१०९०. घोंगडें नेलें सांगों मी कोणा । दुवळें माझें नोंणीत[5] मना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें तें मज न मिळे आतां । जवळी सत्ता दाम नाहीं ॥ छ्रु ॥ संटे महाजन ऐका कोणी । घोंगडियाची करा शोधणी[6] ॥ २ ॥ घोंगडियाचा करा बोभाट । तुका ह्मणे जंव भरला हाट ॥ ३ ॥

१०९१. माझें घोंगडें पडिलें ठायीं । माग तया पायीं सांपडला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चोर तो भला चोर तो भला । पाठिसी घातला पुंडलिकें ॥ छ्रु ॥ चोर कुठोरि एके चि ठायीं । वेगळें पाहावें न[7] लगे कांहीं ॥ २ ॥ आणिकांचीं ही चोरलीं आधीं । माझें तयामधीं मेळविलें ॥ ३ ॥ आपल्या आपण शोधिलें तींहीं[8] । करीन मी ही ते चि परी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझें हित चि जालें । फाटकें जाउन धडकें[9] आलें ॥ ५ ॥

॥ १२ ॥

१०९२. सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडियें फांदां घातलासे[10] । हिंडवुनि पोट भरी दारोदारीं । कोंडुनि पेटोरी असेरया[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों[12] तो मी गा सोडीं आतां । माझें मज कांहीं न चलेसें जालें । कृपा[13] तुज न करितां ॥ छ्रु ॥ आविसें मीनें[14] लोंवियला[15] गळीं । भक्ष तो गिळी ह्मणउनियां । काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथे बापमाये[16] कवण रया ॥ २ ॥ पक्षी पिलियां[17] पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते वळें । मरण नेणें मैंया[18] धांवोनि वोसरे । जीवित्वें[19] ना जालीं वाळें ॥ ३ ॥ गोडपणें मासी गुंतली लिगाडीं । सांपडे फडफडी अधिकाअधिक[20] । तुका ह्मणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घालीं ॥ ४ ॥

---

१ पं. घेतली खाण त. घेतलें खान.—२ पं. मजपाशीं —३ पं. उघड चि —४ पं. सहज न्याय त. सहज चि न्याव.—५ पं. नाणिती.—६ पं. त. शोधनी —७ दे. नलगेच काहीं.—८ पं. तेहि.—९ दे. धडकें चि आलें —१० पं. गारुडिये फादा घालीतसे.—११ पं. पेटारी आसेरया.—१२ पं. गुतलो मी० —१३ पं. कृपा हे तुज०.—१४ दे. मिनु. त. मीनु —१५ त. पं. लावियेला —१६ दे. त. बापुमाये.—१७ पं. पीलीया पातले. त. पीलिया पातले.—१८ पं. सायासे धावोनि०.—१९ पं. जीवित्वा नास जाली०.—२० पं. अधिकाधिक

१०९३. यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥ छ्र ॥ द्रव्यामुळें[1] माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होता गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ॥ ३ ॥

१०९४. शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाऊनि वोसंगा रिघेन वोरस । लागलें[2] तें इच्छे पीइन वरी ॥ छ्र ॥ कृपा तनु माझी[3] सांभाळी दुभूनि । अमृतजीवनी लोटलीसे ॥ २ ॥ आनंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥ ३ ॥ सैर जाये पडे तयेसी सांकडें । सांभाळीत पुढें मागें असे[4] ॥ ४ ॥ तुका ह्मणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हें विठाईचें ॥ ५ ॥

## रामचरित्र—अभंग ॥ १४ ॥

१०९५. रामा वनवास । तेणें वसे[5] सर्व देश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केलें नामाचें जतन । समर्थ तो नव्हे भिन्न ॥ छ्र ॥ वनांतरीं रडे । ऐसे पुराणीं पवाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऋषिनेम । ऐसा कळोनि कां भ्रम ॥ ३ ॥

१०९६. राम ह्मणे ग्रासोग्रासीं । तो[6] चि जेविला[7] उपवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्यधन्य तें शरीर । तीर्थव्रतांचें माहेर ॥ छ्र ॥ राम ह्मणे करितां[8] धंदा । सुखसमाधि त्या सदा ॥ २ ॥ राम ह्मणे वाट चाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥ ३ ॥ राम ह्मणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥ ४ ॥ ऐसा राम जपे नित्य । तुका ह्मणे जीवन्मुक्त[9] ॥ ५ ॥

१०९७. तारी ऐसे जड । उदकावरी जो दगड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा न करी तें[10] काई । कां रे लीन नव्हां[11] पायीं ॥ छ्र ॥ सीळी[12] मनुष्य जाली । ज्याच्या चरणाचे चाली ॥ २ ॥ वानरां हातीं लंका । घेवविली ह्मणे तुका ॥ ३ ॥

१०९८. राम ह्मणतां राम चि होइजे । पदीं वैसोन पदवी[13] घेइजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें सुख वचनीं आहे । विश्वासें अनुभव पाहें ॥ छ्र ॥ रामरसाचिया चवी । आन रस रुचती केवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे चाखोनि सांगें । मज अनुभव आहे अंगें ॥ ३ ॥

१ दे. पं. द्रव्यमुळें—२ पं. लागेल.—३ दे. त. माझा.—४ पं. त. असे.—५ पं. वस (ओस)—६ पं. तो जेविला०—७ पं. करी धंदा०.—८ दे. वाटे.—९ पं. तो चि मुक्त—१० त. तो—११ पं. व्हाना.—१२ पं. सीळा होती मनुष्य०.—१३ पं. पद घेवियीजे

१०९९. रामराम उत्तम अक्षरें । कंठीं धरिलीं आपण शंकरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां[1] । हळाहळ शीतळ केलें शिवा देखा ॥ ध्रु ॥ हा चि मंत्र उपदेश भवानी । तिच्या चुकल्या गर्भादियोनि ॥ २ ॥ जुनाट[2] नागर नीच नवें । तुका ह्मणे म्यां धरिलें जीवें भावें ॥ ३ ॥

११००. राम ह्मणतां तरे जाणतां नेणतां । हो का यातिभलता कुळहीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम ह्मणतां न लगे आणीक सायास । केले महा दोष तेही जळती ॥ ध्रु ॥ राम ह्मणे[3] तया जवळी नये भूत । कैचा यमदूत ह्मणतां राम ॥ २ ॥ राम ह्मणतां तरे भवसिंधुपार । चुके येरझार ह्मणतां राम ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें[4] सुखाचें साधन । सेवीं अमृतपान एका भावें ॥ ४ ॥

११०१. पैल आला राम रावणासी सांगती । काय निदसुरा निजलासी भूपति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघे लंकेमाजी जाले रामाचे दूत । व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥ ध्रु ॥ अवघे अंगलग तुझे वधियेले वीर । होईं शरणागत किंवा युद्धासी सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे एक्या भावें रामेसी[5] भेटी । करूनि घेईं आतां[6] संबंधेसी तुटी ॥ ३ ॥

११०२. समरंगणा आला । रामें रावण देखिला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसे भीडतील दोन्ही । नांव[7] सारुनियां रणीं ॥ ध्रु ॥ प्रेमसुखाचें संधान । बाणें निवारिती बाण ॥ २ ॥ तुकयास्वामी[8] रघुनाथ । वर्म जाणोनि केली मात ॥ ३ ॥

११०३. केला रावणाचा वध । अवघा तोडिला संबंध ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लंकाराज्यें[9] विभीषणा । केली चिरकाळ स्थापना ॥ ध्रु ॥ औदार्याची[10] सीमा । काय वर्णूं रघुरामा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा दाता । रामें सोडविली सीता ॥ ३ ॥

११०४. रामरूप केली । रामें[11] कौसल्या माउली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम राहिला मानसीं । ध्यानीं चिंतनीं जयासी । राम होय त्यासी । संदेह नाहीं[12] हा भरवसा ॥ ध्रु ॥ अयोध्येचे लोक । राम जाले सकळीक ॥ २ ॥ स्मरतां जानकी । रामरूप जाले कपि[13] ॥ ३ ॥ रावणेसी लंका । राम आपण जाला देखा ॥ ४ ॥ ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ५ ॥

---

१ लोकी । हाळ हाळ०.–२ दे. जुन्हाट.–३ पं. ह्मणती –४ त. हें तों सुखाचें०.–५ पं. रामासी –६ पं. आता या या समधेसी० –७ पं. नावे –८ पं. तुकास्वामी.–९ लंकाराज्य –१० दे. त. उदार्याची –११ राम.–१२ त. पं. नाहीं भरवसा –१३ त. कपी

११०५. आनंदले लोक नरनारी परिवार। शंखभेरीतुरें वाद्यांचे गजर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आनंदे[2] जाला अयोध्येसी आले रघुनाथ। अवघा जयजयकार[3] आळंगिला भरत ॥ ध्रु ॥ करिती अक्षवाणें ओंवाळिती रघुवीरा। लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा ॥ २ ॥ जालें रामराज्य आनंदलीं सकळें। तुका ह्मणे गाईवत्सें नरनारीबाळें ॥ ३ ॥

११०६. जालें रामराज्य काय उणें आह्मांसी। धरणी धरी पीकें गाई वोळल्या ह्मैसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम वेळोवेळां आह्मी गाऊं ओंवियें। दळितां कांडितां जेवितां गे वाइये ॥ ध्रु ॥ स्वप्नीं ही दुःख कोणी न देखे डोळां। नामाच्या गजरें भय सुटलें काळा ॥ २ ॥ तुका ह्मणे रामें सुख दिलें[6] आपुलें। तयां गर्भवासीं येणें जाणें खुंटलें ॥ ३ ॥

११०७. अहल्या जेणें तारिली रामें। गणिका परलोका नेली नामें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रामहरे रघुराजहरे। रामहरे महाराजहरे ॥ ध्रु ॥ कंठ शीतळ जपतां शूळपाणी। राम जपतां[7] अविनाशभवानी[8] ॥ २ ॥ तारकमंत्रश्रवण काशी। नाम जपतां वाल्मीक ऋषि ॥ ३ ॥ नामजप[9] बीजमंत्र नळा। सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥ ४ ॥ नामजप जीवन मुनिजना। तुकयास्वामी रघुनंदना ॥ ५ ॥

११०८. मी तों अल्प मतिहीनें[10]। काय वर्णू तुझे गुण। उदकीं तारिले पाषाण। हें महिमान नामाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाम चांगलें चांगलें। माझे कंठीं राहो भलें। कपिकुळ उद्धरिलें। मुक्त केलें राक्षसां ॥ ध्रु ॥ द्रोणागिरि कपिहातीं। आणविला सीतापती। थोर केली ख्याति। भरतभेटीसमयीं ॥ २ ॥ शिळा होती मनुष्य जाली। थोर कीर्ति वाखाणिली। लंका दहन केली। हनुमंतें काशानें ॥ ३ ॥ राम जानकीजीवन। योगियांचें निजध्यान। राम राजीवलोचन। तुका चरण वंदितो ॥ ४ ॥

॥ १४ ॥

## श्लोकरूपी अभंग—॥ ६ ॥

११०९. तुजवांचुनी मागणें काय कोणा। महीमंडळीं विश्वव्यापकजना। जीवभावना पूरवूं कोण जाणे। तुजवांचुनी होत कां रावराणे ॥ १ ॥ नसे

---

१ पं. ०तुरें याद्यावाद्याचे०.—२ पं. "आनंद जाला अयोध्येसी" हें ध्रुपद पूर्वी असून "आनंदले लोक" हे पहिलें कडवें मागून आहे.—३ दे. त. जेजेकार—४ पं. भरथ.—५ त. पिका.—६ त. पं. दिधलें.—७ पं. जपे.—८ दे. अविनाश भवाणी—९ त. राममंत्र जप बीज मंत्र० पं. राम जपे बीज०. दे. नाम जपे बीज मंत्र०.—१० पं. मतिहीन.

मोक्षदाता तिहींमाजि लोकां । भवतारकु तूजवांचुनि एका । मनीं मानसीं चिंतितां रूपनाम । पळे पाप ताप भयें नास[1] काम ॥ २ ॥ हरी नाम हें साच तूझें पुराणीं । हरीहातिचें काळगर्भादियोनी । करूं शुखवाणी कैसी देशधडी । तुजवांचुनि वाणितां व्यर्थ गोडी ॥ ३ ॥ भवभंजना व्यापको[2] लोक तिन्ही । तुज वाणितां श्रमला शेषफणी । असो भावें जीव तुझ्या सर्व पायीं । दुजें मागणें आणीक व्यर्थ काई ॥ ४ ॥ दिनानाथ हे साक्ष तूझी जनासी । दिनें तारिलीं पातकी थोर दोषी । तुका राहिला पायिं तो राख देवा । असें मागतसे तुझी चरणसेवा ॥ ५ ॥

११११०. उभा भींवरेच्या तिरीं राहिलाहे । असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे । महापातकांसी पळ कांप थोर । कैसे गर्जती घोष हे नामवीर ॥ १ ॥ गुणगंभीर हा धीर हास्यमुख । वदे वदनीं अमृत सर्वसुख । लागलें मुनिवरां[3] हें गोड चित्तीं । देहभावना तुटलियासि खंती ॥ २ ॥ ठसा घातला ये भूमिमाजी थोर । इच्छादाना हा द्यावयासी उदार । जया वोळगती सिद्धि सर्वठायीं । तुझें नाम हें चांगलें गे विटाई ॥ ३ ॥ असे उघडा हा विटेवरि उभा । कटसूत्र हें धरुनि भक्तिलोभा । पुढें वाट दावी भवसागराची । विठो माउली हे सिद्धसाधकांची ॥ ४ ॥ करा वेगु हा धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तें च साधीं । ह्मणे तुका पंढरीस सर्व आलें । असे विश्व हें जीवनें त्याचि ज्यालें ॥ ५ ॥

११११. धना गुंतलें चित्त माझें मुरारी । मन घेउनी हिंडवी दारोदारीं । मरे हिंडतां न पुरे यासि कांहीं । मही ठेंगणी परी तें तृप्त नाहीं ॥ १ ॥ न दिसे शुद्ध पाहातां निजमती । पुढें पडिलों इंद्रियां थोर घातीं । जिवा नास त्या संगतीं दंड बेडी । हरी शीघ्र या दृष्टसंगासि तोडीं ॥ २ ॥ असीं आणिकें काय सांगों अनंता । मोहो पापिणी दृष्टमायाममता । क्रोध काम[6] यातना थोर करी । तुजवांचुनी सोडवी कोण हरी ॥ ३ ॥ निज देखतां निज [7]हे दूरि जाये । निद्रा आळस दंभ या भीत आहे[8] । तयां वस्ति देहीं नको देउं देवा । तुजवांचुनी आणिक नास्ति हेवा ॥ ४ ॥ करीं घात पात शंका लाज थोरी । असे सत्य भाव बहू भक्ति दूरी । नको मोकलूं दीनबंधु अनाथा । तुका विनवी ठेवुनी पायिं माथा ॥ ५ ॥

१११२. पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें । सिरीं तुर्विलीं साजिरीं मोरवीसें[9] । हरे त्यासि रे देखतां ताप माया । भजा रे भजा यादवा[10] योगिराया ॥ १ ॥ जया कामिनी

१ त. नासे काम.–२ दे. व्यापक.–३ दे. मुनिवरां गोड.–४ दे. श्वास.–५ "दृष्ट" हा शब्द "दुष्ट" याबद्दल आढळतो. याचे कारण "दुष्ट" याचा अपभ्रंश "दुष्ट", आणि त्याचा "दृष्ट" असा झाला आहे.–६ त. काम हा यातना.–७ त. हें.–८ दे. आहे.–९ मोर पीसें ?–१० दे. यादव. त. 'यादवा' असतां 'यादव' केलें आहे

लुब्धल्या सहस्रसोळा । सुकुमार ह्या गोपिका दिव्य बाळा । शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी । रुपा मीनली साजिरी माळकंठीं ॥ २ ॥ *असे यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणी । जया वंदिती कोटि तेहतीस तीन्ही । महाकाळ हे कांपती दैत्य ज्यासी । पाहा सांवळें रूप हें पापनासी ॥ ३ ॥ कसीं पाउलें साजिरीं कुंकुमाचीं । कसी वीट हे लाधली दैवांची[2] । जया चिंतितां अग्नि हा शांति नीवे । धरा मानसीं आपला देहभाव ॥ ४ ॥ मुनी[3] देखतां मूख हें चित्त ध्याय । देह मांडला भाव हा बापमाय । तुक्या लागलें मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥ ५ ॥

११११३. असे नांदतु हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्नि हा काष्ठ तेवीं । घटीं बिंबलें बिंब हें ठायिठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥ १ ॥ तन वाटितां क्षीर हें होत नाहीं । पशू भक्षितां पालटे तें चि देहीं । तया वर्म तो जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्वाहे ॥ २ ॥ फळ कर्दळीं सेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजि काये । धीर नाहीं तें[4] वाउगें धीग जालें । फळ पुष्पना यत्न ते व्यर्थ गेले ॥ ३ ॥ असे नाम हें दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या मळा आड ठेलें । कैसें शुद्ध नाहीं दिसे माजिरूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥ ४ ॥ करा वर्म ठावें नका सोंग वांयां । तुका वीनवीतो पडों काय पायां । तुज पुत्र दारा धन वासना हे । मग ऊरलें शेवटीं काय पाहें ॥ ५ ॥

११११४. मना सांडिं हे वासना दुष्ट खोडी । मती मानसीं एक हे व्यर्थ गोडी । असे हीत माझें तुज कांहीं एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें पायिं सूख ॥ १ ॥ ऐसा सर्वभावें तुज शरण आलों । देहदुःख हें भोगितां फार भ्यालों । भवतारितें दूसरें नाहिं कोणी । गुरु होत कां देव तेहेतीस तीन्ही ॥ २ ॥ जना वासना हे धना थोरि आहे । तुज लागली संगती ते चि सोये । करीं सर्व संगी परि त्यागु ठायीं । तुका विनवीतो मस्तक ठेवुनि पायीं ॥ ३ ॥

॥ ६ ॥

१११५. सुटार्याचा कांहीं पाहातों उपाय । तों हे देखें पाय गोवियेले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी[9] । हारपली बुद्धि वळ माझें ॥ ध्रु. ॥ प्रारब्ध क्रियमाण संचिताचें । वोढत ठायींचें आलें साचें ॥ २ ॥ विधिनिषेधाचे

१ त. तया.–२ त. दइवाची.–३ त. मनी.–४ दे. त्यें.–५ दे. यत्न व्यर्थ–६ दे. आहे.–७ दे. त. कैसें.–८ पं. सुटायाचे कांहीं करितो उपाय।–९ पं. संधी–१० पं. प्रारब्ध क्रियामाण सताचे. * त. "असे" शब्द नवा घातला आहे तो दे. नाहीं.

सांपडलों चपे । ऐकें[1] एक लोपे निवडेनां[2] ॥ ३ ॥ सारावें तें वाढे त्याचिया चि अंगें । तृष्णेचिया संगें दुःखी जालों ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालों देवा ॥ ५ ॥

१११६. भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा पडिलों कांचणी[3] । करीं धांवा ह्मणउनी ॥ छ ॥ विचारितों कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥ ३ ॥

१११७. येगों[4] येगा पांडुरंगा । घेईं उचलूनि वोसंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी असोनियां वेसी । दिसतों मी परदेसी ॥ छ ॥ उगवूनि गोवा । सोडवूनि न्यावें देवा ॥ २ ॥ तुज आड कांहीं । वळ करी ऐसें नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हृषीकेशी । काय उशीर लाविलासी[5] ॥ ४ ॥

१११८. माझी विठ्ठल गाउली । प्रेमपान्हा[6] पान्हायेली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कुर्वाळूनि[7] लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ॥ छ ॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ २ ॥ तुका ह्मणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

१११९. आह्मी उतराई । भाव निरोपूनि पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी पुरवावी आळी । करावी[8] ते लडिवाळीं ॥ छ ॥ आमचा हा नेम । तुह्मां उचित हा धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । जाणों सांगितली सेवा ॥ ३ ॥

११२०. केलें पाप जेणें दिलें अनुमोदन[9] । दोघांसी पतन सारिखें[10] चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विष नवनीता विष करी संगें । दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥ छ ॥ देखिलें ओढाळ निघालिया सेता । टाळावें निमित्तीं[11] थेंक ह्मूण ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडे केल्याविण कर्म । देखेतां तो श्रम न मनितां ॥ ३ ॥

११२१. विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥ छ ॥ विठ्ठल जागृतिस्वप्नसुषुप्ती[13] । आन दुजें नेणती[12] विठ्ठलेंविण ॥ २ ॥ भूषण अळंकार सुखाचे प्रकार । विठ्ठल[14] निर्धार जयां नरां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ते ही विठ्ठल चि जाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥ ४ ॥

---

१ पं. एका एक.–२ त. सांपडेना –३ पं. काकरणी –४ पं. येगा येगा.–५ दे. लाविसी – ६ दे. प्रेमें पान्हा० –७ दे. त. कुवाळूनि –८ पं. करविती लडवाळीं.–९ दे. त. पं. आन्सोदन – १० दे. त. सारिके चि.–११ दे. त. निमित्या –१२ त. नेणती तो.–१३ दे. जागृतिस्वप्नी सुपुप्ति – १४ पं. विठ्ठलीं.

११२२. दास जालों हरिदासांचा। बुद्धिकायामनेंवाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें प्रेमाचा सुकाळ। टाळमृदंगकल्लोळें[1]। नासे दुष्टबुद्धि सकळ। समाधि हरिकीर्त्तनीं ॥ छ ॥ ऐकतां हरिकथा। भक्ति लागे त्या अभक्तां ॥ २ ॥ देखोनि कीर्तनाचा रंग। कैसा उभा पांडुरंग ॥ ३ ॥ हें सुख ब्रह्मादिकां। ह्मणे नाहीं नाहीं तुका[2] ॥ ४ ॥

११२३. गति अधोगति मनाची युक्ति[3]। मन लावीं एकांतीं साधुसंगें[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जतन करा जतन करा। धांवतें सैरा ओढाळ तें ॥ छ ॥ मान अपमान मनाचें लक्षण। लाविलिया ध्यान तें चि करी ॥ २ ॥ तुका ह्मणे मन उतरी भवसिंधु। मन करी बंधु चौऱ्याशींचा ॥ ३ ॥

११२४. पंढरीस दुःख न मिळे ओखदा। प्रेमसुख सदा सर्वकाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुंडलिकें हाट भारियेली पेंठ। अवघें वैकुंठ आणियेलें ॥ छ ॥ उदमासी[5] तुटी नाहीं कोणा हानि। घेऊनियां धणी लाभ घेती[6] ॥ २ ॥ पुरलें देशासी भरलें सिगेसी। अवघी पंचक्रोशी दुमदुमीत ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतां लागलीसे धणी। वैसले राहोनि पंढरीस ॥ ४ ॥

११२५. द्वारकेचें केणें आलें या चि ठाया। पुढें भक्तराया चोजवीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोविलें विसारें माप केले खरें। न पाहे माघारें अद्यापवरी ॥ छ ॥ वैष्णव मापारी नाहीं जाली सळे[7]। पुढें ही न कळे पार त्याचा ॥ २ ॥ लाभ जाला त्यांनीं धरिला तो विचार[8]। आह्निक्य परत्र सांटविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज मिळाली मजुरी। विश्वास या घरीं संतांचिया ॥ ४ ॥

११२६. सुरवर येती तीर्थें नित्यकाळ। पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साक्षभूत नव्हे सांगितली मात। महिमा अत्यद्भुत वर्णवेना[9] ॥ छ ॥ पंचक्रोशीमाजी रीघे[10] नाहीं दोषा। जळती आपैसा अघोर ते ॥ २ ॥ निर्विषय नर चतुर्भुज नारी। अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्यापें नाहीं पुण्यलेश। जा रे पंढरीस घेईं कोटि ॥ ४ ॥

११२७. विचार नाहीं नर खर तो तैसा। वाहे ज्ञान पाठीं भार लगड तैसीं[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वादावाद करणें त्यासी तो च दरी। शुखाडीची चाड सरे तों च बाहेरी ॥ छ ॥ सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठ[12]। चिकसेनि[13] सांडी

---

१ पं. कल्होळ.–२ पं. नाहीं नाहीं ह्मणे तुका.–३ पं. मनाची हे युक्ति.–४ त. वाधु.–५ पं. उदिमासी.–६ त. देती. पं. येती.–७ दे. त. सळ.–८ पं. धरिला विचार। अहिक्य.–९ पं न वर्णवे.–१० दे. त. रीग.–११ पं. जैसा.–१२ पं. प्रतिष्टा.–१३ पं. विकसेनि.

पायां लागली ते विष्ठि ॥ २ ॥ नाहीं याति कुळ फांसे ओढी तयासी । तुका ह्मणे काय शुद्रासंग जाळिसी ॥ ३ ॥

११२८. देव होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ १ ॥ दुष्ट होसी तरी अणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ २ ॥ तुका ह्मणे जें दर्पणीं बिंबलें । तें तया वाणलें निश्चयेसीं ॥ ३ ॥

११२९. कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विजलोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते चि कळों आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ॥ छ्र ॥ तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥ २ ॥ देव ह्मणऊनी न येती देऊळा । संसारा वेगळा तरी कां नव्हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ४ ॥

११३०. नमो विष्णुविश्वरूपा मायबापा । अपरा अनुपा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ॥ छ्र ॥ तुझी स्तुति वेद करितां भागला । निवांत चि ठेला नेति नेति ॥ २ ॥ ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां ते गुण न सरती ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ती देवा ॥ ४ ॥

११३१. अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घातलें वचन न पडे चि खालीं । तूं आह्मां माउली अनाथांची ॥ छ्र ॥ मज याचकाची पुरवावी आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥ २ ॥ नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ४ ॥

११३२. उदार कृपाळ अनाथांचा नाथ । ऐकेंसी मात शरणागतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व भार माथां चालविसी त्यांचा । अनुसरलीं वाचा काया मनें ॥ छ्र ॥ पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ २ ॥ चालतां ही पंथ सांभाळिसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता नाहीं तुझ्या दासां । तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ॥ ४ ॥

११३३. काय कीर्ती करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वांयां विण ॥ छ्र ॥

---

१ पं. विष्ठा.–२ त. अणिकासी –३ पं. ऋपि मुनि सिद्ध वहुत कविजन । वार्णितां तुझे गुण०.– ४ पं. नागली –५ पं. ऐकसील.–६ पं. अनुसरे.

होइल थोरपण जाणीवेचा भार । दुरावेन[1] दूर तुझ्यां[2] पायीं ॥ २ ॥ अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानी एकां देखोवेखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे पाय आतुडती । ते[3] मज विपत्ति गोड देवा ॥ ४ ॥

११३४. मानावया जग व्हावी द्रव्यगाया । नाहीं[4] हे माझिया जीवा चाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझ्या पायांसाटीं केली आराणूक । आतां कांहीं एक नको दुजें ॥ ध्रु ॥ करूनियां कृपा करीं अंगीकार । न लेंवीं[5] उसीर आतां देवा ॥ २ ॥ नव्हे साच कांहीं कळों आलें मना । ह्मणोनि वासना आवरिली ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ॥ ४ ॥

११३५. आतां[6] माझा सर्वभावें हा निर्धार । न करीं विचार आणिकांसी ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ ध्रु ॥ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहीन भरोनि डोळे मुख ॥ २ ॥ निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं । येऊं नेदी मनीं शंका कांहीं ॥ ३ ॥ अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका ह्मणे ॥ ४ ॥

११३६. जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा[7] तो वृत्तांत न कळे आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जन्म जरा मरण कवण[8] भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें[9] ॥ ध्रु ॥ पापपुण्यें[10] शुद्धाशुद्ध आचरणें[11] । हीं[12] कोणांकारणें कवणें केलीं ॥ २ ॥ आह्मां मरण नाश तूं तंव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं चि निवडीं हें[13] गुढार । दाखवीं साचार तें चि मज ॥ ४ ॥

११३७. यथार्थ वाद सांडूनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥ १ ॥ चोरा धरितां सांगे कुठोऱ्याचें[14] नांव । दोघांचे ही पाव हात जाती ॥ २ ॥ तुका ह्मणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥ ३ ॥

११३८. धीर तो कारण सांह्य[15] होतो नारायण । नेदी होऊं सीण वाहों चिंता दासांसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें करावें कीर्तन हर्षें गावे हरिचे गुण । वारी सुदर्शन आपण चि कळिकाळ ॥ ध्रु ॥ जीव वेची माता बाळा जडभारी होतां । तों तों नव्हे दाता प्राकृतां यां सारिखा ॥ २ ॥ हें तों माझ्या अनुभवें अनुभवा आलें जीवें । तुका ह्मणे सत्य व्हावें आहाच नये कारणा ॥ ३ ॥

---

१ पं. दुऱ्हावेन.–२ दे. त. तुझा.–३ पं. त्या –४ पं. हे नाहीं माझिया.–५ पं. लावीं.–
६ पं. आता सर्वभावें हा माझा निर्धार.–७ पं. कैसा हा वृत्तांत०.–८ त. कोण.–९ पं. सुख दु.ख.–
१० पं. पापपुण्य –११ त. आचरण। हें कोणा०.–१२ पं. कीं कोणा.–१३ पं. हे.–
१४ पं. कुटाऱ्याचें –१५ दे. त. साहे

११३९. पुढें आतां कैंचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥ छ्रु ॥ पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥ २ ॥ तुका ह्मणे चुकती[1] वापा । पुन्हा खेपा सकळा ॥ ३ ॥

११४०. दुंध[2] दहीं ताक पशूचें पाळण । त्यांमध्यें कारण घृतसार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि वर्म आह्मां भाविकांचे हातीं । ह्मणऊनि चित्तीं धरिला राम ॥ छ्रु ॥ लोहो कफ गारा अग्नीचिया काजें । येऱ्हवी तें ओझें कोण वाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे खोरीं पाहारा जतन । जोंवरि हें धन हातीं[3] लागे ॥ ३ ॥

११४१. वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती घोष जयजयकार[4] । जळती दोषांचे डोंगर ॥ छ्रु ॥ क्षमा[5] दया शांति । बाण अभंग[6] हे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । ते चि एक भूमंडळीं ॥ ३ ॥

११४२. ऐकें[7] रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा मनामाजी स्मरावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग कैचें रे वंधन वाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण ये चि तीरीं[8] सरेल ॥ छ्रु ॥ दास्य करील कळिकाळ बंद[9] तुटेल मायाजाळ । होतील सकळ रिद्धिसिद्धी ह्मणियारीं ॥ २ ॥ सकळशास्त्रांचें सार हें वेदांचें गव्हर । पाहातां विचार हा चि करिती पुराणें ॥ ३ ॥ ब्राह्मण क्षत्रिय[10] वैश्य शूद्र चांडाळां[11] आहे अधिकार । बाळें[12] नारीनर आदि करोनि वेश्या ही ॥ ४ ॥ तुका ह्मणे अनुभवें आह्मीं पाडियलें ठावें । आणीक ही दैवें सुख घेती भाविकें ॥ ५ ॥

११४३. न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा[13] कृपाळ स्वामी माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्याशीच्या ॥ छ्रु ॥ आणिकियां जीवां होईल उद्धार । ते ही उपकार घडती कोटि ॥ २ ॥ ऐहिक्य[14] परत्रीं होसील सरता । उच्चारीं[15] रे वाचा रामराम ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ४ ॥

११४४. कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणे ॥ छ्रु ॥

---

१ पं. चुकवी.–२ दे. त. दुद.–३ पं. हाता –४ दे. त. जेजेकार –५ पं. दया क्षमा शाति०.–६ दे. अभंग ते हातीं.–७ पं. आयीक –८ दे. तरीं –९ पं. वध.–१० दे. त. पं. क्षेत्री.–११ पं. चांडाळांही अधिकार.–१२ पं. स्त्रिया बाळे०.–१३ पं. "हा" शब्द नाहीं.–१४ ऐहिक्य असें असावें –१५ पं. वाचे उच्चारितां रामनाम.

आणीक ही भोग आणिकां इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं[1] ॥ २ ॥ रूप दृष्टि धाय पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि[2] तृष्णा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे नाशिवंतासाटीं । देवा[3]सवें तुटी करितोसी ॥ ४ ॥

११४५. बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्नवस्त्रदाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय आह्मां करणें अधिक सांचुनी । देव जाला ऋणी पुरविता ॥ ध्रु ॥ दयाळ मयाळ जाणे कळवळा । शरणागतां ळळा राखों जाणे ॥ २ ॥ न[4] लगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥ ३ ॥ तुका ह्मणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूं चि होसी ॥ ४ ॥

११४६. सोनियांचा कळस । माजी भरिला सुरारस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करावें प्रमाण । तुह्मी सांगा संतजन ॥ ध्रु ॥ मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांट ॥ २ ॥ तुका ह्मणे हित । तें मज सांगावें त्वरित ॥ ३ ॥

## सेतावर—अभंग ३.

११४७. सेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं वेठी जेवा सारा । जो[5]हाती नाहीं ह्मणियारा । सरिक नाहीं[6] रे दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥ ध्रु ॥ जपतप नांगरणी । न लगे आटी दुनँवणी[7] ॥ २ ॥ कर्म कुळवणी । न लगे धर्मपाळी दोन्ही ॥ ३ ॥ ज्ञानपाभारी तीं फणी । न लगे करावी पेरणी ॥ ४ ॥ बीज न लगे संचिताचें । पीक पिकलें ठायींचें ॥ ५ ॥ नाहीं यमाचें चोरटें । विठ्ठल पागाऱ्याच्या नेटें ॥ ६ ॥ पीक न वजे हा भरवसा । करी उद्वेग[8] तो पिसा ॥ ७ ॥ सेराई[9] सर्व काळ । वांयां न वजे घटिकापळ ॥ ८ ॥ प्रेम पिकलें अपार । नाहीं सांटवावया थार ॥ ९ ॥ ऐसीये[10] जोडी जो चुकला । तुका ह्मणे धिग त्याला ॥ १० ॥

११४८. बोणे[11]न्या सोंकरीं । सेत खादलें पांखरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा खाऊं नको दगा । निदसुरा राहुनि जागा ॥ ध्रु ॥ चोरासवें वाट । चालोनि केलें तळपट ॥ २ ॥ डोळे झांकुनि राती । कूपीं पडे दिवसा जोती ॥ ३ ॥ पोसी वांजे[12] गाय । तेथें कैंची दुधं[13] साय ॥ ४ ॥ फुटकी सांगडी । तुका ह्मणे न पवे थडी ॥ ५ ॥

---

१ पं. "कांहीं" याच्याबद्दल "ही" आहे—२ आणीक—३ पं. देवासाटीं—४ पं. न लगे सांगणें सागणें तयासी०—५ त. 'जाहाती' यावर 'जाहाजती' असा शोध घातला आहे—६ पं. नाहीं दुसरा—७ त. दुणवणी पं. दुणवनी—८ पं. उद्योग—९ पं. दे. सराये.—१० पं. ऐसी.—११ दे. बोनव्या—१२ पं. वांझ.—१३ पं. दुधतोय.

११४९. सेत आलें सुगी सांभाळावे चारी कोण। पिका आलें परी केलें पाहिजे जतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोंकरीं सोंकरीं विसावा[1] तोंवरीं। नको खाऊं उभें आहे तों ॥ छ्र ॥ गोफणेसी गुंडा घालीं पागोऱ्याच्या नेटें। पळती हाहाकारें अवघीं पांखरांचीं थाटें ॥ २ ॥ पेटवूनि आगटी राहें जागा पालटूनि। पडिलिया मान[2] बळ बुद्धि व्हावीं दोनी ॥ ३ ॥ खळे दानें[3] विश्व सुखी करीं होतां रासी। सारा सारूनियां ज्याचे भाग देईं त्यासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे मग नाहीं आपुलें कारण। निज आलें हातां भूस सांडिलें निकण ॥ ५ ॥

॥ ३ ॥

११५०. नका घालूं दूध जयामध्यें सार। ताकाचे उपकार तरी करा ॥ १ ॥ नेदा तरी हें हो नका देऊं अन्न। फुकाचें जीवन तरी पाजा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सगुणाची चाड। पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥ ३ ॥

## उतराधिपदें—२२.

११५१. क्या गाऊं कोई सुननवाला। देखें तों सब जग ही भुला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खेलों आपने[4] रामेंहिसात[5]। जैसी वैसी करहों मात ॥ छ्र ॥ काहांसे लाऊं[6] मधुरा वानी। रीझे ऐसी लोक बिरानी[7] ॥ २ ॥ गिरिधर लाल तो भावका[8] भुका। राग कला नहिं जानत तुका ॥ ३ ॥

११५२. छोडे[9] धन मंदिर बन बसाया। मांगत टुका[10] घरघर खाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तीनसों हम करवों सलाम। ज्योंमुख[11] वैठा राजाराम ॥ छ्र ॥ तुलसीमाला[12] बभूत चन्हावे। हरजीके गुण निर्मल गावे ॥ २ ॥ कहे तुका जो साईं हमारा। हिरनकश्यप उन्हें[13] मारहि डारा ॥ ३ ॥

११५३. मंत्रयंत्र[14] नहिं मानत साखी। प्रेमभाव नहिं अंतर राखी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम कहे त्याके पगहूं लागूं। देखत कपट अभिमान दुर भागूं ॥ छ्र ॥ अधिक याती कुलहीन नहिं जानूं[15]। जाने[16] नारायन सो प्रानी[17] मानूं ॥ २ ॥ कहे तुका जीव तन[18] डारू वारी। राम उपासिंहु वलियारी* ॥ ३ ॥

---

१ दे.० तों वरी नको उभें आहे तों ॥ पं.० तो वरी उभे आहे तो।.–२ पं. मानी वळबुद्धि.–३ त. पं. दानी.–४ दे. आपणें.–५ दे. राम इसा.–६ दे. ल्यावों माधुर वाणी. त. ल्यावो मधुरावांणी.–७ दे. त. विराणी.–८ दे. त. भावहि भुका.–९ त. "छोडे" हा शब्द नाहीं. दे. बाहेर नवीन घातला आहे.–१० दे. टूका –११ दे. ज्या मुखें.–१२ पं. तुलसीची माला –१३ पं. जिन्हे.–१४ पं. मत्र तंत्र.–१५ दे. ज्यानु. त. जाणु.–१६ दे. ज्याणे त. ज्याने त. नारायण.–१७ दे. प्राणी त. प्राणी माणु.–१८ पं. तन धन डारू.०. * "वलिहारी;"

११५४. चुराचुराकर माखन खाया । गौलनीका[1] नंद कुमर कन्हया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काहे वरोई[2] दिखावत मोहि । जानतहुं[3] प्रभुपना तेरा[4] खब* हि ॥ ध्रु. ॥ और बात सुन उखलसुं[5] गला । बांधलिया आपना तूं गोपाला[6] ॥ २ ॥ फेरत बनबन गाऊ धरावत[7] । कहे तुकयाबंधु लकरी लेले हात[8] ॥ ३ ॥

११५५. हरिसुं मिल दे एक हि बेर । पाछे तूं फिर नावे घर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मात सुनो दुति आवे[9] मनावन । जाया करति भर जोबन ॥ ध्रु. ॥ हरिसुख मोहि कहिया न जाये । तब तूं बुझे आंगो पाये[10] ॥ २ ॥ देखहि भाव कछु पकरि हात । मिलाई[11] तुका प्रभुसात ॥ ३ ॥

११५६. क्या कहुं नहीं बुझत लोका । लिजावे जम मारत धका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्या जीवनेकी पकडी आस । हातों लिया नहिं तेरा घांस ॥ ध्रु. ॥ किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तन तूं सब ल्या न्यारा[12] ॥ २ ॥ कहे तुका तूं भया दिवाना । आपना बिचार कर ले जाना ॥ ३ ॥

११५७. कब मरूं पाऊं चरन[13] तुह्मारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जग रडे[14] ज्याकुं सो मोहि मीठा । मीठो[15] दर आनंदमाहि पैठा ॥ ध्रु. ॥ भला पाऊं जनम इन्हे[16] बेर । वसें[17] मायाके असंग फेर ॥ २ ॥ कहे तुका धन मानहि दारा । वोहि[18] लिये गुंडलीया पसारा ॥ ३ ॥

११५८. दासों पाछें दौरे राम । सोवे खडा आपें मुकाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेमसरडी† बांधी गले[19] । खैंचें[20] चले उधर ॥ ध्रु. ॥ आपने[21] जनसुं भुल न देवे[22] । कर हि धर आपें बाट बतावे ॥ २ ॥ तुकाप्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हुं गोपाला ॥ ३ ॥

११५९. ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥ ध्रु. ॥ इतने गोते काहे खाता । जब तूं आपना[23] भूल न होता ॥ १ ॥ अंतरजामी जानत साचा । मनका[24] एक उपर बाचा ॥ २ ॥ तुकाप्रभु देसविदेस । भरिया खाली नहिं लेस ॥ ३ ॥

---

१ दे. त. गौळणीका.—२ दे. त. वडाई.—३ दे. त. पं. जाणत हुं प्रभुपणा—४ त. तेरा खुबाहि.—५ दे. त. उखळसुं गळा.—६ दे. त. गोपाळा—७ दे. धरावतें. पं. धरावततें.—८ पं. हाते.—९ त. आवो.—१० दे. आगोपाये. पं. आगे पाय—११ पं. मीललई.—१२ दे. पं. ० ल्या नेरा.—१३ त. पं. चरण.—१४ "रडे" याच्या बद्दल "रोवे" असें असावें.—१५ पं. मीठा दर आनंदसाहि पैठा.—१६ दे. ईण्हे. पं. ० पहूजनम ईन्हे—१७ पं. सब—१८ दे. वोहिलिये गुडलीयें. पं. गुडली.—१९ दे. त. गळे.—२० पं. खैचलले उधर चेले—२१ दे. आपणे त. आपले.—२२ पं. लेवे—२३ दे. त. आपणा.—२४ पं. मन येक उवर वाचा * "सब ही;" असावें † "प्रेमरसडी" असावें.

११६०. मेरे रामको नाम जो लेवे बारोंवार । त्याके[1] पाऊं मेरे तनकी पैजार ॥ ध्रु ॥ हांसत खेलत चालत बाट । खाना[2] खाते सोते खाट ॥ १ ॥ जातनसुं मुजे[3] कछु नहिं प्यार । असतेके[4] नहिं हेंदु* धेड चंभार ॥ २ ॥ ज्याका चित लगा मेरे रामको नांम[5] । कहे तुका मेरा चित लगा त्याके पाव ॥ ३ ॥

११६१. आपे[6] तरे त्याकी कोण बडाई[7] । औरनकुं भलो[8] नाम धराई ॥ ध्रु ॥ काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नहिं दुध चाखे ॥ १ ॥ बरसतें मेघं[9] फलतेंहे[10] बिरखा । कोन काम आपनी उन्होति[11] रखा ॥ २ ॥ काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन एक बैठन पावत घेरा ॥ ३ ॥ काहे परिस कंचन करे धातु । नहिं मोल तुटत पावत घातु ॥ ४ ॥ कहे तुका उपकार[12] हि काज । सब करेरहिया[13] रघुराज ॥ ५ ॥

११६२. जग चले उस घाट कोन जाय । नहिं समजत फिरफिर गोते[14] खाय ॥ ध्रु ॥ नहिं एकदो सकल संसार । जो बुझे सो आगला स्वार[15] ॥ १ ॥ उपर स्वार[15] बैठे कृष्णापीठ[16] । नहिं बाचे कोइ जावे लूठ ॥ २ ॥ देख हि डर फेर बैठा तुका । जोवत[17] मारग राम हि एका ॥ ३ ॥

११६३. भले रे भाई जिन्हें किया चीज[18] । आछा नहिं मिलत बीज ॥ ध्रु ॥ फीरतफीरत पाया सारा । मीलत[19] लोले धन किनारा ॥ १ ॥ तीरथ बरत फिर पाया जोग । नहिं तलमल तुटतें[20] भवरोग ॥ २ ॥ कहे तुका मैं तांको[21] दास । नहिं सिरभार चलावे पांस[22] ॥ ३ ॥

११६४. लाल कमलि वोढे पेनाये । मोसु हरिथें[23] कैसें बनाये ॥ ध्रु ॥ कहे सखि तुम्हें करति सोर । हिरदा हरिका कठिन कठोर ॥ १ ॥ नहिं किया† सरम कछु लाज । और सुनाउं बहुत हे भाज ॥ २ ॥ और नामरूप नहिं गोवलिया । तुकाप्रभु माखन खाया ॥ ३ ॥

११६५. राम कहो जीवना फल सो ही । हरिभजनसुं विलंब न पाई ॥ ध्रु ॥ कवनका मंदर कवनकी झोपरी । एकरामबिन सब हि फुकरी ॥ १ ॥ कवनकी

---

१ पं. याके –२ द. त. पं. खाणा –३ पं. मजे –४ द. असते की नही०.–५ दे. त. नाव –६ पं. आप.–७ पं. वडाई । आवरनकु –८ त. भली –९ त. मेघा.–१० पं. तेही –११ पं. उणोति. त. उण्हेति –१२ पं. उपकर –१३ पं. करक रहिया –१४ दे. त. गोठे.–१५ दे. त. स्वार.–१६ पं. कृष्णापिठ –१७ पं. जावत.–१८ पं. चित्त –१९ त. ० सर । मीटत ० किनार ॥ दे. मीटत.–२० दे. त. तुटति.–२१ पं. तकोदास. दे. त. ताको दासा.–२२ दे. त. पासा –२३ पं. हरिते

* "हिंदु" असावें † "कन्या" असावें.

काया कवनकी माया । एकरामबिन सब हि जाया ॥ २ ॥ कहे तुका सब हि चलनार[1] । एकरामबिन नहिं वासारा[2] ॥ ३ ॥

११६६. काहे भुला धनसंपत्तीघोर । राम[3]राम सुन गाउ हो बाप रे ॥ ध्रु ॥ राजे लोक सब कहे[4] तूं आपना । जब काल नहीं पाया ठाना ॥ १ ॥ माया मिथ्या मनका सब धंदा । तजो अभिमान भजो गोविंदा ॥ २ ॥ राना रंक डोंगरकी राई । कहे तुका करे[5] इलाहि ॥ ३ ॥

११६७. काहे रोवे आगले मरना । गंव्हार तूं भुला आपना ॥ ध्रु ॥ केते मालुम[6] नहिं पडे । नन्हे बडे गये सो ॥ १ ॥ बाप भाई लेखा नहिं । पाछें[7] तूं हि चलनार ॥ २ ॥ काले बाल सिपत[8]* भये । खबर पकडो तुका कहे ॥ ३ ॥

११६८. क्या मेरे राम कवन सुख सारा । कहकर दे पुछूं दास तुह्मारा ॥ ध्रु ॥ तनजोवनकी कोन बराई । व्याधपीडादि स काटहि खाई ॥ १ ॥ कीर्त बधाऊं तों नाम[9] न मेरा । काहे झुटा[10] पछतऊं घेरा ॥ २ ॥ कहे तुका नहिं समजत[11] मात । तुह्मारे शरन हे जोडहि[12] हात ॥ ३ ॥

११६९. देखते[13] आखों झुटा कोरा । तो काहे छोरा घरबार ॥ ध्रु ॥ मनसुं किया चाहिये पाख । उपर खाक पसारा[14] ॥ १ ॥ कामक्रोधसो संसारे[15] । वो सिरभार चलावे[16] ॥ २ ॥ कहे तुका वो[17] संन्यास । छोडे आस तनकी हि ॥ ३ ॥

११७०. रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जनमदुख राई ॥ ध्रु ॥ दुधभात घृत सकरपारे[18] । हरते भुक नहि अंतरतारे[19] ॥ १ ॥ खावते जुग सब चलिजावे । खटमिठा[20] फिर पचतावे ॥ २ ॥ कहे तुका रामरस जो पावे[21] । बहुरि फेरा वो कबहु न खावे ॥ ३ ॥

११७१. बारबार[22] काहे मरत अभागी । बहुरि मरन संक्या* तोरे भोगी[23] ॥ ध्रु ॥ ये हि तन करते क्या ना होय । भजन भगति करे वैकुंठे जाय ॥ १ ॥ रामनाम मोल नहिं बेचे कवरि । वो हि सब माया छुरावत झगरी[24] ॥ २ ॥ कहे तुका मनसुं[25] मिल राखो । रामरस जिव्हा नित्य[26] चाखो ॥ ३ ॥

---

१ दे. चेलण्हार त. चेलाण्हारा. पं. चलणार.–२ दे. पं. वासार –३ पं. रामनाम.–४ पं. कह –५ पं. कर –६ पं. तालुम नहि परे। नन्हे बरे गगे हिसारे ॥.–७ पं. पाछे चलनार तु हि.–८ पं. सोपत.–९ पं. तों मन मेरा.–१० पं. सुटा.–११ दे. समज्यात.–१२ पं. जोडत हि.–१३ पं. देखो आखो० घर वारा.–१४ पं. पसारा राख–१५ नदसारा १६ पं. चलावे खरा.–१७ पं. सो सन्यास छोडे तनकी ही आस.–१८ पं. साकरपारे.–१९ पं. अनंत तारे.–२० पं. खाट मीठापर चलावे.–२१ पं. पीवे –२२ दे. बारवार.–२३ पं. मरनमे क्या तोरे भोगी.–२४ पं. छुरावन सगरी.–२५ पं. रामनसुं.–२६ पं. नित * "स्वेत": * "संका;" असावें

११७२. हम उदास तीन्हके सुनाहो लोकां। रावणमार बिभीषण दिई लंका ॥ ध्रु० ॥ गोबरधन नखपर गोकुल राखा। वर्सन लागा जब मेंहुं फत्तरका ॥ १ ॥ वैकुंठनायक काल कौंसासुरका। दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥ २ ॥ स्तंभ फोड पेट चिरीया कैश्यपका। प्रल्हाद के लियें कहे भाई तुकर्याका ॥ ३ ॥

॥ २२ ॥

## ॥ साख्या* ॥ ३० ॥

११७३. तुका बस्तर बिचारा क्यों करे रे। अंतर भगवान होय। भीतर मैला कैंव मिटे† रे। मरे उपर धोय ॥ १ ॥

११७४. रामराम कहे रे मन। औरसुं नहिं काज। बहुत उतारे पार। आघे राख तुकाकी लाज ॥ १ ॥

११७५. लोभीकें चित धन बैठे। कामीन चित काम। माताके चित पुत बैठें। तुकाके मन राम ॥ १ ॥

११७६. तुका पंखिबहिरन मानुं। बोई जनावर बाग। असंतनकुं संत न मानूं। जे वर्सकुं दाग ॥ १ ॥

११७७ तुका राम बहुत मिठा रे। भर राखूं शरीर। तनकी करूं नावरि। उतारूं पैल तीर ॥ १ ॥

११७८. संतनें पन्हयां लें खडा। राहूं ठाकुरद्वार। चलत पाछेंहुं फिरों। रज उडत लेऊं सीर ॥ १ ॥

११७९. तुकाप्रभु बडो न मनूं न मानूं बडो। जिसपास बहु दाम। बलिहारि उस मुखकी। जिसेंती निकसे राम ॥ १ ॥

११८०. राम कहे सो मुख भलारे। खाये खीर खांड। हरिबिन मुखमो धूल परी रे। क्या जनि उस रांड ॥ १ ॥

११८१. राम कहे सो मुख भला रे। बिन रामसें बीख। आव न जानूं रमते बेरों। जब काल लगावे सीख ॥ १ ॥

---

१ पं. तीन्हको सुनाउं स. हामदास तीन्हके सुनाहो—२ पं. लगा जब महु.—३ दे. कसेपका. पं. कशपका—४ तुस्याका—५ पं. क्या करे।—६ पं. कहे मन—७ पं. तुकाके राम—८ पं. असतकु.—९ पं. नावरी.—१० पं. त. सत—११ त. तुका प्रभु वडो न मानु। पं. ० नमानो—१२ दे. जीमेंती

* पं. "दोहोरे" हें सदर आहे. † 'भेटे;' असावें

११८२. कहे तुका मैं[1] सवदा बेचूं । लेवेके तन हार । मिठा साधुसंतजन रे । मुरुखके सिरें[2] मार ॥ १ ॥

११८३. तुका दास तिनका रे । रामभजन निरास । क्या बिचारे पंडित करो रे । हांत[3] पसारे आस ॥ १ ॥

११८४. तुका प्रीत रामसुं । तैसी मिठी राख । पतंग जाय दीर्पे परे रे । करे तनकी खाक ॥ १ ॥

११८५. कहे तुका जग भुला रे । कह्या न मानत कोय । हात परें जब कालके । मारत फोरत डोय ॥ १ ॥

११८६. तुका सुरा नहि सवदका रे । जब कमाइ न होये । चोट सांहे घनकि रे । हिरा नीवरे तोये ॥ १ ॥

११८७. तुका सुरां वहुत कहावे । लडत विरला कोये । एक पावे उंच पदवी । एक खौंसां जोये ॥ १ ॥

११८८. तुका मान्या पेटका । और न जाने कोये । जपता कछु रामनाम । हरिभगतनकी सोये ॥ १ ॥

११८९. काफर सोही आपण वुझे । आला दुनियां भर । कहे तुका तुम्हें सुनो रे भाई । हिरिदां जिन्होका कठोर ॥ १ ॥

११९०. भीस्त* न पावे मालथी । पढीया लोक रिझाये । निचा जयें कंमेंतरिण । सो ही सो फल खाये ॥ १ ॥

११९१. फल पाया तो खुंस[11] भया । किन्होसुं[12] न करे वाद । वान न देखे मिरगौं[13] रे । चित मिलाया नाद ॥ १ ॥

११९२. तुका दास रामका । मनमे एक हि भाव । तो न पालटू आव । ये हि तन जाव ॥ १ ॥

११९३. तुका रामसुं चित बांध राखूं । तैसा औंपनी हात । धेनु वछरा छोर जावे । प्रेम न छुटे सात ॥ १ ॥

११९४. चितसुं चित जब मिले । तब तनु थंडा होये । तुका मिलेंनां[15] जिन्होसुं । ऐसा विरला कोये ॥ १ ॥

१ दे. पं. में—२ पं. सीस—३ पं. जव पसारे हात ।—४ त. दीपपर.—५ त. पडे—६ पं. ० साहे जवघन.—७ पं. सुर वहुत.—८ पं. भार.—९ पं. हिरदा जिन्हका०. हिरदा जिण्हेका०.—१० पं. कमतारीण—११ पं. सुख—१२ पं. किन्हे सुनकरवे—१३ पं. मिरगी ।—१४ पं. आनि.—१५ पं. मिलन. *"भेस्त" अमावें

११९५. चित मिले तो सब मिले । नहिं तो फुकट संग । पानी पथेर येक ही ठोर । कोरनभिगे अंग ॥ १ ॥

११९६. तुका संगत तीन्हसें कहिये । जिनथें सुख दुनाये । दुर्जन तेरा मूं काला । थीतो प्रेम घटाये ॥ १ ॥

११९७. तुका मिलना तो भला । मनसुं मन मिल जाय । उपर उपर माटि घसनी । उनांकि कोन बराई ॥ १ ॥

११९८. तुका कुटुंब छोरे रे । लरके जोरों सिर मुंदाय । जबथे इच्छा नहि मुई । तब तूं किया काय ॥ १ ॥

११९९. तुका इच्छा मीटइ तो । काहा करे जट खाक । मथीया गोला डारदिया तो । नाहिं मिले फेरन ताक ॥ १ ॥

१२००. ब्रीद मेरे साईयांके । तुका चलावे पास । सुरा सो हि लरे हमसें । छोरे तनकी आस ॥ १ ॥

१२०१. कहे तुका भला भया । हुं* हुवा संतनका दास । क्या जानूं केते मरता । जो* न मिटती मनकी आस ॥ १ ॥

१२०२. तुका और मिठाइ क्या करूं रे । पाले बिकारपिंड । राम कहावे सो भली रुखी । मांखन खांडखीर ॥ १ ॥

॥ ३० ॥

१२०३. ह्मणसी नाहीं रे संचित । न करीं न करीं ऐसी मात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाहो घेईं हरिनामाचा । जन्म जाऊं नेदीं साचा ॥ छ्रु ॥ गळां पडेल यमफांसीं । मग कैंचा हरि ह्मणसी ॥ २ ॥ पुरलासाटीं देहाडा । ऐसें न ह्मणें न ह्मणें मूढा ॥ ३ ॥ नरदेह दुबळा । ऐसें न ह्मणें रे चांडाळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे सांगों किती । सेकी[7] तोंडीं पडेल माती ॥ ५ ॥

१२०४. संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ १ ॥ बहु धड जरी जाली ह्मैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥ तुका ह्मणे [9]अंगें व्हावें तें आपण । तरी च महिमान येईल कळों ॥ ३ ॥

---

१ दे. त. पाथर. पं. पानी पथर येक ठोर ।. कोरन भिजे —२ पं. सुख —३ पं. जोरे.— ४ त. साईका —५ पं. माखना त. माखन खीर खाड.—६ दे. गळा पडेल यमफासा —७ पं. शेखी — ८ त. पडे.—९ पं. आंग. * पं. "हुं" व "जो न" हे शब्द नाहींत

१२०५. नाहीं संतपण मिळतें हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥ १ ॥ नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥ १ ॥ तुका ह्मणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ ३ ॥

१२०६. नामाची आवडी तो चि जाणा देव । न धरीं संदेह कांहीं मनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता संतांचिया ॥ छ्र ॥ नाम ह्मणे तया आणीक साधन । ऐसें हें वचन बोलों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख पावे या वचनीं । ज्यांचीं शुद्ध दोन्ही मायबापें ॥ ३ ॥

१२०७. सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधविला गळा आपुले हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं बहु गुंतलों आतां । नये सरतां मागें पुढें ॥ छ्र ॥ होतें गांठी तें सरलें येतां । आणीक माथां ऋण जालें ॥ २ ॥ सोंकरिलियाविण गमाविलें पिक । रांडापोरें भिके लावियेलीं ॥ ३ ॥ बहुतांचीं बहु घेतलीं घरें । न पडे पुरें कांहीं केल्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं न धरावी आस । जावें हें सर्वस्व टाकोनियां ॥ ५ ॥

१२०८. न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥ आड आला ह्मूनं फोडियेला डोळा । बळिनें आंधळा शुक्र केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करी देव तरी काय नव्हे एक । कां तुह्मी पृथक सिणा वांयां ॥ छ्र ॥ [11]उल्लंघुनियां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या ॥ अवघे चि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥ २ ॥ पितियेंसी[12] पुत्रें केला वैराकार । प्रल्हादें असुर मारविला ॥ बहुत विघ्नें केलीं तया [13]आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥ ३ ॥ गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती ॥ [14]तैंथांसी दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्वाही तो[15] चि जाला ॥ ४ ॥ देव जोडे ते[16] करावे अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ॥ तुका ह्मणे हा जाणतो कळवळा । ह्मणोनि अजामेळा उद्धरिलें ॥ ५ ॥

१२०९. अरे गिळिलें हो संसारें । कांहीं तरि राखा खरें । दिला करुणाकरें । मनुष्यदेह [17]सत्संग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड । उठाउठीं गोडें[18] । बीजें बीज वाढवा ॥ छ्र ॥ केलें तें क्रियमाण ।

---

१ त. पं. मीळत –२ पं. धरा –३ दे. आनुनि. पं. जाणोनी समता सताचिया.–४ पं. उरले – ५ पं. ज्याचे शुद्ध दोनी मायेबाप –६ पं. आतां –७ पं. दे. त. रीण.–८ पं. सोकरविल्याविणे – ९ पं. ह्मणोनी –१० दे. त. ते.–११ दे. त. उल्घुनि –१२ पं. पितयाम्पी.–१३ पं. आड आड.– १४ दे. तयां दिले ते कोणासी नाहीं ।. त. तया दिले तैसें कवणासी नाहीं.–१५ पं. हरी जाला – १६ पं. तरी करावा अधर्म –१७ पं. सतसग –१८ पं. कोड.

जालें तें संचित ह्मण । [1]प्रारब्ध जाण । उरवरित उरलें तें ॥ २ ॥ चित्त खोटें चालीवरि । रोग भोगाचे अंतरीं । रसने अनावरी । तुका ह्मणे [2]ढुंगे वाहे ॥ ३ ॥

१२१०. अग्न तापलिया काया चि होमे । तापत्रयें संतप्त होती । संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसारास्थिति । राहाटघटिका जैसी फिरतां चि राहिली । भरली [3]जाती एके रितीं । [4]साधीं हा प्रपंच पंचाग्न अग्न । तेणें पावसील निजशांती रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायणनाम नारायणनाम । नित्य करीं काम जिव्हासुखें । जन्मजराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळ ही दुःखें[5] ॥ ध्रु ॥ शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसनसमाधी साधीं । तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी । भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । [6]जन्मजरादुःखव्याधि । साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश [7]साधीं ॥ २ ॥ घोकितां अक्षर [8]अभिमानविधि । निषेध लागला पाठी । वाद करितां निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भविष्यति । दूषणाचें मूळ भूषण तुका ह्मणे । सांडीं मिथ्या खंती । रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती ॥ ३ ॥

१२११. नव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां । तैसें [9]नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि गोड सर्वभावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें । अर्थचाड जीवें । न लगे घ्यावें संसारा ॥ ध्रु ॥ कर्म तंव न पुरे संसारिक । धर्म तंवें[10] फळदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥ २ ॥ न लगे सांडणें मांडणें । आगमनिगमाचें देखणें । अवघें तुका [11]ह्मणे । विठ्ठलनामें आटलें ॥ ३ ॥

१२१२. नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देहाचा निग्रही त्याचें तो सांभाळी । मग नये कळि अंगावरी ॥ ध्रु ॥ आपलिया इच्छा माता सेवा करी । न बाधी ते थोरी येणें क्षोभें ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडा देखीचे दिमाख । मोडसीचें दुःख गांड फाडी ॥ ३ ॥

१२१३. [12]सत्यें सत्यें देतें फळ । नाहीं लागत चि वळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥ ध्रु ॥ करावी च चिंता । नाहीं [13]लागत तत्वता ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ३ ॥

---

१ पं. प्रारब्ध तें जाण । उरउरीत उले ते.–२ पं. डुट्टग –३ पं. जाली होती रिती –४ पं. एकें रिती सार्वी०.–५ पं. दुखें रे.–६ पं. जन्म मरण जरा० –७ पं. साधीं रे –८ पं. अभिमान । – ९ दे. नाम पढरीराया –१० पं. तगी –११ पं. ह्मणे येणें –१२ त. सत्ये सत्य पं सत्य सत्य – १३ दे. त. लागती

१२१४. साधक जाले कळी । गुरुगुडीची[1] लांब नळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पचीं पेंडे मद्यपान । भांगभुर्का हें साधन ॥ ध्रु ॥ अभेदाचें[3] पाठांतर । अति विषयीं पडिभर ॥ २ ॥ चेल्यांचा सुकाळ । पिंड दंड भंगेपाळ[4] ॥ ३ ॥ सेवा मानधन । वरे इच्छेनें संपन्न ॥ ४ ॥ सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां[5] सोडी ॥ ५ ॥

१२१५. मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणाचा कोणासीं न धरे[6] संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥ ध्रु ॥ कोंढा[7] जी आपुलें मोह बुंथी जाळें । नका लावूं बळें[8] वेड आह्मां ॥ २ ॥ जीव शिव कांहीं[9] ठेवियेलीं नांवें । सत्य तुह्मां ठावें असोनियां ॥ ३ ॥ सेवेच्या अभिलाषें[10] न धरा चि विचार । आह्मां दारोदार हिंडविलें ॥ ४ ॥ आहे तैसें आतां कळलियावरी । परतें सांडा दुरी दुजेपण ॥ ५ ॥ तुका ह्मणे काय छायेचा अभिलाष । हंस पावे नाश तारागणीं[11] ॥ ६ ॥

१२१६. पंचभूतांचा गोंधळ । केलों[12] एकेठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें ओझें । देहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥ ध्रु ॥ जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोगी[13] शुभा अशुभा ॥ २ ॥ इच्छा वाढवी ते वेल । खुंटावा तो खरा बोल । तुका ह्मणे मोल । झांकलें[14] तें पावेल ॥ ३ ॥

१२१७ पुसावेंसें हें चि वाटे । जें जें भेटे तयासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव कृपा करील मज । काय लाज राखील ॥ ध्रु ॥ अवघियांचा विसर जाला । हा राहिला उद्योगें[15] ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसें[16] ॥ ३ ॥

१२१८. जाला तुह्मी माझें जाणतें मीपण । येणें माझा खुण मांडियेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खादलें[17] पचे तरि च तें हित । ओकलिया थीत पिंड पीडी ॥ ध्रु ॥ तरि भलें भोगे जोडिलें तें धन । पडिलिया खोनें[18] जीवनासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तारीं गा विठ्ठला । नेणतां चि भला दास तुझा ॥ ३ ॥

---

१ पं. गुडगुडीची.–२ पं. पडिलें –३ दे. अभेदाचा.–४ पं. भगपाळ.–५ पं. वोडोनियां.–६ पं. न धरवे.–७ दे. काढा काढा जी० जाळ. पं. जाळ –८ पं वेड बळें.–९ दे. कां ठेवियेलीं –१० दे. त. अभिळामें.–११ त. पं. तारांगणीं.–१२ पं. एके ठायीं केला मेळ ।.–१३ पं. भोग शुभा अशुभाच्या ।–१४ पं. झाकेल तो पावेल ।.–१५ त. उद्येग. दे. उद्वेग.–१६ पं. मागेसा –१७ पं. खादल्या खादलें हें पचे –१८ त. खान. पं. खाण.

१२१९. याती मतिहीन रूपें लीन दीन । आणीक अवगुण जाणोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥ छ ॥ जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचित कळों चित्ता ॥ २ ॥ जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे यांसी नांवाचा अभिमान । ह्मणोनि शरण तारी बळें ॥ ४ ॥

१२२०. बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझ्या पायीं मज जालासे विश्वास । ह्मणोनियां आस मोकलिली ॥ छ ॥ ऋषि मुनि सिद्ध साधक अपार । कळेला विचार त्यांसी तुझा ॥ २ ॥ नाहीं नाँस तें सुख दिलें तयांस । जाले जे उदास सर्वभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख न माये मानसीं । धरिले जीवेंसी पाय तुझे ॥ ४ ॥

१२२१. मायामोहँजाळीं होतों सांपडेला । परि या विठ्ठला कृपा आली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काढूनि बाहेरि ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखविलें ॥ छ ॥ नाचे उडे माया करी कवतुक । नाँशवंत सुखें साच केलीं ॥ २ ॥ रडे फुंदे दुःखें कुटितील माथा । एकासी रडतां तें ही मरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज वाटतें नवल । मी माँझें हे बोल ऐकोनियां ॥ ४ ॥

१२२२. देहभाव आह्मी राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तो चि पुढें देव करीतसे ॥ छ ॥ ह्मणउनी नाहीं सुख दुःख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ॥ २ ॥ जालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों जयाचे अंकित । तो चि माझें हित सर्व जाणे ॥ ४ ॥

१२२३. आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरी तें जतन होय देंठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामें चि सिद्धि नामें चि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥ छ ॥ चालिला पंथ तो पांववील ठाया । जरि आड तया नये कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हांनि लाभ ॥ ३ ॥

---

१ पं. यास नामाचा –२ पं. कळ्ला हा विचार०.–३ पं. नाश –४ दे. त. माया मोहो०.– ५ दे. सांपडलों.–६ दे. त. पं. नासिवत.–७ दे. मी माझे बोल० पं. मी हे माझे बोल०.–८ पं. देटीं –९ दे. पावईल –१० दे. त. पं. हाणी.

१२२४. निरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ छ ॥ देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे देव अंतरे ज्यामुळें[2] । आशामोह[3]जाळें दुःख वाढे[4] ॥ ३ ॥

१२२५. तुजशीं संबंध[5] चि खोटा । परता परता रे थोटा[6] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवा तुझें काय घ्यावें । आप आपणां ठकावें[7] ॥ छ ॥ जेथें मुदल न ये हातां । व्याज मरावें लेखितां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ३ ॥

१२२६. या चि हाका तुझे द्वारीं । सदा देखों ऋणकरी[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सदा करिती[9] खंड दंड । देवा बहु[10] गा तूं लंड ॥ छ ॥ सुखें गोविसी भोजना । लपवूनियां आपणां ॥ २ ॥ [11]एकें एक बुझाविसी । तुका ह्मणे ठक होसी ॥ ३ ॥

१२२७. आह्मी जाणों तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फांकूं नेदूं चुकावितां । नेघों थोडें बहु देतां ॥ छ ॥ बहुता दिसाचें लिगाड । आलें होत होत जड ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । नेघों[12] सर्वस्व ही देतां ॥ ३ ॥

१२२८. ऋणें[13] वैर हत्या । हें तों न सुटे नेदितां[14] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें कां नेणां पांडुरंगा । तुह्मी सांगतसां जगा ॥ छ ॥ माझा संबंध तो किती । चुकवा लोकाची फजिती ॥ २ ॥ तुका ह्मणे या चि साटीं । मजें[15] न घेतां नये तुटी ॥ ३ ॥

१२२९. नाहीं मागितला । तुह्मां मान म्यां विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जे हे करविली फजिती । माझी एवढी जना हातीं ॥ छ ॥ नाहीं केला पोटें[16] । पुढें घालूनि बोभाट ॥ २ ॥ तुका ह्मणे धरूनि हात । नाहीं नेलें[17] दिवाणांत ॥ ३ ॥

१२३०. तूं पांढरा स्पटिक मणी । करिसी आणिकां त्याहुनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तुझ्या दारा । न येत ठकती दातारा ॥ छ ॥ तुझी ठावी नांदणूक[18] । अवघा बुडविला लोकें[19] ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें घेसी । त्यास हें चि दाखविसी ॥ ३ ॥

---

१ त. न साहे उबग०.—२ पं. यामुळें.—३ दे. त. मोहो जाळे० —४ पं. वाटे.—५ पं. संबध तो खोटा —६ पं. रे तू खोटा.—७ पं. टकावे.—८ दे. रिणकरी. त. पं. रीणकरी.—९ दे. करिगी.—१० पं. बहुत —११ पं. एक एक —१२ दे. त. नेघें.—१३ दे. रिण पं. त. रीण० —१४ "न देतां" याच्या बद्दल "नेदितां."—१५ पं. मज घेतां नये तुटी —१६ पं. पोटें —१७ पं. नाहीं केली दिवानात. दे. नाहीं नेलें दिवानांत.—१८ दे. नांदनूक.—१९ पं लौकिक

१२३१. बोलतों निकुरें । नेव्हेत[1] सलगीचीं उत्तरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें संतापलें मन । परपीडा ऐकोन ॥ छ ॥ अंगावरि आलें । तोंवरि[2] जाईल सोसिलें ॥ २ ॥ तुज भक्तांची आण देवा । जेरि तुका येथें ठेवा ॥ ३ ॥

१२३२. बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणिकां उपायां कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥ छ ॥ गीतें[3] गावों नाचों छंदें वावों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें एके रोमावळी । आह्मी केला भोळीं भावें उभा ॥ ३ ॥ लेंटिका[4] हा केला संवसारसिंधु[5] । मोक्ष खरा बंधु नाहीं पुढें ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्याच्या नामाचे अंकित । राहिलों निश्चिंत[6] त्याच्या बळें ॥ ५ ॥

१२३३. न लगे मायेसी बाळें[7] निरवावें । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥ छ ॥ गोड धड त्यासी ठेवी न मागतां[8] । समाधान खातां नेदी मना ॥ २ ॥ खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां रतनीं लावी बळें ॥ ३ ॥ त्याच्या दुःखेंपणें[9] आपण खापरीं । लाही तळीं दरी होय जैसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥ ५ ॥

१२३४. ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयासी नावडे [10]हरिनामकीर्तन । आणीक नृत्य[11] न वैष्णवांचें ॥ छ ॥ सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हारें[12] अंत्यजाचीं[13] ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें मानी आनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठी[14] होय ॥ ३ ॥

१२३५. ब्राह्मण तो याती अंत्यजें[15] असतां । मानावा तत्वता निश्चयेसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रामकृष्णनामें[16] उच्चारी सरळें[17] । आठवी सांवळें रूप मनीं ॥ छ ॥ शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे गेल्या षड्ऊर्मी[18] अंगें । सांडुनियां मग ब्रह्म[19] चि तो ॥ ३ ॥

---

१ पं. नव्हती.—२ पं. तरी—३ पं. गीतीं गावों नाम । छंदें वाहों टाळी । त. वाहों०.—४ दे. लडिका.—५ पं. ससार—६ पं. निश्चित.—७ पं. बाळ—८ दे. मगतां.—९ पं. दु खें पडे. (दु खी पणें ?).—१० पं. नाम सकीर्तन ।.—११ "नर्त्तन" असावें.—१२ पं. व्यवहार —१३ दे. अंतेजाचा.—१४ दे. त. पं. कुष्ट—१५ दे. अंतेज—१६ दे. रामकृष्णें नाम उच्चारी सरळे । त. रामकृष्ण नाम० —१७ पं. सरळ—१८ दे. त. पं. शडऊर्मी—१९ पं. ब्राह्मण तो

१२३६. एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ छ ॥ परस्त्री मद्यपान । पेंडखोन[1] माजविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥ ३ ॥

१२३७ एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्यांचे घरीं[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाप न लगे धुंडावें । लागेल तेणें[3] तेथें जावें ॥ छ ॥ कांहीं दुसरा विचार । न लगे करावा चि फार ॥ २ ॥ असत्य जे वाणी[4] । तेथें पापाची च खाणी ॥ ३ ॥ सत्य बोले मुखें । तेथें उचंबळती सुखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे दोन्ही । जवळी च लाभहानी ॥ ५ ॥

१२३८. जळतें[5] संचित । ऐसी आहे धर्म नीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥ छ ॥ नेदी कर्म घडों । कोठें आडराणें[6] पडों ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । राहों नेदी ताप जाळ ॥ ३ ॥

१२३९. संतापाशीं बहु असावें मर्यादा । फळकटाचा[7] धंदा उर फोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बासर तो भुंके गाढवाचेपरी । उडे पाठीवरि दंडे[8] तेणें ॥ छ ॥ समय नेणें तें वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वांयां चाळवणी । पिटपिटवाणी हागवणेची ॥ ३ ॥

१२४०. घेसी तरी घेईं संतांची[9] हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ छ ॥ करिसील तो करीं संतांचा सांगत । आणीक ते मात नको मना ॥ २ ॥ बैससी[10] तरी बैस संतां च मधीं । आणीक ते बुद्धि नको मना ॥ ३ ॥ जासी तरि जाईं संतांचिया गांवां । होईल विसावा तेथें मना ॥ ४ ॥ तुका ह्मणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ५ ॥

१२४१. संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाही तळमळ दुःखलेश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें मी राहीन[11] होऊनि याचक । घालितील भीक ते चि मज ॥ छ ॥ संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विट्ठल धन वित्त ॥ २ ॥ संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ३ ॥ संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुख साटीं घेती देती ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेथें आणिक नाहीं परी । ह्मणोनि भिकारी जालों त्यांचा ॥ ५ ॥

---

१ पं. पेडखाण.–२ त. तया घरीं–३ त. त्याणें –४ पं. असत्याची वाणी.–५ दे. जळातें. पं. जळे तें–६ पं. आडराणीं.–७ पं. फल्कटेचा–८ पं. यमदंड.–९ दे. संताची भेटी.–१० पं. बैससील तर । बैस संतांमधीं ।.–११ त. पं. राहेन.

१२४२. संतांचें सुख जालें या देवा । ह्मणऊनि सेवा करी त्यांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥ छ्र ॥ निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥ २ ॥ तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळें आपणांसी ॥ ३ ॥ अष्टमा सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोण्ही तया ॥ ४ ॥ तुका ह्मणे ते बळिया शिरोमणी । राहिलों चरणीं निकटवासें ॥ ५ ॥

१२४३. जो मानी तो देईल काई । न मनी तो नेईल काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां विठ्ठल सर्वभूतीं । रैहो चित्तीं भलतैसा ॥ छ्र ॥ आँधीन तें जना काई । जल्पें वांयांविण ठायीं ॥ २ ॥ वंदी निंदी तुज तो गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ३ ॥

१२४४. भावबळें कैसा जालासी लाहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥ छ्र ॥ पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आँलिंगूनि मिठी देइन पांयीं ॥ २ ॥ चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे उँत्कंठित वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥ ४ ॥

१२४५. कृपाळु ह्मणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक उपाय [6]नेणें चि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें[7] ॥ छ्र ॥ नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ २ ॥ कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥ ४ ॥

१२४६. सर्वभावें आलों तुज चि शरण । कार्यावाचामनेंसहित देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक दुसरें नये माझ्या मना । राहिली वासना तुझ्या पायीं ॥ छ्र ॥ माझिये वारचें कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण एक ॥ २ ॥ तुझे आह्मी दास आमुचा तूं ऋणी । चालत दूरूनी आलें मागें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां घेतलें धरणें । हिशोबाकारणें भेटी देई ॥ ४ ॥

१२४७. कई मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संतां मुखीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला पांडूरंगें तुझा अंगीकार । मग होइल धीर माझ्या जीवा ॥ छ्र ॥ ह्मणऊनि मुख अवलोकितों पाय । हे चि मज आहे थोरी आशा ॥ २ ॥ माझिया

१ त. सतांचें या सुख जालें तें या देवा । –२ पं. हो चित्तीं०.–३ दे. त. आध्येन –४ दे. त. आळंगुनि.–५ पं. उत्कठित हे वासना.–६ दे. नेणे मी कांहीं त. नेणें मी हे कांहीं –७ पं. ऐसें –८ त. कायावाचामन सहित –९ त. आलों.–१० पं. माझा.

मनाचा हा चि[1] विश्वास । न करीं सायास साधनांचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज होईल भरवसा । तरलों मी ऐसा साच भाव[2] ॥ ४ ॥

१२४८. दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कष्टलासी साटीं । भैक्तिकाजें[3] विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा । आह्मालागीं सोपा । दैत्या काळ कृतांत ॥ छ्र ॥ होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं । ह्मणोनियां[4] घरीं । गौळियांचे अवतार ॥ २ ॥ केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा । तुका ह्मणे भावा । साटीं हातीं सांपडसी ॥ ३ ॥

१२४९. गोड जालें पोट धालें । अवचित[5] वाचे आलें । ह्मणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । पातकी[6] चांडाळ । नामासाटीं आपुलिया ॥ छ्र ॥ चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा । ह्मणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ २ ॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका ह्मणे दावी । रूप तें चि अरूपा[7] ॥ ३ ॥

१२५०. आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिनें कामा[8] घातला चिरा । वित्तवरा मुकाविलें ॥ छ्र ॥ हरिनें जीवें केली साटी । पांडिली[9] तुटी सकळांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे वेगळा नव्हे । हरि भोवे[10] भोंवताला ॥ ३ ॥

१२५१. हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥ छ्र ॥ पारखियांसी सांगतां गोष्टी[11] । घरची कुटी[12] खातील ॥ २ ॥ तुका ह्मणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं धणीवरि[13] ॥ ३ ॥

## ॥ भुपाळ्या ॥ अभंग ॥ ८ ॥

१२५२. बोलोनि दाऊं कां तुह्मी नेणा जी देवा । ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय । ह्मणऊनि पाय जीवीं धरूनि राहिलों ॥ छ्र ॥ त्यागें भोगें दुःख काय सांडावें मांडावें । ऐसीं धरियेली जीवें माझ्या थोरी आशंका ॥ २ ॥ तुका ह्मणे माते बाळा चुकलिया वनीं । न पवतां[14] जननी दुःख पावे विठ्ठले ॥ ३ ॥

१ पं. हा चि पै विश्वास.–२ त. पं. साच भावें–३ पं. तू जगजेटी भक्तिकाजा.–४ पं. ह्मणोनिया हरी । गौळ्या घरीं अवतार ॥.–५ पं. अवचिता.–६ पं. महा पातकी०.–७ पं. अरूप.–८ पं. काम.–९ पं. पडिली.–१० पं. हरि ह्या भोवे.–११ दे. न. गोटी.–१२ पं. कुट.–१३ पं. परतूनि –१४ त. पावता.

१२५३. ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ । कीं[1] हे कळवळ तुज उमटे चि ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवो[2] पांडुरंगे पंढरीचे निवासे । लावूनियां आस[3] चाळवूनी ठेविलें ॥ छ्रु ॥ काय जन्मा येवूनियां केली[4] म्यां जोडी । ऐसें घडीघडी चित्ता येतें आठवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे खरा न पवे चि विभाग । धिकारितें जग हें चि लाहों हिशोबें ॥ ३ ॥

१२५४. कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन । काय तुझी हीन शक्ति जालीसी[5] दिसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाज येते मना तुझा ह्मणवितां दास । गोडी नाहीं रस ओलिली यासारिखी ॥ छ्रु ॥ लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें । कळों येतें खरें दुजें एकावरूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी कोणें वदविली वाणी । प्रसादावांचूनि तुमचिया विठ्ठला ॥ ३ ॥

१२५५. जळो माझें कर्म वांयां केली कटकट । जालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना । ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥ छ्रु ॥ गुणवंत केलों दोष जाणायासाटीं । माझें माझें पोटीं बळकट दूषण ॥ २ ॥ तुका ह्मणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा ळा पाळियेला शेवटीं ॥ ३ ॥

१२५६. कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटों पाहे हृदय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां जी[6] सासुरवासी मज केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते[7] नाहीं ॥ छ्रु ॥ प्रभातेसि वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥ २ ॥ येथें अवघे वांयां गेले दिसती सायास । तुका ह्मणे नास दिसे जाल्या वेचाचा ॥ ३ ॥

१२५७. जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी[8] तुमचे पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां मज सोहं येथें करावें देवा । तुझी घेईं सेवा सकळ गोवा उगवूनि ॥ छ्रु ॥ भोगें रोगा जोडोनियां दिलें आणीकां । अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे असो तुझें तुझे[9] मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें[10] ॥ ३ ॥

१२५८. न संगतां तुह्मां कळों येतें अंतर । विश्वीं[11] विश्वंभर परिहारें[12] चि न लगे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान ते घडी

१ पं. कांहो कळवळा तुह्मां उमटे चि ना.—२ पं. आहो —३ पं. असे.—४ पं. म्यां केली जोडी.—५ पं. जालीसे ।—६ पं. का गा —७ दे. तें.—८ त. पं. माझे —९ दे. त. माहें —१० दे. पं. वर्तनें.—११ दे. विश्वे विश्वीं भर.—१२ पं. परीहर.

पुरें[1] देत नाहीं ॥ ध्रु ॥ काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं । पोटा आलों तईंपासूनिया समर्थ ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणा दुसरियापासूनि ॥ ३ ॥

१२५९. तुजसवें आह्मीं अनुसरलों अबळा । नको अंगीं कळा राहों हरी हीनें[2] देऊं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सासुरवासा भीतों[3] जीव ओढे तुजपाशीं । आतां दोहींविशीं लज्जा राखें आह्मुची ॥ ध्रु ॥ न कळतां संग जाला सहज खेळतां । प्रवर्तली चिंता मागिलांचियावरि ॥ २ ॥ तुका ह्मणे असतां जैसें तैसें बरवें । वचन या भावें वेचुनियां विनटलों ॥ ३ ॥

॥ ८ ॥

१२६०. रवि दीप हीरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें[4] संतांचे[5] नी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥ ध्रु ॥ तापली[6] चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥ २ ॥ मायबापें पिंड पाळियेला[7] माया । जन्ममरण जाया संतसंग ॥ ३ ॥ संतांचें वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥ ४ ॥ तुका ह्मणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥ ५ ॥

१२६१. हरि हरि तुह्मीं ह्मणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणिका नका कांहीं गबाळाचे भरी । पडों[8] येथें थोरी नागवण ॥ ध्रु ॥ भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । ह्मणावा पतित वेळोवेळां ॥ २ ॥ तुका ह्मणे हा[9] तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील ॥ ३ ॥

१२६२. ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥ ध्रु ॥ त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या[10] ॥ ३ ॥

१२६३. गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नैठेळाची[11] भक्ति कुचराचें बळ । कोरडें वोंगळ मार खाय ॥ ध्रु ॥ सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा दावी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धंदधंदे[12] सिंदळीचे ॥ ३ ॥

---

१ पं. "पुरों देत" याबद्दल "पुरों एकी देत".–२ त. हीण.–३ पं. मासुरवासी भीतें –४ दे. त. दर्पणें.–५ पं. संतांचिया –६ पं. तापलिया.–७ दे. पं. पाळीला –८ पं. पडों तेथें.–९ पं. "हा तंव" यांच्या बद्दल "आहे".–१० दे. अयुशा. त. आविष्या.–११ पं. नाटेळाची.–१२ पं. धिंदधिंद.

१२६४. कैसें[1] असोनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणां[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जागें[3] रे भाई जागें रे । चोर निजल्या नाडूनि भागे रे ॥ ध्रु. ॥ आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥ २ ॥ तुका ह्मणे एकांच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भयें ॥ ३ ॥

१२६५. मुदल जतन जालें । मग लाभाचें काय आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घरीं देउनि अंतर गांठी । राखों पारिख्यां न सुटे मिठी ॥ ध्रु. ॥ घाला पडे थोडें च वाटे । काम मैंदाचें च पेटे ॥ २ ॥ तुका ह्मणे वरदळ खोटें । फांसे अंतरिंच्या कपटें ॥ ३ ॥

१२६६. मज अंगाच्या अनुभवें । काई वाईट बैरें ठावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों दोहींचा देखणा । नये मागें पुढें ही मना ॥ ध्रु. ॥ वोस वैसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥ २ ॥ तुका ह्मणे घेऊं देवा । सर्वें करूनि बोळावा ॥ ३ ॥

१२६७. पाववावें ठाया । ऐसें सवें बोलों तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भावा ऐसी क्रिया राखे । खोट्या खोटेपणें वाखे ॥ ध्रु. ॥ न ठेवूं अंतर । कांहीं भेदाचा पदर ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें भावें । सत्या मानविजे देवें ॥ ३ ॥

१२६८. मोल देऊनियां सांटवावे दोष । नटाचे ते वेषें[11] पाहोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिदासां मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यें पुण्य विशेषता ॥ ध्रु. ॥ हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेशें । पाप त्यासारिसें मात्रागमन ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥ ३ ॥

१२६९. बहुक्षीदक्षीण[12] । आलों[13] सोसुनियां वन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठोवा विसांवया विसांवया । पडों देई पायां ॥ ध्रु. ॥ बहुतां काकुलती । आलों सोसिली फजिती ॥ २ ॥ केली तुजसाटीं । तुका ह्मणे येवढी आटी ॥ ३ ॥

१२७०. कांगा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभाउभीं पाय जोडीं । आतां फांकों नेदीं घडी ॥ ध्रु. ॥ नको सोडूं ठाव । आतां घेऊं नेदीं वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छा । तैसा करीन सरिसा ॥ ३ ॥

१२७१. तुमची तों भेटी नव्हे ऐसी जाली । कोरडी च बोली ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणांसवें ॥ ध्रु. ॥

---

१ पं. 'कैसें असोनि' हें ध्रुवपद असून 'आता जागा' हें पहिलें कडवें आहे –२ पं. पणा.–३ पं. जागा रे भाई जागा रे । ० भागा रे।.–४ पं. गाठीस.–५ दे. राख्या –६ त. वरवें.–७ पं. देहींचा.–८ पं. वोसींत.–९ पं. खोटेपण.–१० पं. सत्य.–११ दे. पं. वेश.–१२ त. बहुक्षेद.–(क्षोद ?)–क्षीण.–१३ पं. जालों

तुह्मां निमित्यासी सांपडलें अंग । ने[1]दावा हा संग विचारिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाची च होती ॥ ३ ॥

१२७२. आहे तें चि आह्मी मागों तुजपाशीं । ने[2]व्हों तुज ऐसीं क्रियानष्टें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ने[3] बोलावीं तों च वर्मे बरें दिसे । प्रकट ते कैसे गुण करूं ॥ ध्रु० ॥ एका ऐसें[4] एका घावयाचा[5] मोळा । कां तुह्मां गोपाळा नाहीं ऐसा ॥ २ ॥ तुका ह्मणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥ ३ ॥

१२७३. आह्मीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे तैसें[6] असो आतां । चिंतें[7] चिंता वाढते ॥ ध्रु० ॥ बोलिल्याचा मी[8]नी सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मांपाशीं । धीराऐसी जतन ॥ ३ ॥

१२७४. आह्मांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क[10]रूनि ठेलों जीवेंसाटीं । होय भेटी तोंवरि ॥ ध्रु० ॥ लागलों तों न फिरें पाठी । पडिल्या गांठी वांचूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे अवकाशें । तुमच्या ऐसें हो[11]वया ॥ ३ ॥

१२७५. बोलिलें चि बोलें पडे[12]पडताळूनि । उपजत मनीं नाहीं शंका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुतांची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ दुं[13]ख्खाविसी ॥ ध्रु० ॥ बहुतांच्या भावें[14] वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तों श्रम न वजे वांयां ॥ ३ ॥

॥ १२ ॥

१२७६. कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥ ध्रु० ॥ उद्वेग ते[15] वांयांविण । कैंचा सीण चिंतनें ॥ २ ॥ तुका ह्मणे गेला भ्रम । तुमच्या धर्में पायांच्या ॥ ३ ॥

१२७७. संसार तो कोण देखे । आह्मां सखे हरिजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥ ध्रु० ॥ स्वप्नीं ते ही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥ ३ ॥

१२७८. पडियेलों वनीं थोर चिंतवनी । उसीर कां आझूनि लावियेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां ॥ ध्रु० ॥ काय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥ ३ ॥

---

१ त. न द्यावा.—२ पं. नव्हे तुज ऐसीं क्रियानष्ट—३ त. न बोलावीं वर्मे तों चि बरें दिसे.—४ पं. ऐसा.—५ पं. द्यावा त्याचा.—६ पं. तैसें.—७ पं. चित्तें—८ पं. मनी.—९ पं. तें—१० पं. धरूनि.—११ त. व्हावया.—१२ पं. पडत पडताळूनि—१३ पं. दुःखविसी—१४ पं. नांवें—१५ पं. तो

१२७९. आपुले गांवींचें न देखेसें जालें । परदेसी एकलें किती कंठूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि पाहें मूळ येतां वाटे । जीवलग भेटे कोणी तरी ॥ छ ॥ पाहातां अवघ्या दिसतील दिशा । सकळ ही वोसा दृष्टीपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणी न संगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥ ३ ॥

१२८०. जन तरी देखें[1] गुंतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि मागें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ॥ छ ॥ इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडीतसे डोई अहंकार ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ॥ ३ ॥

१२८१. धांवे त्यासी फावे[2] । दुजे उगवूनि गोवे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावें भरूनियां घर । मग नाहीं येरझार ॥ छ ॥ धणी उभें केलें । पुंडलिकें या उगलें ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ ३ ॥

१२८२. लाहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐरावत[3] रत्न थोर । तैया[4] अंकुशाचा मार ॥ छ ॥ ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥ २ ॥ तुका ह्मणे जाण । व्हावें लाहनाहुनि लाहन ॥ ३ ॥

१२८३. नीचपणा[5] बरवें देवा । न चले कोणांचा[6] ही दावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ महा पुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहाती ॥ छ ॥ येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरि ॥ २ ॥ तुका ह्मणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ३ ॥

१२८४. उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ १ ॥ ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥ २ ॥ तुका ह्मणे एकें[7] नारायण ध्याईं । वरकडा वाहीं शोक असे ॥ ३ ॥

१२८५. आवडीच्या मतें करिती भजन । भोग नारायणें ह्मणती केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा देव ह्मणे वेगळें तें काय । अर्थासाटीं डोय फोडूं पाहे ॥ छ ॥ लाजे कमंडल[8] धरितां भोपळा । आणीक थीगळा प्रावरणा ॥ २ ॥ शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं । ऐश्वर्य[9] बोलती अवघें मुखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे यांसें[10] देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटि जन्म घेतां ॥ ४ ॥

१२८६. ह्मणेतां[11] हरिदास कां रे[12] नाहीं लाज । दीनास महाराज ह्मणसी हीना ॥ १ ॥ काय ऐसें पोट न भरे[13] तें गेलें । हालविसी कुले सभेमाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटें केली विटंबना । दीन जाला जना कींव भाकी ॥ ३ ॥

---

१ प. देखा गुतले प्रपच । स्मरण तों त्याचें० –२ पं. पावे.–३ पं. एरावती.–४ पं. त्यासी.–५ दे. निंचपण.–६ पं. कोणाचा ची –७ पं. एका नारायणा.–८ पं. कुमंडल.–९ पं. नैश्वर.–१० त. पं. तर्को.–११ पं. ह्मणवितां.–१२ पं. 'कां रे' याच्याबद्दल 'कांहीं' असें आहे.–१३ पं. भरेसें जालें.

१२८७. रिद्धिसिद्धी दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लोडें[1] वालिस्तें पलंग सुपति । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥ छ ॥ पुसाल तरि आह्मां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचें उणें पुरें ॥ ३ ॥

१२८८. घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निरें[2] कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ छ ॥ आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनि दिसतसे ॥ २ ॥ काम क्रोध लोभ सिणवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य[3] मोलें जाये वांयांविण ॥ ४ ॥

१२८९. अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघी च दान दिली भूमि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा चि कोळ[4] दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ छ ॥ अवघीं च तीर्थें व्रतें केले याग । अवघें चि सांग जालें कर्म ॥ २ ॥ अवघें चि फळ आलें आह्मां हातां । अवघें चि अनंता समर्पिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां बोलों[5] अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥ ४ ॥

१२९०. महुरा ऐसीं फळें नाहीं । आलीं कांहीं गळती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पक्कदशे येती थोडीं । नास आढी वेचे तों ॥ छ ॥ विरळा[6] पावे विरळा पावे । अवघड गोवे सेवटाचे ॥ २ ॥ उंच निंच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥ ३ ॥ झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥ ४ ॥ पावेल तो पैल थडी । ह्मणों गडी आपुला ॥ ५ ॥ तुका ह्मणे उभाऱ्यानें । कोण[7] खरें मानितसे ॥ ६ ॥

१२९१. अवघ्या उपचारा । एक मन[8] चि दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावी घ्यावी हे चि सेवा । भाक्षी[9] दुर्बळाची देवा ॥ छ ॥ अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ॥ २ ॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ३ ॥

१२९२. आली सलगी पायांपाशीं । होइल तैसी करीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक आह्मीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥ छ ॥ अवघ्या निरोपणा भाव । हा चि ठाव उरलासे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाळीं लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥ ३ ॥

१२९३. देह आणि देहसंबंधें निंदावीं । इतरें वंदावीं श्वानसूकरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें नांवें जाला मी माझ्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥ छ ॥

---

१ त. लोडें आणि वालिस्तें.–२ पं. नीरें.–३ पं. आयुष्यमोल.–४ त. काळ वेळ दिनशुद्धी.–५ पं. बोलणें.–६ दे. पं. विरळा पावे विरळा.–७ पं. खरें कोण.–८ दे. मनें –९ पं. दीनदुर्बळाचा०.

गृह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरा भेटावें श्वापदझाडां ॥ २ ॥ तुका ह्मणे मी हें[2] माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥ ३ ॥

१२९४. देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कळिवर ओंवाळूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥ छ ॥ करुणावचनीं लाहो एकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ३ ॥

१२९५. देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि लाहो करा । काळ सारा चिंतनें ॥ छ ॥ पाळणाची नाहीं चिंता । ठाव रिता देवाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवासाटीं । देव पोटीं पडेल ॥ ३ ॥

१२९६. पृथक मी सांगों किती । धर्म नीती सकळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥ छ ॥ क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥ २ ॥ तुका ह्मणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ॥ ३ ॥

१२९७. पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आत्महत्यारा हा[4] विषयांचा लोभी । ह्मणावें तें नाभी करवी दंड ॥ छ ॥ नागवला अल्प लोभाचिये साटीं । घेऊनि कांचवाटि परिस दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे हात झाडिले परत्रीं । श्रेव[5] तो चि श्रोत्रीं वेठी केली ॥ ३ ॥

१२९८. अंतरींचें ध्यान । मुख्य या नांवें पूजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उपाधि तें अवघें पाप । गोडें[6] निरसतां संकल्प ॥ छ ॥ आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे वृत्ति । अविट हे सहज स्थिति ॥ ३ ॥

१२९९. मूळ करणें[7] संतां । नाहीं मिळत उचिता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥ छ ॥ सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ३ ॥

१३००. बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालें आह्मांसी जीवन । धणीवरि हें सेवन ॥ छ ॥ सोपें आणि गोड । किती अमृता ही वाड ॥ २ ॥ तुका ह्मणे अच्युता । आमचा कल्पतरु दाता ॥ ३ ॥

१३०१. तृषाकाळीं[8] उदकें भेटी । पडे मिटी आवडीची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ छ ॥ मिष्टान्नाचा योग भुके । ह्मणतां चुके पुरेसें ॥ २ ॥ तुका ह्मणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ३ ॥

---

१ पं. श्वापदा झाडां.–२ त. "मी हे" याच्याबद्दल "मुखें."–३ त. न वावें.–४ पं. 'हा' हा शब्द नाहीं.–५ पं. श्रम तो श्रोत्रीं टेवी केली.–६ पं. गोडी.–७ पं. कारण.–८ दे. त. त्रुशाकाळें.

१३०२. कुंचराचे श्रवण । गुणदोषांवरि मन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असोनियां नसे कथे । मूर्ख अभाग्य तें तेथें ॥ छ्र ॥ निरर्थक कारणीं । कान डोळे वेची वाणी ॥ २ ॥ पापाचे सांगाती । तोंडीं ओढाळांचे माती ॥ ३ ॥ हिताचिया नांवें । वोस पडिले देहभावें ॥ ४ ॥ फजीत करूनि सांडीं । तुका करी वोडावोडी ॥ ५ ॥

१३०३. जग तरि आह्मां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येतो हिताचा कळवळा । पडती हातीं ह्मूंन काळा ॥ छ्र ॥ नाहीं कोणी सखा । आह्मां निपराध पारिखा ॥ २ ॥ उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥ ३ ॥

१३०४. सोपें वर्म आह्मां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समाधीचें सुख सांडा ओंवाळून । ऐसें हें कीर्तन ब्रह्मरस ॥ छ्र ॥ पुढती घँडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ २ ॥ उपजों चि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ४ ॥

१३०५. गंगा न देखे विटाळ । तें चि रांजणीं ही जळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अल्पमहत्ता नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ॥ छ्र ॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पायरिकां लोकां ॥ २ ॥ तुका ह्मणे अग्नीविण । वीजें वेगळीं तों भिन्न ॥ ३ ॥

१३०६. देवावरिल भार । काढूं नये कांहीं पर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तानभुके आठवण । घडे तें बरें चिंतन ॥ छ्र ॥ देखावी निश्चिंती । ते चि अंतर श्रीपती ॥ २ ॥ वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥ ३ ॥

१३०७. थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥ छ्र ॥ अर्थ अनर्थ सारिखा । करूनि ठेविला पारिखा ॥ २ ॥ उपाधिवेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ३ ॥

१३०८. काय ह्याचें घ्यावें । नित्य नित्य कोणें गावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केलें हरिकथेनें वाज । अंतरोनी जाते निज ॥ छ्र ॥ काम संसार । अंतरीं हे करकर ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंड । ऐसे मानिती ते लंड ॥ ३ ॥

१३०९. वदे साक्षत्वेंसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे कांहीं चाचपावें । जातों भावें पेरीत ॥ छ्र ॥ भांडार त्या दातियाचें । मी कैचें ये ठायीं ॥ २ ॥ सादावीत गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ३ ॥

---

१ त. कुचराचें.–२ दे. करणीं–३ पं. सोडी –४ पं. ह्मणोनि.–५ त. हें कडवें येथें अभगांत नाहीं. पं. मूळचेंच आहे दे. या ठिकाणीं नवीन घातले आहे.–६ पं. ओंवाळूनी । ऐसा हा कीर्तनीं ब्रह्मरस.–७ पं. घडतें –८ पं. तुकोनिया.–९ पं. अंतरे.

१३१०. ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥ छ ॥ गुंपोनि चावटी । तेथें कोणा लाभें भेटी ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । देवाविण अमंगळा ॥ ३ ॥

१३११. साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ व्यभिचारा टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ छ ॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । शर्त्तीविण लाजिरवाणें ॥ ३ ॥

१३१२. मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जा रे चाळवीं बापुडीं । कोणी धरिती तीं गोडी ॥ छ ॥ रिद्धिसिद्धी देसी । आह्मीं चुंभळें नव्हों तैसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ठका । ऐसें नागविलें लोकां ॥ ३ ॥

१३१३. पाहातोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वरि ठेवूं दे मस्तक । ठेलों जोडूनि हस्तक ॥ छ ॥ बरवें करीं सम । नको भंगों देऊं प्रेम ॥ २ ॥ तुका ह्मणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ३ ॥

१३१४. भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ छ ॥ निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहीं च सांकडें पडों नेदी ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावें साह्ये । घातलिया भये नर्का जाणें ॥ ३ ॥

१३१५. तों च हीं क्षुल्लकें सर्वां सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी तों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ छ ॥ रवि नुगवे तों दीपिकांचें काज । प्रकाशें तें तेज सहज लोपे ॥ २ ॥ तुका ह्मणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ३ ॥

१३१६. यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारियाँ कारणा । पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये अंगीं । धन्य तो चि जगीं । आदि अंत सांभाळी ॥ छ ॥ आँवश्यक तो शेवट । मागें अवघी खटपट । चालों जाणे वाट । ऐसा विरळा एखादा ॥ २ ॥ तुका होवोनि निराळा । क्षराअक्षरावेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ॥ ३ ॥

१३१७. वेदपुरुष तरि नेती कां वचन । निवडूनि भिन्न दाखविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझीं वर्मे तूं चि दावूनि अनंता । होतोसी नेणता कोण्या गुणें ॥ छ ॥

१ पं. कोण लाभ.–२ पं. धरितील ते गोडी –३ पं. भक्ता ऐसे.–४ दे. त. साहे.–५ दे. पं. दीपिकाचें.–६ पं. प्रकाश तें –७ दे. त. कारीये.–८ दे. आवशक. पं. आवस्यक –९ पं. क्षराक्षरावेगळा.– १० पं. विठ्ठल प्रसाद.

यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग । उणें पडतां अंग क्षोभ घडे ॥ २ ॥ वससी तूं या भूतांचे अंतरीं । तरि कां भेद हरी दावियेला ॥ ३ ॥ तपतिर्थाटणें[1] तुझें[2] मूर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥ ४ ॥ आतां क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनियां हांका[3] उभा द्वारीं ॥ ५ ॥

## लोहागांवीं स्वामींच्या अंगावर ऊन पाणी घातलें—तो अभंग ॥ १ ॥

१३१८. जळे[4] माझी काया लागला वोणवा । धांव रे केशवा मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जालें ॥ ध्रु ॥ फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय हृदय माझें ॥ २ ॥ घेऊनि जीवन धांवें लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी तूं होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ४ ॥

॥ १ ॥

१३१९. अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥ ध्रु ॥ ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ २ ॥ तुका ह्मणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ३ ॥

## नामदेव व पांडुरंग यांनीं स्वप्नांत येऊन स्वामींस आज्ञा केली कीं कवित्व करणें—ते अभंग ॥ २ ॥

१३२०. नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नेंको[5] ॥ ध्रु ॥ माप टाकी सळ[6] धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ २ ॥ प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले[7] शेवटीं लावी तुका ॥ ३ ॥

१३२१. घाल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पंगती[8] पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ ध्रु ॥ सेवटील स्थळ नीचें[9] माझी वृत्ति । आधारें विश्रांती पावईन ॥ २ ॥ नामदेवापायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ३ ॥

॥ २ ॥

---

१ पं. तपें तीर्थाटणें.–२ दे. पं. तुझे.–३ पं. तुका. ( म्हणजे पंढरपुरच्या प्रतींत या अभंगांत दोन वेळ " तुका " हा शब्द एकाच अर्थानें घातला आहे).–४ पं. जळो.–५ त. नये.–६ त. सळे.–७ पं. उरले ते सेवटी –८ पं. संगती.–९ दे. निच.

१३२२. त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणां जोगें । एक जातां[1] लागें । एक पाठीं लागतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कृपे खांदां हरि वाहे ॥ छ ॥ पापपुण्यात्मयाच्या[2] शक्ती । असती योजिल्या श्रीपती । यावें काकुलती । तेथें[3] सत्तानायेका ॥ २ ॥ तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकाश निवडी । घातल्या सांगडी । तापे पेटीं हाकारी ॥ ३ ॥

१३२३. देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंतीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥ छ ॥ पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदंतर[4] तेवी ॥ २ ॥ तुका ह्मणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥ ३ ॥

१३२४. अनुभवें अनुभव अवघा चि साधिला । तरि स्थिरावला मनु ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पिटूनियां मुसे आला अळंकार । द्रव्य तें असार होऊनियां ॥ छ ॥ एक चि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्र्यीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोवाचे ॥ ३ ॥

१३२५. ऐसिया संपत्ती आह्मां संवसारीं[5] । भोगाचिया परि काय सांगों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काम तो कामना भोगीतसे देवा । आळिंगणें हेवा चरण चुंबीं ॥ छ ॥ शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहें तिकडे सारिखें । आपुलें पारिखें[6] निरसलें ॥ ३ ॥

१३२६. राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एक चि सकळ दुजें नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मंगळावांचूनि उमटेना वाणी । अखंड चि खाणी एकी रासी ॥ छ ॥ मोडलें हें स्वामी ठावाठाव[7] सेवा । वाढवावा[8] हेवा कोणा अंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हें चि आतां ॥ ३ ॥

१३२७. निवडोनि वाण काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयाचा विभाग तयासी च फळे[9] । देखणें निराळें कौतुकासी ॥ छ ॥ शूर तो ओळखे धांयडायहात[10] । येरां होइल मात सांगायासी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी केळवते[11] वाणी । केला निजस्थानीं जाणवसा ॥ ३ ॥

१३२८. याजसाटीं केला होता अटाहास[12] । शेवटीचा[13] दिस गोड व्हावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां निश्चितीनें[14] पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥ छ ॥

---

१ त. आतां.–२ पं. पापपुण्यात्मा याच्या०.–३ पं. येथें.–४ दे. त. पं. महदातर–५ पं. संसारीं.–६ त. पाखें.–७ पं. ठाया ठाव.–८ दे. वाढवा तो.–९ त. फळे–१० पं. ढायघायहात.–११ त. केळवती.–१२ दे. त. पं. आटाहास्ये.–१३ पं. सेवटीचा.–१४ त. निश्चितीनें

कवतुक वाटे जालिया वेचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥ ३ ॥

१३२९. भक्तीचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माउलीचे मागें वाळकांची[1] हरी । एका सूत्रें[2] दोरी ओढतसे ॥ ध्रु ॥ जेथील जें मागे[3] तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥ २ ॥ सेवेचिये सत्ते धनी च सेवक । आपुलें तें एक न वंची कांहीं ॥ ३ ॥ आदिअंताठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे मग उच्चासन[4] ॥ ४ ॥ भावारूढ तुका जाला एकाएकीं । देव च लौकिकीं अवघा केला ॥ ५ ॥

१३३०. सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव[5] तो पोटीं कैचा घडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भजनाचे सोई जगा परिहार[6] । नेणत्यां सादर चित्त कथे ॥ ध्रु ॥ नाइकवे कानीं साधन उपाय । ऐकतो गाय हरुषें[7] गीत ॥ २ ॥ नव्हे आराणूक जावयासी वर्ना[8] । वेध कामिना हरिकथेचा ॥ ३ ॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्टप्रहर[9] ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी खेळों भातुकुलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥ ५ ॥

१३३१. जाणपण वरें देवांचिये[10] शिरीं । आह्मी ऐसीं बरीं नेणतीं च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखणियांपुढें रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥ ध्रु ॥ आशंकेची[11] बाधा नाहीं लडिवाळां । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे दिशा मोकळ्या सकळा । अवकाशीं खेळा ठाव जाला ॥ ३ ॥

१३३२. वचनांचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातां घरा मागें । उरों नेणें खंती । मिळाल्या बहुती[12] फांकलिया ॥ ध्रु ॥ उदयीं च अस्त उदयें[13] संपादला । कल्पनेचा केलें[14] जागेपणें ॥ २ ॥ जाणवूनि[15] गेला हांडोरियां पोरां । सावध इतरां करुनी तुका ॥ ३ ॥

## स्वामींस संतांनीं पुसलें कीं तुह्मांस वैराग्य कोण्या प्रकारें जालें तें सांगा—ते अभंग ॥ ३ ॥

१३३३. यती[16] शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुह्मीं संतीं ॥ ध्रु ॥

१ त. वाळकाच्या. पं. वाळकाचे.–२ पं. सूत्र.–३ पं. मागे रायसमोर –४ दे. पं. उंचासनी.–५ पं. अनुभव पोटीं० –६ पं. परिचार.–७ पं. हर्षगीत –८ पं. वचना –९ पं. अष्ट प्रहर (अष्टों प्रहर ).–१० दे. पं. देवाचे –११ दे. पं. आशकेचा –१२ दे. बहुतीं.–१३ दे. त. पं. उदयों.–१४ त. जाला.–१५ पं. जाणोनियां.–१६ दे. याति शुद्र वैग. पं. याति शुद्र वैश्य. त. यातिशुद्र वंश.

संवसारें जालों अतिदुःखें दुखी । मायवाप सेवीं क्रमिलिया ॥ २ ॥ दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥ ३ ॥ लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें[4] तुटी येतां ॥ ४ ॥ देवाचें देऊळ होतें[5] तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ५ ॥ आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ६ ॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ७ ॥ गाती पुढें त्यांचें धरावें धृपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ८ ॥ संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ ९ ॥ टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ १० ॥ वचन मानिलें नाहीं सुहृदाचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ ११ ॥ सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १२ ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १३ ॥ यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १४ ॥ निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १५ ॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥ विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १७ ॥ आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १८ ॥ भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ १९ ॥ तुका ह्मणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोलें[11] पांडुरंगें ॥ २० ॥

१३३४. ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । करीतसां आदरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । एकांचिये वांहीं । एक देखीं मानिती ॥ ध्रु. ॥ बहु पीडिलों संसारें । मोडीं पुसें पिटीं ढोरें । न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥ २ ॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तें ही । त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥ ३ ॥ प्रियापुत्रबंधु । यांचा तोडिला संबंधु । सहज जालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥ ४ ॥ तोंड न दाखवे जना । शिरें सांदी भरें राणां । एकांत तो जाणां । तयासाटीं लागला ॥ ५ ॥ पोटें पिटिलों[12] काहारें । दया नाहीं या विचारें । बोलावितां वरें । सहज ह्मणें यासाटीं ॥ ६ ॥ सहज वडिलां होती सेवा । ह्मणोनि पूजितों या देवा । तुका ह्मणे भावा । साटीं ह्मणी घ्या कोणी ॥ ७ ॥

---

१ दे. त. कर्मल्या.—२ पं. त. दव्ये.—३ पं. करित.—४ दे. पं. देख.—५ पं. त होतें जें भगलें.—६ पं. पर उपकार.—७ दे. सुहुर्दाचें—८ पं. सत्यअसत्याचें.—९ पं. यावरी.—१० पं. आला.—११ दे. "बोल" हा शब्द नाहीं.—१२ पं. पीडिलों.

१३३५. बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला[1] हा वमन संवसार ॥ ध्रु ॥ बरें जालें देवा वाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ २ ॥ बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ३ ॥ बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ४ ॥ बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें वाईल उपेक्षिलीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ६ ॥ ॥ ३ ॥

१३३६. बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें सोसें[2] मन जालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ ध्रु ॥ बंधनापासूनि उकलली गांठी । देतां आली मिठी सांवकाशें[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे देहें[4] भारिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥ ३ ॥

१३३७. मीचि मंज व्यालों । पोटा आपुलिया आला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पुरले नवस । निरसोनी गेली आस ॥ ध्रु ॥ जालों बरा बळी । गेलों मरोनि तेकाळीं ॥ २ ॥ दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥ ३ ॥

१३३८. जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आधीं आपणयां नासी । तरि उतरे ये कसीं ॥ ध्रु ॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें[5] हें निश्चयें उत्तर ॥ २ ॥ तुका ह्मणे ते उन्मनी । नास कारया कारणीं ॥ ३ ॥

१३३९. साधनांच्या कळा आकार आकृति । कारण नवनीतीं मथनाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पक्षियासी नाहीं मारगीं आडताळा । अंतरिक्षीं[6] फळासी चि पावे ॥ ध्रु ॥ भक्तीची जोडी[7] ते उखत्या चि सांटीं । उणें पुरें तुटी तेथें[8] नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें सांचत सांचणी । आजि जाली धणी एकसरें ॥ ३ ॥

१३४०. नाहीं येथें वाणी । सकळां वर्णीं घ्यावी धणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥ ध्रु ॥ एका भावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥ २ ॥ तुका खेंळे दाणीं । करी बैसोनी वांटणी ॥ ३ ॥

१३४१. ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥ ध्रु ॥ निवाडिलें वरळा भूस । सार आइन जिंनस[11] ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ३ ॥

---

१ पं. "हा" हा शब्द नाहीं.–२ पं. सोस० परत माघारी०.–३ पं. सावकाश.–४ पं. ० देहीं भरला विठ्ठल। काम क्रोध केलें०.–५ पं. तें या निश्चयें –६ पं. अतरिक्ष. दे. त. अंतराक्षी –७ पं. गोडी.–८ पं. येथें.–९ पं. आहे.–१० पं. खळ –११ त. जिन्नस.

१३४२. भ्रमणा पाउलें वेचिलीं तीं वाव । प्रवेशतां ठाव एक द्वार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सार तीं पाउलें विठोबाचीं जीवीं । कोणीं न विसंभावीं क्षणभरि ॥ ध्रु ॥ सुलभ हें केलें सकळां जीवन । फुंकावे[3] चि कान न लगेसें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें सकळ ही कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥ ३ ॥

१३४३. कांहीं जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल सीण संदेहानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भलतिया नावें ओंळविला पिता । तरि तो जाणता कळवळा ॥ ध्रु ॥ अळंकार जातो गौरवितां वाणी । सर्वगात्रा धणी हरिकथा ॥ २ ॥ तुका ह्मणे उपजे विल्हाळें आवडी । करावा तो घडी घडी लाहो ॥ ३ ॥

१३४४. बीजापोटीं पाहे फळ । विघ न करितां सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया मूर्ख ह्मणावें वेडें । कैसें तुटेल सांकडें ॥ ध्रु ॥ दांवितिया वाट । वेठी धरूं[11] पाहे चाट ॥ २ ॥ पुढिल्या उपाया । तुका ह्मणे राखे काया ॥ ३ ॥

१३४५. मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतें[12]कीया खळ ॥ ध्रु ॥ अगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म । येरा नाचवितो[13] भ्रम ॥ ३ ॥

१३४६. वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें सांगा मजपाशीं । संतां निरवितों येविशीं ॥ ध्रु ॥ असा जी प्रवीण । ग्रंथीं[14] कळे शुद्धहीण ॥ २ ॥ तुका ह्मणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥ ३ ॥

१३४७. ज्या ज्या आह्मांपाशीं होतील[15] ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अळंकारूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणाठाव पुसियेला ॥ ध्रु ॥ ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकाविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें उरला विठ्ठल । खाये बोले बोल गाये[16] नाचे ॥ ३ ॥

१३४८. आह्मी आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥ ध्रु ॥ येतां पाहें मुळा । वाट पंढरीच्या डोळां ॥ २ ॥ तुका ह्मणे स्थळें । मग मी पाहेन सकळें ॥ ३ ॥

---

१ दे. भ्रमना –२ पं. विसवावीं.–३ पं. फुंमाश.–४ पं. सुळे.–५ पं. आळवितां –६ त. परि – ७ पं. होतो –८ दे. उपज विल्हाळे. पं. उपजे विल्हाळ –९ पं. ह्मणावे तें वेडें –१० पं. दावाविया.– ११ पं धरूनि –१२ दे. पं. सुतकिया –१३ पं. जाणवितो –१४ पं. ग्रथ कळे सुद्रहीण – १५ पं. होईल –१६ गायनाचे –१७ दे. तुश त. तुच्छ.–१८ पं. वाम पंढरीचा –१९ पं. सकळ.

१३४९. आइत्याची राशी । आली पाकसिद्धीपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां सांडोनि भोजन । भिके जावें वेडेपण[1] ॥ ध्रु. ॥ उसंतिली[2] वाट । मागें परतावें फुकट ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । वेचों बैसोन ठाकणीं[3] ॥ ३ ॥

१३५०. धन्य[4] शुद्ध जाती । धरीं लौकरी परती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐकिलें तें चि कानीं । होय परिपाक मनीं ॥ ध्रु. ॥ कळवळा पोटीं । सावधान हितासाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । त्यांचा[5] तो चि जाणां देव ॥ ३ ॥

१३५१. जीवित्व तें किती । हें चि धरितां बरें चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संत सुमनें[6] उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥ ध्रु. ॥ दिसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडी । हाय जतन रोकडी ॥ ३ ॥

१३५२. अभिमानाची स्वामिनी[7] शांति । महत्व घेती सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळोनि हीं[8] न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥ ध्रु. ॥ सर्व सत्ता करितां[9] धीर । वीर्यां वीर आगळा ॥ २ ॥ तुका ह्मणे तिखट तिखें । मृदसखें आवडी ॥ ३ ॥

१३५३. भोजन तें[10] पाशांतीचें । निंचें[11] उंचें उसाळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वंहिता[12] ॥ ध्रु. ॥ कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पावे भूतीं । ते निश्चिंती मापली ॥ ३ ॥

१३५४. पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कारण तें हें चि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥ ध्रु. ॥ प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । बुद्धी वेचूनि सकळ ॥ ३ ॥

१३५५. वहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली[13] हे हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ ध्रु. ॥ वहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणे । ऐसे भले[14] ते शाहाणे ॥ ३ ॥

१३५६. रूप[15] नांवें माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ ध्रु. ॥ पोटा आलें तिच्या लोळे[16] मांड्यांवरि । पारखी न करी खंतीं चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तीसाटीं हरिहर । अरूपींचें क्षीर[17] विभाग हें ॥ ३ ॥

---

१ दे. त. वेडेपणें.–२ पं. उमनील –३ पं. टाकनी.–४ दे. धन्यें –५ पं. ज्याचा –६ पं. सुमन.–७ पं. स्वामिणी.–८ पं. हें –९ पं. धरितां.–१० पं. "ते" शब्द नाहीं.–११ पं. उच नीच.–१२ पं स्वहिताचा –१३ पं. लावली.–१४ पं. भलते. त. भले ते शाहणें.–१५ पं. रूप नाव.–१६ पं. लोड मड्यावरी। पारखीये करी खती तिची –१७ पं. क्षीर०.

१३५७. लेकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ॥ छ ॥ वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरवलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥ ३ ॥

१३५८. ओंतभूतांप्रति[1] । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ छ ॥ अल्पें[2] तो संतोषी । स्थळीं सांपडे उदेसीं ॥ २ ॥ सहज संगम । तुका ह्मणे तो उत्तम ॥ ३ ॥

१३५९. मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा योगियांचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥ छ ॥ न कळे आवडी । कोण आहे कैसी घडी ॥ २ ॥ तुका ह्मणे थींत[3] । दुःख पाववावें चित्त ॥ ३ ॥

१३६०. भाग्यवंतां हें चि काम । मापी नाम वैखरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ छ ॥ पिकविलें[4] तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ २ ॥ तुका करी प्रणिपात । दंडवत ओचारियां[5] ॥ ३ ॥

१३६१. लटिकें तें रुचे । साच कोणां ही न पचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा माजल्याचा गुण । भोगें कळों येइल सीण ॥ छ ॥ वाढवी ममता । नाहीं वरपडला तो दूतां ॥ २ ॥ कांहीं न मनी हेकड । तुका उपदेश माकड[6] ॥ ३ ॥

१३६२. कौतुकाची सृष्टी । कौतुकें चि केलें कष्टी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोडे तरी भलें खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥ छ ॥ जाँणणियासाटीं[7] । भय सामावलें पोटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे चेता । होणें तें तूं च आइता ॥ ३ ॥

१३६३. भोवंडीसरिसें । अवघें भोंवत चि दिसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठायीं राहिल्या निश्चळ । आहे अचळीं अचळ ॥ छ ॥ एकें[8] हाकेचा कपाटीं । तेथें आणीक नाद उठी ॥ २ ॥ अभ्रें[9] धांवे शशी । तुका[10] ह्मणे दुसरें भासी ॥ ३ ॥

१३६४. नव्हों[11] आह्मी आजिकालीचीं । काचीं कुचीं चाळवणी[12] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एके ठायीं मूळडाळ । ठावा सकळ आहेसी ॥ छ ॥ तुमचें आमचेंसें[13] कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें असें । तेथें दिसें तुमचासा ॥ ३ ॥

---

१ पं. आर्तभूत प्रति.–२ त. आणे.–३ दे. त. थीतें. पं. स्थीत.–४ पं. पिकलें.–
५ पं. आचार्या.–६ दे. पं. न मनी माकड । कांहीं उपदेश हेकड ॥.–७ त. पं. जाणनिया –८ पं. एके.–
९ पं. अभ्र.–१० दे. असे ते तें दुसरें भासी. पं. असे तेथें दुसरे भासी.–११ पं. नव्हे.–
१२ पं. चाळवणी –१३ पं. आमचें तें कांहीं ।.

१३६५. योग्याची संपदा त्याग आणि शांति । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरयेरांवरी जायांचें उसिणें । भाग्यस्थळीं देणें झाडावेसीं ॥ ध्रु ॥ केलिया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो फान्हवितो ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥ ३ ॥

१३६६. मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाचे ॥ ध्रु ॥ न देखें से जालें श्रम । आलें वर्म हाता हें ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ॥ ३ ॥

१३६७. नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें औचावाचे ॥ ध्रु ॥ कांपवूनि टिरी शूरत्वाची मात । केलें घाताहात उचित काळें ॥ २ ॥ तुका ह्मणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मळ स्तुति होतां ॥ ३ ॥

१३६८. नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ ध्रु ॥ नको गुंपों भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सरें अंगीं देवाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ३ ॥

१३६९. अवघी मिथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥ ध्रु ॥ सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळें दंडे ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें भागा । देउनि चिंतीं पांडुरंगा ॥ ३ ॥

१३७०. न संगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उगींच लागतील पाठीं । होतीं रितीं च हिंपुटीं ॥ ध्रु ॥ सिकविल्या गोटी । शिकोनें न धरिती पोटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सीण । होइल अनुभवाविण ॥ ३ ॥

१३७१. जातिविजातीची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होणार तें घडो होणाराच्या गुणें । होइल नारायणें निर्मिलें तें ॥ ध्रु ॥ व्याघ्राचिये भुके वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥ २ ॥ तुका ह्मणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥ ३ ॥

---

१ पं. भोगावे.–२ पं. आचावचे.–३ पं. चित्तीं.–४ त. भार्गी.–५ पं. भागी.–६ पं. सर्व.–७ त. निराळा.–८ दे. आग्र. पं. श्रम.–९ पं. काळ.–१० पं. आला.–११ सगवे.–१२ पं. शिकोनि धरितील पोटीं.–१३ पं. व्याघ्राची ते.

१३७२. शाहाणियां पुरे एक चि वचन । विंशारती खुण ते चि त्यासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उपदेश असे बहुतांकारणें । घेतला तो मनें पाहिजे हा ॥ ध्रु ॥ फांसावेना तरि दुःख घेतें वाव । मग होतो-जीव कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे नको राग धरूं झोंडा । नुघडितां पीडा होइल डोळे ॥ ३ ॥

१३७३. अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें वरें संतजनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूपाच्या आठवें दोन्ही ही आपण । विंयोग तो क्षण होत नाहीं ॥ ध्रु ॥ पूजा तरि चित्तें कल्पीं तें ब्रह्मांड । आहाच तो खंड एकदेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा अनुभव यापरि । डोई पायांवरि ठेवीतसें ॥ ३ ॥

१३७४. नटनाट्य तुह्मी केलें याच साटीं । कवतुकें दृष्टी निववावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरी काय कळलें चि आहे । वाघ आणि गाय लांकुडाची ॥ ध्रु ॥ अभेद चि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहुएकी ॥ २ ॥ तुका ह्मणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ३ ॥

१३७५. रवीचा प्रकाश । तो चि निशी घडे नाश । जाल्या बहुवस । तरि त्या काय दीपिका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हा चि वसो जीवीं । माझे अंतरीं गोसावीं । होऊं ऐसी ठावीं । काय वर्मे यांच्यानें ॥ ध्रु ॥ सर्वे असतां धणी । आड येऊं न सके कोणी । न लगे विनवणी । पृथकाची करावी ॥ २ ॥ जन्माचिया गति । येणें अवघ्या खुंटती । कारण ते प्रीति । तुका ह्मणे जवळी ॥ ३ ॥

१३७६. ऐसे सांडुनियां धुरे । किविलवाणी दिसां कां रे । कामें उर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ ध्रु ॥ न लगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं । त्यांचा तो चाकरी । पारपत्य सकळ ॥ २ ॥ नाहीं आडकाटी । तुका ह्मणे जातां भेटी । न बोलतां मिठी । उगी च पायीं घालावी ॥ ३ ॥

१३७७. उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ ध्रु ॥ जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळ चि रासि गुणांची च ॥ २ ॥ तुका ह्मणे देव त्यांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ३ ॥

---

१ "इशारती" असावें.–२ पं. "पाहिजे हा" याच्याबद्दल "पाहिजेल".–३ दे. त. पं. अभिनव –४ दे. वियोगें तो क्षीण –५ पं. कल्प.–६ पं. त्या याने –७ दे. त. पृथुकाची.– ८ पं. दिसता.–९ पं. कार्मी.–१० पं. कोण वकील या घरीं.–११ पं. ज्याचा–१२ पं. जा भेटी – १३ पं उपकारी असो उरोनि उरला –१४ पं. विचारिता.–१५ पं. ऐसा.–१६ पं. गुणाचा.

१३७८. कोणी[1] पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिकें[2] दुराविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरी[3] च खुणा [4]प्रकटोनि ॥ छ्र ॥ बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे मेग नयें वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ३ ॥

१३७९. क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न घडावी पायीं तुटी । [5]मन[6] मुठी घातलें ॥ छ्र ॥ विचारतों वचनां आधीं । धरूनि शुद्धी ठेविली ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें भ्यालों । तरीं जालों जागृत ॥ ३ ॥

१३८०. आणूनियां मना । आवघ्या धांडोळिल्या खुणा । देखिला तो राणा । पंढरपूरनिवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वांयां जाय । देखिले[7] ते पाय । सम जीवीं राहाती ॥ छ्र ॥ तो देखावा हा विध । चिंतनें[8] तें कार्य सिद्ध । [9]आणिकां संबंध । नाहीं पर्वकाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । होती[10] क्षणें चि निर्मळ । जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ ३ ॥

१३८१. [11]धरितां ये पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वंदूं येती देव पदें । त्या आनंदें उत्साहें ॥ छ्र ॥ नृत्यछंदें उडती रज । जे सहज चालतां ॥ २ ॥ तुका ह्मणे गरुड [12]टेंके । वैष्णव निके संभ्रम ॥ ३ ॥

१३८२. नाम घेतां मन निवे । जिव्हे[13] अमृत चि स्रवे । होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥ छ्र ॥ जालें भोजनसें दिसे । चिरा पडोनि ठेला[14] इच्छे । घालियाच्या ऐसें । अंगा येती उद्गार ॥ २ ॥ सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका ह्मणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥ ३ ॥

१३८३. रुची रुची घेऊं गोडी । प्रेमसुखें जाली जोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काळ जाऊं नेदूं वांयां । चिंतूं[15] विठोबाच्या पायां ॥ छ्र ॥ करूं भजन भोजन । धणी घेऊं नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥ ३ ॥

१३८४. वेळोवेळां हें चि सांगें । दान मागें जगासि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल हे मंगळवाणी । घेऊं धणी पंगती ॥ छ्र ॥ वेचतसे पळें पळ । केलें वळ पाहिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे दुश्चित नका । [16]राहों फुका नाड हा ॥ ३ ॥

---

१ पं. कोण्या पुण्यें त्यांचा.–२ दे. त. पं. द्वंदादिक.–३ पं. अंतरींच्या.–४ त. पं. प्रगटोनि. ५ पं. मन.–६ पं. मनें मिठी घातली.–७ पं. धरिले.–८ पं. चिंतनें चि.–९ पं. आणीक.– १० दे हो त. होय –११ पं. धरितां पंढरीची०.–१२ दे. टेके.–१३ पं. जीवें.–१४ दे. छेला.– १५ दे. चिंतितां त. चिंती –१६ पं. राहे.

१३८५. आणीक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगा सारिखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दैवत ये भूमंडळीं । उद्धार कळी पांवित्रितें[1] ॥ छ्रु ॥ कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठायीं स्थळासी ॥ २ ॥ अन्यत्रींचें[2] तीर्थीं नासे । तीर्थीं वसे वज्रलेप ॥ ३ ॥ पांडुरंगींचें पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ॥ ४ ॥ ऐसें हरें गिरिजेप्रति । गुह्य स्थिती सांगितली ॥ ५ ॥ तुका ह्मणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ॥ ६ ॥

१३८६. पुराणींचा[3] इतिहास । गोड रस सेविलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हती हे आहाच बोल । मोकळें फोल कवित्व ॥ छ्रु ॥ भावें घ्या रे भावें घ्या रे । एकदा[5] जा रे पंढरिये ॥ २ ॥ भाग्यें आलेति मनुष्यदेहा । तो हा पाहा विठ्ठल ॥ ३ ॥ पापपुण्या करील झाडा[4] । जाइल पीडा जन्माची ॥ ४ ॥ घ्यावी हातीं टाळदिंडी । गावे तोंडीं गुणवाद ॥ ५ ॥ तुका ह्मणे घटापटा । न लगे वाटा शोधाव्या ॥ ६ ॥

१३८७. कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भलत्या काळें[6] नामावळी । सुलभ भोळी भाविकां[7] ॥ छ्रु ॥ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ॥ २ ॥ तुका ह्मणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ३ ॥

१३८८. पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाचारिल्या सारिसें पावे । ऐसें[8] सेवे वराडी ॥ छ्रु ॥ शुष्ककाष्ठीं[9] गुरुगुरी । लाज हरि न धरी ॥ २ ॥ तुका ह्मणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं ॥ ३ ॥

१३८९. बहुत सोसिले मागें न कळतां । पुढती काय आतां अंध व्हावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्नां[10] चांचपडो ॥ छ्रु ॥ कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपण चि हांक[11] देइल हाके ॥ २ ॥ तुका ह्मणे दिलीं चेतवूनि सुनीं[12] । कौतुकावांचूनि नाहीं छळ ॥ ३ ॥

१३९०. आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुजियासी तंव अकळ[13] हा भाव । करावा तो जीव साक्षी[14] येथें ॥ छ्रु ॥ एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणें चि ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं जगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुह्मी देवा ॥ ३ ॥

---

१ दे. पावितें.–२ दे. आनेत्रींचें. त. अंत्रेत्रींचें.–३ त. हा अभग चार चरणी धरून "भावें घ्यारे भावे घ्यारे। एकदा जारे पढरिये" हें एवढेंच ध्रुवपद धरलें आहे; आणि शेवटच्या कडव्यांत "तुका ह्मणे०" हें अर्ध पूर्वी असून "घ्यावी हातीं०" हें अर्ध पुढें आहे.–४ त. पं. निवडिला.–५ दे. येगदा.–६ पं. काळीं.–७ पं. भाविका.–८ पं. ऐसी सवे –९ दे. त. शुल्क काष्टीं. पं. शुष्क काष्टीं गुरगुरी –१० पं. भिन्न भिन्न.–११ दे. आपणें चि हाके देईल हाके. । पं. आपण चि हाके देइल हाक.–१२ दे. सुर्णी –१३ दे. त. पं. आकळ.–१४ दे. पं. साक्ष.

१३९१. अस्त नाहीं आतां एक चि मोहोरों । पासूनि अंधारा दुरि जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सौक्षत्वें या जालों गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरें ॥ छ ॥ आठवें विसरु पडियेला मागें । आलें तें चि भागें यत्न केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा विनोद देवासी । आह्मी तुह्मां ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ३ ॥

१३९२. क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दुरी धरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे आह्मी नेणों पालटों च कांहीं । त्यागिल्याची नाहीं मागें चाड ॥ छ ॥ प्रतिपादिता तूं समविषमाचा । प्रसाद तो याचा पापपुण्य ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां नाना अवगणीं । लागे संपादणी लटिक्याची ॥ ३ ॥

१३९३. सर्वरसीं मीनलें चित्त । अखंडित आनंदु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोत पति विश्वंभरीं । जाला हरि सोयरा ॥ छ ॥ वोळखी ते एका नांवें । ईतरभावें खंडणा ॥ २ ॥ तुका ह्मणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥ ३ ॥

१३९४. मीं हें ऐसें काय जाती । अवघड किती पाहातां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरें ॥ छ ॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अंतर ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वे देव । घेतां ठाव दावील ॥ ३ ॥

१३९५. कवीश्वरांचा तो आह्मांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दंभाचे आवडी वहिराट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ छ ॥ सोन्यासेजारीं तों लाखेची जतन । संतंत ते गुण जैसेतैसे ॥ २ ॥ सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका ह्मणे गोवी पावती हीं ॥ ३ ॥

१३९६. वाढलियां मान न मनावी निश्चिती । भूतांचिये प्रीती भूतपण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि मना लावावी कांचणी । इंद्रियांचे झणी ओढी भरे ॥ छ ॥ एका एकपणें एकाचिये अंगीं । लागे रंग रंगीं मिळलियीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणांचा ॥ ३ ॥

१३९७. माया साक्षी आह्मी नेणों भीड भार । आप आणि पर नाहीं दोन्ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्याचिये साटीं अवघा चि भरे । नावडे व्यापार तुटीचा वो ॥ छ ॥ पोभौंळितां चरे अंतरींचें दुःख । लासें फांसें मुख उघडावें ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे स्फीतीचा हा ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥ ३ ॥

---

१ पं. मोहरा.–२ पं. साक्षत्वें.–३ पं. त. इतर वाद.–४ दे. कवेश्वराचा. त. पं. कवेश्वराचा.–५ पं. आह्मां.–६ पं. दंभाची आवडी वहिरट०.–७ पं. सोन्याचे सेजारीं०.–८ पं. सतंत.–९ दे. सेव्य सेयवता. पं. सेव्य सेवकता.–१० पं. ह्मणोनियां.–११ त. मिळालिया.–१२ दे. पोंभाळितां.

१३९८. संतां आवडे तो काळाचा ही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परिसतां तेथें नाहीं ऐकविणें[1] । मोहें[2] न पवे सीण ऐसें राखे ॥ छ ॥ केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखें दुसरें नाशा[3] मूळ ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख्य कल्पतरुछाया । काय नाहीं दया तये ठायीं ॥ ३ ॥

१३९९. संतांच्या धिकारें[4] अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कुळ आणि रूप वांयां संवसार[5] । गेला भरतार[6] मोकलितां ॥ छ ॥ मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें[7] राखों जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तई अवघें बरें ॥ ३ ॥

१४००. ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । आभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरि ॥ छ ॥ दोरें चिरा कापे पडिला[8] कांचणी । अभ्यासें[9] सेवनीं विष पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ॥ ३ ॥

१४०१. अमर आहां अमर आहां । खरें कीं पाहा खोटें हें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न ह्मणां देह माझा ऐसा । मग भरवसा कळेल ॥ छ ॥ कैंचा धाक कैंचा धाक । सत्काळिक हें आपुलें ॥ २ ॥ देव चि वरे देव चि वरे । तुका ह्मणे खरे[10] तुह्मी ॥ ३ ॥

१४०२. काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फावल्या या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टी[11] बैसोनि ॥ छ ॥ नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विन्हईतसे[12] ॥ २ ॥ एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं[13] निराळा ॥ ३ ॥

१४०३. हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कळिवरा[14] पाठी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेऊनि निजाविलें स्मशानीं । माणसें जाळी[15] ते ठाकणीं ॥ छ ॥ काढिलें तें ओढें । मागील उपचाराचें पुढें ॥ २ ॥ नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगिता देव ॥ ३ ॥ याजसाटीं[16] हें निर्वाण । केलें कसियेलें मन ॥ ४ ॥ तुका ह्मणे अनुभव बरा । नाहीं तरी शास्त[17] होय चोरा ॥ ५ ॥

---

१ पं. एकेविणे त. एकेविण.–२ पं. मोहो–३ दे. पं. नासा.–४ दे. त. पं. धीकारें.–५ पं. ससार.–६ पं. भ्रतार–७ पं. ल्क्षण.–८ पं. पडिल्या.–९ पं. अभ्यास.–१० त. खरे खरे तुह्मी.–११ दे. त. पं. द्दष्टा.–१२ पं. विन्हव्हतसे.–१३ त. लोकिर्की–१४ पं. कलिवरा.–१५ पं. " नाळी ते" याच्याबद्दल " जाळीत".–१६ पं. याच साटीं.–१७ दे. सास्त.

१४०४. कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेमाछंदें नाचे डोले । हारपला देहभाव ॥ छ ॥ एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ॥ २ ॥ तुका ह्मणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥ ३ ॥

१४०५. नै बोलेसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका तुमच्या नामाविण । अवघा सीण कळतसे ॥ छ ॥ संकल्पाचे ओढी मन । पापपुण्य सैम चि ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणीं । पावो वाणी विसांवा ॥ ३ ॥

१४०६. प्रारब्धा हातीं जन । सुख सीण पावतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करितां घींयाळाचा संग । अंगें अंग मारखावें ॥ छ ॥ आविसा अंगें पीडा वसे । त्यागें असे बहु सुख ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव भ्याला । अवघ्या आला बाहेरी ॥ ३ ॥

१४०७. आशा ते करविते बुद्धीचा लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ औपला आपण करावा विचार । प्रसन्न तें सार मन ग्वाही ॥ छ ॥ नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । होतें त्या निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ २ ॥ अंधळ्यानें नये देखण्याची चाली । चालों ऐसी बोली तुका बोले ॥ ३ ॥

१४०८. जळो आतां नांव रूप । माझें पाप गांठींचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतांचिया चरणरजें । उतरूं ओझें मातीचें ॥ छ ॥ [१०]लटिकियाचा अभिमान । होता सीण पैंववित ॥ २ ॥ तुका ह्मणे अरूपींचें । सुख साचें निनांवें ॥ ३ ॥

१४०९. निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥ छ ॥ शृंगारिलें मढें । जीवेंविण जैसें कुडें ॥ २ ॥ तुका ह्मणे रागें । भलतें चावळे वाउगें ॥ ३ ॥

१४१०. भिक्षापात्रें अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥ छ ॥ जगा घालावें सांकडें । दीन होऊनि वापुडें । हें चि अभाग्य रोकडें । मूळें आणि विश्वास ॥ २ ॥ काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ३ ॥

१४११. भावबळें विष्णुदास । नाहीं नैश पावत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ति चालत ॥ छ ॥ पित्याचें जें कींय धन । पुत्रा कोण वंचील ॥ २ ॥ तुका ह्मणे कडे वैसों । तेणें असों निर्भर ॥ ३ ॥

---

१ पं. हरपले—२ पं. सोइरा.—३ पं. ते काळीं.—४ पं. न बोलसी—५ पं. सवें.—६ दे. घाईळाचा.—७ पं. आपुल्या.—८ दे. गोही.—९ पं. ते—१० पं. लटिका चि—११ दे. पावित.—१२ दे. भिक्ष्यापत्र. त. भिक्षापात्र.—१३ पं. मूळ आणि विश्वासा—१४ दे. त. नाश.—१५ पं. का.

१४१२. कोरड्या गोष्टी[1] चटक्या बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण यांचें मना आणी । ऐकों कानीं नाइकोनि ॥ छ ॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भूस [2]सिणें कांडिती ॥ २ ॥ तुका ह्मणे आपुल्या मति । काय रितीं पोकळें[3] ॥ ३ ॥

१४१३. नव्हतियाचा सोस होता । झडो आतां पदर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखणें तें देखियेलें । आतां भलें साक्षित्वें ॥ छ ॥ लाभें[4] कळों आली हानि । राहों दोन्हीं निराळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे एकाएकीं । हा कां लोकीं पसारा ॥ ३ ॥

१४१४. सोसें वाढे दोप । जाला न पालटे कस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें बरवें वचन । [6]करितां तें नारायण ॥ छ ॥ [7]असे प्रारब्ध नेमें । श्र[8]म चि उरे श्रमें ॥ २ ॥ सुख देते शांती । तुका ह्मणे धरितां चित्तीं ॥ ३ ॥

१४१५. काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम । उचिताचे धर्म । भागा आले ते करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देईन हाक नारायणा । तें तों नाकळे बंधना । पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥ छ ॥ सातांपांचांचें गोठलें । प्रारब्धें आकारलें । आतां हें संचलें । असो भोगा सांभाळीं ॥ २ ॥ फांवली[9] ते बरवी संधि । सावधान करूं बुद्धी । तुका ह्मणे मधीं । कोठें नेघें विसावा ॥ ३ ॥

१४१६. न लगे देशकाळ । मंत्रविधानें सकळ । मनें चि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येतो बैसलिया ठाया । [10]आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ छ ॥ कल्पनेचा साक्षी । तरि [11]आदरें चि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥ २ ॥ घेणें तरि भाव । लक्षी दासांचा उपाव । तुका ह्मणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ३ ॥

१४१७. नाहीं [12]आलें भक्तिसुख अनुभवा । तो मी ज्ञान देवा काय करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नसावें जी तुह्मी कांहीं निश्चिंतीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥ छ ॥ एकाएकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥ ३ ॥

१४१८. मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संत साक्षी या वचना । त्यांसी ठाउकिया खुणा ॥ छ ॥ होइन धरणेकरी । मग मी रिघों नेदीं बाहेरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥ ३ ॥

---

१ दे. त. गोठी.–२ पं. त. सीण.–३ पं. पोकळ–४ पं. लाभ –५ पं. हा लोकिकीं पसारा. त. हा कां लोकिकीं पसारा–६ त. करितो.–७ पं. असो.–८ दे. श्रमुचि उरे श्रम. त. श्रमुचि उरे श्रमें–९ पं. पावली.–१० दे. आसणें. त. असणें.–११ पं. आदरें लक्षी.–१२ पं. त. "आलें" हा शब्द नाहीं

**१४१९.** मिटेवण्याचे[1] धनी । तुह्मी व्यॆवसाय[2] जनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण पडे ये लिगाडीं । केली तैसीं उगवा कोडीं ॥ छ्र ॥ केलें सांगितलें काम । दिले पाळूनियां धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । असो तुमचें तुमचे माथां ॥ ३ ॥

**१४२०.** समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते[3] धणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पूजा होते[4] मुक्ताफळीं । रस ओविया मंगळीं ॥ छ्र ॥ धार अखंडित । ओघ चालियेला नित्य[5] ॥ २ ॥ पूर्णाहुति जीवें[6] । तुका घेऊनि[7] ठेला भावें[8] ॥ ३ ॥

**१४२१.** अवघा चि आकार ग्रासियेला काळें । एकें[9] चि निराळें हरिचें नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरूनि राहिलों अविनाश कंठीं । जीवन हें पोटीं सांटविलें ॥ छ्र ॥ शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां उपाधीच्या नांवें । आणियेला देवें वीट मज ॥ ३ ॥

**१४२२.** बोलणें चि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ छ्र ॥ पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टि धाय ॥ २ ॥ तुका ह्मणे मनें । हे चि संकल्प वाहाणें ॥ ३ ॥

**१४२३.** येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उंची देवाचे चरण । तेथें जालें अधिष्ठान ॥ छ्र ॥ आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे स्थळ । धरूनि राहिलों अचळ ॥ ३ ॥

**१४२४.** भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट । संचितांचे[10] वाट । वाटाऊनि फांकती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोगा ऐसे ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव । द्रष्टा येथें देव । विरहित संकल्पीं[11] ॥ छ्र ॥ दिला पाहूनियां धडा । पापपुण्यांचा निवाडा । आचरती गोडा । आचरणें आपुलाल्या ॥ २ ॥ तुका ह्मणे पराधीनें । जालीं ओढलिया ऋणें । तुटती बंधनें । जरि[12] देवा आळविते ॥ ३ ॥

**१४२५.** आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहो भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय चाले तुह्मीं बांधलें दातारा । वाहिलिया भारा उसंतितों ॥ छ्र ॥ शरीर तें करी शरीराचे[13] धर्म । नको देऊं वर्म चुकों मनीं[14] ॥ २ ॥ चळण फिरवी ठाव बहुवस । न घडो[15] आळस चिंतनाचा ॥ ३ ॥ इंद्रियें करोत आपुले[16] व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको देऊं काळा हातीं । येतों काकुलती ह्मणऊनि ॥ ५ ॥

---

१ मी ठेवण्याचे धणी । तुह्मीं येवसाय –२ दे. वेवसाय.–३ पं. घेती.–४ पं. होती.–५ दे. नित.–६ पं. जीव –७ त. होउनि –८ पं. भाव.–९ त. एका चि. पं. एकतें निराळें –१० त. संचिताची वाट पं. संचिताचे वाटे । वाटा होउनि फाकती ॥.–११ त. पं. सकल्प.–१२ पं. जरि या देवा.–१३ पं. शरीराचा.–१४ पं. मज.–१५ पं. पडो.–१६ त. आपुला. पं. आपुलाला

१४२६. आह्मां अवघें भांडवल । येथें[1] विठ्ठल एकला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कायावाचामनोभावें । येथें जीवें वेचलों ॥ ध्रु. ॥ परतें कांहीं नेणें दुजें । तेंत्त्वबीजें[2] पाउलें ॥ २ ॥ तुका ह्मणे संतसंगें । येणें रंगें रंगलों ॥ ३ ॥

१४२७. साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार गाच्या मोलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कळिवर । संचिंताची[3] थार मोडूनियां ॥ ध्रु. ॥ महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टां पंचभूतां ॥ २ ॥ तुका ह्मणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तें चि व्हावें ॥ ३ ॥

१४२८. निर्वैर होणें सौंधनाचें[4] मूळ । येर ते विल्हाळ सांडीमांडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं चालों येतें[5] सोंग[6]संपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥ ध्रु. ॥ त्यागा नांव तरी निर्विषयवासना । कार्यकारणां[7]पुरते विधि ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेंशीं ॥ ३ ॥

१४२९. पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं यां[8] विषयांचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवूनियां लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥ ध्रु. ॥ केला आणिकां वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ३ ॥

१४३०. कां जी धरिलें नाम । तुह्मी असोनि निष्काम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणां सांगतसां ज्ञान । ठकाठकीचें लक्षण ॥ ध्रु. ॥ आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥ २ ॥ तुका ह्मणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥ ३ ॥

१४३१. खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे फुकाचे उपाय । सांडूनियां वांयां जाय ॥ ध्रु. ॥ परउपकार । एका वचनाचा फार ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ३ ॥

१४३२. दया क्षमा शांति । तेथें[9] देवाची वसति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पावे धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा ॥ ध्रु. ॥ कीर्तनाचे वाटे । वराडिया ऐसा लोटे ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे । पूजा नामें[10] देव जोडे ॥ ३ ॥

१४३३. शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा फळे उपदेश । आणिकां[12] दोष उफराटे ॥ ध्रु. ॥ त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं[13] ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य सांगें । योतें[14] रागें येती ते ॥ ३ ॥

---

१ पं. एक–२ पं. तत्वबीज–३ दे. सचित चि.–४ पं. साधनाच्या मुळें–५ दे. येती–६ त. सोंग सपादनी.–७ दे. त. कारीये.–८ पं. "या" नाहीं.–९ पं. तेथे देवाची हे वस्ती.–१० पं. ०नाम देव०.–११ त. खरा.–१२ पं. येरा.–१३ पं. देहेभावे.–१४ पं. येउत.

१४३४. माझीं मेलीं बहुवरि। तूं कां जैसा तैसा हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठो कैसा वांचलासि। आतां सांग मजपाशीं ॥ छ्र ॥ तुज देखतां चि माझा। बाप गेला आजा पणजा ॥ २ ॥ आह्मां लागलेंसे पाठी। बालत्व तारुण्य[1] काठी ॥ ३ ॥ तुज फावलें तें मागें। कोणी नसतां वादिलागें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझ्या अंगीं। मज देखिल लागलीं अवघीं[2] ॥ ५ ॥

१४३५. आणीक कोणाचा न करीं मी संग। जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी। नाइकें मी कानीं आपुलिया ॥ छ्र ॥ समाधानासाटीं बोलावी हे मात। परि माझें चित्त नाहीं कोठें ॥ २ ॥ जिवाहूनि मज ते चि आवडती। आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥ ३ ॥ तुका[3] ह्मणे माझें तो चि जाणे हित। आणिकांच्या चित्त नेदीं[4] बोला ॥ ४ ॥

१४३६. आशा हे समूळ खाणोनि काढावी। तेव्हां चि गोसावी व्हावें तेणें[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरि सुखें असावें संसारीं। फजिती दुसरी करूं नये ॥ छ्र ॥ आशा मारूनियां जयवंत व्हावें। तेव्हां चि निघावें सर्वांतूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे जरीं योगाची तांतडी। आशेची बीबुडी करीं आधीं ॥ ३ ॥

१४३७. निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म। निर्धार हें वर्म चुकों नये ॥ १ ॥ निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास। पाहों नये वास आणिकांची ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा कोणें[6] उपेक्षिला। नाहीं ऐकिला ऐसा कोणीं ॥ ३ ॥

१४३८. नामाचें चिंतन प्रगट पसारा। असाल तें करा जेथें तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोडवील माझा स्वामी निश्चयेसीं। प्रतिज्ञा हे दासीं केली आह्मीं ॥ छ्र ॥ गुण दोष नाहीं पाहात[7] कीर्तनीं। प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥ २ ॥ तुका ह्मणे कडु वाटतो प्रपंच। रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ३ ॥

१४३९. नाम ह्मणतां मोक्ष नाहीं। ऐसा उपदेश करिती[8] कांहीं। बधिर व्हावें त्याचे ठायीं। दुष्ट वचन वाक्य तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयाचे राहिलें मानसीं। तें[9] चि पावले तयासी। चांचपडतां मेलीं पिसीं। भलतैसीं वाचाळें ॥ छ्र ॥ नवविधीचा[10] निषेध। जेणें मुखें करिती वाद। जन्मा आले निंद्य। शूकरयाती संसारा ॥ २ ॥ काय सांगों वेळोवेळां। आठव नाहीं[11] चांडाळा। नामासाटीं बाळा। क्षीरसागरीं कोंडिलें ॥ ३ ॥ आपुलिया नामासाटीं। लागे शंखासुरापाठीं।

---

१ दे. तारुण्यें.–२ दे. औषीं.–३ पं. तुका ह्मणे तो चि जाणे माझें हित।.–४ पं. नाहीं–५ त. त्यांनीं.–६ पं. कोण.–७ त. पाहातां.–८ त. करितिल–९ त. तें चि पावलें०–१० पं. नवविधाचा.–११ पं. नाहीं त्या चांडाळा.

फोडोनियां[1] पोटीं । वेद चारी काढिले ॥ ४ ॥ जगीं प्रसिद्ध[2] हे बोली । नामें गणिका तारिली । आणिकें ही उद्धरिलीं । पातकी महादोषी ॥ ५ ॥ जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या[3] चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखे हातीं क्षिाचे ॥ ६ ॥ काय सांगों ऐशीं किर्ती[4] । तुका ह्मणे नामख्याती । नरकाप्रती जाती । निपेधिती तीं एकें ॥ ७ ॥

१४४०. किती या काळाचा सोसावा वेंळसा[5] । लागला सरिसा पाठोवाठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लक्ष चौऱ्याशीची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥ ध्रु ॥ उपजल्या पिंडीं[6] मरण सांगातें । मरतें उपजतें सवें[7] चि तें ॥ २ ॥ तुका ह्मणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलिया ॥ ३ ॥

१४४१. गासी तरि एक विठ्ठल चि गाईं । नाहीं तरि ठायीं राहें उगा ॥ १ ॥ अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा श्रम करिसी वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे किती करावी फजिती । लाज नाहीं चिंत्तीं निलाजिरा ॥ ३ ॥

१४४२. जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥ १ ॥ शत्रु तो म्यां केला न ह्मणें आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥ २ ॥ जयासी नावडे विठोबाचें नाम । तो जाणा अधम तुका ह्मणे ॥ ३ ॥

१४४३. आह्मांसी तों नाहीं आणीक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घालूनियां कास करितों कैवाड । वागों नेदीं आड कळिकाळासी ॥ ध्रु ॥ अवद्ध वांकडें जैशातैशीं[10] परी । वाचे हरि हरि उच्चारावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां सांपडलें निज । सकळां[11] हें बीज पुराणांचें ॥ ३ ॥

१४४४. जीव तो चि देव भोजन ते भक्ति । मरण[12] ते चि मुक्ति पाषांड्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केलें वेद ॥ ध्रु ॥ मना आला तैसा करिती विचार । ह्मणती संसार नाहीं पुन्हा ॥ २ ॥[13] तुका ह्मणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विर्चारिती[14] ॥ ३ ॥

१४४५. भक्तांचा[15] महिमा भक्त चि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणोनि नेणते जाले तेणें सुखें । न[16] बोलोनि मुखें बोलताती ॥ ध्रु ॥

१ पं. फोडिया —२ पं. प्रसिद्ध बोली.—३ दे. त. प्रल्हादाचा.—४ त. कीर्ती.—५ पं. वोळसा.—६ पं. पीडा.—७ पं. सरे चि तो.—८ पं. मीण.—९ दे. त. नीति —१० त. पं. जैसें तैशापरी.—११ पं. सकळ ही बीज०.—१२ त. पं. मरण ते मुक्ति.—१३ पं. आपुले मनींचें करूनि पापांड । जनामध्यें भांड पोट भरी ॥ हें कडवें येथें जास्त आहे.—१४ दे. विचारी —१५ पं. भक्तीचा.—१६ दे. नो

अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढवया जगीं प्रेमसुख ॥ २ ॥ टाळ [1]घोष कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ४ ॥

१४४६. आशा तृष्णा माया अपमानाचे बीज । [2]नासिलिया पूज्य होइजेतें ॥ १ ॥ अधीरासी नाहीं चालों जातां मान । दुर्लभ [3]दर्शन धीर त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आणिकांसी बोल । वांयां जाय मोल बुद्धीपाशीं ॥ ३ ॥

१४४७. चिंतनें[4] सरे तो धन्य[5] जाणा काळ । सकळ मंगळ मंगळांचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संसार[6]सिंधु नाहीं हरिदासां[7] । गर्भवास कैसा नेणती ते ॥ ध्रु. ॥ जनवन ऐसें[8] कृपेच्या सागरें । दाटला आभारें[9] पांडुरंग ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ॥ ३ ॥

१४४८. मोक्षाचें आह्मांसी नाहीं अवघड । तो असे उघडें[10] गांठोळीस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ ध्रु. ॥ ज्याचें त्यासी देणें कोणें[11] तें उचित । मानूनियां हित घेतों सुखें[12] ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें देई[13] संवसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ३ ॥

॥ १२ ॥

१४४९. चिंतनासी न लगे वेळ । सर्व काळ करावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥ ध्रु. ॥ पढिये सर्वोत्तम[14] भाव । येथें[15] वाव पसारा ॥ २ ॥ ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥ ३ ॥

१४५०. अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तो चि बाधी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय[16] तुझा देवा ॥ ध्रु. ॥ अखंड तें खंडे संकल्पीं विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसे दशे सुखरूप ॥ ३ ॥

१४५१. एकाचिया धांव्या[17] टोके । एक फिके उपचार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥ ध्रु. ॥ एकाचें[18] तें उच्छिष्ट खाय । एका जाय ठेकवूनि[19] ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु सोपें । बहु रूपें अनंत ॥ ३ ॥

---

१ पं. त. घोळ.–२ पं. नासील या.–३ दे. त. दरुषण.–४ पं. चिंतनें जो सरे तो चि धन्य काळ ।.–५ दे. "धन्य जाणा काळ" याच्याबद्दल "धन्य काळ ।."–६ दे. त. ससार.–७ पं. हरिच्या दासा.–८ पं. ऐसा–९ पं. आभार–१० दे. उघाड.–११ पं. कोणाचें उचित.–१२ पं. सुखे.–१३ पं. घेई.–१४ दे. सर्वोत्तमा –१५ पं. इतर.–१६ पं. ठाव–१७ पं. धाटा टोके । एका फिके० –१८ दे. एकाचेयें उच्छिष्ट०.–१९ पं. ठकउनी. दे. त. ठकोणि.

१४५२. कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांयां ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका हें सोपें वर्म । न लगे श्रम चिंतना ॥ छ्र ॥ मृत्याचिये अंगीं छाये । उपाये चि खुंटतां ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे जन । येथें मन असों द्या ॥ ३ ॥

१४५३. ज्यानें ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ छ्र ॥ अवघें साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥ २ ॥ तुका ह्मणे जें जें करी । तें तें हरी भोगिता ॥ ३ ॥

१४५४. आचरती कर्में । तेथें काळें कर्मधर्में ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खेळे गोवळियांसवें । करिती तें त्यांचें साहावें ॥ छ्र ॥ यज्ञमुखें घांस । मंत्रपूजेसी उदास ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरी । योगियां ही सर्वे करी ॥ ३ ॥

१४५५. नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तनें तो चि ठेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ॥ छ्र ॥ आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ॥ २ ॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥ ३ ॥ परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त जालों वाचा उच्चारितां ॥ ४ ॥ कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामा आधीं ॥ ५ ॥ सगुण निर्गुण तुज ह्मणे वेद । तुका ह्मणे भेद नाहीं नांवां ॥ ६ ॥

१४५६. भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिकल्या बोलाचा धरीसील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ॥ छ्र ॥ हिरा परिस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परी जन संतां तैसी ॥ २ ॥ सरितां व्हाहाळां गंगे सागरा समान । लेखी तयाहून अधम नाहीं ॥ ३ ॥ आणीक अमुप होती तारांगणें । रविशशिमानें लेखूं नये ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं नम्रता अंगीं । नव्हे तें फिरंगी कठिण लोह ॥ ५ ॥

१४५७. आणीक कांहीं मज नावडे मात । ऐका पंढरिनाथावांचूनियां ॥ १ ॥ त्याची च कथा आवडे कीर्तन । तें मज श्रवण गोड लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे संत ह्मणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनी कांहीं ॥ ३ ॥

---

१ दे. त. ज्याणे ज्याणे.–२ पं. धर्माधर्में–३ पं. कीर्त्तनें तूं चि ठेलें–४ पं. जाली.–५ पं. नामीं.–६ पं. धरितील.–७ पं. जाती–८ पं. वोहळ. त. वाहळ–९ पं. मोज्ं०.–१० पं. नम्रता–११ पं. "मज" हा शब्द नाहीं–१२ दे. त. एक पंढरिनाथ वांचुनिया.–१३ दे. श्रवणें.

१४५८. देवा जाणीव शुंडून । येथें भाव चि प्रमाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरिराज ॥ छ ॥ तर्कवितर्कासी । वाव न लगे सायासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भावेंविण । अवघा बोलती तो सीण ॥ ३ ॥

१४५९. येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो चि ध्यावा ऐका चित्तें[1] । करूनि रितें कळिवर ॥ छ ॥ षडउर्मी हृदयांत । यांचा अंत पुरवूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥ ३ ॥

१४६०. मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंतीं[2] ॥ १ ॥ सुख पावे शांती धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभे थोडा च विचार । परी हे प्रकार नागविती ॥ ३ ॥

१४६१. कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणीक नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पावेल गौरव वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतां ॥ छ ॥ शब्दज्ञानी एक आपुल्याला मतें । सांगती वेदांत भिन्नभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक भाव न धरिती । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ॥ ३ ॥

१४६२. देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ति । तया इच्छा गति[3] । हें चि सुख आगळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धी द्वारीं । कर जोडूनि उभ्या ॥ छ ॥ नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नास । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥ २ ॥ तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे रे मेघश्यामा[4] । तुका ह्मणे आह्मां । जन्म गोड यासाटीं ॥ ३ ॥

१४६३. न पूजीं आणिकां देवां न करीं त्यांची सेवा । न मनीं या केशवाविण दुजें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय उणें जालें मज तयापायीं । तें मी मागों काई कवणासी[5] ॥ छ ॥ आणिकाची कीर्ती नाइकें न[6] बोलें । चाड या विठ्ठलेंविण नाहीं ॥ २ ॥ न पाहें लोचनीं श्रीमुखावांचूनि । पंढरी सांडूनि न वजें कोठें ॥ ३ ॥ न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास । न भें[7] संसारास येतां जातां ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजें ॥ ५ ॥

१४६४. नव्हे खळवादी मतां[8] च पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साक्षत्वेंसी मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥ छ ॥ नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥ २ ॥ तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वांयां श्रमों नये ॥ ३ ॥

---

१ पं. एक चित्तें.—२ पं. चित्ता.—३ पं. उभया.—४ दे. त. मेघशामा.—५ पं. कवणापें. त. आणिकांसी—६ पं. "न बोलें" याबद्दल "नाबोळ".—७ पं. भीये.—८ त. मताचा पुरता. पं. मताचि.

१४६५. या चि नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभें उत्तम संकल्प ॥ छ ॥ विजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । शुद्ध करावें हे निंत ॥ ३ ॥

१४६६. कुशळ वक्ता नव्हे जाणीव श्रोता । राहे भाव चित्ता धरूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥ छ ॥ न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं रामराम ॥ २ ॥ जप तप ध्यान नेणे योगें युक्ती । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनि ॥ ४ ॥

१४६७. काळाचिया सत्ता ते नाहीं घटिका । पंढरीनायका आठवितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सदाकाळ गणना करी आयुष्याची । कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ छ ॥ याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे हे त्रिजगतीं थोर वांट ॥ २ ॥ तुका ह्मणे जन्मा आलियाचें फळ । स्मरावा गोपाळ तें चि खरें ॥ ३ ॥

१४६८. घरोघरीं बहु जाले कवि । नेणे प्रसादाची चवी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥ छ ॥ काढावें आइतें । तें चि जोडावें स्वहितें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । परि होवाती अंधळे ॥ ३ ॥

१४६९. नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥ छ ॥ नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिये दृष्टी पाप वाढे ॥ ३ ॥

१४७०. कथा करोनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रवरव कुंभपाक भोगिती यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥ छ ॥ असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ॥ २ ॥ तुका ह्मणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥ ३ ॥

१४७१. नाइकावे कानीं तयाचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥ छ ॥

---

१ पं. अशुभ.–२ पं. हित.–३ पं. जाणीव तो श्रोता–४ पं. रामनाम–५ दे. याग.–६ पं. काळाची ते सत्ता–७ पं. वाटे–८ पं. "बहु" शब्द नाहीं.–९ पं. आहाच शास्त्रील डोळे ।.–१० पं. करिती.

अहं ब्रह्म ह्मणोनि पोळीतसे[1] पिंडा । नो[2] बोलावें भांडा तया सवें ॥ २ ॥ वेदबाह्य लंड बोले जो[3] पापांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खंडी देवभक्तपण । वैरिष्ठ[4] त्याहूनि श्वपच तो ॥ ४ ॥

१४७२. वेदविहित तुह्मी आइका हो कर्मे । बोलतों तीं वर्में[5] संतांपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं[6] विभागिलें ॥ ध्रु ॥ प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥ २ ॥ आंबे बोरी वडँ[7] बाभुळा चंदन । गुणांगुणें[8] भिन्न अग्नि एक ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन उन्मन जों होय । तोंवरि हे सोय विधि पाळीं ॥ ४ ॥

१४७३. तीर्थाचें[9] जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें आह्मीं देखिलें आपुलया नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ ध्रु ॥ जीवांचें जीवन सुखाचें सेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥ २ ॥ जनांचा जनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां[11] काळ ॥ ३ ॥ सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं[12] तें चि असे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं श्रुती आतुडलें । आह्मां सांपडलें गीतीं गावां ॥ ५ ॥

१४७४. माझे मनोरथ पावँविले[13] सिद्धी । तई पायीं बुद्धि स्थिरावली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें[14] हे ॥ ध्रु ॥ त्रिविध तापाचें जालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥ २ ॥ महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगेंअंगीं[15] संग अखंडित ॥ ३ ॥ जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामाविलें[16] ॥ ४ ॥ तुका ह्मणे माप भरी आलें सिगे[17] । धारवोळ गंगे पूर वाहे ॥ ५ ॥

१४७५. कृपेचें[18] उत्तर देवाचा प्रसाद । आनंदीं आनंद वाढवावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुतांच्या भाग्यें लागलें जाहाज । येथें आतां काज लवलाहें[19] ॥ ध्रु ॥ अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें[20] आतां चुका न पाहिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे जिव्हाश्रवणाच्या द्वारें । माप भरा बरें सिगेवरि ॥ ३ ॥

---

१ दे. त. पाळित—२ पं. बोलों नये भांडा०.—३ पं. तो—४ त. वरिष्ठ तो जाण श्वपचाहूनि ।.—५ पं. बोलतो तें वर्म.—६ पं. जगीं—७ पं. वन.—८ पं. गुणागुण त. गुणागुणीं—९ दे. तीर्थाचे मूळ व्रतांचें फळ. त. तीर्थाचें तें मूळ व्रताचें तें फळ.—१० पं. जगाचा—११ दे. त. पं. दृष्टा.—१२ पं. तो.—१३ दे. पावले.—१४ दे. स्मरण हें.—१५ पं. अंगोअंगीं—१६ पं. मावळे—१७ पं. सीग.—१८ पं. कृपेची.—१९ पं. लवलाहो.—२० पं. आतां येथें चुका०

१४७६. पापपुण्यसुखदुःखाचीं मंडळें । एक एकोवळें वाव घेती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवांसी तो[3] ॥ छ्रु ॥ स्वर्गाचिया भोगें सरतां नरक । मागें पुढें एक एक दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे भय उपजलें मना । घेईं नारायणा कडिये मज ॥ ३ ॥

१४७७. वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला आतां अंगीकार । न मनी भार समर्थ ॥ छ्रु ॥ संसाराचा नाहीं पांग । देवें सांग सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे कीर्ति वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥ ३ ॥

१४७८. कथा करोनियां मोल ज्यापें घेती । ते ही दोघे जाती नरकामध्यें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंड स्मरा रामराम ॥ छ्रु ॥ मधुरवाणीच्या नका पडों भरी । जाल यमपुरी भोगावया ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥ ३ ॥

१४७९. गोड नांवें क्षीर । पैरी साकरेचा धीर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥ छ्रु ॥ रुची नेदी अन्न । ज्यांत नसतां लवण ॥ २ ॥ अंधळ्याचे श्रम । शिकविल्याचें चि नेम ॥ ३ ॥ तुका ह्मणे तारा । [11]नांवें तंबुऱ्याच्या सारा ॥ ४ ॥

१४८०. नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि शूरत्वाचें अंग । हरि आणिला श्रीरंग ॥ छ्रु ॥ अवघा जाला पण । लवण सकळां कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे पाणी । [12]पांताळ तें परी खणी ॥ ३ ॥

१४८१. आपुल्या महिमानें । धातु [13]परिसें केलें सोनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें न मनीं माझे आतां । गुणदोष पंढरिनाथा ॥ छ्रु ॥ [14]गांवाखालील वाहाळ । गंगा न मनी असंगळ ॥ २ ॥ तुका ह्मणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥ ३ ॥

१४८२. आशाबद्ध वक्ता । भय श्रोतियांच्या[15] चित्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गातो तें चि[16] नाहीं ठावें । तोंड वासी [17]कांहीं द्यावें ॥ छ्रु ॥ जालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ॥ २ ॥ [18]माप आणि गोणी । तुका[19] ह्मणे रितीं दोन्ही ॥ ३ ॥

---

१ पं. एका वेळे डाव देती । –२ त. भूतांसी –३ पं. हा.–४ पं. देवें –५ पं. कीर्ती.–६ पं. अखंडित स्मरा रामनाम.।–७ पं. मधुरा वाणीच्या.–८ पं. कळिकाळ.–९ त. परि त्या साकरेचा• –१० पं. फास.–११ दे. पं. नाव –१२ पं. पातळपणें तळा आणि । –१३ पं. परिस.–१४ पं. गांवा मागील वोहळ.–१५ दे. त. श्रोतयाच्या.–१६ पं. ही –१७ पं. काय.–१८ पं. " उभयतां लोभी मन । वांया गेलें तें भजन ॥ बहिर्मुख एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥" हीं दोन कडवीं जास्त आहेत. –१९ दे. त. तुका ह्मणे गोणी । माप आणि रितीं दोन्ही

१४८३. तन्न शिष्या मान । दुग्धा ह्मणे नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशीं ज्ञानाचीं डोबडें । आशाविटंविलीं मूढें ॥ ध्रु ॥ उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ॥ २ ॥ रसनाशिश्नाचे अंकित । तुका ह्मणे वरदळ स्फीतिं ॥ ३ ॥

१४८४. ब्रह्मचारी धर्म घोकावें अक्षर । आश्रमीं विचार षट्कर्में[3] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग । संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ ध्रु ॥ परमहंस तरी जाणे सहज वर्म । तेथें याती धर्म कुळ नाहीं ॥ २ ॥ बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो सीण दुःख पावे ॥ ४ ॥

१४८५. आह्मी क्षेत्रींचे संन्यासी । देहभरित हृषीकेशी । नाहीं केली ऐशी । आशाकामबोहरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलें अयाचित अंगा । सहज तें आह्मां भागा । दाता पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिंती ॥ ध्रु ॥ दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडण । बंदीं[4] बंद कौपीन । बहिरवास औठडें ॥ २ ॥ काळें साधियेला काळ । मन करूनि निश्चळ । लौकिकीं विटाळ । धरूनि असों ऐकांत ॥ ३ ॥ कार्यकारणाची चाली । वाचावाचत्वें नेमिली । एका नेमें चाली । स्वरूपीं च राहाणें ॥ ४ ॥ नव्हे वेषधारी । तुका आहाच वरवरी । आहे तैसीं वरीं । खंडें निवँडितों वेदांची ॥ ५ ॥

१४८६. निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोंपी गुहा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोठें ही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥ ध्रु ॥ नये बोलों फार बैसों जनागर्धीं । सावधान बुद्धी इंद्रियें[9] दमी ॥ २ ॥ तुका ह्मणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ॥ ३ ॥

१४८७. जैसीं तैसीं तरी । शरणांगतें तुझीं हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ॥ ध्रु ॥ शुद्ध नाहीं चित्त । परी ह्मणवितों भक्त ॥ २ ॥ मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥ ३ ॥

१४८८. नाशवंत देह नसेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामें चि तारिले कोट्यान हे कोटी । नामें हे[11] वैकुंठीं बैसविले ॥ ध्रु ॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुह्मी मनीं आठवाना ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम वेदांसी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाटीं ॥ ३ ॥

---

१ दे. स्थित त. स्थित.—२ पं. घोकावी अक्षरें.—३ त. पं. षट्कर्में.—४ पं. बंद बंदाचा कोपीन ।.—५ पं. एकांता.—६ "वाच्यावाच्यत्वें" ह्मणावें —७ पं. "निवडितों" बद्दल "निवडी"— ८ पं. सर्वकाळ —९ पं. इंद्रिय.—१० पं. तुझीं शरणागतें हरी.—११ पं. ही

१४८९. ओळवितां[1] बाळें । मातेतें सुख आगळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ द्यावें आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥ छ ॥ लेवेंवूनि[2] अळंकार । दृष्टी करावी सादर ॥ २ ॥ आपुलिये पदीं । बैसवूनि कोडें वंदी ॥ ३ ॥ नेदी लागों दिठी । उचलोनि लावी कंठीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे लाभा । वारी घ्यां[3] वो पद्मनाभा ॥ ५ ॥

१४९०. तप तीर्थ दान व्रत आचरण । गातां हरिगुण वारूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोटि कुळें[4] त्याचीं वाटुली पाहाती । त्या तया घडती ब्रह्महत्या ॥ छ ॥ आपुलिया पापें न सुटे सायासें । कोणा काळें ऐसें निस्तरेल ॥ २ ॥ व्हावें साह्य तया न घलावें भय । फुकासाटीं पाहे लाभ घात ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित माना या वचना । सुख दुःख जाणा साधे फुका ॥ ४ ॥

१४९१. देवासाटीं जाणा तयासी च आटी । असेल ज्या गांठीं पुण्यराशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निर्बळा पाठवी बळें वाराणसी । गेला[5] आला त्यासी अर्ध पुण्य ॥ छ ॥ कथे निद्राभंग करावा भोजनीं । तया सुखा धणी पार नाहीं ॥ २ ॥ यागीं ऋर्ण[6] घ्यावें द्यावें सुख लाहीं । बुडतां चिंता नाहीं उभयतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म जाणोनि करावें । एक न घलैंवें[7] एकावरी ॥ ४ ॥

१४९२. अग्नीमाजी पडे धातु । लीन होउनि राहे आंतु[8] । होय शुद्ध न पवे घातु । पंटतंतुप्रमाणें[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघें चि भेंषण[10] । गर्व ताठा हें अज्ञान । मरेंण[11] सर्वे वाहातसे ॥ छ ॥ पुरें मातलिया नदी । ल्व्हा नांदे जीवनसंधीं । वृक्ष उन्मळोनि भेदी । परि तो कधीं भंगेना ॥ २ ॥ हस्ती परेंदळा[12] जो भंगी । तया पायीं न मरे मुंगी । कोण जाय संगी । पाणीवाणी तयेच्यां[13] ॥ ३ ॥ पिटितां घणें वरि सैरा । तया पोटीं राहे हिरा । तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनि ॥ ४ ॥ लीन दीन हें चि सार । भव उतरावया पार । बुडे माथां भार । तुका ह्मणे वाहोनि[14] ॥ ५ ॥

१४९३. आह्मी वीर झुंझार । करूं जमदाढे मार । तोंपाटिले[15] भार । मोड जाला दोषांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाला होहाकार[16] । आले हांकीत झुंझार । शंखचक्रांचे शृंगार । कंठीं हार तुळसीचे ॥ छ ॥ रामनामांकित बाण । गोपी लाविला चंदन । झळकती निशाणें[17] । गरुडटके पताका ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । जालों जिंकोनि निश्चळ । पावला सकळ । भोग आह्मां आमचा ॥ ३ ॥

---

१ पं. आळविती –२ पं. लेउनि.–३ प. घ्यावें –४ प. कुळी.–५ दे. त. मेला –६ दे. त. रीण. पं. रुण.–७ पं. घालावें –८ दे. अतु. त. अतु पं. आतु.–९ दे. पं. पटतंतुप्रमाण.–१० दे. भषण. प. भूषण.–११ पं. मरणा.–१२ त. परदळा तें भगी दे. परदळ तें भंगी –१३ पं. तयाच्या.–१४ पं. राहोनि.–१५ पं. थापटिले भार । मोड जाला महा दोषां ।–१६ प. हाह कार.–१७ पं. निशाण.

१४९४. आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे तें अधीन आपुले हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥ छ ॥ जाणतिया पाठीं लागला उपाध । नेणता[1] तो सिद्ध भोजनासी ॥ २ ॥ तुका ह्मणे भय बांधलें[2]से गांठी । चोर लागे पाठी दुम तया ॥ ३ ॥

१४९५. आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । घड तें नासोनि भलता टाकी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं[3] ॥ छ ॥ ओल शुद्ध काळी कोंळें[4] जिरें बीज । कैंचें लागे निज हांता[5] तेथें ॥ २ ॥ एक[6] गहू करिती अनेक प्रकार । सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे विषा रुचि एकां[7] हातीं । पाधानी नासिती नवनीत ॥ ४ ॥

१४९६. वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ छ ॥ काय मानुनियां राहिले निश्चिंती । काय जाब देती यमदूतां ॥ २ ॥ कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ३ ॥ काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणों ॥ ४ ॥ कां[8] हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ५ ॥ काय मोल यासी लागे धन वित्त । का हें याचें चित्त घेत नाहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कां हीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ७ ॥

१४९७. काय एकां जालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखतील डोळां ऐकेंतील[10] कानीं । बोलिलें पुराणीं तें ही ठावें ॥ छ ॥ काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥ २ ॥ कां हें कळों नये आपुलें[11] आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ॥ ३ ॥ कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणीं[12] आलें ॥ ४ ॥ कां हें जन्म वांयां घातलें उत्तम । कां हे रामराम न ह्मणती ॥ ५ ॥ काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥ ६ ॥ काय करिती हे बांधलियें[13] काळें । तुका ह्मणे वळें वज्रपाशीं ॥ ७ ॥

१४९८. झुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं वैसलासे ॥ छ ॥

---

१ पं. नेणता तो सावध भजनासी । –२ दे. बाधलें गांठीं. त. वांधियेलें –३ त. अळकारें.– ४ पं. काळी.–५ पं. हातीं –६ पं. एका गहु करी –७ पं. एक.–८ पं. " कां हीं " याच्याबद्दल "कां हे".–९ पं. ह्मणे –१० दे. पं. ऐकती.–११ पं. आपण.–१२ पं. कामा (ह्मणजे " कामा " असें दोन वेळ आहे).–१३ पं. बांधियेले.

ऊ[1]र्ध्व पुंड्र भाळीं कं[2]ठीं शोभे माळ । कांपिजे क[3]ळिकाळ तया भेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजी ॥ ३ ॥

१४९९. जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संचितासी जाय मिळोनियां खोडी । पतनाचे ओढीवरी[4] हांव ॥ छ० ॥ बांधलें गांठी तें लोंगलें[5] भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥ २ ॥ तुका ह्मणे जया गांवां जाणे जया । पुसोनियां तैया[6] वाट चाले ॥ ३ ॥

१५००. मानी भक्तांचे उपकार । ऋ[7]णीया ह्मणवी निरंतर । केला निर्गुणीं आकार । की[8]र्ति मुखें वर्णितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा । जाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ॥ छ० ॥ अंबऋषीकारणें । जन्म घेतले नारायणें । एवढें भक्तीचें लहणें । दास्य करी हें[10] दासावें[9] ॥ २ ॥ ह्मणियें[11] करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं । भक्तीचा आभारी । रीग न पुरे जावया ॥ ३ ॥ अर्जुनाचे रथवारु । ते वागवी सर्वेश्वरु । एवढे भक्तीचे उपकारु । मागें मागें हिंडतसे ॥ ४ ॥ पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउ[12]लीं विटेवरी । न वजे कट करीं । धरूनि तेथें राहिला ॥ ५ ॥ भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ । ह्मणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि ॥ ६ ॥

१५०१. सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांचा आह्मांसी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥ छ० ॥ रिद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ३ ॥

१५०२. टाकलोंसें द्वारीं । उभें याचक भीकारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज भीक कांहीं देवा । प्रेमें[13]भातुकें पाठवा ॥ छ० ॥ याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥ २ ॥ तुका ह्मणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥ ३ ॥

## सदाशिवावर अभंग ॥ २ ॥

१५०३. काय धर्म नीत । तुह्मां[14] शिकवावें हित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें रचियेलें हेळा । लीळा ब्रह्मांड सकळा ॥ छ० ॥ नाम महादेव । येथें निवडला भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे वेळे । माझें तुह्मां कां न कळे ॥ ३ ॥

१ दे. ऊर्ध्व पुंड्र भाळीं. त. उर्ध्व पुंड्र भाळीं. पं. ऊर्ध्व पुंड्र माळ.—२ दे. कंठीं शोभे माळी. त. कंठीं शोभे माळ.—३ त. कळि काळें.—४ पं. जोडीवरि.—५ पं. लागलें.—६ पं. "तया" हा शब्द नाहीं.—७ दे. त. रुणीया.—८ पं. कीर्ति मुखें गर्जतां.—९ पं. राहावें.—१० त. पं. "हा" शब्द नाहीं.—११ पं. मनीयें.—१२ पं. पाउलें.—१३ पं. प्रेम मोहरी पाठवा.—१४ पं. तुज.

१५०४. भांडावें ते[1] गोड । पुरे सकळ ही कोड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा घरींचा या मोळा । ठावा निकटां जवळां ॥ छ्र ॥ हाक देतां दारीं । येती जवळी सामोरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे शिवें । मागितलें हातीं द्यावें ॥ ३ ॥

॥ २ ॥

१५०५. ऐसें[2] कां जालें तें मज ही न कळे । कीर्तनाचे रळेपळे जगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसें तुह्मां देवा वाटतसे बरें । संतांचीं उत्तरें लाजविलीं ॥ छ्र ॥ भाविकां कंटक करिताती पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम निर्वाणीचा बाण । याचा अभिमान नाहीं तुह्मां ॥ ३ ॥

१५०६. तुह्मी बैसलेती निर्गुणाचे खोळे । आह्मां कां हे डोळे कान दिले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाइकवे तुझी अपकीर्त्ति देवा । अ[3]व्हेरली सेवा न देखवे ॥ छ्र ॥ आपुले पोटीं तों राखियेला वाव । आह्मांसी कां भाव अल्प दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखी ऐसें हें कळों द्या । पुढिलिया धंद्या मन नेघे ॥ ३ ॥

१५०७. सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सारा अवघें गावाळ । डोळ्या आडील पडळ ॥ छ्र ॥ शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । परि होताती अंधळे ॥ ३ ॥

१५०८. अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ छ्र ॥ माझी कोणी न धरो शंका । हो[5] कां लोकां [6]निर्द्वंद्व ॥ २ ॥ तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें[7] ॥ ३ ॥

१५०९. सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें अळंकार शोभती सकळ । भाववळें फळ इच्छेचें तें ॥ छ्र ॥ अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्याविण ॥ ३ ॥

१५१०. काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोरींव सांडिली आपुली परिसें । [8]नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ छ्र ॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उप[9]कारें ॥ २ ॥ भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ४ ॥

---

१ त. तों.–२ पं. ऐसें कां जालें मज तें ही न कळे.–३ पं. अव्हेरिले.–४ पं. ऐसें. त. आहे–५ पं. ऐसें हो कां निद्वद–६ दे. निद्वद. त. निर्द्वंद.–७ पं. ऐसा.–८ दे. नेणसि यो. पं. नेणो शिवो–९ पं. पर उपकारें.

१५११. जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी सांभाळिलों[1] संतीं । भय निवारली[2] खंती ॥ छ ॥ कृतकृत्य[3] जालों । इच्छा केली ते पावलों ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । आतां करूं न शके बळ ॥ ३ ॥

१५१२. काय पुण्यराशी । गेल्या भेदूनि आकाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी जालेति कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥ छ ॥ काय बोळलें संचित । ऐसें नेणें अगणित ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें । काय केलें नारायणें ॥ ३ ॥

१५१३. असें येथींचिया दीनें[4] । भाग्यहीन[5] सकळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भांडवल एवढें[6] गांठीं । नाम कंठीं धरियेलें ॥ छ ॥ आणिक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला कोणें । एवढा नेणें लौकिक ॥ ३ ॥

१५१४. गायें नाचें वांयें[7] टाळी । साधन कळी[8] उत्तम हें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाणों तरले किती । नांव ऐती या वैसा ॥ छ ॥ सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥ ३ ॥

१५१५. सर्वकाळ माझे चित्तीं । हे चि खंती राहिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसलें तें रूप डोळां । वेळोवेळां आठवे ॥ छ ॥ वेव्हाराची सरली मात । अखंडित अनुसंधान ॥ २ ॥ तुका ह्मणे वेध जाला । अंगा आला श्रीरंग ॥ ३ ॥

१५१६. जैसें[9] दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुःख पावायाचें मूळ । रहणी[10] ठाव नाहीं ताळ ॥ छ ॥ माळामुद्रांवरी । कैंचा सोंगें जोडे हरि ॥ २ ॥ तुका ह्मणे देखें । ऐसे[11] परीचीं बहुतेकें ॥ ३ ॥

१५१७. अवघा तो शकुन । हृदयीं देवाचे चरण[12] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥ छ ॥ संग हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिच्या दासां । शुभकाळ अवघ्या दिशा ॥ ३ ॥

१५१८. ब्रह्मरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेविलिया दिसे[13] रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा स्फटिक मणि ॥ छ ॥ नानाभाषामतें[14] आळविती वाळा । प्रबोध[15] तो मूळा जननीठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें नमन जाणतियां । लागतसें पायां वेळोवेळां ॥ ३ ॥

---

१ पं. सांभाळिलें.–२ पं. निरसली –३ दे. त कृत्याकृत्य पं. कृत्यकृत्य.–४ दे. पं. दिनें –५ त. भाग्यहीने –६ त. पं. वाहें.–७ पं. कली.– ८ दे. "वैसती या नावेवरी" असें मागून शोध व छक घालून केलें आहे. प्रथम पं. व त. याजप्रमाणेंच पाठ होता त. नाव आडनी.–९ पं. जैसा –१० दे. रहनी –११ पं. ऐसीं.–१२ पं. चिंतन.–१३ त. दावी.–१४ त. नानाभाषा मत्यें आळविनां बाळा. पं. नानाभाषे माते आळविती बाळें –१५ पं. प्रबोधी तो मूळ जननी०.

१५१९. नाहीं सुगंधाची लागत[1] लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाऱ्या हातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण ॥ ध्रु ॥ प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तें[2] जन सकळ साक्षी ॥ २ ॥ तुका ह्मणे वरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हा ॥ ३ ॥

१५२०. तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे विष्णुदास नव्हती सावडे । एकाचिया पडे पायां एक ॥ ध्रु ॥ अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे विधिनिषधाचे डोहीं । पडिले[3] त्यां नाहीं देव कधीं ॥ ३ ॥

१५२१. पटे ढाळूं आह्मी विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पापपुण्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निर्भर अंतरीं सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥ ध्रु ॥ बळिवंत जेणें रचिलें सकळ । आह्मां त्याचें बळ अंकितांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी देखत चि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥ ३ ॥

१५२२. कथेचा उलंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखवा[4] तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया जीऊन जाला भूमी भार । अनउपकार[5] माते कुंसी ॥ ध्रु ॥ निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे दोन्ही बुडविलीं कुळें । ज्यांचें[6] तोंड काळें कथेमाजी ॥ ३ ॥

१५२३. सांडोनियां[7] दों अक्षरां । काय करूं हा पसारा । विधिनिषेधाचा भारा । तेणें दातारा नातुडसी[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि बोबड्या[9] उत्तरीं । वाचे जपें निरंतरीं । नाम तुझें हरी । भवसागरीं तारूं तें[10] ॥ ध्रु ॥ सर्वमय ऐसें वेदांचें वचन । श्रुति गर्जती[11] पुराणें । नाहीं[12] आणीक ध्यान । रे साधन मज चाड ॥ २ ॥ शेवटीं[13] ब्रह्मार्पण । या चि मंत्राचें कारण । काना मात्रा[14] वांयांविण । तुका ह्मणे बिंदुलीं[15] ॥ ३ ॥

१५२४. हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधुपार उतरलों[16] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फावलें फावलें आतां । पायीं संतां विनटलों ॥ ध्रु ॥ हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा छेदिला ॥ २ ॥ हरिनामांचीं[17] धनुष्यकांडें । विन्मुख तोंडें कळिकाळ ॥ ३ ॥

---

१ दे. लागती –२ पं. तें.–३ पं. वुडाले.–४ पं. ओळखावा तो –५ दे. आन्न. त. आण. ("अनुपकार" याच्याबद्दल "अनउपकार" असा कवीचा अभिप्राय दिसतो.) –६ पं. त्याचें.– ७ दे. त. साडोनी –८ दे. नातुडेसी.–९ दे. त. बोवडा –१० पं. हें –११ पं. बोलती.–१२ पं. नाहीं आन ध्यान। साधनें मज चाड ॥.–१३ पं. सेवटीं हें ब्रह्मार्पण।.–१४ दे. त. मात्र.–१५ पं. विंदुलें – १६ त. उतरीलों. पं. उतरले.–१७ त. पं. हरिनामाचें.

येणें चि बळें सरते आह्मी । हरिचे नामीं[1] लोकीं तिहीं[2] ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों साचे । श्रीविठ्ठलाचे डिंगर ॥ ५ ॥

१५२५. नव्हे[3] हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आरुष हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥ छ्र ॥ देहपिंड दान दिला एकसरें । मुळिचें तें खरें टांकसाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ॥ ३ ॥

१५२६. घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेंवी[4] । तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षीवर्तनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं । विचित्र ये रंगीं । रंगें रंगला गोसावी ॥ छ्र ॥ देह संकल्पासारिखें[5] । एक एकांसी पारिखें । सुख आणि दुःखें । अंगीं कर्में त्रिविध ॥ २ ॥ तुका ह्मणे कोडें । न कळे तयासी सांकडें । त्याचिया निवाडें । उगवे[6] केलें विंदान ॥ ३ ॥

१५२७. सद्गदित कंठ दाटो[7] । येणें फुटो[8] हृदय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो[9] विठ्ठला ॥ छ्र ॥ नेत्रीं जळ वाहो[10] सदा । आनंदाचे रोमांच ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ३ ॥

१५२८. जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनि संचलें ॥ छ्र ॥ सरसावलें मन । केलें सोज्वळ लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वें । आतां असिजेत[11] देवें ॥ ३ ॥

१५२९. तान्हे तान्ह प्याली । भूकें भुकेनें[12] खादली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयें तें च नाहीं जालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥ छ्र ॥ वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥ २ ॥ शेष उरला तुका । जीवें[13] जीवीं जाला चुका ॥ ३ ॥

१५३०. पाणिपात्र दिगंबरीं[14] । हस्त करा सारिखे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ छ्र ॥ भिक्षा कामधेनुऐशी । अवकाशीं शयन ॥ २ ॥ पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं[15] ॥ ३ ॥

१५३१. विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ छ्र ॥

---

१ दे. नामें –२ पं. तिहीं लोकीं.–३ पं. नव्हे गुरुत्व –४ त. तेवी.–५ पं. सद्वल्यासारिखें.– ६ पं. उठाव (पण हा लेखकप्रमाद आहे).–७ त. दाटे –८ त. फुटे –९ पं. हो –१० त. वाहे – ११ असिजेतें ?–१२ त. भूक भुकेली च ठेली ।.–१३ पं. जीव जीवा जाला०.–१४ दे. न दिगांवरा. पं. दिगांवर.– १५ पं. त. आलक्षीं

लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे गंगासागरसंगमीं । अवघ्या जाल्या ऊर्मि एकमय ॥ ३ ॥

१५३२. कृष्णरामनाम मांडीं पैंवोळी । तेणें होइल होळी पापा धुनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥ छ ॥ जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस नुरे[4] मागुताली ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥ ३ ॥

१५३३. परमार्थी तो न ह्मणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोडा चि स्फुलिंग वहुत दावाग्नी । वाढतां इंधेनीं वाढविला ॥ छ ॥ पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देवें[6] वसे ॥ २ ॥ तुका ह्मणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ३ ॥

१५३४. ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ छ ॥ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ २ ॥ तुका ह्मणे भेदाभेद । गेले[8] वाद खंडोनि ॥ ३ ॥

१५३५. सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघें चि घरीं बैसलिया ॥ छ ॥ देवाचीं च नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे भावें चि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ३ ॥

१५३६. ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनियां ऐसें[10] सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ छ ॥ वेदपरायेणें[11] पंडित वाचक । न मिळती एक ऐकांमधीं[12] ॥ २ ॥ पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥ ३ ॥ आपुलिया नाहीं निवाले जे अंगें[13] । योगी करती रागें गुरगुरु ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज कोणांचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥ ५ ॥

१५३७. पंढरीची वाट पाहें निरंतर । निडळावरी कर ठेवूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातियां निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥ छ ॥

---

१ पं. रामकृष्णनाम.–२ त. मांडी पारे वोळी. (मांडीं रे पावोळी असावें).–३ पं. पापधुनी.–४ पं. उरे–५ त. यिधनीं.–६ पं. देवकार्जी–७ दे. त. पं. दरुषणें.–८ पं. गेला.–९ पं. होय–१० पं. ह्मणउनि आवघे सांडीं रे उपाया.–११ दे. वेदपारायण.–१२ पं. एकान्तीं.–१३ पं. आंग। येकी करती०

पैलें कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिकें चतुर्भुज ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ॥ ३ ॥

१५३८. ऐसी जोडी करा रांम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा सीण तें चि फळ ॥ छ ॥ नाव धड करा सहस्त्रां[3] नामांची । जे भवसिंधूची थडी पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे काळा हाणा तोंडावरी । भाता भरा हरिरामबाणीं[4] ॥ ३ ॥

१५३९. पाहें मजकडे भरोनियां दृष्टी । बहुत हिंपुटी[5] जालों माते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक[6] ॥ छ ॥ सत्यासाटीं माझी शब्दविवंचना । जोडिल्या वचनाचें तें नव्हे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥ ३ ॥

१५४०. तुज ह्मणतील कृपेचा सागर । तरि कां केला धीर पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आझुनि कां नये तुज माझी दया । काय देवराया पाहातोसि ॥ छ ॥ आळवितों जैसें पाडस कुरंगिणी । पीडिलिया वनीं तानभूक[7] ॥ २ ॥ प्रेमरसपान्हा पाजीं माझे आई । धांवें वो विठाई वोरसोनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें कोण हरी[8] दुःख । तुजविण एक पांडुरंगा ॥ ४ ॥

१५४१. भक्ति तों[9] कठिण शुळावरील पोळी । निवडे[10] तो बळी विरळा शूर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंती[11] तांतडीची ॥ छ ॥ कामविलें[12] तरि पाका ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥ २ ॥ तुका ह्मणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ ३ ॥

१५४२. पापी ह्मणों तरि आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशा विचाराचे[13] घालूनि कोंडणी । काय चक्रपाणी निर्जलेती[14] ॥ छ ॥ एकवेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कैसें नेलें दुःख ॥ २ ॥ तुका ह्मणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमाचिया ॥ ३ ॥

१५४३. उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणों किती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ख्यांती[15] केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ॥ छ ॥ मोकलिला प्रायश्चितीं । कोणी न धरिती हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्त वाट । वैकुंठीची घडघडाट ॥ ३ ॥

---

१ पं. हें कडवें नाहीं.—२ पं. नाम —३ पं. त. सहस्र —४ पं. हरिराम वाणें —५ दे. हिंपुष्टी.—६ दे. त. श्रुंघारिक. पं. शृघारिक.—७ त. तान भुके.—८ पं. हरिल.—९ पं. ते.—१० पं. "निवडे तो" याबद्दल "निवडतो".—११ पं. भीत —१२ पं. कामाविलें तरी पिका वोज घडे.—१३ पं. विचाराची.—१४ पं. पाहातोसी.—१५ दे. त. ख्यात.

१५४४. सरळीं हीं[1] नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुण्य पर्वकाळ तीर्थें हीं सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥ छ ॥ अवघे चि लाभ वैसालिया घरा । येती भाव धरा एके ठायीं ॥ २ ॥ सेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती ह्मैसी । कामधेनु तैसी नव्हे एकें[2] ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभ चि ॥ ४ ॥

१५४५. पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील रासी पातकाच्या ॥ छ ॥ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ २ ॥ काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ४ ॥

१५४६. पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें[3] तिर्थें जगीं दानें व्रतें ॥ छ ॥ चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथां ॥ २ ॥ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेंदी पाव हात कांहीं ॥ ३ ॥ [4]तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥ ४ ॥

१५४७. येणें बोधें आह्मी असों सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी भूमीवरी एक दैइवांचे[5] । निधान हें वाचे सांपडलें ॥ छ ॥ तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥ २ ॥ न चळे हा मंत्र न ह्मणों[6] यातीकुळ । न लगे काळ वेळ विचारावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल विसांवा । सांटवीन हांवा हृदयांत ॥ ४ ॥

१५४८. बहुतां जन्मींचें[7] संचित । सबळ होयें[8] जरि वहुत । तरि चि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणवी ह्मणियारा तयांचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले[9] वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥ छ ॥ असे भूतदया मानसीं । अवघा देखे हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यांसी[10] । मागें मागें हिंडतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म[11][12] चुकलें ॥ ३ ॥

---

१ पं. हें.–२ पं. एकी –३ पं. तप तीर्थ जगीं दान व्रतें ।–४ पं. हें कडवें लेखकप्रमादानें लिहिण्याचें राहिलें आहे –५ पं. "दैवांचे" याबद्दल छंदासाठीं "दइवांचे" असें सर्व प्रतींत लिहिलें आहे –६ पं. न ह्मगे –७ पं. जन्मांचें.–८ पं. जरि होय.–९ पं. अतरीं.–१० पं. अनुसरल्या – ११ दे. त. तयासी –१२ पं. जन्मा

१५४९. तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें रासी धन ॥ छ्र ॥ जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ २ ॥ तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥ ३ ॥

१५५०. आळवीन स्वरें । कैशा मधुरा उत्तरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यें वो यें वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दें गे ॥ छ्र ॥ पसरूनि चोंची । वेचनें हीं करुणेचीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । आह्मी लेंडिवाळें आळीं ॥ ३ ॥

१५५१. सकळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचून ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूप दाखवीं रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥ छ्र ॥ शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे कान्हा । भूक लागली नयनां ॥ ३ ॥

१५५२. पतितपावना । दिनानाथा नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझें रूप माझे मनीं । राहो नाम जपो वाणी ॥ छ्र ॥ ब्रह्मांडनायका । भक्तजनाच्या पाळका ॥ २ ॥ जीवांचिया जीवा । तुका ह्मणे देवदेवा ॥ ३ ॥

१५५३. करीं हें चि काम । मना जपें राम राम ॥ १ ॥ लागो हा चि छंद । मना गोविंद गोविंद ॥ २ ॥ तुका ह्मणे मना । मज भीक द्यावी दीना ॥ ३ ॥

१५५४. आपुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाम धरिलें दिनानाथ । सत्य करावया व्रत ॥ छ्र ॥ आघात निवारी । छाया पीतांबरें करी ॥ २ ॥ उभा कर कटीं । तुका ह्मणे याजसाटीं ॥ ३ ॥

१५५५. साधावया भक्तिकाज । नाहीं लाज हा धरीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची ॥ छ्र ॥ भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे सांक्ष हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ॥ ३ ॥

१५५६. धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें करीं वो माझे आई । ठाव देउनि राखें पायीं ॥ छ्र ॥ काढितां तळमळी । जिवनाबाहेर मासोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे कुडी । जीवाप्राणांची आवडी ॥ ३ ॥

१५५७. हरिजनाची कोणां न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयंकर खळां कष्ट ॥ छ्र ॥ दुर्वास हो छळों आला आंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित

१ पं. मधुर.–२ दे. वचन हें करुणेची. पं. वचनें हे करुणेची.–३ त. पं. लडिवाळे आळी.–४ पं. नाहीं.–५ त. रूप दावीं रे अनता ।.–६ पं. जीवींचिया.–७ पं. "आघात" याबद्दल "घात आघात".–८ त. पीतांबर.–९ पं. नाहीं लाज धरीत –१० पं. साक्षी.–११ पं. "हा" नाहीं.

फिरे ॥ २ ॥ द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांति । होऊनि श्रीपति साह्य केलें ॥ ३ ॥ न साहे चि वधु पांडवां पारिखा । धुडाविला सखा बळिभद्र ॥ ४ ॥ तुका ह्मणे अंगीं राखिली दुर्गंधि । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ५ ॥

१५५८. ज्यासी आवडी हरिनामांची । तो चि एक बहु शुचि ॥ १ ॥ जपेतो हरिनाम बीज । तो चि वर्णांमाजी द्विज ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्ण धर्म । अवघें आहे सम ब्रह्म ॥ ३ ॥

१५५९. विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां विठ्ठल जीवन । टाळ चिपळिया धन ॥ ध्रु. ॥ विठ्ठल हे वाणी । अमृत हे संजिवनी ॥ २ ॥ रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥ ३ ॥

१५६०. विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मूळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्यवंता छंद मनीं । कोडें[5] कानीं ऐकती ॥ ध्रु. ॥ विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥ २ ॥ तुका ह्मणे भलते याती । विठ्ठल चित्तीं ते[6] शुद्ध ॥ ३ ॥

१५६१. ह्मणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तो[7] हो का कोणी एक । आदि करोनि ब्रह्मादिक ॥ ध्रु. ॥ नाहीं विठ्ठल जया ठावा । तो ही डोळां न पाहावा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । त्याची भीड मज कांहीं ॥ ३ ॥

१५६२. एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मारा हाक देवा भय अंटाहासें । जंव काळाऐसें जालें नाहीं ॥ ध्रु. ॥ मरणांची तंद गांठोडी पदरीं । जिणें[11] तो चि वरि माप भरी ॥ २ ॥ तुका ह्मणे पिंगें[12] वाहाती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥ ३ ॥

१५६३. संतांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अन्हेरितो[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि तया न वजावें ठाया । होतसे घात या [14]दुर्बळाचा ॥ ध्रु. ॥ भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ॥ २ ॥ तुका ह्मणे जया संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ॥ ३ ॥

---

१ दे. त. साहे.—२ पं. जपे हरिनाम बीज. दे. जपतो हरिनामें बीज.—३ पं. विठ्ठ्ल विठ्ठल वाणी—४ पं. सर्व अंगें—५ पं. कोड.—६ पं. शुद्ध ते.—७ पं. "तो" नाहीं—८ पं. जया विठ्ठल नाहीं ठावा.—९ पं. व्हाना.—१० पं. अटाहास्य—११ पं. जिणें तो चि माप भरे.—१२ दे. त. पं. भींग (पण शब्दकोशात 'भिंग" असा आहे)—१३ पं. अन्हेरितो.—१४ पं. दुर्बळासी.

१५६४. संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हेंडग्याच्या[1] आळां अवघीं चिपाडें । काय तेथें[2] गोडें निवडावीं ॥ छ्र ॥ ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला सेटीं[3] विचार त्या ॥ ३ ॥

१५६५. जातीचें[4] तें चढे प्रेम । पक्षी स्मरे राम राम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते काय गुण लागती येरां । कांगा[5] पिंजरा शोभेना ॥ छ्र ॥ शिकविलें तें[6] सुजात सोसी । मग[7] तयासी मोल चढे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेषधारी । हिजड्या नारी नव्हेति[8] ॥ ३ ॥

१५६६. वैसोनि[9] थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंड पिटी करी हांवा ॥ छ्र ॥ फुंगतें[10] काउळें । ह्मणे मी राजहंसा आगळें ॥ २ ॥ गजाहूनि खर । ह्मणे चांगला मी फार ॥ ३ ॥ मुलाम्याचें नाणें । तुका ह्मणे नव्हे सोनें ॥ ४ ॥

१५६७. मुक्त होता परी बळें जाला बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ॥ १ ॥ पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणे कोण [11]करिता तो ॥ २ ॥ [12]तुका ह्मणे वांयां गेलें वांयां विण । जैसा मृगशीण मृगजळीं ॥ ३ ॥

१५६८. पंढरिये माझें[14] माहेर साजणी । ओवियें कांडणीं गाऊं गीतें[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता मौहियेर ॥ छ्र ॥ उद्धव अक्रूर व्यास आंबऋषि । भाई नारदासी गौरवीन ॥ २ ॥ गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । यांचें कवतुक वाटे मज ॥ ३ ॥ मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ॥ ४ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ॥ ५ ॥ नागोजन मित्रा नरहरि सोनारा । रोहिदास[15] कबिरा सोइरिया ॥ ६ ॥ [16]परसो भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळांसी ॥ ७ ॥ चोखामेळा संत जिवाचे सोइरे । न पडे विसर यांचा घडी ॥ ८ ॥ जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाटका[17] कान्हया मिराबाई ॥ ९ ॥ आणीक [18]ही संत महानुभाव

---

१ पं. हेंडगाच्या.–२ पं. तेथी–३ पं. सेवटीं–४ पं. जातीच्याला चढे०–५ पं. कागा न शोभे पिंजरा.–६ पं. "तें" नाहीं–७ पं. मग मोल चढे त्यासी–८ पं. न होती. दे. नव्हती.–९ दे. त. वसनें–१० दे. त. फुगातें.–११ पं. धरिता.–१२ पं. तुका ह्मणे गेले व्यर्थ वांया विणें। जैसा मृग शीणे मृगजळें.–१३ पं. त. गीती–१४ पं. माहेर माझें.–१५ पं. रोहिदासा.–१६ पं. परसा.–१७ पं. पाठक हा कान्हा मिराबाई।. त. पाटक कान्हया०. दे. पाटका०.–१८ दे. हे.

मुनि । सकळां चरणीं जीव माझा ॥ १० ॥ आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारेकरी[1] ॥ ११ ॥ तुका ह्मणे माझा बाळिया बापमाय । हैषें[2] नांदों सये घराचारी ॥ १२ ॥

१५६९. पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ ध्रु ॥ जप तप अनुष्ठान । पोटासाटीं जाले दीन ॥ २ ॥ पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥ ३ ॥ पोट काशियानें भरे । तुका ह्मणे झुरझुरूं मरे ॥ ४ ॥

## आरत्या ॥ १३ ॥

१५७०. जगदीश[3] जगदीश तुज ह्मणती । परि या जनामाजी असशील युक्ति । पुण्यपापविरहित[4] सकळां अधिपति । दृष्टा परि नळणी अलिप्त गति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देव जय देव जय पंढरिनाथा । श्रीपंढरिनाथा । नुरे[5] पाप विठ्ठल ह्मणतां सर्वथा ॥ ध्रु ॥ आगम निगम तुज नेणती कोणी । परि तूं भाव भक्ति जवळी च दोन्ही । नेणतां विधियुक्त राते पूजेनी[6] । न माये ब्रह्मांडीं संपुष्टशयनीं ॥ २ ॥ असुरां काळ भासे विक्राळ पुढें । पसरी मुख एक चावितो धुडें । भक्ता शरणागता चाले तो पुढें । दावी वाट जाऊं नेदी वांकडें ॥ ३ ॥ एकाएकीं बहु विस्तरला सुखें । खेळे त्याची लीळा तो चि कवतुकें । तेथें नरनारी कवण बाळकें । काय पापपुण्य कवण सुखदुःखें ॥ ४ ॥ सकळां वर्मां तूं चि जाणशी एक । बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदुःख । जाणों ह्मणतां तुज ठकलीं बहुतेकें[7] । तुका ह्मणे शरण आलों मज राखें[8] ॥ ५ ॥

१५७१. दैत्यभारें पीडिली पृथ्वी[9] बाळा । ह्मणोनि तूज येणें जालें गोपाळा । भक्तिप्रतिपाळक उत्सवें सोहळा । मंगळें तुज गाती ओंवळ[10] बाळा[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देव जय देव जय गरुडध्वजा । श्रीगरुडध्वजा[12] । आरती ओवाळूं तुज भक्तीकाजा ॥ ध्रु ॥ गुण रूप नाम नाहीं जयासी । चिंतितां तैसा चि होसी तैयांसी[13] । मत्स्य कूर्म वराह नरसिंह जालासी । असुरां काळ ह्मूण[14] टाके ध्यानासी ॥ २ ॥ सहस्र रूपें नाम सांवळा ना गोरा । श्रुति नेती ह्मणती तुज विश्वंभरा । जीवनां जीवन तूं चि होसी दातारा । न कळे पार ब्रह्मादिकां

---

१ दे. वारेकरी.–२ दे. त. हरुषें. पं. हर्षें नाद.–३ दे. त. जगदेश जगदेश.–४ पं. पुण्यपापा-विरहित.–५ पं. नुरे चि पाप.–६ ("पूजनीं" अथवा "पूजेनें" असें असावें) पं.० पुजूनी। न माय ब्रह्मांडीं तो सतुष्ट०.–७ पं. त. बहुतेक.–८ त. राख.–९ दे. पृथुवी.–१० पं.० उत्साहो सोहळा। मंगळ तुज गाती आवळा बाळा.–११ त. आवळें बाळा.–१२ पं. एवढा चरण नाहीं.–१३ त. जयासी.–१४ दे. मुणि.

सुरवरां ॥ ३ ॥ संतां महंतां घरीं[1] ह्मणवी ह्मणियारा । शंखचक्रगदाआयुधांचा भारा । सुदर्शन घरटी फिरे अवस्वरा[2] । सकुमार ना स्थूळ होसी गोजिरा ॥ ४ ॥ भावेंविण तुझें न घडे पूजन । सकळ ही गंगा जाल्या तुजपासून । उत्पत्ति प्रळय तूं[3] चि करिसी पाळण । धरूनि राहिला तुका निश्चयीं चरण ॥ ५ ॥

१५७२. काय तुझा महिमा वर्णूं मी किती । नाममात्रें[4] भवपाश तुटती । पाहातां पौडलें[5] हे विष्णुमूर्ती । कोटिकुळां सहित जे[6] उद्धरती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देव जय देव जय[7] पंढरिराया । श्रीपंढरिराया । करुनियां कुरवंडी । सांडीन काया ॥ छ्रु ॥ मंगळआरतीचा थोर महिमा । आणीक द्यावया नाहीं उपमा । श्रीमुखासहित देखे जो कर्मा । पासुन सुटे जैसा रवि नासी तमा ॥ २ ॥ धन्य व्रतकाळ हे एकादशी । जागरण उपवास घडे जयांसी । विष्णूचें पूजन एकाभावेंसी । नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकांसी ॥ ३ ॥ न वजे वांयां काळ जे तुज ध्याती । असे[8] तुझा वास तयांच्या चित्तीं । घाले सुखें सदा प्रेमें डुल्लती । तीर्थें मळिण[9] वास तयांचा पाहाती ॥ ४ ॥ देव भक्त तूं चि जालासी दोन्ही । वाढावया सुख भक्ति हे जनीं । जड जीवां उद्धार होय लागोनि । शरण तुका वंदी पाउलें दोन्ही ॥ ५ ॥

१५७३. कंसरायें गर्भ वधियेले सात । ह्मणोनि गोकुळासी आले अनंत । घ्यावया अवतार जालें[10] हें चि निमित्त्य[11] । असुर संहारूनि तारावे भक्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देव जय देव जय विश्वरूपा । श्रीविश्वरूपा[12] । ओवाळीन तुज देहदीपें बापा ॥ छ्रु ॥ स्थूळरूप होऊनि धरितसे सानें । जैसा भाव तैसा तयांकारणें । दैत्यांसी भासला सिंह[13] गजाने । काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ॥ २ ॥ अनंत वर्णी कोणा न कळे चि पार । सगुण कीं निर्गुण हा ही निर्धार । पांगलीं साही[14] अठरा करितां वेव्हार । तो[15] वळितसे गौळियांचें खिल्लार ॥ ३ ॥ तेहतिस कोटि तिहीं देवांसी श्रेष्ठ । पौडलें[16] पाताळीं नेणती स्वर्गमुगुट । गिळिलीं चौदा भुवनें तरि न भरे चि पोट । तो खाउन धाला गोपाळाचें उच्छिष्ट ॥ ४ ॥ महिमा वर्णूं तरि पांगलिया श्रुति । सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुती । भावेंविण कांहीं न चले चि युक्ति । रामें शरण तुकयाबंधु करी विनंती ॥ ५ ॥

---

१ पं. ह्मणवी घरीं.—२ पं. आवस्वरा ( अवसरा ? )—३ पं. करिसी तू चि पाळण.—४ दे. पं. नामें मात्रें.—५ दे. पं. पाउले.—६ पं. "जे" याबद्दल "जग".—७ पं. "जय" नाहीं.—८ पं. असुव तुझा वास जयाच्या चित्तीं.—९ त. मळिणें. दे. पं. मळिन.—१० पं. "जालें" शब्द नाहीं.—११ दे. त. पं. निमित्य.—१२ पं. "श्रीविश्वरूपा" नाहीं.—१३ दे. सिंहीं गजान. त. सिंही गजाने.—१४ दे. साई.—१५ पं. तो हा वळितसे.—१६ पं. पाउलें पाताळीं स्वर्गीं मुगुट.

१५७४. परमानंदा परमपुरुषोत्तमरामा । अच्युता अनंता हरि मेघश्यामा । आविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळापती न कळे महिमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देव जय देव जय[1] जी श्रीपती । मंगळशुभदायका करीन आरती ॥ छ ॥ गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना । मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा । दीनवत्सळ सकळां मूळ जय जयनिधाना ॥ २ ॥ विश्वंभरा[2] सर्वेश्वर जगदाधारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा । सुखसागर गुणआगर मुगुटमणी शूरा । कल्याणकैवल्यमूर्ति मनोहरा ॥ ३ ॥ गरुडासना शेषशयना नरहरी । नारायणा ध्याना सुरवरहरगौरी[3] । नंदा नंदनवंदन त्रिभुवनांभीतरी । अनंतनामीं ठसा अवतारांवरी ॥ ४ ॥ सगुणनिर्गुणसाक्ष श्रीसंत संतां । भर्गवाना[4] भगवंता कालकृतांता[5] । उत्पत्तिपाळणपासुन संहारणसत्ता । शरण तुकयाबंधु तारीं रिति बहुतां ॥ ५ ॥

१५७५. पंढरि पुण्यभूमी भीमा दक्षिणवाहिनी । तीर्थ हें चंद्रभागा महा पातकां धुनी । उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देवा पांडुरंगा जय[6] अनाथनाथा । आरती ओंवाळीन तुह्मां लक्ष्मीकांता ॥ छ ॥ नित्य नवा सोहळा हो[7] महावाद्यांचा[8] गजर । सन्मुख गरुड पारीं उभा जोडुनि कर । मंडितचतुर्भुजा कटीं मिरवती कर ॥ २ ॥ हरिनाम कीर्तनें[9] हो आनंद महाद्वारीं । नाचती प्रेमसुखें नर तेथिंच्या नारी । जीवन्मुक्त लोक नित्य पाहाती हरी ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी हो गरुडटकयां[10] भार । गर्जती नामघोषें[11] महावैष्णववीर । पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ॥ ४ ॥ हें सुख पुंडलिकें कसें आणिलें वोपें । निर्गुण साकारलें आह्मांलागिं[12] हें सोपें । ह्मणोनि चरण धरोनि तुका राहिला सुखें ॥ ५ ॥

१५७६. अवतार गोकुळीं हो जन तारावयासी । लावण्यरूपडें हें तेजपुंजाळरासी[13] । उगवतां कोटि बिंबें रवि लोपले शशी । उत्साव[14] सुरवरां मही थोर मानसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देवा कृष्णनाथा जय रखुमाईकांता । आरती ओंवाळीन तुह्मां देवकीसुता । जय देवा कृष्णनाथा ॥ छ ॥ वसुदेवदेवकीची बंद फोडुनी[15] शाळ । होउनि विश्वजनिता तया पोटिंचा बाळ । दैत्य हे त्रासियेले[16] समूळ कंसासी काळ । राजैया[17] उग्रसेना केला मथुरापाळ ॥ २ ॥ राखतां गोधनें हो इंद्र कोपला भारी[18] ।

---

१ दे. त. जया जी श्रीपती.—२ पं. विश्वभरा सर्वेश्वरा जगदोद्धारा.—३ दे. त. सुरहरवरगौरी.—४ पं. 'भगवाना' नाहीं.—५ दे. त. कालकृदांता (कालकृदंता?)—६ दे. त. जया.—७ पं. ही.—८ दे. महावाद्यां गजर.—९ पं. कीर्तनें.—१० पं. गरुडटक्कियांचा.—११ दे. नाम घोष.—१२ पं. आह्मांलागीं सोपें.—१३ पं. तेजः पुजाळ रासी.—१४ पं. उत्साह.—१५ पं. पोटिली.—१६ पं. क्सादि.—१७ पं. राज्यया.—१८ दे. वरि.

मेघ जो कडाडिला शिळा वर्षतां धारीं । राखिलें गोकुळ [1] हें नखीं धरिला गिरी । निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥ ३ ॥ कौतुक पाहावया माव ब्रह्मयानें केली । [2] वत्सें ही चोरुनियां सत्यलोकासि नेलीं । गोपाळ [3] गाईवत्सें दोहीं ठायीं [4] राखीलीं । सुखाचा प्रेमसिंधु अनाथांची माउली ॥ ४ ॥ तारिलें भक्तजना दैत्य निर्दाळूनि । पांडवां साहकारी आडल्यां निर्वाणी । गुण मी काय वर्णूं मति केवढी [5] वाणी । विनवितो दास तुका ठाव दें [6] चरणीं ॥ ५ ॥

१५७७. सुंदर अंगकांती [7] मुख भाळ सुरेख । बाणली उटी अंगीं टिळा [8] साजिरी रेख । मस्तकीं मुगुट कानीं [9] कुंडलां तेज फांके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देवा चतुर्भुजा [10] जयं लावण्यतेजा । आरती ओवाळीन [11] भवतारिया हा वोजा । जय० ॥ ध्रु० ॥ उदार जुंझार हा जया वाणिती श्रुति । परतल्या नेति ह्मणती तयां न कळे गति । भाट हा चतुर्मुखें अनुवाद करिती । पांगलीं साही अठरा रूप न गाति ॥ २ ॥ ऐकोनि रूप ऐसें तुजलागीं धुंडिती । वोडके नग्न एक निराहार [12] येति । साधनें योग नाना तपें दारुण किती [13] । सांडिलें सुख [14] दिली संसारा शांती ॥ ३ ॥ भरूनि माजी लोकां तिहीं नांदसि एक । कामिनी मनमोहना रूप नाम अनेक । नासाति नाममात्रें [15] भवपातकें शोक । पाउलें [16] वंदिताती सिद्ध आणि साधक ॥ ४ ॥ उपमा द्यावयासी दुजें काय हें तुज । तत्त्वासि तत्त्वसार मूळ जालासी बीज । खेळसि बाळलीळा अवतार सहज । विनवितो दास तुका कर जोडोनि तुज ॥ ५ ॥

१५७८. सकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ । सावळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ । झळकति दिव्य तेजें दंत [17] माज पातळ । मिरवलें [18] मयूरपत्रें मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देवा जगदीश्वरा । धन्य रखुमाईवरा । आरती करीन काया । ओंवाळिन सुंदरा । जय० ॥ ध्रु० ॥ गोजिरें [19] ठाणेंमान भुजा मंडित चारी । शोभति शंखचक्रगदापद्म मोहरी । हृदयीं ब्रह्मपद बाणलें शृंगारीं । गर्जति चरणीं वांकी कंठ [20] कोकिळास्वरीं ॥ २ ॥ घवघवित उटी अंगीं वावन चंदनांची । [21] लल्लाटीं कस्तुरिचा कास पितांवराची । [22] कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोतियांची । संगीत

१ त. हो–२ पं. वत्सें हे चारोनियां. दे. वत्से चोरोनिया.–३ पं. गाई वत्स.–४ त. पं. रक्षिली.–५ दे. वाणू–६ प. मागे–७ दे. मुखें पं. मुळ–८ पं. साजिरा–९ पं. कुडले–१० दे. त. जया–११ त. भवतारिया वोजा. पं. भवतारी हा वजा–१२ दे. ईति त. इति.–१३ पं. तपती.–१४ पं. दिले ससाराची त्या शाति ।.–१५ पं. भवपातक.–१६ पं. वदिती.–१७ पं. पाताळ–१८ दे. त. पं. मयोरपत्रें.–१९ दे. ठाणमाण–२० पं. कोकिळस्वरीं.–२१ दे. ल्ल्हाट. पं. ल्लाट–२२ पं. ही पंक्ति नाहीं.

सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाचीं ॥ ३ ॥ सौभाग्यसुख सागर गुणलावण्यखाणी । लाघवी दीनवत्सळ विश्व लाविलें ध्यानीं । आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनि । धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥ ४ ॥ वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति । रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती । उदार सुर [1]गंभीरें पूर्ण आनंदमूर्ति । तुकयाबंधु ह्मणे स्तवूं मी काय किती ॥ ५ ॥

१५७९. महा जी महादेवा महाकाळमर्दना । मांडियेलें उग्रतप महादीप्त दारुणा । परिधान व्याघ्रांबर [2]चिंताभस्मलेपना । [3]स्मशान क्रीडास्थळ तुह्मा जी त्रिनयना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा । आरती ओंवाळिन कैवल्यदातारा । जय० ॥ ध्रु० ॥ रुद्र हें नाम तुह्मां उग्र [4]संहार सी । शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं । उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी । आपुलें पद दासां ठाव देईं[5] कैलासीं ॥ २ ॥ त्रैलोक्यव्यापका हो जन [6]आणि विजन । विराटस्वरूप हें तुझें साजिरें ध्यान । [7]करितो वेद स्तुती कीर्ती [8]मुखें आपण । जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥ ३ ॥ बोलतां नाम महिमा असे आश्चर्य जगीं । उपदेश केल्यानंतरें पापें पळती वेगीं । हरहर वाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं । राहिलि दृष्टी चरणा रंग मीनला रंगीं ॥ ४ ॥ [9]पुंजूनि लिंग उभा तुका जोडोनी हात । करिती विज्ञापना परिसावी हे मात । अखंड राहूं द्यावें माझें चरणीं चित्त । घातलें साष्टांग [10]मांगे मस्तकीं हात ॥ ५ ॥

१५८०. अवतारनामभेद गणा आदि [11]अगाद । जयासि पार नाहीं पुढें खुंटला वाद । एक चि दंत शोभे मुख विक्राळ दोंद । ब्रह्मांडामाजि दावी अनंत हे छंद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय जया गणपती ओंवाळित आरती । साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ॥ ध्रु० ॥ हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका । भोंवरि फेर देतां असुर मर्दिले एकां । घातले तोडरीं हो भक्तजनपाळका । [12]सहस्र नाम तुज भुक्तिमुक्तिदायका ॥ २ ॥ सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें । उपमा काय देऊं असे आणिक दुजें । रविशशि[13]तारागणें जयामाजी सहजें । उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ॥ ३ ॥ वर्णिता शेष ली.ळा तया भागलीं मुखें । पांगुळले वेद चारी कैसे राहिले सुखें । अवतार जन्मला हो लिंगनाभी या मुखें । अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ॥ ४ ॥ विश्व हें रूप तुझें हस्त पाद मुखडें । ऐसा चि भाव देईं तया नाचतां पुढें । धूप दीप पंचारति ओंवाळिन निवाडें । [14]राखें या शरणागता तुका खेळतां लाडें ॥ ५ ॥

---

१ पं.० गंभीर आनद हे मूर्ति —२ दे. चिदाभस्मलेपना.—३ पं. स्मशानीं —४ पं. त. संहारराशी.— ५ पं. डेसी.—६ पं. वन.—७ पं. करिती —८ पं. मुख्य —९ पं. पूजिलें.—१० पं. माझे —११ पं. अगाध.— १२ पं. ही पंक्ति नाहीं.—१३ त.० तारागणें० —१४ त. राख या शरणांगता. पं. राखे शरणांगता

१५८१. कनकाच्या परियेळीं उजळूनि आरती । रत्नदीपशोभा कैशा पाजळल्या ज्योती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ओंवाळूं गे माये सबाह्य साजिरा । राहिरखुमाईसत्यभामेच्या वरा ॥ छ ॥ मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें । श्रीमुखाची शोभा पाहातां तेज फांकलें ॥ २ ॥ वैजयंती माळ गळां शोभे श्रीमंत । शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत ॥ ३ ॥ सांवळा सकुमार जैसा कर्दळीगाभा । चरणीचीं नेपुरें वांकी गर्जती नभा ॥ ४ ॥ ओंवाळितां मन हें उभें ठाकलें ठायीं । समदृष्टि समाधि तुकया लागली पायीं ॥ ५ ॥

१५८२. भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योती । पंचप्राण जीवें भावें ओंवाळूं आरती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा । दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेवीन माथा ॥ छ ॥ काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥ २ ॥ राही रखुमाई दोही दों बाहीं । मयूर पिच्छचामरें ढाळिति ठायीं ठायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे दीप घेऊनि उन्मनति शोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ४ ॥* ॥ १३ ॥

१५८३. धन्य दिवस आजि दर्शन संतांचें । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य पुण्य रूप कैसा जाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ छ ॥ धन्य पूर्व पुण्य वोडवलें निरुतें । संतांचें दर्शन जालें भाग्यें बहुतें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य आह्मां जोडली जोडी । संतांचे चरण आतां जीवें न सोडीं ॥ ३ ॥

१५८४. गाऊं वाणूं तुज विठो तुझा करूं अनुवाद । जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आनंद रे विठोबा जाला माझे मनीं ।

---

१ पं. रत्नदीपप्रभा–२ पं. माळा.–३ पं. "हें" नाहीं.–४ पं. समदृष्टि समान तुकया लागला पायीं –५ दे. त. दरुषण –६ त. आतां न विसंभे घडी । –७ पं. गाऊं नाचूं विठु तुझा०.

* या अभंगाच्या पुढे रामेश्वर भटाचा एक अभंग तळेगावच्या प्रतींत आहे तो.—

तूं चि आत्माराम नव्हेसी देहधारी । स्तुति जरीं होय झडो माझी वैखरी । पातकीं मूढ जन पडतील अघोरीं । यालागीं अवतार केला महीवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जय जय भक्तराया धर्ममूर्ति तुकया । आरती ओंवाळीं भावें तुझिया पाया ॥ छ ॥ तुझे ठायीं असे भ्रम कोणा नकळे नेम । जन हे काय जाणे अनुभवित्रतो राम । टाकोनि अभिमान जीवीं धरिलें प्रेम । बोलोनि महिमा तुझा जना दिला विश्राम ॥ २ ॥ अद्भुत महिमा तुझा काय वर्णूं दातारा । उदकेंविण अन्न दिवस क्रमिले तेरा । आतां हे ऐसी प्राप्ति काय घडेल येरा । उदकीं कागद दिन रक्षिले अठरा ॥ ३ ॥ ऐकतां तुझे वचन मन होय उन्मन । सच्चिदानंद गाभा तुजठायीं पूर्ण । नित्य हें असो माझें तुझे पायीं अनुसंधान । करूनि कृपादान देईं इतुकें दान ॥ ४ ॥ शास्त्र आणि वेदांत शिष्टाचार समस्त । आणिला एकवाक्यता जनलोक कृतार्थ । विशेष रामेश्वरा प्रेम दिलें बहुत । विनवितों तुज आतां ठेवीं मस्तकीं हात ॥ ५ ॥

दे[1]खिले लोचनीं विटेसहित पाउले ॥ ध्रु ॥ न[2] करीं तपसाधनें रे मुक्तीचे सायास। हा चि जन्मोजन्मीं गोड[3] भक्तीचा रस ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां प्रेमा उणें तें काई। पंढरीचा राणा सांटविला हृदयीं ॥ ३ ॥

१५८५. मागणें तें एक तुजप्रति आहे। देशी तरि पाहें पांडुरंगा ॥ १ ॥ या संतांसी निरवीं हें मज देई। आणिक दुजें काहीं न मागें[4] तुज ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां उदार होईं। मज ठेवीं पायीं संतांचिया ॥ ३ ॥

## स्वामींनीं काया ब्रह्म केली ते अभंग ॥ २४ ॥

१५८६. शोधितां चि नये। ह्मणोनि वोळगतों पाये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दिसों नये जना। ऐसें करा नारायणा ॥ ध्रु ॥ परतोनि मन। गेलें ठायीं चि मुरोन ॥ २ ॥ विसरला तुका। बोलों चालों जाला मुका ॥ ३ ॥

१५८७. रज्जुसर्पाकार। भासयेलें[5] जगडंबर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि [6]आठवती पाय। घेतों आलाय बलाय ॥ ध्रु ॥ दृश्य[7] द्रुमाकार लाणी। केलों [8]सर्वस्वासी धणी ॥ २ ॥ तुकीं तुकला तुका। विश्वीं भरोनि उरला लोकां[9] ॥ ३ ॥

१५८८. ह्मणवितों दास। परि मी असें उदास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा चि निश्चय माझा। परि मी निश्चयाहुनि दुजा ॥ ध्रु ॥ सरतें कर्तृत्वं[10] माझ्यानें। परि मी [11]त्यांही हून भिन्न ॥ २ ॥ तुका तुकासी तुकला। तुका तुकाहुनि निराळा ॥ ३ ॥

१५८९. घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं। मुक्तां आत्मस्थिती सांडवीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्म[12]भूत होते काया च कीर्तनीं। भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ ध्रु ॥ तीर्थ[13]श्रमकासी आणीन आळस। कडु स्वर्गवास करिन भोग ॥ २ ॥ सांडवीन तपोनिधा अभिमान। यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ३ ॥ भक्तिभाग्य[14]प्रेमा साधीन पुरुषार्थ। ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ४ ॥ धन्य ह्मणवीन येहे[15] लोकीं लोकां। भाग्य आह्मीं तुका देखियेला ॥ ५ ॥

१५९०. संसाराचे अंगीं अवघीं च व्यसनें[16]। आह्मी या कीर्तनें शुद्ध जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन। विषम धोऊन

---

१ त. देखिलें लोचनीं विटेसहित पाउलें। दे. पं. (पाउल शब्द पुल्लिंगी धरिला आहे).–२ त. न करीं तप रे मुक्तीचे०. पं. न करीं तप साधन मुक्तीचे०.–३ त. सेवीं –४ पं. मागें.–५ त. भासयलें.–६ पं. आठवितों.–७ दे. दृश द्रुमाकार०. त. पं. दृश्य द्रुमाकार०.–८ दे. सर्व सासी.–९ पं. जोकां.–१० दे. त. कर्तुत्व.–११ पं.० त्याहूनि असें भिन्न।.–१२ पं. ब्रह्मभूत काया हा तसे कीर्तनीं।.–१३ दे. तीर्थ श्रमकासी.–१४ पं. भक्ति भाग्य मीमा०.–१५ दे. येह पं. येही. " इह " छापलें.–१६ दे. त. वेसनें.

सांडियेलें ॥ ध्रु० ॥ ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ३ ॥

१५९१. तुह्मी सनकादिक संत । ह्मणवितां कृपावंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एवढा करा उपकार । देवां[1] सांगा नमस्कार ॥ ध्रु० ॥ भोंकूनि[2] करुणा । विनवा वैकुंठींचा[3] राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आठवा । मूळ[4] लवकरी पाठवा ॥ ३ ॥

१५९२. आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप या संतां हातीं आला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख दुःख माझें ऐकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥ ध्रु० ॥ करुनी सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसें एकें[5] न्यावयासी ॥ २ ॥ त्या चि पंथें माझें लागलेंसे चित्त । वाट पाहें नित्य माहेरांची[6] ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलिया मायबाप ॥ ४ ॥

१५९३. चिन्हें उमटती[7] अंगीं । शकुना जोगीं उत्तम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आठवला बापमाय । येइल काय मूळ नेणों ॥ ध्रु० ॥ उत्कंठित जालें मन । तें[8] चि खुण तेथींचि ॥ २ ॥ तुका ह्मणे कांम[9] वारीं । आळस घरीं करमेना ॥ ३ ॥

१५९४. आरोनियां पाहे वाट । कटकट सोसेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलियांस पुसें मात । तेथें चित्त लागलें ॥ ध्रु० ॥ दळीं कांडीं लोकांऐसें । परि मी नसें ते ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पिसें । तेथें[10] तैसें असेल ॥ ३ ॥

१५९५. येथीलियां[11] अनुभवें । कळों जीवें[12] हें येतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोहीं ठायीं एक जीव । माझी कींव त्या अंगीं ॥ ध्रु० ॥ भूक भुके चि खाउनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख जालें । अंतर धालें त्यागुणें ॥ ३ ॥

१५९६. पैल आले हरि । शंख चक्र शोभे करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गरुड येतो फेंडत्कारें[13] । ना भी ना भी ह्मणे त्वरें[14] ॥ ध्रु० ॥ मुगुटकुंडलांच्या दीप्ति । तेजें[15] लोपला गभस्ति ॥ २ ॥ मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥ ३ ॥ चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥ ४ ॥ पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ५ ॥ तुका जालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठें[16] ॥ ६ ॥

१५९७. शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ ध्रु० ॥ दुरूनि येतां दिसे दृष्टी । धाकें दोष पळती सृष्टी ॥ २ ॥ तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ३ ॥

---

१ पं. सा.। देवा.—२ पं. भाकावी —३ पं. पंढरीचा.—४ दे. त. पं. मुळ.—५ पं. एक—६ आठवाची —७ दे. उमटताती.—८ पं. ते खुण०.—९ त. पं. कामा.—१० पं. तैसें तेथें—११ पं. येथील या.—१२ पं.०जीवें येतसे.—१३ पं. फडात्कारें.—१४ पं. खरें.—१५ पं. तेज.—१६ पं. “वैकुंठपीठ” याबद्दल “वैकुंठ”.

१५९८. पैल दिसतील भार। दिंडी पताका अपार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आला पंढरीचा राणा। दिसतील त्याच्या खुणा। सुख वाटे मना। डोळे बाह्या स्फुरती ॥ ध्रु० ॥ उठिले गजर नामाचे। दळभार वैष्णवांचे ॥ २ ॥ तुका करी रिता ठाव। त्यांसी बैसावया वाव ॥ ३ ॥

१५९९. चला जाऊं रे सामोरे। पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुका आनंदला मनीं। कैसा जातो लोटांगणीं। फेडावया[1] धणी। प्रेमसुखाची आजि ॥ ध्रु० ॥ पुढें आले कृपावंत। मायबाप साधुसंत ॥ २ ॥ तुका आळंगिला बाहीं। ठेविला विठोबाचे पायीं ॥ ३ ॥

१६००. पाहुणे घरासी। आजि आले हृषीकेशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं उपचार। कोंप मोडकी जर्जर। कण्या दरदर। पाण्यामाजी रांधिल्या[2] ॥ ध्रु० ॥ घरीं मोडकिया बाजा। वरि वाकळांच्या शेजा ॥ २ ॥ मुखशुद्धि तुळसी दळ। तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ३ ॥

१६०१. संतीं केला अंगीकार। त्यासी अभिमान थोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं ठेविलें चरणीं। घेती तें चि पुरवूनि। तुका पायवणी। घेऊनियां निराळा ॥ ध्रु० ॥ नसतां कांहीं संचित। भेटी[3] जाली अवचित ॥ २ ॥ देव मिळोनियां भक्त। तुका केलासे सनाथ ॥ ३ ॥

१६०२. अवघियांच्या आलों मुळें। ऐंका[4] वेळे न्यावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें। आधीं ठावें करितों ॥ ध्रु० ॥ जोंवरि ते[5] घटिका दुरी। आहे उरी तो काळ ॥ २ ॥ मंगळाचे वेळे उभे। ऐसों[6] शोभे सावध ॥ ३ ॥ अवघियांचा योग घडे। तरी जोडे श्लाघ्यता ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाहें वाट। बहु आट करूनि ॥ ५ ॥

१६०३. सकळ ही माझी बोळवण करा। परतोनि घरा जावें तुह्मीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर्मधर्मे[7] तुह्मां असावें कल्याण। घ्या माझें वचन आशीर्वाद ॥ ध्रु० ॥ वाढवूनि दिलों[8] एकाचिये हातीं। सकळ निश्चिंती जाली तेथें ॥ २ ॥ आतां मज जाणें प्राणेश्वरासवें। माझिया भावें अनुसरलों ॥ ३ ॥ वाढवितां लोभ होईल

---

१ पं. "फेडावया० आजि।" इतकें नाहीं—२ पं. "दरदरीत पाण्या माजी रांधियेल्या कण्या।" एवढेंच ध्रुवपद आहे—३ पं. "भेटी जाली०" आणि पुढच्या कडव्यातलें "देव मिळोनिया०" हे दोन चरण एकमेकाशीं बदलले आहेत.—४ पं. एक.—५ पं. हे.—६ पं. असा—७ पं. कर्म धर्म—८ पं. दिले

उसीर । अवघींच स्थिर करा ठायीं ॥ ४ ॥ धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥ ५ ॥ तुका ह्मणे आतां[1] जाली हे चि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ ६ ॥

१६०४. बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें[2] पुण्य कोण माझे गांठी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आह्मी करूं कोठें ॥ छ्र ॥ न घडे यावरि न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनि जग ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥ ३ ॥

१६०५. करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें एकमय । राज्य बोलों चालों नये ॥ छ्र ॥ दुजयाची सत्ता । न चलेसी जाली आतां ॥ २ ॥ आतां नाहीं तुका । पुन्हा हारपला लोकां ॥ ३ ॥

१६०६. आह्मी जातों तुह्मी कृपा असों द्यावी । सकळा सांगावी विनंती माझी ॥ १ ॥ वाढवेळ जाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥ २ ॥ अंतकाळीं विठो आह्मांसी पावला । कुडीसहित जाला गुप्त तुका ॥ ३ ॥

१६०७. तुका उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नित्य करितों कीर्तन । हें चि माझें अनुष्ठान ॥ छ्र ॥ तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ॥ २ ॥ देव भावाचा भुकेला । तुका वैकुंठासी नेला ॥ ३ ॥

१६०८. न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृपेचिये सिंहासनीं[3] । अधिष्ठानीं बैसाविलें ॥ छ्र ॥ वाजता तो नलगे वारा । क्षीरसागरा शैयनीं[4] ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे ठायीं । मज पायीं राखिलें ॥ ३ ॥

१६०९. वाराणसीपर्यंत असों सुखरूप । सांगावा निरोप संतांसी हा ॥ १ ॥ येथूनियां आह्मां जाणें निजधामा । सर्वे असे आह्मां गरुड हा ॥ २ ॥ कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसों[5] माहेरी तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २४ ॥

शखे १५७१ एकाहत्तरीं[6] विरोधनामसंवत्सरीं फाल्गुनवद्य द्वितीया सोमवासरीं प्रथमप्रहरीं[7] तुकोबा[8] गुप्त जाले ॥ १ ॥

---

१ दे. "आतां जाली" यावर "तुह्मां आज्ञा" असा पाठ घातला आहे.–२ पं. काय ऐसें पुण्य माझे गाठी।.–३ दे. त. पं. सिंव्हासनीं–४ पं. नयनीं–५ त. जातसें दे. जातोंसों–६ पं. "एकाहातरीं" नाहीं.–७ पं. "प्रथम प्रहरीं तुकोबा गुप्त जाले" याबद्दल "प्रात काळीं स्वामी गुप्त जाळे असे"–८ त. "तुकोबा गुप्त जाले" याबद्दल "तुकाराम गुप्त."

१६१०. जाती पंढरीस । ह्मणे जाईन तयांस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया आहे संवसार[1] । ऐसें बोले तो माहार ॥ ध्रु ॥ असो नसो भाव । जो हा देखे पंढरिराव ॥ २ ॥ चंद्रभागे न्हाती । तुका ह्मणे भलते याती ॥ ३ ॥

१६११. धरियेलीं सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागे तिरीं ॥ ध्रु ॥ अंतर्व्यापी[2] बाहे । धांडोळितां[3] कोठें नोहे[4] ॥ २ ॥ योगयागतपें । ज्याकारणें दानजपें ॥ ३ ॥ दिले नेदी जति । भोग सकळ ज्या होती ॥ ४ ॥ अवघी लीळा पाहे । तुका ह्मणे दासां साहे ॥ ५ ॥

१६१२. ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा सा चौं अठरां जणां ॥ ध्रु ॥ चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति[6] कामारी दासी ॥ २ ॥ वैकुंठासी जावें । तुका ह्मणे ज्याच्या नांवें ॥ ३ ॥

१६१३. ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन्य पडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुती ॥ ध्रु ॥ सिणलीं[7] सहस्र तोंडें । शेषफणीऐसें[8] धेंडें ॥ २ ॥ तुका ह्मणे मही । पत्र सिंधु न पुरे शाही[9] ॥ ३ ॥

१६१४. देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तें ही अमृत पैंहीं[10] ॥ ध्रु ॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं[11] यमबाधा ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायण । येतां[12] गोळ्या वारी बाण ॥ ३ ॥

१६१५. कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहों केलें पापपुण्य ॥ ध्रु ॥ पतितपावन ब्रीदें[13] चराचर । पातकी अपार उद्धरिले ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥ ३ ॥

१६१६. कोठें गुंतलासी कोणांच्या धांवया । आली देवराया निद्रा तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती[14] मुखें गोपिकांचीं ॥ ध्रु ॥ काय पडिलें तुज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चालवे[15] ॥ २ ॥ काय माझे तुज गुण दोष दिसती । ह्मणोनि श्रीपती कोपलासी ॥ ३ ॥ काय जालें[16] सांग माझिया कपाळा । उरला जीव डोळां तुका ह्मणे ॥ ४ ॥

---

१ पं. त. ससार.–२ दे. त. अतर व्या०.–३ पं. धुडाळितां.–४ दे. पं. नाहीं.–५ पं. ज्ञान–६ पं. रिद्धिसिद्धी होती दासी–७ दे. सिणले.–८ दे. शेषफणी ऐसें.–९ "शाई" याबद्दल.–१० त. पं. "पाहीं" नाहीं–११ दे. "कधीं" याबद्दल "कधीं कधीं" आहे–१२ पं. ये ऊन.–१३ पं. ब्रीद.–१४ दे. सुटेती.–१५ पं. चलवे.–१६ त. जालों

१६१७. परस्त्रीतें ह्मणतां माता। चित्त लाजवितें चित्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय बोलोनियां तोंडें। मनामाजी कानकोंडें ॥ छ ॥ धर्मधारिष्टगोष्टी सांगे। उष्ट्या हातें [1]तुडवी काग ॥ २ ॥ जें जें कर्म वसे अंगीं। तें तें आठवे प्रसंगीं ॥ ३ ॥ बोले तैसा चाले। तुका ह्मणे तो अमोल ॥ ४ ॥

१६१८. असत्य वचन होतां [3]सर्व जोडी। जरी लग्नघडी परउपकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाईल पतना यासि संदेह नाहीं। साक्ष [5]आहे कांहीं सांगतों ते ॥ छ ॥ वदविलें मुखें नारायणें धर्मा। अंगुष्ठ त्या कर्मासाटीं गेला ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां सांभाळा रे पुढें। अंतरिंचें कुडें देइल दुःख ॥ ३ ॥

१६१९. जळों त्यांचें तोंड। ऐसी कां ते व्याली रांड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सदा भोवयासी [6]गांठी। क्रोध धडधडीत पोटीं ॥ छ ॥ फोडिली गोंवरी। ऐसी दिसे तोंडावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं। चित्ता समाधान कांहीं ॥ ३ ॥

१६२०. तोंडें खाये फार। पादे बोचा करी मार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक ऐसे ते शाहाणे। आपुले अधीन तें नेणें ॥ छ ॥ कुले घालूनि उघडे। रागें पाहे लोकांकडे ॥ २ ॥ खेळे द्यूतकर्म। मग बोंबली जुलूम ॥ ३ ॥ निजतां आला मोहो। वीतां ह्मणे मेला गोहो ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांनीं। मनुष्यपणा केली हानी ॥ ५ ॥

१६२१. पतिव्रता नेणे आणिकांची स्तुती। सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें माझें मन एकविध जालें। नावडे विठ्ठलेंविण दुजें ॥ छ ॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा। गाय ते कोकिळा वसंतेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ मातेपुढें नाचे। बोल आणिकांचे नावडती ॥ ३ ॥

१६२२. पंडित ह्मणतां थोर सुख। परि तो पाहातां अवघा मूर्ख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करावें घोकिलें। वेदपठण वांयां गेलें ॥ छ ॥ वेदीं[9] सांगितलें तें[10] न करी। सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥ २ ॥ तुका देखे [11]जीवीं शिव। [12]हा चि तेथींचा अनुभव ॥ ३ ॥

१६२३. पंडित[13] तो चि एक भला। नित्य भजे जो विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें सम ब्रह्म पाहे। सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ छ ॥ रिता नाहीं कोणी ठाव। सर्वां भूतीं वासुदेव ॥ २ ॥ तुका ह्मणे तो चि दास। [14]त्यां देखिल्या जाती दोष ॥ ३ ॥

---

१ त. न उडवी. पं. तुठवी.–२ पं. कोटि.–३ त. असे.–४ पं. तिचें.–५ पं. एमीयातें ०.–६ पं. आटी.–७ दे. द्युत.–८ पं. दुजें कांहीं.–९ पं. वेदें.–१० त. पं. "तें" नाहीं.–११ पं. जीवशिव.–१२ दे. हा तेथींचा.–१३ पं. पडित तो भला.–१४ दे. त्यां.

१६२४. ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका करूं नरस्तुति । माझी परिसों[1] हे विनंती ॥ छ ॥ अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा अधीन ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । सुखें वेचा नारायणीं ॥ ३ ॥

१६२५. विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥ छ ॥ विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥ २ ॥ विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥ ३ ॥

१६२६. काय तुझें वेचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥ छ ॥ काय तुझें आह्मां करावें वैकुंठ । भेऊं[2] नको भेट आतां मज ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझी नलगे दसोडी । परि आहे[3] आवडी दर्शनाची ॥ ३ ॥

१६२७. संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर ते यमपुरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । [4]संगें जना होय पीडा ॥ छ ॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिता चि नर्कवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तो[5] नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥ ३ ॥

१६२८. आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबा घरीं पाणी ॥ छ ॥ पांडवांचा साहाकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे उगेचि राहा । होईल तें सहज पाहा ॥ ३ ॥

१६२९. निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे[6] नाना छंदें गोविंद हा ॥ छ ॥ मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाटीं[7] ॥ ३ ॥

१६३०. काम क्रोध आह्मी वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कोण पाहे मागें परतोनि । गेलें[8] हारपोनि देहभाव ॥ छ ॥ रिद्धिसिद्धी सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी विठोबाचे दास । करूनि[9] ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥

१६३१. उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें यें[10] पंढरीसि घडे । खळां पाझर रोकडे ॥ छ ॥ अश्रूचिया धारा । कोंठें[11] रोमांच शरीरा ॥ २ ॥ तुका ह्मणे काला । कोठें अभेद देखिला ॥ ३ ॥

---

१ पं.० परिसावी विनती.—२ दे. पं. भेवों.—३ पं. "आहे" याबद्दल "हे".—४ पं. "संगें" याच्याबद्दल "ज्याच्या संगें".—५ पं. "तो" नाहीं.—६ पं. नाचे हा गोविंद नाना छंदें ।. दे. व त. यांतही प्रथमतः हाच पाठ होता, परंतु मागून आंकडे घालून वर छापल्याप्रमाणें लिहिला आहे.—७ त. नामापाठीं.—८ पं. गेला.—९ त. गिळूनि. दे. मुळीं हाच पाठ होता.—१० पं. हे.—११ पं. राहिला.

१६३२. पंढरी पंढरी। ह्मणतां पापाची वोहरी[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य धन्य जगीं ठाव। होतो नामाचा उत्साव ॥ ध्रु ॥ रिद्धिसिद्धी लोटांगणीं। प्रेमसुखाचिया खाणी ॥ २ ॥ अधिक अक्षरानें एका। भूवैकुंठ ह्मणे तुका ॥ ३ ॥

१६३३. अल्प माझी मति। ह्मणोनि येतों काकुलती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दाखवा दाखवा। मजें[2] पाउलें केशवा ॥ ध्रु ॥ धीर माझ्या मना। नाहीं नाहीं नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे दया। मज करा अभागिया ॥ ३ ॥

१६३४. भार घालीं देवा। न लगे देश डोई घ्यावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह प्रारब्धा अधीन। सोसें अधिक वाढे सीण ॥ ध्रु ॥ व्यवसाय निमित्त। फळ देतसे संचित ॥ २ ॥ तुका ह्मणे फिरे। भोंवडीनें दम जिरे ॥ ३ ॥

१६३५. भोग भोगावरी द्यावा। संचिताचा करुनी ठेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शांती धरणें जिवासाटीं। दशा उत्तम गोमटी ॥ ध्रु ॥ देह लेखावें असार। सत्य परउपकार ॥ २ ॥ तुका ह्मणे हे मिरासी। बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥ ३ ॥

१६३६. येथें वोलोनियां काय। व्हावा गुरु तरि जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज न साहे वांकडें। ये विठ्ठलकथेपुढें ॥ ध्रु ॥ ऐकोनी मरसी कथा। जंव आहेसि तुं जीता ॥ २ ॥ हुरमतीची चाड। तेणें न करावी वडवड ॥ ३ ॥ पुसेल कोणी त्यास। जा रे करीं उपदेश ॥ ४ ॥ आह्मी विठ्ठलाचे वीर। फोडूं कळिकाळाचें शीर ॥ ५ ॥ घेऊं पुढती जन्म। वाणूं कीर्ति[3] मुखें नाम ॥ ६ ॥ तुका ह्मणे मुक्ती। नाहीं आस चि ये चित्तीं ॥ ७ ॥

१६३७. अनुहातीं[4] गुंतला नेणे वाह्य रंग। वृत्ति येतां मग वळ लागे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मदें मातें[5] तया नाहीं देहभाव। आपुले अवयव[6] आवरितां ॥ ध्रु ॥ आणिकांची वाणी वेद तेणें मुखें। उपचारदुःखें नाठवती ॥ २ ॥ तें सुख बोलतां आश्चर्य या जना। विपरीत मना भासतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाह्य रंग तो विठ्ठल। अंतर[7] निवालें ब्रह्मरसें ॥ ४ ॥

१६३८. ब्रह्मरसगोडी तयांसी फावली। वासना निमाली सकळ ज्यांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं त्यां विटाळ अखंड सोंवळीं[8]। उपाधीवेगळीं जाणिवेच्या ॥ ध्रु ॥ मन हें निश्चळ जालें एके ठायीं। तयां उणें काई निजसुखा ॥ २ ॥ तीं[9] चि

१ दे. वोहोरी –२ पं. तुमचीं –३ पं. कीर्ती.–४ दे. त. आनुहातीं –५ त. मातलें पं. माजे – ६ दे. त. पं. आवेव.–७ पं. अतरीं.–८ पं. ० सोवळा। उपाधीवेगळा जाणिवसी ॥ मन हें संचलें जालें०. त. ०सोवळें। उपाधी वेगळें वासनेसी ॥.–९ पं. तेचि पुण्यवंत पर०.

पुण्यवंतें परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥ ४ ॥

१६३९. जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥ ध्रु ॥ मागों नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥ ३ ॥

१६४०. आह्मां हरिच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥ ध्रु ॥ जैसा केला तैसा होय । धांवे सोय धरोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥ ३ ॥

१६४१. परद्रव्यपरनारींचा अभिळास । तेथूनि हारास सर्वभाग्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घटिका दिवस मास वर्षें लागती तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥ ध्रु ॥ पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे एकां तडताथवड । काळ लाँगे नाड परी खरा ॥ ३ ॥

१६४२. समर्थाचें केलें । कोणां जाईल मोडिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांयां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥ ध्रु ॥ ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥ २ ॥ ज्योंचें त्याचे हातीं । भुंके[6] तयाची फजिती ॥ ३ ॥ तुकाँ ह्मणे कोटी । बाळे जाले शूळ पोटीं ॥ ४ ॥

१६४३. हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥ ध्रु ॥ देऊनियां जीव । वळी साधिला हा ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥ ३ ॥

१६४४. नेणे गति काय कवण अधोगति । मानिली निश्चिती तुझ्या पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर्म धर्म कोण नेणें हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥ ध्रु ॥

---

१ त. पं. देवाचें देगें.—२ दे. वरुषें लागेतीन.—३ पं. गेला.—४ दे. खटपटें.—५ त. तुका ह्मणे ज्याचे०. पं. प्रतींतून येथें छापलेलें "तुका ह्मणे कोटी" हें कडवें तळेगावची प्रत लिहिणाराम लब्ध न झाल्यामुळें याच कडव्यात "तुका ह्मणे" हें घातलें असावें असें वाटतें.—६ दे. भुके.—७ पं. प्रतींत मात्र हें कडवें आहे. दे. प्रतींत नाहीं; परंतु तींत शेवटच्या कडव्यांत "तुका" हा शब्द नाहीं यावरून "तुका ह्मणे कोटी" हें कडवें लिहिणें राहिलें असावें.—८ दे. "ठेवा हे माझी०." येथें "ठेवा" हें मागूनच घातलें आहे.—९ दे. "वडिली." असें 'वळी" याच्या ठिकाणीं मागून केलें आहे.

नेणें निरसूं पाप पुण्य नेणें काय । ह्मणऊनि पाय धरिले तुझे ॥ २ ॥ वेडा मी अविचार न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज करितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥ ४ ॥

१६४५. तुझा ह्मणऊनि जालों उतराई । त्याचें वेंर्म काई तें मी नेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातीं धरोनियां दावीं मज वाट । पुढें कोण नीट तें चि देवा ॥ छ्रु ॥ देवभक्तपण करावें जतन । दोहीं पक्षीं जाण तूं चि बळी ॥ २ ॥ अभिमानें तुज लागली हे लाज । शरणागतां काज करावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे वहु नेणता मी फार । ह्मणऊनि विचार जाणविला ॥ ४ ॥

१६४६. मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व सुख लागे घेऊनियां पाठी । आवडीचा कंठीं रस ओती ॥ छ्रु ॥ पीतांबरें छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि करावें जीवन । वाचे नारायण तोंन भूक ॥ ३ ॥

१६४७. जालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठाव द्यावा पायांपाशीं । मी तों पातकांची राशी ॥ छ्रु ॥ सकळ ही गोवा । माझा उगवूनि देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे भय । कर्धी जवळी तें नये ॥ ३ ॥

१६४८. अंतरींचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमची करावी म्यां सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥ छ्रु ॥ नव्हती मोडामोडी । केली मागें ते चि घडी ॥ २ ॥ तुका ह्मणे दिला वाव । पायीं लागों दिला भाव ॥ ३ ॥

१६४९. पवित्र होईन चरित्रउच्चारें । रूपाच्या आधारें गोजिरिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठी । पायीं घालीं मिठी पाहें डोळां ॥ छ्रु ॥ गाईन ओंविया शिष्टांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलिया ॥ ३ ॥

१६५०. काय ऐसा जन्म जावा वांयांविण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥ छ्रु ॥ शता एका तरी जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं होईल दया ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं फांकों तरी देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥ ३ ॥

---

१ पं. पुण्य काय.–२ पं. कर्म.–३ पं. ह्मणोनि.–४ पं. पीतावर छाया.–५ पं. ताहान भूक त. तानभुके –६ त. कदा.–७ पं. येईल.

१६५१. नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं सीण लटिका चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाचिये माथां असावें निमित्त । नसो नाहीं हित[1] कपाळीं तें ॥ छ ॥ कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्में कळों येती कांहीं । ओळखी जे नाहीं होईल ते ॥ ३ ॥

१६५२. काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दरिद्र[2] लाज नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥ छ ॥ नामाच्या चिंतनें नाली गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणों किती वांयां गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ॥ ३ ॥

१६५३. संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती या सांगावें करूनि फाजित । खळ नेणे हित जवळी तें ॥ छ ॥ माजल्या न कळे उचित तें काय । नें[5] घ्यावें तें खाय घ्यावें सांडी ॥ २ ॥ तुका ह्मणे घेती भिती सवें डोकें । वावसी नीं एकें अंधारलीं ॥ ३ ॥

१६५४. दुधाचे घागरी मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥ छ ॥ काय करावीं तीं[7] बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी संवेसगें ॥ ३ ॥

१६५५. सांगावें तें बरें असतें हें पोटीं । दुःख देते खोटी बुद्धि मग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपला आपण करावा वेव्हारें । जिंकोनि अंतर मन ग्वाही ॥ छ ॥ नाहीं मागें येत बोलिलें वचन । पावावा तो सीण बरा मग ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु भ्यालों खटपटे । आतां देवा खोटे शब्द पुरे ॥ ३ ॥

## ॥ वाराणसीस यात्रा चालली तेव्हां स्वामींनीं भागीरथीस पत्र धाडिलें—ते अभंग ॥ ३ ॥

१६५६. परिसें वो माते माझी विनवणी । मस्तकें[12] चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भागीरथी महादोष निवारणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥ छ ॥

१ पं. "हित" नाहीं.–२ पं. दरिद्र–३ पं. "ऐसें हें कळों आलें माझ्या मना । हरिच्या जना नाश नाहीं ॥" हे कडवें येथें जास्त आहे.–४ दे. नेवावें०.–५ दे. तें. पं. नें एक वाया०.–६ पं. विद.–७ दे. पं. तें.–८ त. पं. गेले.–९ दे. सवें श्वर्ग. त. संवश्वर्ग. पं. संवमर्गें–१० पं. अस्यावें–११ पं. विचार–१२ त. "मस्तक०" व दुसऱ्या चरणांतील "सकळां०" या दोन चरणाच्या जागा परस्पराशीं बदलल्या आहेत

१६७०. जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कंठ कंठा मिळों देईं । माझा वोरस तूं घेईं ॥ ध्रु० ॥ नको पीतांबर । सांवरूं हे अळंकार ॥ २ ॥ टाकीं वो भातुकें । [1]लौकिकाचें कवतुकें ॥ ३ ॥ [2]होतां पायां नको । कांहीं वेगळालें राखों ॥ ४ ॥ तुका ह्मणे यावरी । मग सुखें अळंकारीं ॥ ५ ॥

१६७१. कृपेचा ओलावा । दिसे वेगळा चि देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी हें इच्छीतसें साचें । न लगे [3]फुकटशाई काचें ॥ ध्रु० ॥ जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥ ३ ॥

१६७२. दावूनियां कोणां कांहीं । ते चि वाहीं चाळविलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥ ध्रु० ॥ [4]रिद्धीसिद्धी ऐसीं आड । येती नाड नागवूं ॥ २ ॥ [5]उदकाऐसी दावुनि ओढी । उर फोडी [6]झळई ॥ ३ ॥ दर्पणींचें दिलें धन । दिसे पण [7]चरफड ॥ ४ ॥ तुका ह्मणे पायांसाटीं । [8]करीं आटी[9] कळों द्या ॥ ५ ॥

१६७३. काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ॥ ध्रु० ॥ लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥ २ ॥ भावंडाचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ॥ ३ ॥ माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥ ४ ॥ तुका ह्मणे नारायणा । तुह्मी जाणां बुझावूं ॥ ५ ॥

१६७४. तरीं आह्मी तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आगा [10]पंढरीशीं [11]उभ्यों विटेवरी । येईं लवकरी [12]धांवें नेटें ॥ ध्रु० ॥ [13]पाळवितों तुज उभी करोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज बहु कान डोळे । [14]कां हे माझे वेळे ऐसी परी ॥ ३ ॥

१६७५. करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधीं च कां प्रीत लावियेली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणतसां तुह्मीं रूपाचें लाघव । [15]आपुलें तें जीव घेतें ऐसा ॥ ध्रु० ॥ काय ह्मणऊनि आलेती आकारा । आह्मां उजगरा करावया ॥ २ ॥ तुका ह्मणे भीड होती आजिवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ३ ॥

१६७६. धरूनि पालव असुडीन करें । मग काय बरें दिसे लोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तें विचारा ठायींचें आपणां । जो [16]हा नारायणा अवकाश ॥ ध्रु० ॥

---

१ पं. लौकिकाची.—२ पं. आतां.—३ पं. फुकटसाई काचें.—४ दे. रिद्धिसिद्धी ऐसे आड ।.—५ दे. उदकाऐसे.—६ पं. झळाळी.—७ दे. चरफडी.—८ पं. करितों.—९ दे. आट.—१० दे. पंढरीच्या.—११ पं. उभा.—१२ त. पं. धांव.—१३ पं. पालवितों वरी उभारोनि बाहे.—१४ पं. कांगा माझे०.—१५ पं. आपुलाले जीव०.—१६ पं. जोडा नारा०.

अंतर पायांसी तों वरी या गोष्टी । पडिलिया मिठी हालों नेदीं ॥ २ ॥ रुसलेती तरी होइल बुझावणी । तांतडी करूनि साधावें हें ॥ ३ ॥ सांपडलिया आधीं कारणासी ठाव । येथें करूं भाव दृढ आतां ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझे ठाउके बोभाट । मग खटपट चुकली ते ॥ ५ ॥

१६७७. निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागभाग ठायींचा चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं माझा जनिता तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥ ध्रु ॥ मुळींच्या ठेवण्यां आहे अधिकार । दुरावोनि दूर गेलों होतों ॥ २ ॥ पोटींच्या आठवा पडिला विसर । कांहीं आला भार माथां तेणें ॥ ३ ॥ राखिला हा होता बहु चौघां चार । साक्षीनें व्यं[2]वहार निवाडिला ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं बोलणें न लगे । आतां पांडुरंगे [3]तूं मी ऐसें ॥ ५ ॥

१६७८. सांगतां गोष्टी लागती गोडा । हा तो रोकडा अनुभव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख जालें सुख जालें । नये बोलें बोलतां ॥ ध्रु ॥ अंतर तें नये दिसों । आतां सोस कोंसया ॥ २ ॥ तुका ह्मणे जतन करूं । हें चि धरूं जीवेंसी ॥ ३ ॥

१६७९. मजशीं पुरें न पडे वादें । सुख दोहींच्या संवादें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं चि आगळा काशानें । शिर काय पायांविणे ॥ ध्रु ॥ वाहों तुझा [4]भार । दुःख साहोनि अपार ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥ ३ ॥

१६८०. तुज नाहीं शक्ति । काम घेसी आह्मां हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें अनुभवें पाहीं । उरलें बोलिजेसें नाहीं ॥ ध्रु ॥ लपोनियां आड । आह्मां तुझी कैवाड ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजसाटीं । आह्मां सं[6]वसारें तुटी ॥ ३ ॥

१६८१. तुंझ्याठायीं ओस । दोन्ही पुण्य आणि दोष ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ झडलें उरलें किती । आह्मीं धरियेलें चित्तीं ॥ ध्रु ॥ कळलासी नष्टा । यातिक्रियाकर्मभ्रष्टा ॥ २ ॥ तुका ह्मणे बोला । नाहीं ताळा गा विठ्ठला ॥ ३ ॥

१६८२. भांडावें तों हित । ठायीं पडों तें उचित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये खंडों देऊं वाद । आह्मां भांडवलभेद ॥ ध्रु ॥ शब्दसारसें भेटी । नये पडों देऊं तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे आळस । तो चि कारणांचा नास ॥ ३ ॥

---

१ त. पं. ठेवण्या.–२ दे. त. वेव्हार –३ पं. ' तू मी " याबद्दल ' तुह्मी ".–४ पं. कराया.– ५ पं. ० तुह्मा कधी वाड।.–६ पं. संसार तुटी –७ दे. त. तुझाठायीं –८ पं. झडल किती आह्मीं। आह्मीं धरि०.–९ पं. पडतें उचित.–१० पं. शब्द सरसे.

१६८३. नव्हों गांढे आळसी । जो तूं आह्मांपुढें जासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अरे दिलें आह्मां हातीं । वर्म वेवादाचें[1] संतीं ॥ ध्रु ॥ धरोनियां वाट । जोलों[2] शिरोमणि थोंट ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । वाद करीन खरी सेवा ॥ ३ ॥

१६८४. तुझा विसर नको माझिया जीवा । क्षण एकु[3] केशवा मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाओ राहो देह आतां ये चि घडी । कायसी आवडी याची मज ॥ ध्रु ॥ कुश्चीळ[4] इंद्रियें आपुलिया गुणें । यांचिया पाळणें कोण हित ॥ २ ॥ पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं । यांचा कोण धरी संग आतां ॥ ३ ॥ पिंड हा उसना आणिला पांचांचा । सेकीं[5] लागे ज्याचा त्यासी देणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं आणिक सोइरें । तुजविण दुसरें पांडुरंगा ॥ ५ ॥

१६८५. ऐसें सत्य माझें[6] येईल[7] अंतरा । तरि मज करा कृपा देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वचनांसारिखें तळमळी चित्त । बाहेरि तो आंत होइल भाव ॥ ध्रु ॥ तरि मज ठाव द्यावा पायांपाशीं । सत्यत्वें जाणसी दास खरा ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य निकट सेवकें[8] । तरि च भातुकें प्रेम द्यावें ॥ ३ ॥

१६८६. आदि वर्तमान जाणसी भविष्य । मागें पुढें नीस संचिताचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय देऊं पायांपें परिहार । जाणां तो विचार करा देवा ॥ ध्रु ॥ आपुलें तें येथें काय चाले केलें । जोडावे ते भले हात पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे फिके बोल माझे वारा । कराल दातारा होईल तें ॥ ३ ॥

१६८७. सुखें न मनी अवगुण । दुःख[9] भोगी[10] त्याचें कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें कां टायींचें न कळे । राती करा झांकुनि डोळे ॥ ध्रु ॥ चालोनि आड वाटे । पायीं मोडविले कांटे ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणा । बोल ठेवितो शाहाणा ॥ ३ ॥

१६८८. आह्मी न देखों अवगुणां । पापी पवित्र शाहाणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ ध्रु ॥ मज[11] भक्तीसवें चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥ २ ॥ तुका ह्मणे घोटीं । विष अमृत तुजसाटीं ॥ ३ ॥

१६८९. मज नाहीं तुझ्या ज्ञानाची[12] ते चाड । घेतां वाटे गोड नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेणतें लेंकरूं आवडीचें तान्हें । बोलतों वचनें आवडीनें ॥ ध्रु ॥ भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं । घातला विठाई भार तुज ॥ २ ॥ तुका ह्मणे नाचें निर्लज्ज होऊनि । नाहीं माझे मनीं दुजा भाव ॥ ३ ॥

---

१ "विवादाचें" याबद्दल.–२ पं. जाला.–३ पं. रे.–४ पं. कुश्चळ–५ त. करी.–६ त. पं. माझ्या–७ पं. देईल.–८ पं. सेवक.–९ पं. दुख त्याचे भोगी कोण ।–१० त. भोगील.–११ दे. मज मुक्ती सवें०.–१२ त. ज्ञानाची हे चाड. दे. ज्ञानाची चाड.

१६९०. काय माझी संत पाहाती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय[1] चाड ॥ ध्रु ॥ वोबड्या[2] उत्तरीं ह्मणें हरिहरि । आणीक भीकारी नेणें दुजें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥ ३ ॥

१६९१. जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांड भूषणु नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखाचा सांगात अंतकासी अंत । निजांचा निवांत नारायण ॥ ध्रु ॥ गोडाचें ही गोड हर्षाचें ही कोड । प्रीतीचा ही लाड नारायण ॥ २ ॥ भावाचा निज भाव नांवांचा ही[3] नांव । अवघा पंढरिराव अँवतरलासे[4] ॥ ३ ॥ तुकाँ[5] ह्मणे जें हें साराचें हें सार । माझा अंगीकार तेणें केला ॥ ४ ॥

१६९२. आतां मी सर्वथा नव्हें[6] गा दुर्बळ । यातिहीनकुळ दैन्यवाणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥ ध्रु ॥ बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकांसी ॥ २ ॥ दुष्ट[7] नव्हों आह्मी अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ॥ ३ ॥ संवसार आह्मां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों निर्भर मानसीं । जोडालिया रासी सुखाचिया ॥ ५ ॥

१६९३. केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग[8] उद्वेग नाहीं चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव चि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥ ध्रु ॥ त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥ २ ॥ तुका ह्मणे आपआँपणां[9] विचारा । कोण हा दुसरा सांगे तुह्मां ॥ ३ ॥

१६९४. हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तंशुद्धि[10] सेवा देवाची हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडी विठ्ठल गाईजे एकांती । अलभ्य ते येती लाभ घरा ॥ ध्रु ॥ आणीकां अंतरीं नें[11] द्यावी वसति । करावी हे शांती वासनेची ॥ २ ॥ तुका ह्मणे वाण हा चि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ॥ ३ ॥

१६९५. हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते मज विठोबासमान । नमूं आँवडी[12] ते जन ॥ ध्रु ॥ ज्यांचें[13] अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥ २ ॥ तुँका[14] ह्मणे भावें । जिव्हें प्रेम वोसंडावें ॥ ३ ॥

१ त. कोण.–२ दे. त. वोबडा.–३ दे. त. हा.–४ पं. अवतरला –५ पं. तुका ह्मणे हें साराचें ही सार–६ पं. नोव्हे –७ दे. त. पं. दृष्ट –८ दे. उबगें –९ दे. त. पं. ०आपण्या.–१० दे. त. चित्त शुद्ध–११ दे. नेदावी –१२ त. पं. आवडीनें –१३ त. अंतरीं निर्मत्सर । सबाह्य कोमळ जिव्हार ॥. दे. मूळ पाठ कायम ठेवून हा पाठ समासात दाखविला आहे.–१४ पं. तुका ह्मणे जीवें। जिव्हीं प्रेम०.

१६९६. हरिची हरिकथा नावडे जया । अधम ह्मणतां तया वेळ लागे । मनुष्यदेहीं तया नोट लागलें । अघोर सोधिलें कुंभपाक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं । उपजे मरोनि वेळोवेळां भांड । पैंरि[3] लाज लंड न धरी कांहीं ॥ छ ॥ ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी । देवधर्मांविण चांडाळ हा नर । न साहे भूमि भार क्षणभरी ॥ २ ॥ राम ह्मणतां तुझें कांय तें वेचलें । कां हित आपुलें न विचारिसी । जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका ह्मणे चुकी जरी यासी ॥ ३ ॥

१६९७. उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय ब्रीद सांडील आपुलें । ठायींचें धरिलें जाणोनियां ॥ छ ॥ माझ्या दोषासाटीं होइल पाठमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥ २ ॥ तुका ह्मणे रूप आमुच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतुर्भुज ॥ ३ ॥

१६९८. आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंत[9] हें मग जालें नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचा ही साक्षी ॥ छ ॥ हातें जेवी एक मुखीं मागे घांस । माउली जयास तैसी बोंळा[10] ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें ध्यान विटेवरी । तैसी च गोजिरी दिसे मूर्ति ॥ ३ ॥

१६९९. धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य जालों आतां यासि संदेह नाहीं । न पडों यीं वाहीं काळा हातीं ॥ छ ॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट धालें चि न धाये । खादलें चि खायें आवडीनें ॥ ३ ॥

१७००. आवडी न पुरे सेवितां न सरे । पडियेली धुंरेसवें[11] गांठी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न पुरे हा जन्म हें सुख सांटितां । पुढती ही आतां हें चि मागों ॥ छ ॥ मारगाची चिंता पालखी वैसतां । नाहीं उसंतितां कोसपेणी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक तान ॥ ३ ॥

१७०१. नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । ह्मणऊनि मन स्थिरावलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरियेलीं जीवीं पाउलें कोमेळीं[13] । केली एकावळी नाममाळा ॥ छ ॥

---

१ पं. ०नाट पैं लागला । अघोर साधिला कुभ०.–२ त. साधिलें.–३ दे. परिलाज न०. पं. परि न धरी लंड लाज कांहीं.–४ दे. त. तो हा चांडाळ ।.–५ दे. त. काय वेचेल –६ पं. होसील –७ पं. जयासी.–८ त. पं. पाठीमोरा.–९ पं. अनंत हीं मग जालीं नामें.–१० दे. माळा.–११ पं. यावा कांहीं.–१२ दे. धरे.–१३ पं. कोवळी । कंठीं एका०.

शीतळ होऊनियां पावलों विश्रांती । न साहे पुढती घाली चित्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे जाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ३ ॥

१७०२. मायबापापुढें लोंडिकें लेंकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृपावंता घालीं प्रेमपान्हारस । वोळली वोरसें पांडुरंग ॥ छ ॥ नाहीं धीर खुंटी जवळी हुंबरे । ठायीं च पाखर कवळिते ॥ २ ॥ तुका ह्मणे मज होऊं नेदी सीण । कळों नेदी भिन्न आहे ऐसें ॥ ३ ॥

१७०३. आठवों नेंदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्ही राहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मन धांवे तेथें तिचें चि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥ छ ॥ न लगे वेंळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे समपाउलाचा खुंट । केलों बळकट हालों नेदी ॥ ३ ॥

१७०४. उत्तम घालावें आमुचिये मुखीं । निवारावें दुःखी होऊंनि तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न बैसे न वजे जवळूनि दुरी । मागें पुढें वारी घातपात ॥ छ ॥ नाहीं शंका असो भलतिये ठायीं । मावळलें पाहीं द्वैताद्वैत ॥ २ ॥ तुका ह्मणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरलें बाह्य रूप ॥ ३ ॥

१७०५. आह्मां अळंकार मुद्रांचे शृंगार । तुळसीचे हार वांहों कंठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाडिके डिंगर पंढरिरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥ छ ॥ आह्मां आणिकांची चाड चि पैं नाहीं । सर्व सुखें पायीं विठोबाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी नेघों[11] चि या मुक्ती । ऐकाविण[12] चित्तीं दुजें नाहीं ॥ ३ ॥

१७०६. चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥ छ ॥[13] संतां[14] महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ २ ॥ तें[15] तीर्थांचें माहेर । सर्वसुखाचें भांडार ॥ ३ ॥ जन्म नाहीं रे आणीक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ४ ॥

१७०७. पैल घरीं जाली चोरी । देहा केरीं[16] वोंव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हावा हावा करिसी काये । फिराऊनि नेघ्यां वांयें ॥ छ ॥ सांडुनियां शुद्धी । निजलासी

---

१ पं. पाडुरगा.—२ दे. लाटिकें—३ दे. वोरसे—४ दे. त. वोळावीं.—५ पं. जाला.—६ पं. होऊं नेदी—७ पं. राहो.—८ पं. वाचा.—९ दे. चाड चि नाहीं. पं. चाड चित्ती नाहीं.—१० पं. त. मुक्त.—११ दे. त. नेघों या.—१२ दे. त. एकविण.—१३ न. "होईल सज्जन । संतजन भेटती ॥" हें कडवें आढळतें. दे. हें मागून बाहेर घातलें आहे. पं. हें मुळींच नाहीं याचा अर्थ पुढील कडव्यात आला आहे—१४ दे. पं. यांत हें कडवें आहे; त. नाहीं. पं. संत महंता०.—१५ पं. तेथें.—१६ पं. देहा वोंव करी.—१७ पं. काये.

गेली बुद्धी ॥ २ ॥ चोरीं तुझा काढिला बुर । वेगळें भावा घातलें दूर ॥ ३ ॥ भलतियासी देसी वाव । लाहेसि तूं एवढा ठाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे अझुनि तरी । उरलें तें[1] जतन करी ॥ ५ ॥

१७०८. किती वेळा खादला दगा । अझून कां गा जागसी ना ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ लाज नाहीं हिंडतां गांवें । दुःख नवें नित्य नित्य ॥ छ ॥ सवें चोरा हातीं फांसे । देखतां कैसे न देखसी ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडिती वाट । तळपट करावया ॥ ३ ॥

१७०९. मुदलामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ आणिकांची कां लाज नाहीं । आळसा जिहीं ताजिलें ॥ छ ॥ एके सांते सरिखीं[2] वित्तें । हानि हित वेगळालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हित धरा । नव्हे पुरा गांवढाळ ॥ ३ ॥

१७१०. निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ असो ज्याचें त्यांचे[3] माथां । आपण करावी ते कथा ॥ छ ॥ उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥ ३ ॥

१७११. शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ केला न संडी कैवाड । जीवेंसाटीं तों हे होर्ड[4] ॥ छ ॥ धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे हरि । दासां रक्षितो[5] निर्धारीं ॥ ३ ॥

१७१२. हरिच्या दासां भये । ऐसें बोलों तें[6] ही नये ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ राहोनियां आड । उभा देव पुरवी कोड ॥ छ ॥ हरिच्या दासां चिंता । अघटित हे वार्ता ॥ २ ॥ खावें ल्यावें द्यावें । तुका ह्मणे पुरवावें ॥ ३ ॥

१७१३. दासां सर्व काळ । तेथें सुखाचे[7] कल्लोळ ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ जेथें वसती हरिदास[8] । पुण्य पिके पापा नास ॥ छ ॥ फिरे सुदर्शन । घेऊनियां नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । होय ह्मणियारा कामारी ॥ ३ ॥

१७१४. आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ मायबापाचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥ छ ॥ नाहीं निपरादं[9] । कोणां आह्मांमध्यें भेद ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । अवघें आमचें हें धन ॥ ३ ॥

---

१ त. तया.–२ पं. सारिखे.–३ दे. " त्याचे " याबद्दल " त्याचे त्याचे "–४ पं. हौंड.–५ त. रक्षिता.–६ पं. " तेंही " याबद्दल " परी ".–७ पं. सुखाचा.–८ पं. हरिचे दास –९ त. निपराध. पं. निरपराध.

१७१५. काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खैरा[1] विलेपन चंदनाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको नको देवा खळाची संगति । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥ ध्रु ॥ काय सेज बाज माकडा विलास । अळंकारा नास करुनी टाकी ॥ २ ॥ तुका ह्मणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ३ ॥

१७१६. आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनासी ॥ ध्रु ॥ ह्मणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥ २ ॥ तुका[2] ह्मणे हें वहु सकुमार । न साहावे भार वचनाचा ॥ ३ ॥

१७१७. मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आह्मां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटे ऐसें सुख न[3]व्हे भक्तिरस । पुडे[4]तींपुडती आस सेवावें हें ॥ ध्रु ॥ देवा हातीं रूप धे[5]रविला आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त निवांत राहिलें । ध्याईं तीं पाउलें विटेवरि ॥ ३ ॥

१७१८. न[6]को वोलों भांडा । खीळ घालुन वैस तोंडा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐक विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ॥ ध्रु ॥ प्रेमसुखा आड । काय वा[7]जतें चाभाड ॥ २ ॥ तुका ह्मणे हिता । कां रे नागवसी थीता ॥ ३ ॥

१७१९. अति जालें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सवासीण न ह्मणावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपण ॥ ध्रु ॥ शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण नाहीं ॥ ३ ॥

१७२०. शूरां साजती हतियारें । गांड्यां हांसतील पोरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय केली विटंवण । मोतीं नासिकावांचून ॥ ध्रु ॥ पतिव्रते रूप साजे । सिंदळ काजळ लेतां लाजे ॥ २ ॥ दासी पत्नी सुता । नव्हे सरी एक पिता ॥ ३ ॥ मान [10]बुद्धिमंतां । थोर न [11]मनिती पिता ॥ ४ ॥ तुका ह्मणे तरी । आंत शुद्ध दंडे[12] वरी ॥ ५ ॥

१७२१. काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा तों ठायींचा विचार । आहे यातिवैराकार ॥ ध्रु ॥ श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ३ ॥

---

१ पं. खरासी लेपन.–२ पं. तुका ह्मणे वहु असे सकुमार ।.–३ पं. नाहीं.–४ पं. पुढंपुढती आस सेवावी हे ।.–५ पं. धरवू.–६ पं. नये.–७ दे. वाजातें.–८ दे. त. पं. आयुधांव.–९. त. एक नि पिता.–१० दे. पं. बुद्धिवंता.–११ त. ह्मणावा.–१२ पं. दंड.

१७२२. वाइटानें भलें । हीनें दीविलें चांगलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाविण एका । कैचें मोल होतें फुका ॥ छ्रु ॥ विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥ २ ॥ काळिमेनें ज्योती । दिवस[1] कळों आला राती ॥ ३ ॥ उंच निंच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ५ ॥

१७२३. असो खळ[3] ऐसे फार । आह्मां त्यांचे उपकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती पातकांची धुनी । मोल न घेतां साबणीं[4] ॥ छ्रु ॥ फुकाचे मजुर । ओझें वागविती भार ॥ २ ॥ पार उतरून ह्मणे तुका । आह्मां आपण जाती नरका ॥ ३ ॥

१७२४. संत पंढरीस जाती । निरोप धोंडीं तया हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ छ्रु ॥ केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥ २ ॥ तुमचे पायीं पार्यतन । मोचे माझे तन मन ॥ ३ ॥ तांबुलांची पिकधरणी । ते मी असें मुख पसरूनि ॥ ४ ॥ तुमची विष्ठा पंढरीराया । ते[9] सारसुवी माझी काया ॥ ५ ॥ लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥ ६ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥ ७ ॥

१७२५. इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यांचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाईं ॥ छ्रु ॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले[10] जाणतां ॥ २ ॥ पिंड पाळितां ओसरे । अवघी[11] घेऊनि मागें सरे ॥ ३ ॥ करितां उपचार । कोणां नाहीं उपकार ॥ ४ ॥ अल्प जीवन करीं । तुका ह्मणे साधीं हरी ॥ ५ ॥

१७२६. यज्ञनिमित्त तें[12] शरिरासी बंधन । कां रे तृष्णा वांयांविण वाढविली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयांनीं बंधन केलें तुज ॥ छ्रु ॥ आशा धरूनि फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंचि ॥ २ ॥ तुका ह्मणे सिणसी वांयां । शरण न वजतां पंढरिराया ॥ ३ ॥

१७२७. संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं लगती न सायास । तरी कां आळस करिसी झणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें हें सार कां नेघेसी[13] फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ॥ छ्रु ॥

---

१ पं. दाखविलें.–२ पं. दिवसें कळों आली राती ।.–३ पं. ऐसे खळ.–४ दे. सावनीं.–५ पं. धाडिन.–६ दे. त. पाइतन.–७ पं. तांबोल पिकधरणी.–८ दे. पं. इष्टा.–९ पं. "ते" शब्द नाहीं.–१० पं. फिरला.–११ पं. अवघें.–१२ पं. "तें" नाहीं.–१३ पं. न घेसी.

पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथांच्या नार्थे घातला विमानीं । नेला उचलूनि परलोका ॥ २ ॥ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम उच्चारिलें । तंव त्या दिनानाथा कृपा आली । त्यानें [1]तियेसि वैकुंठा नेलें ॥ ३ ॥ अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका ह्मणे भावें स्मरा राम राम । कोण जाणे तये दशे ॥ ४ ॥

१७२८. दुष्टाचें चित्त न भिने[4] अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला । पालथे घागरी घातलें जीवन । न धरी च जार्णं तें ही त्याला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जन्मा येऊनि तेणें पतन चि साधिलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा । जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संवसारा ॥ छ्रु ॥ पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पाहातां अंतरीं कोरडा तो । कुचर मुग नये चि पाका । पाहातां सारिखा होता तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे असे उपाय सकळां । न चले या खळा प्रयत्न कांहीं । ह्मणऊनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हित ॥ ३ ॥

१७२९. कासियानें पूजा करूं केशीराजा । हा चि संदेह माझा फेडीं आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥ छ्रु ॥ गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय [11]करूं ॥ २ ॥ फळदाता तूंच तांबोल अक्षता । तरी काय आतां वाहों तुज ॥ ३ ॥ वाहूं दक्षिणा [12]जरी धातु नारायण । ब्रह्म तें चि अन्न दुजें काई ॥ ४ ॥ गातां तूं ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया [13]थार नाहीं कोठें ॥ ५ ॥ तुका ह्मणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरि ॥ ६ ॥

१७३०. गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ॥ छ्रु ॥ विषयांच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥ २ ॥ वेचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥ ३ ॥ तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्ट लोभें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मेग केला साहे दंड । नाइकती लंड सांगितलें ॥ ५ ॥

१७३१. तुझें ह्मणवितां काय नास जाला । ऐकें वा विठ्ठला कीर्ती तुझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परी तुज नाहीं आमचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥ छ्रु ॥

---

१ दे. तयेसी.–२ त. उभा.–३ पं. स्मरता.–४ पं. चिंतन भिन्न ते अंतरीं ।.–५ दे. त. भिन्ने–६ पं. जाणें–७ पं. तमोगुण.–८ पं. नये चि हा पाका–९ दे. त. पं. प्रेत्न–१० दे. स्वरूप तुझें. त. स्वरूप चि तुझें–११ पं. वाहू–१२ पं. नरी–१३ पं. पार.–१४ पं. पुष्टिलोभें.–१५ पं. केला मग.

समूळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥ २ ॥ लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यांसीं नाहीं थार ऐसें केलें ॥ ३ ॥ मृत्तिका पाषाण तैसें केलें धन । आपले ते कोण पर नेणों[1] ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों देहासी उदार । आणीक विचार काय तेथें ॥ ५ ॥

१७३२. जाऊनियां तीर्थां काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरींचें शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां[2] केलें आपणया ॥ छ ॥ वृंदावन[3] फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडे चि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदां तुह्मी ॥ ३ ॥

१७३३. बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥ ॥ध्रु. ॥ येऊनि अंतरीं राहील[4] गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥ छ ॥ राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होईल[5] भाव एकविध ॥ ३ ॥

१७३४. धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरिये ॥ १[6] ॥ ॥ ध्रु. ॥ न पवीजे केल्या तपांचिया रासी । तें जनलोकांसी[7] दाखविलें ॥ छ ॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ २ ॥ विष्णुपद गया रामधाम[8] काशी । अवघीं[9] पायांपाशीं विठोबाच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ यां नास अहंकाराचा ॥ ४ ॥

१७३५. धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य तो हि लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥ छ ॥ धन्य ते ही[11] भूमी धन्य तरुवर । धन्य[12] तें सरोवर तीर्थरूप ॥ २ ॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भवनें[13] गर्जतसे ॥ ३ ॥ धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरला[14] ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य संसारातें आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ५ ॥

१७३६. मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको जाऊं देउळासी । नेतो बागुल लोकांसी ॥ छ ॥ कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें[15] लावी भीकें[16] ॥ २ ॥ वैष्णवां संगती । हातीं पडलीं[17] नेणों किती ॥ ३ ॥

---

१ पं. नेणें.–२ दे. तों.–३ दे. त. इद्रावण –४ त. राहेल –५ पं. होय –६ पं. "न करीं आळस आलिया संसारीं । पाहें पा पंढरी भूवैकुंठ ॥" हे कडवें जास्त आहे त. हें समासावर आलीकडे कोणी घातलें आहे ; परंतु हें मूळचें येथलें नव्हे असें वाटतें –७ त. तें हें जन० –८ त. पं. रामनाम.–९ पं. अवघें.–१० पं. चि.–११ पं. "ही" नाहीं –१२ दे. धन्य ते सुरवर ०. पं. धन्य सरोवर.–१३ पं. भुवन.–१४ पं. अवतरलासे.–१५ पं. शब्द –१६ त. भीकें.–१७ पं. पडी.

आह्मा कैंचा मग । करिसी उघाडियांचा संग ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ५ ॥

१७३७. मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां तूं उदास नव्हें नारायणा । धांवे[1] मज दीना गांजियेलें ॥ ध्रु ॥ धांव घालीं पुढें इंद्रियांचे ओढी । केलें तडातोडी[2] चित्त माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा न चले सायास । राहिलों हे आस धरुनी तुझी ॥ ३ ॥

१७३८. मागतियाचे दोनि च कर । अमित भांडार दातियाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारु पडियेला ॥ ध्रु ॥ एकें सांटवणें प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आहे तेथें असो । अंखुनियां बैसों पायांपाशीं ॥ ३ ॥

१७३९. जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा[3] विकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ ध्रु ॥ सुखाची विश्रांति । उमटे मातेचिये चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी बहु कृपावंत ॥ ३ ॥

१७४०. यावें माहेरास । हे च सर्वकाळ आस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थ इच्छी पायवणी ॥ ध्रु ॥ भोग उभा आड । आहे तोंवरी च नाड ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । माझें सिद्धी पाववावें ॥ ३ ॥

१७४१. लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभेंविण प्रीती ॥ ध्रु ॥ पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्व ही साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । तैसें तुह्मां संतां ओझें ॥ ३ ॥

१७४२. आह्मां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥ ध्रु ॥ आह्मीं जना ध्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे देश । जाला[4] देवाविण ओस ॥ ३ ॥

१७४३. तुझी पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां बाधूं न सके काळ । जालीं विषम शीतळ ॥ ध्रु ॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भये । आतां स्वप्नीं ही तें नये[5] ॥ ३ ॥

१७४४. काळाचे ही काळ । आह्मी विठोबाचे लडिवाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूं सत्ता सर्वा ठायीं । वसों निकटवासें[6] पायीं ॥ ध्रु ॥ ऐसी कोणाची वैखरी । वदे आमुचे समोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाण । हातीं हरिनाम तीक्षण ॥ ३ ॥

---

१ पं. धाव.–२ दे. तडातडी.–३ दे. तयेचा.–४ त. देवा विण पडिला ओस ।. पं. जाले देवाविण०.–५ पं. स्वप्नीं तें ही दे. स्वप्नीं ही नये.–६ त. प. वास.

१७४५. जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा । मेळवूनि धन मेळवी माती । सदा विपत्ती भोगीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे निजोनि डोकियासी ॥ छ्र ॥ घरा व्याही पाहुणा आला । ह्मणे त्याला बरें नाहीं । तुमचे गावीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥ २ ॥ उजवूं किती होतिलें पोरें । मरतां बरें ह्मणे यांसी । ह्मणऊनि देवा नवस करी । दावी घरींहुनि बोनें ॥ ३ ॥ पर्वकाळीं भट घरासी आला । बोंब घाला ह्मणे पोरां । तुमचा उणा होईलें वांटा । काळ पिठोंसी आला ॥ ४ ॥ दाढी करितां अडका गेला । घरांत आला बाइलेपें । ह्मणे आतां उगवीं मोडी । डोई बोडीं आपुली ॥ ५ ॥ तीर्थे स्वप्नीं नेणे गंगा । पूजन लिंगा गांविंचिया । आडकुनि दांर बैसे दारीं । आल्या घर ह्मणे ओस ॥ ६ ॥ तुका ह्मणे ऐसे आहेत गा हरी । या ही तारीं जीवांसी । माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती ह्मणोनि ॥ ७ ॥

१७४६. जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो ही कारणांचा दास । देव ह्मणवितां पावे नास ॥ छ्र ॥ वेची अनुष्ठान । सिद्धी कराया प्रसन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें । मुदल गेलें हाटवेचें ॥ ३ ॥

१७४७. घातला दुकान । पढीये तैसा आहे वान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी भांडारी देवाचे । द्यावें घ्यावें माप वाचे ॥ छ्र ॥ उगवूं जाणों मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे पुडी । मोलें तैसी खरी कुडी ॥ ३ ॥

१७४८. सादाविलें एका । सरें अवघियां लोकां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां आवडीचे हातीं । भेद नाहीं ये पंगती ॥ छ्र ॥ मोकळी च पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । आहे ढंसाळ वेव्हारा ॥ ३ ॥

१७४९. तडामोडी करा । परि उत्तम तें भरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें खंडे एके खेपे । जाय तेथें लाभें वोपे ॥ छ्र ॥ दाविल्या सारिखें । मागें नसावें पारिखें ॥ २ ॥ मागें पुढें ऋण । तुका ह्मणे फिटे हीण ॥ ३ ॥

१७५०. नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाय तेथें पावे मान । चाले वोलिलें वचन ॥ छ्र ॥ राहों नेदी बाकी । देंन ज्याचें त्यासी टाकी ॥ २ ॥ होवें वाटे जना । तुका ह्मणे सार्टी गुणां ॥ ३ ॥

---

१ त. मेळविले.–२ त. पाहुणा व्याही.–३ पं. होती.–४ त. येईल.–५ पं. पिठासी पैं आला–६ पं. द्वार वैसे द्वारीं.–७ पं. जाणें.–८ पं. मोला तैसी०.–९ त. ढीसाळ.–१० पं. ज्याचें दान–११ पं. व्हावा.

## ॥ अनघडसिद्धाच्या शब्दें करून रामेश्वरभटाच्या शरीरीं दाह जाला तो ज्यानें शमला तो अभंग ॥ १ ॥

१७५१. चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे[1] न खाती सर्प तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विष तें अमृत औघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ छ्र ॥ दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ २ ॥ आवडेल जीवां जीवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपा केली नारायणें । जाणिजेते येणें अनुभवें ॥ ४ ॥

१७५२. लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोर्जुनि झिजलों मापाचिया परी । जाळावी हे[5] थोरी लाभाविण ॥ छ्र ॥ कोमळ कंटक तीक्षण अगरीं । पोचट ते वरी अंगकांति ॥ २ ॥ चित्रींचें लेप शृंगारिलें निकें । जीवेंविण फिकें रूप त्याचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिसें वांयां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ४ ॥

१७५३. बोलविसी माझें मुर्ख । परी या जना वाटे दुःख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जया जयाची आवडो । तया लागीं तें चरफडी ॥ छ्र ॥ कठीण देतां काढा । जल्पे रोगी मेळवी दाढा ॥ २ ॥ खाऊं नये तें चि मागे । निवारितां रडों लागे ॥ ३ ॥ वैद्या भीड काय । अतित्याई जीवें जाय ॥ ४ ॥ नये भिडा सांगों आन । पथ्य औषधा कारण ॥ ५ ॥ धन माया पुत्र दारा । हे तों[8] आवडी नरका थारा ॥ ६ ॥ तुका ह्मणे यांत । आवडे ते करा मात ॥ ७ ॥

१७५४. पतिव्रते आनंद मनीं । सिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळो वर्म लागो आगी । शुद्धपण भलें जगीं ॥ छ्र ॥ सुख पुराणीं आचारशीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥ २ ॥ शूरा उल्हास अंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥ ३ ॥ शुद्ध सोनें उजळे अगी । हीन काळें धांवे रंगीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तो चि हिरा । घनघायें निवडे पुरा ॥ ५ ॥

१७५५. चालिती आड वाटा । आणिकां दाविती जे नीटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न मनीं तयांचे उपकार । नाहीं जोडा तो गंव्हार ॥ छ्र ॥ विष सेवूनि वारी मागें । प्राण जातां जेणें संगें ॥ २ ॥ बुडतां हांक मारी । ठाव नाहीं आणिकां वारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे न करीं हिकीं । गुण घेऊन अवेगुण टाका ॥ ४ ॥

---

१ पं. ही –२ दे. अघातें हित –३ दे. जीवाचें.–४ दे. त. मजुनि.–५ पं. ते.–६ पं. मुखें.– ७ दे. पं. औषधाकारण.–८ त. " तों " नाहीं.–९ पं. हाका –१० दे. हिका.–११ त. अगुण.

१७५६. कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करीं भलते ठायीं दास तुझा ॥ छ ॥ पंढरीस कोणी जाती वारे[1]करी । होईन त्यांचे घरीं पशुयाति ॥ २ ॥ विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ॥ ३ ॥ तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होइन केरसुणी त्याचे घरीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हा चि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गती चाड मज ॥ ५ ॥

१७५७. अवघिया चाडा कुंटित करूनि । लावीं आपुली च गोडी । आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी । मीतूंपणापासाव गुंतलों । मिथ्या संकल्प तो माझा तोडीं । तुझिये चरणीं माझे दोन्ही पक्ष । अवघी करुनि दाखवीं पिंडी रे रे[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें साच काय केलें मृगजळ । वर्णा याती कुळ अभिमान । कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्यांचें साचपण ॥ छ ॥ वेगळाल्या भावें चिं[3]त्ता तडातोडी । केलों देशधडी मायाजाळें । गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं वाळें । एका एक न धरी संबंध पुरलिया । पातलिया जवळी काळें । जाणोनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥ २ ॥ एकां जवळी धरी आणिकां अंतरीं । [4]तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं । एकांचें पाळण एकांसी भांडण । चाड [5]कवणिये काजीं । अधिक असे उणें कवण कवण्या गुणें । हे मात्र न कळे चि तुझी । ह्मणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती । तुका ह्मणे भाक माझी ॥ ३ ॥

१७५८. आणिकां छळावया जालासी शाहाणा । स्वहिता घातलें ख[6]णें । आडिके पैके करूनि सायास । कृपणें सांचलें धन । न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण । तारुण्यदशे अधम मातला । दवडी हात पाय कान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जालें यांस वांयां कां ठकले । हातीं सांपडलें टाकीतसे । घेउनि स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवले आपुले इच्छे ॥ छ ॥ सिद्धीं सेविलें सेविती अधम । पात्रासारिखें फळ । सिंपिलीं[7] मोतीं जन्मलें स्वाती । वरुपलें सर्वत्र जळ । कापुस पट नये चि कारणा । तयास पातला काळ । तें चि भुजंगें धरिलें कंठीं । मां[8] विष जालें त्याची गरळ ॥ २ ॥ भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलुनि केळें । घालुनियां घसा [9]अंगोळिया । वांती करूं पाहे बळें । कुंथावयाची आवडी वांता[10] । उन्ह[11]वणी रडवी वाळें । तुका ह्मणे जे जैसें करिती । ते पावती तैसीं च फळें ॥ ३ ॥

१ पं वारकरी.–२ पं. पीडि रे रे.–३ पं. चिता.–४ पं. "तीं" नाहीं.–५ पं. कवणे ये–६ पं. खाणं. त. खाण.–७ पं. सिपिला तों मोती जन्मले स्वातीचें । वरपले०.–८ दे. माविश त. माविस –९ दे. अगोळिया हाते वात करू०.–१० पं. देवा.–११ पं. उन्हवनी.

१७५९. चंदनाचे गांवीं सर्पांची[1] वसति । भोगिती[2] ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ ध्रु ॥ क्षीरांची[3] वसति अशुद्ध सेवावें । जवळी तें जावें भोगें दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥ ३ ॥

१७६०. तुज दिलें आतां करीं यत्न याचा । जीवभाववाचाकायामनें[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भागलों दातारा सीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥ ध्रु ॥ नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हतां ही कोणी कांहीं माझीं ॥ २ ॥ वर्म नेणें दिशा हिंडती मोकट[5] । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥ ३ ॥ येरझारीफेरा[6] सिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगिकारीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥ ५ ॥

१७६१. स्वयें[7] पाक करी । संशय तो चि धरी । संदेहसागरीं । आणीक परी बुडती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणे विरळा एक । जालें तेथींचें हें[8] सुख । देखिले बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥ ध्रु ॥ तो चि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ २ ॥ तो चि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धी । संदेहाचा संधी । वेठी आणीक[9] धरियेले ॥ ३ ॥ अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान । सोंग वांयांविण । ते झांकून बैसती ॥ ४ ॥ करणें जयासाटीं । जो नातुडे कवणे आटी । तुका ह्मणे साटी । चित्तवित्तेंवांचूनि ॥ ५ ॥

१७६२. माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता । पळसी पंढरिनाथा । भेणें आतां तयाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि मज कळलासी । नव्हतां भेटी जाणीवेसी । एक संपादिसी । मान करिसी लोकांत ॥ ध्रु ॥ तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें । काय तुज ऐसां कोडें । रे[10] सांकडें घालावें ॥ २ ॥ भोगेंधीपति[11] क्रियमाण । तें तुज नांगवे आझून । तरि का वांयांविण । तुज ऐसां सीण करावा ॥ ३ ॥ तुज नव्हतां माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई । हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥ ४ ॥ तूं भितोसि माझिया दोषा । कांहीं मागणें ते आशा । तुका ह्मणे ऐसा । कांहीं न धरीं[12] संकोच ॥ ५ ॥

---

१ दे. सर्पांच्या –२ दे. भोगीत ते होती०. त. भोगीते ते होती०.–३ पं. क्षीराच्या – ४ पं.० मनें.–५ पं. मोकाट.–६ पं. वेरझारी पोरा. दे. वेरझारी फेरा.–७ पं. स्वयपाक.–८ पं. ही.– ९ दे. आणि करियेले. पं. आणीक धरियेली –१० पं. सांकडे रे.–११ पं. भोगाधिपति.–१२ पं. धरणें

**१७६३.** लोकमान देहसुख । संपत्तिउपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिये भेटीवांचूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट । थोरें पुण्यें वीट । तुज दैवें चि लाधली ॥ छ ॥ काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मौंथेचें मापाडें । भेटीविण कुडें । तुझिये अवघें मज वाटे ॥ २ ॥ आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार । न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥ ३ ॥ रिद्धिसिद्धी काय करूं । अथवा अँगम्य विचारु । भेटीविण भारु । तुझिये वाटे मज यांचा ॥ ४ ॥ तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीवें । तुका ह्मणे द्यावें । दरुषण पायांचें ॥ ५ ॥

**१७६४.** तुझा ह्मणवून तुज नेणें । ऐसें काय माझें जिणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ॥ छ ॥ काय शँब्दीं चि ऐकिला । भेटी नव्हँतां गा विठ्ठला ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । अभय देईं पंढरिनाथा ॥ ३ ॥

**१७६५.** उद्धवअक्रूरासी । आणीक व्यासआंब्रऋषी । रुँक्मांगदप्रल्हादासी । दाविलें तें दाखवीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण । उताविळ मन । तयाकारणें तेथें ॥ छ ॥ जनकश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी । विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ॥ २ ॥ पांडवां अकांतीं । तेथें पावसी स्मरती । घातलें द्रौपदी । यागीं विरडें चोळीचें[10] ॥ ३ ॥ करी गोपींचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख । दावीं तें चि सुख । दृष्टी माझ्या आपुलें ॥ ४ ॥ तरि तूं अनाथाचा दाता । मागतियां शरणागतां । तुका ह्मणे आतां । कोड पुरवीं हें[11] माझें ॥ ५ ॥

**१७६६.** मागता भिकारी जालों तुझे द्वारीं । देईं मज हरी कृपादान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजी ॥ छ ॥ सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी एक ॥ २ ॥ तापत्रयें[12] माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥ ३ ॥ संबंधीं जनवाद[13] पीडलों परोपरी । अंतरलों दुरी तुजसी तेणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां तुझा शरणागत । करावें सनाथ मायबापा ॥ ५ ॥

---

१ पं. सपत्तिभोग.—२ पं. थोर पुण्य मीट । तुज दैव चि लाधली. ॥—३ त. मापाचें—४ पं. आगम.—५ पं. शब्द.—६ पं. नसता.—७ दे. रुक्मांगदा.—८ पं. प्रल्हादासी.—९ पं. पावती.—१० पं. चोळीन—११ पं. "हे" नाहीं.—१२ पं. तापत्रयीं.—१३ पं. जनवादी.

१७६७. भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न मनी नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी ॥ ध्रु. ॥ नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके तस्करघाई ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग ॥ ३ ॥

१७६८. दिनदिन शंका वाटे । आयुष्य नेणवतां गाढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसीं भुललीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ ध्रु. ॥ विसरलीं मरण । त्याची नाहीं आठवण ॥ २ ॥ देखत देखत पाहीं । तुका ह्मणे आठव नाहीं ॥ ३ ॥

१७६९. माझें मज आतां न देखें निरसतां । ह्मणऊन आधार केला । संसाराची आस सांडुनि लौकिक । जीव भाव तुज दिला । नव्हतीं माझीं कोणी मी कवणांचा । अर्थ मोहो[3] सांडवला । तारीं मारीं करीं भलतें दातारा । होऊन तुझीं आतां ठेलों रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असो माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप । बाळकासी चिंता काय पोटवेथा । जया शिरीं मायबाप ॥ ध्रु. ॥ पापपुण्यें श्रुति आटल्या । शास्त्रांस न लगे चि ठाव । विधिनिषेधें गोविलीं पुराणें । वेदांसी तो अहंभाव । ओंकाराचें मूळ व्यापिलें माया । तेथें न धरे च भाव । ह्मणऊन कावाड सांडिलें उपसतां । धरिलें तुझें चि नांव ॥ २ ॥ तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों । सर्व आशा तुझे पायीं । तप तीर्थ दान करवूं कवणा । हातीं अधीन तें मज काई । आहिवयें परत्रें चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देई । मायामोहपाश करीं विष तैसें । तुका ह्मणे माझ्याठायीं ॥ ३ ॥

१७७०. तुझें नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळ ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रसना येरां रसां विटे । घेतां घोट अधिक हें ॥ ध्रु. ॥ आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी संसारें ॥ २ ॥ तुका ह्मणे आहार जाला । हा विठ्ठलीं आह्मांसी ॥ ३ ॥

१७७१. घालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेवूं तोंवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्रीडा करूं निरंजनीं[11] । न पुरे धणी हरिसवें ॥ ध्रु. ॥ अवघे खेळों अवघ्यामधीं । डाई न पडों ऐसी बुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे वांचवितां[12] । आह्मां सत्ता समर्थ ॥ ३ ॥

१७७२. एकल्या[13] नव्हे खेळ चांग । धरिला संग ह्मणऊनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥ ध्रु. ॥ दुसरा परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरें ही ॥ २ ॥ तुका ह्मणे कळल्यां[14] कळे । येरें[15] खेळे खेळ ह्मूण ॥ ३ ॥

१ दे. दव०. त. वद०.—२ दे. विसरला.—३ पं. मोहें सांडला—४ पं. आतां तुझा.—५ त. ठेला रे.—६ पं. धरवे.—७ दे. देहीं.—८ पं. "तुझें" नाहीं.—९ पं. संसारा.—१० त. पं. विठ्ठल.—११ दे. त. पं. निरांजनीं.—१२ दे. वाचवीन—१३ पं. एकल्यानें नव्हे खेळ चाग । धरी सग०.—१४ त. कळे त्या कळे ।. पं. कळल्या काळें ।.—१५ पं. येरा खेळे०. त. येरां खेळ खेळ०.

१७७३. बोलविलें जेणें । तो चि यांचें गुह्य जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी तों कावाडाचा धनी । जेवूं मागावें थिंकोनि ॥ छ ॥ मजुराच्या हातें । मापें जालें गेलें रितें ॥ २ ॥ जाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥ ३ ॥ मायबापासवें । बाळें कौतुकें खेळवें ॥ ४ ॥ जैसा करिती धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥ ५ ॥ त्याच्या साच गाई ह्मैसी । येणें खेळावें मातीशीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥ ७ ॥

१७७४. कां हो तुह्मी माझी वदविली वाणी । नेदा हें[4] निवडूनि पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक म्यां कोणां पुसावा विचार । मुळीं संवसार दुराविला ॥ छ ॥ स्वामिसेवा ह्मूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥ ३ ॥

१७७५. सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी[6] हा प्राण जाय त्याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं[7] टळों नये ॥ छ ॥ समय सांभाळूनि आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी ह्मणवावें सेवक । खादलें तें अन्न हक होय ॥ ३ ॥

१७७६. नये पुसों आज्ञा केली एकसरें । आह्मांसी दुसरें आतां नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्यांचे[10] तो बळिवंत सर्व निवारिता । आह्मां काय चिंता करणें लागे ॥ छ ॥ बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ॥ २ ॥ तुका ह्मणे मज होईल वारिता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥

१७७७. बळिवंत आह्मी समर्थाचे दास । घातली या कास कळिकाळासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये मानसाचा कोण आला पाड । उलंघोनि जड गेलों आधीं ॥ छ ॥ संसाराचे बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षड्वर्ग ॥ २ ॥ तुका ह्मणे एक उरला धरिता ठाव । येर केले वाव तृणवत ॥ ३ ॥

१७७८. एका गावें आह्मीं विठोबाचें नाम । आणिकांचें काम नाहीं आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोडूनियां वाटा सूक्ष्मे[12] सगर । केला राज्यभार चाले ऐसा ॥ छ ॥ लावूनि मृदंगें[13] टाळ[14]श्रुतिघोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रें ॥ ३ ॥

---

१ पं. त्याचें—२ पं. माप केलं जाल रितें.—३ पं. माझी तुह्मी.—४ पं. "हे" नाहीं.—५ पं. समु॰.—६ पं. तोंवरी—७ त. निरोपावाचूनि॰ —८ दे. त. हाक अन्न—९ पं. नाहीं आता—१० पं. ज्याचा. दे. ज्याचें.—११ पं. माणसाचा.—१२ पं. सूक्ष्म—१३ दे. त. मृदाग.—१४ पं. श्रुतिटाळघोष.

१७७९. वाचेच्या चापल्यें बहु जालों कुशळ । नाहीं बीजमूळ हाता आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि पंढरिराया दुखी होतें मन । अंतरींचें कोण जाणे माझें ॥ छ ॥ पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥ २ ॥ तुका ह्मणे खूण नें कळे चि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ३ ॥

१७८०. आतां काढाकाढी करीं बा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिचा धर्म घ्यावे प्राण हा चि ॥ छ ॥ मनाचा स्वभाव इंद्रियांचे ओढी । पतनाचे जोडी वरी हांव ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ॥ ३ ॥

१७८१. सज्जन तो शब्द सत्य जो मानी । छळी दुर्जन आणिकांसी ॥ १० ॥ ॥ ध्रु. ॥ एक गुण तो केला दोंठायीं । ज्याचा त्यास पाहीं जैसा तैसा ॥ छ ॥ भाविक शब्द बोले वाणीचा । लटिका वाचा वाचाळ तो ॥ २ ॥ परउपकार घडे तो भला । नाठ्याळ तया दया नाहीं ॥ ३ ॥ जाणीवंत तो[10] पायरी जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥ ४ ॥ हित तें अनहित केलें कैसें । तुका ह्मणे पिसें लागलें [11]यांस ॥ ५ ॥

१७८२. तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा ते चि घडी झडो माझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें मज देईं हें मज देईं । आणिक दुजें कांहीं न मगें तुज ॥ छ ॥ बहिर कान तुझी कीर्ति नाइकतां । पाय न देखतां जात डोळे ॥ २ ॥ मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ॥ ३ ॥ हातपाय तेणें पंथें न [12]चलतां । [13]जावे ते अनंता गळोनियां ॥ ४ ॥ तुजविण जिणें नाहीं मज चाड । तुका ह्मणे गोड नाम तुझें ॥ ५ ॥

१७८३. ह्मणसी होऊनी निश्चिंतो[14] । हरूनियां अवघी चिंता । मग जाऊं एकांता । भजन करूं । संसारसंभ्रमें आशा लागे पाठी । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सेकीं नाडसील नाडसील । विषयसंगें अवघा नाडसील । मागुता पडसील भवडोहीं ॥ छ ॥ शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं [15]कैंधीं अराणूक । करिती तडातोडी [16]अंत बाह्यात्कारीं । ऐसे जाती चारी

१ दे. त. वाचाचापल्ये.—२ पं. नकळे निरुती.—३ पं. तिचा तो स्वभाव प्राण घ्यावा.—४ पं. इंद्रियाची —५ पं. पतनाची.—६ पं. केलासे दोठायीं.—७ पं. पाहिजे.—८ पं. भाविक तो शब्द.—९ पं. पडे तो चि भला.—१० पं. तो नि पायरी०.—११ पं. त्या.—१२ त. पं. चालतां.—१३ त. जावो तें. पं. जावो ते.—१४ पं. निश्चिता.—१५ त. पं. कदा.—१६ पं. अतर्बाह्यात्कारी.

दिवस वेगीं ॥ २ ॥ मोलाची घडी जाते वांयांविण । न मिळे मोल धन देतां कोडी । जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका ह्मणे हाय करिसी मग ॥ ३ ॥

१७८४. कनवाळू कृपाळू भक्तांलागीं मोही । गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंगे ये[2] वो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे ये[2] वो पांडुरंगे ॥ ध्रु ॥ भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । आंबऋषीकारणें जन्म दाहा घेतले ॥ २ ॥ प्रैल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ३ ॥ उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥ ४ ॥ कौरैवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वेस्त्रहरणीं वस्त्रें कैसी जाली माउली ॥ ५ ॥ दुर्वास पातला धैर्मा छळावया वनीं । धांवसी लवलाहीं शाँखादेठ घेऊनि ॥ ६ ॥ कृपाळू माउली भुक्तिमुक्तिभांडार । करीं माझा अंगीकार. तुका ह्मणे विठ्ठले ॥ ७ ॥

१७८५. कवणा पाषाणासी धरूनि भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां । ह्मणऊनि निश्चित राहिलों मनीं । तूं चि सर्वां खाणीं देखोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कवणाचें कारण न लगे चि कांहीं । सेर्वां सर्वां ठायीं तूं मज एक । कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें काई न दिसे देवा ॥ ध्रु ॥ जळें जळ काय धोविलें[10] एक । कवण तें पातक हरलें तेथें । पापपुण्य हे[11] वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ २ ॥ पितरस्वरूपी तूं चि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य । तुका ह्मणे जीत पिंड तुझ्यां हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥ ३ ॥

१७८६. सिणलों दातारा करितां वेरझारा । आतां सोडवीं संसारापासोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न सुटे चि वाकी नव्हे झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥ ध्रु ॥ मायेबापें[12] माझीं जीवाचीं सांगाती । [13]तीं देतील हातीं काळाचिया ॥ २ ॥ पडताळूनि सुरी बैसली सेजारीं । यमफासा करीं घेऊनियां ॥ ३ ॥ पाठीं पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढूनियां ॥ ४ ॥ जन साँडभूत असे या सकळां । मी एक निराळा परदेशी ॥ ५ ॥ कोणां काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥ ६ ॥ तुका ह्मणे मज तुझाची भरवसा । ह्मणऊनि आशा मोकलिली ॥ ७ ॥

---

१ पं. विठाबाई –२ पं. येई वो दे. येंवो ('येईवो' याबद्दल आहे ह्मणून).–३ पं. प्रल्हादाकारणें –४ त. कौरवें.–५ त. पं. वस्त्राहरणीं –६ पं. धर्म.–७ पं. शाखापत्र.–८ पं. विठ्ठल.–९ दे. त. सर्वांठायीं तू एक.–१० पं. धोवियेलें.–११ त. हें –१२ पं. मायबाप.–१३ पं. ते –१४ दे. त. सांडभूत.

१७८७. देवाचा भक्त तो देवासी गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची । कवणाचा सोइरा नव्हे च सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निष्काम वेडें ह्मणती बापुडें । अवघियां सांकडें जाला कैसा । माझें ऐसें तया न ह्मणेती कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥ ध्रु. ॥ प्रातःस्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी । कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चांडाळा काय जालें ॥ २ ॥ गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आई बाप भाऊ । घरीं बाइल ह्मणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ मरता तरी ॥ ३ ॥ जन्मोनि जाला अवघियां वेगळा । ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो । तुका ह्मणे जो संसारा रुसला । तेणें चि टाकिला सिद्धपंथ ॥ ४ ॥

१७८८. कस्तुरी भिनली जये मृत्तिके । तयेसी आणिके कैसी सरी ॥ १ ॥ लोखंडाचे अंगीं लागला परिस । तया आणिकास कैसी सरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मी न वजें यातीवरी । पूज्यमान करीं वैष्णवांसी ॥ ३ ॥

१७८९. अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ ध्रु. ॥ ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तें च ब्रह्म नव्हे ॥ २ ॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लगतां उन्मनीचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ४ ॥

१७९०. नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें[१०] व्यापूनियां ॥ ध्रु. ॥ मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥ २ ॥ राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारि । बोबड्या[११] उत्तरीं हें चि ध्यान ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ४ ॥

१७९१. देवासी लागे सकळांसी[१२] पोसावें । आह्मां न लगे खावें काय चिंता[१३] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवें[१४] विचारावें लागे पापपुण्य । आह्मासी हें जन अवघें भलें ॥ ध्रु. ॥ देवासी उत्पत्ति लागला संहार । आह्मां नाहीं फार थोडें कांहीं ॥ २ ॥ देवासी काम लागला[१५] धंदा । आह्मासी ते सदा रिकामीक ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥ ४ ॥

---

१ त. देवभक्त.–२ पं. देवासी च.–३ दे. ह्मणतील–४ पं. अवघी–५ दे. त. ह्मणत.–६ दे. त. शड. पं. षड.–७ पं. जन्मोनियां.–८ पं. जो या ससारा.–९ पं. लागतां.–१० त. पं. अासंग–११ दे त. बोबडा.–१२ पं. सकळां.–१३ पं. आह्मां काय खावें न लगे चिंता–१४ पं. देवासी.– १५ पं. लागला हा धंदा.

१७९२. घेईन मी जन्म याजसाटीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिनामकीर्तन संतांचें पूजन । घालूं लोटांगण महाद्वारीं ॥ छ्र ॥ आनंदें निर्भर असों भलते ठायीं । सुखदुःखें नाहीं चाड आह्मां ॥ २ ॥ आणीक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्व भावें ॥ ३ ॥ मोक्ष आह्मां घरीं कामारी तें दासी । होय सांगों तैसी तुका ह्मणे ॥ ४ ॥

१७९३. देवा तुज मज पण । पाहों आगळा तो कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी साच मी पतित । तूं च खोटा दिनानाथ । ग्वाही साधुसंत जन । करूनि अंगीं लावीन ॥ छ्र ॥ आह्मी धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ २ ॥ न चले तुझें कांहीं त्यास । आह्मी बळकाविले दोष ॥ ३ ॥ दिशा भरल्या माझ्या मनें । लपालासी त्याच्या भेणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे चित्त । करी तुझी माझी नीत ॥ ५ ॥

१७९४. लौपनिकशब्दें नातुडे हा देव । मैंनिचे गुह्य भाव शुद्ध बोला ॥ १ ॥ अंतरिंचा भेद जाणे परमानंद । जैयासी संवाद करणें लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी आपुलें स्वहित । तरी करीं चित्त शुद्धभावें ॥ ३ ॥

१७९५. नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करिसी वांयां लटिका चि पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ छ्र ॥ मी च देव ऐसें सांगसी या लोकां । विषयांच्या सुखा टोंकोनियां ॥ २ ॥ अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरि राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ४ ॥

१७९६. गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरां नाश तेणें ॥ छ्र ॥ कर्पूरकांडणी काय कोंडा कणी । सिंधू मिळवणीं काय चाले ॥ २ ॥ परिस चिंतामणि आणिकांचा गुणी । पालटे लागोनि नव्हे तैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ४ ॥

१७९७. परिसें[11] काय धातु परिस काय धातु । फेडितो निभ्रांतु लोहपांगु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैाय[12] तयाहूनि जालासी वापुडें । फेडितां सांकडें माझें एक ॥ छ्र ॥

१ दे. पं. सुखदु ख.–२ दे. त. साधुमत.–३ पं. त. लापणीक०.–४ पं. मनिचा –५ पं. तयासी –६ त. पं. बोलता हें सिद्ध –७ त. पं. "हा" नाहीं –८ पं. ऐसा –९ त. सांगसील.–१० दे. नासे.–११ दे. "परिस काय धातु" इतकें एकदांच आहे. पं. परिस काय धातु सोनें करितु ॥ फेडी निभ्रातु०.–१२ पं. काय ते तयाहूनि

कल्पतरु कोड पुरवितो रोकडा। चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥ २ ॥ चंदनांच्या वासें वसतां चंदन। होती काष्ठ आन वृक्षयाती ॥ ३ ॥ काय त्याचें उणें जालें त्यासी देतां। विचारीं अनंता तुका ह्मणे ॥ ४ ॥

१७९८. तोडुनि पुष्पवटिका फळवृक्षयाती। बाभळा राखती करूनि सार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण हित तेणें देखिलें आपुलें। आणीक पाहिलें सुख काई ॥ ध्रु ॥ धान्यें बीजें जेणें जाळिलीं सकळें। पेरितो काळें जिरें बीज ॥ २ ॥ मोडोनियां वाटा पुढिलांची सोय। आडरानें जाय घेउनि लोकां ॥ ३ ॥ विषाचें अमृत ठेवूनियां नाम। करितो अधम ब्रह्महत्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यास नाइके सांगतां। तया हाल करितां पाप नाहीं ॥ ५ ॥

१७९९. संसाराच्या भेणें। पळों न लाहेसें केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें तेथें आपण आहे। आह्मीं करावें तें काये ॥ ध्रु ॥ एकांतींसी ठाव। तिहीं लोकीं नाहीं वाव ॥ २ ॥ गांवा जातों ऐसें। न लगे ह्मणावें तें कैसें ॥ ३ ॥ स्वप्नाचे परी। जागा पाहे तंव घरीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे काये। तुझें घेतलें म्यां आहे ॥ ५ ॥

१८००. आण काय सादर। दिसीं आह्मां कां निष्ठुर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केलें भक्त तैसें देई। तुझें प्रेम माझ्याठायीं ॥ ध्रु ॥ काय पंगतीस कोंडा। एकांतासी साकरमांडा ॥ २ ॥ काय एकपण। पोतां घालूनि गांठी खूणें ॥ ३ ॥ काय घ्यावें ऐसें। तया आपण अनारिसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मैंधीं। आतां तोडूं भेद बुद्धी ॥ ५ ॥

१८०१. चित्त तुझ्या पायीं। ठेवुनि जालों उतराई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तूं खोटा केशीराजा। अंतपार न कळे तुझा ॥ ध्रु ॥ आह्मी सर्वस्वें उदार। तुज देऊनियां धीर ॥ २ ॥ इंद्रियांची होळी। संवसार दिला बळी ॥ ३ ॥ न पडे विसर। तुझा आह्मां निरंतर ॥ ४ ॥ प्रेम एकासाटीं। तुका ह्मणे न वेचे गांठी ॥ ५ ॥

१८०२. आह्मी पतित ह्मणोनि तुज आलों शरण। करितों चिंतन दिवस रात्रीं। नाहीं तरी मज काय होती चाड। धरावया भीड तुज चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां न तारावें तुह्मी काय करावें। सांगिजोजी भावें नारायणा ॥ ध्रु ॥ अन्याय एकाचा अंगीकार करणें। तया हातीं देणें लाज ते चि। काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें। जनामाजी दावणें वळरया ॥ २ ॥ पोह्या अन्नछत्र घालूनियां घरीं। दंडितो

---

१ त. हित.–२ पं. धान्यबीज जेणें जाळिलें सकळ। पेरितो कारळे जिरें०. त. पेरितो तें काळें.– ३ पं. एकांतासी.–४ पं. आपण.–५ पं. घन.–६ पं. तैसें.–७ पं. सधो.–८ पं. देऊनि वेव्हार.– ९ पं. वजे.–१० सांगीजे जी–११ पं. ० अन्नसत्र० दंडी जो बाहेरी०.

बाहेरी आलियासी । नव्हे कीर्ति[1] कांहीं न मानें[2] लोकां । काय विटंबणा तैसी[3] ॥ ३ ॥ प्रत्यक्षासी काय द्यावें[4] हें प्रमाण । पाहातां दर्पण साक्ष काई । तुका ह्मणे तरी आह्मां कां न कळे । तरलों[5] किंवा आह्मी नाहीं ॥ ४ ॥

१८०३. काग वग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो मज दावा तो मज दावा । नंदानंदन जीवा आवडे[6] तो ॥ छ ॥ गोवर्धन गिरी उचलिला करीं । गोकुळ[7] भीतरी राखियेलें ॥ २ ॥ वधुनि भौमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥ ३ ॥ पांडव जोहरीं राखिले कुसरी । विवराभीतरीं चालविले ॥ ४ ॥ तुका ह्मणे हा भक्तांचा कृपाळ । दुष्टजना काळ नारायण ॥ ५ ॥

१८०४. तुजविण देवा । कोणा ह्मणे माझी जिव्हा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि हे हो कां शतखंड । पडो झडोनियां रांड ॥ छ ॥ कांहीं इच्छेसाटीं । करिल[8] वळवळ करंटी ॥ २ ॥ तुका ह्मणे कर । करीं तयाचा विसर ॥ ३ ॥

१८०५. आह्मां सर्वभावें[9] हें चि काम । न विसंभावें तुझें नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे करावी हे चिंता । तरणें करणें काय आतां ॥ छ ॥ आसनीं भोजनीं[10] शयनीं । दुजें नाहीं ध्यानीं मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥ ३ ॥

१८०६. नव्हे कांहीं कवणाचा । भाव जाणवला साचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तुझ्या पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ छ ॥ शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ॥ २ ॥ तुका ह्मणे वांयांविण । देवा कळों आला सीण ॥ ३ ॥

१८०७. रज्जु धरूनियां हातीं । भेडसाविलीं नेणतीं । कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मांआह्मांमध्यें हरी । जाली होती तैसी[11] परी । मृगजळाच्या पुरीं । ठाव पाहों तरावया ॥ छ ॥ सरी चिंताक[12] भोंवरी । अळंकाराचिया परी । नामें जालीं दुरी । एक सोनें आटितां ॥ २ ॥ पिसांचीं पारवीं । करोनि बाजागिरी दावी । तुका ह्मणे तेवीं । मज नको चाळवूं ॥ ३ ॥

१८०८. नेघें तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांढे[13] वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥ छ ॥ आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥ २ ॥ तुका ह्मणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥ ३ ॥

---

१ पं. कीर्ति –२ पं. माने चि लोकां –३ पं. तसी तशी.–४ त. धावें तें प्रमाण. पं. धावें गा प्रमाण.–५ पं. तरलों अथवा किंवा आह्मी नाहीं –६ त. पं. आवडतो.–७ त. गोकुळा.–८ त. करी.– ९ पं. "सर्वभावें" याबद्दल "सर्व".–१० पं. "भोजनीं" नाहीं.–११ त. ऐसी.–१२ त. चिंतांक – १३ पं. वाटे.

१८०९. व्यवहार तो खोटा । आतां न वजों तुझ्या वाटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका नामा नाहीं तोळ । केली सहस्रांची माळें ॥ छ ॥ पाहों जातां घाई । खेळेंसी लपंडाइ ॥ २ ॥ तुका ह्मणे चार । बहु करितोसी फार ॥ ३ ॥

१८१०. लटिका चि केला । सोंग पसारा दाविला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा बुडालासी ऋणें । बहुतांचें देणें[4] घेणें ॥ छ ॥ लांवियेलीं चाळा । बहु दावूनि पुतळा ॥ २ ॥ तुका ह्मणे हात । आह्मी अवरिली मात ॥ ३ ॥

१८११. दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोंटा झोडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥ छ ॥ सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥ २ ॥ तुका ह्मणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥ ३ ॥

१८१२. लाज ना विचार । बाजारी तूं[6] भांडखोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें ज्याणें व्हावें । त्याची गांठी तुजसवें ॥ छ ॥ फेडिंसी लंगोटी । घेसी सकळांसी तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरा । तुला आप ना दुसरा ॥ ३ ॥

१८१३. ठाव नाहीं बुड । घरें वसविसी कुड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भलते ठायीं तुझा वास । सदा एरवी उदास ॥ छ ॥ जागा नों निजेला । धाला ना भुकेला ॥ २ ॥ न पुसतां भलें । तुका ह्मणे बुझें बोलें ॥ ३ ॥

१८१४. श्वाना दिली सवे । पायांभोंवतें तें भोंवे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी जाली मज परी । वसे निकट सेजारीं ॥ छ ॥ जेवितां जवळी । येऊनियां पुंच्छ घोळी ॥ २ ॥ [11]कोपेल तो धनी । तुका ह्मणे नेणें मनीं ॥ ३ ॥

१८१५. वटवट केली । न विचारितां मना आली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज कराल तें क्षमा । कैसें नेणों पुरुषोत्तमा ॥ छ ॥ उचित न कळे । जिव्हा भलतें चि बरळे ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । लौकिकाची चाड नाहीं ॥ ३ ॥

१८१६. जीवें व्हावें साटी । पडे संवसारें तुटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशीं बोलिलों वचनें । सवें घेउनि नारायण ॥ छ ॥[12] नाहीं जन्मा आलों । करील ऐसें नेदीं बोलों ॥ २ ॥ ठाव पुसी सेणें[13] । तुका ह्मणे खुंटी येणें ॥ ३ ॥

---

१ पं. ताळा.–२ पं. माळा.–३ पं. खेळसील त. "खेळ्मी तू".–४ पं. घेणें देणें–५ पं. "लावियेलीं" येथपासून तों पुढील अभगांत "भेटलासी नागवणी" येथपर्यंत ग्रंथ मुळींच नाहीं–६ पं. तो–७ पं. फेडी.–८ पं. वसविली–९ पं. चि–१० दे. त. पुस.–११ पं. तुका ह्मणे धणी। कोपले हें मना नाणी।.–१२ पं. "येणें नाहीं जाणें। केलें कोणा न मागणें ।।" हें कडवें जास्त आहे.–१३ पं. येणें.

१८१७. आतां पंढरीराया । माझ्या निरसावें भया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनीं राहिली आशंका । स्वामिभयाची सेवका ॥ छ१ ॥ ठेवा माथां हात । कांहीं बोला अभयमात ॥ २ ॥ तुका ह्मणे लाडें । खेळें ऐसें करा पुढें ॥ ३ ॥

१८१८. कवतुकवाणें । बोलों बोबड्या वचनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों नसावें अंतरीं । आह्मां धरायाचें दुरी ॥ छ२ ॥ स्तुति तैसी निंदा । माना सम३ चि गोविंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे बोलें । मज तुह्मी शिकविलें ॥ ३ ॥

१८१९. असो मागें जालें । पुढें गोड तें चांगलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां मज्ञे मनीं । कांहीं अपराध न मनीं ॥ छ१ ॥ नेदीं अवसान । ४करितां नामाचें चिंतन ॥ २ ॥ तुका ह्मणे बोलें । तुज आधीं च गोविलें ॥ ३ ॥

१८२०. मातेविण बाळा । आणिक न माने सोहळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें जालें माझ्या चित्ता । तुजविण पंढरिनाथा ॥ छ१ ॥ वाट पाहे मेघा बिंदु । नेघे चातक सरिता सिंधू ॥ २ ॥ सारसांसी निशीं । ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥ ३ ॥ जीवें५नाविण मत्स्य । जैसें धेनूलागीं वत्स ॥ ४ ॥ पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्त्तमानें ॥ ५ ॥ कृपणाचें धन । लोभालागीं जैसें मन ॥ ६ ॥ तुका ह्मणे काय । तुजविण प्राण राहे ॥ ७ ॥

१८२१. तुजऐसा कोणी न देखें उदार । अभयदानशूर पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरण येती त्यांचे न विचारिसी दोष । न मागतां त्यांस अढळ देसी ॥ छ१ ॥ धांवसी६ आडणी ऐकोनियां धांवा । कड्वारें देवा भक्तांचिया ॥ २ ॥ दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी । नामासाटीं हरि आपुलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज वाणूं कैशा परी । एक मुख हरी आयुष्य थोडें ॥ ४ ॥

१८२२. काय तुझे उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजी आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जतन हें माझें करूनि संचित । दिलें अवचित आणूनियां ॥ छ१ ॥ घडल्या दोषें७चे न घली च भरीं । आली यास थोरी कृपा देवा ॥ २ ॥ नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं । न मैगतां पाहीं दान दिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे याच्या उपकारासाटीं । नाहीं माझे गांठीं कांहीं एक ॥ ४ ॥

१८२३. वाळूनियां जन सांडी मज दुरी । करिसील हरी ऐसें कधीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥ छ१ ॥

---

१ त. पं. स्वामी भयाची.—२ पं. आतां.—३ पं. "सम चि" याबद्दल "समान".—४ पं. करीं.—५ पं. जीवनालागीं.—६ पं. धावसील.—७ पं. दोषांची.—८ पं. मागतां.

नावडती जीवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी धरितों वासना । होई नारायणा साह्य मज ॥ ३ ॥

१८२४. सांगतों या मना तें माझें नाइके । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि पाहे तरतें बुडतें । न लोहे[2] पुरतें बळ करूं ॥ ध्रु ॥ काय तें संचित न कळे पाहातां । मतिमंद चिंता[3] उपजतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहोनियां वेगीं पार टाकीं ॥ ३ ॥

१८२५. आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाइच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आचरावे दोष हें आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ ध्रु ॥ आह्मी तों आपुलें केलेसें जतन । घडो तुह्मांकून[4] घडेल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ३ ॥

१८२६. मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी । विदित पायांपाशीं सर्व आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हें चि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुह्मी त्याचों[5] ॥ ध्रु ॥ आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या[6] वाहीं पडों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ३ ॥

१८२७. कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य[7] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नवल हे लीळा करित्याचें[8] लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ ध्रु ॥ लोभालोभ एका धनाचिये ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक न विचारी प्रकार । योजे [9]तें चि सार यथाकाळें ॥ ३ ॥

१८२८. बांधे सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणां बळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुळलियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ ध्रु ॥ घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ३ ॥

१८२९. कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ध्रु ॥ [10]कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥ कवण तें रूप कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥ सर्वां ठायीं तूं चि सर्व ही जालासी । तुका ह्मणे यासी दुजें नव्हे ॥ ४ ॥

---

१ पं. तें.–२ दे. त. ल्हाये.–३ पं. चिता–४ पं. तुह्मावहून.–५ पं. याचा.–६ दे. त. साधनाचा.–७ पं. तृणवत्.–८ दे. करात्याचें. पं. करत्याचें.–९ पं. "तें चि' याबद्दल ' तें तें".–१० पं. कवण भोगविता कवण भोगता।.

१८३०. जेथें देखें तेथें तुझी च पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें । रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें । जातां लोटांगणीं अवघी च मेदिनी । सकळ देव पाट जालें । सदा पर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा आह्मां तूं च जालासी देवा । संसार हेवा कामधंदा । न लगे जाणें कोठें कांहीं च करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥ ध्रु ॥ वाचा बोले ते तुझे चि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुति । भोजन सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती । चालतां प्रदक्षिण निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति । देखोन दृष्टी परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ति ॥ २ ॥ जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें । महाल मंदिरें माड्या तनघरें । झोपड्या अवघीं देव देवाइलें । ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द होते जाले । तुका ह्मणे या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें धाले ॥ ३ ॥

१८३१. जे दोष घडले न फिटे करितां कांहीं । सरते तुझ्या पायीं जाले तैसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा कां हो करूं नये अंगीकार । जालेती निष्ठुर पाडुरंगा ॥ ध्रु ॥ यातिहीन नये ऐकों ज्यां वेद । तयां दिलें पद वैकुंठींचें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे एकांचा आभार । घेसी माथां भार वाहोनियां ॥ ३ ॥

१८३२. हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागे घालितसे ॥ ध्रु ॥ निर्लज्ज भोजें नाचत रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे विकलें देवें । आपण भावें संवसाटी ॥ ३ ॥

१८३३. साधन संपत्ति हें चि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळी च नीट सुखरूप ॥ ध्रु ॥ वैष्णवांचा संग रामनाम गाणें । मंडित भूषणें अळंकार ॥ २ ॥ भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडी[10] च चाली जावें पायीं ॥ ३ ॥ मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥ ५ ॥

१८३४. यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी । वेदश्रुति तुज नेणती कोणी । चोवीस ठेंगणीं धांडोळितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां

१ पं. जातों.–२ दे. पं. प्रदक्षणा.–३ पं. होते.–४ पं. ह्मणे आह्मी या०.–५ पं. धालों–६ पं. नाचे.–७ पं. समसाटीं.–८ दे. रामगाणें ।.–९ दे. भूषण.–१० पं. कोरडे.–११ पं. मायबापें.

मज क्षमा करावें देवा । सलगी ते केशवा बोलियेलों ॥ ध्रु ॥ सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न कळे हा पार वेदां श्रुतीं । तो[2] आम्ही भावें केलासी लहान । ठेवूनियां नांवें पाचारितों ॥ २ ॥ सहस्रमुखें शेष सीणला स्तवितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला । तेथें माझी देहबुद्धि तें काई । थोर मी अन्यायी तुका ह्मणे ॥ ३ ॥

१८३५. कृष्ण[3] गातां गीतीं कृष्ण ध्यातां चित्तीं । ते ही कृष्ण होती कृष्णध्यानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । ह्मणारे भोगिता[4] नारायण ॥ ध्रु ॥ ओंविये दळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥ २ ॥ नर नारी याति हो कोणी भलतीं । भावें एका[5] प्रीती नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥ ४ ॥

१८३६. डोळियां पाझर कंठ माझा दाटे[6] । येऊं देईं भेटे[7] पांडुरंगे[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु दिस टाकिलें निरास कां केलें । कोठें वो गुंतलें चित्त तुझें ॥ ध्रु ॥ बहु धंदा तुज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ॥ २ ॥ पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं धाडीं ॥ ३ ॥ तुजविण कोण सांत्रा धांवा करी । ये वो झडकरी पांडुरंगे ॥ ४ ॥ काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळू[9] कांपरी विसरलासी ॥ ५ ॥ एक वेळ[10] माझा धरूनि आठव । तुका ह्मणे ये वो न्यावयासी ॥ ६ ॥

१८३७. अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं या मना आतां । कां विसैरतें[11] पंढरिनाथा । करी संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती ॥ ध्रु ॥ भजन नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकून ॥ २ ॥ बहुत चंचळ चपळ । जातां येतां न लगे वेळ ॥ ३ ॥ किती राखों दोनी काळ । निजलिया जागे वेळे[12] ॥ ४ ॥ मज राखें आतां । तुका ह्मणे पंढरिनाथा ॥ ५ ॥

१८३८. कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्म नीत ॥ ध्रु ॥ देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥ २ ॥ विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥ ३ ॥ हत्या क्षेत्रैधर्म[13] । नव्हे निष्काम तें कर्म ॥ ४ ॥ तुका ह्मणे संतीं । करूनि ठेविली आइती ॥ ५ ॥

---

१ पं. करावें तें देवा । सलगी केशवा०.–२ पं. केलासी लहान तो तूं आह्मा भावें.– ३ पं. कृष्णध्यातां चित्तीं कृष्ण गातां गीतीं–४ पं. भोक्ता.–५ त. एका प्रति.–६ पं. दाटी –७ पं. भेटी.–८ पं. पांडुरंगा –९ पं. कृपाळुवा हरी विसरलासी. त. कृपाळुवा पगी०.–१० पं. वेळे.– ११ दे. त. विसरातें.–१२ दे. वेळे.–१३ त. क्षेत्रधर्म.

१८३९. पडोनियां राहीं । उगा च संतांचिये पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करीं भावें ॥ ध्रु ॥ सहज ते स्थिति । उपदेश परयुक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ३ ॥

१८४०. देवाचे घरीं देवें केली चोरी । देवें देव नागवूनि केला भिकारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवणियां धांवा धांवणियां धांवा । माग चि नाहीं जावें कवणिया गांवा ॥ ध्रु ॥ सवें चि होता चोर घरिचिया घरीं । फावलियावरी केलें अवघें वाटोळें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें कोणी च नाहीं । नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥ ३ ॥

१८४१. अवघे चि निजों नका अवघिये ठायीं । वेळ अवेळ तरी सांभाळावी कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जतन करा रे जतन करा । घालूं पाहे घरावरी घाला चोरटें ॥ ध्रु ॥ सींतिरिलीं फार खाती भोंवताले फेरे । गेलें नये हातां सेकीं तळमळ उरे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी करूं आपलें जतन । न लगे कांहीं कोणां द्यावें उघडा रे कान ॥ ३ ॥

१८४२. काळोखी खाऊन कैवाड केला धीर । आपुलिया हितें जाले जनामध्यें शूर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे तुह्मी नेणां कां रे तुह्मी नेणां । अल्पसुखासाटीं पडशी विपत्तीचे घाणां ॥ ध्रु ॥ नाहीं ऐसी लाज काय तयांपें आगळें । काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी सुख अवघें चि बरें । जतन करून हीं आपुलालीं ढोरें ॥ ३ ॥

१८४३. जाय परतें काय आणिला कांटाळा । बोला एक वेळा ऐसें तरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां हो केलें तुह्मी निष्ठुर देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥ ध्रु ॥ भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मापासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ३ ॥

१८४४. अनुभवें कळों येतें पांडुरंगा । रुसावें तें कां गा तुह्मांवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवरितां चित्त नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥ ध्रु ॥ अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । ह्मणोनि अंतर तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे काय करूं नेणें वर्म । आलें तैसें कर्म सोसूं पुढें ॥ ३ ॥

---

१ त. पुमावें.–२ दे. परवृत्ति.–३ पं. "अवघे० काहीं" ह्या दोन ओळी "जतन० चोरटें" ह्या दोन ओळींच्या पुढें आहेत.–४ पं. सींतरीली० भोंवताली.–५ पं. सेखी.–६ पं. जालों.–७ दे. हें आपुलालीं० पं. हे आपुलीं.–८ पं. का हो तुह्मीं केली निष्ठुरता देवा त. का हो केलें तुम्ही निष्ठुर हे देवा.–९ पं. "तुज ऐसा स्वामी असोनि मस्तकीं । होतसे या चुकी संचिताची ॥" हें कडवें जास्त आहे.–पं वर्म.

१८४५. तुजकरितां होतें आनाचें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां नये कैवार करूं अंगीकार । माझा बहु भार जडे[1] जाला ॥ छ ॥ चुकलासी ह्मणों तरी जीवांचा ही जीव । रिता नाहीं ठाव उरों दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें[2] काय सत्ताबळ । मांझें[3] परी कृपाळ आहां तुह्मी ॥ ३ ॥

१८४६. फळ देंठींहून झडे । मग मागुतें[4] न जोडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तांतडी[5] खोटी । कारण उचिताचे पोटीं ॥ छ ॥ पुढें चढे हात । त्याग मागिलां उचित ॥ २ ॥ तुका ह्मणे रणीं । नये पाहों परतोनि ॥ ३ ॥

१८४७. अगी देखोनियां सती । अंगीं रोमांच उठती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा तो नव्हे उपदेश । सुख अंतरीं उल्हास[6] ॥ छ ॥ वित्तगोतांकडे । चित्त न घाली न रडे ॥ २ ॥ आठवूनि एका । उडी घाली ह्मणे तुका ॥ ३ ॥

१८४८. फळ पिके देंठीं[7] । निमित्य वारियाची भेटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा तों अनुभव रोकडा । कळों येतो खरा कुडा ॥ छ ॥ तोडिलिया बळें । वांयां जाती काचीं फळें ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । तेथें आपुलें कारण ॥ ३ ॥

१८४९. हालवूनि खुंट । आधीं करावा बळकट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तयाच्या आधारें । करणें[9] अवघें चि बरें ॥ छ ॥ सुख दुःख साहे । हर्षामर्षीं[10] भंगा नये ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें । आधीं मरोनि राहावें ॥ ३ ॥

१८५०. धांवे माते सोई । बाळ न विचा[11]रितां कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग त्याचें जाणें निकें । अंग वोडवी कौतुकें ॥ छ ॥ नेणे सर्प दोरी । अगी भलतें हातीं धरी ॥ २ ॥ [12]तीविणें तें नेणे । आणीक कांहीं तुका ह्मणे ॥ ३ ॥

१८५१. भोग द्यावे देवा । त्याग भोगीं च बरवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥ छ ॥ योजे यथाकाळें । उत्तम पाला कंदें[13] मूळें ॥ २ ॥ वंचें[14] त्यासी दोष । तुका ह्मणे मिथ्या सोस ॥ ३ ॥

१८५२. पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥ छ ॥ नव्हे हा उपदेश । तुमचें वडबडिलों शेष ॥ २ ॥ तुमचे कृपेचें पोषणें[15] । जन्मोजन्मीं तुका ह्मणे ॥ ३ ॥

---

१ दे. चड –२ पं. काय ऐसें –३ दे. पं. माझे.–४ पं. मागुनी न जडे.–५ पं. तातटी – ६ दे. त. उल्हासे –७ पं. देठीं । निमित्य वारियाचे०.–८ पं. सकळ.–९ पं. करणें तें अवघें बरें.– १० पं. हर्षामर्षे –११ पं. विचारी.–१२ दे. तीविन. त. तीविण –१३ पं. कंदमुळ –१४ पं. वचवासी दोष.–१५ दे. पं. पोसणें.

१८५३. जायांचें अंगुलें लेतां[1] नाहीं मान। शोभा नेदी जन हांसविलें ॥ १ ॥ घुंसाळितां[2] ताक कांडितां[3] भूस। साध्य नाहीं क्लेश जाती वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं स्वता भांडवल। भिकेचें तें फोल बीज नव्हे ॥ ३ ॥

१८५४. न बोलावें परी पडिला प्रसंग। हाकालितें जग तुझ्या नामें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लटिकें चि सोंग मांडिला पसारा। भिकारी तूं खरा कळों आलें ॥ ध्रु ॥ निलाजिरीं आह्मी करोनियां धीर। राहिलों आधार धरूनियां ॥ २ ॥ कैसा [4]नेणों आतां करिसी शेवट। केली कटकट त्याची पुढें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न बोलसी देवा। उचित हे सेवा घेसी माझी ॥ ४ ॥

१८५५. नाहीं जालें मोल कळे देतां काळीं। कोण पाहों बळी दोघांमध्यें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी तरी जालों[5] जीवासी उदार। कैंचा हा धीर तुजपाशीं ॥ ध्रु ॥ बहु चाळविलें मागें आजिवरी। आतां पुढें हरी जाऊं नेदीं ॥ २ ॥ नव्हती जों भेटी नामाची ओळखी। ह्मणऊनि दुःखी बहु जालों ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं राहों नेदीं बाकी। एकवेळा चुकी जाली आतां ॥ ४ ॥

१८५६. कैसा कृपाळु हें[6] न कळसी देवा। न बोलसी सेवा घेसी माझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय ऐसें बळ आहे तुजपाशीं। पाहों[7] हा [8]रिघसी कोणा आड ॥ ध्रु ॥ पाडियेला ठायीं तुझा थारा मारा। अवघा दातारा लपसी तो ॥ २ ॥ आतां तुह्मां आह्मां उरी तों चि बरें। काय [9]हीं उत्तरें वाढवूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज साह्य जाले संत। ह्मणऊनि मात फावली हे ॥ ४ ॥

१८५७. चुकलिया आह्मां करितसां दंड। हाकासी कां खंड पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाळविलीं[10] एकें रिद्धिसिद्धीवरी। तैसा मी भिकारी नव्हें देवा ॥ ध्रु ॥ कां मी येथें गुंतों मांडूनि पसारा। मागुता दातारा दंभासाटीं ॥ २ ॥ केलें क्यां जतन आपुलें वचन। ठायींचें धरून होतों पोटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ताळा घातला आंडारवीं[11]। ठावें होतें सेकीं आडविसी ॥ ४ ॥

१८५८. कृपावंता कोप न धरावा चित्तीं। छळूं वक्रोक्ती स्तुती करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी तुझा पार काय जाणों देवा। नेणों कैसी सेवा करावी ते ॥ ध्रु ॥ अनंता अरूपा अलक्षा अच्युता। निर्गुणा सच्चिता[12] सर्वोतमा ॥ २ ॥ चांगलीं हीं नामें घेतलीं ठेवून। जालासी लाहान [13]भक्तिकाजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायांवरी सदा। मस्तक गोविंदा असो माझा ॥ ४ ॥

---

१ पं. लेत.—२ दे. गुमळितां.—३ पं. कांडिता पै भूस.—४ पं. नेणें.—५ दे. जालें—६ पं. "हें" नाहीं.—७ पं. पाहों हरी घेमी कोण आड.—८ दे. रिघेसी.—९ दे. हें पं. तें—१० पं. चाळविले एक रिद्धी वारी.—११ दे. आडांसीं.—१२ पं. सच्चिदा नारायणा. दे. त. सचिता.—१३ त. भक्तिकाजों

१८५९. आतां तुझा भाव कळों आला देवा[1]। ठकूनियां सेवा घेसी माझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ टाकूनि सांकडें आपुलिये माथां। घातला या संतावरी भार ॥ छ्र ॥ स्तुती करवूनि पिटिला डांगोरा। तें[2] कोण दातारा साच करी ॥ २ ॥ जातीचें वाणी मीं[3] पोटींचें कुडें। नको मजपुढें ठकाठकी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं आलें अनुभवा। आधीं च मी देवा कैसें[4] नाचों ॥ ४ ॥

१८६०. जन पूजी याचा मज कां आभार। हा तुह्मी विचार जाणां देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पत्र कोण मानी वंदितील सिक्का। गौरव सेवका त्यां चि मुळें ॥ छ्र ॥ मी मीपणें होतों जनामधीं आधीं। कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥ २ ॥ आतां तूं भोगिता सर्व नारायणा। नको आह्मां दीनां पीडा करूं ॥ ३ ॥ आपुलिया हातें देसील सुशारा। तुका ह्मणे खरा तो चि आह्मां ॥ ४ ॥

१८६१. आमची कां नये तुह्मासी करुणा। किती नारायणा आळवावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाणां तुह्मी दुर्बळाचें जिणें। वैभवाच्या गुणें आपुलिया ॥ छ्र ॥ देती घेती करिती खटपटा आणिकें। निराळा कौतुकें पाहोनियां ॥ २ ॥ दिवस बोटीं आह्मीं धरियेलें माप। वाहातों संकल्प स्वहिताचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मग देसी कोण्या काळें। चुकुर दुर्बळें होतों आह्मी ॥ ४ ॥

१८६२. तुह्मां[5] आह्मां तुटी होईल यावरी। ऐसें मज हरी दिसतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वचनाचा कांहीं न देखों आधार। करावा हा धीर कोठवरी ॥ छ्र ॥ सारिलें संचित होतें गांठी कांहीं। पुढें ऋण तें ही नेदी कोणी ॥ २ ॥ जावें चि न लगे कोणांचिया घरा। उडाला पातेरा तुझ्या संगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां हा चि लाभ जाला। मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥ ४ ॥

१८६३. देव मजुर देव मजुर। नाहीं उजुर सेवेपुढें ॥ १ ॥ देव गांव्याळ देव गांव्याळ। देखोनियां वळ लैंपतसे[7] ॥ २ ॥ देव तर काई देव तर काई। तुका ह्मणे राई तरी[8] मोटी ॥ ३ ॥

१८६४ देव दयाळ देव दयाळ। साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥ देव उदार देव उदार। थोड्यांसाटीं[9] फार देऊं जाणे ॥ २ ॥ देव चांगला देव चांगला। तुका लागला चरणीं ॥ ३ ॥

---

१ पं. करूनियां.–२ पं. तो–३ पं. असें.–४ पं. कैसा.–५ पं. या.–६ पं. आह्मा तुह्मा.– ७ दे. तपतसे.–८ पं. तर.–९ पं. थोड्यासी.

१८६५. देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा म्हूण कोंडी ॥ छ्र ॥ देव लांगट देव लागेट[1] । लाविलिया चट जीवीं जडे ॥ २ ॥ देव बावळा देव बावळा । भावें जवळा लुडबुडी ॥ ३ ॥ देव न व्हावा देव न व्हावा । तुका ह्मणे गोवा करी कामीं ॥ ४ ॥

१८६६. देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥ १ ॥ देव अंकुळी[2] देव अंकुळी । भलते ठायीं[3] सोयरीक ॥ २ ॥ देव लिगाड्या देव लिगाड्या । तुका[4] ह्मणे भाड्या दंभें[5] ठकी ॥ ३ ॥

१८६७. देव बराडी देव बराडी । घाली देंठासाटीं उडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ छ्र ॥ देवं[6] भाविक भाविक । होय दासांचा[7] सेवक ॥ २ ॥ देव होया देव होया । जैसा ह्मणे तैसा तया ॥ ३ ॥ देवं[8] लाहान लाहान । तुका ह्मणे अनुरेण ॥ ४ ॥

१८६८. देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवं[9] उदार उदार । देतां नाहीं थोडें फार ॥ छ्र ॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ २ ॥ देव व्हावा देव व्हावा । आंवडे[10] तो सर्वा जीवां ॥ ३ ॥ देवं[11] चांगला चांगला । तुका चरणीं लागला ॥ ४ ॥

१८६९. देव पाहों देव पाहों । उंचे ठायीं उभे राहों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवं[12] देखिला देखिला । तो नाहीं कोणां भ्याला ॥ छ्र ॥ देवां[13] कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासी सांगों ॥ २ ॥ देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये[14] खुणे ॥ ३ ॥ देवं[15] कातर कातर । तुका ह्मणे अभ्यंतर ॥ ४ ॥

१८७०. देवं[16] आमचा आमचा । जीव सकळ जीवांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव आहे देव आहे । जवळीं आह्मां अंतरंवाहे[17] ॥ छ्र ॥ देव गोड देव गोड । पुरवी कोडाचें ही कोड ॥ २ ॥ देव आह्मां राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥ ३ ॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥ ४ ॥

१८७१. जाऊं देवाचिया गांवां । देव देईल विसांवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवा सांगों सुखदुःख । देव निवारील भूक ॥ छ्र ॥ घालूं देवासी च भार । देव सुखाचा

१ पं लगट –२ त. पं. आकुळी –३ पं. स्थळीं.–४ पं. तुका भाड्या दम टाकी.–५ त. गहें –६ पं. देव भाविक देव भाविक.–७ दे. दासाचें –८ पं. देव लहान देव लहान –९ पं. देव उदार देव उदार.– १० त आवडतो सर्वां०.–११ पं. देव चागला देव चागला । तुका चरणासी लागला ॥.–१२ पं. देव देखिला देव देखिला ।.–१३ पं. देवासी.–१४ त. मनरींचे.–१५ पं. देव कातर देव कातर ।.– १६ पं. देव आमुचा देव आमुचा । –१७ पं. अनर्बाह्य.

सागर ॥ २ ॥ राहों जवळी देवापाशीं । आतां जडोनि पायांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी बाळें । या देवाचीं लडिवाळें ॥ ४ ॥

१८७२. प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेमें[1] यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ॥ ध्रु० ॥ प्रेमें[2] पाठी लागे बळें । भक्त देखोनियां भोळे[3] ॥ २ ॥ प्रेम न वजे दवडितां । शिरे बळें जेथें कथा ॥ ३ ॥ तुका ह्मणे थोर आशा । प्रेमा घेरीं[4] विष्णुदासां ॥ ४ ॥

१८७३. संत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥ ध्रु० ॥ गोविलों थोरिवां[5] । दुःख वाटतसे जीवा ॥ २ ॥ तुका ह्मणे माया । अवरा हे पंढरिराया ॥ ३ ॥

१८७४. नाहीं तुह्मी केला । अंगीकार तो विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोंगें[6] न पवीजे थडी । माजी फुटकी सांगडी ॥ ध्रु० ॥ प्रेम नाहीं अंगीं । भले ह्मणविलें जगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । मज वांयां कां चाळवा ॥ ३ ॥

१८७५. आतां चक्रधरा । झणी आह्मांस अव्हेरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचीं ह्मणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥ ध्रु० ॥ काळ आह्मां खाय । तरी तुझें नांव जाय ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ॥ ३ ॥

१८७६. मज ऐसें कोण उद्धरिलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातींच्या कांकणां कांयसा[7] आरिसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥ ध्रु० ॥ धन्वंतरी[8] हरी रोग्याचिये वेथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥ ३ ॥

१८७७. काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय जालीं[9] वळें शक्तिहीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझिया संचितें आणिलासी हरी । जालें तुजवरी वरिष्ठ तें ॥ ध्रु० ॥ काय गमाविली सुदर्शन गदा । [10]नो बोला गोविंदा लाजतसां ॥ २ ॥ तुका ह्मणे काय ब्रिदाचें तें काम । सांडीं[11] परतें नाम दिनानाथ ॥ ३ ॥

१८७८. वळ बुद्धी वेचुनियां शक्ती । उदकें[12] चालवावें युक्ती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं चळण तया अंगीं । धांवें लवणामागें[13] वेगीं ॥ ध्रु० ॥ पाट मोट कळा । भरित पखाला[14] सगळा[15] ॥ २ ॥ बीज ज्यासी घ्यावें । तुका ह्मणे तैसें व्हावें ॥ ३ ॥

---

१ दे. त. प्रेम –२ दे. प्रेमें.–३ त. भोळे दे. “भोळें” असता “भोळे” केले आहे – ४ पं. घरी –५ दे. थोरिवां.–६ पं. सागे –७ पं. काय तो आरसा.–८ दे. त. धनमत्री. पं. धनवत्री – ९ पं. जाले.–१० पं. त्याभेणें गोविदा०.–११ पं. साडीं० दिनानाथा ।.–१२ पं. उदका.– १३ त. लवनामागें.–१४ दे. पखाळा.–१५ पं. सगळा.

१८७९. न ह्मणे साना थोर । दुष्ट पापी अथवा चोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळा द्यावी ऐकी चवी । तान हरूनि निववी ॥ छ ॥ न ह्मणे दिवस राती । सर्व काळ सर्वां भूतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे झारी । घेतां तांब्यानें खापरी ॥ ३ ॥

१८८०. इच्छा चाड नाहीं । न धरी संकोच ही कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ छ ॥ मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥ ३ ॥

१८८१. तरले ते मार्गें आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उसनें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुह्मी त्यांसी ॥ छ ॥ मज ऐसा कोण सांगा वांयां गेला । तो तुह्मी तारिला पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे नांवासारिखी करणी । न देखें हें मनीं समजावें ॥ ३ ॥

१८८२. कवणांशीं भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरिलें उदास दुरदुरांतरें । सांडी एकसरें केली माझी ॥ छ ॥ आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळ बुंथी घेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे एके गांवींची वसती । ह्मणऊनि खंती वाटे देवा ॥ ३ ॥

१८८३. आळवितां कंठ शोकला भीतरें । आयुष्य वेचे धीरें नाहीं मना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अझून का नये हें तुझ्या अंतरा । दिनाच्या माहेरा पांडुरंगा ॥ छ ॥ धन दिसे डोळा दगडाचे परी । भोग ते शरीरीं विष जालें ॥ २ ॥ चुकलों काय तें मज क्षमा करीं । आलिंगूनि हरी प्रेम द्यावें ॥ ३ ॥ अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरी सर्व काळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥ ५ ॥

## ॥ शिवाजी राजे यांनीं स्वामींस अबदागिरी, घोडा, कारकून असे न्यावयास पाठविले ते अभंग ॥ १४ ॥

१८८४. दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां येथें पंढरिराया । मज गोविसी कासया ॥ छ ॥ मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्ठा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझे सोडवणे धांवा ॥ ३ ॥

---

१ दे. त. पं. दुष्ट.–२ पं. एक–३ दे. मुहरि. पं. मुहुरी–४ दे. अनन्ये.–५ पं. सागावया गेला.–६ पं. नामासारिखी.–७ पं. "हें" नाहीं.–८ "दू. दूर अतरें" असावें ?–९ दे. त. भीतरु.–१० त. धीरु.

१८८५. नावडे जें चित्ता । तें चि होसी पुरविता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे पुरविली पाठी । माझी केली जीवेसाटीं ॥ छ्रु ॥ न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ २ ॥ सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥ जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥ तुका ह्मणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

१८८६. विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ युक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी ॥ छ्रु ॥ ऐसा तुझा प्रेमा कळे कांहीं एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ २ ॥ शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचें कीं ॥ २ ॥ व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥ हहेता लागला आम्हुचिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हे चि थोर ॥ ५ ॥ याचें हें उत्तर ऐक गा भूपती । लिहिली विनंती हेताची हे ॥ ६ ॥ अरण्यवासी आह्मी फिरों उदासीन । दर्शन ही हीन अमंगळ ॥ ७ ॥ वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ ८ ॥ रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥ तुका ह्मणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥ १० ॥

१८८७. ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे हृदयस्थाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नहों कीविलवाणें नाहीं आह्मी दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ छ्रु ॥ पांडुरंग आह्मां पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ २ ॥ तुझी भेट घेणें काय हें मागणें । आशेचें हें शून्य केलें आह्मीं ॥ ३ ॥ निराशेचा गांव दिधला आह्मांसी । प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥ ४ ॥ पतिव्रतेचें हें मन पति भेटो । तैसे आह्मी विठोमाजी नांदों ॥ ५ ॥ विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझें ही तयामाजी ॥ ६ ॥ तुज ही विठ्ठल ऐसें चि वाटलें । परि एक आलें आडवें हें ॥ ७ ॥ सद्गुरुश्रीरामदासाचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥ वहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥ तुका ह्मणे बापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकांसी ॥ १० ॥

१८८८. तुह्मांपाशीं आह्मी येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे[1] थार चिंध्या विदी ॥ छ्रु ॥ निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ २ ॥ तेथें काय करणें कवणाची आस । वांयां होय नाश आयुष्याचा ॥ ३ ॥ राजगृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥ रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरां

---

१ दे. "हे" नाहीं.

सामान्यां मान नाहीं ॥ ५ ॥ देखोनियां वस्त्रें भूषणांचें जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ६ ॥ ऐकोनियां मानाल उदासता जरी । तरी आह्मां हरि उपेक्षीना ॥ ७ ॥ आतां हें चि तुह्मा सांगणें कौतुक । भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥ तपव्रतयाग महां भले जन । आशाबद्ध हीन वर्ततातीं ॥ ९ ॥ तुका ह्मणे तुह्मी श्रीमंत मानाचे । पूर्वीं च दैवांचे हरिभक्त ॥ १० ॥

१८८९. आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें योगें तुह्मां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ छ्रु ॥ निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ती चित्तीं आणूं नका ॥ २ ॥ परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ३ ॥ सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥ हें चि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शनें चाड नाहीं ॥ ५ ॥ घेऊनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥ एकदोनी कर्में जाणोनियां वर्में । आपुलिया भ्रमें राहूं आतां ॥ ७ ॥ कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ८ ॥ आत्मारामीं मन ठेवूनियां राहें । रामदासीं पाहें आपणेयां ॥ ९ ॥ तुका ह्मणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ १० ॥

१८९०. आतां हे विनवणी प्रधानअष्टक । प्रभूसी विवेक समजावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुह्मांपाशीं ॥ छ्रु ॥ मजुमुचे धणी लेखनकारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ २ ॥ पेशवे सुरनिस चिटनिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ३ ॥ भूषण पंडितराय विद्याधन । वैद्यराजा नमन माझें असे ॥ ४ ॥ पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनि । विवंचोनि श्रवणीं घाला तैंया ॥ ५ ॥ सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥ यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदा ॥ ७ ॥ भिडेसाटीं बोला गाळूनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होइल तेणें ॥ ८ ॥ तुका ह्मणे तुह्मां नमन अधिकाऱ्यां । सांगणें तें राया पत्र माझें ॥ ९ ॥

१८९१. जाणोनि अंतर । टाळिसील करकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ छ्रु ॥ उटविसी दारीं । धरणें एखादिया परी ॥ २ ॥ तुका ह्मणे पाये । कैसे सोडीन ते पाहें ॥ ३ ॥

---

१ त. सामान्य—२ दे. वर्म.—३ त. अष्टका । प्रभूसी विवेका०.—४ त. राया.

१८९२. नाहीं विचारीत । मेघ हागणदारी सेत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवीं कारणापें चित्त ॥ छ ॥ वर्जीत गंगा । नाहीं उत्तम अधम जगा ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । नाहीं अग्नीसी विटाळ ॥ ३ ॥

१८९३. काय दिला ठेवा । आह्मां विठ्ठल चि व्हावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी कळलेती उदार । साटीं परिसाची गार ॥ छ ॥ जीव दिलां तरी । वचना माझ्या नये सरी ॥ २ ॥ तुका ह्मणे धन । आह्मां गोमासासमान ॥ ३ ॥

१८९४. पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें उरे खातां देतां । नव्हे खंडण मवितां ॥ छ ॥ खोलीं पडे ओली बीज । तेंरीं च हातीं लागे निज ॥ २ ॥ तुका ह्मणे धनी । विठ्ठल अक्षरें हीं तिन्ही ॥ ३ ॥

१८९५. मुंगी आणि राव । आह्मां सारखाची जीव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ छ ॥ सोनें आणि माती । आह्मां समान हें चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें । घरा वैकुंठ सगळें ॥ ३ ॥

१८९६. तिहीं त्रिभुवनीं । आह्मी वैभवाचे धनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातां आले घाव डाव । आमचा मायबाप देव ॥ छ ॥ काय त्रिभुवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । अवघी आमुची च आतां ॥ ३ ॥

१८९७. आह्मी तेणें सुखी । ह्मणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ छ ॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ २ ॥ ह्मणवा हरिचे दास । तुका ह्मणे मज हे आस ॥ ३ ॥
॥ १४ ॥

१८९८. नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ छ ॥ पदरीं घालीं पिळा । बाप निर्वळ साटीं बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ३ ॥

१८९९. भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ छ ॥ वैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ३ ॥

---

१ दे. हागनदारी.—२ पं. आह्मी.—३ पं०. देतां तरी । वचना नये एकसरी ॥ २ ॥ गोमासासमान । तुका ह्मणे आह्मां धन ॥ ३ ॥.—४ पं. तरी हाता लागे०.—५ दे. अक्षरी हीं०. पं. अक्षरे हे० —६ पं. सावळें.—७ पं. भ्रमरापासून.—८ दे. देवा.

जेथें देवा तुझा न कळे चि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥ २ ॥ जैसे तैसे माझे बोल अंगीकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवितों ॥ ३ ॥ तुका ह्मणे विटेवरि जीं पाउलें । तेथें स्यां ठेविलें मस्तक हें ॥ ४ ॥

१९१५. देवांच्या ही देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याती त्रिभुवनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पातकांच्या रासी नासितोसी नामें । जळतील कर्मे महा दोष ॥ ध्रु ॥ सर्व सुखें तुझ्या बोळगती पायीं । रिद्धि सिद्धि ठायीं मुक्तिचारी ॥ २ ॥ इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीतें गातां छंद वैातां टाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥

१९१६. काय जालें नेणों माझिया कपाळा । न देखींजे डोळां मूळ येतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु दिस पाहें वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ ध्रु ॥ नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तों उतर निष्ठुर न पाहिजे ॥ २ ॥ पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहूनि गोविंदा जरूरसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें वेचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तो ही धाक ॥ ४ ॥

१९१७. एवढा संकोच तरि कां व्यालासी । आह्मी कोणांपाशीं तोंड वासूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण मज पुसे सिणलें भागलें । जरी मोकलिलें तुह्मीं देवा ॥ ध्रु ॥ कवणाची वाट पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥ २ ॥ कोण जाणे माझे जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी देखिली निश्चिंती । काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥ ४ ॥

१९१८. देईं डोळे भेटी न धरीं संकोच । न घलीं कांहीं वेच तुजवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ॥ ध्रु ॥ फार थोडें कांहीं करूनि पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ॥ २ ॥ आहे माझी ते चि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां लेंकराची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥ ४ ॥

१९१९. सीण भाग हरे तेथींच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इंद्रियांची धांव होईल कुंटित । पावेल हें चित्त समाधान ॥ ध्रु ॥ माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥ २ ॥ आस नाहीं परी उरीं वरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी आविट आवडी । खंडणं तांतडी होऊं नेदीं ॥ ४ ॥

---

१ पं. गीति.—२ त. वाहातां.—३ पं. वास.—४ पं. उगविलें.—५ पं. निश्चिनी.—६ पं. माझी.—७ त. "उत्तरी" असें मागून केलें आहे.—८ पं. खडणा.

१९२०. धरितों वासना परी नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥ छ्रु ॥ प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥ २ ॥ जातों तळा येतों [1]मागुताला वरी । बोळशाचे फेरी सांपडलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु करितों विचार । उतरें डोंगर एक चढें ॥ ४ ॥

१९२१. कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥ छ्रु ॥ कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेमे[2] कां हस्तक न पवती ॥ २ ॥ कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्ती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कई जाऊनि मो[3]टॅळें । [4]पैंडेन हा लोळें महाद्वारीं ॥ ४ ॥

१९२२. काय पोरें जालीं फार । किंवा न साहे करकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि केली सांडी । घांस घेऊं [5]नें ल्हां तोंडीं ॥ छ्रु ॥ करूं कलागती । तुज भांडणें भोंवतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे टांचें । घरीं [6]जालेंसेवरोचें ॥ ३ ॥

१९२३. कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी हा पडिला विसर । माझा तुह्मां जाला भार ॥ छ्रु ॥ आली कांहीं तुटी । गेली सुटोनियां गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥ ३ ॥

१९२४. निरोपासी वेचे । काय बोलतां फुकाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परी हें [7]नेघेवे चि यश । भेओं नको सुखी आस ॥ छ्रु ॥ सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥ २ ॥ न लगे निरोपासी मोल । तुका ह्मणे वेचे बोल ॥ ३ ॥

१९२५. जोडीच्या हव्यासें । लागे [8]धनांचें चि पिसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग आणीक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥ छ्रु ॥ पाहे रुक्याकडे । मग अवघें ओस पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुला बहुत चि हेवा ॥ ३ ॥

१९२६. मविलें मविती । नेणों रासी पडिल्या किती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तूं धाला चि न धासी । आलें उभाउभीं घेसी ॥ छ्रु ॥ अवघ्यां [9]अवघा काळ । वाटा [10]पाहाती सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । अराणूक तुज कांहीं ॥ ३ ॥

---

१ पं. मागुता लौकरी दे. "मागुता लौकरी" याचें "मागुताला वरी" केलें आहे–२ पं. क्षम–३ पं. मोटाळें.–४ पं. पडेना हा.–५ पं. न ल्हाये–६ त. जालेंसेंवरोचे. अर्थ बरोबर समजत नाहीं सबब पदच्छेद केला नाहीं–७ पं. न घेवे–८ पं. धन्याचें.–९ पं. अवघ्या.–१० पं. वाहाती.

१९२७. न बैससी खालीं । सम उभा च पाउलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे जाले बहुत दिस । जालीं युगें अठ्ठाविस ॥ ध्रु ॥ नाहीं भाग सीण । अराणूक एक क्षण ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । मापें केलीं देती घेती ॥ ३ ॥

१९२८. जोडी[3] कोणांसाटीं । एवढी करितोसी आटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जरी हें आह्मां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥ ध्रु ॥ करूनि जतन । कोणा देसील हें[4] धन ॥ २ ॥ आमचे तळमळे । तुझें होईल वाटोळें ॥ ३ ॥ घेसील हा श्राप । माझा होऊनियां बाप ॥ ४ ॥ तुका ह्मणे उरी । आतां न ठेवीं यावरी ॥ ५ ॥

१९२९. करूनि चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जरि तूं होऊनि उदास । माझी बुडविसी आस ॥ ध्रु ॥ येथें न करीं काम । मुखें नेघें तुझें नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥ ३ ॥

१९३०. समर्थाचे पोटीं । आह्मी जन्मलों करंटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी जाली जगीं कीर्ति । तुझ्या नामाची फजिती ॥ ध्रु ॥ येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥ ३ ॥

१९३१. पुढें तरी चित्ता । काय येईल तें आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज सांगोनिया धाडीं । वाट पाहातों वराडी ॥ ध्रु ॥ कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥ ३ ॥

१९३२. कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जें या मनासी आवरूं । आंतें पोटीं वात्र धरूं ॥ ध्रु ॥ कैंची शुद्ध मति । भांडवल ऐसें हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥ ३ ॥

१९३३. समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां भावें करूनि साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥ ध्रु ॥ न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे विनंती । दिनविलीं[10] धरा चित्तीं ॥ ३ ॥

१९३४. येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ ध्रु ॥ पत्र हातीं दिलें । जैया जेथें पाठविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती । जाइन सामोरा पुढती ॥ ३ ॥

---

१ पं. उभा सम चि०.–२ पं. बहु–३ त. जोटी केली कोणा०–४ पं. "हें" नाहीं–५ पं. तुमचें.–६ पं. माझ्या–७ त. आतां.–८ त आतां समर्पक.–९ त. आतां पायां पडिलों पायां पडिलों ।. देहूच्या प्रतींत याप्रमाणेंच होतें, पण मागून वर छापल्या प्रमाणें केलें आहे–१० त. विनविलें.–११ पं. तया तेथें पाठविलें ।.

१९३५. रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें माझें दंडवत । निरोपें सांगतील संत ॥ छ ॥ पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ३ ॥

१९३६. तुह्मी संतजनीं । माझी करावी विनवणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ छ ॥ भाका बहुतां रीती । माझी कीव काकुलती ॥ २ ॥ न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥ ३ ॥

१९३७. होइल कृपादान । तरी मी येईन धांवोन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ छ ॥ झिंपेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे ताप । हरती देखोनियां बाप ॥ ३ ॥

१९३८. परिसोनि उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जरी तूं होसी कृपावंत । तरि हा बोलावीं पतित ॥ छ ॥ नाणीं कांहीं मना । करूनि पापाचा उगाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥ ३ ॥

१९३९. ऐकोनियां कीर्ती । ऐसी वाटली विश्रांती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माते सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥ छ ॥ बोलतां ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे धांवे । वासना ते रस घ्यावे ॥ ३ ॥

१९४०. किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥ छ ॥ पुण्य होतें गांठी । तरि कां लागती हे आटी ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । माझी राहिली तळमळ ॥ ३ ॥

१९४१. करील आबाळी । माझ्या दांताची कसाळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जासी एखादा मरोन । पाठी लागेल हें जन ॥ छ ॥ घरीं लागे कळह । नाहीं जात तो शीतळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥ ३ ॥

१९४२. आतां आशीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणसी कोणा तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥ छ ॥ दुरी दूरांतर । तरी घेसी समाचार ॥ २ ॥ नेसी कधीं तरी । तुका ह्मणे लाज हरी ॥ ३ ॥

१९४३. आतां हे सेवटीं । माझी आइकावी गोष्टी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां द्यावा वचनाचा । जाव कळे तैसा याचा ॥ छ ॥ आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसा । तुझा आहे रोखें तैसा ॥ ३ ॥

---

१ दे. रुळें –२ दे. सागा निरोप हा सत.–३ त. पं. करा.–४ पं. कीव माझी –५ पं. बोल्वां एकाचे। –६ त. वासना हे रस०.– पं. रसना ते रस०.–७ पं. होतीं.–८ पं. कळ हे दे. त. कळइ –९ पं घरीं.–१० पं. कळेल –११ पं. राख.

१९४४. बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षमा करावे[1] अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ छ ॥ स्तुती निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥ २ ॥ तुका ह्मणे लाड । दिला तैसें[2] पुरवा कोड ॥ ३ ॥

॥ ३६ ॥

१९४५. माहेरिंचा काय येईल निरोप । ह्मणऊनि झोंप नाहीं डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाट पाहें आस धरूनियां जीवीं । निडळा हे ठेवीं वरी बाहे ॥ छ ॥ बोटवरी माप लेखितों दिवस । होतों कासावीस धीर नाहीं ॥ २ ॥ काय नेणों संतां पडेल[3] विसर । कीं नव्हे सादर मायबाप ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें होईल दाटणी । कोण माझें आणी मना तेथें ॥ ४ ॥

१९४६. परि तो आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुकानदृष्टी आइके[4] देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥ छ ॥ सांगितल्याविणें जाणे अंतरिंचें । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥ २ ॥ बहुमुखें कीर्ती आइकिली कानीं । विश्वास ही मनीं आहे मोझ्या[5] ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं जात वांयांविण । पाळितो वचन बोलिलों तें ॥ ४ ॥

१९४७. यावरि न कळे संचित आपुलें । कैसें वोडवलें होइल पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करील विक्षेप धाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तांतडी हे ॥ छ ॥ जोंवरी हे डोळां देखें[6] वारकरी । तों हें भरोवरी करी चित्त ॥ २ ॥ आस वाढविते बुद्धीचे[7] तरंग । मनाचे[8] ही वेग वावडती ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेव्हां होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥ ४ ॥

१९४८. होईल निरोप घेतला यावरी । राउळाभीतरीं जाऊनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूनियां दधिमंगळभोजन । प्रयाण शकुनसुमुहूर्तें[9] ॥ छ ॥ होतील दाटले सद्गदित कंठीं । भरतें यें[10] पोटीं वियोगाचें ॥ २ ॥ येरयेरां भेटी क्षेम आलिंगनें । केलीं समाधानें[11] होतीं संतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चाली न साहे मनास । पाहाती कळस परंपरतों[12] ॥ ४ ॥

१९४९. ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येतं[13] वारकरी होते वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनियां ॥ छ ॥

---

१ पं. करावा.–२ पं. तैसा.–३ पं. पडिला –४ त. आईके.–५ दे. त. माझा.–६ पं. देखों –७ त बुद्धीचा.–८ पं. चित्ताचे ते वेग वावरती.–९ पं. शकुनसुमुहूर्ते.–१० पं. त्या.–११ दे. समाधान.–१२ पं. परतोनि.–१३ दे. येत वारकरी होत वाटे । त. येत वारकरी होत वाटे.

केली आइकिली होईल जे कथा। राहिलें तें चित्ता होइल प्रेम ॥ २ ॥ गरुडटके टाळ मृदंग[1] पताका। सांगती[2] ते एकां एक सुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां येती लवलाहीं। आलिंगूनि बाहीं देइन क्षेम ॥ ४ ॥

१९५०. क्षेम मायबाप[3] पुसेन हें आधीं। न[4] घलीं हें मधीं सुख दुःख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करीं तांतडी आपणांपासूनि। आइकेन कानीं सांगती तें ॥ छ ॥ अंतरींचें संत जाणतील गूज। निरोप तो मज सांगतील ॥ २ ॥ पायांवरी डोई ठेवीन आदरें। प्रीतिपडिभरें आलिंगून[5] ॥ ३ ॥ तुका ह्मणे काया करीन कुरवंडी। ओंवाळून सांडीं त्यांवरून ॥ ४ ॥

१९५१. होइल माझी संतीं भाकिली करुणा। जे त्या नारायणा मनीं बैसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शृंगारूनि माझीं बोबडीं उत्तरें। होतील विस्तारें सांगितलीं ॥ छ ॥ क्षेम आहे ऐसें होइल सांगितलें। पाहिजे[6] धाडिलें शीघ्र मूळ ॥ २ ॥ अवस्था जे माझी ठावी आहे संतां। होइल कृपावंता [7]निरोपिली ॥ ३ ॥ तुका ह्मणे सवें येईल मुऱ्हाळी[8]। किंवा कांहीं उरी राखतील ॥ ४ ॥

१९५२. दोहींमध्यें एक घडेल विश्वासें। भातुकें सरिसें मूळ तरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती निरासें[9] निःशेष न घडे। [10]कांहीं तरी ओढे चित्त माये ॥ छ ॥ लौकिकाची तरी धरितील लाज। काय माझ्या काज आचरणें ॥ २ ॥ अथवा कोणाचें घेणें लागे रीण। नाहीं तरी हीनेंकर्मी[11] कांहीं ॥ ३ ॥ व्यालीचिये अंगीं असती वेधना। तुका ह्मणे मना मन सोंक्ष[12] ॥ ४ ॥

१९५३. बैसतां कोणापें नाहीं समाधान। विवरे हें मन ते चि सोई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घडी घडी मज आठवे माहेर। न पडे विसर क्षणभरी ॥ छ ॥ नो[13] बोलावें ऐसा करितों विचार। [14]प्रसंगीं तों फार आठवतें ॥ २ ॥ इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली। होती विसांवली ये चि ठायीं ॥ ३ ॥ एकसरें सोस माहेरासी जावें। तुका ह्मणे [15]जीवें घेतलासे ॥ ४ ॥

१९५४. नाहीं हानि[16] परी न राहावे निसुर। न पडे विसर काय करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुसाविसी वाटे मात कापडियां। पाठविती न्याया मूळ मज ॥ छ ॥

---

१ दे. त. पं. मृदांग.–२ सागताती.–३ पं. ० मायबापा पुसेन आर्धी।–४ पं. न घालीं.–५ पं. आलिंगन.–६ पं. होईल.–७ पं. निरूपिली.–८ "मुऱ्हाणी" असावें?.–९ पं. निराश.–१० पं. कार्हीं तरि चि ओढे०.–११ पं. हीन कर्म.–१२ पं. साक्षी.–१३ त. पं. न.–१४ पं. प्रसंगीं तो विसर प्रसंगीं तो.–१५ पं. जीव.–१६ त. पं. हाणी. दे. "हानि" असतां मागून "हाति" केलें आहे.

आणीक या मना नावडे सोहळा । करितें टकळा माहेरींचा ॥ २ ॥ बहु कामें केलें बहु कासावीस । वहु जाले दिस भेटी नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें न कळे अंतर । अवस्था तों[1] फार होते मज ॥ ४ ॥

१९५५. तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणाचिया मुखें तंट नाहीं मागें । वचन वाउगें बोलों नये ॥ ध्रु ॥ दिसे हानि परी निरास न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥ २ ॥ आपुलिया भोगें होईल उशीर । तोंवरी कां धीर केला नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोड करील सेवट । पाहिली ते वाट ठायीं[2] आहे ॥ ४ ॥

१९५६. माहेरींचें आलें तें मज माहेर । सुखाचें उत्तर करिन त्यासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पायांवरी माथा आलिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥ ध्रु ॥ सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पर्वकाळें आहे त्यासें ॥ २ ॥ आपुले जीवींचें सुखदुःख भावें । सांगेन अघवें आहे तैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वीट नेघें आवडीचा । बोलिली च वाचा बोलवीन ॥ ४ ॥

१९५७. वियोग न घडे सन्निध वसलें । अखंड राहिलें होय चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विसरु न पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पंथें ॥ ध्रु ॥ कामाचा विसर नाठवे शरीर । रसना मधुर नेणे फिकें ॥ २ ॥ निरोपासी काज असो अनामिक । निवडितां एक नये मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित चित्तें ओढियेलें । जेथें तें उगलें जावें येणें ॥ ४ ॥

१९५८. आतां माझे सखे येती वारकरी । जीवा आस थोरी लागली ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगतील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरींचा ॥ ध्रु ॥ काय लाभ जाला काय होतें केणें । काय काय कोणें सांटविलें ॥ २ ॥ मागणें तें काय धाडिलें भातुकें । पुसेन तें सुखें आहेतसीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय सांगती ते कानीं । ऐकोनियां मनीं धरुनी राहें ॥ ४ ॥

१९५९. काय करावें म्या केले ते विचार । घडेल साचार काय पाहों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय मन नाहीं धरीत आवडी । प्रारब्धीं जोडी ते चि खरी ॥ ध्रु ॥ काय म्यां तेथींचें रांधिलें चाखोनि । तें हें करीं मनीं विवंचना ॥ २ ॥ आणीक ही त्यासी वहुत कारण । बहु असे जिणें ओढीचें ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां बोलविल्यावरी । परती माघारी केली नाहीं ॥ ४ ॥

---

१ पं. ते फार होत मज.–२ पं. तट–३ पं. ठावी –४ पं. पूर्वकाळ.–५ त. ऐसा.–६ दे. त. वारेकरी.–७ पं. लागलीसे.–८ त. परारब्धीं. पं. प्रारब्ध

१९६०. आह्मां अराणूक संवसारा हातीं । पाडिली नव्हती आजिवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुत्रदाराधन होतों मनीं धंदा । गोविंयेलों सदा होतों कामें ॥ ध्रु ॥ वोडवलें ऐसें दिसतें कपाळ । राहिलें सकळ आवरोनि ॥ २ ॥ मागें पुढें कांहीं न दिसे पाहातां । तेथूनियां चिंता उपजली ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट पाह्याचें कारण । येथीचियां[3] हिंणें[4] जालें भाग्य ॥ ४ ॥

१९६१. बहु दिस नाहीं माहेरिंची भेटी । जाली होती तुटी व्यवसायें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुल्याला होतों गुंतलों व्यासंगें । नाहीं त्या प्रसंगें आठवलें ॥ ध्रु ॥ तोडिलें तुटतें जडती जडलें । आहे तें आपुलें आपणापें ॥ २ ॥ [6]बहु निरोपाचें पावलें उत्तर । जवळी च पर एक तें ही ॥ ३ ॥ काय जाणों मोह होईल सांडिला । बहु दिस तुटला तुका ह्मणे ॥ ४ ॥

१९६२. होतीं [7]नेणों जालीं कठिणें काठिण । जवळी च मन मनें ग्वाही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी होतों सोई सांडिला मारग । घडिलें तें मग तिकून ही ॥ ध्रु ॥ निश्चिंतीनें[8] होते पुढिलांची सांडी । न चाले ते कोंडी मायबापा ॥ २ ॥ आह्मां नाहीं त्यांचा घडिला आठव । त्यांचा बहु जीव विखुरला ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालें धर्माचें माहेर । पडिलें अंतर आह्मांकूनि ॥ ४ ॥

१९६३. आतां करावा कां[9] सोंस वांयांविण । लटिका चि सीण मनासी हा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असेल तें कळों येईल लौकरी । आतां वारकरी आल्यापाठीं ॥ ध्रु ॥ बहु विलंबाचें सन्निध पातलें । धीराचें राहिलें फळ पोटीं ॥ २ ॥ चालिलें तें ठाव पावेल सेवटीं । पुरलिया तुटी पाउलांची ॥ ३ ॥ तुका ह्मणे आसे लागलासे जीव । ह्मणऊनि कींव भाकीतसें ॥ ४ ॥

॥ १९ ॥

१९६४. भागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी क्षेम कीं सकळ । बाळ अवघे गोपाळ ॥ ध्रु ॥ मारगीं चालतां । श्रमलेती येतां जातां ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥ ३ ॥

१९६५. घालूनियां ज्योती । वाट पाहें दिवसराती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु उतावीळ मन । तुमचें व्हावें दरुषण ॥ ध्रु ॥ आलों वोळवीत । तैसें या चि पंथें चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे पेणीं । येतां जातां दिवस गणीं ॥ ३ ॥

---

१ पं. होतीं.–२ पं. गोवियेलें सदा होवें कामें ।.–३ पं. तेथींचिया.–४ त. हीन–५ त. तोडिता तुटाते॰. दे. तुटातें. पं. तोडिलें तुटतें जोडिलें जडलें ।.–६ पं. नाहीं.–७ पं. नेणें. त. जाली नेणों.–८ पं. निश्चितीनें.–९ पं. " का " नाहीं.

१९६६. आजि दिवस धन्य । तुमचें जालें दरुषण ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ सांगा माहेरींची मात । अवघा विस्तारीं वृत्तांत ॥ छ्र ॥ आइकतों मनें । करुनि सादर श्रवण ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥ ३ ॥

१९६७. बोलिलीं तीं काय । माझा बाप आणि माय ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ ऐसें सांगा जी झडकरी । तुह्मी सखे वारकरी ॥ छ्र ॥ पत्राचें वचन । काय दिलें फिरावून ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । मना आणिलें कीं नाहीं ॥ ३ ॥

१९६८. काय पाठविलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ आसें लागलासे जीव । काय केली माझी कींव ॥ छ्र ॥ फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगा । कैसें आर्त पांडुरंगा ॥ ३ ॥

१९६९. आजिचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी जालें मन कल्पवेना ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ आर्तभूत माझा जीव जयांसाटीं । त्यांच्या जाल्या भेटी पायांसवें ॥ छ्र ॥ वाटुली पाहातां सिणले नयन । वहु होतें मन आर्तभूत ॥ २ ॥ माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होइल समाचार सांगती तो ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी निवारलो ताप । फळले[3] संकल्प संत आले ॥ ४ ॥

१९७०. आजि बरवें जालें । माझें माहेर भेटलें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ डोळां देखिले[4] सज्जन । निवारला भाग सीण ॥ छ्र ॥ धन्य जालों आतां । क्षेम देऊनियां संतां ॥ २ ॥ इच्छेचें पावलों । तुका ह्मणे धन्य जालों ॥ ३ ॥

१९७१. वोरसोनि येती । वत्सें[5] धेनुवेच्या चित्तीं ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ माझा कराया[6] सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥ छ्र ॥ स्नेहें भूक तान । विसरती जाले सीण ॥ २ ॥ तुका ह्मणे कौतुकें । दिलें प्रेमाचें भातुकें ॥ ३ ॥

१९७२. आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाईन ओंव्या ॥ १ ॥ सांगितला आधीं आइकों निरोप । होइल माझा वाप पुंसे[7] तो तें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरींहून आजि ॥ ३ ॥

१९७३. आमुप जोडल्या सुखाचिया रासी । पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥ १ ॥ काय सांगों सुख जालें आलिंगनें[8] । निवाली दर्शनें कांति माझी ॥ २ ॥ तुका ह्मणे यांच्या[9] उपकारासाटीं । नाहीं माझे गांठी कांहीं एक ॥ ३ ॥

---

१ त. पं. मनें.–२ त. निरसला. पं. निवाला.–३ दे. त. फळलें–४ पं. देखिला –५ पं. वत्स.–६ पं. करावा.–७ पं. पुसे तो चि. दे. पुसें तों तें.–८ दे. आलिंगन.–९ पं. त्याच्या.

१९७४. पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें ॥ १ ॥ जोडोनि हस्तक करीन विनवणी । घेइन पायवणी धोवोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें भांडवल सुचें । संतां हें ठायींचें ठावें आहे ॥ ३ ॥

## *पत्राचे अभंग समाप्त । ३६ । १९ । ११ ॥ ६६ ॥

१९७५. मना एक करीं । ह्मणें[1] जाइन पंढरी । उभा विटेवरी । तो पाहेनें[2] सांवळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीन सांगसी[3] तें काम । जरी जपसी हें नाम । नित्य वाचे राम । हरि कृष्ण गोविंदा[4] ॥ छ ॥ लागें[5] संतांचिया पायां । कथे उल्हास गावया । आलों मागावया । शरण देईं उचित ॥ २ ॥ नाचें रंगीं[6] वाहें टाळी । होय सादर ते काळीं । तुका ह्मणे मळी । सांडूनियां अंतरीं[7] ॥ ३ ॥

१९७६. न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं[8] त्रिपुटी । जाय तेथें[9] दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाविक गे माये भोळें[10] गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ छ ॥ जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी । ह्मणतां[11] वाचे हरि । राम कृष्ण गोविंदों[12] ॥ २ ॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची[13] ॥ ३ ॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ४ ॥ ऐसा भक्तांचा ऋणी । पाहातां आगमीं पुराणीं । नाहीं तुका ह्मणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ५ ॥

१९७७. स्वल्प वाट[14] चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी आह्मी खेळीमेळीं । गदा रोळी आनंदें ॥ छ ॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि नीट । जवळी वाटे वैकुंठा[15] ॥ ३ ॥

१९७८. आनंदाच्या कोटी । सांटवल्या आह्मां पोटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेमें[16] चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ छ ॥ अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥ २ ॥ थडी आहिक्य परत्र । तुका ह्मणे सम तीर ॥ ३ ॥

---

१ दे. त. ह्मणे. पं. ह्मणे मी जाईन० –२ पं. पाहिन –३ दे. सागती.–४ पं. गोविंद.–५ पं. लागन – ६ पं. रंगें –७ पं. अतरिची.–८ पं. क्षीरसागरा.–९ त. जेथें –१० पं. भोळ्या –११ पं. वाचे ह्मणतां हरि०. त. ह्मणतां नाचे हरि०.–१२ पं. गोविंद.–१३ पं. राहिची.–१४ पं. वाट.–१५ पं. वाटे वैकुठ.–१६ पं. प्रेमा *संतांबरोबर पाठविल्या पत्राचे अ० ३६; या पत्राच्या उत्तराच्या मार्गप्रतीक्षेचे अ० १९; व संत परत आले त्यांची भेट झाली ते अभंग ११; एकंदर अभंग ६६.

१९७९. चाहाडाची माता । व्यभिचारीण तत्त्वता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥ छ्र ॥ जाणों त्याच्या वाचें । कांहीं सोडिलें गाठीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥ ३ ॥

१९८०. सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंकी जन ॥ छ्र ॥ विंचु हाणी नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । नरका पाउलीं चालती ॥ ३ ॥
॥ ६ ॥

## ॥ स्वामींनीं स्त्रीस उपदेश केला ते अभंग ॥ ११ ॥

१९८१. पिकल्यां[3] सेताचा आह्मां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्तर टक्के बाकी उरली मागे तो हा । मागें झडले दाहा आजिवरी ॥ छ्र ॥ हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज । माजघरीं बाजे बैसलासे ॥ २ ॥ मज यासी भांडतां जाब नेदी वेळें । ह्मणे ऐका वेळे घ्याल वांटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥ ४ ॥

१९८२. करितां विचार अवघें एक राज्य[6] । दुजा कोण मज पाठी घाली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण्या रीती जावें आह्मी वो पळोनि । मोकळे अंगणीं मागें पुढें ॥ छ्र ॥ काय तें गव्हाणें हिंडावीं वो किती । दूत ते लागती याचे पाठी ॥ २ ॥ कोठें याची करूं गेलों कुळवाडी । आतां हा न सोडी जीवें आह्मां ॥ ३ ॥ होऊनि वेबारें येथें चि राहावें । देईल तें खावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

१९८३. नागवूनि एकें नागवीं च केलीं । फिरोनियां आलीं नाहीं येथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेणें सुती कोणी न घेती पालवीं । करूनियां गोवी निसंतान ॥ छ्र ॥ एकें तीं गोविलीं घेऊनि जमान । हांसतील जन लोक तयां ॥ २ ॥ सरले तयांसी धालीं वैकुंठीं । न सोडी हे साटी जीवें[12] जाली ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों जाणोनि नेणतीं । सांपडलों हातीं याचे आह्मी ॥ ४ ॥

१९८४. आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभला नास माझ्या जीवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जरूर हें जालें मज[13] कां नावडे । उपास रोकडे येती आतां ॥ छ्र ॥

१ दे. "जेणों" (जणों ?)–२ दे. हाणें–३ पं. केल्या.–४ त. याज.–५ पं. एक वेळे–६ त. राज–७ त. मोकळा. दे. मोकळ.–८ दे. याच–९ दे. केलों–१० पं. वोस.–११ पं. घालितो–१२ जाली जिवें–१३ पं. तुज.

बरें [1]म्या तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें[2] हें पाहें विचारूनि ॥ २ ॥ तुज मज तुटी नव्हे या विचारें । सहित [3]लेंकुरें राहों सुखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी तुझा माझा संग । घडेल वियोग कधीं नव्हे ॥ ४ ॥

१९८५. काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जीववित्ता साटी केली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न ह्मणावें कोणी माझें हें करणें । हुकुम तो येणें देवें केला ॥ ध्रु ॥ करूनि मोकळा सोडिलों भिकारी । पुरविली तरी पाठी माझी ॥ २ ॥ पाणिया भोंपळा जेवावया पानें । लाविलीं वो येणें देवें आह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी नाहीं वो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥ ४ ॥

१९८६. नको धरूं आस व्हावें या बाळांस । निर्माण तें [4]त्यांस त्यांचें आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुला [5]तूं गळा घेईं उगवूनि । चुकवीं जाचणी गर्भवास ॥ ध्रु ॥ [6]ऐवज देखोनि बांधितील गळा । ह्मणोनि निराळा [7]पळसें ॥ २ ॥ देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी आहे माझी चाड । तरी करीं वाड चित्त आतां ॥ ४ ॥

१९८७. भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें जालीं मज ॥ ध्रु ॥ आस निरसूनि कठिण हें मन । करीं वो समान वज्र तैसें ॥ २ ॥ किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनि । पावसील धनी परमानंद ॥ ३ ॥ तुका ह्मणे थोर [8]चुकती सायास । [9]भवबंधपाश तुटोनियां ॥ ४ ॥

१९८८. ऐक हें सुख होईल दोघांसी । सोहळे हे ऋषि करिती देव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जडितविमानें बैसाविती मानें । गंधर्वांचें गाणें नामघोष ॥ ध्रु ॥ संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्वसुखा पुर कोड तेथें ॥ २ ॥ आलिंगूनि [11]लोळों त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी [12]मायबापें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया सुखा वर्णूं काय । जेव्हां बापमाय देखें[13] डोळां ॥ ४ ॥

१९८९. देव पाहावया करीं वो सायास । न धरीं हे आस [14]नाशिवंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिन [15]शुद्ध सोम सकाळीं पातला । द्वादशी घडला पर्वकाळ ॥ ध्रु ॥ द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन । देईं वो हें दान यथाविध ॥ २ ॥ नको चिंता करूं

१ त. पं. मा—२ दे. हें तें—३ पं. लेकरें.—४ पं. त्याच त्यांस.—५ पं. तो.—६ दे. त. अवेज.—७ दे. त. पं. पळ्तुसें —८ पं. चुकती वो सत्यास ।.—९ दे. त. भवबंद पान —१० पं. सोहळे.—११ पं. लोळें.—१२ पं. मायबाप.—१३ पं. देखों.—१४ पं. नाशिवत.—१५ पं. सोम शुद्ध.

वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आह्मां ॥ ४ ॥

१९९०. सुख हें नावडे आह्मां कोणा[1] बळें । नेणसी अंधळे[2] जालीशी तूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भूक तान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठायीं ॥ छ ॥ द्रव्य जीवाहूनि आवडे या जना । आह्मांसी पाषाणाहूनि हीन ॥ २ ॥ सोइरे सज्जन जन आणि वन । अवघें समान काय गुणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां जवळी च आहे[3] । सुख दुःख साहे पांडुरंग ॥ ४ ॥

१९९१. गुरुकृपे मज बोलविलें देवें । होईल हें[4] घ्यावें हित कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्य देवें माझा केला अंगीकार । आणीक विचार नाहीं आतां ॥ छ ॥ होई बळकट घालूनियां कास । हा चि उपदेश तुज आतां ॥ २ ॥ सडा संमार्जन तुळसीवृंदावन । अतीतपूजन ब्राह्मणाचें ॥ ३ ॥ वैष्णवांची दासी होई सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥ ४ ॥ पूर्णबोध स्त्रीभ्रतारसंवाद । धन्य जिहीं वाद आइकिला ॥ ५ ॥ तुका ह्मणे आहे पांडुरंगकथा । तरेल जो चित्ता धरील कोणी ॥ ६ ॥

॥ ११ ॥

१९९२. खडा रवाळी साकर । जाला नामाचा चि फेर । न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी आह्मी पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा । चाळविलें[6] जगा । मी हें माझें यासाटीं ॥ छ ॥ पायीं हातीं नाकीं शिरीं । हेम राहे[7] अळंकारीं । मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥ २ ॥ निजलिया लाभ हानी । तों च खरी ते स्वप्नीं । तुका ह्मणे दोन्ही । निवारलीं जागतां ॥ ३ ॥

१९९३. आह्मी जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आह्मी आप । आपणासी देखिलें ॥ छ ॥ एके ठायीं घरिच्याघरीं । न कळतां जाली चोरी । तेथें तें चि दुरी[8] । जाणें येणें खुंटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे धरूनि हातीं । उर[9] ठेविली मागुती । एकांतीं लोकांतीं । देवभक्तिसोहळा[10] ॥ ३ ॥

१९९४. कांहीं बोलिलों बोबडें । मायबापा तुह्मांपुढें । सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा ।

---

१ पं. कोण्या.–२ दे. अंधळें.–३ पं. आहे–४ पं. तें.–५ पं. दुजा.–६ दे. जाळविलें–७ त. साजे.–८ पं. तेथें चि दुसरी । जाणें०.–९ पं. उरी.–१० त. देवभक्त सोहळा.

आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥ छ ॥ घडे अवज्ञा सख्यत्वें । [1]वाळें वापासी न भ्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुह्मासी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । प्रेम लोभ न संडावा । पाळिला पाळावा । ळळा पुढती आगळा ॥ ३ ॥

१९९५. वहु भितों जाणपणा । आड न यो नारायणा । घेइन प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं । काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ छ ॥ [2]निमिषैार्ध संतसंगति । वास वैकुंठीं कल्पांतीं । मोक्षपदें [3]होती । ते विश्रांति बापुडी ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि देईं । मीतूंपणा खंड नाहीं । बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ३ ॥
॥ ४ ॥

१९९६. देवा आतां ऐसा करीं उपकार । [4]देहाचा विसर पाडीं मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरीं च हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥ छ ॥ ठाव देईं चित्ता [5]राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ॥ २ ॥ [6]आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा [7]माझा ॥ ३ ॥ मागणें तें एक हें चि आहे आतां । नाम मुखीं [8]संतसंग देईं ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको वरपंग देवा । [9]घेईं माझी सेवा भावशुद्ध ॥ ५ ॥

१९९७. तुज न करितां काय नव्हे एक । हे तों सकळिक संतवाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेईं माझा भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥ छ ॥ उचित अनुचित पापपुण्यकाला । हें तों नये मला निवाडितां ॥ २ ॥ कुंटित राहिली बोलतां बोलतां । पार न पवतां वाणी पुढें ॥ ३ ॥ पुसतां ही कोणां न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका ह्मणे वहु पाहिलें या जीवें । वर्म जालें जी ठावें नाम तुझें ॥ ५ ॥

१९९८. मज त्याची भीड नुलंघवे देवा । जो ह्मणे केशवा दास तुझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज आवडती वहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥ छ ॥ सांडूनियां लाज नाचेन त्यांपुढें । आइकती कोडें नाम तुझें ॥ २ ॥ न लगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित तें चि करूं ॥ ४ ॥

---

१ त. वापें वाळासी निभावें. दे. "वाळें वापासी न भ्यावें" असें असतां मागून त. प्रमाणें केलें आहे.–२ त. पं. निमिष्यार्ध. दे. र्निमिशा अर्ध.–३ पं. येती । त्या विश्रांति०.–४ दे. न. देहेचा.–५ दे. त. राख.–६ दे. असे भय आतां लाज० त. आशाभय०.–७ पं. मज.–८ पं. न. संतासग. (सतां संग ?)–९ पं. घ्यावी.–१० प. हें.

१९९९. तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां अंधां तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां[1] ॥ छ ॥ मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ २ ॥ पापपुण्य भेद नासिलें तिमिर । त्रिगुण[2] शरीर सांडियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥ ४ ॥

२०००. जेथें जातों तेथें[3] तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चालों वाटे आह्मी तुझा चि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ छ ॥ बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों[4] देवा ॥ २ ॥ अवघे[5] जन मज जाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ४ ॥

२००१. जालें पीक आह्मां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाली अराणुक अवघियांपासून । अवघा गेला सीण भाग आतां ॥ छ ॥ अवघा जाला आह्मां एक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥ २ ॥ अवघे चि आह्मी ल्यालों अळंकार । शोभलों हि फार अवघ्यांवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी सदैवांचे[6] दास । करणें न लगे आस आणिकांची ॥ ४ ॥

॥ ६ ॥

२००२. साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण[7] सेवकें स्वामिसत्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्मरसें अलिप्त त्या ॥ छ ॥ सांगणें[8] तें नाहीं करणें आपण । मोलही वचन बाध जालें[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां भांडवल हातीं । येरझारा खाती केवढियें ॥ ३ ॥

२००३. शुभ जाल्या दिशा अवघा चि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे ते ही ॥ छ ॥ सुख दुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हितफळें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आह्मांसी हें भलें । अवघे चि जाले जीव जंत ॥ ३ ॥

२००४. पाप पुण्य दोन्ही वाहाती मारग । स्वर्गनर्कभोग यांचीं पेणीं[10] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका आड एकें[11] न लगे पुसावें । जोविल्या देखावें मागें भूक ॥ छ ॥

---

१ दे. त. चाळविता.–२ त. पं. त्रिगुणें–३ त. ० तेथें तुझा च सांगाती–४ प. केलें–५ दे. अवघें.–६ पं. देवाचे. दे. सदेवाचे–७ पं. प्रधान सेवकें.–८ दे. सांगणें न तें नाहीं०.–९ पं. जालों–१० पं. याची खाणी.–११ पं. एका.

राहाटीं पाहिलें भरोनियां रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी खेळतियांमधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२००५. हित तें हें एक राम कंठीं राहे । नोंठविती देहेभाव देहीं ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ हा चि एक धर्म निज बीजवर्म । हें चि जाळी कर्मे केलीं महा ॥ छ ॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ २ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका ह्मणे गंगे मिळणी सिंधु ॥ ३ ॥

॥ १ ॥

२००६. माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडे ज्या हरि अंतरापासूनि । ऐसियांचें मनीं आर्त माझे ॥ छ ॥ तयालागीं जीव होतो कासावीस । पाहातील वास नयन हे ॥ २ ॥ सुफळ हा जन्म होईल तेथूंन । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तो चि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ॥ ४ ॥

२००७. आमुचें जीवन हें कथाअमृत । आणिक ही संतसमागम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ छ ॥ धालिया ढेंकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥ २ ॥ पिकलें स्वरूप आलिया घुंमरी । रासी ते अंबरीं न समाये ॥ ३ ॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका ह्मणे ॥ ४ ॥

२००८. जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संचित सारूनि बांधेलें धरणें । तुंबिलें जीवन सांक्षेपें हें ॥ छ ॥ शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाही एक जालें ॥ २ ॥ बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघें नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्यां परवडी होती जाती ॥ ४ ॥

२००९. भक्तिभाव आह्मी बांधिलासे गांठी । सौदावितों हाटीं घ्या रे कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखाचिया पेंठे घातला दुकान । मांडियेले वान रामनाम ॥ छ ॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधु ॥ २ ॥ मागें भाग्यवंत जाले थोर थोर । तिहीं केला फार हा चि सांटा ॥ ३ ॥ खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका ह्मणे चित्त शुद्ध करीं ॥ ४ ॥

---

१ त. पं. नाठवती.—२ त. देहभाव देहीं—३ त. दे. ऐसियाचे मनीं आर्त माझें.—४ त. सफळ—५ पं. येथून.—६ दे. घुंमरि.—७ त. आक्षोप हें दे. आक्षप हें—८ त. आच्छादिलें फळ। प्राप्तबीजें मूळ अवघें०.—९ पं. मूळ.—१० पं. बीजाची.—११ दे. त. साधावितों.

२०१०. [1]पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बीज तें चि फळ येईल शेवटीं । लाभहानितुटी ज्याची तया ॥ छ ॥ दीपाचिये अंगीं [2]नाहीं दुजाभाव । [3]धणी चोर साव सारिखे चि ॥ २ ॥ काउळें ढोंपरा [4]कंकरें तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥ ४ ॥

२०११. धीर तो कारण एकविधभाव । पतिव्रते [5]नाहो सर्वभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चातक हे जळ न पाहाती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥ छ ॥ [6]सूर्यविकासिनी नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥ २ ॥ धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेम [7]प्राणांसवेंसाटी । [8]तरी च या गोष्टी विठोबाची ॥ ४ ॥

॥ ६ ॥

२०१२. [9]नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणिकें दुरावलीं करितां खटपट । [10]वेंउगे बोभाट वर्माविण ॥ छ ॥ रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें [11]कळिकाळें ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ३ ॥

२०१३. वैष्णवांची कीर्ति गाइली पुराणीं । साही अठरांजणीं चहूं वेदीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे कोणी दावा ग्रंथांचे वाचक । [12]कर्मठ धार्मिक पुण्यशील ॥ छ ॥ आदिनाथ शंकर नारद [13]मुनीश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुगुटमणी हे भक्ति । आणीक विश्रांति [14]आरतिया ॥ ३ ॥

२०१४. बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुम्हां ठावें जातिकुळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरि ॥ छ ॥ वाचेचा चाळक जाला दावी [15]वर्मे । उचित ते धर्म मजपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ३ ॥

२०१५. संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं [16]परोवरीं लोळतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चरणींचे रज लागती अंगांस । तेण वेताळीस उद्धरती ॥ छ ॥ उच्छिष्ट

---

१ दे. त. पं. प्रजन्यें—२ दे. "नाहीं" शब्द नाहीं—३ पं. चोर आणि साव सारिखाची ।.—४ पं. करकर तीतरा. त. कंकर तित्तरा. दे. ककर तितरा.—५ त. नाव्हो.—६ दे. सूर्यविकाशनी. त. ० विकासनी. पं. विकाशिनी.—७ पं. प्राणासवसाटी.—८ पं. तरि च माझ्या गोष्टी०.—९ दे. त. रामें.—१० पं. वाउगा.—११ त. कळिकाळा.—१२ पं. कर्मिष्ठ.—१३ दे. त. पं. मुनेश्वर.—१४ दे. अरतिया.—१५ पं. कर्मे.—१६ त. परवरी.

हें जमा करुनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे मी[1] आणीक विचार । नेणें हें चि सार मानीतसें ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२०१६. एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां[2] रे तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥ छ्र ॥ औठ[3] हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥ २ ॥ तुका ह्मणे श्रम । एक विसरतां राम ॥ ३ ॥

२०१७. आलें धेरायेच[4] पेंठे । पुढें मागुतें[5] न भेटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होसी फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासींचे वेढां ॥ छ्र ॥ नाहीं कोणांचा सांगात[6] । दुःख भोगितां आघात ॥ २ ॥ एका पाउलाची वाट । कोणां सांगावा बोभाट ॥ ३ ॥ जुंतिजेसी[7] घाणां । नाहीं मारित्या करुणा ॥ ४ ॥ तुका ह्मणे हित पाहें । जोंवरि हें हातीं आहे ॥ ५ ॥

२०१८. लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी । उत्तमजोडी जोडिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेईं हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । जालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥ छ्र ॥ घेउनि माप हातीं । काळ मोवी दिवस राती । चोर लाग घेती । पुढें तैसें पळावें ॥ २ ॥ हित सावकासें[8] । ह्मणे करीन तें पिसें । हातीं काय ऐसें । तुका ह्मणे नेणसी ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

२०१९. सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनें धरिला अभिळास[9] । मिठी घातली पायांस ॥ छ्र ॥ होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । लाभें लाभ दुणावला ॥ ३ ॥

२०२०. झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइंचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जो हें माप तोंडें धरी । सळे जाली ते आवरी ॥ छ्र ॥ जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥ २ ॥ तुका ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ३ ॥

२०२१. आह्मी बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय परिहाराचें काम । जाणें अंतरींचें राम ॥ छ्र ॥ कळोनियां काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥ २ ॥ कारण सर्वे एका । अवघें आहे ह्मणे तुका ॥ ३ ॥

२०२२. उमटे तें ठायीं । तुझे निरोपावें पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मीं करावें चिंतन । तुझें नामसंकीर्तन ॥ छ्र ॥ भोजन भोजनाच्या काळीं । मागों करूनियां आळी ॥ २ ॥ तुका ह्मणे माथां । भार तुझ्या पंढरिनाथा ॥ ३ ॥

---

१ त. मज.–२ पं. काय तृष्णा.–३ दे. ओठ–४ पं. मरायेचि. दे. धरावच पेंट.–५ पं. मागुती.–६ पं. सांगत.–७ पं. जुतिजेसी.–८ त. पं. सावकारें.–९ पं. अभिलाष.

२०२३. केला पण सांडी । ऐसियासी ह्मणती लंडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥ छ ॥ आपला निवाड । [1]आपण चि करितां गोड ॥ २ ॥ तुह्मीं आह्मीं देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥ ३ ॥ [2]असे धुरे उणें । मागें सरे तुका ह्मणे ॥ ४ ॥

२०२४. न व्हावें तें जालें । [3]तुह्मां आह्मांसी लागलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हालमाकलमें । भांडोनियां काढूं वर्मे ॥ छ ॥ [4]पाटोळ्यासवेंसाटी । दिली [5]रंगव्याची गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । आणूनियां करिन सरी ॥ ३ ॥

२०२५. पतितमिरासी । ते म्यां धरिला जीवेंसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां बळिया सांग कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥ छ ॥ [6]पावनाचा ठसा । दावीं मज तुझा कैसा ॥ २ ॥ [7]वाव तुका ह्मणे जालें । रोख पाहिजे दाविलें ॥ ३ ॥

२०२६. करितां वेरझारा । उभा न राहसी वेव्हारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥ छ ॥ [8]आरोगुनी मुग । बैसलासी जैसा बग ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । बुडाविलीं आळवितीं ॥ ३ ॥

२०२७. नाहीं देणें घेणें । गोवी[9] केली अभिमानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कां हो निवडूं नेदां । पांडुरंगा येवढा धंदा ॥ छ ॥ पांचांमधीं जावें । थोड्यासाटीं फजित व्हावें ॥ २ ॥ तुज ऐसीं नाहीं । पांडुरंगा आह्मी कांहीं ॥ ३ ॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां । निवडूं संतां हें देखतां ॥ ५ ॥

॥ ९ ॥

२०२८. सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलेंवे सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको [11]पृथकाचे भरी । पडों एक मूळ धरीं ॥ छ ॥ [12]पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटावें तें थोर ॥ २ ॥ [13]वेश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥ ३ ॥ एक चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे धांवा । आहे [14]पंढरी विसांवा ॥ ५ ॥

---

१ दे. आपणें.–२ त. एसें. दे. पं. आसे.–३ पं. आह्मां तुह्मांसी.–४ प. पाटोळ्यासवसाटी.–५ पं. रवट्याची.–६ दे. पावणांचा. त. पावणाचा.–७ पं. "वाव" नाहीं.–८ दे. त. आरुगुणी.–९ पं. गोवा केला अभिमानें.–१० दे. त. पं. बोल्हावे.–११ पं. पृथुकाचे.–१२ पं. पानचोऱ्याचें तें द्वार ।.–१३ दे. त. पं. दस्त.–१४ दे. पंढरिचें.

२०२९. करूं याची कथा नामाचा गजर । आह्मां संवसार काय करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तयाभेणें कळिकाळ ॥ छ्र ॥ आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं ऐसियांचा[1] संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ३ ॥

॥ २ ॥

२०३०. काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ छ्र ॥ काय उंदीर नाहीं धांवीं । राख लावी गाढव ॥ २ ॥ तुका ह्मणे सुस[2] जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ३ ॥

२०३१. मद्यें मातलें नागवें नाचे । अनुचित वाचे बडबडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥ छ्र ॥ आलें अंगासी तें बळिवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत ॥ २ ॥ तुका ह्मणे कळों येईल तो भाव । अंगीं[3]वरि घाव उमटतां ॥ ३ ॥

॥ २ ॥

२०३२. सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ छ्र ॥ अमृतें सागर भरवती गंगा । ह्मणवेल उगा राहें काळा ॥ २ ॥ भूत भविष्य कळों येईल वर्तमान । करवती प्रसन्न रिद्धिसिद्धी ॥ ३ ॥ स्थान मान कळों येती योगमुद्रा । नेणवेल वारा ब्रह्मांडासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे मोक्ष राहे आलीकडे । इतर बापुडें काय तेथें ॥ ५ ॥

॥ १ ॥

२०३३. भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेवितीं[6] कवतुकें धणीवरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती तीं[7] पदें सकुमारें ॥ छ्र ॥ विसरले मुक्ती भक्तिअभिळासें । ओढत सरिसें सुख आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ३ ॥

२०३४. भक्तां समागमें सर्वभावें हरि । सर्व काम करी न सांगतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांटवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥ छ्र ॥ मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि[11] ते कांहीं न मागती ॥ ३ ॥

---

१ त. पं. ऐसियाचा.–२ पं. नाहिंदवी ।.–३ दे. त. अंगावरि.–४ दे. मरवे ती–५ पं. ऐलीकडे.–६ दे. त. सेवितु–७ पं. ते पदें सकुमार.–८ पं. भक्तिभाव.–९ दे. त. सुखा.–१० दे. सांगतां.–११ पं. ठेवूनिया कांहीं.–१२ दे. मागती.

२०३५. प्रेमअमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळ ही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ छ ॥ सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२०३६. कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥ छ ॥ नष्टदुष्टपण कवणाचें वाणू । तयाहून अणु[1] आधिक माझें ॥ २ ॥ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी भांडवलें पुरता । तुंजसी[2] पंढरिनाथा लावियेलें ॥ ४ ॥

॥ १ ॥

२०३७. काळ जवळि च उभा नेणां । घाली झांपडी खुंटी कानां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा हुशार सावध राहीं । आपुला तूं अपुलेठायीं ॥ छ ॥ काळ जवळिच उभा पाहीं । नेदि कोणासि देऊं कांहीं ॥ २ ॥ काळें पुरविली पाठी । वरुषें जालीं तरी साठी ॥ ३ ॥ काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥ ४ ॥ तुका ह्मणे काळा । कर्म मिळे[3]तें जाळा ॥ ५ ॥

॥ १ ॥

२०३८. दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकांवारि ॥ छ ॥ मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचा । प्रीती आदर करा साचा ॥ ३ ॥

२०३९. साहोनियां टांकीघाये । पाषाण देव चि जाला पाहें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया रीती दृढ मन । करीं साधाया कारण ॥ छ ॥ बाण शस्त्र साहे गोळी । शूरां[4] ठाव उंच स्थळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सती । अग्नि[5] न देखे ज्या रीती ॥ ३ ॥

॥ २ ॥

२०४०. तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें । मानावया जग आत्मपणें[6] । नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें । भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एक चि पेणें[7] । विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं त्रुटित

१ दे. आनु. पं. अनु.—२ पं. तुज.—३ पं. मिळत.—४ दे. सुरा. त. पं. शुरां.—५ त. "अग्न" असें मागून केलें आहे.—६ त. आत्मैपणें. दे. "आत्मैपणें" असतां मागून "आत्मपण" केलें आहे. पं. आत्मणें —७ पं. पेणें.

तेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां त्यांसीं काय चाले माझें बळ । जालोंसें दुर्बळ सत्त्वहीन । दग्ध पट दिसे संगींति वरवंट । काय त्याचें कारण ॥ छ ॥ आळसें दृष्टी न पाहे आपुलें । एक चि देखिलें सर्वरूप । मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुनें तो कोण बाप । ज्योति ना अंधार अवघा एकंकार । तेथें काय पुण्यपाप । विठ्ठलावांचुनि कांहीं च नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥ २ ॥ बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया । सुखदुःखाची वार्ता नाइके । अंतरलों दुरी तया । मीतूंपणनिष्काम[3] होऊनि । राहिलों आपुलिया ठायां । तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका ह्मणे देवराया ॥ ३ ॥

॥ १ ॥

२०४१. कथा पुराणें[4] ऐकतां । झोपें[5] नाथिलें तत्त्वता । खाटेवरि पडतां । व्यापी चिंता तळमळ[6] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी गहन कर्मगति । काय तयासी रडती । जाले जाणते जो चित्तीं । कांहीं नेघे आपुला ॥ छ ॥ उदक लावितां न धरे । चिंता करी केव्हां सरे । जाऊं नका धीरें । ह्मणे करितां ढवाळ्या[7] ॥ २ ॥ जवळी गोंचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा । तुका ह्मणे दुरा । देशत्यागें तयासी ॥ ३ ॥

२०४२. संदेह बाधक आपआपणयांतें । रज्जुसर्पवत भासतसे । भेऊनियां काय देखिलें येणें । मारें[8] घायेंविण लोळतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपण[9] चि तारी आपण चि मारी । आपण उद्धरी आपणयां । शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥ छ ॥ पापपुण्य कैसे भांजिले[10] अंकें[11] । दशकाचा एक उरविला । जाणोनियां काय होतोसी नेणता । शून्या[12] ठाव रिता नाहीं नाहीं ॥ २ ॥ दुरा दृष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न ह्मणें चाडा । धांवतां चि फुटे नव्हे समाधान[13] । तुका ह्मणे जाण पावे पीडा ॥ ३ ॥

॥ २ ॥

२०४३. कथे उभा अंग रंखेल[14] जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें तो पातकी न येतां[15] च भला । रणीं कुचराला काय चालें[16] ॥ छ ॥

---

१ पं. दुरोनि.–२ दे. त. पिसुन पं. पिसुण.–३ दे. पं. निःकाम–४ पं. पुराण.–५ दे. "झोंप नाथिलि" असता मागून "झोपें नाथिलि" असें केलें आहे. त. झोंपें नाथिला.–६ पं. तळमळी. ७ पं. टवाळ्या.–८ त. विण घाये कैसें लोळतसें. दे. असेंच असतां मागून "मारें घायें विण लोळतसे" असें केलें आहे पं. घायें विण कैसे०.–९ दे. आपणें. पं. "आपण उद्धरी" याबद्दल "आपण चि उद्धरी".–१० पं. भाजिले–११ दे. त. अख. पं. अंख.–१२ त. शून्याचा ठाव नाहीं जाला ।. पं. शून्याचा ठाव रिता नाहीं ।.–१३ त. सावधान–१४ दे. राखे.–१५ त. पं. येता.–१६. पं जाले.

कथे[1] बैसोनी आणीक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐलपैल ते[2] थडींचे । बुडतील साच मध्यभागीं ॥ ३ ॥

२०४४. नावडे ज्या कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बैरे[3] वोजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय[4] तया दुरी ॥ ध्रु० ॥ नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ २ ॥ तुका ह्मणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ३ ॥

२०४५. जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा पाहे चर्मदृष्टि[5] । दीप स्नेहाच्या शेवटीं ॥ ध्रु० ॥ कांतेलेंसें श्वान । [6]तैसें दिशा हिंडे मन ॥ २ ॥ त्याचे कानीं ह्मणे । कोण बोंब तुका ह्मणे ॥ ३ ॥

२०४६. दुर्बळा वाणीच्या एक दोनि सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ॥ ध्रु० ॥ तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ॥ २ ॥ ॥ ४ ॥

२०४७. परिमळें काष्ठ ताजवां तुळविलें । आणीक नांवांचीं थोडीं । एक[7] तीं कांतिवें[8] उभविलीं ढवळारें । एकाचिया कुड मेडी । एक दीनरूप आणिती मोळिया । एक ते बांधोनि माडी । अवघियां बाजार एक चि जाला । मांविकलीं आपुल्या पाडीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥ ध्रु० ॥ एक गुणें आगळे असती । अमोल्य नांवांचे खडे । एक समर्थ दुर्बळा घरीं । फार मोलाचे थेंडे । एक झगझग करिती वाळवंटीं । कोणी न पाहाती तयांकडे । सभाग्य संपन्न आपुलाले घरीं[9] । मायेक दैन्यें वापुडें ॥ २ ॥ एक नामें रूपें सारिख्या असती । अनेकप्रकार याती । ज्याचिया संचितें[10] जैसें आलें पुढें । तयाची तैसी[11] चि गति । एक उंचपदीं बैसोनि[12] सुखें । दास्य करवी[13] एका हातीं । तुका ह्मणे कां मानिती सुख । चुकलिया वांयां खंतीं ॥ ३ ॥ ॥ १ ॥

२०४८. नाहीं आह्मां शत्रु सोसुरें[14] पिशुनें[15] । दाटलें हें धन माहियेर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जनानिया ॥ ध्रु० ॥ लज्जा

---

१ पं. कथे बैसोनियां आणिक करी चर्चा ।—२ पं. 'ते" नाहीं.—३ पं. बऱ्या.—४ दे. ठायें—५ त. चद्रीदाटी. पं. चद्रीदष्टी. दे. "चद्रिदाष्टी" असतां "चर्मद्रिष्टि" केलें आहे.—६ पं. दाहीं दिशा०—७ पं. नावडे चि.—८ दे. एक तें कातिवें. पं. एक तें कितीची.—९ पं. परी । मायेक दैन्यवाणें वापुडें.—१० पं. सचितीं.—११ पं. "च" नाहीं.—१२ दे. त. पं. बैसउनि.—१३ पं. करविती—१४ पं. सोइरें.—१५ दे. त. पं. पिसुन.

भय कांहीं आह्मां चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगती ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी सदैवाचीं बाळें । जालों लडिवाळें सकळांचीं ॥ ३ ॥

२०४९. गर्भी असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा लाघवी सूत्रधारी । कृपाळुवा माझा हरी ॥ छ ॥ सर्प पिलीं वितां चि[1] खाय । वांचलियां[2] कोण माय ॥ २ ॥ गगनीं लागला कोसेरें[3] । कोण पुरवी तेथें चारा ॥ ३ ॥ पोटीं पाषाणांचे जीव । कवण जीव त्याचा भाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥ ५ ॥

२०५०. न ह्मणे कवणां सिद्ध साधक गंव्हार । अवघा विश्वंभर वांचूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें माझे बुद्धि काया वाचा मन । लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥ छ ॥ गातां प्रेमगुण शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥ २ ॥ देईं चरणसेवा भूतांचें भजन । वर्णी अभिमान सांडवूनि ॥ ३ ॥ आशापाश माझी तोडीं माया चिंता । तुजविण ठ्यथा[4] नको कांहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे सर्व भाव[5] तुझे पायीं । राहे ऐसें देईं प्रेम देवा ॥ ५ ॥

२०५१. अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तें चं[6] ठेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय उरलें तया पण । मागील तें नाम गुण ॥ छ ॥ लोह लागे परिसा अंगीं । तो ही भूषण जाला जगीं ॥ २ ॥ सरिता ओहळाँ[7] ओघा । गंगे[8] मिळोनि जाल्या गंगा ॥ ३ ॥ चंदनाच्या वासें । तरु[9] चंदन जाले स्पर्शें ॥ ४ ॥ तुका जडला[10] संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ५ ॥

॥ ४ ॥

२०५२. ऐशा भाग्यें जालों । तरी धन्य जन्मा आलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रुळें तळीले[11] पायरी । संत पाय देती वरी ॥ छ ॥ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ३ ॥

२०५३. करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥ छ ॥ ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारितां कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ३ ॥

॥ २ ॥

---

१ पं. "चि" नाहीं—२ पं. वांचवितं—३ दे. कोसरा.—४ दे. त. वेथा.—५ पं. मावें.—६ पं. "च" नाहीं.—७ पं. वोहळ. दे. वोहळा त. वोहोळा.—८ पं. मिळोनियां जाल्या गंगा—९ पं. तरुवर.—१० पं. जवळा. दे. जला.—११ पं. तळील.

२०५४. वेद जया गाती । आह्मां तयाची संगति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांटविला पोटीं ॥ ध्रु० ॥ ॐकाराचें बीज । हातीं आह्मुचे तें निज ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु मोटें । [1]अणुरणियां धाकुटें ॥ ३ ॥

२०५५. तूं[2] श्रीयेचा पति । माझी बहु हीन[3] याती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥ ध्रु० ॥ [4]माझ्या दीनपणा पार । नाहीं बहु तूं उदार ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥ ३ ॥

२०५६. मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ म्या तों पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥ ध्रु० ॥ आह्मी घ्यावें नाम । तुह्मां समाधान काम ॥ २ ॥ तुका ह्मणे देवराजा । वाद खंडीं तुझा माझा ॥ ३ ॥

२०५७. तुझे पोटीं वांव[5] । व्हावा ऐसा माझा भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं वासनेसारिखें । प्राण फुटे येणें दुःखें ॥ ध्रु० ॥ अहंकार खोटे । वाटे [6]श्वापदांचे थाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे आई । हातीं धरूनि संग देईं ॥ ३ ॥

२०५८. दारीं परोवरी । [7]कुंडीं कवाडीं मी घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघे ठायीं नारायणा ॥ ध्रु० ॥ नेदीं खाऊं जेवूं । हातींतोंडींचें हीं घेऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं । जडलों ठायींचा सलगी ॥ ३ ॥

२०५९. मज कोणी कांहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ व्याला वाढविलें ह्मूण । मज सुख तुज सीण ॥ ध्रु० ॥ माझें पोट धालें । तुझे अंगीं उमटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे खेळें । तेथें[8] तुमाचिया बळें ॥ ३ ॥

२०६०. जोडोनियां कर । उभा राहिलों समोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि माझें भांडवल । जाणे कारण विठ्ठल ॥ ध्रु० ॥ भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ॥ २ ॥ तुका ह्मणे डोई । ठेवीं वेळोवेळां पायीं ॥ ३ ॥

२०६१. आह्मी घ्यावें तुझें नाम । तुह्मी आह्मां द्यावें प्रेम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ ध्रु० ॥ माझी डोई पायांवरी । तुह्मी न धरावी दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ३ ॥

२०६२. वारिलें लिगाड । वहुदिसांचें हें जाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न वोलावें ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥ ध्रु० ॥ जाला चौघांचार । गेला खंडोनि वेव्हार ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥ ३ ॥

---

१ पं. आणुरेणुया.–२ पं. तुह्मी तरी हो श्रीपति. । दे. मूळातल्याप्रमाणच होतें तें मागून पं. प्रतीप्रमाणें केलें आहे.–३ पं. दीन –४ पं. माझा दीनपणा फार ।.–५ दे. ठाव –६ दे. श्वापदाचीं थाटें. पं. श्वापदाची थाटे.–७ पं. कुटि.–८ पं. येथें –९ पं. असों –१० पं. धरावे.

२०६३. पायरवे अन्न । मग करी [1]क्षीदेक्षीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे होती घातपात । लाभे विण संगें थीत ॥ ध्रु ॥ जन्माची जोडी । वाताहात एके घडी ॥ २ ॥ तुका ह्मणे शंका । हित आड या लौकिका ॥ ३ ॥

२०६४. आह्मां वैष्णवांचा । नेम काया मनें वाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीर धरूं जिवासाटीं । येऊं नेदूं लाभा तुटी ॥ ध्रु ॥ उचित समय । लाज निवारावें भय ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । जाणों नेम नाहीं बाळा ॥ ३ ॥

२०६५. उलंघिली लाज । तेणें साधियेलें काज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें नाचे पैलतीरीं । गेलों भवाचे सागरीं ॥ ध्रु ॥ नामाची सांगडी । [2]सुखें बांधली आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे लोकां । उरली वाचा मारीं हाका ॥ ३ ॥

२०६६. बैसलोंसें दारीं । धरणें कोंडोनि भिकारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कोठें हालों नेदीं । बरी सांपडली [3]संदी ॥ ध्रु ॥ किती वेरझारा । मागें घातलिया घरा ॥ २ ॥ माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥ ३ ॥ भांडावें तें किती । बहु सोसिली फजिती ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥ ५ ॥

२०६७. जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं लागों दिलें अंगा । आड ठाकलों मी जगा ॥ ध्रु ॥ करूनियां नीती । दिल्याप्रमाणें चालती ॥ २ ॥ हातीं दंड काठी । उभा जिवाचिये साटीं ॥ ३ ॥ बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥ ४ ॥ तुका ह्मणे खरा । आतां घेईन मुशारा ॥ ५ ॥

२०६८. फळाची तों पोटीं । घडे वियोगें ही भेटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावें चिंतन । सार तें चि आठवण ॥ ध्रु ॥ चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥ ३ ॥

॥ १५ ॥

२०६९. दुर्बळाचें कोण । ऐके घालूनियां मन । राहिलें कारण । तयावांचूनि काय तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें । [4]नें संगतां ठावें । पडे चर्या देखोनि ॥ ध्रु ॥ काम क्रोध माझा देहीं । भेदाभेद गेले नाहीं । होतें तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥ २ ॥ हें तों नव्हे उचित । नुपेक्षावें शरणागत । तुका ह्मणे रीत । तुमची आह्मां न कळे ॥ ३ ॥

२०७०. आह्मी भाव जाणों देवा । न कळती तुझिया मावा । [5]गौणिकेचा कुढावा । पतना न्यावा दशरथ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी म्यां काय गा करावें ।

---

१ त. क्षदक्षण.–२ त. सुखीं.–३ पं. संधी.–४ पं. नसतां हें ठावें ।.–५ पं. गणिकेचा करिशी कुडावा ।.

कोण्या रीती तुज पावें । न संगतां ठावें । तुह्मांविण न पडे ॥ ध्रु ॥ दोनी[1] फाकलिया वाटा । गोवी केली[2] घटापटा । नव्हे धीर फांटा । आड रानें भरती ॥ २ ॥ तुका ह्मणे मांझे[3] डोळे । तुझे देखती हे चाळे । आतां येणें वेळे[4] । चरण जीवें न सोडीं ॥ ३ ॥

२०७१. वेरझारीं जाला सीण । बहु केलें खेदक्षीण[5] । भांडणासी दिन । आजी येथें फावला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय भीड भार । धरूनियां लोकाचार[6] । बुडवूनि वेव्हारें[7] । सरोबरी करावी ॥ ध्रु ॥ आलें बहुतांच्या मना । कां रे न होसी शाहाणा । मुळींच्या वचना । आह्मी जागों आपुल्या ॥ २ ॥ तुका ह्मणे चौघांमधीं । तुज नेलें होतें आधीं । आतां नाहीं मधीं[8] । उरी कांहीं राहिली ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

२०७२. कल्पतरूखालीं । फळें येती मागीतलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोलें ठाव ॥ ध्रु ॥ द्यावें तें उत्तर । येतो प्रतित्याचा[9] फेर ॥ २ ॥ तुका ह्मणे मनीं । आपुल्या च लाभहानि ॥ ३ ॥

२०७३. रंगलें या रंगें पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें[10] कैसे शोभा देती ॥ ध्रु ॥ पवित्र जालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळी[11] आडवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥ ३ ॥

२०७४. जगा काळ खाय । आह्मी माथां दिले पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंगें[12] करी साहे ॥ ध्रु ॥ हरिच्या गुणें धाला । होता खात चि भुकेला ॥ २ ॥ तुका ह्मणे हळु । जाला कढत शीतळु ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

२०७५. ब्रह्मरस घेई काढा । जेणें[13] पीडा वारेल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पथ्य नाम विठोबाचें । अणीक वाचे न सेवीं ॥ ध्रु ॥ भवरोगाऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे बाधा । अणीक[14] कदा भूतांची ॥ ३ ॥

२०७६. अंगें अनुभव जाला मज । संतरजचरणांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखी जालों या सेवनें । दुःख नेणें यावरी ॥ ध्रु ॥ निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥ २ ॥ तुका ह्मणे भोंवसार[15] । करूनि फार मिश्रित ॥ ३ ॥

---

१ पं. दोही.–२ दे. केला.–३ पं. "माझे" नाहीं.–४ पं. काळें. त. वळें –५ दे. क्षीदक्षीण. त. क्षेदक्षीण –६ दे. त. लोकचार –७ पं. व्यवहार.–८ दे. त. आतां नामधीं । –९ पं. प्रीतीचा चि. त. प्रतीत्याचाची.–१० पं. अंगसग.–११ दे. त. मला.–१२ त. वेगें –१३ पं. तेणें.– १४ पं. आणि कदा०.–१५ पं. भवसार.

२०७७. वैद्य एक पंढरिराव । अंतर्भाव तो जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रोगाऐसा द्याव्या वल्ली । जाणे जाली बाधा ते ॥ छ्र ॥ नेदी रुका वेचों मोल । पोहे बोल प्रीतीचे ॥ २ ॥ तुका ह्मणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥ ३ ॥

२०७८. करितां कोणाचें ही काज । नाहीं लाज देवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥ छ्र ॥ करुनि अराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥ २ ॥ बोले-तैसी करणी करी । तुका ह्मणे एक हरि ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२०७९. उभें चंद्रभागे तीरीं । कट धरोनियां करीं । पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा । संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥ छ्र ॥ रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे । मस्तक नावडे । उठों पायांवरोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम । हरी भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥ ३ ॥

२०८०. आह्मां हें चि भांडवल । ह्मणों विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें तरों भवनदी । संगें वैष्णवांची मांदी ॥ छ्र ॥ बाखराचें वाण । सांडूं हें जेवूं जेवण ॥ २ ॥ न लगे वारंवार । तुका ह्मणे वेरझार ॥ ३ ॥

२०८१. आतां माझ्या भावा । अंतराय नको देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥ छ्र ॥ दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे । नको फुटों देऊं फांटे ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२०८२. काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं [१]धुनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करी अक्षरांची आटी । एके कवडी च साटीं ॥ छ्र ॥ निंदी कोणां स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥ ३ ॥

२०८३. मागणें तें मागों देवा । करूं भक्ती त्याची सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय उणें तयापाशीं । रिद्धिसिद्धी [४]ज्याच्या दासी ॥ छ्र ॥ कायावाचामन । करूं देवों हें अर्पण ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभर । [६]ज्याच्यानें हें चराचर ॥ ३ ॥

२०८४. चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असे भक्तांचिये घरीं । काम न सांगतां करी ॥ छ्र ॥ अनाथाचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ३ ॥

---

१ पं. धुतों.–२ दे. सग.–३ पं. धुगे –४ पं. त्याच्या.–५ पं. देवाशीअर्पण.–६ पं. त्याच्यानें.– ७ दे. संगतां.–८ पं. अंगीं असे.

२०८५. कर्कशसंगति । दुःख उदंड फजिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं इह ना परलोक । मजुर दिसे[1] जैसें रंक ॥ ध्रु. ॥ वचन सेंटांवरी[2] । त्याचें ठेवूनि धिकारी[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं बेडी । पडिली कपाळीं कुऱ्हाडी ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२०८६. बीज पेरे[4] सेतीं । मग गाडेवरी वाहाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांयां गेलें ऐसें दिसे । लाभ त्याचे अंगीं वसे ॥ ध्रु. ॥ पाल्याची जतन । तरि प्रांतीं येती कण ॥ २ ॥ तुका ह्मणे आळा । उदक देतां लाभे फळा ॥ ३ ॥

२०८७. जाणावें तें सार । नाहीं तरी दगा फार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळे झांकिलिया रवि । नाहीं ऐसा होय जेवीं[5] ॥ ध्रु. ॥ बहुथोड्या आड । निवारितां लाभे जाड ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें । नेलें हातींचें अंधारें ॥ ३ ॥

२०८८. मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांयां जावें हें चि खरें । केलें तेणें चि प्रकारें ॥ ध्रु. ॥ अराणूक नाहीं कधीं । जाली तरि भेदबुद्धि ॥ २ ॥ अंतरली नाव । तुका ह्मणे नाहीं ठाव ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२०८९. संवसारसांते[6] आले हो आइका । तुटीचें तें नका केणें भरूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाभाचा हा काळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥ ध्रु. ॥ शृंगारिलें दिसे न कळे अंतर । गोविलें[7] पदर उगवेना ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटें गुंपतां विसारें । हातिंचिया खरें हातीं घ्यावें ॥ ३ ॥

२०९०. सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥ ध्रु. ॥ वेचल्याचा पाहे बरावरि झाडा । बळाचा निधडा पुढिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी दाखवावी वाणी । ते द्यावी भरोनी शेवट तों ॥ ३ ॥

२०९१. बुद्धिमंदा[8] शिरीं । भार फजिती पदरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाय तेथें अपमान । पावे हानि[9] थुंकी जन ॥ ध्रु. ॥ खरियाचा पाड । मागें लावावें लिगाड ॥ २ ॥ तुका ह्मणे करी । वर्म नेणें भरोवरी ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२०९२. पूर्वजांसी नर्का । जाणें तें एक आइका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निंदा करावी चाहाडी । मनीं धरूनि आवडी ॥ ध्रु. ॥ मात्रागमना ऐसी । जोडी पातकांची रासी ॥ २ ॥ तुका ह्मणे वाट । कुंभपाकाची ते नीट ॥ ३ ॥

---

१ त. जालें.—२ पं. सेटावारी.—३ दे. त. धीकारी. पं. धी कारी—४ पं. परी.—५ पं. जीवीं—६ पं. संसारसाते.—७ पं. गोविचा.—८ दे. बुद्धिमंद.—९ दे. त. पं. हाणी.

२०९३. देहीं[1] लावी वात । पालव घाली जाली रात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेडी[2] ते वेडी [3]बहुत च वेडी । चाखतां गोडी चवी नेणे ॥ ध्रु ॥ कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलुनि रडे धाये ॥ २ ॥ लेंकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ३ ॥ आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकांची ते जाणे काई ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसे जन । नर्का जातां राखे कोण ॥ ५ ॥

२०९४. आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ ध्रु ॥ ठायीं पडिलिया तें चि लागे खावें । ठायींचें चि घ्यावें विचारूनि ॥ २ ॥ बीज पेरूनियां तें चि घ्यावें फळ । डोरलीस केळें कैंचें लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा कांहीं बोल नाहीं । तुझा तूं चि पाहीं शत्रु सखा ॥ ४ ॥

२०९५. अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करावें तें मौन्य । दाही दिशा हिंडे मन ॥ ध्रु ॥ बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ २ ॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ३ ॥ सारविलें निकें । वरि माजी अवघें फिकें ॥ ४ ॥ तुका ह्मणे अंतीं । कांहीं न लगे चि हातीं ॥ ५ ॥

२०९६. लय लक्षूनियां जालों ह्मणती देव । तो ही नव्हे भाव सत्य जाणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों बहुश्रुत न लगे आतां कांहीं । नको राहूं ते ही निश्चितीनें ॥ ध्रु ॥ तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥ २ ॥ कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी होईल निष्काम । तरि च होय राम देखे डोळां ॥ ४ ॥
॥ ५ ॥[*]

२०९७. पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगे जिवलगे ॥ ध्रु ॥ अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥ २ ॥ तुका ह्मणे बोलवेना । लावीं स्तनां ईश्वरे ॥ ३ ॥

२०९८. जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां तूं चि बाह्यात्कारीं । अवघ्यापरी जालासी ॥ ध्रु ॥ नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वसांगे । पांडुरंगे दयाळे ॥ ३ ॥

---

१ दे. पं. "देहा लावी०" हें कडवें "वेडी ते वेडी०" या ध्रुवपदाच्या पुढें आहे.—२ दे. वेडीं तें वेडीं बहुत चि वेडीं ।—३ पं. वुडत.—४ पं. जया.—५ पं. केळें.—६ पं. वाणीर—७ त. कांहीं—८ दे. त. पं. विश्वरें—९ पं. सर्वसंगे. * दे. त. "४" हा अंक आहे, पण तो चुकून असावा.

२०९९. जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ ध्रु. ॥ अवघा च अवघे देसी । सुखरासी[2] संपन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२१००. नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां ॥ ध्रु. ॥ कोण्या काळें सुखा । ऐशीं[3] कोण पावता ॥ २ ॥ अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालें । भूमी वैकुंठ आणिलें ॥ ४ ॥

२१०१. अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीव देऊनियां बळी । अवघीं तारिलीं दुर्बळीं । केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥ ध्रु. ॥ कांहीं न मगे याची-गती । लुंटावितो जगा हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ॥ ३ ॥

२१०२. प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्तांचा अंकिला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतां ही भिये ॥ ध्रु. ॥ अवघा त्याचा होतें । जीव भाव ही सहित ॥ २ ॥ वदे उपचाराची वाणी । कांहीं माग ह्मणऊनि ॥ ३ ॥ उदासीनाच्या लागें । तुका ह्मणे धांवे मागें ॥ ४ ॥

२१०३. कांहीं न मागती देवा । त्यांची करूं धांवे सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हळहळ फेडी ऋण । होऊंनियां रूपें दीन ॥ ध्रु. ॥ होऊं न सके वेगळा । क्षण एक त्यां निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तिभाव । हीं चि देवाचा ही देव ॥ ३ ॥

२१०४. जाणे अंतरींचा भाव । तो चि करितो उपाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें । अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनि ॥ ध्रु. ॥ वांळा[12] न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी । एकीं लंघियेले[13] गिरी ॥ ३ ॥

२१०५. आह्मी नाचों तेणें सुखें । वाऊं टाळी गातों मुखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥ ध्रु. ॥ आह्मां जाला हा निर्धार । मागें तारिलें अपार ॥ २ ॥ तुका ह्मणे संतीं । वर्म दिलें आह्मां हातीं ॥ ३ ॥

---

१ पं. असें तया समाधानें.—२ दे. सुख घेवविसी संपन्य. । त. अवघ्याविसीं संपन्न ।.—३ पं. ऐसा — ४ त. मग.—५ त. लुटविती —६ पं. पार वर्णी.—७ पं. होय ।. जीवभावा सहित.—८ पं. उपचारवाणी — ९ पं. मगती.—१० पं. रूप धरोनियां दीना. ।—११ पं. तो.—१२ पं. वाळ.—१३ पं. लंघियेली.

२१०६. जालों निर्भर मानसीं । ह्मणऊनि कळलासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझे ह्मणविती त्यांस । भय चिंता नाहीं आस ॥ ध्रु ॥ चुकविसी पाश । गर्भवासयातना ॥ २ ॥ तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरियेलें नाम ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेणें[1] सुखें । विसरलों जन्मदुःखें ॥ ४ ॥

॥ ७ ॥

२१०७. नको दुष्टसंग । पडे भजनामधीं भंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥ ध्रु ॥ तुज निषेधितां । मज न सोहे सर्वथा ॥ २ ॥ एका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥ ३ ॥ तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्टजन ॥ ४ ॥ काय करूं एका । मुखें सांग ह्मणे तुका ॥ ५ ॥

२१०८. विठ्ठल माझी माय । आह्मां सुखा उणें काय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेतों अमृताची धनी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥ ध्रु ॥ क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंत । ठेवीं आह्मांपाशीं चित्त ॥ ३ ॥

२१०९. भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ ध्रु ॥ महा दोषां आला त्रास । जन्ममरणां केला नाश ॥ २ ॥ सहस्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ ३ ॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ॥ ५ ॥

॥ ३ ॥

२११०. पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥ ध्रु ॥ स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥ २ ॥ थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे सकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥ ४ ॥

२१११. कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नीचियेे कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ ध्रु ॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप झाला कुळीं वंशाचिये ॥ २ ॥ त्याची निंदा करी त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम ध्यावें ॥ ४ ॥

---

१ पं. "तेणें" नाहीं—२ दे. जन्मदुःख.—३ दे. दुष्टसंग. त. दुष्टसंग—४ पं. साहवे.—५ त. माझा.—६ त. सुखें—७ पं. जातां मरसी.—८ पं. उतरले अपार बहु देणें।.

२११२. टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जैयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गरुडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ छ ॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहूनि भद्रजाति ॥ २ ॥ तेणें सुखें सुटे पाषाणां पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोपें वैकुंठवासी जातां । रामकृष्ण कथा हे चि वाट ॥ ४ ॥

॥ ३ ॥

२११३. देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥ छ ॥ शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणां हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ३ ॥

२११४. भाग्यवंत ह्मणों तयां । शरण गेले पंढरिराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरले तरले हा भरवसा । नामधारकांचा ठसा ॥ छ ॥ भुक्तिमुक्तीचें तें स्थळ । भोळेभाविकां निर्मळ ॥ २ ॥ गाइलें पुराणीं । तुका ह्मणे वेदवाणी ॥ ३ ॥

२११५. जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर । असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥ छ ॥ अवघें जाणे सूत्रधारी । कोण नाचे कोणे परी ॥ २ ॥ तुका ह्मणे बुद्धि । ज्याची ते च तया सिद्धि ॥ ३ ॥

२११६. नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥ १ ॥ मुंगियांच्या मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥ २ ॥ तुका ह्मणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥ ३ ॥

२११७. तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तेये घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेले वान आवडीचे ॥ छ ॥ आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥ २ ॥ मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसज्जन भाग्याचें । अनंतां जन्मींचें सांटेकरी ॥ ४ ॥

२११८. दुःखाचिये साटीं तेथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदाराचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥ छ ॥

१ दे. त. जेजेकार.–२ त. दे. भाविकनिर्मळ.–३ पं. ज्याची तया ते चि सिद्धि ।.– ४ पं. मुंगीचिया.–५ पं. तया.–६ त. पं. पंढरीचोहटा.–७ त. पं. भरियेला.–८ पं. देता घेतां.– ९ पं. जन्माचे.

जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आळिंगी आवडी करूनियां ॥ २ ॥ शीण घेऊनियां प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभा कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे असों अनाथ दुबळीं । आह्मांसी तो पाळी पांडुरंग ॥ ४ ॥

२११९. आणिक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखा तें चि गोड श्रवणां[1] आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ॥ ६१ ॥ जये पदीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ॥ २ ॥ आणिकाचें मज ह्मणवितां लाज । वाटे हें सहज न बोलैवें[2] ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज तूं च आवडसी । सर्वभावेंविसीं[3] पांडुरंगा ॥ ४ ॥

२१२०. कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनासवें काज कैाय[4] माझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीन मी स्तुती आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥ ६१ ॥ होऊनी निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥ २ ॥ काय करूं कळा युक्ती या कुसरी । जाणिवेच्या परी संकळिका[5] ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ४ ॥

२१२१. तयासी नेणतीं बहु आवडती । होय जयां चित्तीं एक भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उपमन्यु धुरु हे[6] काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥ ६१ ॥ कोळी[7] भिल्ल पशु श्वापदें अपारें[8] । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ २ ॥ कैाय तीं गोपाळें[9] चांगलीं शाहाणीं । तयां चक्रपाणी जेवी सवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळा भाविक हा देव । आह्मी त्याचे पाव धरुनी ठेलों ॥ ४ ॥

२१२२. न लगे पाहावें अवद्य वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेंहीं[10] वेळ नाहीं पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ ६१ ॥ पुराणीं[11] ही कोठें न मिळे पाहातां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ॥ २ ॥ आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथाकाळीं[12] ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी आनंदें चि धालों । आनंद चि ल्यालों अळंकार ॥ ४ ॥

२१२३. दैन्य दुःख आह्मां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व सुखें येती मानें लोटांगणीं । कोण यांसी आणी दृष्टीपुढें ॥ ६१ ॥

---

१ पं. श्रवणीं.–२ पं. बोलवे.–३ दे. त. सर्वभावेंविसीं.–४ पं. नाहीं.–५ पं. सकळिक.–६ दे. त. हें.–७ दे. कोळ भिल्ल त. काळे भिल्ल.–८ पं. अपार.–९ दे. काय तें गोपाळ॰. पं. काय ते गोपाळ॰.–१० त. नेणों वेळा नाहीं॰. पं. नाहीं वेळकाळ पंडितांचा॰.–११ दे. 'पं. वेदीं जें प्रतिपाद्य न कळे पाहातां' हें दे. मागून केलें आहे. पूर्वी मूळांतल्याप्रमाणेंच होतें.–१२ दे. कथेकाळीं.

आह्मुची आवडी संतसमागम । आणीक त्या नाम विठोबाचें ॥ २ ॥ आमचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्दैवा कोणा चाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोटीं सांटविला देव । [1]न्यून तो हा भाव कोण आह्मां ॥ ४ ॥

२१२४. काळतोंडा सुना । भलतें चोरुनि करी जना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळुनि वर्ते मन ॥ छ्र ॥ मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे थीत । नागवला नव्हे हित ॥ ३ ॥

२१२५. विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज न साहावें कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥ छ्र ॥ हरीकथेतें [2]धिक्कोरी । शत्रु माझा तो वैरी ॥ २ ॥ सुना काळतोंडा । जो या देवा ह्मणे धोंडा ॥ ३ ॥ अहं ह्मणे ब्रह्म । नेणे [3]भक्तीचें तें वर्म ॥ ४ ॥ तुका ह्मणे क्षण । [4]नको तयाचें दर्षण ॥ ५ ॥

२१२६. यमपुरी त्यांणीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधी केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥ छ्र ॥ काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥ २ ॥ द्रव्य दारा कोणें स्थापियेलें धन । पिंडाचें पाळण विषयभोग ॥ ३ ॥ तुका ह्मणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूतजना हातीं ॥ ४ ॥

२१२७. न कळतां कोणीं मोडियेलें व्रत । तया प्रायश्चित्त चाले कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणतियां वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ॥ छ्र ॥ आतां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तें चि पाप ॥ २ ॥ काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जना पाहा विचारूनी । सुख वाटे मनीं तें चि करा ॥ ४ ॥

२१२८. वाचे विठ्ठल नाहीं । तो चि प्रेतरूप पाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥ छ्र ॥ न वैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥ २ ॥ जातां कांटाळे [5]देउळीं । तो चि सुना मुखकाळा ॥ ३ ॥ हरिभक्तीविण । [6]त्याचें जळो ब्राह्मणपण ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥ ५ ॥

२१२९. [7]तारिलीं [8]बहुतें चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाटीं ॥ छ्र ॥ जन्म

---

१ त. नुन्य तो हा भाव. पं. नुन्य तो ही भाव. दे. नुन्य तो भाव.–२ दे. त. धीकारी. पं. धीःकारी.–३ पं. भक्तिभाव वर्म.–४ त. तयाचें कोण दर्षण ।.–५ पं. राउळा.–६ पं. जळे त्याचें.–७ पं. वारिलीं.–८ "बहुत" हें यमकास जुळतें ; पण कोणत्याही प्रतींत तसें आढळत नाहीं.

नांवें धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा या च साटीं ॥ २ ॥ असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देव भक्तपण सार । कैवतुकवेव्हार तयासाटीं ॥ ४ ॥

२१३०. याचिया आधारें राहिलों निश्चिंत । ठेवूनियां चित्त पायीं सुखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें सुखदुःख जाणे हित फार । घातलासे भार पांडुरंगा ॥ ध्रु ॥ कृपेचीं पोसणीं ठायींचीं अंखिलीं । ह्मणऊनि लागली यास चिंता ॥ २ ॥ मन राखे हातीं घेऊनियां काठी । इंद्रियें तांपटीं फांकों नेदी ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी अवघड नाहीं । शरणागता कांहीं रक्षावया ॥ ४ ॥

२१३१. उभाउभी फळ । अंगीं मंत्राचे या बळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥ ध्रु ॥ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे रोग । वारे भवाऐसा भोग ॥ ३ ॥

२१३२. जैसों अधिकार । तैसें बोलावें उत्तर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय वाउगी घसघस । आह्मी विठोबाचे दास ॥ ध्रु ॥ आह्मी जाणों एका देवा । जैसी तैसी करूं सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । माझें पुढें पडेल ठावें ॥ ३ ॥

२१३३. न वजतां घरा । आह्मी कोणाच्या दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां हे छळूं येती लोक । दाट बळें चि कंटक ॥ ध्रु ॥ नाहीं आह्मी खात । कांहीं कोणाचें लागत ॥ २ ॥ कळे तैसी सेवा । तुका ह्मणे करूं देवा ॥ ३ ॥

२१३४. मोहरोनी चित्ता । आणूं हळू चि वरि हिता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ॥ ध्रु ॥ संवसारा भेणें । कांहीं उसंती तों पेणें ॥ २ ॥ एखादिया भावें । तुका ह्मणे जवळी यावें ॥ ३ ॥

२१३५. काय जाणों वेद । आह्मी आगमाचे भेद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक रूप तुझें मनीं । धरूनि राहिलों चिंतनीं ॥ ध्रु ॥ कोठें अधिकार । नाहीं रानट विचार ॥ २ ॥ तुका ह्मणे दीना । नुपेक्षावें नारायणा ॥ ३ ॥

२१३६. धर्माचें पाळण । करणें पाषांड खंडण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि आह्मां करणें काम । बीज वाढवावें नाम ।. ध्रु ॥ तीक्षण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरें ॥ २ ॥ नाहीं भीड भार । तुका ह्मणे साना थोर ॥ ३ ॥

---

१ पं. नाम.–२ पं. कौतुकें वेव्हार.–३ पं. यापटीं.–४ पं. क्दा.–५ पं. पाहोनिया दे. मागून 'जैसा' खोडून 'पाहोनी' केलें आहे.–६ दे. त. पं. वजावां.–७ पं. आगमींचे.–८ पं. पापाटा.–९ पं. उत्तर.

२१३७. निवडावे खडे । तरी दळणे वोजें घडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरि नासोनि जाय । कारण आळस उरे हाय ॥ छ्र ॥ निवडावें तन । सेतीं करावें राखण ॥ २ ॥ तुका ह्मणे नीत । न विचारितां नव्हे हित ॥ ३ ॥

२१३८. दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लात हाणोनियां वारी । गुंड वाट शुद्ध करी ॥ छ्र ॥ बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नरवें । काढुनि टाकिजेती सुखें ॥ ३ ॥

२१३९. नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें बहुतांचें हित । शुद्ध करोनि राखा चित्त ॥ छ्र ॥ नाहीं केली निंदा । आह्मीं दूषिलेंसे भेदा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज । ग्रेणें विण काय काज ॥ ३ ॥

२१४०. कांहीं जडभारी । पडतां ते अवसरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज आठवावे पाय । आह्मीं मोकलूनि धाय ॥ छ्र ॥ तान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ॥ २ ॥ तुका ह्मणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ३ ॥

२१४१. होउनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं चि चालविसी माझें । भार सकळ ही ओझें ॥ छ्र ॥ देह तुझ्या पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥ २ ॥ कायावाचामनें । तुका ह्मणे दुजें नेणें ॥ ३ ॥

२१४२. आतां होईं माझे बुद्धीचा जानिता । अवरावें चित्ता पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येयूनियां कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥ छ्र ॥ अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलवें वाचे ऐसें करीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हित कोणिये जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥ ३ ॥

२१४३. नित्यें या मनासी करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां ॥ छ्र ॥ सांपडलों गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों अज्ञान चि आहें । परि तुझी पाहें वास देवा ॥ ३ ॥

२१४४. दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी परी मज झाली नारायणा । योगक्षेम जाणां तुह्मी आतां ॥ छ्र ॥ खातां लेतां नये भिरवितां वरि । राजा दंड करी जनराग ॥ २ ॥ तुका ह्मणे मग तळमळ उरे । देखिलें तें झुरे पाहावया ॥ ३ ॥

१ पं. दळणा वोज घडे ।—२ दे. त. पं. दुमिलेंसे.—३ दे. त. अवश्वरी.—४ पं. सत्य मनासी. दे. नित्य मनासी.—५ पं. "हे" नाहीं —६ त. सापडला.—७ पं. जनाराग.

२१४५. मागें जैसा होता माझे अंगीं भाव । तैसा एक ठाव नाहीं आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें गोही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेंसी दिसे पुढें ॥ ध्रु ॥ पुढिलांचे मना आणि गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली कोंबड्याची परी । पुढें चि उकरी लाभ नेणें ॥ ३ ॥

२१४६. किती तुजपाशीं देऊं पेरिहार[1] । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझें मेंाझे हातीं देईं हित[2] । करीं माझें चित्त समाधान ॥ ध्रु ॥ राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥ ३ ॥

२१४७. लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चुकलिया काम मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥ ध्रु ॥ पाय सोडूनियाँ[3] फिरतों बासर । स्वामिसेवे चोर होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजे ॥ ३ ॥

२१४८. पुढिलिया सुखें निंब देतां भले । बहुत[4] वारलें होय दुःख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों वर्म असे माउलीचे हातीं । हाणी मारी भीती हितासाठीं ॥ ध्रु ॥ खेळतां विसरे भूक तान घर । धरूनियां कर आणी बैळें ॥ २ ॥ तुका ह्मणे पोंळी[5] तोंडींचिया घांसें । उदार सर्वस्वें सर्वकाळ ॥ ३ ॥

२१४९. आतां गुण दोष काय विचारिसी । मी तों आहे रासी पातकांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पतितपावनासवें समागम । अपुलाला धर्म चालवीजे ॥ ध्रु ॥ धनघायें[6] भेटी लोखंडपरिसा । तरी अनारिसा न पालटे ॥ २ ॥ तुका ह्मणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ॥ ३ ॥

२१५०. कृपावंता दुजें नाहीं तुह्मां पोटीं । लाडें बोलें गोटी[7] सुख मातें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेउनि भातुकें लागसील पाठी । लाविसील ओंठीं ब्रह्मरस ॥ ध्रु ॥ आपुलिये पांख घालिसी पाखर । उदार मजवर कृपाळू तूं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मांकारणें गोविंदा । वागविसी गेदा[8] सुदर्शन ॥ ३ ॥

२१५१. पाळिलों पोसिलों जन्मजन्मांतरीं । वागविलों करीं धरोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें वहु दूर वागविलें ॥ ध्रु ॥ नेदीं वारा[9] अंगीं लागों आघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल करितों आवडी । अविट ते चिं[10] गोडी अंतरींची ॥ ३ ॥

१ पं. परिहर.–२ पं. आतां माझे हातीं देईं माझें हित.–३ दे. साडूनिया.–४ पं. बट–५ पं. पोळी.–६ पं. पगें पायी भेटी लोखंडा परीसा ।.–७ पं. गोटी.–८ पं. कदा.–९ पं. अंगीं वारा–१० पं. "चि" नाहीं

२१५२. पांडुरंगा कांहीं आइकावी मात । न करावें मुक्त आतां मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जन्मांतरें मज ऐसीं[1] देईं देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ॥ छ ॥ वाखाणीन कीर्ती आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ॥ २ ॥ करूनि कामारी दास दीनाहुनी । आपुला अंगणीं ठाव मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी मृत्युलोकीं भले । तुझे चि अंकिले पांडुरंगा ॥ ४ ॥

२१५३. माझे अंतरींचें तो चि जाणे एक । वैकुंठनायक पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीव भाव त्याचे ठेवियेला पायीं । मज चिंता नाहीं कवणेविशीं ॥ छ ॥ सुखसमारंभें संतसमागमें । गाऊं वाचे नाम विठोबाचें ॥ २ ॥ गातां पुण्य होय आइकतां लाभ । संसारबंद तुटतील ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव तयासी विकिला । आणीक विठ्ठलाविण नेणें ॥ ४ ॥

२१५४. कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा यों चि वरी विठोबाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कथा पाप नासी उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥ छ ॥ कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हे पान हरिकथा ॥ २ ॥ कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथोंकाळीं कांप कळिकाळासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कथा देवाचें हीं[6] ध्यान । समाधि लागोन उभा तेथें[7] ॥ ४ ॥

॥ १३ ॥

२१५५. काय ऐसा सांगा । धर्म मज पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझे पायीं पावें ऐसा । जेणें उगवे हा फांसा ॥ छ ॥ करीं कृपादान । तैसें बोलवीं वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझें हृदय वसवा ॥ ३ ॥

२१५६. भला ह्मणे जन । परि नाहीं समाधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥ छ ॥ कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला भार ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपे । अंतराय कोण्या पापें ॥ ३ ॥

२१५७. शिकविले बोल । बोलें तैसी नाहीं ओल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां देवा संदेह नाहीं । वांयां गेलों यासी कांहीं ॥ छ ॥ एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ॥ २ ॥ बुद्धि नाहीं स्थिर । तुका ह्मणे शब्दा धीर ॥ ३ ॥

२१५८. उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे न घालिसी धांव । तुझें उच्चारितां नांव ॥ छ ॥ काय बळयुक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं विश्वंभर । ओस माझें कां अंतर ॥ ३ ॥

---

१ दे. तैसीं.–२ पं. आपलें.–३ दे. त. अखिले.–४ दे. त. याची.–५ पं. कळि कांपे कळिकाळासी.–६ पं. हें.–७ पं कथे.–८ पं. फार.–९ त. पं. रूपें.–१० पं. शिकलों ते बोल। बोल तैसी.०–११ पं. उच्चारितों.

२१५९. वोहावतों[1] पुरीं । आतां उचित तें करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी शक्ति नारायणा । कींव भाकावी करुणा ॥ ध्रु ॥ आह्मां ओढी काळ । तुझें क्षीण झालें दळ ॥ २ ॥ तुका ह्मणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥ ३ ॥

२१६०. आतां घेईं माझें । भार सकळ हीं ओझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करिसी होई वाड । आलों पोटासीं दगड ॥ ध्रु ॥ तूं चि डोळे वाती । होईं दीपक सांगातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । विचाराया चाड नाहीं ॥ ३ ॥

२१६१. असोत हे बोल । अवघें तूं चि भांडवल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा मायबाप देवा । सज्जन सोयरा केशवा ॥ ध्रु ॥ गाळियेले[2] भेद । सारियेले वादावाद ॥ २ ॥ तुका ह्मणे मधीं । आतां न पडे उपाधि ॥ ३ ॥

२१६२. करीन कोल्हाळ । आतां हा चि सर्वकाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां ये वो माझे आई । देईं भातुकें विठाई ॥ ध्रु ॥ उपायासी नाम । दिलें याचें पुढें क्षेम ॥ २ ॥ बीज आणि फळ । हें चि तुका ह्मणे मूळ ॥ ३ ॥

२१६३. धनासीं च धन । करी आपण[3] जतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज आळवितां गोडी । पांडुरंगा खरी जोडी ॥ ध्रु ॥ जेविल्याचें खरें । वरी उमटे ढेकरें ॥ २ ॥ तुका ह्मणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥ ३ ॥

२१६४. अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असे जवळी अंतरें[4] । फिरे आवडीच्या फेरें ॥ ध्रु ॥ खादलें चि वाटे । खावें भेटलें चि भेटे ॥ २ ॥ तुका ह्मणे उभें । आह्मी राखियेलें लोभें ॥ ३ ॥

॥ १० ॥

२१६५. पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें मज कांगा केलें पंढरिराया । लौकिक हा वांयां[5] वाढविला ॥ ध्रु ॥ ज्वरिलियापुढें वाढिलीं[6] मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची[7] ॥ २ ॥ तुका ह्मणे मढें शृंगारिलें वरी । ते चि जाली परी मज देवा ॥ ३ ॥

२१६६. वेगडाचा रंग राहे कोण काळ । अंगें[8] हें पितळ न देखतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें चित्त मज जवळीच गोही[9] । तुझी मज नाहीं भेटी ऐसें ॥ ध्रु ॥ दासीसुतां नाहीं पितियाचा ठाव । अवघें चि वाव सोंग त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येईल कळों ॥ ३ ॥

---

१ दे. वाहावेतों.–२ पं गाळियेला.–३ पं. आपणा.–४ दे. त. अंतर.–५ त. व्हावया वाढविला.–६ पं. वाढिलें मिष्टान्न–७ दे. त. पं. स्याची.–८ त. आग.–९ त. ग्वाही. दे 'गो ही' याचें 'गोही' केलें आहे.

२१६७. मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याचा कांहीं तुह्मीं देखावो[1] परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ ध्रु ॥ [2]कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें ॥ ३ ॥

२१६८. [3]सावित्रीचें विटंबण । रांडपण करीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ॥ ध्रु ॥ [4]कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहें फाजिती ॥ २ ॥ तुका ह्मणे ठुणगुण देखें[5] । [6]उगीं मूर्ख फुंदतां ॥ ३ ॥

२१६९. न [7]गमेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी नो[8] बोलावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रुचिविण काय शब्द वाऱ्या माप । [9]अनादरें कोप येत असे ॥ ध्रु ॥ आपुलिया रडे आपुलें चि मन । दाटे समाधान पावतसें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी असा जी जाणते । काय करूं रिते वादावाद ॥ ३ ॥

२१७०. मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध[10] । आरालिया [11]बद्धे ठेवा आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ ध्रु ॥ गाणें गीत आह्मां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥ २ ॥ तुका ह्मणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत [12]सांनुकूळ ॥ ३ ॥

२१७१. एकाएकीं आतां असावेंसें वाटे । तरि च हे खोटे चाळे केले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाजवूनि तोंड [13]घातलों बाहेरी । [14]कुलूप करुनी दारीं माजी वसा ॥ ध्रु ॥ उजेडाचा केला दाटोनि अंधार । सर्वे हुद्देदार चेष्टाविलों[15] ॥ २ ॥ तुका ह्मणे भय होतें तों चि वरी । होती कांहीं उरी स्वामिसेवा ॥ ३ ॥

२१७२. काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुंग्या कैंचे[16] मुंगळे । नटनाट्य तुझे चाळे ॥ ध्रु ॥ जाली तरी मर्यादा । किंवा न्यासावें गोविंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे साचा । कोठें जासी हृदयींचा ॥ ३ ॥

२१७३. कां जी वाढविलें । न लगतां हें उगलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां मानितां कांटाळा । भोंवतीं मिळालिया बाळा ॥ ध्रु ॥ लावूनियां [17]सेवे । पळतां दिसाल वरवे ॥ २ ॥ तुका ह्मणे बापा । येतां न कळा चि रूपा ॥ ३ ॥

॥ ३ ॥

---

१ दे. त. देखा.—२ दे. त. काम क्रोध —३ दे. त. सावित्रीची.—४ दे. त. कुबिर.—५ पं. ठुणगुण देख.—६ पं. उगेच. त. उगी मुख.—७ दे. नमगेसी.—८ पं. न.—९ पं. आदरें —१० दे. त. संसारसबंधें.—११ दे. बधें —१२ दे. त पं. सानकुळ —१३ पं. घातले.—१४ पं. कल्पें.—१५ पं. चेष्टविला.—१६ पं कैंचे ते मुंगळे.—१७ पं सेव.

२१७४. क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न[1] विचारून ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धर्म आहे वर्मा अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥ छ ॥ द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म सोधण्या ॥ २ ॥ तुका ह्मणे पुण्य गांठी । तरि च उचितांसी[2] भेटी ॥ ३ ॥

२१७५. वेचावें तें जीवें । पूजा घडे ऐशा नावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विगारीची ते विगारी । सांक्षी[3] अंतरींचा हरी ॥ छ ॥ फळ बीजाऐसें । कार्यकारणांसरिसें[4] ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । लवणासारिखें लवण ॥ ३ ॥

२१७६. मज नाहीं धीर । तुह्मी न करा अंगीकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें पडिलें विषम । बळी देवाहूनि कर्म ॥ छ ॥ चालों नेणें वाट । केल्या न पवे[5] बोभाट ॥ २ ॥ वेचों नेणे जीवें । तुका उदास धरिला देवें ॥ ३ ॥

२१७७. तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वचनीं च संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥ छ ॥ वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव । न पवे चि जीव समाधान ॥ २ ॥ तुका ह्मणे कई देसील विसांवा । पांडुरंगे धांवा घेतें मन ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२१७८. हागतां ही खोडी । चंळण[6] मोडवितें काडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे अनावर गुण । आवरावे काय ह्मूण[7] ॥ छ ॥ नाहीं जरी संग । तरी वडवडविती रंग ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुमची न घडे चि सेवा ॥ ३ ॥

॥ १ ॥

२१७९. देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येर वाचेचें वाग्जाळ । अळंकारापुरते बोल ॥ छ ॥ काचें तरी कढे । जाती ऐसें चित्त ओढे ॥ २ ॥ विष्णुदास तुका । पूर्ण धनी जाणे चुका ॥ ३ ॥

२१८०. खोट्याचा विकरा । येथें नव्हे कांच हिरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय दावायाचें काम । उगा च वाढवावा श्रम ॥ छ ॥ परीक्षकाविण । मिरवों जाणां[8] तें तें हीण ॥ २ ॥ तुका पायां पडे । वाद पुरे हे झगडे ॥ ३ ॥

॥ २ ॥

२१८१. पंढरीस घडे अतित्यायें[9] मृत्य । तो जाय पतित अधःपाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुरांचारें[10] मोक्ष सुखाचे वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥ छ ॥ केला न सेहावे[11] तीर्थउपवास । कथेविण दोषसाधन तें ॥ २ ॥ कालियापें भेद

१ पं. "न" नाहीं.—२ पं. उचिताची.—३ पं. साक्ष.—४ पं. "सरिसें" याबद्दल "सारिखें".—५ दे. त. पवा.—६ पं. चरण.—७ पं. ह्मण.—८ पं. जाणे.—९ पं. अतित्याई.—१० पं. दुराचाऱ्या मोक्षसुखाची वसति.—११ त. साहे.

मानितां निवडे[1] । श्रोत्रियांसी जोडे अंत्यजतां[2] ॥ ३ ॥ माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी । काळिमा काजळी पावविते ॥ ४ ॥ तुका ह्मणे [3]तेथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान सम पाय ॥ ५ ॥ ॥ १ ॥

२१८२. चातुर्याच्या अनंतकळा । [4]सत्या विरळा [5]जाणता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ॥ ध्रु. ॥ जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ॥ २ ॥ तुका ह्मणे अंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुक ॥ ३ ॥

२१८३. नयो वाचे अनुचित वाणी । नसो मनीं कुडी बुद्धि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें मागा अरे जना । नारायणा विनवूनि ॥ ध्रु. ॥ कामक्रोधां पडो चिरा । ऐसा वरा सायास ॥ २ ॥ तुका ह्मणे नानाछंदें । या विनोदें न पडावें ॥ ३ ॥

२१८४. माझिया देहाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इच्छितां ते मान मागा देवापासीं । [6]असा संचितासी गुंपले[7] हो ॥ ध्रु. ॥ देह आह्मी केला भोगाचे सांभाळीं । राहिलों निराळीं [8]मानामानां ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणें[9] वेचावें वचन । [10]नसतां तो सीण वाढवावा ॥ ३ ॥

२१८५. धरितां इच्छा दुरी पळे । पाठी सोहळे उदासा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि असट मन । नका खुण सांगतों ॥ ध्रु. ॥ [11]आमिषापाशीं अवघें वर्म । सोस श्रम पाववी ॥ २ ॥ तुका ह्मणे बीज न्यावें । तेथें यावें फळानें ॥ ३ ॥ ॥ ४ ॥

२१८६. वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन [12]नावलोका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तार्किंयाचें अंग आपणा पारिखें । माजिऱ्यासारिखें [13]वांईचाळे ॥ ध्रु. ॥ माता निंदी तया कोण तो आधार । भंगलें खापर [14]यांचे नावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आडराणें ज्याची चाली । तयाची ते वोली मिठेंविण ॥ ३ ॥

२१८७. कस्तुरीचे अंगीं मीनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयापरि भेद नाहीं देवभक्तीं । संदेहाच्या युक्ति सरों द्याव्या ॥ ध्रु. ॥ इंधनें[15] तें आगी संयोगाच्या गुणें । सागरा [16]दरुषणें वाहाळ तों चि ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें साक्षीचें वचन । येथें तों कारण शुद्ध भाव ॥ ३ ॥

---

१ पं. निवाडे.–२ दे. आंतेजेता.–३ पं. येथें. –४ पं. सत्य.–५ दे. त. जाणत. पं. तया–६ दे. आसा.–७ पं. गुंफले.–८ पं. मानामान.–९ पं. नलगे.–१० त. पं. नसता.–११ दे. त. पं. आविसापासीं.–१२ पं. नावलोकावें.–१३ त. वाईचळ.–१४ त. याचें नांव. पं. याची नावें.–१५ पं. इंधन.–१६ पं. दर्शन वोहळ तो चि.

२१८८. भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ ध्रु ॥ उदक अग्नि धान्य जाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥ २ ॥ तुका ह्मणे मज [1]केळे ते चांचणी । वडवडीची वाणी अथवा सत्य ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२१८९. श्रीसंतांचिया माथा चरणांवरी । साष्टांग हें करीं दंडवत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्रांती पावलों सांभाळउत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥ ध्रु ॥ दौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें [2]उद्धरलों ॥ २ ॥ तुका ह्मणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्यठेवा वोडवला ॥ ३ ॥

२१९०. नेणों काय नाड । आला उचित काळा आड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं जाली संतभेटी । येवढी हानी काय मोठी ॥ ध्रु ॥ सहज पायांपासीं । [3]जवळी पावलिया ऐसी ॥ २ ॥ चुकी जाली आतां काय । तुका ह्मणे उरली हाय ॥ ३ ॥

२१९१. आणीक कांहीं नेणें । असें पायांच्या चिंतनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा न व्हावा विसर । नाहीं आणीक आधार ॥ ध्रु ॥ भांडवल सेवा । हा चि ठेवियेला ठेवा ॥ २ ॥ करीं मानभावा । तुका विनंती करी देवा ॥ ३ ॥

२१९२. [4]आरुष माझी वाणी बोवडीं उत्तरें । केली ते लेंकुरें सलगी पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावें कवतुक संतीं मायबापीं । जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥ ध्रु ॥ आधारें वद्‌ली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवेंनीं तुमचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे हे चि करितों विनंती । [6]मागेन पुढती सेवादान ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२१९३. पुरु[7]षा हातीं कंकणचुडा । नवल दोडा वृत्तिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा कैसी विटंबणा । नारायणा देखिली ॥ ध्रु ॥ जळो ऐसी ब्रिदावळी । भाटबोलीपणाची ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहों डोळां । अवकळा नये हे ॥ ३ ॥

२१९४. वितीयेव्हढें[8] पोट । केव्हढा बोभाट तयाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळो [9]यांची विटंबना । भूक जना नाचवी ॥ ध्रु ॥ अभिमान सिरीं भार । जाले खर तृष्णेचे ॥ २ ॥ तुका ह्मणे नरका जावें । हा चि जीवें व्यापार ॥ ३ ॥

---

१ दे. केले ते.—२ पं. उद्धरले.—३ पं. तुज जवळी पावली ऐसी.—४ दे. आरुश.—५ दे. त.० सेवणी.—६ दे. त. मागोनि.—७ पं. पुरुषहातीं०.—८ पं. येव्हडा.—९ पं. त्याची.

२१९५. सेवटासी जरी आलें। तरी जालें आंधळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्वहिताचा लेश नाहीं। दगडो कांहीं अंतरीं ॥ छ्र ॥ काय परिसासवें भेटी। खापरखुंटी जालिया ॥ २ ॥ तुका ह्मणे अधम जन। अवगुण चि वाढवी ॥ ३ ॥

२१९६. प्रायश्चित्तें देतो तुका। जातो लोकां सकळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरितील ते तरती मनीं। जाती घाणी वांयां त्या ॥ छ्र ॥ निग्रहअनुग्रहाचे ठाय। देतो घाय पाहोनि ॥ २ ॥ तुका जाला नरसिंहीं। भय नाहीं कृपेनें ॥ ३ ॥

॥ ४ ॥

२१९७. दुर्जनाचें अंग अवघें चि सरळ। नर्कोचा कोथळ सांटवर्णे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खाय अमंगळ बोले अमंगळ। उठवी कपाळ संघष्टणें ॥ छ्र ॥ सर्पा मंत्र चाले धरावया हातीं। खळाची ते जाती निंखळ चि ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं न साहे उपमा। आणीक अधमा वोखर्ट्याची ॥ ३ ॥

२१९८. ऐका जी संतजन। सादर मन करूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळांचें सार एक। कंटक ते त्यजावे ॥ छ्र ॥ विशेषता कांद्याहूनि। सेवित्या घाणी आगळी ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याची जोडी। ते परवडी बैसीजे ॥ ३ ॥

२१९९. आज्ञा पाळुनियां असें एकसरें। तुमचीं उत्तरें संतांचीं हीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भागवूनि देह ठेवियेला पायीं। चरणावरि डोई येथूनें चि ॥ छ्र ॥ येणें जाणें हें तों उपाधीचें मूळ। पूजा ते सकळ अकर्तव्य ॥ २ ॥ तुका ह्मणे असें चरणींचा रज। पदीं च सहज जेथें तेथें ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२२००. न संडावा ठाव। ऐसा निश्चयाचा भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पुरे पुन्हा यात्रा। हें चि सारूनि सर्वत्रा ॥ छ्र ॥ संनिध चि सेवा। असों करुनियां देवा ॥ २ ॥ आज्ञेच्या पाळणें। असें तुका संतां ह्मणे ॥ ३ ॥

२२०१. उपाधीचें बीज। जळोनि राहिलें सहज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां राहिली ते आतां। चाली देवाचिया सत्ता ॥ छ्र ॥ पैरांधीन तें जिणें। केलें सत्ता नारायणें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणें पाय। खुंटले आणीक उपाय ॥ ३ ॥

२२०२. गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी। हगवण घाणी पिटपिट ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मस्तक सांडूनि सिसफुल गुडघां। चार तो अवघा [11]वांवळ्याचा ॥ छ्र ॥

---

१ पं. दगड.–२ दे. अवगुणें.–३ पं. "चि" नाहीं.–४ पं. सांटवला.–५ दे. निखळे–६ पं. वोखट्यासी.–७ दे. त. तजावे.–८ पं. त्याची.–९ दे. येथुने–१० दे. त. प्राधीन.–११ पं. वावळाचा.

अंगभूत ह्मूण पूजितो वाहाणा । ह्मणतां शाहाणा येइल कैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे वेश्या सांगे सेवासिणी[1] । इतर पूजनीं भाव तैसा ॥ ३ ॥

२२०३. कुतऱ्याऐसें ज्याचें जिणें । संग कोणी[2] न करींजे ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ जाय तिकडे हाडहाडी । गोऱ्हवांडी[3] च सोइरीं ॥ छ ॥ अवगुणांचा त्याग नाहीं । खवळे पाहीं उपदेशें[4] ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंची लवी । टेंग्यां[5] केवीं अंकुर ॥ ३ ॥

२२०४. सर्वथा ही खोटा संग । उपजे भंग मनासी ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ वहु रंगें भरलें जन । संपन्न चि अवगुणी ॥ छ ॥ सेविलिया निष्कामबुद्धी[6] । मदें शुद्धी सांडवी[7] ॥ २ ॥ त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥ ३ ॥

॥ ५ ॥

२२०५. उपचारासी वाज जालों । नका[8] बोलों यावरी ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥ छ ॥ दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे वहु मतें ॥ २ ॥ एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥ ३ ॥

२२०६. मी तें मी तूं तें तूं । कुंकुडें[9] हें लाडसी ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ वचनाची[10] पडो तुटी । पोटींचें पोटीं राखावें ॥ छ ॥ तेथीलें[11] तेथें येथील येथें । वेगळ्या कुंथे कोण भारें ॥ २ ॥ याचें यास त्याचें त्यास । तुक्यानें[12] कास घातली ॥ ३ ॥

॥ २ ॥

२२०७. लाडाच्या उत्तरीं वाढविती कळ्हे[13] । हा तो अमंगळ जातिगुण ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ तमाचे शरीरीं विटाळ चि वसे । विचाराचा नसे लेश तो ही ॥ छ ॥ कवतुकें घ्यावे लेंकराचे बोल । साहिलिया मोल ऐसें नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे काय उपदेश खळा । न्हाउनि काउळा क्षेतें[14] धुंडी ॥ ३ ॥

२२०८. आतां मज देवा । इचे हातींचें सोडवा ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ पाठी लागलीसे लांसी । इच्छा जिते जैसी तैसी ॥ छ ॥ फेडा आतां पांग । अंगीं लपवुनी अंग ॥ २ ॥ दुजें नेणें तुका । कांहीं तुह्मासी ठाउका ॥ ३ ॥

२२०९. बहु वाटे भये । माझे उडी घाला दये ॥ १ ॥ ॥ धृ. ॥ फांसा गुंतलों लिगाडीं । न चले बळ चरफडी ॥ छ ॥ कुंटित चि युक्ति । माझ्या जाल्या सर्व शक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । काममोहें केला गोवा ॥ ३ ॥

॥ ३ ॥

---

१ पं. सुवासिनी.–२ पं. कोणें.–३ पं. गोऱ्हेवाडी.–४ पं. उपदेश.–५ त. ठेग्या.–६ दे. नि.कामवद्धी.–७ पं. सांडावी.–८ पं. नको–९ पं. कुक्कड.–१० पं. वचनासी पडे तुटी ।.–११ पं. येथील तेथें तेथील येथें ।.–१२ पं. तुकानें.–१३ "कळ" (भांडण) असतें तर यमकास जुळतें.–१४ दे. खतें.

२२१०. विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळ चि सखें वोंगळाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । झणी ठेंका संत दुर्जनापें ॥ ध्रु ॥ भेंसळीच्या बीजों अमंगळ गुण । उपजवी सीण दरुषणें ॥ २ ॥ तुका ह्मणे छी थूं जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ॥ ३ ॥

॥ १ ॥

२२११. चंवाळलें काय न करी वडबड । न ह्मणे फिकें गोड भुकेलें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उमजल्याविण न धरी सांभाळ । असो खळखळ जनाची हे ॥ ध्रु ॥ गरज्या न कळे आपुलिया चाडा । करावी ते पीडा कोणा काई ॥ २ ॥ तुका ह्मणे भोग भोगितील भोगें । संचित तें जोगें आहे कोणा ॥ ३ ॥

२२१२. आपुला तो देह आह्मां उपेक्षीत । कोठें जाऊं हित सांगों कोणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण नाहीं दक्ष करितां संसार । आह्मीं हा विचार वमन केला ॥ ध्रु ॥ नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ २ ॥ तुका ह्मणे असों चिंतोनियां देवा । मी माझें हा हेवा सारूनियां ॥ ३ ॥

॥ २ ॥

२२१३. चाकरीवांचून । खाणें अनुचित वेतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धणी काढोनियां निजा । करील ये कामाची पूजा ॥ ध्रु ॥ उचितावेगळें । अभिलाषें तोंड काळें ॥ २ ॥ सांगे तरी तुका । पाहा लाज नाहीं लोकां ॥ ३ ॥

२२१४. बरें सावधन । राहावें समय राखोन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं सारखिया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥ ध्रु ॥ लाभ अथवा हानी । थोड्यामध्यें च भोवनी ॥ २ ॥ तुका ह्मणे राखा । आपणा नाहीं तोंचि वाखा ॥ ३ ॥

॥ २ ॥

२२१५. काय करूं जी दातारा । कांहीं न पुरे संसारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाली माकडाची परि । येतों तळा जातों वरी ॥ ध्रु ॥ घालीं भलते ठायीं हात । होती शिव्या वैस लात ॥ २ ॥ आदि अंतीं तुका । सांगे न कळे झाला चुका ॥ ३ ॥

२२१६. धर्म तो न कळे । काय झांकितील डोळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीव भ्रमले या कामें । कैसीं कळों येती वर्मे ॥ ध्रु ॥ विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥ २ ॥ तुका ह्मणे लांसी । माया नाचविते कैसी ॥ ३ ॥

॥ २ ॥

---

१ पं. त. वोंगळासी सखें वोंगळ चि ।–२ पं. टाका.–३ त. वीर्या –४ पं. त. चीयू०.–५ पं. चळलें.–६ पं. नाहीं.–७ पं. असें.–८ पं. मी हें माझा हेवा०.–९ पं. खावें.–१० पं. कामेची.–११ पं. सखा.

२२१७. दुर्जनाची जोडी । सज्जनाचे खेंटर तोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहे निमित्य तें उणें । धांवे छळावया सुनें ॥ ध्रु० ॥ न ह्मणे रामराम । मनें वाचे हें चि काम ॥ २ ॥ तुका ह्मणे भागा । आली निंदा करी मागा ॥ ३ ॥

२२१८. शादीचें तें सोंग । संपादितां राजा व्यंगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा कैसी विटंवना । मूर्खा अभाग्याची जना ॥ ध्रु० ॥ दिसतें तें लोपी । झिंज्या वोढुनियां पापी ॥ २ ॥ सिंदळी त्या सती । तुका ह्मणे थुंका घेती ॥ ३ ॥ ॥ २ ॥

२२१९. भक्ता ह्मणऊनि वंचीवें जीवें । तेणें शेण खावें काशासाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नासिले अडबंद कौपीन ते[3] माळा । अडचण राउळामाजी केली ॥ ध्रु० ॥ अंगीकारिले सेवे धंडे अंतराय । तया जाला न्याय खापराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें तगों येती घाणीं । आहाच ही मनीं अधीरता ॥ ३ ॥ ॥ १ ॥

२२२०. गैयाळाचें काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें । असावें परतें जवळूनि ॥ ध्रु० ॥ न करावा संग न बोलावी मात । सावधान चित्त नाहीं त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःख देतील माकडें । घालिती सांकडें उफराटें ॥ ३ ॥

२२२१. बहु बरें एकाएकीं । संग चुकी करावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें बरें जालें ठावें । अनुभवें आपुल्या ॥ ध्रु० ॥ सांगावें तें काम मना । सलगी जना नेदावी ॥ २ ॥ तुका ह्मणे निग्रे अगी । दुजे संगीं आतळतां ॥ ३ ॥ ॥ २ ॥

## अलकापुरीं[6] स्वामी कीर्तनास उभे राहिले तेव्हां कवित्वाचा निषेध करून लोक बोलिले कीं कवित्व बुडवणें तेव्हां कवित्व बुडवून पांच दिवस होते ॥ लोकांनीं फार पीडा केली कीं संसारही नाहीं व परमार्थही बुडविला आणीक कोणी असतें तें जीव देतें मग निद्रा केली ते अभंग ॥ २० ॥

२२२२. भूतबाधा आह्मां घरीं । हें तों आश्चर्य गा हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाला भक्तीचा कळस । आले वसतीसी दोष ॥ ध्रु० ॥ जागरणाचें फळ । दिली जोडोनि तळमळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आहाच कळों आली सेवा ॥ ३ ॥

१ दे. वेंग.–२ पं. वंचावें तें जावें.–३ त. हे.–४ दे. "घडे" नाहीं. त. "घडे" याबद्दल "बरी".–५ पं. गहिल्याचें.–६ पं. अभंगाच्या वह्या उदकांत बुडवून, पाच दिवस उगेच राहिले; तेव्हां छळवादी येऊन फिरोन निषेधाच्या गोष्टी बोलिले. श्रीसन्मुख तेरा दिवस निद्रा केली ते अभग १९ करून. मग निद्रा केली. अळंकापुरी स्वामी कीर्त० ॥ कवित्वाचा निशेध के० ॥ लोका० ते०॥.–७ पं. दे. त. वस्तीस.

२२२३. नाहीं जों वेचलों जिवाचिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणिवलें[2] आतां करीं ये उदेश । जोडी किंवा नाश तुमची जीवें ॥ छ ॥ ठायींचें[3] चि आलें होतें ऐसें मना । जावें ऐसें वना दृढ जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे मग वेचीन उत्तरें । उद्देशिलें[4] खरें जाल्यावरी ॥ ३ ॥

२२२४. करूं कवित्व[5] काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां आला एका निवाड्याचा दिस । सत्याविण रस विरसलें[6] ॥ छ ॥ अनुभवाविण कोण करी पाप । रिते चि संकल्प लाजलावे[7] ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ ३ ॥

२२२५. नाहीं आइकत तुह्मी माझे बोल । कासया हें फोल उपणूं भूस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येसी तें करीन बैसलिया ठाया । तूं[8] चि बुझावया जवळी देवा ॥ छ ॥ करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझुनि वास ॥ २ ॥ तुका ह्मणे आला आज्ञेसी सेवट । होऊनियां नीट पायां पडों[9] ॥ ३ ॥

२२२६. नव्हे तुह्मां सरी । येवढें कारण मुरारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग जैसा तैसा काळ । दाट सारावा पातळ ॥ छ ॥ स्वामीचें तें सांडें । पुत्र होतां काळतोंडें[10] ॥ २ ॥ शब्दा नाहीं रुची । मग कोठें तुका वेची ॥ ३ ॥

२२२७. केल्यापुरती आळी । कांहीं होते टाळाटाळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्यसंकल्पाचें फळ । होतां[11] न दिसे चि बळ ॥ छ ॥ दळणांच्या ओव्या । रित्या खरें मापें घ्याव्या ॥ २ ॥ जातीं उखळें[12] चाटूं । तुका ह्मणे राज्य घाटूं ॥ ३ ॥

२२२८. आतां नेम जाला । या च कळसीं विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातीं न धरीं लेखणी । काय भुसकट ते वाणी ॥ छ ॥ जाणें तेणें काळ । उरला सारीन सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे घाटी । चाटू कोरडा शेवटीं ॥ ३ ॥

२२२९. पावावे संतोष । तुह्मीं यासाठीं सायास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं आवडी वेचनें[13] । पालटूनि क्षणक्षणें[14] ॥ छ ॥ द्यावें अभयदान । भुमी न पडावें वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे परस्परें । कांहीं वाढवीं उत्तरें ॥ ३ ॥

२२३०. बोलतां वचन असा पाठमोरे । मज भाव बरे कळों आले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागितलें नये अरुचीनें हातां । नाहीं वरी सत्ता आदराची ॥ छ ॥ समाधानासाटीं लाविलासे कान । चोरलें तें मन दिसतसां ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां तुमचे चि फंद । वरदळ छंद कळों येती ॥ ३ ॥

---

१ पं. नये.–२ पं. जाणविलें.–३ पं. ठायीं च.–४ दे. त. उद्देसिलें.–५ दे. त. कवि काय आतां नाहीं लाज ।.–६ पं. विसरला –७ पं. लाजवावे.–८ पं. तुझी बुझावया०.–९ पं. पडें.–१० पं. काळें तोंड.–११ पं. हे तों.–१२ पं. उखळ.–१३ पं. वचन.–१४ दे. पं. क्षणक्षण.

२२३१. काशासाटीं बैसों करूनियां हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय आलें एका जिवाच्या उद्धारें । पावशी उच्चारें काय हो तें ॥ छ ॥ नेदी पट परी अन्नें तों न मारी । आपुलिये थोरीसाटीं राजा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां अव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥ ३ ॥

२२३१-अ. माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमच्या नामाची जतन । नव्हतां थोर वाटे सीण ॥ छ ॥ न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे लाज । आह्मां स्वामीचें तें काज ॥ ३ ॥

२२३२. कांहीं मागणें हें आह्मां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह तुच्छ जालें सकळ उपाधी । सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ॥ छ ॥ शब्द तो उपाधि अचळ निश्चय । अनुभव हा काय नाहीं अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देह फांकिला विभागीं । उपकार अंगीं उरविला ॥ ३ ॥

२२३३. मागितल्यास कर पसरी । पळतां भरी वाखती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय आह्मी नेणों वर्म । केला श्रम नेणतां ॥ छ ॥ बोलतां बरें येतां रागा । कठीण लागा मागेंमागें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें बोली । असे चाली उफराटी ॥ ३ ॥

२२३४. असो तुझें तुजपाशीं । आह्मां त्यासी काय चाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निरोधें कां कोंडूं मन । समाधान असोनी ॥ छ ॥ करावा तो उरे आट । खटपट वाढतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे येउनि रागा । कां मी भागा मुकेन ॥ ३ ॥

२२३५. आहे तें चि पुढें पाहों । वरे आहों येथें चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय वाढवूनि काम । उगा च श्रम तृष्णेचा ॥ छ ॥ स्थिरावतां ओघीं बरें । चाली पुरें पडेना ॥ २ ॥ तुका ह्मणे वळितां मन । आह्मां क्षण न लगे ॥ ३ ॥

२२३६. सांगा दास नव्हें तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणासाटीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥ छ ॥ नसेल तो ध्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं दुजें कांहीं ॥ ३ ॥

२२३७. अनन्यासी ठाव एक सर्वकाजें । एकाविण दुजें नेणे चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न पुरतां आळी देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥ छ ॥

---

१ दे. उधारें. पं. उदारें.–२ दे. त. मरी–३ दे. उबेग.–४ त. तुझ्या.–५ पं. "हा" नाहीं.–६ पं. उभविला.–७ त. पं. पसरी कर.–८ पं. विरोधें.–९ पं. विभागा.–१० पं. तुजविण.–११ पं. सर्वकाज ।.

लेंकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे किती घातली लांबणी । समर्थ होउनि केवढ्यासाटीं ॥ ३ ॥

२२३८. स्तुती तरि करूं[1] काय कोणापासीं । [2]कीर्ती तरि कैसी वाखाणावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खोट्या तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो श्रम वरि वरा ॥ ध्रु ॥ ह्मणवावें त्याची खुण नाहीं हातीं । अवकळा फजिती सौंवकाशें[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंगे तुमचें माझें तोंड । होऊनीयां लंड आळवितों ॥ ३ ॥

२२३९. कांहीं च न लगे आदि अवसान । बहुत कठीण दिसतसां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघ्याच माझ्या वेचविल्या शक्ती । न चलेसी युक्ति जाली पुढें ॥ ध्रु ॥ बोलिलें वचन हारपलें नभीं । उतरलों तों उभीं आहों तैसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं न करावेंसें जालें । थकित चि ठेलें चित्त उगें ॥ ३ ॥

२२४०. रूपें[4] गोविलें चित्त । पायीं राहिलें निश्चिंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मीं देवा अवघे चि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥ ध्रु ॥ जाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडतें[5] ते होतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ ३ ॥

॥ २० ॥

## * स्वामींनीं तेरा दिवस निद्रा केली. मग भगवंतें येऊन समाधान केलें कीं, कवित्व कोरडें आहे तें काढणें उदकांतून.

२२४१. थोर अन्याय केला तुझा अंत म्यां पाहिला । जनाचिया[6] बोलासाटीं चित्त क्षोभविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भागविलासी केला सीण अधम मी यातिहीन । झांकूनि लोचन दिवस तेरा राहिलों ॥ ध्रु ॥ अवघें घालूनियां कोडें तानभुकेचें सांकडें । योगक्षेम पुढें तुज करणें[7] लागेल ॥ २ ॥ उदकीं राखिले कागद चुकविला जनवार्द[8] । तुका ह्मणे ब्रीद साच केलें आपुलें ॥ ३ ॥

२२४२. तूं कृपाळू माउली आह्मां दीनांची साउली । न संरितें[9] आली बाळवेंशें जवळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें केलें समाधान रूप गोजिरें सगुण । निववीलें मन आलिंगन देऊनी ॥ ध्रु ॥ कृपा केली जना हातीं पायीं ठाव दिला संतीं । कळों नये चित्तीं दुःख कैसें आहे तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मी अन्यायी क्षमा करीं वो माझे आई । आतां पुढें काई तुज घालूं सांकडें ॥ ३ ॥

---

१ पं. काय करू.–२ दे. त. कीर्ते.–३ पं. सावकाश –४ पं. रूपीं गोवियेलें चित्त ।.–५ पं. पीडित होती –६ पं. जगाचिया.–७ पं. तुज कारणें लागले.–८ पं. जनापवाद –९ (सवृत ?) त. संवगीत. पं. स्वरित. * त. स्वामींनीं तेरा दिवस निद्रा के० ते० ॥ ७ ॥. पं. अभंग करून तेरा दिवस निद्रा केली. उदकांत वह्या बुडविल्या त्या कोरड्या निघाल्या ; तेंव्हा अन्याय ह्म० अ०.

२२४३. कापो कोणी माझी मान सुखें पीडोत दुर्जन । तुज होय सीण तें मी न करीं सर्वथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चुकी जाली एकवेळा मज पासूनि चांडाळा । उभें करोनियां जळा माजी वह्या राखिल्या ॥ छ ॥ नाहीं केला हा विचार माझा कोण अधिकार । समर्थासी भार न कळे कैसा घालावा ॥ २ ॥ गेलें होऊनियां मागें नये बोलों तें वाउगें । पुढिलिया प्रसंगें तुका ह्मणे जाणावें ॥ ३ ॥

२२४४. काय जाणें मी पामर पांडुरंगा तुझा पार । धरिलिया धीर काय एक न करिसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उताविळ जालों आधीं मतिमंद हीनबुद्धि । परि तूं कृपानिधी नाहीं केला अव्हेर ॥ छ ॥ तूं देवांचा ही देव अवघ्या ब्रह्मांडाचा जीव । आह्मां दासां कींव कां भाकणें लागली ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरा मी तों पतित चि खरा । अन्याय दुसरा दारीं धरणें बैसलों ॥ ३ ॥

२२४५. नव्हती आली सीसा सुरी अथवा घाय पाठीवरी । तो म्यां केला हरी एवढा तुह्मां आकांत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांटिलासी दोहीं ठायीं मजपाशीं आणि डोहीं । लागों दिला नाहीं येथें तेथें आघात ॥ छ ॥ जीव घेती मायबापें थोड्या अन्यायाच्या कोपें । हें तों नव्हे सोपें साहों[१] तों चि जाणीतलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता तुज ऐसा नाहीं दाता । काय वांणूं आतां वाणी माझी कुंटली ॥ ३ ॥

## वर्षाव केला.

२२४६. तूं माउलीहून मयाळ चंद्राहूनि शीतळ । पाणियाहूनि पातळ कल्लोळ प्रेमाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देऊं काशाची उपमा दुजी तुज पुरुषोत्तमा । ओंवाळूनि नामा तुज्या वरूनि टाकिलों ॥ छ ॥ तुवां केलें रे अमृता गोड त्या ही तूं परता । पांचां तत्वांचा जनिता सकळ सत्तानायक ॥ २ ॥ कांहीं न बोलोनि आतां उगा च चरणीं ठेवितों माथा । तुका ह्मणे पंढरिनाथा क्षमा करीं अपराध ॥ ३ ॥

२२४७. मी अवगुणी अन्यायी किती ह्मणोन सांगों काई । आतां मज पायीं ठाव देई विठ्ठले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरे पुरे हा संसार कर्म बळिवंत दुस्तर । राहों नेदी स्थिर एके ठायीं निश्चळ ॥ छ ॥ अनेक बुद्धिचे तरंग क्षणक्षणां पालटती रंग । धरूं जातां संग तंव तो होतो बाधक ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां अवघी तोडीं माझी चिंता । येऊनि पंढरिनाथा वास करीं हृदयीं ॥ ३ ॥

॥ ७ ॥

१ पं. सकळ.–२ पं. त्वां.–३ पं. वाणूं तुज आतां.–४ पं. खुंटली.–५ पं. पालटे.

२२६०. नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोड गोमटें हें अमृतासी वाड । केला कइवाड माझ्या चित्तें ॥ ध्रु ॥ प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांति । त्रिविध सांडिती ताप [1]अंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ॥ ३ ॥

॥ ३ ॥

२२६१. स्वामिकाजें[2] गुरुभक्ति । पितृवचन सेवा पति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे चि विष्णूची महापूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥ ध्रु ॥ सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ २ ॥ निश्चयाचें बळ । तुका ह्मणे तें च फळ ॥ ३ ॥

२२६२. चित्त घेऊनियां तूं काय देसी । ऐसें मजपासीं सांग आधीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि च पंढरिराया करिन साटोवाटी । नेघें[3] जया तुटी येईल तें ॥ ध्रु ॥ रिद्धिसिद्धि कांहीं दाविसी अभिळास । नाहीं मज आस मुक्तीची ही ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें[5] घेणें ॥ ३ ॥

२२६३. तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपल्या सारिखें करिसी दासां । भिकारिसा जग जाणे ॥ ध्रु ॥ रूपा नाहीं ठाव नांवा । तैसें आमुचें करिसी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे तोयें आपुलें भेंडोळें । करिसी वाटोळें माझें तैसें ॥ ३ ॥

२२६४. आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझें नाम दिनानाथ । ब्रिदावळी जगविख्यात ॥ ध्रु ॥ कोण लेखी माझ्या दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥ २ ॥ वांयां जातां मज । तुका ह्मणे तुह्मां लाज ॥ ३ ॥

२२६५. विठ्ठल आमुचा निजांचा । सज्जन सोयरा जीवाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मायबाप चुलता बंधु । अवघा तुजशीं संबंधु ॥ ध्रु ॥ उभयकुळींसाक्ष । तूं चि माझा मातुळपक्ष ॥ २ ॥ समर्पिली काया । तुका ह्मणे पंढरिराया ॥ ३ ॥

२२६६. वेदाचा तो अर्थ आह्मांसी च ठावा । येरांनीं वाहावा भार माथां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचें ॥ ध्रु ॥ उत्पत्तिपाळगसंहाराचें निज । जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें आपण चि फळ । हातोहातीं मूळ सांपडलें ॥ ३ ॥

---

१ दे. अग.—२ दे. 'स्वामिसेवा गुरुभक्ति । पितृवचन पाळिती ॥' असा पाठ नवीन केला आहे; पूर्वी मूळांत लिहिल्याप्रमाणेंच होता.—३ पं. नघें.—४ पं. माझें तुझें—५ पं. घेणें देणें—६ पं. रूप नाहीं ठावा नावा ।.—७ त. आह्मां—८ दे. 'तुका ह्मणे आह्मा सांपडलें मूळ । आपण चि फळ आलें हातां ॥' असा पाठ मागून केला आहे; पूर्वी मूळातल्या प्रमाणेंच होता.

२२६७. आमचा तूं[1] ऋणी ठायींचा चि देवा । मागावया ठेवा आलों दैरा[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्म तुझें आह्मां सांपडलें हातीं । धरियेले चित्तीं दृढ पाय ॥ ध्रु ॥ वैसलों धरणें कोंडोनियां द्वारीं । आंतूनि बाहेरी येऊं नेदीं ॥ २ ॥ तुज मज सरी होइल या विचारें । जळो भांडखोरें निलाजिरीं[3] ॥ ३ ॥ भांडवल माझें मिरविसी जनीं । सहस्र वोवैणी[4] नाममाळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी केली जिवें साटी । तुह्मां आह्मां तुटी घालूं आतां ॥ ५ ॥

२२६८. काय धोविलें बाहेरी मन मळलें अंतरीं । गादलें जन्मवरी असत्यकाटें काटलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडीं व्यापार दंभाचा शुद्ध करीं रे मन वाचा । तुझिया चित्ताचा तूं च ग्वाही आपुला ॥ ध्रु ॥ पापपुण्यविटाळ देहीं भंरितां[5] न विचारिसी कांहीं । काय चाचपसी मही जी अखंड सोंवळी ॥ २ ॥ कामक्रोधा वेगळा ऐसा होईं कां सोंवळा[6] । तुका ह्मणे कळा गुंडुन ठेवीं कुसरी ॥ ३ ॥

२२६९. ऊंस वाढवितां वाढली गोडी । गुळ साकर हे त्याची परवडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्यकर्में आचरें रे । बापा सत्यकर्में आचरें रे । सत्यकर्में आचरें होईल हित । वारेलें दुःख असत्याचें ॥ ध्रु ॥ साकरेच्या आळां लाविला कांदा । स्थूळसानापरि वाढे दुर्गंधा ॥ २ ॥ सत्य असत्य हें ऐसिया परी । तुका ह्मणे याचा विचार करीं ॥ ३ ॥

२२७०. पाषाण देव पाषण पायरी । पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सार तो भाव सार तो भाव । अनुभवीं देव ते चि जाले ॥ ध्रु ॥ उदका भिन्न पालट काई । गंगा गोड येरां चवी काय नाहीं[8] ॥ २ ॥ तुका ह्मणे हें भाविकांचें वर्म । येरीं धर्माधर्म विचारावे ॥ ३ ॥

॥ १० ॥

२२७१. जन्मा येऊनि कां रे निदसुरा । जायें भेटी वरा रखुमाईच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाप ताप दैन्य जाईल सकळ । पावसी अढळ उत्तम तें ॥ ध्रु ॥ संतमहंतसिद्धहरिदासदाटणी । फिटती पारणीं इंद्रियांचीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें नामाचा गजर । फुकाची अपार लुटी घेईं ॥ ३ ॥

२२७२. काय धोविलें कातडें । काळकुट भीतरि कुडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ॥ ध्रु ॥ घेसी बुंथी पानवथां ।

---

१ पं. 'तू' नाहीं.–२ पं. द्वारा –३ पं. निलाजिरे.–४ दे. वोवनी.–५ पं. करितां.–६ पं. कां रे सोवळा.–७ दे. त. वाढेल.–८ पं. काय चवी.

उगा च हालविसी माथा ॥ २ ॥ लावूनि बैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं ॥ ३ ॥ हालवीत बैसे माळा । विषयजप वेळोवेळां ॥ ४ ॥ तुका ह्मणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ॥ ५ ॥

॥ २ ॥

२२७३ येईं वो येईं वो येईं[1] धांवोनियां । विलंब कां वायां लाविलो[2] कृपाळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठाबाई विश्वंभरे भवच्छेदके । कोठें गुंतलीस[3] अगे विश्वव्यापके ॥ ध्रु ॥ न करीं न करीं न करीं आतां अळस अव्हेरु । [4]व्हावया प्रकट कैंचें दूरि अंतरु ॥ २ ॥ नेघें नेघें नेघें मांझी[5] वाचा विसांवा । तुका ह्मणे हांवां[6] हांवा हांवा साधावा ॥ ३ ॥

२२७४. हें चि याच्या[7] ऐसें मागावें दान । वंदूनि चरण नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीर उदारीव निर्मळ निर्मत्सर । येणें सर्वेश्वर ऐसें नांव ॥ ध्रु ॥ हा चि होईजेल याचिया विभागें । [8]अनुभवत्री अंगें अनुभवील ॥ २ ॥ जोडे तयाचे कां[9] न करावे सायास । जाला तरि अळस दीनपणें ॥ ३ ॥ पावल्यामागें कां न धेंलावी[10] धांव । धरिलया तरि हांव वेळ[11] येतें ॥ ४ ॥ तुका ह्मणे घालूं खंडीमध्यें टांक । देवाचें हें एक करुनी घेऊं ॥ ५ ॥

२२७५. सत्ताबळें येतो मागतां विभाग । लावावया लाग निमित्य करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझीं ऐसीं मुखें करूं उच्चारण[12] । बोलें नारायण सांपडवूं ॥ ध्रु ॥ आसेत्रिण नाहीं उपजत मोहो । तरि च हा गोहो न पडे फंदीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां व्हावें याजऐसें । सरिसें सरिसें समागमें ॥ ३ ॥

२२७६. करितां होया[13] व्हावें चित्त चि नाहीं । घटापटा कांहीं करूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग हालत चि नाहीं जवळून । करावा तो सीण सीणवितो ॥ ध्रु ॥ साहत चि नाहीं कांहीं पांकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी बोलावें झांकून । येथें खुणे खूण पुरतें[14] चि ॥ ३ ॥

२२७७. संतसंगें[15] याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत[16] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासी च अंतरीं वास दिला ॥ ध्रु ॥

---

१ पं. धांवोनि लवलाह्या । –२ पं. लावियेला.–३ पं. माय.–४ पं. प्रगट व्हावयासी कैंचे.–५ पं. माझे.–६ पं. हांवहांव साधावा.–७ त. मागावें हो दोन –८ पं. अनुभवी अंगें अनुभविलें–९ पं. 'कां' नाहीं.–१० पं. घालावी.–११ पं. वळीयेते ।.–१२ पं. उचारणा । बोले नारायणा०–१३ पं. होय –१४ त. पुरे ते. पं. पुरत.–१५ पं. संतसंग.–१६ दे. मूर्तिमंद.

आपुलेंसें जिहीं नाहीं उरों[1] दिलें । चोजावितां भलें ऐसीं स्थळें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदन चि ॥ ३ ॥

२२७८. पुष्ट कांति निवती डोळे । हे सोहळे श्रीरंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतर्बाहीं विलेपन । हें भूषण मिरवूं ॥ ध्रु ॥ इच्छेऐसी आवड पुरे । विश्वंभरे जवळी ॥ २ ॥ तुका करी नारायण । या या सेवन नामाचें ॥ ३ ॥

२२७९. सुकाळ हा दिवसरजनी । नित्यें धणी नवी च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करुण सेवूं नानापरी । राहे उरी गोडीनें ॥ ध्रु ॥ सरे ऐसा नाहीं झरा । पंक्ती करा समवेत ॥ २ ॥ तुका ह्मणे बरवा पान्हा । कान्ठावाई माउलीचा ॥ ३ ॥

२२८०. पाहतां तव एकला दिसे । कैसा असे व्यापक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्याचे त्याचे मिळणीं मिळे । तरी खेळे वहुरूपी ॥ ध्रु ॥ जाणिवेचें नेदी अंग । दिसों[3] रंग निवडीना ॥ २ ॥ तुका ह्मणे ये चि ठायीं । हें तों नाहीं सर्वत्र ॥ ३ ॥
॥ ८ ॥

२२८१. तुह्मांसाटीं आह्मां आपुला विसर । करितां अव्हेर कैसें[4] दिसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विचाराजी आतां ठायींचें हे देवा । आह्मां नये हेवा वाढवितां ॥ ध्रु ॥ आलों टाकोनियां सुखाची वसती । पुढें माझ्या युक्ति खुंटलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला सकळ वृत्तांत । केला प्रणिपात ह्मणऊनि ॥ ३ ॥

२२८२. करावा उद्धार हें तुह्मां उचित । आह्मी केली नीत[2] कळली ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाववील हाक धांवा ह्मणऊन । करावें जतन ज्याचें तेणें ॥ ध्रु ॥ दुश्चितासी बोल ठेवायासी ठाव । ऐसा आह्मी भाव जाणतसों ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें कायावाचामन । दुसरें तें ध्यान करित नाहीं ॥ ३ ॥

२२८३. संताचे उपदेश आमुचे मस्तकीं । नाहीं मृत्यलोकीं[5] राहाणेसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि बहु तळमळी चित्त । येईं वो धांवत पांडुरंगे ॥ ध्रु ॥ उपजली चिंता लागला उसीर । होत नाहीं धीर निढळ वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटीं रिघालेंसे भय । करूं आतां काय ऐसें जालें ॥ ३ ॥

२२८४. काळावरि घालूं तरि तो सरिसा । न पुरतां इच्छा दास कैसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां नाहीं कांहीं उसिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥ ध्रु ॥ देणें लागे मग विलंब कां आड । गोड तरि गोड आदि अंत ॥ २ ॥ तुका ह्मणे होइल दर्शनें[6] निश्चिंती[7] । गाईन तें गीतीं ध्यान मग ॥ ३ ॥

---

१ पं. "उरों" नाहीं.–२ दे. त. नीत.–३ पं. दिसे.–४ पं. कैसा.–५ दे. मृतेलोकीं.– ६ दे. त.दरुषणें.–७ पं. निश्चिति.

२२८५. [1]पैरउपकारें कायावाचामन । वेचे सुदर्शन रक्षी तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याजसाटीं असें योजिलें श्रीपति । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥ छ ॥ परपीडे ज्याची जिव्हा मुं[2]डताळे । यमदूत [3]ढोंळे करिती पूजा ॥ २ ॥ तुका ह्मणे अंबऋषी दुर्योधना । काय झालें नेणां दुर्वासया ॥ ३ ॥

२२८६. हागिल्याचे सिंके[4] वोणवा चि राहे । अपशकुन पाहे वेडगळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अत्यंत समय नेणतां अवकळा । येऊं नये वळा सिक धरा ॥ छ ॥ [5]भोजनसमयीं ओकाचा आठव । ठकोनियां जीव कष्टी करी ॥ २ ॥ तुका ह्मणे किती [6]सांगों उगवून । अभाग्याचे गुण अनावर ॥ ३ ॥

२२८७. [7]नारे तरि काय नुजेडे कोंबडें । करूनियां वेडें [8]आग्रो दावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [9]आइत्याचें साहे फुकाचा विभाग । विक्षेपानें जग ची थू करी ॥ छ ॥ नेमून ठेविला करत्यानें काळ । नलह्ययेसें बळ [10]करूं पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे देव साहे जाल्यावरी । असांग चि[11] करी [12]सर्व सांग ॥ ३ ॥

॥ ७ ॥

२२८८. तरी सदा निर्भर दास । चिंताआसविरहित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा च एकीं ठाव । [13]सर्व भाव विठ्ठलीं ॥ छ ॥ निरविलें तेव्हां त्यास । जाला वास त्यामाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे [14]रूप ध्यावें । नाहीं ठावे गुणदोष ॥ ३ ॥

२२८९. वेडिया उपचार करितां सोहळे । काय सुख कळे तयासी तें[15] । अंधापुढें दीप नाचती नाचणें । भक्तिभावेंविण भक्ति तैसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [16]तिर्माणें राखण ठेवियेलें सेता । घालुनियां माथां चुना तया । खादलें ह्मणोनि सेत्रटीं [17]बोंबेली । ठायींची भुली कां नेणां रया ॥ छ ॥ मुकियापासाव सांगतां [18]पुराण । रोगिया मिष्टान्न [19]कांय होय । नपुंसका काय करील पद्मिणी । रुचिविण वाणी तैसे होय ॥ २ ॥ हात पाय नाहीं करिल तो [20]कांय । [21]वृक्षा फळ आहे अमोलिक । हातां नये तैसा वांयां च तळमळी । भावेंविण भोळीं ह्मणे तुका ॥ ३ ॥

२२९०. [22]मेघवृष्टीनें करावा उपदेश परि गुरुनें न करावा शिष्य । वांटा लाभे त्यास केल्या अर्धकर्माचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ द्रव्य वेचावें [23]अन्नछत्रीं भूतीं द्यावें सर्वत्र ।

१ पं. पर उपकार कायावाचामनें.–२ त. मुडताळे.–३ पं. टाळे.–४ पं. सिके–५ पं. भोजनासमयीं.–६ पं. सांगावें.–७ पं. नारडे.–८ पं. आग्रो (आग्रह).–९ त. आइत्याची.–१० पं. पुढं करूं–११ पं. तें.–१२ दे. सर्व संग ।.–१३ पं. शुद्ध–१४ त. गुण गावे ।–१५ त. "तें" नाहीं.–१६ पं. तिमानें–१७ दे. बोंबाली–१८ पं. पुराणें.–१९ दे. काई.–२० दे. काई.–२१ पं. वृक्षीं.–२२ दे. "मेघवृष्टीनें" असतां "मेघवृष्टीन" केलें आहे.–२३ अन्नसत्रीं.

नेदावी[1] हा पुत्र उत्तमयाती पोसणी[2] ॥ ध्रु ॥ बीज न पेरावें खडकीं ओल नाहीं ज्याचे बुडखीं । थीतां ठके सेखीं पाठी लागे दिवाण ॥ २ ॥ गुज बोलावें संतांशीं पत्नी राखावी जैसी[3] दासी । लाड देतां तियेसी वांटा पावे कर्माचा ॥ ३ ॥ शुद्ध कसूनि पाहावें वरि रंगा न भुलावें । तुका ह्मणे घ्यावें जया नये तुटी तें ॥ ४ ॥

२२९१. नावडावें जन नावडावा मान । करूनि प्रमाण तूं चि होईं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोडूनि[4] देहसंबंध व्यसनें[5] । ऐसी नारायणें कृपा कीजे ॥ ध्रु ॥ नावडावें रूप नावडावे रस । अवघी राहो आस पायांपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुलिया सत्ता । करूनि अनंता ठेवीं[6] ऐसें ॥ ३ ॥

२२९२. उपाधिवेगळे तुह्मी निर्विकार । कांहीं च संसार तुह्मां नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें मज करूनी ठेवा नारायणा । समूळ वासना तुरवावी ॥ ध्रु ॥ निसंग तुह्मांसी राहणें एकट[7] । नाहीं कटकट साहों येते ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं मिळों येत शिळा[8] । रंगासी सकळां[9] स्पटिकाची ॥ ३ ॥

२२९३. माहार माते चपणी भरे । न कळे खरें पुढील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोंगळें[10] अधमाचे गुण । जातां घडी न लगे चि ॥ ध्रु ॥ श्वान झोळी स्वामिसत्ता । कोप येतां उतरे ॥ २ ॥ तुका ह्मणे गुमान कां । सांगों लोकां अधमासी ॥ ३ ॥

२२९४. डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तें हि न समाये[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें शुद्ध करीं[12] हित । नका चित्त बाटवूं ॥ ध्रु ॥ आपल्याचा[13] कळवळा । आणिका बाळावरि न ये ॥ २ ॥ तुका ह्मणे बीज मुंडा[14] । जैशा[15] चाडा पिकाच्या ॥ ३ ॥

२२९५. मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी[16] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वैष्णवांचा माल खरा । तुरंतुरा[17] वस्तूसी ॥ ध्रु ॥ भस्म दंड न लगे काठी । तीर्थां आटी भ्रमण ॥ २ ॥ तुका ह्मणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ३ ॥

२२९६. आगी लागो तया सुखा । जेणें हरि नये मुखा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ॥ ध्रु ॥ जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ३ ॥

---

१ त. न द्यावा.–२ दे. त. पोसना–३ पं. दासी जैसी.–४ दे. सोडुनि. पं. साडुनियां.–५ दे. त. वेसनें.–६ पं. ठेवी–७ दे. त. येक–८ दे. शिळ–९ दे. सकळ. (हे दोन्ही पाठ मागून केलेले आहेत).–१० पं. अधमाचे वोंगळ गुण–११ पं. साहे.–१२ पं. राखा.–१३ पं. अपल्याचा.–१४ दे. मुडां.–१५ पं. तैशा.–१६ पं. वहुतांची.–१७ पं. तूर्तातूर्त.

२२९७. आतां न ह्मणे मी माझें । नेघें भार कांहीं ओझें[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं चि तारिता मारिता । कळों आलासी निरुता ॥ छ्र ॥ अवघा तूं चि जनार्दन । संत बोलती वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । तुझ्या रिगालों वोसंगा ॥ ३ ॥

२२९८. समुद्रवळयांकित पृथ्वीचें दान । करितां समान न ये नामा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि कोणीं न करावा आळस । ह्मणा रात्रीदिवस रामराम ॥ छ्र ॥ सकळ ही शास्त्रें[2] पठण करितां वेद । सरी नये गोविंदनामें[3] एकें ॥ २ ॥ सकळ ही तीर्थें[4] प्रयाग काशी । करितां नामाशीं तुळेति ना ॥ ३ ॥ कर्वतीं कर्मरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हें चि सार विठोबाचें ॥ ५ ॥

२२९९. अवघ्या वाटा जाल्या क्षीण कळीं[5] न घडे साधन । उचित विधि विधान न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तिपंथ बहु सोपा पुण्य नागवया[6] पापा । येणें जाणें खेपा येणें[7] चि एक खंडती ॥ छ्र ॥ उभारोनि बाहे विठो पालवीत आहे । दासां मी चि साहे[8] मुखें बोले आपुल्या ॥ २ ॥ भाविक विश्वासी पार उतरिलें[9] त्यांसी । तुका ह्मणे नासी कुतर्क्याचे कपाळीं ॥ ३ ॥

२३००. आह्मीं नामाचे धारक नेणों प्रकार आणीक । सर्व भावें एक विठ्ठल चि प्रमाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे जाणावें नेणावें गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख ध्यावें[10] वैष्णवांचे संगती ॥ छ्र ॥ भावबळें घालूं कास लज्जा चिंता दवडूं आस । पायीं निजध्यास ह्मणों[11] दास विष्णूचे ॥ २ ॥ भय नाहीं जन्म घेतां मोक्षपदीं[12] हाणों लाता । तुका ह्मणे सत्ता धरूं निकट सेवेची ॥ ३ ॥

२३०१. आह्मी हरिचे सवंगडे जुने ठायींचे वेडे बागडे । हातीं धरुनी कडे पाठीसवें वागविलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि भिन्न भेद नाहीं देवा आह्मां एकदेहीं[13] । नाहीं जालों कईं[14] एका एक वेगळे ॥ छ्र ॥ निद्रा करितां होतों पायीं सवें चि लंका घेतली तईं । वानरें[15] गोवळ गाई सवें चारित फिरतसों ॥ २ ॥ आह्मां नामाचें चिंतन राम कृष्ण नारायण । तुका ह्मणे क्षण खातां जेवितां न विसंभों[16] ॥ ३ ॥

१ पं. ०कांहीं । माझें तिळभरी नाहीं.–२ पं. शास्त्र.–३ दे. नाम एकें. पं. नामें एका०.–४ त. प्रयाग हे काशी. पं. प्रयागादि काशी.–५ पं. कली.–६ पं. नागवती.–७ पं. अवघ्या येणें खडंती.–८ पं. आहे–९ पं. पावविलें. त. उतरील.–१० पं. ०ध्यावें या वैष्णवांसंगती ।.–११ पं. ह्मणवूं–१२ पं. मोक्षसुखा.–१३ पं. त. एकदोही.–१४ त. कांहीं.–१५ दे. त. वानरें.–१६ पं. विसंबों.

२३०२. मागें बहुतां जन्मीं हें चि करित आलों आह्मी । भवतापश्रमी दुःखें पीडिलीं निववूं त्यां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गर्जों हरिचे पवाडे मिळों[1] वैष्णव बागडे । पाझर रोकडे काढूं पाषाणामध्यें ॥ छ्रु ॥ भाव शुद्ध नामावळी हर्षें नाचों पिटूं टाळी । घालूं पायां तळीं कळिकाळ त्यावळें[2] ॥ २ ॥ कामक्रोध बंदेखाणी[3] तुका ह्मणे दिले दोन्ही । इंद्रियांचे धणी आह्मी जालों गोसांवी ॥ ३ ॥

२३०३. अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चाल जाऊं संतांपुढें । वाद सांगेन निवाडें ॥ छ्रु ॥ तुज नांव जर नाहीं । तर माझें दाव काई ॥ २ ॥ [4]तुज रूप नाहीं । तर माझें दाव काई ॥ ३ ॥ खेळसी तूं लीळा । तेथें[5] मी काय वेगळा ॥ ४ ॥ साच तूं लटिका । तैसा मी ही ह्मणे तुका ॥ ५ ॥

२३०४. मंत्र चळे[6] पिसें लागतें सत्वर । अवद्ध ते फार तरले नामें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अशौच[7] तो बाधी आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ॥ छ्रु ॥ रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥ २ ॥ आणिकां भजना[8] बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ४ ॥

२३०५. नव्हती ते संत करितां कवित्व । संताचे ते आप्त नव्हती[9] संत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें नाहीं वेश सरतें आंडनांवें[10] । निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥ छ्रु ॥ नव्हती ते संत धरितां भोंपळा । करितां वाकळा प्रावरणें[11] ॥ २ ॥ नव्हती[12] ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणें नव्हती संत ॥ ३ ॥ नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥ ४ ॥ नव्हती[13] संत करितां तप तीर्थाटणें । सेविलिया वन नव्हती संत ॥ ५ ॥ नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्मउद्धूळणें नव्हती संत ॥ ६ ॥ तुका ह्मणे नाहीं निरसला देहे । [14]तों अवघे हे संसारिक ॥ ७ ॥

२३०६. हें चि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गुण गाईन आवडी । हे चि माझी सर्व जोडी ॥ छ्रु ॥ न लगे मुक्ति आणि[15] संपदा । संतसंग देईं सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे गर्भवासीं । सुखें घालावें आह्मासी ॥ ३ ॥

---

१ पं. मिळ्वू.–२ पं. यावळें.–३ पं. बंदीखाणी–४ पं. हें कडवे नाहीं.–५ पं. तरी काय मी वेगळा.–६ दे. पं. चळ.–७ दे. आशोचे त. आशौच्य.–८ पं. ०भजना विधि बोल्लिा०.–९ पं. होती (पण "न" लेखकप्रमादानें चुकला आहे असें उघड दिसतें)–१० त. सरत आड नावें. पं. सरत आड नांव –११ पं. प्रावर्ण तें. त. प्रावर्णे –१२ पं. हें कडवें या ठिकाणीं नसून "नव्हती संत करितां तप तीर्थाटणें०" या कडव्याच्या पुढें आहे.–१३ पं. नव्हती ते संत.–१४ पं. तंव हे अवघे ससारिक.–१५ पं. धनसपदा.

२३०७. भाग्यवंता हे परवडी। करिती जोडी जन्माची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [1]आपुलाल्या लाहों भावें। जें ज्या व्हावें तें आहे ॥ छ्रु ॥ इच्छाभोजनाचा दाता। न लगे चिंता करावी ॥ २ ॥ तुका ह्मणे आल्या थाऱ्या। वस्तु वऱ्या मोलाच्या ॥ ३ ॥

२३०८. वं[2]चुनियां पिंड। भाता दान करी लंड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसी याची चाली वरी। तैसा अंतरला दुरी ॥ छ्रु ॥ मेला राखे दिस। [3]ज्यालेपण जालें वोस ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा। लोभें न पुरे चि सेवा ॥ ३ ॥

२३०९. अधीरा माझ्या मना ऐकें[4] एकी मात। तूं कां रे दु[5]श्चित निरंतर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे चि चिंता काय खावें ह्मणऊनि। भले तुजहूनि पक्षिराज ॥ छ्रु ॥ पाहा तें चातक नेघे भूमिजळा। वरुषे उन्हाळा मेघ तया ॥ २ ॥ सकळयातींमध्यें ठक हा सोनार। त्याघरीं व्यापार झारियाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळीं वनीं जीव एक। तयापाशीं लेख काय असे ॥ ४ ॥

२३१०. कां रे नाठविसी कृपाळु देवासी। पोसितो जनासी एकला तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाळा दुंधा कोण करितें उत्पत्ती। वाढवी श्रीपति सैवें[6] दोन्हीं ॥ छ्रु ॥ फुटती तरुवर उष्णकाळमासीं। जीवन तयांसी कोण घाली ॥ २ ॥ तेणें तुझी काय नाहीं[7] केली चिंता। राहे त्या अनंता आठवूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्याचें नाम[8] विश्वंभर। त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ४ ॥

२३११. उदारा कृपाळा पतितपावना। ब्रिदें नारायणा साच तुझीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्णिलासी जैसा जाणतां नेणतां। तैसा तूं अनंता साच होसी ॥ छ्रु ॥ दैत्यां काळ भक्तां मेघश्याममूर्ति। चतुर्भुज हातीं शंख चक्र ॥ २ ॥ काम इच्छा तयां तैसा होसी राणी। यशोदेच्या स्तनीं पान करी ॥ ३ ॥ होऊनि सकळ कांहींच न होसी। तुका ह्मणे यासी वेद ग्वाही ॥ ४ ॥

२३१२. ऐका संतजन उत्तरें माझे वोबडे बोल। करीं लाड तुह्मांपुढें हो कोणी झणी कोपाल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उपाय साधन आइका कोण गति अवगति। दृढ बैसोनि सादर तुह्मी धरावें चित्तीं ॥ छ्रु ॥ धर्म तयासी घडे रे ज्याचे [9]स्वाधीन भाज। कर्म तयासी जोडे रे भीत नाहीं लाज ॥ २ ॥ पुण्य तें जाणां रे भाइनो पै[10]रउपकाराचें। परपीडा परनिंदा रे[11] खरें पाप तै[12]याचें ॥ ३ ॥

---

१ दे. आपुलाल्या लाहो भावें. पं. आपुलाल्या हो भावें –२ पं. वेचूनियां –३ दे. ज्यालेपणें –४ दे. ऐक एकी. पं. ऐक एक –५ पं. दुश्च –६ पं. स्वयें.–७ पं. केली नाहीं.–८ पं. नांव.–९ पं. आधीन.–१० पं. परोपकाराचें.–११ पं. 'रे' नाहीं.–१२ पं. त्याचें.

लाभ तयासी जाला रे मुखीं देव उच्चारी । प्रपंचापाठीं गुंतला ह्मणी तयासी च योरी ॥ ४ ॥ सुख तें जाणा रे भाइनो संतसमागम । दुःख तें जाणा रे भाइनो सेम तेथें विपमें ॥ ५ ॥ साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धि । पैराधीनासी आहे घात रे थोर जाण संबंधी ॥ ६ ॥ मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें राखे । अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥ ७ ॥ जाणता तयासी बोलिजे जाणे समाधान । नेणता तयासी बोलिजे वाद करी भूषण ॥ ८ भला तो चि एक जाणा रे गयावर्जन करी । बुरा धन नष्ट मेळवी परद्वार जो करी ॥ ९ ॥ आचारी अन्न काढी रे गाई अतितभाग । अनाचारी करी भोजन ग्वाही नसतां संग ॥ १० ॥ स्वहित तेणें चि केलें रे भूतीं देखिला देव । अनहित तयाचें जालें रे आणी अहंभाव ॥ ११ ॥ धन्य जन्मा ते चि आले रे एक हरिचे दास । धिग ते विषयीं गुंतले केला आयुष्या नास ॥ १२ ॥ जोहेरी तो चि एक जाणा रे जाणे सिद्धलक्षणें । वेडसर तो भुले रे वरदळभूषणें ॥ १३ ॥ बळियाढा तो चि जाणा रे भक्ति दृढ शरीरीं । गांढ्या तयासी बोलिजे एक भाव न धरी ॥ १४ ॥ खोल तो वचन गुरूचें जो गिळूनि बैसे । उथळ धीर नाहीं अंगीं रे ह्मणे होईल कैसें ॥ १५ ॥ उदार तो जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं । कृपण तयासी बोलिजे पडे उपाधिडाईं ॥ १६ ॥ चांगलेंपण तें चि रे ज्याचें अंतर शुद्ध । वोंगळ मैळिण अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥ १७ ॥ गोड तें चि एक आहे रे सार विठ्ठलनाम । कडु तो संसार रे लक्षचौऱ्याशी जन्म ॥ १८ ॥ तुका ह्मणे मना धरीं रे संतसंगतिसोई । न लगे कांहीं करावें राहें विठ्ठलपायीं ॥ १९ ॥

## ॥ येकाखडी ॥ १ ॥

२३१३. करावा कैवाड । नाहीं तरी आला नाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्मरा पंढरीचा देव । मनीं धरोनियां भाव ॥ ध्रु ॥ खचविलें काळें । उगवा लवलाहें जाळें ॥ २ ॥ गजर नामाचा । करा लवलाहे वाचा ॥ ३ ॥ घरटी चक्रफेरा । जन्ममृत्याचा भोंवरा ॥ ४ ॥ नानाहव्यासांची जोडी । तृष्णा करी देशधडी ॥ ५ ॥ चरणीं ठेवीं चित्त । ह्मणवा देवाचे अंकित ॥ ६ ॥ छंद नानापरी । कळा न पविजे हरी ॥ ७ ॥ जगाचा जनिता । भुक्तिमुक्तींचा ही दाता ॥ ८ ॥ ह्मणी माझें माझें । भार वागविसी ओझें ॥ ९ ॥ यांची कां रे गेली बुद्धि । नाहीं तेरायाची

१ दे. पं. शम तेथें विशम–२ त. विशम.–३ पं. पराधीन–४ पं. जाणा–५ पं. इंद्रिय त. इंद्रियें.–६ पं. सारलक्षण.–७ पं. "चि" नाहीं.–८ पं. आयुष्याचा नाश.–९ दे. जोहोरि तो०.–१० पं. सिद्धलक्षण.–११ पं. तो चि जीव०.–१२ दे. मळिन.–१३ पं. 'एक' नाहीं.–१४ पं. रे धरीं.–१५ पं. ठेवीं–१६ पं. तयाची हे शुद्धि.

लाभ तयासी जाला रे मुखीं देव उच्चारी । प्रपंचापाठीं गुंतला ह्मणी तयासी च थोरी ॥ ४ ॥ सुख तें जाणा रे भाइनो संतसमागम । दुःख तें जाणारे भाइनो सेम[1] तेथें विषमें[2] ॥ ५ ॥ साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धि । पराधीनासी[3] आहे घात रे थोर जाण[4] संबंधी ॥ ६ ॥ मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें[5] राखे । अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥ ७ ॥ जाणता तयासी बोलिजे जाणे समाधान । नेणता तयासी बोलिजे वाद करी भूषण ॥ ८ भला तो चि एक जाणा रे गयावर्जन करी । बुरा धन नष्ट मेळवी परद्वार जो करी ॥ ९ ॥ आचारी अन्न काढी रे गाई अतितभाग । अनाचारी करी भोजन ग्राही नसतां संग ॥ १० ॥ स्वहित तेणें चि[6] केलें रे भूतीं देखिला देव । अनहित तयाचें जालें रे आणी अहंभाव ॥ ११ ॥ धन्य जन्मा ते चि आले रे एक हरिचे दास । धिग ते विषयीं गुंतले केला आयुष्या[8] नास ॥ १२ ॥ जोहेरी[9] तो चि एक जाणा रे जाणे सिद्धलक्षणें[10] । वेडसरु तो भुले रे वरदळभूषणें ॥ १३ ॥ बळियाढा तो चि जाणा रे भक्ति दृढ शरीरीं । गांढ्या तयासी बोलिजे एक भाव न धरी ॥ १४ ॥ खोल तो वचन गुरूचें जो गिळूनि बैसे । उथळ धीर नाहीं अंगीं रे ह्मणे होईल कैसें ॥ १५ ॥ उदार तो[11] जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं । कृपण तयासी बोलिजे पडे उपाधिडाईं ॥ १६ ॥ चांगलेंपण तें चि रे ज्याचें अंतर शुद्ध । वोंगळ मैळिण[12] अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥ १७ ॥ गोड तें चि एक[13] आहे रे सार विठ्ठलनाम । कडु तो संसार रे लक्षचौऱ्याशी जन्म ॥ १८ ॥ तुका ह्मणे मना धरीं[14] रे संतसंगतिसोई । न लगे कांहीं करावें राहें विठ्ठलपायीं ॥ १९ ॥

## ॥ येकाखडी ॥ १ ॥

२३१३. करावा कैवाड । नाहीं तरी आला नाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्मरा पंढरीचा देव । मनीं धरोनियां भाव ॥ ध्रु ॥ खचविलें काळें । उगवा लवलाहें जाळें ॥ २ ॥ गजर नामाचा । करा लवलाहे वाचा ॥ ३ ॥ घरटी चक्रफेरा । जन्ममृत्याचा भोंवरा ॥ ४ ॥ नानाहव्यासांची जोडी । तृष्णा करी देशधडी ॥ ५ ॥ चरणीं ठेवीं[15] चित्त । ह्मणवा देवाचे अंकित ॥ ६ ॥ छंद नानापरी । कळा न पविजे हरी ॥ ७ ॥ जगाचा जनिता । भुक्तिमुक्तींचा ही दाता ॥ ८ ॥ ह्मणी माझें माझें । भार वागविसी ओझें ॥ ९ ॥ यांची कां रे गेली बुद्धि । नाहीं तरायाची[16]

---

१ दे. प. शम तेथे विशम –२ त. विशम.–३ पं. पराधीन –४ पं. जाणा –५ पं. इद्रिय त. इंद्रियें.–६ प. सारलक्षण.–७ पं. "चि" नाहीं –८ पं. आयुष्याचा नाश.–९ दे. जोहोरि तो०.– १० पं. सिद्धलक्षण.–११ पं. तो चि जीव०.–१२ दे. मळिन –१३ पं. 'एक' नाहीं –१४ पं. रे धरीं.– १५ पं. ठेवीं –१६ पं. तयाची हे शुद्धि.

शुद्धि ॥ १० ॥ टणक धाकुलीं । अवघीं सरती विठ्ठलीं ॥ ११ ॥ ठसा त्रिभुवनीं । उदार हा शिरोमणि ॥ १२ ॥ डगमगी तो वांयां जाय । धीर नाहीं गोता खाय ॥१३ ॥ ढळों नये जरी । लाभ घरिंचिया घरीं ॥ १४ ॥ नाहीं ऐसें राहे । कांहीं नासिवंत देहे ॥ १५ ॥ तरणा भाग्यवंत । नेटे हरिकीर्तनांत ॥ १६ ॥ थडी टाकी पैलतीर । बाहे ठोके होय वीर ॥ १७ ॥ देया[1] तिचें नांव । अहंकार जाय जंव ॥ १८ ॥ धनधान्य हेवा । नांडे[2] कुटुंबाची सेवा ॥ १९ ॥ नाम गोविंदाचें । घ्या रे हें चि भाग्य साचें ॥ २० ॥ परउपकारा । वेचा शक्ति निंदा वारा ॥ २१ ॥ फळ भोग इच्छा । देव आहे जैयां[3] तैसा ॥ २२ ॥ बरवा ऐसा छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ २३ ॥ भविष्याचे माथां । भजन न द्यावें[4] सर्वथा ॥ २४ ॥ माग लागला न संडीं । अळसें माती घालीं तोंडीं ॥ २५ ॥ यश कीर्ति[5] मान । तरी जोडे नारायण ॥ २६ ॥ रवि लोपे तेजें । जरी हारपे हें दुजें ॥ २७ ॥ लकार लाविला । असतां नसतां चि उगला ॥ २८ ॥ वासनेची[6] धाडी । बंद खोड्या नाड्यां[7] बेडी ॥ २९ ॥ सरतें[8] न कळे । काय झांकियेले डोळे ॥ ३० ॥ खंती ते न धरा । हाणें[9] गाढव कुतरा ॥ ३१ ॥ सायासाच्या जोडी । पिकें[10] काढियेल्या पेडी ॥ ३२ ॥ हातीं हित आहे । परि न करिसी पाहें ॥ ३३ ॥ अळंकार लेणें । ल्या रे तुळसीमुद्राभूषणें[11] ॥ ३४ ॥ ख्याती[12] केली विष्णुदासीं । तुका ह्मणे पाहा कैसी ॥ ३५ ॥

२३१४. देवें देऊळ सेविलें । उदक कोरडें चि ठेविलें[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे मत गूढ उमानें कांहीं । तूं आपआपणापें पोंहीं[14] ॥ ध्रु ॥ पाठें पूर वोसंडला । सरिता सागर तुंबोनि ठेला ॥ २ ॥ वांजेघरीं[15] बाळ तान्हा । एक बाळी दों कानां ॥ ३ ॥ तुका ह्मणे पैस । अनुभविया ठावा गोडीरस ॥ ४ ॥

## ॥ *लोहागांवीं कीर्तनांत मेलें मूल जीत झालें ते समयीं स्वामींनीं अभंग केले ते

२३१५. अशक्य तों[16] तुह्मां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ॥ ध्रु ॥

१ पं. 'दमातिचें नांवें । अहंकार जाय जीवें ॥' असें आहे. दे. पूर्वी असा पाठ होता; मागून फिरविला आहे.–२ पं. नाड.–३ पं. जैसा.–४ दे. 'न द्यावे' या बद्दल 'नेदावें'.–५ दे. कीर्त.–६ दे. पं. वासने चि.–७ पं. नाड.–८ पं. सार तें.–९ पं. होय–१० त. पिकें. दे. पिकें' असतां 'पिके' केलें आहे. पं. पीक काढिले ते पेडी.–११ पं. तुळशीभूषणें.–१२ दे. ख्याति त. क्षाति –१३ त. टेलें.–१४ दे. कांहीं.–१५ पं. वाझेघरीं.–१६ पं. तें.

* त. कीर्त० मूल मृ०. पं. लोहोगांवीं मूल कीर्तनांत जीवंत जालें ते अ०.

थोर भाग्य आह्मी समर्थाचे कासे[1]। ह्मणवितों दास काय थोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे निवतावे डोळे। दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ३ ॥

२३१६. दाता तो एक जाणा। नारायणा स्मरवी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक नासिवंतें काय। न सरे हाय ज्यांच्यानें[3] ॥ छ ॥ यावें तयां काकुलती। जे दाविती सुपंथ ॥ २ ॥ तुका ह्मणे उरी नुरे। त्याचे[5] खरे उपकार ॥ ३ ॥

## अलंकापुरीं ब्राह्मण धरणें बसून बेताळीस दिवस उपवासी होता त्यास दृष्टांत कीं देहूस तुकोबापाशीं जाणें. ब्राह्मण स्वामीपें आला त्याबद्दल अभंग ॥ ३१ ॥

२३१७. श्रीपंढरीशा पतितपावना। एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनाथां जीवांचा तूं काजकैवारी। ऐसी चराचरीं ब्रिदावळी ॥ छ ॥ न संगतां[4] कळे अंतरींचें गुज। आतां तुझी लाज तुज देवा ॥ २ ॥ आळिकर ज्याचें करिसी समाधान। अभयाचें दान देऊनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं चि खेळें दोहीं ठायीं। नसेल तो देई धीर मना ॥ ४ ॥

२३१८. अगा ये उदारा अगा विश्वंभरा। रखुमाईच्या वरा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा। अगा मेघश्यामा विश्वजनित्या ॥ छ ॥ अगा कृपावंता जीवन तूं दाता। अगा सर्वसत्ता धरितया ॥ २ ॥ अगा सर्वजाणा अगा नारायणा। करुणावचना चित्त द्यावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं अधिकार तैसी। सरती पायांपाशीं केली मागें ॥ ४ ॥

२३१९. नव्हें दास खरा। परि जाला हा डांगोरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यासी काय करूं आतां। तूं हें सकळ जाणता ॥ छ ॥ नाहीं पुण्यगांठी। जें[6] हें वेचूं कोणासाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कां उपाधी। वाढविली कृपानिधी ॥ ३ ॥

२३२०. तुजविण सत्ता। नाहीं वाचा वदविता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे आह्मी जाणों दास। ह्मणोनि जालों उदास ॥ छ ॥ तुह्मी दिला धीर। तेणें मन झालें स्थिर ॥ २ ॥ तुका ह्मणे आड। केलों मी हें तुझें कोड ॥ ३ ॥

---

१ पं. समर्थाची.–२ त. काशे.–३ पं. ज्याचनी.–४ पं. सांगतां.–५ पं. त्यावें.–६ पं. देहे वेचूं.

२३२१. काय मी जाणता । तुह्माहूनि अनंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जो[1] हा करूं अतिशय । कां तुह्मां दया नये ॥ छ ॥ काय तुज नाहीं कृपा । विश्वाचिया मायबापा ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । माझी वदे तुह्मांहूनि ॥ ३ ॥

२३२२. काय[2] ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐकोनियां लिखित । ह्मूण जाणवली हे मात ॥ छ ॥ तरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवा[3] । होतां सांभाळावें देवा ॥ ३ ॥

२३२३. ठेवूनियां डोई । पायीं जालों उतराई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कारण तें तुह्मी जाणां । मी तराळ नारायणा ॥ छ ॥ प्रसंगीं वचन । दिलें तें चि खावें अन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे भार । तुह्मी जाणां थोडा फार ॥ ३ ॥

## उपदेश अभंग ॥ ११ ॥

२३२४. नको कांहीं पडों ग्रंथांचिये[4] भरीं । शीघ्र व्रत करीं हें चि एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥ छ ॥ साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं[5] न चुकती ॥ २ ॥ उधाराचा मोक्ष होय नव्हे[6] ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥ ३ ॥ रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरि ॥ ४ ॥ तुका ह्मणे घालीं नामासाटीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

२३२५. नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोळें । आणूनि निराळें द्यावें हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इंद्रियांचा जय साधुनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥ छ ॥ उपास पारणीं अक्षरांची आटी । सत्कर्मा शेवटीं असे फळ ॥ २ ॥ आदरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाणें[7] ॥ ३ ॥ स्वप्नींच्या घायें विवळसी[8] वांयां । रडे रडतियासवें मिथ्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासी जाय वेगीं ॥ ५ ॥

२३२६. त्यजिलें[9] भेटवी आणूनि वासना । दाविल्याचे जना काय काज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आळवावें देवा भाकूनि करुणा । आपुलिया मना साक्षें[10] करीं ॥ छ ॥ नाहीं जावें यावें दुरूनि लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे[11] हा आहे कृपासिंधु । तोडी भवबंधु तात्काळिक ॥ ३ ॥

---

१ पं. जे.—२ त. काय.—३ त. ०ठेवा । होता सांभाळी हा ठेवा ॥—४ दे. ग्रथ,चे—५ दे. सेकों.—६ पं. नोहे—७ पं. जाणे.—८ दे. त. विळवसी.—९ दे. त. तजिलें—१० पं. साक्षे—११ पं. ह्मणे तो हा.

२३२७. गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ ध्रु ॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे आळी । जेवीं नुरे चि वेगळी ॥ ३ ॥

२३२८. ज्याचें[1] जया ध्यान । तें चि होय त्याचें मन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ ध्रु ॥ सम खूण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥ २ ॥ तुका ह्मणे नभा । परता अनूचा ही गाभा ॥ ३ ॥

२३२९. पाहुनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरि वांयां केली तोंडपिटी । उरी ते शेवटी उरलीसे[2] ॥ ध्रु ॥ पढोनियां वेद हरिगुण गावे[3] । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥ २ ॥ तपतीर्थाटणें[4] तेव्हां कार्यसिद्धि । स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं ॥ ३ ॥ यागयज्ञादिक काय दानधर्म । तरि फळ नाम कंठीं राहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको कावाडाचे भरी । पडों सार धरीं हें चि एक ॥ ५ ॥

२३३०. सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचें[5] दिलें त्यासी । पावे फळ आपणासी ॥ ध्रु ॥ आहे हा आधार । नाम त्याचें विश्वंभर ॥ २ ॥ नाहीं रिता ठाव । तुका ह्मणे पसरीं भाव ॥ ३ ॥

२३३१. संकोचोनि काय जालासी लहान । घेई अपोशण ब्रह्मांडाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करोनि पारणें आंचवें संसारा । उशीर उशिरा लावूं नको ॥ ध्रु ॥ घरकुलानें[6] होता पडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥ झुगारूनि दुरी लपविलें काखे । तुका ह्मणे वाखे कौतुकाचे ॥ ३ ॥

२३३२. माझ्या बापें मज दिधलें भातुकें । ह्मणोनि कवतुकें क्रीडा करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें ॥ ध्रु ॥ घेऊनि विभाग जावें लवलाह्या । आलेति यां[7] ठाया आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानदेवीं समुदाय । करावा मी पाय येऊन वंदूं ॥ ३ ॥

२३३३. ज्ञानियांचा गुरु[8] राजा महाराव । ह्मणती ज्ञानदेव ऐसें तुह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ॥ ध्रु ॥ ब्रह्मादिक जेथें तुह्मां वोळगणे[9] । इतर तुळणें काय पुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणे[10] युक्तीची ते खोली । ह्मणोनि ठेविली पायीं डोई ॥ ३ ॥

---

१ पं. जया ज्याचें.–२ पं. उरली आहे.–३ पं. गाये –४ दे. तप तिर्थाटण.–५ पं. त्याचें दिलें त्यासी पावे । फळ आपणासी फावे ॥.–दे. पूर्वी पं. प्रमाणें होतें, मागून फिरविलें आहे.–६ त. घरकुल्यानें.–७ त. त्या.–८ पं. तूं त. ०राजा गुरु महा०.–९ पं. वोळगण । आणीक तुळ०.–१० पं. नेणों.

२३३४. बोलिलीं लेंकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करा क्षमा अपराध । महाराज तुह्मी सिद्ध ॥ छ ॥ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥ ३ ॥
॥ ११ ॥

२३३५. काय तुह्मी जाणां । करूं अन्हेर नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी या लटिक्याची गोही[1] । निवडली दुसरे ठायीं ॥ छ ॥ कळों अंतरींचा गुण । नये फिटल्यांवांचून[2] ॥ २ ॥ आणिलें अनुभवा । जनाच्या हें ज्ञानदेवा ॥ ३ ॥ आणीक कोणी भिती । त्यांच्या[3] चिंतनें विश्रांति ॥ ४ ॥ तुका ह्मणे बीज पोटीं । फळ तैसें चि सेवटीं ॥ ५ ॥

२३३६. अविश्वासीयाचें शरीर सुतकी । विटाळ पातकी भेद वाही[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला[5] पुढें ॥ छ ॥ मातेचा संकल्प व्हावा राजबिंडा । कपाळींचा[6] धोंडा उभा ठाके ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं अन्नां[7] न मिळे जैसा ॥ ३ ॥

२३३७. तामसाचीं तपें पापाची सिदोरी । तमोगुणें भरी घातले[8] ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राज्यमदा आड सुखाची संपत्ति । उलंघूनि जाती निरयगांवा ॥ छ ॥ इंद्रियें दमिलीं इच्छा जीती[9] जीवीं । नागविती ठावीं नाहीं पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिभजनावांचून । करिती तो सीण पाहों नये ॥ ३ ॥

२३३८. हरिकथेवांचूनें[10] इच्छिती स्वहित । हरिजनें[11] चित्त न घला तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाईल भंगोन आपुला विश्वास । होईल या नास कारणांचा ॥ छ ॥ ज्याचिया बैसावें भोजनपंगती । त्याचिया संगती तैसें खावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जाणेति जाणते । देवा ही परते थोर तुह्मी ॥ ३ ॥

२३३९. सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हुंतूंपण कामा नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेईल जीव कां सारील परतें । भंगलिया चित्तें सांदी जेनों[12] ॥ छ ॥ खद्योतें दावावी रवी केवीं वाट । आपुलें चि नीट उसंतावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तो ज्ञानाचा सागर । परि नेंदी अगर भिजों भेदें ॥ ३ ॥

२३४०. जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ छ ॥

---

१ त. ग्वाही.—२ पं. फुटल्या०—३ पं. याच्या.—४ पं. वाहे.—५ पं. पुढें आला.—६ दे. कपाळीचें. त. कपाळीचें तोंडा उभें ठाके.—७ पं. परिपाका जाणा रसा नये ।.—८ पं. घातलेसे.—९ दे. जिति. पं. जिती. त. जीते.—१० पं. हरिकथेविण.—११ पं. हरिजनि चित्त न घाला तेथे.—१२ दे. सादी जनां.

जेणें हे घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ॥ ३ ॥

२३४१. वहुतां छंदाचें वहु वसे जन । नये वांटूं मन त्यांच्या संगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ ध्रु ॥ सुखाची समाधि हरिकथा माउली । विश्रांति साउली सिणलियांची[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे वुडे बांधोनि दगड । तेथें काय कोड धांवायाचें ॥ ३ ॥

२३४२. हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याची वाणी अमंगळ । कान उंदरांचें[2] बीळ ॥ ध्रु ॥ सांडुनि हा रस । करिती आणीक सायास ॥ २ ॥ तुका ह्मणे पिसीं । वांयां गेलीं किती ऐसीं ॥ ३ ॥

२३४३. प्रेम अमृताची धार । वाहे देवा[3] ही समोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऊर्ध्ववाहिनी[4] हरिकथा । मुगुटमणि सकळां[5] तीर्थां ॥ ध्रु ॥ शिवाचें[6] जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥ २ ॥ तुका ह्मणे हरि । इची स्तुति वाणी थोरी ॥ ३ ॥

२३४४. आतां माझ्या मना । इची घडो उपासना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें[7] करीं पांडुरंगा । प्रेम वोसंडेसें अंगा ॥ ध्रु ॥ सर्व काळ नये । वाचे विठ आड भये ॥ २ ॥ तुका वैष्णवांसंगती । हें चि भजन[8] पंगती ॥ ३ ॥

२३४५. उपास करादी[9] । तिहीं करावीं वापुडीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी विठोबाचे दास । चिंता धुंगारिली[10] आस ॥ ध्रु ॥ भक्तीच्या उत्कर्षें । नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ ३ ॥

२३४६. करविली तैसी केली कटकट । वांकडें[11] कीं नीट देव जाणे ॥ १ ॥ कोणाकारणें हें जालेंसे निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे मी या अभिमाना वेगळा । घालूनि गोपाळा भार असें ॥ ३ ॥

२३४७. तुह्मी येथें पाठविला धरणेकरी । त्याची जाली परी आइका ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय पुढें वाढवुनि विस्तार । जाला समाचार आइका तो ॥ ध्रु ॥ देवाचे उचित एकादश अभंग । महाफळ त्याग करूनि गेला ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा समर्पूनि पायीं । जालों उतराई ठावें असो ॥ ३ ॥

॥ ३१ ॥

---

१ पं. सिणल्या.–२ पं. उंदिराचें –३ त. देवा हे. पं. देवाचे.–४ दे. त. उर्ध्व वाहिनी.–५ पं. सकळ तीर्थां –६ पं. जीवाचें –७ पं. करीं गा पांडुरंगा ।–८ पं. भोजनपंगती.–९ त. कराडी.–१० दे. धुगारावी.–११ त. वांकडी कां नीट॰. पं. वाकुडें हें नीट॰.

२३४८. मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभावा ॥ छ ॥ आला होता गेला पूर । धरिला धीर जीवनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ॥ ३ ॥

२३४९. माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोष्टी न करीं नांव नेघें । गेलों दोघें खंडोनी ॥ छ ॥ स्तुतिसमवेत निंदा । केला धंदों उदंड ॥ २ ॥ तुका ह्मणे निवांत ठेलों । वेचित आलों जीवित्व ॥ ३ ॥

२३५०. लैवविलें तया सर्वे लवे जैाती । अभिमाना हातीं सांपडेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ॥ छ ॥ अर्चन वंदन नवविधा भक्ति । दया क्षमा शांति तया ठायीं ॥ २ ॥ तये गांवीं नाहीं दुःखाची वसती । अवघा चि भूतीं नारायण ॥ ३ ॥ अवघें चि जालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ॥ ४ ॥ तुका ह्मणे गाजे वैकुंठीं सोहळा । यांही भूमंडळामाजी कीर्ति ॥ ५ ॥

२३५१. पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ॥ १ ॥ व्रत एकादशी करीन उपवासी । गाइन अहर्निशीं मुखीं नाम ॥ २ ॥ नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचें तुका ह्मणे ॥ ३ ॥

२३५२. संपदा सोहळा नावडे मनाला । करी तें टकळा पंढरीचा ॥ १ ॥ जावें पंढरिसी आवडी मनासी । कधीं एकादशी आषाढी हे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥ ३ ॥

२३५३. कथनी पठणी करूनि काय । वांचुनि रहणी वांयां जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुखीं वाणी अमृतगोडी । मिथ्या भुकें चरफडी ॥ छ ॥ पिळणी पाक करितां दगडा । काय जडा होय तें ॥ २ ॥ मधु मेळवूनि माशी । आणिका सांसी पारधिया ॥ ३ ॥ मेळऊनि धन मेळवी माती । लोभ्या हातीं तें चि मुखीं ॥ ४ ॥ आपलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ५ ॥

२३५४. उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वरें सेवन उपकारा । घ्यावें घ्यावें या उत्तरा ॥ छ ॥ सरळ आणि मृद । कथा पाहावी ते ऊर्ध्व ॥ २ ॥ गात जैात तुका । हा चि उपदेश आइका ॥ ३ ॥

---

१ पं. देहभाव —२ पं. धावा.—३ पं. लवविली.—४ त. लविजेती.—५ पं. आणि या भूरळा०.—
६ पं. उपासी ( ह्मणजे "उपवासी" व "उपासी" असे दोन शब्द यांत आहेत ).—७ पं. करितों —
८ पं. उद्योग मानसीं.—९ पं. आणिकासी पारधीया ।.—१० दे. उर्ध.—११ पं. जातो.

२३५५. कथाकाळींची मर्यादा सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा हें चि एक आवडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ टाळ वाद्य गीत नृत्य अंतःकरणें प्रेमभरित । वाणिता तो कीर्त तद्भावने लेखावा ॥ ध्रु ॥ नये अळसें मोडूं अंग कथे कानवडें हुंग । हेळणेचा रंग दावी तो चांडाळ ॥ २ ॥ तोंडीं विडा माने ताठा थोरपणें घाली गेंठो । चित्त नेदी नामपाठा गोष्टी लावी तो चांडाळ ॥ ३ ॥ कथे इच्छी मान दावूनियां थोरपण । रजा संकोच न लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥ ४ ॥ आपण वैसे वाजेवरी सामान्य हरिच्या दासां धरी । तरि तो सुळावरी वाहिजे निश्चयेसीं ॥ ५ ॥ येतां न करी नमस्कार कर जोडोनियां नम्र । न ह्मणतां थोर आणिकां खेटी तो चांडाळ ॥ ६ ॥ तुका विनवी जना कथे नाणावें अवगुणा । करा नारायणा ऋणी समर्पक भावें ॥ ७ ॥

२३५६. कथा देवाचें ध्यान कथा साधना मंडण । कथे ऐसें पुण्य आणीक नाहीं सर्वथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ ध्रु ॥ मंत्र स्वल्प जना उच्चारितां वाचे मना । ह्मणतां नारायणा क्षणें जळती महा दोष ॥ २ ॥ भावें करितां कीर्तन तरे तारी आणीक जन । भेटे नारायण संदेह नाहीं ह्मणे तुका ॥ ३ ॥

२३५७. कथा त्रिवेणीसंगम देव भक्त आणि नाम । तेथींचें उत्तम चरणरज वंदितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळती दोषांचे डोंगर शुद्ध होती नारी नर । गाती ऐकती सादर जे पवित्र हरिकथा ॥ ध्रु ॥ तीर्थें तया ठाया येती पुनीत व्हावया । पर्वकाळ पांया तळीं वसे वैष्णवां ॥ २ ॥ अनुपम्य हा महिमा नाहीं द्यावया उपमा । तुका ह्मणे ब्रह्मा नेणे वर्णूं या सुखा ॥ ३ ॥

२३५८. सांडूनि कीर्तन न करीं आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां या चि लागीं ॥ ध्रु ॥ टाळी वांऊनियां विठ्ठल ह्मणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा नुपेक्षावें आह्मां । न्यावें निजधामा आपुलिया ॥ ३ ॥

२३५९. जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि बळिवंत गाढें । आनंद करूं दिंडीपुढें ॥ ध्रु ॥ कळि पापाची हे मूर्ति । नामखड्ग घेऊं हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं । वळें दमामे ही लावूं ॥ ३ ॥

---

१ पं. अंत करण—२ त. गाठा—३ त. संकोचोन.—४ दे. सामान—५ दे. त. ह्मणवितां.—६ दे. भक्त आणि देव नाम —७ दे. वाहूनियां त. वाहोनियां —८ पं. नामखर्ग—९ पं. हे.

२३६०. यॆम सांगे दूतां तुह्मां नाहीं तेथें सत्ता । जेथें होय कथा सदा घोष नामाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका जाऊं तया गांवां नामधारकाच्या शिवें । सुदर्शन यावा घरटी फिरे भोंवती ॥ छ्र ॥ चक्र गदा घेउनी हरि उभा असे त्यांचे द्वारीं । लक्ष्मी कामारी रिद्धिसिद्धीसहित ॥ २ ॥ ते बळियाशिरोमणी हरिभक्त ये मेदिनी । तुका ह्मणे कानीं यम सांगे दूतांचे ॥ ३ ॥

२३६१. कान्हया रे जगजेठी । देई भेटी एकवेळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय मोकलिलें वनीं । सावजांनीं वेढिलें ॥ छ्र ॥ येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहिलें मागें । एवढ्या वेगें अंतरला ॥ ३ ॥

२३६२. आपुल्या आह्मी पुसिलें नाहीं । तुज कांहीं कारणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें मागें धांवत आलों । कांहीं बोलों यासाटीं ॥ छ्र ॥ वहुत दिसें होतें मनीं । घ्यावी धणी एकांतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे उभा राहें । कान्हो पाहें मजकडे ॥ ३ ॥

२३६३. धन्य बो ह्या ऐशा नारी । घरीं दारीं नांदती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चोरूनिया तुजपाशीं । येतां त्यांसी न कळतां ॥ छ्र ॥ दोन्हीं ठायीं समाधान । सम कठिण बहुतचि ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥ ३ ॥

२३६४. उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेटाळिला भोंवता हरी । मयूरफेरीं नाचती ॥ छ्र ॥ मना आले करिती चार । त्या फार हा एकला ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणीं । निरंजनीं मीनलिया ॥ ३ ॥

२३६५. विषमांची शंका वाटे । सारिखें भेटे तरी सुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि चोरिलें जना । आल्या रानां एकांतीं ॥ छ्र ॥ दुजियासी कळों नये । जया सोय नाहीं हे ॥ २ ॥ तुका ह्मणे मोकळें मन । नारायण भोगासी ॥ ३ ॥

२३६६. आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न घडे मागें परतें मन । नारायण संभोगी ॥ छ्र ॥ वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियांत ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतर्ध्यानीं । जीव जीवनीं विराल्या ॥ ३ ॥

२३६७. कोणी सुना कोणी लेंकी । कोणी एकी संतता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियांची जगनिंदे । जाली धिंद सारखी ॥ छ्र ॥ अवघ्या अवघ्या चोरा । विना वरा मायबापा ॥ २ ॥ तुका ह्मणे करा सेवा । आलें जीवावर तरी ॥ ३ ॥

---

१ पं. यमधर्म—२ त. सोंवा पं. शिवा.—३ दे. येवा—४ पं. दिवस—५ पं. वाबा ऐशा॰—६ पं. बहुता चि।—७ दे. त. पं. मयोरफेरीं.—८ दे. त. निर.जनी.—९ दे. विषमाची.—१० दे. त. पं. राणां.—११ पं. परतो—१२ पं. ■तता—१३ त. जगनिंद्य.

२३६८. येथील जे[1] एक घडी । तये जोडी पार नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती त्यांचा सासुरवास । कैंचा रस हा तेथें ॥ छ्र ॥ अवघे दिवस गेले कामा । नाहीं जन्मा खंडण ॥ २ ॥ तुका ह्मणे रतल्यों[2] जनीं । सोडा क्षणी कान्होबा ॥ ३ ॥
॥ ८ ॥

२३६९. चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचिये । घोष जयजयकार सदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायण घरीं सांठविलें धन । अवघे चि वाण तया पोटीं ॥ छ्र ॥ सवंग सकळां पुरे घणीवरी । सेवावया नारी नर बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु पिकाविला ॥ ३ ॥

२३७०. करिती तया वेवसाव आहे । येथें व्हा रे साहे एकां एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गातां आइकतां समान चि घडे । लाभें लाभ जोडे विशेषता ॥ छ्र ॥ प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं । नटे टाळी रंगीं शूरत्वेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुजन्मांचें खंडण । होईल हा सीण निवारोनि ॥ ३ ॥
॥ २ ॥

## स्वामींचे अभंगांचें नांव काढून सालोमालो आपुलें नांव घालीत त्यावर अभंग ॥ ८ ॥

२३७१. नाहीं घाटावें लागत । एका सितें कळे भात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षीर निवडतें पाणी । चोंची हंसाचिये आणी ॥ छ्र ॥ आंगडें फाडुनि घोंगडें करी । अवकळा तये परी ॥ २ ॥ तुका ह्मणे कण । भुसीं निवडे[3] कैंचा सीण ॥ ३ ॥

२३७२. सालोमालो हरिचे दास । ह्मणउन केलों[4] अवघा नास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें बचमंगळ केलें । ह्मणती एकांचें आपुलें ॥ छ्र ॥ मोडूनि संतांचीं वचनें । करिती आपणां भूषणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कवी । जगामधीं रूढ दावी ॥ ३ ॥

२३७३. जेयाचे[5] अळंकार । बुडवूनि होती चोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांसी तोंडणाची[6] पूजा । योग घडे बऱ्या वोजा ॥ छ्र ॥ अभिलाषाच्या सुखें । अंतीं होती काळीं मुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरा । होय भूषण मातेरा ॥ ३ ॥

२३७४. कालवूनि विष । केला अमृताचा नास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशा अभाग्याच्या बुद्धि । सत्य लोपी नाहीं शुद्धि ॥ छ्र ॥ नाक कापुनि लावी सोनें । कोण अळंकार तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे वावी । मोडूनि मदार बांधावी ॥ ३ ॥

---

१ दे. जें.–२ पं. रातल्या.–३ दे. निवडितें. पं. निवडिते –४ पं. अवघा केला.–५ पं. जयांचे.–६ ताडण चि.

२३७५. कण भुसाच्या आधारें । परि तें निवडितां बरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय घोंघाणिया घाणी । ताकामध्यें घाटी लोणी ॥ छ[1] ॥ सुइणीपुढें चेंटा । काय लपविसी चाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञान । दिमाकाची भेंनभन[2] ॥ ३ ॥

२३७६. विकल तेथें विका । माती नांव ठेवूनि बुका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा तो निवाड्याचा ठाव । खऱ्या खोट्या निवडी भाव ॥ छ ॥ गव्हंआरे हा विधि । पोट वाढविलें चिंधी ॥ २ ॥ लावूं जाणे विल्हे । तुका साच आणिक[3] कल्हे ॥ ३ ॥

२३७७. विषयीं अद्वये । त्यासी आह्मां सिवों नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव तेथुनि निराळा । असे निष्कामें[4] वेगळा ॥ छ ॥ वासनेची बुंथी[5] । तेथें कैंची ब्रह्मस्थिति ॥ २ ॥ तुका ह्मणे असतां[6] देहीं । तेथें नाहीं जेमतीं[7] ॥ ३ ॥

२३७८. नमितों या देवा । माझी एके ठायीं सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गुणअवगुण निवाडा । ह्मैस ह्मैस रेडा रेडा ॥ छ ॥ जनीं जनार्दन । साक्ष त्यासी लोटांगण ॥ २ ॥ तुका ह्मणे खडे । निवडूं दळगीं घडघडे ॥ ३ ॥

॥ ८ ॥

२३७९. जीव जीती[8] जीवना संगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जया चित्तीं जैसा भाव । तयां जवळि तैसा देव ॥ छ ॥ सकळां पैंडिये[9] भानु । परि त्या कमळाचें जीवनु ॥ २ ॥ तुका ह्मणे माता । वाहे तान्ह्याची[10] चिंता ॥ ३ ॥

२३८०. मुंगीचिया घरा कोण जाये मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥ छ ॥ उदक अन्न काये ह्मणे मज खा ये । भुकेला तो जाये चोजवीत ॥ २ ॥ व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे जया आपुलें स्वहित । करणें तो चि प्रीत धरी कये ॥ ४ ॥

२३८१. जन्मांतरींचा परिट न्हावी । जात ठेवी त्यानें ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वारवर[11] जैसा चरचरी । तोंड करी संव दणी ॥ छ ॥ [12]पूर्वं जन्म शिखासूत्र । मळ मूत्र अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे करिती निंदा । धुवस्वंदा पुढिलांचा ॥ ३ ॥

---

१ दे. काय घोंगालि पाधाणी ।. पं. काय घोंगाणी पादाणी । घाटी ताकामध्यें लोणी ॥.– २ पं. भणभण.–३ पं. आणि.–४ दे. त. नि.काम –५ पं. गुती –६ पं. असा –७ दे. त. जेमेनी. पं. जमेति.–८ पं. जीवती.–९ दे. पाडीये –१० दे. तान्हें याची.–११ पं. वाढी –१२ पं. पूर्वजन्में.

२३८२. नामें दूषी त्याचें नको दरपण। विष तें वचन वाटे मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अमंगळ वाणी नाइकवे कानीं। निंदेची पोहणी उठे तेथें ॥ छ ॥ कार्य साच लभ्य त्याचिये वचनीं। कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥ २ ॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी। आतां या जिभेसी[5] काय करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत न मनिती त्यांस। घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ४ ॥

२३८३. येऊनि नरदेहा झांकितील डोळे। बळें चि अंधळे होती लोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उजडासरसी न चलती वाट। पुढील बोभाट जाणोनियां ॥ छ ॥ बहु फेरे आले सोसोनि वोळसा। पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं सादावीत वाट। भेटे तरी भेटो[6] कोणी तरी ॥ ३ ॥

२३८४. नव्हे जाखाई जोखाई। मायराणी मेसाबाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बळिया माझा पंढरिराव। जो या देवांचा ही देव ॥ छ ॥ रंडी चंडी शक्ति। मद्यमांसातें भक्षिती ॥ २ ॥ बहिरव खंडेराव। रोटीसुटीसाटीं देव ॥ ३ ॥ गणोबा विक्राळ। लाडुमोदकांचा काळ ॥ ४ ॥ मुंज्या ह्मैसासुरें। हें तों कोण लेखी पोरें ॥ ५ ॥ वेताळें फेताळें। जळो त्यांचें तोंड काळें ॥ ६ ॥ तुका ह्मणे चित्तीं। धरा रखुमाईचा पती ॥ ७ ॥

२३८५. पडतां जड भारी। दासीं आठवावा हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तो होऊं नेदी सीण। आड घाली सुदर्शन ॥ छ ॥ नामाच्या चिंतनें। बारा वाटा पळती विघ्नें ॥ २ ॥ तुका ह्मणे प्राण। करा देवासी अर्पण ॥ ३ ॥

२३८६. मायें मोकलिलें कोठें जावें बाळें। आपुलिया बळें न वंचे[13] तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रुसोनियां पळे सांडुनियां ताट। मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ छ ॥ भांडवल आह्मां आळी करावी हे। आपणची माये धांवसील ॥ २ ॥ तुका ह्मणे आळी करुनियां निकी। देसील भातुकीं बुझाऊनि ॥ ३ ॥

२३८७. नागर [16]गोडें बाळरूप। तें स्वरूप काळीचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाईगोपाळांच्या संगें। आलें लागें पुंडलीका ॥ छ ॥ तें हें ध्यान दिगंबरें। कटीं कर मिरवती ॥ २ ॥ नेणपणें उगें चि उभें। भक्तिलोभें राहिलें ॥ ३ ॥

---

१ पं. नामद्वेषी दे. त. नाम दुसी –२ पं. नाइकावी –३ दे. पोहोणी –४ त. काय लभ्य असे त्याचिये०. दे. काय लभ्य त्याचिये० –५ पं. जिव्हे.–६ त. पं. भेटे –७ पं. यादवांचा –८ दे. पं. मद्यमांस –९ पं. गणोजी.–१० पं. ह्मैसासुर.–११ पं. वेताळ फेताळ। जळो त्यांचें तोंड काळें ॥.– १२ पं. हरिनामाच्या.–१३ पं. वांचे.–१४ पं. सोडुनियां.–१५ दे. आपणें.–१६ पं. गोंडें.– १७ दे. त. दिगांबर.–१८ पं. नेणेपणें.

नेणे वरदळाचा मान । विटे चरण सम उभे ॥ ४ ॥ सहज कटावरी हात । दहींभात शिदोरी ॥ ५ ॥ मोहरी पांवा गांजिवा पाठीं । धरिली काठी ज्या काळें ॥ ६ ॥ रम्य स्थळ चंद्रभागा । पांडुरंगा क्रीडेसी ॥ ७ ॥ भीमा दक्षणमुख वाहे । दृष्टी पाहे समोर ॥ ८ ॥ तारावेसे मूढ लोक । दिली भाक पुंडलिका ॥ ९ ॥ तुका ह्मणे वैकुंठवासी । भक्तांपासीं राहिला ॥ १० ॥

२३८८. विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयासी बोलतां होईल विटाळ । नेत्र जाये तो जळस्नान करितां ॥ छ ॥ विठ्ठलनामाची नाहीं ज्या आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ॥ २ ॥ तुका ह्मणे मज विठोवाची आण । जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥ ३ ॥

२३८९. तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं न लगे सिणावें । आणिक वेगळाल्या भावें । वाचे उच्चारावें । रामकृष्णगोविंदा ॥ छ ॥ फळ पावाल अवलिळा । भोग वैकुंठ सोहळा ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या नांवें । तो चि होईजे स्वभावें ॥ ३ ॥

२३९०. पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारकमहिमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें जाळी महा दोष । पुढें नाहीं गर्भवास ॥ छ ॥ जें निंदिलें शास्त्रें । वंद्य जालें नाममात्रें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ॥ ३ ॥

२३९१. नाम घेतां न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दों चिं अक्षरांचें काम । उच्चारावें रामं राम ॥ छ ॥ नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघीं चिं सरतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । चैतन्य निजधाम ॥ ३ ॥

२३९२. नाम घेतां वांयां गेला । ऐसा कोणें आइकिला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगा विनवितों तुह्मांसी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ छ ॥ नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ॥ २ ॥ सलगीच्या उत्तरा । तुका ह्मणे क्षमा करा ॥ ३ ॥

२३९३. फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ॥ छ ॥ उदंड भावें उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे घरिच्या घरीं । देशा उरीं न सीणीजे ॥ ३ ॥

॥ १५ ॥

---

१ पं. न वजे तो० –२ पं. ज्या नाहीं –३ दे. होइजेल –४ दे. त. "चि" नाहीं.–५ दे. त. वर्णाधम०.–६ त. पं. "चि" नाहीं –७ पं. चैतन्य हें निज०.–८ पं. सीणी.

२३९४. प्रीति नाहीं राया[1] वर्जिली ते कांता । परी तिची सत्ता जगावरी[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे दंभी[3] जालों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहाती ॥ छ्र ॥ राजयाचा पुत्र अपराधी देखा । तो काय आणिकां दंडवेल ॥ २ ॥ बाहातरी[4] खोडी परी देवमण कंठीं । तैसों[5] जगजेठी ह्मणे तुका ॥ ३ ॥

२३९५. करावा उद्धार किंवा घ्यावी हारी । एका बोला स्थिरी राहें[6] देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निरसेंनें[7] माझा होईल संदेह । अवघें चि आहे मूळ पायीं ॥ छ्र ॥ राहिलों चिकटून कांहीं चि न कळे । कोणी[8] नेणों काळें उदय भाग्य ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु उद्वेगला जीव । भाकीतसें कीव देवराया ॥ ३ ॥

॥ १ ॥

२३९६. आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंकें[9] ॥ छ्र ॥ भैयाचिये[10] पोटीं दुःखाचिया रासी । शरण देवासी जातां भलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ३ ॥

२३९७. भोग तो न घडे संचितावांचूनि । करावें तें मनीं समाधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनी मनीं मानूं नये खेदें[11] । ह्मणावा गोविंद वेळोवेळां ॥ छ्र ॥ आणिकां रुसावें न लगे बहुतां । आपुल्या संचितावांचूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे भार घातलिया करीं[12] । होईल कैवारी नारायण ॥ ३ ॥

२३९८. निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें । साधन बरवें हें चि एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी च अंगीकार करिलें नारायण । बडबड तो सीण येर्णेविण ॥ छ्र ॥ सोइरें पिशुन समान चि घडे । चित्त पर ओढे उपकारी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त जालिया निर्मळ । तरि च सकळ केलें होय ॥ ३ ॥

२३९९. दिली चाले वाचा । क्षय मागिल्या तपाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रिद्धि सिद्धि येती घरा । त्याचा करिती पसारा ॥ छ्र ॥ मानदंभांसाटीं । पडे देवासवें तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे मेवा । कैचा वेठींच्यां[13] निदैवां ॥ ३ ॥

२४००. तापल्यावांचून नव्हे अळंकार । पिटूनियां सार उरलें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग कदाकाळीं नव्हे[14] शुद्ध जाति । नासें शत्रु होती मित्र ते चि ॥ छ्र ॥

---

१ पं. रायें वर्जियेली —२ पं. सर्वावरी —३ पं. दांभी.—४ पं. बाहातर खोडा घोडे देव०.— ५ पं. तैसा मी जग०.—६ पं. राहवें.—७ पं. निराने.—८ पं. कोण्या नेणें.—९ दे. त. रंकें.— १० पं. भवाचिया.—११ दे. पं. ०खेदु । ह्मणावा गोविंदु०.—१२ पं. करी.—१३ पं. वेठीचा निदैवा. दे. वेठीच्या नदर्वा.—१४ पं. शुद्ध नव्हे.

कळिवर वरें भोगूं द्यावें भोगा । फांसिलें तें रोगा हातीं सुटे ॥ २ ॥ तुका ह्मणे मन करावें पाठेळ[1] । साहावे चि जाळ सिजेवरि ॥ ३ ॥

२४०१. पाठेळ करितां न साहवे वारा । साहेलिया ढोरा गोणी चाले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपणां आपण हे चि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ॥ छ ॥ नवनीत तोंवरी कडकडी लोणी । निश्चळ होऊनी राहे मग ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी जग टाकी धाया । त्याच्या पडे पायां जन मग ॥ ३ ॥

२४०२. कावळियासी[2] नाहीं दया उपकार । काळिमा अंतर विटाळसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें कुधनाचें जिणें अमंगळ । घाणेरी वोंगळ वदे वाणी ॥ छ ॥ कडु भोंपळ्याचा उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे विष सांडूं नेणे[3] साप । आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥ ३ ॥

२४०३. लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाय अवघिया देशा । येथें संचेलासी[4] तैसा ॥ छ ॥ मग न लगे पारखी । अवघीं संकट[5] सारखीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वोळे । रूपें भुलविले डोळे ॥ ३ ॥

२४०४. नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ छ ॥ वचनाचा न करीं[6] गोवा । रिघें देवासीं शरण ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥ ३ ॥

२४०५. बुद्धिहीनां जडजीवां । नको[7] देवा उपेक्षूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परिसावी हे[8] विज्ञापना । आह्मां दीनां दासांची ॥ छ ॥ चिंतूनियां आले पाय । त्यांसी काय वंचन ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरुषोत्तमा । करीं क्षमा अपराध ॥ ३ ॥

२४०६. ह्मणऊनि काकुळती । येतों पुढतों पुढती । तुह्मां[9] असे हातीं । कमळापती भांडार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फेडूं आलेती दरिद्र । तरी न लगे उशीर । पुरे अभयंकर । ठांया[10] ठाव रंकाशी ॥ छ ॥ कोठें न घली धांव । याजसाठीं तेजिली[11] हांव । येऊं नेदी वाव । मना केला विरोधें[12] ॥ २ ॥ कारणांच्या गुणें । वेळ काळ तोही नेणें । तुमच्या कीर्तनें । तुका तुह्मां जागवी ॥ ३ ॥

२४०७. बहु नांवें ठेविलीं स्तुतीचे[13] आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु सोसें सेवन केलें बहुवस । बहु आला दिस गोमट्याचा ॥ छ ॥

---

१ पं. पाटेळ–२ पं. कावळ्या–३ पं. नये–४ दे. त. सचलाची.–५ पं. सकळ–६ पं. वचनाचा न रिघे गोवा । रिघे देवासी शरण ॥.–७ पं. नका.–८ पं. "हे" नाहीं.–९ पं. तुमचिया.–१० पं. ठायीं–११ पं. त्यजिली–१२ पं. निरोध.–१३ पं. स्तुतीची.

बहुतां पुरला बहुतां उरला । बहुतांचा केला बहु नट ॥ २ ॥ बहु तुका जाला निकट वृत्ती । बहु काकुलती येऊनियां ॥ ३ ॥

२४०८. ईहलोकीं[1] आह्मां वस्तीचें पेणें । उदासीन तेणें देहभावीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय पुरतें[2] कारण मारगीं । उलंघूनि वेगीं जावें स्थळा ॥ ध्रु ॥ सोंगसंपादणी चालवितों वेव्हार । अत्यंतीं[3] आदरें नाहीं गोवा ॥ २ ॥ तुका ह्मणे वेंच लाविला संचिता । होइल घेतां देतां लाभ कोणां ॥ ३ ॥

२४०९. रोजेंकीर्दी[4] जमा धरुनी सकळ । खताविला काळ बराबरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजराती ते[5] गोड सेवा रुजू ॥ ध्रु ॥ चोरासाटीं रदबदल आटाहास[6] । जळो जिणें दास्य[7] बहुताचें ॥ २ ॥ सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापाशीं गुंपों नेणे ॥ ३ ॥

२४१०. त्रिविधकर्माचे वेगळाले भाव । निवडूनि ठाव दाखविला[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख[9] गौरव संतां अंगीं ॥ ध्रु ॥ हिशेबें[10] आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं पापपुण्य[11] खतीं । झाड्याची हुजती हातां आली ॥ ३ ॥

२४११. साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आह्मां जोडी वैष्णवांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनी । सोस तो भजनीं आवडीचा ॥ ध्रु ॥ भोजनाची चिंता माय वाहे बाळा । आह्मां[12] तरी खेळावरि चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ३ ॥

२४१२. सुखें घेऊं जन्मांतरें । ऐक[13] बरें इहलोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडी हे ॥ ध्रु ॥ हें[14] तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे केला त्याग । सर्वसंग ह्मणऊनि ॥ ३ ॥

२४१३. करूं जातां सन्निधान । क्षणि[15] जन पालटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां गोमटे ते पाय । तुझे माय विठ्ठले ॥ ध्रु ॥ हरिदासांचा समागम । अंगीं प्रेम विसांवे ॥ २ ॥ तुका[16] ह्मणे हें चि मन । इच्छादान मागतसे ॥ ३ ॥

---

१ दे. त. पं. येह –२ दे. त. पुरातें.–३ पं. दे. अत्यंतिक आदर –४ दे. त. रोज कीर्ति –५ पं. "ते" नाहीं.–६ दे. त. आटा हाश.–पं. अटाहास्य –७ दे. दाश० त. दाष्ये०. पं. दास बहुताचे ।.–८ पं. दाखविले –९ त. सुखाच गौरव. पं. सुख तो गौरव.–१० त. हिसोबें.–११ त. पापपुण्यें खती पं. पापपुण्या खती –१२ दे. त. आह्मासि.–१३ पं. हें चि.–१४ दे. या अभंगांतील "हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरूनि ॥" हें कडवें, आणि पुढल्या अभंगातील "हरिदासाचा समागम । अंगीं प्रेम विसावे ॥" हें कडवें यांच्या जागा मागून आंकड घालून परस्परांशीं पालटल्या आहेत.–१५ पं. क्षण.–१६ दे. "तुका ह्मणे केला त्याग । सर्व सग ह्मणऊनि" ॥ असें मूळचा पाठ खोडून मागून केलें आहे, प्रथम मूळांतल्याप्रमाणेंच होतें.

२४१४. क्षीर मागे तया रायतें वाढी । पाधानी गधडी ऐशा नांवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समयो जाणां समयो जाणां । भलतें नाणां भलतेथें ॥ ध्रु. ॥ अमंगळ वाणी वदवी मंगळी[1] । अशुभ वोंगळी[2] शोभन तें ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें समयो ठाया ठाव । राहाडी ते वाव नरकाडी ॥ ३ ॥

२४१५. विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ॥ ध्रु. ॥ मधुरा उत्तरीं । रांवां[3] खेळे उरावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे रेडा । सुखें जाती ऐशा पीडा ॥ ३ ॥

२४१६. तीर्थीची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म । जाणावें तें वर्म वहु पुण्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वहु वरी ऐसी भाविकांची जोडी । काळ नाहीं घडी जात वांयां ॥ ध्रु. ॥ करूनी चिंतन करवावें आणिकां । तो या जाला लोकां नाव जगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे परउपकारी । त्यांच्या पायांवरी डोई माझी ॥ ३ ॥

२४१७. भयाची तों आह्मां चित्तीं । राहो खंती सकेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समर्पिलों[4] जीवें भावें । काशा भ्यावें कारणें[5] ॥ ध्रु. ॥ करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभेलें[6] ॥ २ ॥ तुका ह्मणे माप भरूं । दिस सारूं कवतुकें ॥ ३ ॥

२४१८. पाचारितां धांवे[7] । ऐसी ठायींची हे सवे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोले करुणा वचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥ ध्रु. ॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा जिव्हाळा[8] ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । मागें मागें धांवे प्रेम ॥ ३ ॥

२४१९. कां जी माझे जीवीं । आळस ठेविला गोसावीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येवढा घात आणीक काय । चिंतनासी अंतराय ॥ ध्रु. ॥ देहआत्म वंदी । केला घात कुबुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । कळवळी वाटे सीण ॥ ३ ॥

२४२०. दर्शनाचें आर्त जीवा । वहु देवा राहिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जाणसी तें करीं । विश्वंभरीं काय उणें ॥ ध्रु. ॥ येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहूनी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणवलें । आह्मां भलें एवढें च ॥ ३ ॥

२४२१. वैसों पाठमोरीं । मना वाटे तैसें करीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि तूं जाणसी आवडी । वाळा वहुतांची परवडी ॥ ध्रु. ॥ आपुलाल्या इच्छा । मागों जया व्हावें जैशा ॥ २ ॥ तुका ह्मणे आई । नव्हसी उदास विठाई ॥ ३ ॥

---

१ पं. मंगळ.–२ पं. अगळी.–३ पं. राखा.–४ पं. "समर्पिलों०" आणि "करीन तें०" या कडव्यांच्या जागा परस्परांशीं पालटल्या आहेत.–५ पं. कारणा.–६ त. शोभलें.–७ पं. पावे.–८ पं. सोहळा.

२४२२. विश्वंभरा बोळे । बहुत हात कान डोळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें असे तेथें देखे[1] । मागितलें तें आइके[2] ॥ छ्र ॥ जें जें वाटे गोड । तैसें पुरवितो[3] कोड ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । कांहीं पडों[4] नेदी तुटी ॥ ३ ॥

२४२३. दाटे कंठ लागे डोळियां पाझर । गुणाची अपार वृष्टि वरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें सुखें छंदें घेईन सोंहळा । होऊनि निराळा पापपुण्यां ॥ छ्र ॥ तुझ्या मोहें पडो मागील विसर । आलापें सुस्वर करिन कंठ ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे सौरस । तुह्मांविण रस गोड नव्हे ॥ ३ ॥

२४२४. पसरूनि राहिलों बाहो । सोयी अहो तुमचिये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां यावें लागवेगें । पांडुरंगे धांवत ॥ छ्र ॥ बैसायाची इच्छा कडे । चाली खडे रुंपताती[5] ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपाळुवा । करीन सेवा लागली ॥ ३ ॥

२४२५. आह्मी जालों एकविध । सुध्रा सुदें असावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पावरी तुमचा मोळा । तो गोपाळा अकळ ॥ छ्र ॥ घेतलें तें उसणें द्यावें । कांहीं भावें विशेषें[6] ॥ २ ॥ तुका ह्मणे क्रियानष्ट । तरी कष्ट घेतसां ॥ ३ ॥

२४२६. आह्मी[7] आर्तभूत जिवीं । तुह्मी गोसावी तों[8] उदास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वादावाद समर्थाशीं । काशानशीं करावा ॥ छ्र ॥ आह्मी मरों वेरझारीं । स्वामी घरीं बैसले ॥ २ ॥ तुका ह्मणे करितां वाद । कांहीं भेद कळेना ॥ ३ ॥

२४२७. पुसावें तें ठाई आपुल्या आपण । अहंकारा शून्य घालूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान तें ॥ छ्र ॥ फळ तें चि बीज बीज तें ची फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे गव्हांचे प्रकार । सोनें अलंकार मिथ्या नांव ॥ ३ ॥

२४२८. माझी आतां सत्ता आहे । तुह्मां पायां हे वरती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाविण नेणें दुजा । पंढरिराजा सर्वांगें ॥ छ्र ॥ पुरवावी केली आळी । जे जे काळीं मागेन[9] तें ॥ २ ॥ तुका ह्मणे सुटसी कैसा । धरूनि दिशा राहिलों ॥ ३ ॥

२४२९. फावलें तुह्मां मागें । नवतों लागें पावलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलों आतां उभा राहें । जवळी पाहें सन्मुख ॥ छ्र ॥ घरीं होती गोवी जाली । कामें बोलीं न घडे चि ॥ २ ॥ तुका ह्मणे धडफुडा । जालों झाडा देई देवा ॥ ३ ॥

---

१ त. देखे—२ त. आइकें.—३ पं. पुरविता कोडें—४ पं पडे.—५ पं. रुपती.—६ त. विशेष.—७ त. "आह्मी" नाहीं.—८ पं. "तों" नाहीं—९ दे. त. मागण.

२४३०. आतां नये बोलों अन्हेराची मात । बाळावरि चित्त असों द्यावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज कां सांगणें लागे हा प्रकार । परि हें उत्तर आवडीचें ॥ छ ॥ न वंचीं वो कांहीं एकही प्रकार । आपणां अंतर नका मज ॥ २ ॥ तुका ह्मणे मोहो राखावा सतंत । नये पाहों अंत पांडुरंगा ॥ ३ ॥

२४३१. करूनि राहों जरी आत्मा चि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेवलिया विण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्द चि ते ॥ छ ॥ पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आह्मासी चरण न सोडणें ॥ २ ॥ विरोधें विरोध वाढे पुढतोपुढती । वासनेचे हातीं गर्भवास ॥ ३ ॥ सांडीमांडीअंगीं वसे पुण्यपाप । बंधनें संकल्प या चि नांवें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी देह ॥ ५ ॥

२४३२. तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसीदळ । जोडूनि अंजुळ उभा असें ॥ छ ॥ कैचें भाग्य ऐसें पाविजे संनिध । नेणें पाळूं विध करुणा भाकीं ॥ २ ॥ संतांचे सेवटीं उच्छिष्टाची आस । करूनियां वास पाहातसें ॥ ३ ॥ करीं इच्छा मज ह्मणोत आपुलें । एखादिया बोलें निमित्याच्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रदिवस ॥ ५ ॥

२४३३. सर्वविशीं आह्मीं हे चि जोडी केली । स्वामीची साधिली चरणसेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहिलें चि नाहीं मागें परतोनी । जिंकिला तो क्षेणीं क्षण काळ ॥ छ ॥ नाहीं पडों दिला विचाराचा गोवा । नाहीं पाठी हेवा येऊं दिलों ॥ २ ॥ केला लाग वेगीं अवघी चि तांतडी । भावना ते कुडी दुराविली ॥ ३ ॥ कोठें मग ऐसें होतें सावकास । जळो तया आस वेव्हाराची ॥ ४ ॥ तुका ह्मणे लाभ घेतला पालवीं । आतां नाहीं गोवी कशाची ही ॥ ५ ॥

२४३४. येणें मुखें तुझे वर्णी गुण नाम । तें चि मज प्रेम देईं देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळे भरूनियां पाहें तुझें मुख । तें चि मज सुख देईं देवा ॥ छ ॥ कान भरोनियां ऐकें तुझी कीर्ती । ते मज विश्रांती देईं देवा ॥ २ ॥ वाहे रंगीं टाळी नाचेन उदास । हें देईं हातांस पायां बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा सकळ देहभाव । आणीक नको ठाव चिंतूं यासी ॥ ४ ॥

---

१ त. दे. सोडवे.—२ त. बधनें.—३ पं. निरसे —४ पं. क्षणक्षणीं —५ पं. दिली —६ पं. केली लागवेगीं.—७ पं. ऐकेन.

२४३५. तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत। तूं चि माझें हित करिता देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं चि माझा देव तूं चि माझा जीव। तूं चि माझा भाव पांडुरंगा ॥ छ्र ॥ तूं चि माझा आचार तूंचि माझा विचार। तूं चि सर्व भार चालविसी ॥ २ ॥ सर्व भावें मज तूं होसी प्रमाण। ऐसी तुझी आण वाहातसें[1] ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज विकला जीवभाव। कळे तो उपाव करीं आतां ॥ ४ ॥

२४३६. वारंवार तुज द्यावया आठव। आइक[2] तो भाव माझा कैसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गेले[3] मग नये फिरोन दिवस। पुढिलांची आस गणित नाहीं ॥ छ्र ॥ गुणां अवगुणांचे पडती आघात। तेणें होय चित्त कासावीस ॥ २ ॥ कांहीं एक तुझा न देखों आधार। ह्मणऊनी धीर नाहीं जीवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं ब्रह्मांडाचा जीव। तरी कां आह्मी कींव भाकीतसों ॥ ४ ॥

२४३७. असोत हे तुझे प्रकार सकळ। काय खळखळ करावी हे ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ आमुचें स्वहित जाणतसों आह्मी। तुझें वर्म नामीं आहे तुझ्या ॥ छ्र ॥ विचारितां आयुष्य जातें वांयांविण। रोज नागवण[4] पडतसे ॥ २ ॥ राहेन मी तुझे पाय आठवूनी। आणीक तें मनीं येऊं नेदीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें येसी अनायासें। थोर तुंज पिसें कीर्तनाचें ॥ ४ ॥

२४३८. विष्णुदासां[6] भोग। जरी[7] आह्मां पीडी रोग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि हें दिसे लाजिरवाणें। काय तुह्मांसी सांगणें ॥ छ्र ॥ आह्मां काळें खावें[8]। बोलिलें तें वांयां जावें ॥ २ ॥ तुका ह्मणे दास। आह्मी भोगूं गर्भवास ॥ ३ ॥

२४३९. भावें गावें गीत। शुद्ध करूनियां चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज व्हावा आहे देव। तरि हा सुलभ उपाव ॥ छ्र ॥ आणिकांचे कानीं। गुण दोष मना नाणीं ॥ २ ॥ मस्तक ठेंगणा। करीं संतांच्या चरणा ॥ ३ ॥ वेचीं तें वचन। जेणें राहे समाधान ॥ ४ ॥ तुका ह्मणे फार। थोडा तरी पर उपकार ॥ ५ ॥

२४४०. वचन तें[11] नाहीं तोडीत शरीरा। भेदत अंतरा वज्राऐसें[12] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं न सहावे कैशा[13] ही कारणें। संदेह निधान देह बळी ॥ छ्र ॥ नाहीं शब्द मुखीं लागत तिखट। नाहीं जड होतें[14] पोट तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी गिळे अहंकार। तरी वसे घर नारायण ॥ ३ ॥

---

१ दे. त. वाहातुसें —२ दे. पं. ऐक.—३ पं. गेला.—४ त. रोज जन्मा गोवण पडतसे ।— दे. पूर्वी तळेगावाप्रमाणें होतें —५ पं. "तुज" नाहीं.—६ पं. 'विष्णुदासा' याबद्दल नाहीं हरिच्या दासां.—७ पं. 'जरी' याबद्दल तरि कां.—८ पं. खाये। बोलितें वाया जाये।—९ पं. जरि तुज व्हावा देव।—१० पं. लागें —११ पं. हे.—१२ पं. वज्राऐसा —१३ दे. काशा करणें त. कासया कारणें.— १४ पं. पोट होत त. मागून 'पोट होत' असा पाठ केला आहे.

२४४१. नव्हो आतां जीवीं कपटवसती । मग काकुळती कोणा यावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्याचिये मापें गांठीं नये नाड । आदि अंत गोड नारायण ॥ ध्रु. ॥ चोखटिया नाहीं विटाळाचा आघात । साच तें साचांत सांचों पडे ॥ २ ॥ विचारिली वाट उसंत सीतळ । बुद्धीपुढें बळ तृणतुल्य ॥ ३ ॥ आहाराच्या घासें पचोनियां जिरे । वासना ही उरे उर्वरीत ॥ ४ ॥ तुका ह्मणे ताळा घालावा वचनीं । तूं माझी जननी पांडुरंगे ॥ ५ ॥

२४४२. नव्हती हीं माझीं जीयाचीं भूषणें । असे नारायणें उचित केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शब्दाच्या वोवोनी रत्नाचिया माळा । मुळींच जिव्हाळा झरवणी ॥ ध्रु. ॥ अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन सोंस येथें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सरतें परतें । हें नाहीं अनंतें उरों दिलें ॥ ३ ॥

२४४३. सहज लीळा मी साक्षी यांचा । नये वेंचूं वाचा ऐसें जालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जे कोठें बंधनीं गुंपों नेणें ॥ ध्रु. ॥ तम नासी परि वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हा नये तोंड दावूं ॥ ३ ॥

२४४४. बोलाल या आतां आपुल्यापुरतें । मज या अनंतें गोवियेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ झाडिला न सोडी हातींचा पालव । वेधी वेधें जीव वेधियेला ॥ ध्रु. ॥ तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी । मज सर्वे मिठी अंगसंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां होईल हे परी । अनुभव बरी येईल मग ॥ ३ ॥

२४४५. जैशा तुह्मी दुरी आहां । तैशा राहा अंतरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका येऊं देऊं आळ । अंगीं गोपाळ जडलासे ॥ ध्रु. ॥ अवघा हा चि राखा काळ । त्रिकाळ चि भोंवता ॥ २ ॥ तुका ह्मणे मज ऐशा । होतां पिशा जगनिंद्य ॥ ३ ॥

२४४६. सतीचें तें घेतां वाण । बहु कठीण परिणामीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिवासाटीं गौरव वाढे । आहाच जोडे तें नव्हे ॥ ध्रु. ॥ जरि होय उघडी दृष्टि । तरि गोष्टी युद्धाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा येतां । तरी सत्ता धैर्याची ॥ ३ ॥

२४४७. आढवा तो उभा । असे दाटोनियां प्रेभा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव नाहीं एकविध । एक भाव असे शुद्ध ॥ ध्रु. ॥ भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥ ३ ॥

---

१ पं. सांच.–२ दे. त. उरउरीत.–३ पं. जयाचें.–४ पं. बोवणी–५ पं. माझी–६ पं. तमाचा.–७ पं. •कळे.–८ पं. ' हा " नाहीं.–९ त. दाटोनियां.–१० पं. उभा

२४४८. एका बोटाची निशाणी। पैरीपाक[1] नाहीं मनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि तें संपादिलें सोंग । कारणावांचूनियां व्यंग[2] ॥ छ्र ॥ वैष्णवांचा धर्म । जग[3] विष्णु नेणे वर्म ॥ २ ॥ अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥ ३ ॥

२४४९. सत्यत्वेंशीं घेणें भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तें अवीट न भंगे साचारें । पावलें विस्तारें फिरों नेणे ॥ छ्र ॥ वाणी वदे त्याचा कोणांसी विश्वास । अभयें[4] करें दास सत्य तई ॥ २ ॥ तुका ह्मणे आधीं न करीं तांतडी । पायीं जाली जोडी तेणें शुद्ध ॥ ३ ॥

२४५०. सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेतो[5] कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनीं भक्तीची आवडी । हेवा व्हावी ऐशी जोडी ॥ छ्र ॥ घेईन जन्मांतरें । हें चि करावया खरें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ऋणी करूनि ठेवूं सेवा ॥ ३ ॥

२४५१. आणितां[6] त्या गती । हंस काउळे न होती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडा सांडा रे मठारे । येथें गांठीसवें धुरें ॥ छ्र ॥ नाकेंविण मोती । उभ्या बाजारें[7] फजिती ॥ २ ॥ हुकुमदाज तुका । येथें कोणी फुंदों नका ॥ ३ ॥

२४५२. ढेंकणासी बाज गड । उतरचढ केवढी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होता तैसा कळों भाव । आला वाव अंतरींचा ॥ छ्र ॥ बोरामध्यें वसे अळी । अठोळीच भोंवती ॥ २ ॥ पोटासाटीं वेंची चणे । राजा ह्मणे तोंडें मी ॥ ३ ॥ बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें आहे । काय पाहे त्यांत तें ॥ ५ ॥

२४५३. धांव धांव गरुडध्वजा । आह्मां अनाथांच्या काजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु जालों कासावीस । ह्मणोनि पाहें तुझी वास ॥ छ्र ॥ पाहें पाहें त्या मारगें । कोणी येतें माझ्या लागें ॥ २ ॥ असोनियां ऐसा । तुज सारिखा कोंवसा ॥ ३ ॥ न लवावा उशीर । नेणों कां हो[11] केला धीर ॥ ४ ॥ तुका ह्मणे चाली । नको चालूं धांव घालीं ॥ ५ ॥

२४५४. पांडुरंगे पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पान्हां घालीं प्रेमधारा । पूर क्षीरा लोटों दे ॥ छ्र ॥ अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडायों[12] ॥ २ ॥ तुका ह्मणे येइन उड्या । सांडिन कुड्या भावना ॥ ३ ॥

---

१ दे. त. परीपाख.–२ दे. वेग.–३ पं. जगीं.–४ त. पं. आभयकरें दास.–५ पं. नेतें–६ पं. आणितानि गती। हंस काउळी.–७ पं. बाजारा.–८ दे. त. हा चरण कायम ठेवून त्याजवर "ह्मणे विष्णुदास तुका।" हा पाठ घातला आहे.–९ पं. असे.–१० पं. "पाहें पाहें०" व "असोनिया०" या दोन कडव्याच्या जागा परस्पराशीं पालटल्या आहेत; आणि "पाहें पाहें" याबद्दल "पाहें" इतकेंच आहे.–११ पं. हो.–१२ पं. फेडावया.

२४५५. [1]गजइंद्र पशु आर्तें मोकलिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यासाठीं गरुड सांडुनि धांवसी । माया [2]झेळंबसी दिनानाथा ॥ छ्र ॥ धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी । तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रीद बांधलें यासाटीं । भक्तांसी संकटीं रक्षावया ॥ ३ ॥

२४५६. चारी वेद जयासाटीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करीं आणीक [3]साधन । कष्टसी कां वांयांविण ॥ छ्र ॥ अठरा पुराणांचे पोटीं । नामाविण नाहीं [4]गोठी ॥ २ ॥ गीता जेणें उपदेशिली । ते [5]हीं विटेवरी माउली ॥ ३ ॥ तुका ह्मणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारीं ॥ ४ ॥

२४५७. पाहातां ठायाठाव । जातो अंतरोनि देव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये वाटों गुणदोषीं । मना जतन येविशीं ॥ छ्र ॥ त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरें- । विण कैसें होतें बरें ॥ ३ ॥

२४५८. नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें [6]जन्मांतरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न [7]लगे सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ छ्र ॥ ठायींच बैसोनि करा एकाचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ २ ॥ रामकृष्णहरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ३ ॥ [8]यांविण असतां आणीक साधन । वाहातसें आण विठोबाची ॥ ४ ॥ तुका ह्मणे सोपें आहे सर्वांहूनि । शाहाणा तो धणी [9]घेतो येथें ॥ ५ ॥

२४५९. भाविकांचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं । आवडी तयांची मोठी देवा ॥ छ्र ॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान [10]द्रौपदीसी ॥ २ ॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें [11]बहुतें निवारिलीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसीं आवडती लडिवाळें । जाणीवेचें काळें तोंड देवा ॥ ४ ॥

२४६०. सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळियांची धणी पाहातां न पुरे । तया लागीं झुरे मन माझें ॥ छ्र ॥ आन गोड कांहीं न लगे संसारीं । राहिले अंतरीं पाय तुझे ॥ २ ॥ प्राण रिघों पाहे कुडी हे सांडुनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥ ३ ॥ चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका ह्मणे येणें [12]गरुडध्वजें ॥ ४ ॥

---

१ त. पं. गजेंद्र.—२ दे. झळंबसी.—३ दे. साधनें.—४ त. पं. गोष्टी.—५ पं. हे—६ पं. जन्मांतरिंचीं—७ पं. लागती—८ पं. याहूनि आणीक नाहीं पैं साधन।. दे. पूर्वी असें होतें.—९ पं. घेत असे.—१० पं. द्रौपदीचें.—११ पं. बहुत.—१२ पं. गरुडध्वजा.

२४६१. ऐकों ऐका भाविकजन। कोणें कोण व्हाल ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तार्किकांचा टाका संग। पांडुरंग स्मरा हो ॥ छ्र ॥ नका शोधूं मतांतरें। तुमगे खरें बुडाल ॥ २ ॥ कलिमध्यें दास तुका। जातो लोकां सांगत ॥ ३ ॥

२४६२. आपुलिया आंगें तोडी मायाजाळ। ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रांडापोरें त्याग करी कुटुंबाचा। नावरे हे वाचा आणि मन ॥ छ्र ॥ हर्षामर्ष जों हे नाहीं जों जिराले। तोंवरि हे केले चार त्यांनीं ॥ २ ॥ मुक्त जालों ऐसें बोलों जाये मुखें। तुका ह्मणे दुःखें बांधला तो ॥ ३ ॥

२४६३. आलिया अतीता ह्मणतसां पुढारें। आपुलें रोकडें सत्त्व जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं। हीनकर्मी लोकीं ह्मणावया ॥ छ्र ॥ दारीं हाका कैसें करवतें भोजन। रुची तरि अन्न कैसें देतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ध्वज उभारिला कर। ते शक्ति उदार काय जाली ॥ ३ ॥

२४६४. जेथें लक्ष्मीचा वास। गंगा आली पापा नास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें म्यां हृदयीं धरिलें। तापें हरण पाउलें ॥ छ्र ॥ सेवा केली संतजनीं। सुखें राहिले लपोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे वांकी। भाट जाली तिहीं लोकीं ॥ ३ ॥

२४६५. रूपीं जडले लोचन। पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देहभाव हरपला। तुज पाहातां विठ्ठला ॥ छ्र ॥ कळों नये सुखदुःख। तान हरपली भूक ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे परती। तुझ्या दर्शनें मागुती ॥ ३ ॥

२४६६. जाणतें लेंकरूं। माता लागे दूर धरूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें न करीं कृपावंते। पांडुरंगे माझे माते ॥ छ्र ॥ नाहीं मुक्ताफळा। भेटी मागुती त्या जळा ॥ २ ॥ तुका ह्मणे लोणी। ताक सांडी निवडूनि ॥ ३ ॥

२४६७. तुजविण कोणां। शरण जाऊं नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा न देखें मी कोणी। दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥ छ्र ॥ पाहिलीं पुराणें। धांडोळिलीं दरुषणें ॥ २ ॥ तुका ह्मणे ठायीं। जडून ठेलों तुझ्या पायीं ॥ ३ ॥

२४६८. ऐसें भाग्य कई लाहाता होईन। अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तया सुखा अंत नाहीं पार। आनंदें सागर हेलावती ॥ छ्र ॥ शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं। परावृत्त संगीं कामादिकां ॥ २ ॥ विवेकासहित वैराग्याचें बळ। धग्धगितोज्ज्वाळ अग्नि जैसा ॥ ३ ॥ भक्ति नवविधा भावशुद्ध

---

१ त. ऐका गा भाविक हो। कोण कोण व्हाल ते ॥.–२ दे. "व्हाल कोण कोण ते" असें मागून केलें आहे.–३ पं. करी लोका सावध।.–४ पं. हें कडवें नाहीं. त. हर्षामर्ष हे जों नाहीं जिराले।.–५ पं. तापशमन.–६ पं. सुख राहिलें.–७ पं. जालें जाणतें०.

थेरी । अळंकारावरी मुगुटमणि ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी पुरवीं वासना । कोण नारायणा तुजविण ॥ ५ ॥

२४६९. कासया करावे तपाचे डोंगर । आणीक अपार दुःखरासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया फिरावे अनेक ते देश । दावितील आस पुढें लाभ ॥ छ ॥ कासया पुजावीं अनेक दैवतें । पोटभरे तेथें लाभ नाहीं ॥ २ ॥ कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुका साटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे करीं कीर्तन पसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ॥ ४ ॥

२४७०. वैष्णवमुनिविप्रांचा सन्मान । करावा आपण घेऊं नये ॥ १ ॥ प्रभु जाला तरी संसाराचा दास । विहिंत तयासीं यांची सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे हे आशीर्वादें बळी । जाईल तो छळी नरका यासीं ॥ ३ ॥

२४७१. देव वसे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ छ ॥ हरिजनांसी भेटी । नहो अंगसगें तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । भलें संतसंघष्टणें ॥ ३ ॥

२४७२ भाग सीण गेला । माझा सकळ विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझा ह्मणवितों दास । केली उच्छिष्टाची आस ॥ छ ॥ राहिली तळमळ । तई पासोनी सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें । पोट ऐसें कळों आलें ॥ ३ ॥

२४७३. रायाचें सेवक । सेवटीचें पीडी रंक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा तों हिणाव कवणा । कां हो नेणां नारायणा ॥ छ ॥ परिसेंसी भेटी । नव्हे लोहोपणा तुटी ॥ २ ॥ तुझें नाम कंठीं । तुक्या काळ सत्रे भेटी ॥ ३ ॥

२४७४. सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । माझ्या पांडुरंगा सारिकें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ॥ छ ॥ चंद्रभागे स्नान विधि तो हरिकथा । समाधान चित्ता सर्वकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष तो[10] लाभ संतसंग ॥ ३ ॥

२४७५. नसतां अधिकार उपदेशासी बळोंन्कार । तरि ते केले हो[12] चार माकडा आणि गारोडी[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धैन[14] धान्य राज्य बोल वृथा रंजवणें फोल । नाहीं तेथें ओल बीज वेचीं मूर्ख तो ॥ छ ॥ नये वांधों गांठी पदरा

---

१ पं. करीं.–२ त. पं. आणीक.–३ पं. आणीक–४ पं. विहित हे त्यास.–५ त. तयास.–६ पं. हरिजनाचीं.–७ पं. अंगसंग.–८ सेवटील.–९ "विधि" याबद्दल.–१० त. हा–११ दे. त. बळन्कार–१२ पं. "हो" नाहीं–१३ दे. गारुडी–त. गारुडी.–१४ पं. धन्यधान्य राज्य०.

आणी ऐसी तुटी । असोन कसोटी शिष्टाचारअनुभव ॥ २ ॥ उपदेसी तुका मेघ वृष्टीनें आइका । संकल्पासी धोका सहज तें उत्तम ॥ ३ ॥

२४७६. घालुनियां मापीं । देवभक्त बैसले जपीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी होते सांडउलंडी । निजनिजांची मुकुंडी ॥ ध्रु ॥ अमुपीं उखतें । आपण वोस आपण यातें ॥ २ ॥ देव आतां जाला । उगवे संकोच वेहिला ॥ ३ ॥ अखंड नेलें वेठी । भार सत्याविण गांठी ॥ ४ ॥ ओडकिला झोंपा । रिता कळिवराचा खोंपा ॥ ५ ॥ गोदातीरीं आड । करिते करविते द्वाड ॥ ६ ॥ तुका ह्मणे वळें । उपदेशाचें तोंड काळें ॥ ७ ॥

२४७७. उंबरांतील कीटका । हें चि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐशीं झाडें किती नव खंडीं ॥ ध्रु ॥ हें चि ब्रह्मांड आह्मांसी । ऐसीं अगणित अंडें कैसीं ॥ २ ॥ विराटाचे अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥ ३ ॥ ऐशा विराटाच्या कोटी । सांटवल्या ज्याच्या पोटीं ॥ ४ ॥ तो हा नंदाचा बाळमुकुंद । तान्हा ह्मणवी परमानंद ॥ ५ ॥ ऐशी अगम्य ईश्वरी लीळा । ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥ ६ ॥

२४७८. ब्रह्मज्ञान जरी एके दिवसीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासें उपराटी दृष्टी केली ॥ ध्रु ॥ जनकभेटीसी पाठविला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥ २ ॥ खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥ ३ ॥ जाऊनियां तेणें[12] साधिली समाधी । तुका ह्मणे तधीं होतों आह्मी ॥ ४ ॥

२४७९. सहज पावतां भगवंतीं परि [13]हीं विकल्पें परतीं । फुकाची हे चित्तीं ओंठवण कां न धरिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरि व्यापक सर्वगत [15]हें तंव मुख्यत्वें वेदांत । चिंतनासी चित्त असों द्यावें सावध ॥ ध्रु ॥ विरजाहोम या चि नांवें देह नव्हे मी जाणावें । मग कां जी यावें वरी लागे संकल्पा ॥ २ ॥ कामक्रोधें देह मळिण स्वाहाकारीं कैचें पुण्य । मंत्रीं पूजियेला यज्ञ मनमुंडण नव्हे चि ॥ ३ ॥ अनन्यभक्तीचे उपाय ते या विठोबाचे पाय । ध्याइल तो काय जाणे चुकों मारग ॥ ४ ॥ आतां सांगे तुका एक तुह्मी चुकों नका । सांडीमांडी धोका शरण रिघतां गोमटें ॥ ५ ॥

---

१ दे. पं. आण.–२ दे. मुकेंडी –३ पं. गहिला.–४ पं. गोठी.–५ पं. हें कडवें नाहीं.–६ पं. गंगेतीरीं.–७ त. करी.–८ पं. देखा –९ दे. नवखडीं.–१० दे. त. तगी.–११ पं. जनकभेटी.–१२ पं. तेथें.–१३ पं. हे.–१४ दे. वाठवण.–१५ पं. हा.–१६ पं. चुकों जाणे.

२४८०. आह्मीं जाणावें तें काई तुझें वर्म कोणे ठायीं । अंतपार नाहीं ऐसें श्रुति बोलती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होईं मज तैसा मज तैसा साना सकुमार हृषीकेशा । पुरवीं माझी आशा भुजा चारी दाखवीं ॥ छ ॥ खालता सप्त ही पाताळा वरता स्वर्गाहूनि ढिसाळा । तो मी मैशक डोळां कैसा पाहों आपुल्या ॥ २ ॥ मज असे हा भरवसा पढीयें होसी तयां तैसा । पंढरीनिवासा तुका ह्मणे गा विठोबा ॥ ३ ॥

२४८१. वृक्ष वल्ली आह्मां सोयरीं वनचरें । पक्षी ही सुस्वरें आळविती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुण दोष अंगा येत ॥ छ ॥ आकाश मंडप पृथिवीं आसन । रमे तेथें मन क्रीडा करी ॥ २ ॥ कंथाकुमंडलु देहउपचारा । जाणवितो वारा अवसरु ॥ ३ ॥ हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥ ४ ॥ तुका ह्मणे होय मनासी संवाद । आपुला चि वाद आपणांसी ॥ ५ ॥

२४८२. अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें धेंडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥ छ ॥ मेरीं दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ३ ॥

२४८३. सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो संसारा सकळ ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतीं समयाचा करणें विचार । वेचती सादर घटिका पळें ॥ छ ॥ मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपोटें ॥ २ ॥ तुका ह्मणे देव अंतरला दुरी । डोळिया अंधारी पडलीसे ॥ ३ ॥

२४८४. लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा समरस जालों । तुजमाजी हरपलों ॥ छ ॥ अग्निकर्पुराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥ २ ॥ तुका ह्मणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥ ३ ॥

२४८५. सुख नाहीं कोठें आलिया संसारीं । वांया हांवभरी होऊं नका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुःखवांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें ॥ छ ॥ चवदा कल्पेंवरी आयुष्य जयाला । परी तो राहिला तोंटींखालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वेगीं जाय सुटोनियां । धरूनि हृदयामाजी हरि ॥ ३ ॥

२४८६. तुज करितां नव्हे ऐसें कांहीं नाहीं । डोंगराची राई रंक रोणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगीं ॥ छ ॥ सोळा

१ दे. त. हृषीकशा.–२ दे. त. मस्यक. पं. मश्यक –३ दे. क्षापला –४ पं. आहे.–५ दे. योगी.–६ पं. पृथ्वी. दे. पृथुवी –७ दे. त. अवश्वरु –८ पं. ब्रह्मांड –९ पं. हा.–१० पं. मारिदेले.–११ पं. अंतरपाट –१२ पं. ताटीतळीं.–१३ त. दे. होय.–१४ पं. राणे.–१५ पं. नारायणा.

सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥ २ ॥ पंचभ्रेतार[1] द्रौपदी सती । करितां पितृशांती[2] पुण्य धर्मा ॥ ३ ॥ दशरथा पातकें ब्रह्महैत्ये[3] ऐसीं । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥ ४ ॥ मुनेश्वेरा[4] नाहीं दोष अनुमात्र[5] । भांडवितां सुत्रं[6]* वध होती ॥ ५ ॥ तुका ह्मणे[7] माझे दोष ते[8] कायी । सरता तुझे[9] पायीं जालों देवा ॥ ६ ॥

## पाळणा.

२४८७. जननिया बाळका रे घातलें पाळणा । पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा । अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा । वैखरी धरूनि हातीं भाव दावी खेळणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निजीं रे निजीं आतां । ह्मणोनि परिये[10] दे माता । खेळतां कष्टलासी बाळा तूं रे नेणतां । निजीं रे निजीं आतां ॥ छ ॥ खेळतां बाहेरि रे मुला लोकांच्या सवें । बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें । खेळतां दुश्चित्तीं[11] रे देखोनि तें न्यावें । ह्मणोनि सांगें तुज शीघ्र वचन पाळावें ॥ २ ॥ संचित मागें तुज शुद्ध होतें सांगातीं । तेणें तुज वांचविलें वेरझारिया हातीं । आणीक नेलीं मागें काय जाणों तीं किती । आलासि येथवरि थोरें[12]पुण्यें बहुतीं ॥ ३ ॥ खेळतां शुक देवा तो रे लागला पाठीं । लपाला वरुषें बारा तिये[13] मातेचे पोटीं । रिघतां बाहेरि रे पळे घेऊनि कासोटी । ते[14] चि परी जाली स्वामी भेणें रिघे कपाटीं ॥ ४ ॥ खेळतां चक्रवर्ती जनका लागला धाक । पडिला अग्नीमाजी पाव जळत एक । भरलासे कांप अंगीं सुख नाठवे दुःख । आप पर तें ही नाहीं देहभाव सकळिक ॥ ५ ॥ सिभ्रीया† चक्रवर्ती कव पडिली अवचिती । धीट तो न भे तया मास कापिलें हातीं । टाकिलें तयावरी खुणें गोत्रिला अंतीं । पावला मायबाप हिरोन घेतला हातीं ॥ ६ ॥ बांधलें अजामेळा वेश्यागणीका कैसी । मारिली हाक धाकें कळलें मायबापासी । घातली धांव नेटें[15] वेगीं पावला त्यासी । हिरोनि नेलीं दोघें आपैणयां[16] तीं पासीं ॥ ७ ॥ धरूनी आँठवू[17] रे बाळा राहें निश्चळ । खेळतां दुश्चिता रे नको जाऊं बरळ । टोंकताहे तुजलागीं दिवस लेखूनी काळ । मग नेदी आठवूं रे नेत्रीं घालीं पडळ ॥ ८ ॥ ऐसी तीं

१ पं. पंचभ्रतारांची द्रौपदी ते सती ॥.–२ पं. गोत्रशांती.–३ पं. ब्रह्महत्यारासी –४ "मुनीश्वरा" याबद्दल.–५ "अणुमात्र" याबद्दल.–६ पं. 'सुत्र वध' याबद्दल स्तोत्रवंद.–७ पं. ह्मणे तेथें माझे.–८ पं. "ते" नाहीं.–९ त. दे. तुझा.–१० त. पं. परिये.–११ पं. दुश्चित.–१२ पं. थोरपुण्य –१३ पं. तये.–१४ पं. तेणें परि०.–१५ पं. त्वरे.–१६ पं. आपयातीपासी.–१७ पं. आटवू.
* सुत्र (सुत) असें यमका करितां केलें असावें.–† शिबिराया.

कृपावंतें बाळा मोहिलें चित्त । सुस्वरें कंठ गाय मधुर आणि संगीत । तेणें तें चि चित्त राहे होऊनियां निवांत । पावती तुका ह्मणे नाहीं विश्वास ते घात ॥ ९ ॥ ॥ १ ॥

२४८८. उभ्या बाजारांत कथा । हे तों नावडे पंढरिनाथा ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ अवघें पोटासाटीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ध्रु ॥ लावी अनुसंधान । कांहीं देईल ह्मणऊन ॥ २ ॥ काय केलें रांडलेंका । तुला राजी नाहीं तुका ॥ ३ ॥

२४८९. असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज वरी विठाबाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपंगिलें मज आहे ते कृपाळु । बहुत कनवाळु अंतरींची ॥ ध्रु ॥ वेदशास्त्रें जिसी वर्णिती पुराणें । तिचें मी पोसणें लडिवाळ ॥ २ ॥ जिचें नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेंकरूं तुका ह्मणे ॥ ३ ॥

२४९०. वाराणसी गया पाहिली द्वारका । परी नये तुका पंढरीच्या ॥ १ ॥ पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पायां पडे जन एकमेका ॥ २ ॥ तुका ह्मणे जाय एकवेळ पंढरी । तयाचिये घरीं यम न ये ॥ ३ ॥

२४९१. सांडुनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहूनियां झाडें वरवडूनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥ ध्रु ॥ वेंचूनियां चिंध्या भरूनियां धागा । गुंडाळूनि ढुंगा आळवावें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥ ३ ॥

२४९२. दह्यांचिया अंगीं निघे ताक लोणी । एका मोलें दोन्ही मागों नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहींशी समान पाहों नये ॥ ध्रु ॥ पृथ्वीचा पोटीं हिरा गारगोटी । दोहोंसी संसाटी करूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे संत आणि जन । दोहींसी समान भजूं नये ॥ ३ ॥

२४९३. तेरा दिवस जाले निश्चक्र करितां । न पवसी अनंता मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पार्षाणांची खोळ घेउनि बैसलासी । काय हृषीकेशी जालें तुज ॥ ध्रु ॥ तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥ २ ॥ फार विठाबाई धरिली तुझी आस । करीन जीवा नास पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन चंद्रभागे ॥ ४ ॥

२४९४. लोक फार वाखा अमंगळ जाला । त्याचा त्याग केला पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विषयां वंचलों मीपणा मुकलों । शरण तुज आलों पांडुरंगा ॥ ध्रु ॥

---

१ पं. एक वेळा.–२ दे. त. समसाटी.–३ पं. षोधाची.–४ दे. त. तजीन.–५ पं. हे चरण नाहीं.–६ त. तुजवरी.–७ पं. तुज्वरी.–८ पं. विषयं चेवलों.

घर दार अवघीं त्यजिलीं नारायणा । जीवांच्या जीवना पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे पैडिलों पुंडलिकापाशीं । धांव हृषीकेशी आलिंगीं मज ॥ ३ ॥

२४९५. इंद्रियांचीं दिनें । आह्मी केलों नारायणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि ऐसें सोसीं । काय सांगों कोणांपाशी ॥ छ ॥ नाहीं अंगीं बळ । त्याग करींसा सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे मोटें । प्रारब्ध होतें खोटें ॥ ३ ॥

२४९६. हातीं धरूं जीवें । तेणें परतें चि व्हावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा कां हो आला वांटा । हीन भाग्याचा करंटा ॥ छ ॥ देव ना संसार । दोहीं ठायीं नाहीं थार ॥ २ ॥ तुका ह्मणे पीक । भूमि न दे न मिळे भीक ॥ ३ ॥

२४९७. मोलें घातलें रडाया । नाहीं असुं आणि माया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥ छ ॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पावे ॥ २ ॥ काजव्याच्या ज्योती । तुका ह्मणे न लगे वाती ॥ ३ ॥

२४९८. तरि च जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरि काय थोडीं । श्वानशूकरें बापुडीं ॥ छ ॥ ज्यालयाचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥ २ ॥ तुका ह्मणे भले । ज्याच्या नांवें मानवलें ॥ ३ ॥

## ॥ लळतें ९ ॥

२४९९. देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी तों सांगतसें भावें । असो ठावें सकळां ॥ छ ॥ निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥ ३ ॥

२५००. न कळे[10] माव मुनि मागे एकी अंतुरीं । साठी संवत्सरां जन्म तया उदरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा ओंकळे गे माये चपळ वो । त्रिभुवनें[11]व्यापक सकळ वो ॥ छ ॥ हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा । गरुडा विटंबना रूपा सत्यभामेच्या ॥ २ ॥ द्रौपदीचा भेद पुरविला समयीं । ऋषि फळवनीं देंठीं लोंवितां[12] ठायीं[13] ॥ ३ ॥ अर्जुनाच्या रथीं कपि स्तंभीं ठेविला । दोहीं पैज तेथें गर्व हरी[14] दादुला ॥ ४ ॥ भावभक्ती सत्त्वगुण जाला दुर्जना । तुका ह्मणे सकळां छंदें खेळे ओंपणा ॥ ५ ॥

---

१ दे. त. तजिलीं.–२ पं. बहु जालों कासाविसी ।.–३ पं. धांवे.–४ पं. ठाव.–५ पं. श्वान शूकर.–६ पं. जाल्यांचें.–७ पं. नांवा –८ पं. न कळे वो माव०.–९ पं. एक.–१० त. पं. आकळ वो.–११ पं.० व्यापक हरि सकळ वो.–१२ पं. लावित्या.–१३ त. तई.–१४ पं. हरी हा दादुला.–१५ दे. आपण.

२५०१. उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा । तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा जासी सांग आतां मजपासुनी । केलें वाताहात दिलें संसारा पाणी ॥ छ ॥ अवघीं आवरूनि तुझे लाविलीं पाठीं । आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां चरणीं घातली मिठी । पडिली ते पडो तुह्मा आह्मांसी तुटी ॥ ३ ॥

२५०२. जाली होती काया । वेहु मळीन देवराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमच्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ छ ॥ अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा केला तोडा ॥ २ ॥ तुका ह्मणे देह पायीं । ठेवूनि झालों उतराई ॥ ३ ॥

२५०३. आजि आनंदु रे एकी परमानंदु रे । जया श्रुति नेति नेति ह्मणती गोविंदु रे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठोबाचीं वेडीं आह्मां आनंदु सदा । गाऊं नाचों वाऊं टाळी रंजवूं गोविंदा ॥ छ ॥ सदा सणें सांत आह्मां नित्य दिवाळी । आनंदें निर्भर आमचा कैवारी वळी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं जन्ममरणांचा धाक । संत सनकादिक तें आमचें कवतुक ॥ ३ ॥

२५०४. प्राणियां एक वीजमंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण ह्मण कां मुरारि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि साधन रे तुज सर्व सिद्धींचें । नाम उच्चारीं पां गोपाळाचें वाचे ॥ छ ॥ उपास पारणें न लगे वनसेवन । न लगे धूम्रपान पंचाअग्नतापन ॥ २ ॥ फुकाचें सुखाचें कांहीं न वेचें भांडार । कोटी यज्ञां परिस तुका ह्मणे हें सार ॥ ३ ॥

२५०५. विठ्ठल कीर्तनाचे अंतीं । जय जय हरी जे ह्मणती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें चि सुकृताचें फळ । वाचा रामनामें निरवळ ॥ छ ॥ बैसोनि हरिकथेसी । होय सावध चित्तासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचा जन्म । सुफळ जाला भवक्रम ॥ ३ ॥

२५०६. न चलवे पंथ वेचें नसतां पालवीं । शरीर त्रिंटविलें वाटे भीक मागावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करीं रे तैसें आपआपणां । नित्य राम राम तुह्मी सकळ ह्मणा ॥ छ ॥ राम ह्मणवितां रांडा पोरें निरविशी । पडसी यमा हातीं जाचविती चौऱ्यासी ॥ २ ॥ मुखीं नाहीं राम तो ही आत्महत्यारा । तुका ह्मणे लाज नाहीं तया गंव्हारा ॥ ३ ॥

---

१ पं. बहुत मळिन पंढरिराया.–२ पं. तुम्च्या.–३ पं. नि तोडा ।.–४ पं. "आजि" नाहीं.–५ दे. त. मन–६ दे. त. प्राणियां.–७ पं. रे.–८ पं. पचाग्निसाधन ।.–९ भवश्रम.–१० पं. वचन न सतां.–११ पं. ह्मणतां.–१२ त. तर. पं. "ही" नाहीं.

२५०७. यहियेसी निघतां पापाणांच्या सांगडी । बुडतां मध्यभागीं तेथें कोण घाली उडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करी रे तैसें आपआपणिया । पतंग जाय वांयां जीवें ज्योती घालूनियां ॥ छ ॥ सावधपणें सोमवलें वाटी भरोनियां प्याला । मरणा अंतीं वैद्य बोलावितो गाहिला ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंरीं ठायींचा चि विचार । जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥ ३ ॥

॥ ९ ॥

२५०८. द्या जी माझा विचारोनियां विभाग । न खंडे हा लाग आहाचपणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती नेणों तुह्मां साहाते कटकट । आह्मी च वाईट निवडलों ते ॥ छ ॥ करितां कलह जिवाचियेसाटीं । हे तुह्मां वोखटी ढाळ देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर कारण आपुला । तुह्मीं तों विठ्ठला मायातीत ॥ ३ ॥

२५०९. आमुचे ठाउके तुह्मां गर्भवास । वळिवंत दोष केले भोग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय हा सांगावा नसतां नवलावें । मैंदपणें भावें भुलवणेचा ॥ छ ॥ एका पळवूनि एका पाठी लावा । कवतुक देवा पाहावया ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यांणें असें चेतविलें । त्याच्यानें उगलें कैसें नव्हे ॥ ३ ॥

२५१०. निर्दयासी तुह्मी करितां दंडण । तुमचें गाऱ्हाणें कोठें द्यावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाकितों करुणा ऐकती कान । उगलें चि मौन्य धरिलें ऐसें ॥ छ ॥ दीनपणें पाहें पाय भिडावोनि । मंजुळा वचनीं विनवीतसें ॥ २ ॥ तुका ह्मणे गांठी मनाची उकला । काय जी विठ्ठला पाहातसां ॥ ३ ॥

२५११. नेंसेतों किविलवाणें । कांहीं तुमच्या कृपादानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे चि तयाची ओळखी । घालें टवटवित मुखीं ॥ छ ॥ वांयां जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥ ३ ॥

२५१२. जैंलों तंव साचें । दास राहवणें काचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें कां मिळतें उचितें । तुह्मी नेणा कृंपावंत ॥ छ ॥ सिंहाचें तें पिलें । जाय घेऊनियां कोल्हें ॥ २ ॥ तुका ह्मणे नास । आह्मां ह्मणविलियां दास ॥ ३ ॥

२५१३. देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लोभाचे संकल्प पळालियावरी । कैंची तेथें उरी पापपुण्या ॥ छ ॥

---

१ त. घाला.–२ दे. आपआपणा. पं. आपआपण्या.–३ त. सोमल. पं. सोमवोल.–४ पं. करीं रे ठायींचा०.–५ पं. जवळि.–६ पं. "ते" नाहीं.–७ दे. त. करवितां कल्हें.–८ दे. त. नवलावो.–९ दे. त. भावो.–१० पं. ऐसें जेणें.–११ पं. कोणें.–१२ त. नसतां.–१३ पं. जाळे नवसाचे–१४ पं. उचिता.–१५ पं. कृपावंता.

शुद्ध भक्ती मन जालिया निर्मळ । कुश्चळी[1] विटाळ वज्रलेप ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें तयासी च कळे । भांत येतो फळें[2] कळों मग ॥ ३ ॥

२५१४. कडसणी धरितां अडचणीचा ठाव । ह्मणऊनि जीव त्रासलासे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लौकिकाबाहेरि राहिलों[3] निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥ छ ॥ संकोचानें नाहीं होत धणीवरी । उरवूनि उरी काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें इच्छे चि सारिखें । नाहींसें पारिखें येथें कोणी ॥ ३ ॥

२५१५. हें चि जतन करा दान । धरुनी चरण राहिलों तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक कांहीं न घेलीं[4] भार । बहुत[5] फार सांकडें ॥ छ ॥ घ्यावी माझ्या हातें सेवा । हे चि देवा विनवणी ॥ २ ॥ तुका तुमचा ह्मणवी दास । तेणें[6] आस पुरवावी ॥ ३ ॥

२५१६. आपल्या च स्फुंदें[7] । जेथें तेथें घेती छंदें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पडिला सत्याचा दुष्काळ । वहु फार जाली घोळ ॥ छ ॥ विश्वासाचे माठ । त्याचे कपाळीं तें नाट ॥ २ ॥ तुका ह्मणे घाणा । मूढा तीर्थी[8] प्रदक्षिणा ॥ ३ ॥

२५१७. उद्वेगाची धांव बैसली आसनीं । पडिलें[9] नारायणीं मोटळें[10] हें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकळ निश्चिंती जाली हा भरवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ॥ छ ॥ आपुलिया नांवें नाहीं आह्मां जिणें । अभिमान तेणें नेला देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे[11] चेळे एकाचिया सत्ता । आपुलें मिरवितां[12] पणें ऐसें ॥ ३ ॥

२५१८. बहुतां पुरे ऐसा वाण । आलें धन घरासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्या रे फुका मोलेंविण । नारायण न भुला ॥ छ ॥ ऐका निवळल्या मनें । वरवें कानें सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे करूनि अंतीं । निश्चिंती[13] हे ठेवावी ॥ ३ ॥

२५१९. माझी मज जाती आवरली देवा । नव्हतां या गोवा इंद्रियांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया मी तुझा ह्मणवितों दास । असतों उदास सर्व भावें ॥ छ ॥ भैयाचिये[14] भेणें धरियेली कास । न पुरतां आस काय थोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे आपआपुली जतन । कैचें थोरपण मग तुह्मां ॥ ३ ॥

२५२०. विनवितों तरी आणितोसि परी । याचकानें थोरी दातयाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आमुचे ही कांहीं असों द्या भैकार[15] । एकल्यानें थोर कैचे तुह्मी ॥ छ ॥

---

१ पं. कुश्चळ.–२ पं. फळ.–३ पं. राहिलोंसें.–४ त. पं. घालीं.–५ पं. वहु.–६ पं. त्याची.–७ पं. फुदे. दे. स्फुदे.–८ पं. तीर्थ प्रदक्षणा.–९ पं. पढिलों.–१० पं. मोटाळें हें.–११ दे. चेळें.–१२ पं. मी रिता पणें आसे।.–१३ दे. त. निश्चिंती.–१४ दे. त. भयाचिया.–१५ पं. उपकार.

नेघावी जी कांहीं बहु साल सेवा । गौरव तें[1] देवा यत्न कीजे ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आमुची मिरासी । असावेंसीं[2] ऐसीं दुर्बळें चि ॥ ३ ॥

२५२१. एका ऐसें एक होतें कोणीं[3] काळें । समर्थाच्या बळें काय नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घालूनि बैसलों मिरासीस पाया । जिंकों देवराया संदेह नाहीं ॥ छ ॥ केला तो न संडीं आतां कइवाड । वारीन हे आड कामक्रोध ॥ २ ॥ तुका ह्मणे जाळीं[4] अळसाची धाडी । नव्हती आली जोडी कळों साच ॥ ३ ॥

२५२२. जालें समाधान । तुमचे धरिले[5] चरण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां उठावेंसें मना । येत नाहीं नारायणा ॥ छ ॥ सुरवाडिकपणें[6] । येथें सांपडलें केणें[7] ॥ २ ॥ तुका ह्मणे भाग[8] । गेला निवारला लाग ॥ ३ ॥

२५२३. मुखाकडे वास । पाहें करूनियां आस[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ आतां होईल ते शिरीं । मनोगत आज्ञा[10] धरीं ॥ छ ॥ तुह्मीं अंगीकार । केला पाहिजे हें[11] सार ॥ २ ॥ तुका ह्मणे दारीं । उभे याचक मीं हरी ॥ ३ ॥

२५२४. नाहीं मायां भार । तुह्मी घेत हा विचार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणोनियां ऐसें केलें । दुरिल अंगेसी लाविलें ॥ छ ॥ आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडी ॥ २ ॥ तुका ह्मणे दुरी[12] । देवा खोटी ऐसी उरी ॥ ३ ॥

२५२५. माझें जड भारी । आतां अवघें तुह्मांवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों अंकित अंकिला । तुमच्या मुकलों मागिला ॥ छ ॥ करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥ २ ॥ तुका पायां लागे । कांहीं नेदी ना न मंगे[13] ॥ ३ ॥

२५२६. तुह्मी आह्मी भले आतां । जालों चिंता काशाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलाले आलों[14] स्थळीं । मौन कळी[15] वाढेना ॥ छ ॥ सहज[16] जें मनीं होतें । तें उचितें[17] घडलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नसतें[18] अंगा । येत रंगा सारिखें ॥ ३ ॥

२५२७. चित्ता ऐसी नको देऊं आठवण । जेणें[19] देवाचे चरण अंतरे तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलिया वचनें[20] रामनामध्वनि । ऐकावीं कानीं ऐसीं गोडें[21] ॥ छ ॥ मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेंविण जीवा दुःख देतो ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे अंतर शीतळ । शांतीचें तें बळ क्षमा अंगीं ॥ ३ ॥

---

१ पं. तो –२ दे. असावेंसें.–३ पं. कोण्या. दे. कोणां –४ पं. जाळी.–५ पं. देखिले.–६ त. पं. सुरवाडिकपेणें.–७ पं. पेणें.–८ पं. भोग.–९ पं. वास.–१० पं. आज्ञाधारी –११ पं. तो –१२ त. घरीं.–१३ त. मागे.–१४ पं. गेलों.–१५ त. काळी –१६ पं. सहजं० –१७ पं. उचित.–१८ त. नसतां.–१९ पं. "जेणें" नाहीं.–२० त. पं. वचन –२१ पं. विनवणी ऐसी गोड.

२५२८. कोण पुण्य कोणा गांठी । ज्यासी ऐसियांची भेटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिहीं हरी धरिला मनीं । दिलें संसारासी पाणी ॥ छ ॥ कोण हा भाग्याचा । ऐसियांसी बोले वाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचे भेटी । होय संसारासी तुटी ॥ ३ ॥

२५२९. तरि च हा जीव संसारीं उदास । धरिला विश्वास तुह्मां सोई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एके जातीविण नाहीं कळवळा । ओढली गोपाळा सूत्रदोरी ॥ छ ॥ फुटतसे प्राण क्षणांच्या विसरें । हें तों परस्परें सारिखें चि ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारलों ॥ ३ ॥

२५३०. किती विवंचना करीतसें जीवीं । मन धांवडवी दाही दिशा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणा एका भावें तुह्मी अंगीकार । करावा विचार या च साटीं ॥ छ ॥ इतर ते आतां लाभ तुच्छ जाले । अनुभवा आले गुणागुण ॥ २ ॥ तुका ह्मणे लागो अखंड समाधि । जावें प्रेमबोधीं बुडोनियां ॥ ३ ॥

२५३१. दिक चि यां नाहीं संसारसंबंधा । तुटेना या बाधा भवरोगाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तांतडींत करीं ह्मणऊनि तांतडी । साधिली ते घडी सोनियाची ॥ छ ॥ संकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली । प्रारब्ध तें घाली गर्भवासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बीजें जाळुनी सकळ । करावा गोपाळ आपुला तो ॥ ३ ॥

२५३२. आतां होइन धरणेकरी । भीतरीच कोंडीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं केली जीवेंसाटी । तों कां गोष्टी रुचे ते[11] ॥ छ ॥ आधीं निर्धार तो सार । मग भार सोसीन ॥ २ ॥ तुका ह्मणे खाऊं जेवूं । नेदूं होऊं वेगळा ॥ ३ ॥

२५३३. होइल तरि पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तोंवरी मी पुढें कांहीं । आपुलें नाहीं घालीत ॥ छ ॥ जाणोनियां अंतर देव । जेव्हां भेव फेडील ॥ २ ॥ तुका ह्मणे धरिला हातीं । करील खंतीवेगळें ॥ ३ ॥

२५३४. हा तों नव्हे कांहीं निराशेचा ठाव । भलें पोटीं वाव राखिलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वंभरें विश्व सामाविलें पोटीं । तेथें चि सेवटीं आह्मी असों ॥ छ ॥ नेणतां चिंतन करितों अंतरीं । तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा स्वामी अबोलणा । पुरवूं खुणे खुणा जाणतसों[12] ॥ ३ ॥

२५३५. निष्ठुर तो दिसे[13] निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला च करावा केला कइवाड । होईल तें गोड न [15]पुरेते ॥ छ ॥

---

१ दे. संवसारा.—२ दे. त्यांचे.—३ त. तुझा—४ पं. निरसला.—५ दे. त. तुश.—६ पं. "या" नाहीं.—७ पं. तुटे चि ना बाधा०.—८ पं. टांतडी ते.—९ दे. प्रारब्ध. त. परारब्ध.—१० पं. करावें गोपाळे आपुले भाट.—११ दे. तें.—१२ पं. जाणतसे—१३ त. असे.—१४ पं. सगुण.—१५ पं. पुरते.

मथिलिया लागे नवनीत ह्मातां । नासे वितेळितां[1] आहाच तें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्त ॥ ३ ॥

२५३६. बहु देवा बरें जालें । नसतें गेलें सोंवळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धोवटाशीं पडिली गांठी । जगजेठीप्रसादें ॥ ध्रु ॥ गादल्याचा जाला जाडा । गेली पीडा विकल्प ॥ २ ॥ तुका ह्मणे बराबरी । निर्मळ करी निर्मळा ॥ ३ ॥

२५३७. स्वामित्वाचीं वर्में असोनि जवळी । वाहों जावें मोळी गुणांसवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कावाडापासूनि सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥ ध्रु ॥ धैनवंत्र्याचिये[2] अंगीं सत्ताबळ । व्याधि तो सकळ तोडावया ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें मोड्यासी कोंपट । सांडव्याची वाट विसरावी ॥ ३ ॥

२५३८. ऋणाच्या परिहारा जालों बोळगणा । धावी नारायणा वासलाती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों उतराई शरीरसंकल्पें । चुकों धावीं पापें सकळ ही ॥ ध्रु ॥ आजिवरि होतों धरूनि जिवासी । व्याजें कासाविसी बहु केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मना आणिला म्यां भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ॥ ३ ॥

२५३९. येणें पांगें पायांपाशीं । निश्चयेंसी राहेन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगितली करीन सेवा । सकळ देवा दौस्यत्व[3] ॥ ध्रु ॥ बंधनाची तुटली बेडी । हे चि जोडी मग आह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हें क्षण । पायांविण वेगळा ॥ ३ ॥

२५४०. आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करुन घ्याल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उँद्धारासी[4] काय उधाराचें काम । वाढवूं चि श्रम नये देवा ॥ ध्रु ॥ करा आतां मजसाटीं वाड पोट । ठाव नाहीं तंटें[5] जालें लोकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बाकी झडलियावरी । न पडे व्यवहीरीं[6] संचिताचे ॥ ३ ॥

२५४१. सर्व संगीं विट आला । तूं एकला आवडसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिली आतां पायीं मिठी । जगजेठी न सोडीं ॥ ध्रु ॥ बहु जालों क्षेदक्षीण[7] । येणें सीण तो नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे गंगे[8] वास । बहु त्या आस स्थळाची ॥ ३ ॥

२५४२. शीतळ तें शीतळाहुनी । पायवणी चरणींचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सेवन हें[9] शिरसा धरीं । अंतरीं हीं[10] वरदळा ॥ ध्रु ॥ अवघें चि नासी पाप । तीर्थें बाप माझ्याचें ॥ २ ॥ बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ॥ ३ ॥

---

१ पं. वितळतां.–२ दे. त. धनमंत्र्याचिये. "धर्न्वंतऱ्याचिये" असावें.–३ त. दाशत्व –४ दे. त. उधारासी.–५ पं. तट.–६ दे. त. वेव्हारीं.–७ दे. क्षीदक्षीण (खेदक्षीण ?).–८ दे. त. गम्वास ॥०.–९ पं. ही.–१० दे. हीं.

२५४३. गोंदे कांठीं होता आड । करूनि कोड कवतुकें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेलें जिवनापें ॥ छ्र ॥ राखोनियां ठाव । अल्प जीव लावूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे फिटे धनी । हे सज्जनीं विश्रांति ॥ ३ ॥

२५४४. न पाहें माघारें आतां परतोनि । संसारापासूनि विटला जीव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सामोरें येऊनि कवळीं दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥ छ्र ॥ सावधान चित्त होईल आधारें । खेळतां ही बरें वाटईल ॥ २ ॥ तुका ह्मणे कंठ दाटला या सोसें । न पवे चि कैसें जवळी हें ॥ ३ ॥

२५४५. मथनीचें नवनीत । सर्व हितकारक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दंडवत दंडा परी । मागें उरी नुरवावी ॥ छ्र ॥ वचनाचा तो पसरु काई । तांतडी डोईपार्शीच ॥ २ ॥ तुका ह्मणे जगजेठी । लावीं कंठीं उचलूनि ॥ ३ ॥

२५४६. अवचिता चि हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्य फळलें जाली भेटी । नेघें तुटी यावरी ॥ छ्र ॥ दैन्य गेलें हरली चिंता । सैदैव आतां यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे वांश जाला । बोलों बोली देवासीं ॥ ३ ॥

२५४७. समर्थाची धरिली कास । आतां नाश काशाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवें पावें करीन लाहो । तुंमचा आहो विठ्ठलाँ ॥ छ्र ॥ न लगे मज पाहाणें दिशा । हाकेसरिसा ओढसी ॥ २ ॥ तुका ह्मगे नव्हे धीर । तुह्मां स्थिर दयेनें ॥ ३ ॥

२५४८. करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिहीं केला मूर्तिमंत । ऐसेँ संतप्रसाद ॥ छ्र ॥ सोज्ज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागीलां ॥ २ ॥ तुका ह्मगे घेऊं धांवा । करूं हांवा ते जोडी ॥ ३ ॥

२५४९. अचळ न चळे ऐसें जालें मन । धरूनि निज खुण राहिलोंसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥ छ्र ॥ एकविध भाव नव्हे अभावना । आर्णिकिया गुणां न मिळवे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें पडिलें आहारीं । ध्यान विटेवरी ठाकलें तें ॥ ३ ॥

२५५०. काय तुझी थोरी वर्णूं मी पामर । होसी दयाकर कृपासिंधु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज ऐसी दया नाहीं आणिकासी । ऐसें[10] हृषीकेशी नवल एक ॥ छ्र ॥ कुरुक्षेत्रभूमीवरी पक्षी व्याले । तृणामाजी केलें कोठें त्यांनीं ॥ २ ॥ अकस्मात तेथें रणखांब रोविला । युद्धाचा नेमिला ठाव तेथें ॥ ३ ॥ कौरव पांडव दळभार दोन्ही ।

---

१ दे. नुरावी.–२ दे. पं. सर्व.–३ त. नास.–४ दे. त. धाव.–५ दे. तुमच्या पं. "तुमचा" बद्दल "नामें".–६ पं. विठ्ठल.–७ पं. ऐसा.–८ पं. मागील्या.–९ पं. आर्णीक या.–१० पं. एकें.

झुंजावया रणीं आले तेथें ॥ ४ ॥ तये काळीं तुज पक्षी आठविती । पाव बा श्रीपती ह्मणोनियां ॥ ५ ॥ हस्ती[1] घोडे रथ येथें धांवतील । पाषाण होतील शतचूर्ण ॥ ६ ॥ ऐसिये आकांतीं वांचों कैसे परी । धांव वा श्रीहरी लवलाहें ॥ ७ ॥ टाकोनियां पिलीं कैसें जावें आतां । पावें जगन्नाथा लवलाहीं ॥ ८ ॥ आली तिये[2] काळीं कृपा तुझ्या चित्ता । अनाथांच्या नाथा नारायणा ॥ ९ ॥ एका गजाचिया कंठीं घंटा होती । पडिली[3] अवचिती तयांवरी ॥ १० ॥ अठरा दिवस तेथे द्वंद्वयुद्धें[4] जालें । वारा ऊन लागलें नाहीं तयां ॥ ११ ॥ झुंजें जाल्यावरी दाविलें अर्जुना । तुह्मी[5] नारायणा पक्षियांसी ॥ १२ ॥ पाहें आपुलिया दासां म्यां[6] रक्षिलें । रणीं वांचविलें कैशा परी ॥ १३ ॥ ऐसी तुज माया आपुल्या भक्तांची । माउली आह्मुची तुका ह्मणे ॥ १४ ॥

२५५१. वैष्णवां संगती सुख वाटे जीवा । आणीक मी देवा कांहीं नेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गायें नाचें उडें आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥ छ ॥ लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुल्या सायासें । आह्मां जगदीशें[7] सांभाळावें ॥ ३ ॥

२५५२. शरण शरण वाणी । शरण त्रिवाचा विनवणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्तुती न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासांचा ॥ छ ॥ देह[8] सांभाळून । पायांवरी लोटांगण ॥ २ ॥ विनवी तुका[9] संतां दीन । नव्हे गोरवें उत्तीर्ण ॥ ३ ॥

२५५३. लेंकरा लेववी माता अळंकार । नाहीं अंतपार आवडीसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ॥ छ ॥ आरुषा उत्तरीं संतोषे माउली । कवळूनि घाली हृदयात ॥ २ ॥ पोटा आलें त्याचे नेणे गुणदोष । कल्याणें[10] चि असे असावें हें ॥ ३ ॥ मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघें[11] गंगा काई परतों जाणे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कोठें उदार मेघां शक्ति । माझी तृषा किती चातकाची ॥ ५ ॥

२५५४ युक्ति तंव जाल्या कुंटित सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतचरणीं भावें ठेविलें मस्तक । जोडोनि हस्तक राहिलोंसें ॥ छ ॥ जाणपणें नेणें कांहीं चि प्रकार । साक्षी तें अंतर अंतरासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी केलें अभयदान । तेणें[12] समाधान राहिलेंसे[13] ॥ ३ ॥

---

१ पं. हत्ती.–२ पं. तये.–३ पं. पडिली.–४ दे. द्वदजुज.–५ पं. जुझ –६ पं. मी.–७ दे. त. जगदेशें.–८ पं. देह न सांभा० –९ दे. संता तुका.–१० त. पं. कल्याणाची आस असावें हें ।.– ११ पं. वोघ.–१२ दे. जेणें.–१३ पं. राहिलोंसें

२५५५. हागे आलों कोणी ह्मणे बुडतिया । तेणें किती तया बळ चढे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी तंव भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ॥ छ ॥ भुकेलियां आस दावितां निर्धार । किती होय धीर समाधान ॥ २ ॥ तुका ह्मणे दिली चिंतामणीसाटीं । उचित कांचवटी दंडवत ॥ ३ ॥

॥ १ ॥

२५५६. कैसा [२]तीं देखिला होसील गोपाळीं । [३]पुण्यवंतीं डोळीं नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें लोभें जीव [४]जालासे बराडी । आह्मी ऐसी जोडी कई लाभों ॥ छ ॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभावितां ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते [५]क्षणक्षणा [६]होते ॥ ३ ॥

२५५७. कासया या लोभें केलें आर्तभूत । सांगा माझें चित्त नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चातकाचे परी एक चि निर्धार । लक्षभेदीतीर फिरों नेणे ॥ छ ॥ सांवळें रूपडें चतुर्भुज मूर्ति । कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं आवडीसी ठाव । नको माझा भाव भंगों देऊं ॥ ३ ॥

२५५८. काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां दाविली ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खरी करूनियां देई माझी आळी । येऊनि [७]कुंरवाळीं पांडुरंगे ॥ छ ॥ आणीक म्यां कोणा ह्मणवावें हातीं । नये काकुलती दुजियासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज येथें चि ओळखी । होईन तो सुखी पायांनीं च ॥ ३ ॥

२५५९. तुह्मां आह्मां जंव जालिया समान । तेथें कोणां कोण सनमानी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उरी तों [८]राहिलें गोमटें गौरव । ओढे माझा जीव पायांपाशीं ॥ छ ॥ नेणपणें आह्मी आळवूं वोरसें । बोलवितों रसें शब्दरत्नें ॥ २ ॥ तुका ह्मणे लळे पाळीं वो विठ्ठले । कां हे उरविले भेदाभेद ॥ ३ ॥

२५६०. नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळ्याचा वाद करीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासयानें बळ करूं पायांपाशीं । भाकावी ते दासीं करुणा आह्मीं ॥ छ ॥ काय मज चाड असे या लौकिकें । परी असे निकें अनुभवाचें ॥ २ ॥ लांचावल्यासाटीं वचनाची आळी । टकळ्यानें घोळी जवळी मन ॥ ३ ॥ वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरि अंगीं पिसें लावियेलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी [९]येथें चि आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छीतसें ॥ ५ ॥

---

१ ह्मणे कोणी.–२ पं. तो –३ पं. पुण्यवता –४ पं. जालोसे.–५ दे. क्षणाक्षणां.–६ पं. होत.– ७ दे. त. कुवाळी –८ दे. त. राहिली –९ पं. येथींची.

२५६१. ह्मणऊनी लवलाहें । पाय आहें[1] चिंतीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाटिलागों[2] येतो काळ । तूं कृपाळ[3] माउली ॥ छ्र ॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं जननी । ये निर्वाणीं विठ्ठले ॥ ३ ॥

२५६२. जेणें वाढे अपकीर्ति । सर्वार्थी तें वर्जावें[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्य रुचे भलेपण । वचन तें जगासी ॥ छ्र ॥ होइजेतें शुद्ध[5] त्यागें । वाउगें तें सारावें ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटें वर्म । निर्धर्म[6] काळिमा ॥ ३ ॥

२५६३. याची सवे लागली जीवा । गोडी हेवा संगाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परतें न सरवे दुरी । क्षण हरीपासूनि ॥ छ्र ॥ जालें तरीं काय तंट । आतां चट न संडे[7] ॥ २ ॥ तुका ह्मणे चक्रचाळे । वेर्ड[8] बळें लाविलें ॥ ३ ॥

२५६४. याचा तंव हा[9] चि मोळा । देखिला डोळा उदंड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेदी मग फिरों मागें । अंगा अंगें संचरे ॥ छ्र ॥ कां गा याची नेणां[10] खोडी । जीभा जोडी करितसां ॥ २ ॥ पांघरे तें बहु काळें । घोंगडें ही ठायींचें ॥ ३ ॥ अंगीं वसे चि ना लाज । न ह्मणे भाज कोणाची ॥ ४ ॥ सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणें नसावें ॥ ५ ॥ तुका ह्मणे धरिला हातीं । मग निश्चितीं हरीनें[11] ॥ ६ ॥

२५६५. प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घरबुडी ॥ छ्र ॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागें लागेना ॥ २ ॥ हो कां नर अथवा नारी । लाहान थोरीं आदर ॥ ३ ॥ जालें वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥ ४ ॥ वळेना तो आहे कैसा । कोणी दिशीं[12] बहु थोडा ॥ ५ ॥ तुका ह्मणे दुसऱ्या भावें । छायें नावें न देखवे ॥ ६ ॥

२५६६. न संडावा आतां ऐसें[13] वाटे टाव । भयाशी उपाव रक्षणाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि मनें बोळियेलें[14] मन । कोरियेकारण[15] चाड नाहीं ॥ छ्र ॥ नानाची[16] उपाधि करूनियां मूळ । राखतां विटाळ तें चि व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें न वेचे वचन । निजीं निजखूण सांपडली ॥ ३ ॥

२५६७. सत्तेचें भोजन समयीं आतुडे । सेवन ही घडे रुचिनेसी[17] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्मे श्रम नेला जालें एकमय । हृदयस्थीं सोय संग जाला ॥ छ्र ॥

---

१ पं. असें.–२ पं. पाटिलाग –३ दे. त. कृपाळू –४ पं. त्यजावें.–५ दे. त. शूर – ६ पं. नित्यवर्मे –७ दे. त. संटे –८ दे. त. वेळ –९ पं. ऐसा चि मोळा.–१० पं. कोणी.– ११ पं. हरीन.–१२ पं. दिसा.–१३ पं. ऐसा.–१४ पं. वोळियेलें मना.–१५ पं.० कारणा.– १६ दे. त. नाना वीचि.–१७ त. रुचिनसी.

कोथळीस जमा पडिलें संचित । मापल्याचा वित्त नेम जाला ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी ऐसा जालों आतां । करीन ते सत्ता माझी आहे ॥ ३ ॥

२५६८. देईल तें उणें नाहीं । याचे कांहीं पदरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहिजे तें संचित आतां । येथें सत्ता करावया ॥ ध्रु ॥ गुणां ऐसा भरणा भरी । जो जें विचारी तें लाभे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवीं देव । फळे भाव आपुला ॥ ३ ॥

२५६९. तेव्हां होतों भोगाधीन । तुह्मां भिन्न पासूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां बोलों नये ऐसें । आनारिसें वेगळें ॥ ध्रु ॥ सन्मुख जालों स्वामीकडे । भव औठडे निराळे ॥ २ ॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥ ३ ॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं ते वंचेना ॥ ४ ॥ तुमची देवा धरिली कास । केला नास प्रपंचा ॥ ५ ॥ तुका ह्मणे जाणोनि वर्म । कर्माकर्में ठेविलीं ॥ ६ ॥
॥ ५ ॥

२५७०. केला कईवाडँ संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जीवित्वाची धरुनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥ ध्रु ॥ अंत्राळीनें जावें निश्चिंतीच्यों ठायां । रांडा रोटा वांयां करूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी देतां तें निधान । भिकेसाटीं कोण राज्य देतो ॥ ३ ॥

२५७१. संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव आसिजेतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसीं तैसीं असों पुढिलांचे सोई । धरिती हातीं पायीं आचारिये ॥ ध्रु ॥ उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलांची सदा दया चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तरीं सज्जनाची कीर्ति । पुरवावी आर्ति निर्बळांची ॥ ३ ॥

२५७२. करितां विचार सांपडलें वर्म । समूळ निश्रम परिहाराचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज घेऊनियां आपणांसी द्यावें । साटीं जीवें जीवें नारायणा ॥ ध्रु ॥ उरी नाहीं मग पडदा कां आला । स्वमुखें चि भला करितां वाद ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें खरें देणें घेणें । तुह्मी साक्षी जाणें अंतरींचें ॥ ३ ॥

२५७३. कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवें जालें शरण गेलों । उगविलों संकटीं ॥ ध्रु ॥ आणिला रूपा ही वळें । करूनि खेळें हरिदासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥ ३ ॥

---

१ दे. त. चारी.–२ दे. त. स्थित.–३ त. कइवाड. दे. कैवाड–४ पं. आमाळीनें.–५ दे. निचितिया.–६ पं. अशुभ.–७ त. समूळुनिश्रम–८ पं. सांटीं जीवें भावें नारायणा. दे. साटी.–९ पं. खळ.

२५७४. आतां देह अवसान। हें जतन तोंवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाऊं नाचों गदारोळें। जिंकों बळें संसार ॥ छ ॥ या चि जीऊं अभिमानें। सेवाधनें बळकट ॥ २ ॥ तुका ह्मणे न सरें मागें। होईन लागें आगळा ॥ ३ ॥

२५७५. ज्यानें आड यावें कांहीं। त्याचें नाहीं बळ आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मन येथें साह्य जालें। हरिच्या घालें गुणवादीं ॥ छ ॥ चुकुर तो गेला काळ। जालें बळ संगाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे धरूं सत्ता। होईल आतां करूं तें ॥ ३ ॥

२५७६. देवासी तो पुरे एकभाव गांठी। तो चि त्याचे मिठी देइल पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहोनि राहीन कवतुक निराळा। मी मज वेगळा होऊनियां ॥ छ ॥ कांहीं नेघें शिरीं निमित्याचा भार। न लगे उत्तर वेचावें चि ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें पडिलिया गांठी। मग नाहीं मिठी सुटों येत ॥ ३ ॥

२५७७. लौकिकासाटीं या पसाऱ्याचा गोवा। कांहीं नाहीं देवा लागों येत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवावा माथा तो तुचलावा पायीं। ठायींचिये ठायीं हालों नये ॥ छ ॥ [1]ढेवळिल्या मनें वितळिलें रूप। नांवऐसें पाप उपाधीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे देव प्रीतीनें कवळी। ठेवील जवळी उठवूनि ॥ ३ ॥

२५७८. नाहीं होत भार घातल्या उदास। पुरवावी आस सकळ ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा नाहीं मज एकाचा अनुभव। धरिला तो भाव [2]उद्धरील ॥ छ ॥ उतावीळ असे शरणागतकाजें। धांव केशीराजे आइकतां ॥ २ ॥ तुका ह्मणे हित चिंतनें[3] भरवंसा। नेदी गर्भवासा येऊं देवा ॥ ३ ॥

२५७९. [4]उपजों मरों हे तों आह्मुची मिरासी। हें तूं निवारिसी तरी थोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभा राहीं करीं खरा खोटा वाद। आह्मी जालों निंद्यें[5] लंडीपणें ॥ छ ॥ उभयतां आहे करणें समान। तुह्मां ऐसा ह्मणें मी ही देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे हातीं सांपडलें वर्म। अवघाची [6]श्रम फेडिन आतां ॥ ३ ॥

२५८०. मेलियांच्या रांडा इच्छितील करूं। लाज नाहीं धरूं भीती कैशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागिलां पुढिलां [7]एक सरोबरी। काळाची पेटारी खांदीं[8] वाहे ॥ छ ॥ आन दिसे परी मरणें चि खरें। सांपळा उंदिरें सामाविलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली मनाची परती। निवळली ज्योती दिसों आली ॥ ३ ॥

२५८१. निष्ठुर मी जालों अतिवादागुणें। हें कां नारायणें नेणिजेल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडियेली तुह्मी गोत परिसोय। फोडाविली डोय कर्मा हातीं ॥ छ ॥

---

१ दे. त. पं. डव्हळिल्या—२ दे. त. उद्धरलें—३ त. चिंतनें.—४ पं. उपजोनि मरों.—५ दे. निंद.—६ पं. श्रम—७ दे. एकी.—८ पं. खादीं.

सांपडूनि संदी केली जीवेंसाटीं । घ्यावयासि तुटी कारण हें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज काय ह्मणों उणें । नाहीं अभिमानें चाड देवा ॥ ३ ॥

२५८२. माझें माझ्या हाता आलें । आतां भलें सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काशासाटीं विषम थारा । तो अंतरा विटाळ ॥ छ्र ॥ जालीं तया दुःखें तुटी । मागिल पोटीं नसावें ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्धकुळ । तेथें मळ काशाचा ॥ ३ ॥

२५८३. समर्थपणें हे[2] करा संपादणी । नसतें चि मनीं धरिल्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत । तैरि[3] मी निवांत पाय पाहें ॥ छ्र ॥ खोटियाचें खरें खरियाचें खोटें । मानलें गोमटें तुह्मांसी तें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां सवें करितां वाद । होईजेतें निंद्य[4] जनीं देवा ॥ ३ ॥

२५८४. तुह्मां आह्मांसवें न पडावी गांठी । अॅलेति[5] जगजेठी कळों आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती ह्मणों आतां वाइटा वाइट । शिवों नये वीट आल्यावरी ॥ छ्र ॥ बोलिल्याची आतां हे चि परचित । भीड भार थीत बुडवील ॥ २ ॥ तुका ह्मणे आली रोकडी प्रचिती । झांकणें तें किती कोठें देवा ॥ ३ ॥

२५८५. सकळ सत्ताधारी । व्हावें ऐसें काय हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि या कृपेच्या वोरसें । कुडावयाचें चि पिसें ॥ छ्र ॥ अंगें सर्वोत्तम । अवघा चि पूर्णकाम ॥ २ ॥ तुका ह्मणे दाता । तरि हा जीव दान देतां[6] ॥ ३ ॥

२५८६. कोणापाशीं द्यावें माप । आंपीं[7] आप राहिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ॥ छ्र ॥ एकें दाखविले दाहा । फांटा पाहा पुसून ॥ २ ॥ तुका ह्मणे सरलें वोझें । आतां माझें सकळ ॥ ३ ॥

२५८७. नभोमय जालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥ छ्र ॥ कैचा तेथ यावा सांडी । आप कोंडी आर्पणा ॥ २ ॥ तुका ह्मणे कल्प जाला । अंस्त गेला उदय ॥ ३ ॥

२५८८. राजा करी तैसे दाम । [10]ते ही चाम चालती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कारण ते सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥ छ्र ॥ वाइट तें सुनें खांदीं । चाले पदीं बैसविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरें । करुणाकरें [11]रक्षिलें ॥ ३ ॥

---

१ पं. संधी.–२ पं. "हे" नाहीं.–३ पं. परी.–४ दे. निंद –५ त. आली ती जग०.–६ दे. देता.–७ पं. आपे आप.–८ दे. आपण्या –९ पं. अस्ता.–१० पं. चाम ते ही.–११ त. रक्षीलें.

२५८९. आह्मी देव तुह्मी देव। मध्यें भेव अधीक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैवाडाच्या धांवा लागें। मागें मागें विठ्ठले ॥ छ ॥ भेडसाविलें हाके नादें। वोळखी भेदें मोडिली ॥ २ ॥ तुका ह्मणे उभा राहे। मागें पाहे परतोनि ॥ ३ ॥

२५९०. हीनसुरबुद्धीपासीं। आकृतीसी भेद नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक दांडी एक खांदी। पैदीं पदीं भोगणें ॥ छ ॥ एका ऐसें एक नाहीं। भिन्न पाहीं प्रकृती ॥ २ ॥ तुका ह्मणे भूमी खंडे। पीक दंडे जेथें तें ॥ ३ ॥

२५९१. काय बोलों सांगा। याउपरी पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं आधारावांचून। पुढें न चले वचन ॥ छ ॥ वाढे ऐसा रस। कांहीं करावा सौरस ॥ २ ॥ भक्तिभाग्यसीमा। द्यावा जोडोनियां प्रेमा ॥ ३ ॥ कोरड्या उत्तरीं। नका गौरवूं वैखरी ॥ ४ ॥ करी विज्ञापना। तुका प्रसादाची दाना ॥ ५ ॥

२५९२. आहाच तो मोड बाळलियामर्थी। अधीराची बुद्धि तेणें न्यायें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि संग न करीं दुसरें। चित्त मळीन द्वारें दोडें पडे ॥ छ ॥ विषासाटीं सर्पा भयाभीत लोक। हें तों सकळीक जाणतसां ॥ २। तुका ह्मणे काचें राहे कुळांकुड। अवगुण तो नाड ज्याचा तया ॥ ३ ॥

२५९३. क्षणक्षणां जीवा वाटतसे खंती। आठवती चित्तीं पाय देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यंई वो येंई वो येंई लवलाहीं। आलिंगूनि बाहीं क्षेम देंई ॥ छ ॥ उताविळ मन पंथ अवलोकी। आठवा ते चुकी काय जाली ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवींच्या जीवना। घाला नारायणा उडी वेगीं ॥ ३ ॥

२५९४. आळी करावी ते कळतें बाळका। बुझवावें हें कां नेणां तुह्मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निवाड तो तेथें[3] असे पायांपाशीं। तुह्मांआह्मांविशीं एकेठायीं ॥ छ ॥ आणीक तों आह्मी न देखोंसें जालें। जाणावें शिणलें भागलेंसें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां लागतें सांगावें। अंतरींचें ठावें काय नाहीं ॥ ३ ॥

२५९५. तांतडीनें आह्मां धीर चि न कळे। पळावे हे लळे लवलाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका कांहीं पाहों सावकाशीं देवा। करा एक हेवा तुमचा माझा ॥ छ ॥ वोरसाचा हेवों सांभाळावी प्रीत। नाहीं राहों येत अंगीं सैंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज नका गोवूं खेळा। भोजनाची वेळा राखियेली ॥ ३ ॥

---

१ पं. पदोपदीं जोगणें.—२ त. पूर्वी "द्वाडपडे" असून "द्वोडपडे" केलें आहे.—३ पं. येथें.—४ पं. यावा—५ पं. धंदा.

२५९६. नाहीं लोपों येत गुण । वेधी आणीकें[1] चंदन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न संगतां पडे ताळा । रूप दर्पणीं सकळां ॥ छ ॥ सारविलें वरी । आहाच तें क्षणभरी ॥ २ ॥ तुका ह्मणे वोहळें । सागराच्या ऐसें व्हावें ॥ ३ ॥

२५९७. वचनें चि व्हावें आपण उदार । होइल विश्वंभर संतुष्ट[2] चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्यसंकल्पाचीं फळें बीजाऐसीं । शुद्ध नाहीं नासी पावों येत ॥ छ ॥ वंचिलिया काया येतसे उपेगा । शरीर हें नरकाचें चि आळें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव जितां थारे लावा । पडिलिया गोवा देशधडी ॥ ३ ॥

२५९८. उरवतें आयुष्य जायांचें कलिवरें[3] । अवघें वोडंवर विषयांचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणासी हा लागे पुसणें विचार । मैनें[4] चि सादर करूं आतां ॥ छ ॥ उत्पत्ति प्रळय पडिलें दळण । पाकाचें भोजन बीज वाढे ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं अभयाच्या ठायां । रिघों देवराया शरण वेगीं ॥ ३ ॥

२५९९. वोलावे ह्मूण हे[5] वोलतों उपाय । प्रवाहें हें जाय गंगाजळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्ययोगें कोणां घडेल सेवन । कैंचे येथें जन अधिकारी ॥ छ ॥ मुखीं देतां घांस पळवितीं तोंडें[6] । अंगींचिया भांडे असुकानें ॥ २ ॥ तुका ह्मणे पूजा करितों देवाची । आपुलिया रुची मनाचिये ॥ ३ ॥

२६००. लटिक्याचे वाणी चवी ना सँवाद[7] । नांहीं कोणां वाद रुचों येत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायबापीं वेळा न साधिली ॥ छ ॥ अनावर अंगीं प्रबळ अवगुण । तांतडीनें मन लाहो साधी ॥ २ ॥ तुका ह्मणे दोष आणि अवकळा । न पडतां ताळा घडतसे[8] ॥ ३ ॥

२६०१. नये स्तवूं काचें होतें क्रियानष्ट । फुंदाचे[9] ते कष्ट भंगा मूळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं परमार्थ साधत लौकिकें । धरुन होतों फिकें अंगा आलें ॥ छ ॥ पारखिया पुढें नये घालूं तोंड । तुटी लाभा खंड होतो[10] मौना[11] ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी भिरवतें परवडी । कामावल्या गोडी अविनाश[12] ॥ ३ ॥

२६०२. कोण्या काळें येईल मना । नारायणा तुमचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा करणें अंगीकार । सर्व भार फेडूनि ॥ छ ॥ लागली हे तळमळ चिंता[13] । तरी दुश्चिता संसारीं ॥ २ ॥ सुखाची च पाहें वास । मागें दोष सांभाळीं ॥ ३ ॥ इच्छा पूर्ण जाल्याविण । कैसा सीण वारेल ॥ ४ ॥ लाहो काया मनें वाचा ।

१ पं. आणीकां.–२ दे. त. संपुष्ट.–३ दे. त. कळिवर.–४ पं. मन.–५ पं. "हे" नाहीं.–६ पं. तोंड.–७ त. पं. संवाद. दे. पूर्वी 'रुंवाद' असें होतें.–८ दे. घडे तसे.–९ पं. स्फुंदाचे.–१० त. होती.–११ त. पं. मना.–१२ त. अविनाशा.–१३ पं. चिंता.

देवीं साच्या भेटीचा ॥ ५ ॥ कांटाळा तो न धरावा । तुह्मी देवा दासांचा ॥ ६ ॥ तुका ह्मणे माझे वेळे । न कळे कां हें उफराटें ॥ ७ ॥

२६०३. घ्यावी तरी घ्यावी उदंड चि सेवा । द्यावें तरी देवा उदंड चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसीं कैचीं आह्मी पुरतीं भांडवलें । आल्या करीं बोलें समाधान ॥ छ ॥ व्हावें तरी व्हावें बहुत चि दुरी । आलिया अंतरीं वसवावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें सख्यत्व आपणीं । अससील ऋणी आवडीचा ॥ ३ ॥

२६०४. काय करूं जीव होतो कासावीस । कोंडलिये दिस गमे चि ना ॥ १ ॥ पडिलें हें दिसे ब्रह्मांड चि वोस । दाटोनि उच्छ्वास राहातसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आगा सर्वजाणतिया । विश्वंभरें काया निववावी ॥ ३ ॥

२६०५. सुकलियां कोमां अत्यंत जळधर । तेणें च प्रकार न्याय असे ॥ १ ॥ न चलें पाउलीं सांडीं गरुडासन । मनाचें हीं मन त्वरेलागीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक न साहावे बाळा । जीवनांची कळा ओढलीसे ॥ ३ ॥

२६०६. शृंगारिक माझीं नव्हती उत्तरें । आळवितों खरे अवस्थेच्या ॥ १ ॥ न घलोंवा मर्यी कामाचा विलंब । तुह्मी तों स्वयंभ करुणामूर्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें सन्मुख वदन । देखतां चरण पोटाळीन ॥ ३ ॥

२६०७. तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहातों वाटुली पांडुरंगे ॥ १ ॥ तूं मज येकुला वडील धाकुला । तूं मज आपुला सोयरा जीव ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव तुजपाशीं असे । तुंजविण ओस सर्व दिशा ॥ ३ ॥

२६०८. कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बळियाचीं आह्मी बाळें । असों निर्भर या सळे ॥ छ ॥ आतां कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरीराया । थापटितों ठोक बाह्या ॥ ३ ॥

२६०९. डोळां भरिलें रूप । चित्ता पायांपें संकल्प ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ छ ॥ वाचा केली माप । राशीं हरिनाम अमुप ॥ २ ॥ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ३ ॥

२६१०. आतां आहे नाहीं । न कळे आळी करा कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देसी पुरवुनी इच्छा । आतां पंढरीनिवासा ॥ छ ॥ नेणे भाग सीण । दुजें कोणी तुह्मांविण ॥ २ ॥ आतां नव्हे दुरी । तुका पायीं मिठी मारी ॥ ३ ॥

---

१ पं. दिवसाचा भेटीचा.–२ पं. आपुल्या.–३ पं. कोंडली हे.–४ त. ही.–५ पं. घालावा.–६ दे. त. तुझियानें.–७ पं. मध्यें रिघेल वोंगळ.–८ पं. चित्तीं पायांचे संकल्प.–९ पं. कांहीं.

२६११. संकल्पासीं आधिष्ठान । नारायण गोमटें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियांचें पुरे कोड । फिटे जड देहत्व ॥ छ ॥ उभय लोकीं उत्तम कीर्ति । देव चित्तीं राहिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव धाय । नये हाय जवळी ॥ ३ ॥

२६१२. भाग्यवंता ऐशी जोडी । परवडी संतांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना ॥ छ ॥ जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांटवणें ॥ २ ॥ तुका ह्मणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ३ ॥

२६१३. जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता व्यवसायी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तृष्णेचीं मजुरें नेणती विसांवा । वाढे हांव हांवा काम कामीं ॥ छ ॥ वैभवाचीं सुखें [1]नातळतां अंगा । चिंता करी भोगीं [2]विघ्न जाळी ॥ २ ॥ तुका ह्मणे वाहे मरणाचें भय । रक्षणउपाय करूनि असे ॥ ३ ॥

२६१४. कोण होईल आतां संसारपांगिलें । आहे उगवलें [3]सहजें चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला तो चालवीं आपुला प्रपंच । काय कोणां वेच आदा घे दे ॥ छ ॥ [4]सहजें चि घडे आतां मोल्याविण । येथें काय सीण आणि लाभ ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों सहज देखणा । ज्याच्या तेणें खुणा दाखविल्या ॥ ३ ॥

२६१५. आह्मां शरणागतां । एवढी काय करणें चिंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि हे कौतुकाचे खेळ । अवघे [5]पाहातों सकळ ॥ छ ॥ अभयदान[6]द्वंदें । आह्मां कैंचीं [7]भयद्वंद्वें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी । हरिजन साधनाचे स्वामी ॥ ३ ॥

२६१६. देवाचिये चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासीं ॥ १ ॥ नये राहों उभें [8]कैसमळापाशीं । [9]भुंकतील तैसीं सांडावीं [10]तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षमा सुखाची हे रासी । सांडूनि कां ऐसी दुःखी व्हावें ॥ ३ ॥

॥ १ ॥

२६१७. खळा सदा [11]क्षुद्रीं दृष्टी । करी कष्टी सज्जना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [12]करिती आपुलाले परी । धणीवरी व्यापार ॥ छ ॥ दया संतां भांडवल । वेची बोल उपकार ॥ २ ॥ तुका ह्मणे आपुलालें । उसंतिलें ज्यांणीं तें ॥ ३ ॥

२६१८. जग ऐसें बहुनांवें । बहुभावें भावना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [13]पाहों बोलों बहु नये । सत्य काय सांभाळा ॥ छ ॥ कारियामी जें कारण । तें जतन करावें ॥ २ ॥ तुका ह्मणे संतजनीं । हें चि मनीं धरावें ॥ ३ ॥

---

१ पं. नातळती अगीं.–२ पं. भोगी विघ्नें–३ पं. सहजचि.–४ पं. सहजचि.–५ त. पाहातो गोपाळा.–६ दे. त. द्वंदें.–७ पं. कश्मळापाशीं.–८ पं. ते–९ पं. क्षुद्र–१० दे. करिता.–११ पं. पाहों बहु बोलों नये.

२६१९. निघालें तें अगीहूनि । आतां ह्मणी आतळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पळवा परतें दुरी । आतां हरी येयूनि ॥ छ ॥ धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें आहो प्रपंचीं ॥ २ ॥ अबोल्यानें ठेला तुका । भेंउनि लोकां निराळा ॥ ३ ॥

२६२०. आतां दुसरें नाहीं वनीं । निरंजेनीं पडिलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमची च पाहें वास । अवघी आस निरसली ॥ छ ॥ मागिलांचा मोडला माग । घडला त्याग अरुची ॥ २ ॥ तुका ह्मणे करुणाकरा । तूं सोयरा जीवींचा[3] ॥ ३ ॥

२६२१. धरूनियां सोई परतलें मन । अनुलक्षीं[4] चरण करूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येईं पांडुरंगे नेईं सांभाळूनि । करुणावचनीं आळवितों ॥ छ ॥ बुद्धि जाली साह्य परि नाहीं बळ । अवलोकितों जळ वाहे नेत्रीं ॥ २ ॥ न चलती पाय गळित जाली काया । ह्मणऊनि दया येऊं[5] द्यावी ॥ ३ ॥ दिशेच्या[6] करितों वारियासीं मात । जोडुनियां हात वास पाहें ॥ ४ ॥ तुका ह्मणे वेग करावा सत्वर । पाववया तीर भवनदीचें[7] ॥ ५ ॥

२६२२. कौलें भरियेली पेंठ । निग्रहाचे खोटे तंट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें माता जाणे वर्म । बाळ वाढवितां धर्म ॥ छ ॥ कामवितां[8] लोहो कसे । तांतडीनें काम नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे खडे । देतां अक्षर[9] तें जोडे ॥ ३ ॥

२६२३. चालिलें न वाटे । गाऊनियां जातां वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥ छ ॥ नाहीं भय आड । कांहीं विषमांचें जड ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्ति । सुखरूप आदीं अंतीं ॥ ३ ॥

२६२४. करितां विचार तो हा दृढ संसार । ब्रह्मांदिकां पार नुलंघवे सामर्थ्यें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरण शरण नारायणा मज अंगीकारीं[10] दीना । आलें तें वचनांपासीं माझ्या सामर्थ्य[11] ॥ छ ॥ पाठीवरी मोळी तो चि कळवा पायीं[12] तळीं । सांपडला जाळीं मत्स्य जाला तो न्याय ॥ २ ॥ आतां करीन तांतडी लाभाची ते याच जोडी । तुका ह्मणे ओढी पायां सोई मनाची ॥ ३ ॥

२६२५. वहुतां जातीचा केला अंगीकार । वहुत ही फार सर्वोत्तमें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरला[13] चि नाहीं कोणांचिये वेचें । अक्षोभ ठायींचें ठायीं आहे ॥ छ ॥ लागत चि नाहीं घेतां अंतपार । वसवी अंतर अणुचें ही ॥ २ ॥ तुका ह्मणे केला होयें[14] टाकीऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते[15] ॥ ३ ॥

---

१ पं. वोलुनि.–२ दे. त. निरांजनीं.–३ पं. दीनाचा.–४ दे. त. अनुरक्षीं–५ त. व्हावी–६ दे. दिशच्या पं. दिसेच्या.–७ त. पं. भवनदी.–८ पं. कामावितां.–९ दे. अक्षरें.–१० पं. अंगीकार.–११ त. सामर्थ्यें–१२ पं. पायांतळीं.–१३ पं. धरला.–१४ पं हाये.–१५ त. ती.

२६२६. पोट धालें आतां जीवनीं आवडी । पुरवावे परवडी बहुतांचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय आंचवणा तांतडीचें काम । मागील तीं श्रम न पैवावीं[1] ॥ ध्रु. ॥ वाढितिया पोटीं बहु[2] असे वाव । सांभाळितां ठाव काय वांचे[3] ॥ २ ॥ दाविल्यावांचूनि नाहीं कळों येत । तेथें हीं[4] दुश्चित एकपणें[5] ॥ ३ ॥ नावेचा भार तो उदकाचे शिरीं । काय हळू भारी तये ठायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे गीतीं गाऊनि गोविंद । करूं ब्रह्मानंद एकसरें ॥ ५ ॥

२६२७. एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया । घालिती हुंमरी एक वाताती[6] टाळिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं चाड[7] मोक्षपदें भजनीं आवडी ॥ ध्रु. ॥ हाका अरोळिया गीतें वाद्यें[8] सुखसोहळे । जाय तें न कळे केव्हां रजनी दिवस ॥ २ ॥ तीर्थी नाहीं चाड न लगे जावें वनांतरा । तुका ह्मणे हरिहरात्मक चि पृथिवी[9] ॥ ३ ॥

२६२८. देव सखा आतां केलें नव्हे काई । येणें[10] सकळे[11] ही सोइरीं च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्यवंत जालों गोतें सपुरतीं । आतां पुण्या नीती पार नाहीं ॥ ध्रु. ॥ पाहातां दिसती भरलिया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥ २ ॥ अविनाश जोडी आह्मां भाग्यवंतां । जाली होती सत्ता संचिताची ॥ ३ ॥ पायांवरी डोई ठेवाया अरोथा । जाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे जीव पावला विसावा । ह्मणवितां देवा तुमचींसीं ॥ ५ ॥

२६२९. कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्ता झाली त्रिभुवनीं । चक्रपाणी कोंवसा ॥ ध्रु. ॥ लाडिवाळांचा भार वाहे । उभा आहे कुडावया[12] ॥ २ ॥ तुका ह्मणे घटिका दिस । निमिषें[13] ही न विसंभे ॥ ३ ॥

२६३०. आह्मां आवडे नाम घेतां । तो[14] ही पिता संतोषे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभयतां एकचित्त । तरी प्रीत वाढली ॥ ध्रु. ॥ आह्मी शोभों निकटवासें । अनारिसें न दिसे ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगे । अवघीं अंगें निवालीं[15] ॥ ३ ॥

२६३१. देह तंव असे भोगाचे अधीन । याचें सुख सीण क्षणभंगुर[16] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ ध्रु. ॥

---

१ त. पावावीं.—२ त. वहुत.—३ पं. वेचे.—४ पं. हे.—५ पं. एकपण —६ पं. वाहाताती.—७ दे चाट.—८ दे. गीतवादें सुख०.—९ दे. पृथुत्री. त. पृथवी. पं. पृथ्वी.—१० पं. तणें.—११ दे. सकळई सोइरीं च.—१२ पं कुडावया.—१३ दे. निमिश. त. निमिश्य. पं. निमिष्य—१४ पं. हा.—१५ पं. निववितीं.—१६ दे. क्षीणभगर. त. क्षण भंगरे.

क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया ओंकारा अवघें नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥ ३ ॥

२६३२. आतां आवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ केलें तरीं आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥ छ ॥ नाहीं भक्तराजीं ठेविला उद्धार । नामाचा आकार त्यांचियानें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या वडिलांचें ठेवणें । गोप्य नारायणें न करावें ॥ ३ ॥

२६३३. काया वाचा मनें श्रीमुखाची वास । आणीक उदास विचारासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय आतां मोक्ष करावा जी देवा । तुमचिया गोवा दर्शनासी ॥ छ ॥ केलिया नेमासी उभें ठाडें व्हावें । नेमलें तें भावें पालटेना ॥ २ ॥ तुका ह्मणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ॥ ३ ॥

२६३४. पुढीलांचे सोयी माझ्या मना चाली । मताची आणिली नाहीं बुद्धी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केलासी तो उभा आजवरी संतीं । धरविलें हातीं कट देवा ॥ छ ॥ आहे तें चि मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बळा लेंकराशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा साक्षीचा व्यवहार । कृपण जी थोर परी तुह्मी ॥ ३ ॥

२६३५. बहुत करूनि चाळवाचाळवी । किती तुह्मी गोवी करीतसां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लागटपणें मी आलों येथवरी । चाड ते दुसरी न धरूनि ॥ छ ॥ दुजियाचा तंव तुह्मांसी कांटाळा । राहासी निराळा एकाएकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां यावरी गोविंदा । मजशीं विनोदा येऊं नये ॥ ३ ॥

२६३६. तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसांऐसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांजेच्या मैथुनांपरी गेलें वांयां । बांडेल्याचें जायां जालें पीक ॥ छ ॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुके चि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे वरदळी ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ३ ॥

२६३७. नव्हे मतोळ्याचा वाण । नीच नवा नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख उपजे श्रवणें । खरें टांकसाळी नाणें ॥ छ ॥ लाभ हातोहातीं । अधिक पुढतोंपुढती ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणों किती । पुरोनि उरेलें पुढती ॥ ३ ॥

---

१ त. दे. हाकारा –२ त. राहे. दे. हा पाठ दिला आहे.–३ दे. शुशोभें.–४ दे. उधार – ५ पं. याचियातें –६ पं. नारायण० –७ पं. ०नेमा उभें ठाड० –८ दे. त. वेन्हार.–९ त. दे. माणसा ऐसे.–१० पं. मैथुन परि.–११ त. बाडेल्याचें वाया आलें०.–१२ त. उरलों.

२६३८. घीतला दुकान । देती आलीयासि दानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥ छ ॥ मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥ २ ॥ तुका ह्मणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥ ३ ॥

२६३९. नरस्तुति आणि कथेचा विकरा । हें नको दातारा घडों देऊं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसिये कृपेची भाकितों करुणा । आहेसि तूं[3] राणा उदाराचा ॥ छ ॥ पराविया नारी आणि परधना । नको देऊं मनावरी येऊं ॥ २ ॥ भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडों देऊं ॥ ३ ॥ देहअभिमान नको देऊं शरीरीं । चढों कांहीं परी एक देऊं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ॥ ५ ॥

२६४०. लौकिकापुरती नव्हे माझी सेवा । अनन्य केशवा दास तुझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि करीं पायांसवें आळी । आणीक वेगळी नेणें परी ॥ छ ॥ एकविध आह्मी स्वामिसेवेसाटीं । वरी तो चि पोटीं एकभाव ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं सांगितलें काम । तुह्मां धर्माधर्म ठावे देवा ॥ ३ ॥

२६४१. ज्यांच्या संगें होतों पडिलों भोवनीं । ते केली धोवनी झाडूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां एकाएकीं मनासीं विचार । करूं नाहीं भार दुजियाचा ॥ छ ॥ प्रसादसेवनें आली उष्टावळी । उचित ते काळीं अवचित ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म सांपडलें हातीं । सांडिली ते खंती चिंता देवा ॥ ३ ॥

२६४२. आवडीभोजन प्रकार परवडी । भिन्नभिन्न गोडी एका रसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोगित्या पंगती लाधलों प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला ॥ छ ॥ पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ॥ २ ॥ तुका ह्मणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥ ३ ॥

२६४३. समर्थाचा ठाव संचलाचि असे । दुर्बळाची आस पुढें करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पावलें घेईन पदरीं हें[9] दान । एकांतीं भोजन करूं जेंऊं ॥ छ ॥ न लगे पाहावी उचिताची वेळ । अयाचित काळ साधला तो ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट धालिया उपरी । गौरवा उत्तरीं पूजूं देवा ॥ ३ ॥

२६४४. आपुल्यांचा करीन मोळा । माझ्या कुळाचारांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियांचे वंदिन पाय । ठायाठाय न देखें ॥ छ ॥ नेदीं तुटों समाधान । धांवों जन सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे झाडा होय । तों हे सोय न संडीं[11] ॥ ३ ॥

१ पं. घातलें.–२ पं. वान.–३ पं. तो.–४ पं. हें कडवें नाहीं.–५ पं. सांडोनिया.–६ पं. दुजायाचा.–७ दे. त. भिन्नाभिन्न गोडी एक रसा.–८ पं. स्वये हस्तकें.–९ पं. वे.–१० दे. त. टाऊ–११ त. सोडी.

२६४५. जन्ममरणांची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतील ते डोळां पाहेन प्रकार । भय आणि भार निरसलीं ॥ ध्रु ॥ लिंगाडाचें मूळ होतीं पंच भूतें । त्यांचें यां पुरतें विभागिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला प्रपंच पारिखा । जिवासी तूं सखा पांडुरंगा ॥ ३ ॥

२६४६. उदार तूं हरी ऐसी कीर्ति चराचरीं । अनंत हे थोरी गर्जतील पवाडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझे पायीं माझा भाव पुसी जन्ममरणां ठाव । देवाचा तूं देव स्वामी सकळां ब्रह्मांडा ॥ ध्रु ॥ मागणें तें तुज मागों जीवभाव तुज सांगों । लागों तरी लागों पायां तुमच्या दातारा ॥ २ ॥ दिसों देसी कीविलवाणें तरी तुंज चि हें उणें । तुका ह्मणे जिणें माझें तुज अधीन ॥ ३ ॥

२६४७. पाहा किती आले शरण समान चि केले । नाहीं विचारिले गुण दोष कोणांचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज सेवटींसा द्यावा ठाव तयांचिये देवा । नाहीं करीत हेवा कांहीं थोरपणाचा ॥ ध्रु ॥ नाहीं पाहिला आचार कुळगोत्रांचा विचार । फेडूं आला भार मग न ह्मणे दगड ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वजाणा तुझ्या आल्यावरि मना । केला तो उगाणा घडल्या महादोषांचा ॥ ३ ॥

२६४८. आतां चुकलें बंधन गेलें[10] विसरोनि दान । आपुले ते वीण सावकाश विकावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाभ जोडला अनंत घरीं सांपडलें वित्त । हातोहातीं थीत उरों तळ नल्हाचि ॥ ध्रु ॥ होतें गोविलें विसारें माप जालें एकसरें । होतें होरें[12] वारें तों चि लाहो साधिला ॥ २ ॥ कराया जतन तुका ह्मणे निजधन । केला नारायण साह्य नेदी विसंबों ॥ ३ ॥

२६४९. तुझ्या रूपें माझी काया भरों द्यावी पंढरीराया । दर्पणींची छाया एका रूपें भिन्नत्व ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख पडिलें साटवण सत्ता वेचे शनें[13] शनें । अडचणीचे कोन चारी मार्ग उगवले ॥ ध्रु ॥ वैसों डोळ्यांची बाहुली कवळे भिन्न छाया आली । कृष्णांजन चाली नव्हे पैरंती माघारी ॥ २ ॥ जीव ठसावला शिवें मना आलें तथें जावें । फांटा पडिला नांवें तुका ह्मणे खंडलें ॥ ३ ॥

२६५०. सोसें सोसें मारूं हाका । होइल चुका ह्मणऊनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें पुढें क्षणभरी । नव्हे दुरी अंतर ॥ ध्रु ॥ नाम मुखीं बैसला चाळा । वेळोवेळां पडताळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखी केलें । या विठ्ठलें बहुतांसी ॥ ३ ॥

---

१ पं. लिगाडाच्या मुळे.—२ पं. त्याच्या त्या पुरतें—३ पं. पांडुरंग.—४ पं. वर्णितातीं.—५ पं. जन्ममरण.—६ पं. सकळ.—७ पं. तुजमी हें० —८ पं. तुझ्या.—९ दे. दोषांच्या.—१० पं. गेलों.—११ पं. वान.—१२ त. हारे वारें.—१३ पं. शनशने. त. शनेशनें.—१४ त. बसे.—१५ दे. प्रति०.

२६५१. धरूनियां चाली हांवा । येइन गांवां धांवत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाठविसी सूळ तरी । लवकरी विठ्ठले ॥ छ्र ॥ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ति मुखें गाईन ॥ २ ॥ तुका ह्मणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥ ३ ॥

२६५२. मायबापाचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ॥ छ्र ॥ उत्तम तें बाळासाटीं । लावी ओठीं[3] माउली ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली धणी । आनंद मनीं न समाये ॥ ३ ॥

२६५३. उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुताप अंगीं अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥ छ्र ॥ दोष ऐशा नावें देहाचा आदर । विटलें अंतर अहंभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाय नासोनियां खंती । तंव चि हे चित्तीं बद्धता ते ॥ ३ ॥

२६५४. बंधनाचा तोडूं फांसा । देऊं आशा टाकोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तें च घेतां शिरीं । होइल दुरी निजपंथ ॥ छ्र ॥ नाथिलें चि माझें तुझें । कोण वोझें वागवी ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतराय । देवीं काय जिणें तें ॥ ३ ॥

२६५५. तें च किती वारंवार । बोलों फार बोलिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझें दंडवत । तुमच्या संत चरणांसी ॥ छ्र ॥ आवडी ते नीच नवी । जाली जीवीं वसती ॥ २ ॥ तुका ह्मणे बरवें जालें । घरा आलें बंदरींचें ॥ ३ ॥

२६५६. उपासा सेवटीं अन्नासवें भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरवीं वासना साच सर्वजाणा । आह्मां नारायणा अंकिताची ॥ छ्र ॥ बहुदिसां पुत्रामातेमध्यें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीतिउभडें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन कृपणा सोइरें[8] । यापरि दुसरें नहो आतां ॥ ३ ॥

२६५७. रणीं निघतां शूर न पाहे माघारें । ऐसा मज धीरें राख आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संसारा हातीं अंतरलों दुरी । आतां कृपा करीं नारायणा ॥ छ्र ॥ वागवितों तुझिया नामाचें हत्यार । हा चि बडिवार मिरवितों ॥ २ ॥ तुका ह्मणे मज फिरतां माघारें । तेथें उणें पुरें तुह्मी जाणां ॥ ३ ॥

---

१ पं. चाले.–२ त. पं. सक्रोच्या –३ त पं. होटीं.–४ पं. विटाळे.–५ त. अंकितामी – ६ पं. बहुदिस पुत्रा मातसवें भेटी ।.–७ दे. त. उभोड.–८ दे. सोयरें.–९ पं. राखे

२६५८. सकळ पूजा स्तुति । करावी ते व्हावें[1] याती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि वारा जन । संतपूजा नारायण ॥ छ्रु ॥ सेवावें[2] तें वरी । दावी उमटूनि ढेंकरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सुरा । दुधा ह्मणतां केवीं वरा ॥ ३ ॥

२६५९. धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भार घातलियावरी । दासां नुपेक्षील हरी ॥ छ्रु ॥ याऐसी आटी । द्यावी द्रव्याचिये साटी ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटें । देवा बहु केलें खोटें ॥ ३ ॥

२६६०. द्रव्याचिया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतीं बोळवणेसाटीं । पांडुरंग धरा कंठीं ॥ छ्रु ॥ लोभाचीं[3] लोभिकें । यांचें[4] सन्निधान फिकें ॥ २ ॥ तुका ह्मणे हितें । जग नव्हो पडो रितें[5] ॥ ३ ॥

२६६१. कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कधीं खटखट सरेल हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणां आराणूक होईल कोणे काळीं । आपुलालीं जाळीं उगवूनि ॥ छ्रु ॥ माझा येणें दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन[6] सुखी असे ॥ २ ॥ भोगा आधीं मनें मानिलासे त्रास । पाहें लपायास ठाव कोठें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देतों देवाचें गाऱ्हाणें । माझें ॠण[7] येणें सोसियेलें ॥ ४ ॥

२६६२. राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूं जगाचा विनोद । डोळां पाहोनियां छंद ॥ छ्रु ॥ भुललिया संसारें । आलें डोळ्यासी माजिरें ॥ २ ॥ तुका ह्मणे माथा । कोणी नुचली[8] सर्वथा ॥ ३ ॥

२६६३. आह्मां एकविधा पुण्य सर्वकाळ । चरणसंकळ[9] स्वामीचे ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चित्ताचे संकल्प राहिले चळण । आज्ञा ते प्रमाण करुनी असों ॥ छ्रु ॥ दुजियापासून परतलें मन । केलें ध्यावें[10] दान होईल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां[11] पुरला नवस । एकाविण [12]ओस सकळ ही ॥ ३ ॥

२६६४. राहाणें तें पायांपाशीं । आणिकां रसीं विटोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा धीर देई मना । नारायणा विनवितों ॥ छ्रु ॥ अंतरीं तों तुझा वास । आणिकां नास कारणां[13] ॥ २ ॥ तुका ह्मणे शेवटींचें । वाटे सांचें[14] राखावें ॥ ३ ॥

---

१ दे. व्होवें.–२ पं. सेवावी.–३ पं. लोभाचें.–४ पं. त्याचें.–५ पं. जाग नको पडो रिते–६ पं. जाण.–७ दे. त. रिण.–८ पं. नुचलिती.–९ पं. 'चरण सकळ' याबद्दल 'चरणकमळ'.–१० पं. घ्यावें.–११ पं. आजि.–१२ पं. सोस.–१३ दे. कारण.–१४ पं. साच.

२६६५. चंदन तो चंदनपणें । सहजगुणें संपन्न ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेधालिया धन्य जाती । भाग्यें होती सन्मुख ॥ छ ॥ परिसा अंगीं परिसपण । वाणोनि तें राहिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंची खंती । सुजाती ते ठाकणी ॥ ३ ॥

२६६६. लय लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें[4] तों असाध्य जी सर्वत्र या जना । भलें नारायणा आळवितां ॥ छ ॥ कामनेचा त्याग वैराग्य या नांव । कुटुंब ते सर्वविषयजातें ॥ २ ॥ कर्म उसंतावें चालत पाउलीं । होय जों राहिली देहबुद्धि ॥ ३ ॥ भक्ती तें नमावें जीवजंतुभूत । शांतवूनि ऊत कामक्रोध ॥ ४ ॥ तुका ह्मणे साध्य साधन अवघडें । देतां हें सांकडें देह बळी ॥ ५ ॥

२६६७. ऐसें कां हो न करा कांहीं । पुढें नाहीं नास ज्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदूनि ॥ छ ॥ श्रुतीचें कां नेघा फळ । सारमूळ जाणोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढें कांहीं । वाट नाहीं यावरी ॥ ३ ॥

२६६८. जाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव श्मशानींचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रडती रात्रदिवस कामक्रोधमाया । ह्मणती हायहाया यमधर्म ॥ छ ॥ वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि भरभरां जीवित्वेसी ॥ २ ॥ फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य जनीं बोंब जाली ॥ ३ ॥ दिली तिळांजुळी कुळनामरूपांसी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे रक्षा जाली आपींआप । उजळला दीप गुरुकृपा ॥ ५ ॥

२६६९. आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग जाला ॥ छ ॥ एकदेशीं होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें जाला सुकाळ हा ॥ २ ॥ फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी जालों ॥ ३ ॥ नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ॥ ५ ॥

---

१ दे. सहज गुणसंपन्न ।.–२ पं. भोग्यें.–३ पं. टाकणी –४ पं. हें चितों असाध्य सर्वत्र.–५ पं. सवे विषये जात –६ पं. हें कडवें नाहीं.–७ पं. भक्ती ते नमावीं जीव जंतु भूतें. त. भक्ती तें नमावें जीव जंतु भूतें.–८ पं. अवघड देतां हें सांकडें०.–९ पं. लागला ममत्वेंसी ।. दे. त. यांत असाच पाठ असतां मागून मूळांतल्या प्रमाणें केला आहे –१० पं. महा वाक्यध्वनि बोंब०.–११ पं. आपें आप.–१२ दे. पं. वस्तीस.

२६७०. बोळविला देह आपुलेनि हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकवेळे जालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥ छ ॥ अमृतसंजीवनी निववली खाई । अंगें तये ठायीं हारपलीं ॥ २ ॥ एकादशीविध जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥ ३ ॥ अवघीं कर्में जालीं घटस्फोटापाशीं । संबंध एकेसी उरला नामीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां आनंदीं आनंदु । गोविंदीं[1] गोविंदु विस्तारला ॥ ५ ॥

२६७१. पिंडदान पिंडें ठेविलें करून । तिळीं तिळत्रण मूळत्रयीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सारिले संकल्प एका चि वचनें । ब्रह्मीं ब्रह्मार्पण सेवटींच्या ॥ छ ॥ सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । एका[3] एक वर्म एकोविष्णु ॥ २ ॥ पितयापुत्रत्वाचें जालें अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ॥ ३ ॥ आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधियेला ॥ ४ ॥ तुका ह्मणे केला अवघ्यांचा[4] उद्धार । आतां नमस्कार सेवटींचा ॥ ५ ॥

२६७२. सरलें आतां नाहीं । न ह्मणे वेळकाळ कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल कृपाळु माउली । सदा प्रेमें पान्हायेली ॥ छ ॥ सीणें[5] विचारी भाग । नव्हे निष्ठुर नाहीं राग ॥ २ ॥ भेदाभेद नाहीं । तुका ह्मणे तिच्याठायीं ॥ ३ ॥

२६७३. तुज पाहावें हे धरितों वासना । परि आचरणा नाहीं[6] ठाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिसी कैवार आपुलिया सत्ता । तरि च देखता होइन पाय ॥ छ ॥ बाहिरल्या वेषें उत्तम दंडलें । भीतरी मुंडलें[7] नाहीं तैसें ॥ २ ॥ तुका ह्मणे वांयां गेलों च मी आहें । जरि तुह्मी साहे[8] न व्हा देवा ॥ ३ ॥

२६७४. दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां तुह्मी सर्वजाण[9] पांडुरंगा । पाहिजे प्रसंगाऐसें केलें ॥ छ ॥ व्याह्याजांवायांचे पंगती दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं[10] ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जालों शरणागत । पुढील उचित तुह्मां हातीं ॥ ३ ॥

२६७५. आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा । घडलिया सेवा समर्थाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझ्या मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें ॥ छ ॥ येथें नाहीं जाली कोणांची निरास । आल्या याचकास कृपेविशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें नाहीं दुजी परी । राया रंका सरी देवा पायीं ॥ ३ ॥

---

१ पं. गोंविंदे.–२ पिंडदानें पिंड०.–३ पं. एकाएकी वर्म –४ दे. त. अवधियांचा.–५ दे. त. सीण न विचारी०.–६ पं. ठाव नाहीं.–७ पं. दडिलें.–८ पं. साह्य.–९ पं. सर्व जाणा.–१० पं. कायी.

२६७६. वैष्णवें चोरटीं । आलीं घरासी करंटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आजि आपुलें जतन । करा भांडें पांघरुणें ॥ छ ॥ ज्याचे घरीं खावें । त्याचें सर्वस्वें[2] ही न्यावें ॥ २ ॥ तुका ह्मणे माग । नाहीं लागों देत लाग ॥ ३ ॥

२६७७. ऐकतों दाट । आले एकांचे बोभाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका विश्वासों यावरी । चोर देहाचे खाणोरी ॥ छ ॥ हे चि यांची जोडी । सदा बोडकीं उघडीं ॥ २ ॥ तुका ह्मणे न्यावें । ज्याचें त्यासी नाहीं ठावें ॥ ३ ॥

२६७८. आणिकांची सेवा करावी शरीरें । तीं येथें उत्तरें कोरडीं च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेघे येरझारा सेवकाच्यां[3] ॥ छ ॥ आणिकांचे भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचन ही ॥ २ ॥ आणिकांचें देणें काळीं पोट भरे । येथील न सरे कल्पांतीं ही ॥ ३ ॥ आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें सोस हेवा नाहीं दोन्ही ॥ ४ ॥ तुका ह्मणे करी आपणासारिखें[4] । उद्धरी पारिखें उंच निंचें[5] ॥ ५ ॥

२६७९. दुर्जनाची जाती । त्याचे तोंडीं पडे माती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याची बुद्धि त्यासी[6] नाडी । वाचे अनुचित बडबडी ॥ छ ॥ पाहें संतांकडे । दोषदृष्टी पाँहे[7] भीडे ॥ २ ॥ उंच निंच नाहीं । तुका ह्मणे खळा कांहीं ॥ ३ ॥

२६८०. न करीं उदास । माझी पुरवावी आस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐकां[8] ऐका नारायणा । माझी परिसा विज्ञापना ॥ छ ॥ मायबाप बंधुजन । तूं चि सोयरा सज्जन ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजविरहित । माझें कोण करी हित ॥ ३ ॥

२६८१. जीवन उपाय । वैद्यवाणी[9] तुझे पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते मी नाठवीं घडिघडी । ह्मणोनियां चंरफडीं[10] ॥ छ ॥ तुटे भवरोग । जेथें सर्व सुखें[11] भोग ॥ २ ॥ तुका ह्मणे विटे । धरियेले जें गोमटें ॥ ३ ॥

२६८२. ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडुन कर तुह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारी ॥ छ ॥ आमुच्या जीवींचा तो चि जाणे भावो । रखुमाबाईचा[12] नाहो पांडुरंग ॥ २ ॥ चित्त माझें त्याचे गुंतलेंसे पायीं । ह्मणऊनि कांहीं नावडे त्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज न साहे मीनती । खेद होय चित्तीं भंग मना ॥ ४ ॥

---

१ दे. पांघुरण.–२ दे. सर्वस्वें.–३ पं. याचकांच्या.–४ दे. त. आपण्यासारिखें.–५ त. पं. नीच.–६ पं. त्यासि नाहीं नाडी०.–७ दे. त. सांडी भडे.–८ पं. ऐसें.–९ दे. वैदेवाणी.–१० त. पं. चरफडी.–११ पं. सुख भोग।.–१२ दे. त. रखुमाईचा.

२६८३. ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निंब घेतें रोगी कवणिया [1]सुखें । हरावया [2]दुःखें व्याधि पीडा ॥ ध्रु ॥ काय पळे [3]सुखें चोरा लागे पाठी । न घलावी काठी आड तया ॥ २ ॥ जयाचें कारण तो चि जाणे करूं । नये कोणां वारूं आणिकासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी सांपडे निधान । द्यावा ओंवाळून जीव बळी ॥ ४ ॥

२६८४. काय मी अन्यायी तें घाला पालवीं । [4]आणीक वाट दावीं चालावया ॥१॥ ॥ ध्रु. ॥ माग पाहोनियां जातों ते च [5]सोयी । न वजावें कायी कोण [6]सांगों ॥ ध्रु ॥ धोपट मारग लागलासे गाढा । मज काय पीडा करा तुह्मी ॥ २ ॥ वारितां ही भय कोण धरी धाक । परी तुह्मां एक सांगतों मी ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर दोहीं पक्षीं भला । मरतां मुक्त जाला मान पावे ॥ ४ ॥

२६८५. नव्हती माझे बोल जाणां हा निर्धार । मी आहें मजूर विठोबाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निर्धारा [7]वचन सोडविलें माझ्या । कृपाळुवें लज्जा राखियेली ॥ ध्रु ॥ निर्भर मानसीं जालों आनंदाचा । गोडावली वाचा नामघोषें ॥ २ ॥ आतां भय माझें नासलें संसारीं । जालोंसें यावरी गगनाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा तों संतांचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ॥ ४ ॥

२६८६. जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी । मृत्याचिये भेटी जवळी आली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझ्या मना होंई सावधान । [8]पुण्य ची जाण कार्यसिद्धि ॥ ध्रु ॥ शेवटील घडी बुडतां न लगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥ २ ॥ तुका [9]ह्मणे चिंतीं कुळींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ३ ॥

२६८७. मागील ते आटी येणें घडे सांग । सुतवेल अंग एका सूत्रें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पहिपाहुणेर ते सोहळ्यापुरते । तेथूनि आरते उपचार ते ॥ ध्रु ॥ आवश्यक तेथें आगळा आदर । चाली थोडें फार संपादतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऋण फिटे एके घडी । अलभ्य ते जोडी हातां आल्या ॥ ३ ॥

२६८८. साधावा तो देव [10]सर्वस्वांचेसाटीं । [11]प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग कासयानें पुन्हा संवसार । वीजाचे अंकुर दग्ध होती ॥ ध्रु ॥

---

१ पं. मुखें.–२ पं. दु ख.–३ पं. सुख –४ पं. आणिका वाटा०.–५ पं. ठायीं –६ पं. साग.– ७ पं. वचने –८ दे. त. वोंपुण्याची.०–९ पं. "ह्मणे" नाहीं.–१० दे. त. सर्वस्वाचे.०– ११ त. प्रारब्धे. पं. प्रारब्धा.

जिणें दिल्हें त्यासी द्यावें[1] पिंडदान । उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे निज भोगईल निजता । नाहीं होइल सत्ता दुजियाची ॥ ३ ॥

२६८९. *जळो[2] अगी पडो खाणें[3] । नारायणें[4] भोगिता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी ज्याची वदे वाणी । नारायणीं ते पात्रे ॥ छ ॥ भोजनकाळीं करितां धंदा । ह्मणा गोविंदा पावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे मोल । देवा बोल आवडती ॥ ३ ॥

२६९०. संतांसी क्षोभवी कोण्यों[5] ही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । । पृथ्वी[6] ही थार नेदी तया ॥ छ ॥ संतांपाशीं ज्याचा नुरे चि विश्वास । त्याचे जाले दोष बळिवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धांवे लागें विषमें मारूं ॥ ३ ॥

२६९१. उदकीं कालवी[7] शेण मलमूत्र । [8]तो होय पवित्र कासयानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संतांचिया ॥ छ ॥ दुखवी तो बुडे सांगडीचा तापा । अतित्याई पापाची च मूर्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे जेव्हां फिरतें[9] कपाळ । तरी अमंगळ योग होतो[10] ॥ ३ ॥

२६९२. शोकवावा म्यां देहे । ऐसें नेणों पोटीं आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी च नेदीं[11] जी उत्तर । दुःखी राखिलें अंतर ॥ छ ॥ जावें वनांतरा । येणें उद्देशें दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे गिरी । मज सेववावी दरी ॥ ३ ॥

२६९३. येइल तुझ्या नामा । लाज ह्मणों पुरुषोत्तमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीर राहिलों धरूनि । त्रास उपजला मनीं ॥ छ ॥ जगा कथा नांव । निराशेनें नुपजे भाव ॥ २ ॥ तुह्मी साक्षी कीं गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ३ ॥

२६९४. नेणें जप तप अनुष्ठान याग । काळें तंव लाग घेतें[12]लासे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रिघालों या भेणें देवाचे पाठीसी । लागे त्याचें त्यासी सांभाळणें ॥ छ ॥ मापें माप सळे चालिली चढती । जाली मग राती काय चाले ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरा हातीं जें वांचलें । लाभावरी आलें वारिलेशु ॥ ३ ॥

---

१ दे. द्यावा –२ त. जळतां आगी पडतां खान । नारायण भोगिता ॥ –३ दे. खान.– ४ पं. नारायण तो भोक्ता. दे. नारायण भोक्ता.–५ पं. कोणा.–६ पं. पृथ्वीवरी थार.–७ पं. कालविलें – ८ पं. ते.–९ पं. परते.–१० पं. येतो.–११ प. दुख –१२ पं. घातलासे.

* त. "हारपल्याची हानी ॥ नका मनीं धरूं कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पावले ते ह्मणा देवा । सहज सेवा या नांवें ॥ छ ॥ "

हीं दोन कडवीं "जळो अगी० " याच्या पूर्वी जास्त आहेत.

२६९५. कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुह्मांसी ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडत ॥ ध्रु ॥ आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण जाला । हा विठ्ठला हीनशक्ति ॥ ३ ॥

२६९६. लागों दिलें अंगा । ऐसें कांगा सन्निध ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण्या पापें उंदय केला । तो देखिला मळय ॥ ध्रु ॥ न देखवे पिडला सर्प । दया दर्प विषाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे भलें । मज तों न वजे साहिलें ॥ ३ ॥

२६९७. धांवा शीघ्रवत । किंवा घ्यावें दंडवत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचा जातो बडिवार । आह्मी होतों हीनवर ॥ ध्रु ॥ न धरावा धीर । धांवा नका चालों स्थिर ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । माझी लाजली जी गुणीं ॥ ३ ॥

२६९८. सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनाचिये मुळीं रहावें बैसोन । आकर्षाचे गुण पायांपाशीं ॥ ध्रु ॥ भेटीचे तांतडी करीतसें लाहो । ओंवाळावा देहो ऐसें वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥ ३ ॥

२६९९. उद्वेगासी बहु फाकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥ ध्रु ॥ मज तो अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीवित्वाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ॥ ३ ॥

२७००. दुःखाची संगति । तिच्याठायीं कोण प्रीति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें असो हें निराळें । करूं सोइरें सावळें ॥ ध्रु ॥ क्षणभंगुर तें ठाव । करूनि सांडावे चि वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । ठाव पावलों हा थारा ॥ ३ ॥

२७०१. मेला तरी जावो सुखें नरकासी । कळंकी याविशीं शिवों नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रजस्वला करी वेलासी आघात । अंतरें तों हित दुरी बरें ॥ ध्रु ॥ उगी च कां आलीं नासवावीं फळें । विटाळ विटाळें कालवूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे लोणी घालोनि शेणांत । उपेगाची मात काय असे ॥ ३ ॥

२७०२. वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वासिया घडे लाभ । देइल तरी पद्मनाभ ॥ ध्रु ॥ भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळा देव । परि हा नागवी संदेह ॥ ३ ॥

---

१ दे. त. उदो –२ पं. लाजिली गुणीं.–३ पं. त. आकर्शावे दे. आकृगावे –४ पं. उदेगाचे.– ५ पं. सांगाती –६ पं. अवघी.–७ पं. तो.–८ प्रं. सांडावा.–९ पं. अंतरतो.

२७०३. संचितावांचून । पंथ न चलवे कारण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोरडी ते अवघी आटी । वांयां जाय लाळ घोंटी ॥ ध्रु. ॥ धन वित्त जोडे । देव ऐसें तों न घडे ॥ २ ॥ तुका ह्मणे आड । स्वहितासी बहु नाड ॥ ३ ॥

२७०४. अतित्याई बुडे गंगे । पाप लागे तैयाचें[1] त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों आपुलिया गुणें । असे जेणें योजिलें ॥ ध्रु. ॥ अवचटें अग्नि जाळी । न सांभाळी दुःख पावे ॥ २ ॥ जैसें तैसें दावी आरसा । नकट्यो[2] कैसा पालटे ॥ ३ ॥

२७०५. हेंदऱ्याचे भरितां कान । हलवी मान भोंक रितें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं मी येथें सांगों स्पष्ट[3] । भावें नष्ट घेत नाहीं ॥ ध्रु. ॥ अवगुणी वाटलें चित्त । तया हित आतळे ना ॥ २ ॥ तुका ह्मणे फजितखोरा । ह्मणतां बरा उगा[4] रहा ॥ ३ ॥

२७०६. नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्याचा अनुभवा वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येतों[5] ॥ ध्रु. ॥ काय आगीपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें करावा उकल । लागे चि ना बोल वाढवूनि ॥ ३ ॥

२७०७. लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे ओंगळा उपदेश ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वचनचर्येची न कळे चांचणी । ऐसी संग्रष्टनी अमंगळ ॥ ध्रु. ॥ समय[6] न कळे वेडगळ बुद्धि । विजाती[7] ते शुद्धि चांच चाट[8] ॥ २ ॥ तुका ह्मणे यांचा[9] धिक्कार चि बरा । बहुमति खराहूनि हीन ॥ ३ ॥

२७०८. एक धरिला चित्तीं । आह्मीं रखुमाईचा पती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें जालें अवघें काम । निवारला भवश्रम ॥ ध्रु. ॥ परद्रव्य परनारी । जाली विषाचिये परी ॥ २ ॥ तुका ह्मणे फार । नाहीं लागत[10] व्यवहार[11] ॥ ३ ॥

२७०९. भेणें पळे डोळसा । न कळे मृत्यु तो सारिसीं[12] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसी जाली दिशाभुली । न वजातिये वाटे चाली ॥ ध्रु. ॥ संसाराची खंती । मावळल्या तरी शक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे हीणीं[13] । बुद्धि चुकली नारायणा ॥ ३ ॥

२७१०. अभिमानाचें तोंड काळें । दावी दळें अंधार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनि ॥ ध्रु. ॥ लोगलासे[14] पाठी लाज । जालें काज नासाया ॥ २ ॥ तुका ह्मणे कुश्चळ मनीं । विटंबनीं पाडिलीं तीं ॥ ३ ॥

---

१ पं. ज्याचें.–२ पं. नकटा.–३ त. पं. पष्ट.–४ पं. उगी.-५ पं. येत.–६ पं. समयो.–७ त. जीवाची.–८ पं. चाड.–९ पं. त्याचा.–१० पं. लागला –११ दे. त. वेव्हार.–१२ पं. सदृशा –१३ पं. हीना.–१४ पं. पाठी लागलीसे.

२७११. चोराचिया धुडका मनीं । वसे ध्यानीं लंछन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशा आह्मी करणें काय । वेरसो न्यायें पर्जन्य ॥ ध्रु ॥ ज्याच्या बैसे खतावरी । ते चुरचुरी दुखवूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याची खोडी । त्याची जोडी त्या पीडी ॥ ३ ॥

२७१२. बुद्धिहीना उपदेश । तें तें विष अमृतीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हुंगों नये गोऱ्हवाडी । तेथें जोडी विटाळ ॥ ध्रु ॥ अळसियाचें अंतर कुडें । जैसें मढें निष्काम ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा हातीं । मज श्रीपती वांचवा ॥ ३ ॥

२७१३. न करीं तुमची सेवा । बापुडें[2] मी पण देवा । बोलिलों तो पावला । पण सिद्धी सकळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक काय तुह्मां काम । आह्मां नेदा तरी प्रेम । कैसे धर्माधर्म । निश्चयेंसी रहाती[3] ॥ ध्रु ॥ आह्मी वेचलों शरीरें । तुह्मी बीज पेरा खरें । संयोगाचें बरें । गोड हेतें उभयतां ॥ २ ॥ एका हातें टाळी । कोठें वाजते निराळी । जाला तरी वळी । स्वामीविण शोभेना ॥ ३ ॥ रूपा यावें जी अनंता । धरीन पुटाची त्या सत्ता । होईन सरता । संतांमाजी पोसणा ॥ ४ ॥ ठेविलें उधारा । वरी काय तो पातेरा । तुका ह्मणे बरा । रोकडा चि निवाड ॥ ५ ॥

२७१४. भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे तों चाळवाचाळवी । केलें आपण चि जेवी ॥ ध्रु ॥ नैवेद्याचा आळ । वेचे[4] ठाकणीं सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जड । मज नें[5] राखावें दगड ॥ ३ ॥

२७१५. सर्व भाग्यहीन । ऐसें सांभाळिलों दीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पायीं संतांचे मस्तक । असों जोडोनि हस्तक ॥ ध्रु ॥ जाणें तरि सेवा । दीन दुर्बळ[6] जी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव । समर्पून भाकीं कींव ॥ ३ ॥

२७१६. भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथूनिया नुठों[7] माथा । मरणावांचूनि सर्वथा ॥ ध्रु ॥ होईं वळकट । माझ्या मना तूं रे धीट ॥ २ ॥ तुका आला लोटांगणीं । भक्तिभाग्यें[8] जाली धणी ॥ ३ ॥

२७१७. नाहीं तरी आतां कैचा अनुभव । जालासी तूं देव घरघेणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें तेथें देखें लांचाचा पर्वत । घ्यावें तरि चित्त समाधान ॥ ध्रु ॥ आधीं वरी हात या नांवें उदार । उसण्याचे उपकार फिटाफीट ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी तैसी करूं सेवा । सामर्थ्य[9] न देवा पायांपाशीं ॥ ३ ॥

---

१ पं. वर्षे.–२ पं. बापुडेपणे मी देवा.–३ पं. राहातील.–४ पं. वेचे –५ त. "न" नाहीं–६ पं. ० दुर्बळाची. त. दुर्बळ चि.–७ नुठऊं –८ पं. भक्तिभाग्या –९ त. सामर्थ्यानें देवा०.

२७१८. आह्मी सर्वकाळ कैंचीं [1]सावधान । [2]व्यवसायें मन अभ्यासलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी ह्मणा मोट[3] ठेविली चरणीं । केलों गुणागुणीं कासावीस ॥ ध्रु ॥ याचे [4]कानसुलीं मारीतसे हाका । मज घाटूं नका मधीं[5] आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे निद्रा जागृति सुषुप्ति । तुह्मी हो श्रीपती साक्षी येथें ॥ ३ ॥

२७१९. नसता चि दाउनि भेव । केला जीव हिंपुटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों तेव्हां कळलें [6]जना । वाउगा हा आकांत ॥ ध्रु ॥ ग[7]वँसिलों पुढें मागें । लागलागे पावला ॥ २ ॥ तुका ह्मणे केली आणि । सलगीच्यांनीं सन्मुख ॥ ३ ॥

२७२०. हें का आह्मां सेवादान । देखों सीण विषमाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांभाळा जी ब्रीदावळी । तुह्मी कां कळीसारिखे ॥ ध्रु ॥ शरणागत वैऱ्या हातीं । हे निश्चिंती[8] देखिली ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छीं भेटी । पाय पोटीं उफराटे ॥ ३ ॥

२७२१. कां हो आलें नेणों भागा । पांडुरंगा माझिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उफराटी तुह्मां चाली । क्रिया गेली सत्याची ॥ ध्रु ॥ साक्षी हेंगे[9] माझें मन । आर्त कोण होतें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे समर्थपणें । काय नेणें करीतसां ॥ ३ ॥

२७२२. शकुनानें लाभ हानि । येथूनि च कळतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भयारूढ जालें मन । आतां कोण विश्वास ॥ ध्रु ॥ भीत कळे आलिंगनीं । संपादनीं अत्यंत ॥ २ ॥ तुका ह्मणे मोकलिलें । कळों आलें बरवें हें ॥ ३ ॥

२७२३. नव्हेव निग्रह देहासी दंडण । न वजे भूकतान सहावली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि नित्य नित्य करीं आळवण । माझा अभिमान असों द्यावा ॥ ध्रु ॥ नाहीं विटाळिलें कायावाचामन । सं[10]कल्पासी भिन्न असें चि या ॥ २ ॥ तुका ह्मणे भवसागरीं उतार । कराया आधार इच्छीतसें ॥ ३ ॥

२७२४. [11]आइकिली कीर्त्ति संतांच्या वदनीं । तरि हें [12]ठाकोनि आलों स्थळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागिला पुढिला करावें सारिखें । पालटों पारिखें नये देवा ॥ ध्रु ॥ आह्मासी विश्वास नामाचा आधार । तुटतां हे थार उरी नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें नसावें चि दुजें । विनंती पंढरिराजें परिसावी हे ॥ ३ ॥

---

१ दे. त सावधानें.—२ पं. व्यवसाय. दे. वेवसाये —३ पं. मोटे टेविले —४ दे. कानसुटीं —५ पं. आतां मधीं.—६ त. जगा.—७ पं. गवसिलें —८ पं. निश्चिती.—९ पं. हे गे.—१० पं. संकल्पानें —११ दे. ऐकिली —१२ पं. टाकोनि.

२७२५. मोलाचें आयुष्य वेचतसे सेवे । नुगवतां गोवे खेद होतो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उगवूं आलेति तुह्मी नारायणा । परिहार या सिणा निमिषांत ॥ छ ॥ लिगाडाचे मासीं न्यायें जाली परी । उरली ते उरी नाहीं कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे लाहो साधीं वाचाबळें । ओढियेलों काळें धांव धाला ॥ ३ ॥

२७२६. ह्मणऊनि जालों क्षेत्रींचे संन्यासी । चित्त आशापाशीं आवरूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कदापि ही नव्हे सीमा उलंघन । केलें विसर्जन ओंव्हानीं च ॥ छ ॥ पारिखा तो आतां जाला दुजा ठाव । दृढ केला भाव एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे कार्यकारणाचा हेवा । नाहीं जीव देवा समर्पिला ॥ ३ ॥

२७२७. विभ्रंशिली[6] बुद्धि देहांत जवळी । काळाची अँकाळीं वायचाळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पालटलें जैसें देंठ सोंडी पान । पिकलें आपण तयापरी ॥ छ ॥ न मारितां हीन बुद्धि दुःख पावी । माजल्याची गोवी तयापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे गळ लागलिया मत्स्या । तळमळेचा तैसा लवलाहो ॥ ३ ॥

२७२८. नें वजावा तो काळ वांयां । मुख्य दया हे देवों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि जैसें तैसें । रहणी असें पायांचे ॥ छ ॥ मोकळें हें मन कष्ट । करी नष्ट दुर्जन ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं नेणें । न वजें येणेंपरी वांयां ॥ ३ ॥

२७२९. कल्पतरूअंगीं इच्छिलें तें फळ । अभागी दुर्बळ भावें सिद्धी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य त्या जाती धन्य त्या जाती । नारायण चित्तीं सांठविला ॥ छ ॥ बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर । गुणाचे प्रकार ज्याचे तया ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे पारखिया हिरा । ओझें पाठी खरा चंदनाचें ॥ ३ ॥

२७३०. उकरडा आधीं अंगीं नरकाडी । जातीची ते जोडी ते चि चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासयानें देखे अंधळा माणिकें । चवीविण फिके वांयां जाय ॥ छ ॥ काय जाणे विष पालटों उपचारें । मुखासी अंतर तों चि वरें ॥ २ ॥ तुका ह्मणे काय उपदेश वेड्या । संगें होतो रेड्यासवें कष्ट ॥ ३ ॥

२७३१. जया शिरीं कारभार । बुद्धि सार तयाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्ते तैसें वर्ते जन । बहुतां गुण एकाचा ॥ छ ॥ आपणीयां पाक करी । तो इतरीं सेविजे ॥ छ ॥ तुका ह्मणे शूर राखे[12] । गांळ्या[13] वाखे सांगातें ॥ ३ ॥

---

१ दे निमिस्यांत. त. पं. निमिष्यात.–२ पं. न्याय.–३ पं. घाली.–४ दे. त. आशापाशीं.–५ पं. आन्हानींनें.–६ त. विभ्रंशली –७ पं. अवकाळी वायचळ.–८ दे. सोडी.–९ पं. न वजे तो.०–१० त. देवाची.–११ पं. अंधळे–१२ दे. त. राखे.–१३ पं. गांव्या.

२७४८. न सरे भांडार । भरलें वेचितां अपार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मवित्याचें पोट भरे । पुढिलासी पुढें उरे ॥ छ्र ॥ कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥ ३ ॥

२७४९. तरी हांव केली अमुपा व्यापारें । व्हावें एकसरें धनवंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों हरिदास शूरत्वाच्या नेमें । जालीं ठावीं वर्में पुढिलांचीं ॥ छ्र ॥ जनावेगळें हें असे अभिन्नव । वळी दिला जीव ह्मणऊनि ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी लागलों विल्हेसी । चालतिया दिसीं स्वामी ऋणी ॥ ३ ॥

२७५०. कोण दुजें हरी सीण । शरण दीन आल्याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मांविण जगदीशा । उदार ऐसा त्रिभुवनीं ॥ छ्र ॥ कोण ऐसें वारी पाप । हरी ताप जन्माचा ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव घाली । कोण चाली मनाचे ॥ ३ ॥

२७५१. ग्रंथाचे अर्थ नेणती[1] हे खळ । बहु अनर्गळ जाले विषयीं ॥ १ ॥ नाहीं भेद ह्मूण भलतें चि आचरे । मोकळा विचरे[2] मनासवें ॥ २ ॥ तुका ह्मणे विषा नांव तें अमृत । पापपुण्या भीत नाहीं नष्ट ॥ ३ ॥

२७५२. कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥ १ ॥ विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ ३ ॥

२७५३. याती हीन मति[4] हीन कर्म हीन माझें । सांडोनियां सर्व लज्जा शरण आलों तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येईं गा तूं मायबापा पंढरीच्या राया । तुजविण सीण जाला क्षीण जाली काया ॥ छ्र ॥ दिनानाथें[5] दीनबंधु नाम तुज साजे । पतितपावन नाम ऐसी ब्रीदावळी गाजे ॥ २ ॥ विटेवरि नीट उभा कटावरी कर । तुका ह्मणे हें चि आह्मां ध्यान निरंतर ॥ ३ ॥

२७५४. गंगा आली आह्मांवरि । संतपाउलें साजिरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें करीन मी[6] अंघोळी । उडे चरणरजधुळी । येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ॥ छ्र ॥ पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । संतसागरांत[7] न्हालों ॥ ३ ॥

२७५५. पोटासाटीं खटपट करिसी अवघा वीळ । राम राम ह्मणतां तुझी वसली[8] दांतखीळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिचें नाम कदाकाळीं कां रे नये वाचे । ह्मणतां राम राम तुझ्या वाचें काय वेचे ॥ छ्र ॥ द्रव्याचिया आशा तुजला दाही दिशा न

१ पं. लागलें.–२ पं. नेणतां.–३ पं. विचार –४ पं. "मति हीन" नाहीं.–५ त. दिनानाथा – ६ पं. "मी" नाहीं.–७ त. पं. संतसागरीं न्हालों.–८ पं. वैसे.

पुरती । कीर्तनासी जातां तुझी जड झाली माती ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न ह्मणे त्याचा गाढव मातापिता ॥ ३ ॥

२७५६. आह्मां सुकाळ सुखाचा । जवळी हाट पंढरीचा । सोदाविती वाचा । रामनामें वैष्णव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्या रे आपुलाल्या परी । नका ठेवूं कांहीं उरी । ओसरतां भरी । तोंडवरी अंबर ॥ ध्रु ॥ वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उभे चि विकिलें एका । सनकादिकां सांपडलें ॥ २ ॥ धन्य धन्य हे भूमंडळी । प्रगटली नामावळी । घेती जीं दुबळीं । तीं आगळीं सदैव ॥ ३ ॥ माप आपुलेनि हातें । कोणी नाहीं निवारितें । पैस करूनि चित्तें । घ्यावें हितें आपुलिया ॥ ४ ॥ नाहीं वांटितां सरलें । आहे तैसें चि भरलें । तुका ह्मणे गेलें । वांयांविण न घेतां ॥ ५ ॥

२७५७. चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें जागें करीं चित्ता । कांहीं आपुलिया हिता ॥ ध्रु ॥ निक्षेपिलें धन । तेथें गुंतलेंसे मन ॥ २ ॥ नाशिवंतासाटीं । तुका ह्मणे करिसी आटी ॥ ३ ॥

२७५८. करूनि जतन । कोणा कामा आलें धन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें जाणतां जाणतां । कां रे होतोसी नेणता ॥ ध्रु ॥ प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज यांशीं संबंधु ॥ २ ॥ तुका ह्मणे एका । हरीविण नाहीं सखा ॥ ३ ॥

२७५९. आह्मी देतों हाका । कां रे जालासी तूं मुका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न बोलसी नारायणा । कळलासी क्रियाहीना ॥ ध्रु ॥ आधीं करूं चौघाचार । मग सांडूं भीडभार ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवटीं । तुह्मां आह्मां घालूं तुटी ॥ ३ ॥

२७६०. नव्हे भिडा हें कारण । जाणे करूं ऐसे जन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जों जों धरावा लौकिक । रेंबडवितोसी आणीक ॥ ध्रु ॥ चाल जाऊं संतांपुढें । ते हें निवडिती रोकडें ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं निर्लज्ज । आह्मां रोकडी गरज ॥ ३ ॥

२७६१. बहु होता भला । परि ये रांडेनें नासिला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु शिकला रंग चाळे । खरें खोटें इचे वेळे ॥ ध्रु ॥ नव्हतें आळवितें कोणी । इनें केला जगऋणी ॥ २ ॥ ज्याचे त्यासी नेदी देऊं । तुका ह्मणे धांवे खाऊं ॥ ३ ॥

२७६२. काय करावें तें आतां । जालें नयेसें बोलतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं दोघांचिये हातीं । गांठी घालावी एकांतीं ॥ ध्रु ॥ होय आपुलें काज । तों हे भीड सांडूं लाज ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आधीं निवडूं हा गोवा ॥ ३ ॥

---

१ पं. नामाचा.–२ पं. साधाविती.–३ पं. जाणत.–४ पं. रडवितोसी.–५ पं. वरि.

२७६३. केली सलगी तोंडपिटी । आह्मी लडिवाळें धाकुटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न बोलावें तें चि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥ छ ॥ अवघ्यांमध्यें एक वेडें । तें चि खेळविती कोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापा । मजवरि कोपों नका ॥ ३ ॥

२७६४. शिकवूनि बोल । केलें कवतुक नवल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपणियां रंजविलें । बापें माझिया विठ्ठलें ॥ छ ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । आह्मां देऊनियां निकें ॥ २ ॥ तुका करी टाहो । पाहे रखुमाईचा नाहो ॥ ३ ॥

२७६५. तेथें सुखाची वसति । गाती वैष्णव नाचती । दिंड्या[1] पताका झळकती । गर्जती हरिनामें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोषा जाली घेघेमारी । पळती[2] भरले दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया ॥ छ ॥ विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विठोनि[3] निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें[4] ॥ २ ॥ पोट सेवितां न धाये । भूक भुकेली च राहे । तुका ह्मणे पाहे । कोण आस[5] मुक्तीची ॥ ३ ॥

२७६६. शूद्रवंशी जन्मलों । ह्मणोनि दंभें मोकलिलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अरे तूं चि[6] माझा आतां । मायबाप पंढरीनाथा ॥ छ ॥ घोकाया अक्षर । मज[7] नाहीं अधिकार ॥ २ ॥ सर्वभावें दीन । तुका ह्मणे यातिहीन ॥ ३ ॥

२७६७. वेडें वांकुडें[8] गाईन । परि मी तुझा चि ह्मणवीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज तारीं दिनानाथा । ब्रीदें[9] साच करीं आतां ॥ छ ॥ केल्या अपराधांच्या राशी । ह्मणऊनि आलों तुजपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तारीं । सांडीं[10] ब्रीद नाहींतरीं ॥ ३ ॥

२७६८. हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें[11] धरीन त्यांचीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतकाळीं येती[12] माझ्या सोडवणे । मस्तक वैसणें देइन त्यांसी ॥ छ ॥ आणिक सोइरे सज्जन वो कोणी । वैष्णवांवांचोनि नाहीं मज ॥ २ ॥ देइन आळिंगण धरीन चरण । संवसारसीण नासे तेणें ॥ ३ ॥ कंठीं तुळशीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥ ४ ॥ तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हे[13] वैकुंठीं नाहीं मज ॥ ५ ॥ अळसें दंभें भावें हरिचें नाम गाती । ते माझे

---

१ दे. "दिंड्या" नाहीं. त. दिंडी.–२ पं. पळती दिशा भरल्या चारी–३ पं. विठला.–४ दे. "सगुण" असा पाठ घातला आहे.–५ दे. आस या मुक्तीची.–६ पं. "चि" नाहीं.–७ त. मति–८ पं. वेडें वांकुडें गायीन परी तुझा ह्मणवीन. त. परि तुझाचि ह्मणवीन–९ पं. ब्रीद.–१० पं. सोडीं.–११ दे. पाउले धरिन त्यांचे.–१२ त. माझे येती.–१३ पं. त्या. दे. चाड वैकुंठीं.

सांगाती परलोकींचे ॥ ६ ॥ कायावाचामनें देइन क्षेम त्यासी । चाड [1]जीवित्वासी नाहीं मज ॥ ७ ॥ हरिचें नाम मज ह्मणविती कोणी । तया सुखा धणी [2]धणी वरी ॥ ८ ॥ तुका ह्मणे तया [3]उपकारें बांधलों । ह्मणऊनि आलों शरण संतां ॥ ९ ॥

२७६९. लटिका तो प्रपंच एक हरि साचा । हरिविण आहाच सर्व इंद्रियें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लटिकें तें [4]मौनें भ्रमाचें तें स्वप्न । हरिविण ध्यान [5]नश्वरें [6]अवघें ॥ ध्रु ॥ लटिकिया [7]वित्पत्ति हरिविण [8]करिती । हरि नाहीं चित्तीं तो[9] शव जाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे हरि हें [10]धरिसी निर्धारीं । तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥ ३ ॥

२७७०. सर्वस्वा मुकावें तेणें [11]हरि जिंकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोह ममता माया [12]चाड नाहीं चिंता । [13]विषयकंदुवेथा जाळूनियां ॥ ध्रु ॥ लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशधडी ॥ २ ॥ शांति क्षमा दया सखिया [14]विनउनी । मूळ चक्रपाणी धाडी त्यांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे याती अक्षरें अभिमान । सांडोनियां शरण रिघें संतां ॥ ४ ॥

२७७१. एकांताचें सुख देईं मज देवा । आघात या जीवा चुकवूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदीं ॥ ध्रु ॥ मायबाळा भेटी सुखाची आवडी । तैशी मज गोडी देईं देवा ॥ २ ॥ कीर्ती ऐकोनियां जालों शरणागत । दासाचें तूं हित करितोसी ॥ ३ ॥ [15]तुका ह्मणे मी तों दीन पापराशी । घालावें पाठीशी मायबापा ॥ ४ ॥

२७७२. लटिकें तें ज्ञान लटिकें तें[16] ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लटिकें[17] चि दंभ [18]घातलें दुकान । चाळविलें जन पोटासाठीं ॥ ध्रु ॥ लटिकें चि केलें वेदपारायण । जरि नाहीं स्फुंदन प्रेम कथे ॥ २ ॥ लटिकें तें तप लटिका तो जप । आळस निद्रा झोप कथाकाळीं ॥ ३ ॥ नाम नावडे तो करील बाहेरी । नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसीं गर्जती पुराणें । शिष्टांचीं वचनें मागिला हीं ॥ ५ ॥

२७७३. भूतीं भगवद्भाव । [19]मात्रासहित जीव । अद्वैत तो ठाव । निरंजन एकला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसीं गर्जती पुराणें । वेदवाणी सकळ जन । संत

१ पं. जीवित्वाची—२ पं. पार नाहीं.—३ उपकार बोधलों.—४ दे. त. मौन्य भ्रमाचें स्वप्न—५ पं. नैश्वर्य. त. नैश्वर.—६ दे. आहे—७ दे. त. विपत्ति.—८ पं. रीति.—९ पं. "तो" नाहीं.—१० पं धरीं.—११ दे. त हरीसी.—१२ पं. चाड नाहीं चिंता.—१३ पं. विपय कंडवेया.—१४ पं. विनवनी.—१५ पं. तुका ह्मणे दीन मी तो पाप०.—१६ पं. "ते" नाहीं.—१७ पं. लटिका.—१८ पं. घातलें.—१९ दे. त. मात्रासहित जीव । अद्वैत ठाव.

गर्जतील तेणें । अनुभवें निर्भर ॥ ध्रु ॥ माझें तुझें हा विकार । निरसतां एकंकार । न लगे कांहीं फार । विचार चि करणें ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजें । हें तों नाहीं सहजें । संकल्पाच्या काजें । आपें आप वाढलें ॥ ३ ॥

२७७४. नेणें फुंकों कान । नाहीं ऐकांतींचें[1] ज्ञान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥ ध्रु ॥ नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ २ ॥ चिंतनाच्या सुखें । तुका ह्मणे नेणें दुःखें ॥ ३ ॥

२७७५. त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग जैसा तैसा राहें । काय पाहें उरलें तें ॥ ध्रु ॥ अंतरींचें विषम गाढें । येऊं पुढें नेदावें[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥ ३ ॥

२७७६. मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह विसरे आपुला । जवळीं घेतां सीण गेला ॥ ध्रु ॥ दावी प्रेमभातें । आणि अंगावरि चढतें ॥ २ ॥ तुका संतापुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ॥ ३ ॥

२७७७. कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें नेणें[3] नारायणा । संतीं सांभाळिलें[4] दीना ॥ ध्रु ॥ कोण लाभकाळ । दीन आजिचा[5] मंगळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । लाभ[6] सहज विठ्ठला ॥ ३ ॥

२७७८. मान इच्छी तो अपमान पावे । अमंगळ सवे अभाग्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाचिये अंगीं दुजियाचा[7] वास । आशा पुढें नाश सिद्ध करी ॥ ध्रु ॥ आधीं फळासी कोठें[8] पावों शके । वासनेची भिकेवरी चाली ॥ २ ॥ तुका ह्मणे राजहंस ढोरा नांव । काय तया घ्यावें अळंकाराचें ॥ ३ ॥

२७७९. संसारापासूनी कैसें[9] सोडविशी । न कळे हृषीकेशी काय जाणें । करितां न सरे अधिक वाट पाहीं । तृष्णा देशधडी केलों । भक्तिभजनभाव यांसी नाहीं ठाव । चरणीं तुझ्या अंतरलों । मागें पुढें रीग न पुरे चि पाहातां । अवघा अवघीं वेष्टिलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझी लाज राखें नारायणा । हीन दीन लीन[10] याचकाची । करितां न कळे कांहीं असतील गुण दोष । करीं होळी संचितांची ॥ ध्रु ॥ इंद्रियें द्वारें मन धांवे सैरें । [11]नागवे करितां चि कांहीं । हात पाय कान मुख लिंगस्थान । नेत्र घ्राण द्वारें पाहीं । जया जैसी सोय तया तैसें होय । क्षण एक स्थिर नाहीं । करिती ताडातोडी ऐसी यांची खोडी । न चले माझें यास

१ पं. एकांताचें.–२ त. न यावें.–३ पं. नेणों –४ त. सांभाळिलों.–५ दे. आजि.–६ पं. एवढा लाभ हा विठ्ठला ।.–७ पं. दुजियाची.–८ पं. कई.–९ पं. "लीन" नाहीं.–१० पं. ससाराची.–
११ पं. सैर नांगवेचि करिता कांहीं ।.

कांहीं ॥ २ ॥ शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधु । धन लोभ मायावंत । जन लोकपाळ मैत्र हे सकळ । सोइरीं सज्जनें बेहुतें । नाना कर्म डाय करिती उपाय । बुडावया घैातपातें । तुका ह्मणे हरी राखे भलत्या परी । आह्मी तुझीं शरणागतें ॥ ३ ॥

२७८०. नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा लाभ बांधा गांठी । विठ्ठलपायीं पडे मिठी ॥ ध्रु ॥ नामापरतें साधन नाहीं । जें तूं करिशी आणिक कांहीं ॥ २ ॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ॥ ३ ॥

२७८१. प्राण समर्पिला आह्मी । आतां उशीर कां स्वामी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें फेडावें उसणें । भार न मना या ऋणें ॥ ध्रु ॥ जाला कंठस्फोट । जवळी पातलों निकट ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । कैसी बरी वाटे देवा ॥ ३ ॥

२७८२. येणें मार्गें आले । त्यांचें निसंतान केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी अवघड वाट । ऐकोन आलों मी बोभाट ॥ ध्रु ॥ नागविल्या थाटी । उरों नेदी च लंगोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चोर । तो हा उभा कटिकर ॥ ३ ॥

२७८३. तोंवरि तोंवरि जंबुक करि गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्तिब्राह्मणा देखिलें नाहीं ॥ ध्रु ॥ तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडिली नाहीं ॥ २ ॥ तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ॥ ३ ॥ तोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें । जंव तुक्याचें दर्शन जालें नाहीं ॥ ४ ॥

२७८४. तोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ १ ॥ तोंवरि तोंवरि शोभेती दीपिका । नुगवता एका भास्करासी ॥ २ ॥ तोंवरि तोंवरि सांगती संताचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥ ३ ॥

२७८५. धरोनि दोन्ही रूपें पाळणें संहार । करी कोप रुद्र दयाळ विष्णु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जटाजूट एका मुगुट माथां शिरीं । कमळापति गौरीहर एक ॥ ध्रु ॥ भस्मउद्धळण लक्ष्मीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ॥ २ ॥ वैजयंती माळा वासुगीचा हार । लेणें अळंकार हरिहरा ॥ ३ ॥ कपाळ झोळी एका स्मशानींचा वास । एक जगन्निवास विश्वंभर ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज उभयरूपीं एक । सारोनि संकल्प शरण आलों ॥ ५ ॥

---

१ पं. सज्जन बहुत.–२ पं. घात पात.–३ पं. कोणा सांगावा बोभाट ।. दे. पूर्वी असें होतें–४ दे. शोभतील.

२७८६. उचिताचा भाग होतों राखोनियां । दिसती ते वांयां कष्ट गेले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वचनाची कांहीं राहे चि ना रुचि । खेळाऐसें वाची कुची जालें ॥ ध्रु ॥ विश्वासानें माझें बुडविलें घर । करविला धीर येथवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे शेकीं थार नाहीं बुड । कैसें तुह्मीं कोड पुरविलें ॥ ३ ॥

२७८७. लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि कोर्धे चाले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खायाचा वोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापशाला बोध कैंचा ॥ ध्रु ॥ सेवी भांग अफू तमाखू उदंड । परि तो अखंड भ्रांतीमाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ॥ ३ ॥

२७८८. अवघीं च तीर्थे घडलीं एकवेळा । चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघीं च पापें गेलीं दिगांतरीं । वैकुंठ पंढरी देखिलिया ॥ ध्रु ॥ अवघिया संतां एकवेळा भेटी । पुंडलीक दृष्टी देखिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे जन्मा आल्याचें सार्थक । विठ्ठल चि एक देखिलिया ॥ ३ ॥

२७८९. सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल । तेणें गळां माळ घालूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति । तेणें अंगीं विभूती लावूं नये ॥ ध्रु ॥ जयासी न कळे भक्तीचें महिमान । तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ २ ॥ ज्याचें मन नाहीं लागलें हातासी । तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्यासी नाहीं हरिभक्ति । तेणें भगवें हातीं धरूं नये ॥ ४ ॥

२७९०. आह्मी असों निश्चितीनें । एक्या गुणें तुमचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुराचारी तरले नामें । घेतां प्रेमें[6] ह्मणोनि ॥ ध्रु ॥ नाहीं तुह्मां धांव घेतां । कृपावंता आळस ॥ २ ॥ तुका ह्मणे विसरूं कांई । तुज वो आई विठ्ठले ॥ ३ ॥

२७९१. अनुभवें वदे वाणी । अंतर ध्यानीं आपुलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैंची चिका दुधचवी । जरी दावी पांढरें ॥ ध्रु ॥ जातीऐसा दावी रंग । वहु जग या नावें ॥ २ ॥ तुका ह्मणे खद्योत तें । ढुंगाभोंवतें आपुलिया ॥ ३ ॥

२७९२. परपीडक तो आह्मां दावेदार । विश्वीं विश्वंभर ह्मणऊनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दंडूं त्यागूं बळें नावलोकूं डोळा । राखूं तो चांडाळा ऐसा दुरि ॥ ध्रु ॥ अनाचार कांहीं न साहे अवगुणें । वहु होय मन कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी एकविध सेवा । विमुख ते देवा वाळी चित्तें ॥ ३ ॥

---

१ पं. खेळा ऐसे.–२ पं. झालें–३ त. भूवैकुंठ.–४ दे. पं. "धर्म" नाहीं.–५ पं. अगासी.–
६ दे. प्रेम.–७ पं. आह्मां.–८ दे. कांहीं.

२७९३. कांहीं न मागे कोणांसी । तो चि आवडे देवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव तयासी ह्मणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥ छ ॥ भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥ २ ॥ नाहीं नाहीं त्यासमान । तुका ह्मणे मी जमान ॥ ३ ॥

२७९४. नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥ छ ॥ ब्रह्मादिकांच्या[1] ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥ २ ॥ तुका ह्मणे सार घ्यावें । मनें हरिरूप पाहावें ॥ ३ ॥

२७९५. आडलिया[2] जना होसी सहाकारी । अंधळियाकरीं काठी तूं चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ओंडिले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ छ ॥ प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुह्मी अपंगिला नानापरी ॥ २ ॥ आपुलें चि अंग तुह्मी वोडविलें । त्याचें निवारलें महा दुःख ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे कृपे पार नाहीं । माझे विठाबाई जननीये[5] ॥ ४ ॥

२७९६. तपासी तें मन करूं पाहे घात । धरोनि सांगात इंद्रियांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि कीर्त्तन आवडलें मज । सांडोनियां लाज हें चि करीं ॥ छ ॥ पाहातां आगमनिगमाचे[3] ठाव । तेथें नाहीं भाव एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें नाहीं वो विकार । नाम एक सार विठोबाचें ॥ ३ ॥

२७९७. गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भूतीं नारायण खरा । आप तैसा चि दुसरा ॥ छ ॥ न कळतां दोरी साप । राहूं नेंदावा तो कांप[4] ॥ २ ॥ तुका ह्मणे गुणदोषी । ऐसें न पडावें सोसीं ॥ ३ ॥

२७९८. अंगीकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तें हि तेणें वंद्य केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अजामेळ भिल्लीं[6] तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥ छ ॥ ब्रह्महत्याराशी पातकें अपार । वाल्मीक किंकर वंद्य केला ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥ ३ ॥

२७९९. धनवंता घरीं । करी धन चि चाकरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होय वैसल्या व्यापार । न लगे सांडावें चि घर ॥ छ ॥ रानीं वनीं द्वीपीं[7] । असतीं तीं होतीं सोपीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोल । देतां कांहीं नव्हे खोल ॥ ३ ॥

२८००. हा गे माझा अनुभव । भक्तिभाव भाग्याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला ऋणी नारायण । नव्हे क्षण वेगळा ॥ छ ॥ घालोनियां भार माथां । अवघी चिंता वारली ॥ २ ॥ तुका ह्मणे वचनासाठीं[8] । नाम कंठीं धरोनि ॥ ३ ॥

---

१ त. पं. ब्रह्मादिकां ध्याना.—२ पं. आडले.—३ पं. आगमनिगमाचा.—४ पं. कंप.—५ पं. जन.—६ दे. त. पं. भिल्ली.—७ दे. त. दीपीं.—८ दे. त. वचन साटीं.

२८१७. चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंध पारखी माणिकें । बोलविशी स्पष्ट मुकें ॥ छ्र ॥ काय नाहीं सत्ता । हातीं तुझ्या पंढरीनाथा ॥ २ ॥ तुका ह्मणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥ ३ ॥

२८१८. बळिवंत कर्म । करी आपुला तो धर्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें घालुनियां सत्ता । न्यावें पतना पतिता ॥ छ्र ॥ आचरणें खोटीं । केलीं सलताती पोटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । नाहीं भजन केली सेवा ॥ ३ ॥

२८१९. कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ छ्र ॥ कैं भोज्य नानापरी । कैं कोरड्या भाकरी ॥ २ ॥ कैं बसावें वहनीं । कैं पायीं अन्हवाणी ॥ ३ ॥ कैं उत्तम प्रावर्णें । कैं वसनें तीं जीर्णें ॥ ४ ॥ कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥ ५ ॥ कैं सज्जनाशीं संग । कैं दुर्जनाशीं योग ॥ ६ ॥ तुका ह्मणे जाण । सुख दुःख तें समान ॥ ७ ॥

२८२०. उंचें निंच कांहीं नेणे हा भगवंत । तिष्ठे भाव भक्त देखोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी ॥ छ्र ॥ चर्म रंगूं लागे रोहिदासा [3]संगीं । कबिराचे [4]मागीं विणी शेले ॥ २ ॥ [5]सजनेंकसाया विकूं लागे मास । [6]मळा सांवत्यास खुरपूं लागे ॥ ३ ॥ नरहरिसोनारा घडों फुंकूं लागे । चोख्यामेळ्या संगें ढोरें ओढी ॥ ४ ॥ [7]नामयाची जनी सवें वेची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥ ५ ॥ नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥ ६ ॥ [8]अर्जुनाचीं घोडीं हाकी हा सारथी । भक्षी पोहे [9]प्रीती सुदाम्याचे ॥ ७ ॥ गौळियांचे घरीं [10]गाई अंगें वळी । द्वारपाळ [11]बळीद्वारीं जाला ॥ ८ ॥ [12]यंकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । आंबऋषीचे सोशी गर्भवास ॥ ९ ॥ मिराबाई साटीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥ १० ॥ घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी[13] महत्याची अंगें भरी ॥ ११ ॥ पुंडलिकासाटीं अझूनि तिष्ठत । तुका ह्मणे मात धन्य [14]त्यांची ॥ १४ ॥

---

१ दे. त. उचनिंच नेणे कांहीं भगवंत ।.–तिष्ठे भाव भक्त०.–२ पं. प्रल्हादासी.–३ पं. संगें.–४ पं. मागें शेले विणी –५ त. सज्जन कसाया. पं. सजन्या कसवासी.–६ पं. माळ्या –७ पं. "नामयाची०" आणि "नामा सवें०" या कडव्यांच्या जागा परस्परांशी बदलल्या आहेत –८ पं. अर्जुनाचे रथीं होय हा सारथी ।.–९ दे. प्रीती सुदाम्याची.–१० पं. अंगें गाई वोळी–११ पं. बळिचा द्वारीं.–१२ पं. यकोबाचें. त. येंकोबाचें–१३ पं. हुंडी त्या महत्याची०.–१४ दे. याची.

२८२१. भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रीं दिवस वाट तुझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पूर्णिमेचा चंद्रमा[1] चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ छ ॥ दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली । पाहतसे वाटुली पंढरीची ॥ २ ॥ भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परि माउलीची ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावीं देवा ॥ ४ ॥

२८२२. आले संत पाय ठेविती मस्तकीं । ईहीं[2] उभयलोकीं सरता केलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल ॥ छ ॥ अवघीं पूर्व पुण्यें जालीं सानुकूळ । अवघें चि मंगळ संतभेटी ॥ २ ॥ तुका ह्मणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥ ३ ॥

२८२३. करीं धंदा परि आवडती[3] पाय । प्रीती सांगों काय नेणों[4] देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूप डोळां देखें सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥ छ ॥ नेमून ठेविली कोरया[5] कारणीं । आमुचिये वाणी गुण वदे ॥ २ ॥ मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धन धान्य ॥ ३ ॥ उसंतितों पंथ वेठीचिया परी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढ ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें[6] करितों निर्वाण । जीव तुह्मां भिन्न नाहीं माझा ॥ ५ ॥

२८२४. कां रे माझीं पोरें ह्मणसील ढोरें । मायबाप खरें काय एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे गेलें ह्मणोनि करिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ मेलियाचा ॥ छ ॥ कां रे माझें माझें ह्मणसील गोत । नो संडेविती[9] दूत यमा हातीं ॥ २ ॥ कां रे मी बळिया ह्मणविसी[7] ऐसा । सरणापाशीं कैसा उंचलविसी[10] ॥ ३ ॥ तुका ह्मणे न घरीं भरवसा कांहीं[8] । वेगीं शरण जाई पांडुरंगा ॥ ४ ॥

२८२५. अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐकोनियां माझीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ ॥ छ ॥ मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ॥ २ ॥ उशीर तो आतां न पाहिजे केला । अहो जी विठ्ठला मायबापा ॥ ३ ॥ उरलें[11] तें एक हें चि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळां ॥ ५ ॥

---

१ दे. चंद्र चकोराचें जीवन ।.–२ दे त. येहीं –३ पं. आठवती.–४ पं. नेणों –५ पं. काया हे कारणीं । आमुची हे वाणी –६ त. ऐकें –७ पं. ह्मणविसी –८ त. कांहीं एक.–९ पं. न सोडविती –१० त. उचलसी.–११ पं. उरलें तें मज हें चि एक आतां.

२८२६. न मनीं ते ज्ञानी न मनीं ते पंडित । ऐसे परीचे एकएका भावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धातू पोसोनियां आणिकां उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥ छ ॥ न मनीं ते योगी न मनीं ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परीचीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तयां नमन बाह्यात्कारी । आवडती परी चित्तशुद्धीचे ॥ ३ ॥

२८२७. कासिया पाषाण पूजिती पितळ । अष्ट धातु खळ भावें विण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाव चि कारण भाव चि कारण । मोक्षाचें साधन बोलियेलें ॥ छ ॥ काय करिल जपमाळा कंठमाळा । करिशी वेळोवेळां विषयजप ॥ २ ॥ काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ३ ॥ काय करिशील कुशल गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ४ ॥ तुका ह्मणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥ ५ ॥

२८२८. अंतरींचें गोड । राहें आवडीचें कोड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संघष्टणें येती अंगा । गुणदोष मनोभंगा ॥ छ ॥ उचिताच्या काळा । नाहीं कळत सकळा ॥ २ ॥ तुका ह्मणे अभावना । भावीं मूळ तें पतना ॥ ३ ॥

२८२९. शिळा जया देव । तैसा फळे त्याचा भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होय जतन तें गोड । अंतरा येती नाड ॥ छ ॥ देव जोडे भावें । इच्छेचें तें प्रेम घ्यावें ॥ २ ॥ तुका ह्मणे मोड दावी । तैशीं फळें आलीं व्हावीं ॥ ३ ॥

२८३०. कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुह्मी देवा संतजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विचित्र विंदानी नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥ छ ॥ काय वानरांचीं अंगींची ते शक्ति । उदका तरती वरी शिळा ॥ २ ॥ तुका ह्मणे करी निमित्य चि आड । चेष्टवूनि जड दावी पुढें ॥ ३ ॥

२८३१. पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ ॥ छ ॥ काय उणें तुह्मां संताचिये घरीं । विदित या परी सकळ ही ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ॥ ३ ॥

२८३२. वदवावी वाणी माझी कृपावंता । वांगपुष्प संतां समर्पीशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वसंकटाचा तुह्मां परिहार । घालावा ग्यां भार पांडुरंगा ॥ छ ॥ एकसरें चिंता ठेवूनियां पायीं । जालों उतराई होतों तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें जालें अवसान । काया वाचा मन वेचूनियां ॥ ३ ॥

---

१ पं. परी –२ पं. भाव हीण.–३ त. कारण –४ पं. काय करितील जपमाळ कंठ०.–५ दे. त. मनभंगा.–६ दे. त. कळती.–७ दे. त. खेळ.–८ पं. माझी.–९ पं. चित्त *"वाक्पुष्प" याबद्दल.

२८३३. नमावे पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृपेचा वोरस न समाये पोटीं । ह्मणोनि उफराटीं वचनें हीं ॥ छ ॥ तुमची उष्टावळी हें[1] माझें भोजन । झाडावें अंगण केरपुंजे ॥ २ ॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझें गांठीं । जेणें पडे मिठी पायांसवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे राहे आठवण चित्तीं । ऐशी कृपा संतीं केली तुह्मीं ॥ ४ ॥

२८३४. काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ छ ॥ [2]अमंगळपणें कांटाळा न धरी । उचलोनि करीं कंठीं लावी ॥ २ ॥ लेववी आपुले [3]अंगें अळंकार । संतो[4]षाये फार देखोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्तुति योग्य नाहीं परी । तुह्मां लाज थोरी अंकिताची ॥ ४ ॥

२८३५. माझिया मीपणावर पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें । पापा नाहीं पार दुःखाचे डोंगर । जालों ये भूमीसी ओझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [5]काय विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसें दुःख । नर नारी सकळ उत्तम चांडाळ । न [6]पाहाती माझें मुख ॥ छ ॥ काया वाचा मनें अघाटित करणें । चर्मचक्षु हात पाय । निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणीक सांगों किती काय ॥ २ ॥ लक्ष्मीमदें [7]मातें घडले महा दोष । पत्नी दोनी भे[8]दाभेद । पितृवचन घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुचर वादी निंद्य ॥ ३ ॥ आणीक किती सांगों ते अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन । भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट [9]हीन ॥ ४ ॥ संत म[10]हानुभाव ऐका हें उत्तरें । अवगुण अविचारें वृद्धि पापा । तुका ह्मणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ॥ ५ ॥

## कृष्णजन्म अभंग ॥ ५ ॥

२८३६. फिराविलीं दोनी । कन्या आणि चक्रपाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाला आनंदें आनंद । अवतरले गोविंद ॥ छ ॥ तुटलीं बंधनें । व[11]सुदेवदेवकीचीं दर्शनें ॥ २ ॥ गोकुळासी आलें । ब्रह्म अव्यक्त चांगलें ॥ ३ ॥ नंद दसवंती । धन्य देखिले श्रीपती ॥ ४ ॥ निशीं जन्मकाळ । आले अष्टमी गोपाळ ॥ ५ ॥ आनंदली मही । भार गेला सकळ ही ॥ ६ ॥ तुका ह्मणे कंसा । आट भोंविला वळसा ॥ ७ ॥

---

१ पं. तें.–२ पं. अमंगळपण.–३ त. हातें.–४ पं. सतोषे हे –५ पं. कालचा.–६ पं. ०पाहाती डोळां माझें –७ पं. ०मातले घटले बहु दोष ।.–८ दे. त. भेदभेद.–९ पं. शब्द हीन.– १० पं. महानुभव.–११ पं. वसुदेवदेवकी

२८५१. तपाचे सायास । न लगे घेणें वनवास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें कळलें आह्मां एक । जालों नामाचे धारक ॥ ध्रु ॥ जाळीं महाकर्में । दावीं निजसुख धर्में ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें । कळिकाळ तें ठेंगणें ॥ ३ ॥

२८५२. माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें कां नेणां नारायणा । मज चाळवितां दिना ॥ ध्रु ॥ नागवी धावणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥ २ ॥ राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥ ३ ॥ तुज्या केल्याविण । नव्हे स्थिर वेंश जन ॥ ४ ॥ तुका ह्मणे हरी । सूत्र तुह्मां हातीं दोरी ॥ ५ ॥

२८५३. गाऊं नेणें परी मी कांहीं गाईन । शरण जाईन पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्मांडनायक मी त्याचा अंकित । काय यमदूत करिती काळ ॥ ध्रु ॥ वेंश्या ज्याच्या नामें तारिली गणिका । अजामेळासारिखा पापरासी ॥ २ ॥ चरणींच्या रजें अहिल्या तारिली । रूपवंत केली कुबजा क्षणें ॥ ३ ॥ पृथिवी तारिली पाताळासी जातां । तुका ह्मणे आतां आह्मी किती ॥ ४ ॥

२८५४. गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करोनि पठन । केली अहंता जतन ॥ ध्रु ॥ अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥ २ ॥ तुका ह्मणे लंड । त्याचें हाणोनि फोडा तोंड ॥ ३ ॥

२८५५. परद्रव्य परनारी । अभिळासूनि नाक धरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ ध्रु ॥ सोंवेंळ्याची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ३ ॥

२८५६. टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा वरपंग सारा । पोटीं विषयांचा थारा ॥ ध्रु ॥ मुद्रा लावितां कोरोनि । मान व्हावयासी जनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥ ३ ॥

२८५७. ऐसे संत जाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली ॥ ध्रु ॥ भांगभुर्का हें साधन । पची पडे मद्यपान ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें सोंग । तेथें कैचा पांडुरंग ॥ ३ ॥

२८५८. जातीची शिंदळी । तिला कोण वंशोवळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपघर ना वापघर । चित्तीं मनीं व्यभिचार ॥ ध्रु ॥ सेजे असोनियां धणी । परद्वार मना आणी ॥ २ ॥ तुका ह्मणे असैल जाती । जातीसाठीं खांती माती ॥ ३ ॥

---

१ पं. वस्य मन ।.–२ पं. वेंश्या ज्याच्या नांवें–३ पं. दासी–४ दे. त. सोहोळ्याची स्थिति ।.–५ दे. वसावळी. पं. वसावळी. त. वंसावळी–६ दे. त. असील.–७ पं. खावी.

२८५९. अंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥ ध्रु० ॥ [1]साकर ह्मणोनि माती । चाळवूनि द्यावी हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥ ३ ॥

२८६०. प्रीतिचिया बोला नाहीं पेसपाड । [2]भलतसें गोड करूनि घेई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गायें नाम तुझें ॥ ध्रु० ॥ वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल [3]मायबाप ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज येवो माझी दया । जीवींच्या सखया जिवलगा ॥ ३ ॥

२८६१. माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां आड उभा राहें नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥ ध्रु० ॥ वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां अधीन जालों देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥ ३ ॥

२८६२. वर्णावी ते थोरी एका [4]विठ्ठलांची । कीर्ती मानवाची [5]सांगों नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदंड चि जाले जन्मोनियां [6]मेले । होऊनियां गेले राव रंक ॥ ध्रु० ॥ त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ २ ॥ अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरण व्यथा [7]दूर होती ॥ ४ ॥

२८६३. नको देऊं देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाठवसी ॥ १ ॥ नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्वेग [8]होय जीवा ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं फकिराचे परी । रात्रदिवस हरि येइल घरा ॥ ३ ॥

२८६४. जोडोनियां धन उत्तम [9]वेव्हारें । उदास विचारें वेच करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उत्तम चि गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥ ध्रु० ॥ परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा वहिणी माया ॥ २ ॥ भूतदया गाईपशूचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ३ ॥ शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्व वडिलांचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे हें चि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ ५ ॥

२८६५. हरि ह्मणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि ह्मणतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरि ह्मणतां भुक्ति हरि ह्मणतां मुक्ति । चुके यातायाती हरि ह्मणतां ॥ ध्रु० ॥

१ पं. चाळवूनि हातीं । साकर ह्मणोनि द्यावी माती ।. दे. मागून असा पाठ केला आहे.– २ पं. भलतैसें.–३ त. मायबापें.–४ पं. विठोबाची.–५ पं. बोलों.–६ त. मेलें–७ त. दुरी.– ८ त. होईल.–९ पं. व्यवहारें

तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि ह्मणतां ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुह्मा ॥ ३ ॥

२८६६. नये वांटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावे दिवसराती ॥ ध्रु ॥ नये कावुळती । कोणा यावें हरिभक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे साई । करील कृपेची विठाई ॥ ३ ॥

२८६७. सकळ देवांचें दैवत । उभें असे रंगा आंतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रंग लुटा माझे बाप । शुद्ध भाव खरें माप ॥ ध्रु ॥ रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥ २ ॥ तुका लुटितां हे रंग । साह्य जाला पांडुरंग ॥ ३ ॥

२८६८. उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज दिलें कोणा हातीं । काय मांनिली निश्चिंती ॥ ध्रु ॥ कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥ ३ ॥

२८६९. तुका वेडा अविचार । करी बडबड फार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नित्य वाचे हा चि छंद । राम कृष्ण हरि गोविंद ॥ ध्रु ॥ धरी पांडुरंगीं भाव । आणीक नेणें दुजा देव ॥ २ ॥ गुरुज्ञान सर्वां ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥ ३ ॥ बोल नाईके कोणाचे । कथे नागवा चि नाचे ॥ ४ ॥ संगउपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे ॥ ५ ॥ कांहीं उपदेशिलें नेणे । वाचे विठ्ठल विठ्ठल ह्मणे ॥ ६ ॥ केला बहुतीं फाजित । तरी हें चि करी नित्य ॥ ७ ॥ अहो पंडितजन । तुका टाकावा थुंकोन ॥ ८ ॥

२८७०. आली सिंहस्थपर्वणी । न्हाव्या भटा जाली धणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरीं पापाच्या कोडी । वरिवरि बोडी डोई दाढी ॥ ध्रु ॥ बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥ २ ॥ पाप गेल्याची काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥ ३ ॥ भक्तिभावें विण । तुका ह्मणे अवघा सीण ॥ ४ ॥

२८७१. तुज घालोनियां पूजितों संपुष्टीं । परि तुझ्या पोटीं चवदा भुवनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज नाचऊनि दाखवूं कौतुका । परी रूपरेखा नाहीं तुज ॥ ध्रु ॥ तुजलागीं आह्मी गात असों गीत । परी तूं अतीत शब्दाहूनि ॥ २ ॥ तुजलागीं आह्मीं घातियेल्या माळा । पारि तूं वेगळा कर्तृत्वासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां होऊनि परमित । माझें कांहीं हित विचारावें ॥ ४ ॥

---

१ पं. येकं.–२ स. रंगायात–३ पं. भावें–४ दे. त. "जी" नाहीं.–५ पं. माडिली–६ पं. परी.

२८७२. पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करा दंड नारायणा । माझ्या मनाची खंडणा ॥ छ ॥ जना हातीं सेवा । घेतों लंडपणें देवा ॥ २ ॥ तुझा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥ ३ ॥

२८७३. दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ध्यान लागो ऐसें हरी । तुझे चरणीं तैशापरी ॥ छ ॥ आवंतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥ २ ॥ लोभ्या कळांतराची[1] आस । बोटें मोजी दिवस मास ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरीनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥ ४ ॥

२८७४. लागोनियां पायां विनवितों तुम्हाला । करें[2] टाळी बोला मुखें[3] नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥ छ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठीचा ॥ २ ॥ सकळांसी येथें आहे अधिकार । कल्युगीं उद्धार हरिनामें[4] ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहुग्रंथीं[5] बोलियेलें ॥ ४ ॥

२८७५. लटिकें[6] हासें लटिकें रडें । लटिकें उडें लटिक्यापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ॥ छ ॥ लटिकें गायें[7] लटिकें ध्यायें । लटिकें जायें लटिक्यापें ॥ २ ॥ लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जग माया ॥ ३ ॥ लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ॥ ४ ॥

२८७६. जालों[8] म्हणती त्याचें मज वाटे आश्चर्य । ऐकों[9] नव्हे धीर वचन माझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेसी चाखत न कळे कैसें ॥ छ ॥ तापलिया तेली[10] बावन चंदन । बुंद एक क्षण शीतळ करी ॥ २ ॥ पारखी तो जाणे अंतरींचा भेद । मूढजना छंद लावण्यांचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कसीं निवडे आपण । शुद्ध मंद हीन जैसें तैसें ॥ ४ ॥

२८७७. हे चि थोर भक्ति[11] आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेविलें अनंतें तैसें चि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ छ ॥ वोहिल्या[12] उद्वेग दुःख चि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥ २ ॥ तुका ह्मणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवा पायीं ॥ ३ ॥

---

१ पं. कळंतराची.—२ पं. कर.—३ पं. मुखीं.—४ पं. हरिच्यानामें.—५ पं. बहुता ग्रथीं.—६ पं. हें कडवें व ध्रुवपद यांत प्रत्येक "लटिकें" यापुढें "हें" आहे.—७ पं. गाय लटिके ध्याय। लटिकें जाय०.—८ पं. जाला.—९ पं. ऐको —१० पं. तेलें.—११ पं. भक्त.—१२ पं. वायिल्या

२८७८. जन्मा येणें घडे पातकाचे मूळें[1] । संचिताचें फळ आपुलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग वांयांविण दुःख वाहों नये । रुसोनियां काय देवावरी ॥ छ ॥ ठाउका चि आहे संसार दुःखाचा । चित्तीं सीण याचा वाहों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम[2] त्याचें आठवावें । तेणें विसरावें जन्मदुःख ॥ ३ ॥

२८७९. आतां माझे नका वाणूं गुण दोष । करितों उपदेश याचा कांहीं ॥ १ ॥ मानदंभासाठीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ॥ २ ॥ तुका ह्मणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥ ३ ॥

२८८०. काय माझें नेती वाईट ह्मणोन । करूं समाधान कशासाठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय मज लोक नेती परलोका । जातां कोणा एका निवारेल ॥ छ ॥ न ह्मणें कोणासी उत्तम वाईट । सुखें माझी कूट खावो मागें ॥ २ ॥ सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें सर्व ही साधन । नामसंकीर्त्तन विठोबाचें ॥ ४ ॥

## देवांनीं स्वामींस चिंचवडास नेलें होतें ते अभंग.

२८८१. वांजा गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥ छ ॥ चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारु ॥ २ ॥ पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । कां गा खोचलासी जीवा ॥ ४ ॥

२८८२. परतें मी आहें सहज चि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा[3] ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ न लगे रुसावें धरावा संकोच । सहज तें नीच आलें भागा ॥ छ ॥ पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें । आर्थ[4] तें चि देवें केलें ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी आह्मां जी वेगळे । केलेती[5] निराळे द्विज देवें[6] ॥ ३ ॥

२८८३. चिंतामणिदेवा गणपतीसी आणा । करवावें भोजना दुजे पात्रीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव ह्मणती तुंक्या[7] एवढी कैंची थोरी । अभिमानाभीतरी नागवलों ॥ छ ॥ वाडवेळ[8] जाला सिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण वैसलेती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ॥ ३ ॥

---

१ पं. पातकाच्या मुळें.—२ पं. त्याचें नाम.—३ पं. नामरूप.—४ पं. अर्थ त. आर्थे. दे. "आर्थे" याचें "आर्थ" केलें आहे.—५ पं. केले ते.—६ पं. देवा.—७ पं. तुका.—८ पं. वाडवेळ.

२८८४. भोक्ता नारायण लक्ष्मीचा पति । ह्मणोनि प्राणाहुती घेतालिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भर्ता आणि भोक्ता कर्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ॥ छ्र ॥ विश्वंभरें कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ २ ॥ कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका ह्मणे ॥ ३ ॥

२८८५. माझा स्वामी तुझी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ॥ १ ॥ तीर्थें तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी देवा द्विजवंद्य । मी तों काय निंद्य हीन याति ॥ ३ ॥

२८८६. वांदिलें वंदावें जीवाचिये सांटीं । किंवा बरी तुटी आरंभीं च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघें चि मोल धीरा अंगीं ॥ छ्र ॥ सिंपिलें तें रोप वरीवरी वरें । वाळलिया वैरी कोंभ नये ॥ २ ॥ तुका ह्मणे टाकीघायें देवपण । फुटलिया जन कुला पुसी ॥ ३ ॥

२८८७. आह्मां विष्णुदासां हें चि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ १ ॥ वाणी नाहीं घ्यावें आपुलिया हातें । करोनियां चित्तें समाधान ॥ २ ॥ तुका ह्मणे द्रव्य मेळाविलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ॥ ३ ॥

२८८८. सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला । आनंदें कोंदला मागें पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संगती पंगती देवांसवें घडे । नित्यानित्य पडे तें चि सांचा ॥ छ्र ॥ समार्थाचे घरीं सकळ संपदा । नाहीं तुटी वदा कासयाची ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें लाभाचिया कोटी । बहु वाव पोटीं समर्थांचे ॥ ३ ॥

२८८९. काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ॥ छ्र ॥ काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥ २ ॥ कोण लोकीं सांगा घातला बाहेरी । ह्मणतां हरि हरि तुका ह्मणे ॥ ३ ॥

२८९०. उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥ छ्र ॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥ २ ॥ भाविक विश्वासी । तुका ह्मणे नमन त्यांसी ॥ ३ ॥

२८९१. ज्यासी नावडे एकादशी । तो जिता चि नरकवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्यासी नावडे हें व्रत । त्यासी नरक तो ही भीत ॥ छ्र ॥ ज्यासी मान्य

१ पं. विश्वीं विश्वंभर.–२ दे. पं. घ्या.–३ पं. जालीं पे निर्मळ.–४ पं. पुरें.–५ पं. चित.–६ पं. आनंद.–७ त. देवासगें.–८ पं. सांग.

एकादशी । तो जिता चि मुक्तवासी ॥ २ ॥ ज्यासी घडे एकादशी । जाणें लागे विष्णूपाशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुण्यराशी । तो चि करी एकादशी ॥ ४ ॥

२८९२. मुंगी होउनि साकर खावी । निजवस्तूची भेटी घ्यावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाळवंटीं साकर पडे । गज येउनि काय रडे ॥ छ ॥ जाला हरिदास गोसांवी । अवघी मायिक क्रिया दावी ॥ २ ॥ पाठ पाठांतरिक विद्या । जनरंजवणी संध्या ॥ ३ ॥ प्रेम नसतां अंगा आणी । दृढ भाव नाहीं मनीं ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञान वाचे बोले । करणी पाहातां नै निवती डोळे ॥ ५ ॥ मिथ्या भगल वाढविती । आपुली आपण पूजा घेती ॥ ६ ॥ तुका ह्मणे धाकुटें व्हावें । निजवस्तूसी मागुनि घ्यावें ॥ ७ ॥

२८९३. भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायण ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥ छ ॥ चित्त वित्त हेवा । समर्पून राहा देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । असों द्यावें समाधान ॥ ३ ॥

२८९४. आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारी संसाराचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरिविण ॥ छ ॥ कठीण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तया ठायीं ॥ २ ॥ राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवीं श्रीहरी लवलाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती करिसी लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ॥ ४ ॥

२८९५. होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हटियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई ही धरावी विठोबाची ॥ छ ॥ आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरि जीवा घातक हें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥ ३ ॥

२८९६. नामाविण काय वाउगी चावट । वांयां वटवट हरीविण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुकट चि सांगे लोकाचिया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥ छ ॥ मेळवूनि चाट करी सुरापान । विषयांच्या गुणें मातातसे ॥ २ ॥ वैसोनि टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥ ३ ॥ वळे यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी[11] आयुष्याची ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥ ५ ॥

---

१ पं. "न" नाहीं.–२ पं. निजवस्तु –३ पं. राहें.–४ पं. ससागेच्या.–५ पं. थोर पुढें.–६ पं. सोई हे धरा विठोबाची.–७ पं. हरीविणें.–८ पं. मद्यपान –९ पं. मातला.–१० त. ढवाळी.–११ त. सिदोरी. दे. मागून शोध घालून "सिदोरी" केलें आहे.

२८९७. संत गाती हरिकीर्त्तनीं । त्यांचें घेइन पायवणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ॥ ध्रु ॥ काया कुरवंडी करीन । संत महंत ओंवाळीन ॥ २ ॥ संत महंत माझी पूजा । अनुभाव[2] नाहीं दुजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणें कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥ ४ ॥

२८९८. जालें भांडवल । अवघा पिकला विठ्ठल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां वाणी काशासाटीं । धीर धरावा च पोटीं ॥ ध्रु ॥ आपुल्या संकोचें । ह्मणऊनि तेथें टांचे ॥ २ ॥ घेतों खऱ्या मापें । तुका देखोनियां सोपें ॥ ३ ॥

२८९९. शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान[1] । करा मन सादर[3] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥ ध्रु ॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥ २ ॥ सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं ॥ ३ ॥

२९००. अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवें तो चि तापे जाऊनिया[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदक ह्मणे काय या हो मज प्यावें । तृषित तो धांवे सेवावया ॥ ध्रु ॥ काय वस्त्र ह्मणे यावो मज नेसा । आपुले स्वइच्छा जग वोढी[5] ॥ २ ॥ तुक्यास्वामी ह्मणे काय मज स्मरा । आपुल्या उद्धारा लागूनियां ॥ ३ ॥

२९०१. भक्त देवांघरचा[6] सुना । देव भक्ताचा पोसणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येर येरां जडलें कैसें । जीवा अंगें[7] जैसें तैसें ॥ ध्रु ॥ देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ३ ॥

२९०२. बरवयांबरवंट । विटे चरण सम नीट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते म्या हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ॥ ध्रु ॥ सकळां तीर्थां अधिष्ठान । करी लक्ष्मी[8] संवाहन ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । ठाव मागितला संतीं ॥ ३ ॥

२९०३. मांस चर्म हाडें । देवां अवघीं च गोडें[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जे जे हरिरंगीं रंगले । कांहीं न वचे वांयां गेले ॥ ध्रु ॥ वेद खाय शंखासुर[10] । त्याचें वागवी कलिवर ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । वराडी हे[11] भक्तिरसा ॥ ३ ॥

२९०४. कोणा चिंता आड । कोणा लोकलाज नाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैंचा राम अभागिया । करी कटकट[12] वांयां ॥ ध्रु ॥ स्मरणाचा राग । क्रोधें विटाळलें अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे जडा । काय चाले या[13] दगडा ॥ ३ ॥

---

१ पं. जाति.–२ पं. आनभाव.–३ पं. सान सादर.–४ दे. 'जाणोनियां.–५ पं. वेढी. दे. "वोढी" याचें "वेढी" केलें आहे.–६ पं. देवाचा घरसुना.–७ दे. अंगें.–८ दे. त. लक्षुमी.–९ त. देवें अवघीं केलीं गोडें ।.–१० त. सखासुर. दे. शंकासुर.–११ पं. या.–१२ पं. वटवड.–१३ पं. त्या.

२९०५. आपुलिया काजा । आह्मीं सांडियेली लाजा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां असों जोगवीत । आपुलिया हातीं हित ॥ छ ॥ तुह्मी देहशून्य । आह्मां कळे पाप पुण्य ॥ २ ॥ सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ॥ ३ ॥

२९०६. मायबापें केवळ काशी । तेणें न वजावें तीर्थासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुंडलीकें काय केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥ छ ॥ तैसा होईं सावधान । हृदयीं धरीं नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥ ३ ॥

२९०७. सत्य आह्मां मनीं । नव्हों गाबाळाचे धनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टांका मळ ॥ छ ॥ देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ॥ ३ ॥

२९०८. शिकवूनि हित । सोयी लावावे हे नीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याग करूं नये खरें । ऐसें विचारावें बरें ॥ छ ॥ तुमचिया तोंडें । धर्माधर्म चि खंडे ॥ २ ॥ मजसाटीं देवा । कां हो लपविला हेवा ॥ ३ ॥ जाला सावधान । त्यासी घालावें भोजन ॥ ४ ॥ तुका ह्मणे पिता । वरी बाळाच्या तो हिता ॥ ५ ॥

२९०९. सुख सुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रविरश्मिकळा । नये घालितां पैं डोळां ॥ छ ॥ दुरि तें जवळी । स्नेहें आकाशा कवळी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । माझें पायीं अखंडित ॥ ३ ॥

२९१०. तुह्मां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुकासाटीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥ छ ॥ कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे शिकविलें । माझें ऐकावें विठ्ठलें ॥ ३ ॥

२९११. लोक ह्मणती मज देव । हा तों अधर्म उपाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥ छ ॥ अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥ २ ॥ मन जाणे पापा । तुका ह्मणे मायबापा ॥ ३ ॥

२९१२. एका ह्मणे भलें । आणिका सहज चि निंदिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं न करितां आयास । सहज घडले ते दोष ॥ छ ॥ बरें वाइटाचें । नाहीं मज कांहीं साचें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥ ३ ॥

२९१३. आणिलें सेवटा । आतां कामा नये फांटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज आपुलेंसें ह्मणा । उपरि या नारायणा ॥ छ ॥ वेचियेली वाणी । युक्ती अवघी चरणीं ॥ २ ॥ तुका धरी पाय । क्षमा करवूनि अन्याय ॥ ३ ॥

---

१ दे. त. सांडियेलें.–२ पं. वागवीत.–३ दे. आपुलें अपुले हित ।.–४ पं. धर्माधर्माची खंट.–
५ पं. सुखा सुख.–६ पं. आकाश.–७ त. वेश.–८ पं. "चि" नाहीं.–९ पं. सायास.

२९१४. न करा टांचणी । येथें कांहीं आडचणी ॥ १ ॥ जिव्हा अमुप करी माप । विठ्ठल पिकला माझा [1]बाप ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वकाळ । अवघा गोविंद गोपाळ ॥ ३ ॥

२९१५. तुझ्या नामाची आवडी । आह्मी विठो तुझीं वेडीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां न वजों अणिकां ठायां । गाऊं गीत लागों पायां ॥ ध्रु ॥ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥ २ ॥ संतस[2]मागममेळ । प्रेमसुखाचा सुकाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायीं । जन्ममरणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

२९१६. साकरेच्या योगें[3] वर्ख । राजा कागदातें देखे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें आह्मां [4]मनुष्यपण । रामनाम केण्यागुणें ॥ ध्रु ॥ फिरंगीच्या योगें करी । राजा काष्ठ हातीं धरी ॥ २ ॥ रत्नकनका योगें लाख । कंठीं धरिती श्रीमंत लोक ॥ ३ ॥ देवा देवपाट । देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ॥ ४ ॥ ब्रह्मनंदयोगें तुका । पढीयंता [5]सज्जनलोकां ॥ ५ ॥

२९१७. धनवंतालागीं । सर्वमान्यता आहे जगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माता पिता बंधु जन । सर्व मानिती वचन ॥ ध्रु ॥ जव मोठा चाले धंदा । तंव बहिण म्हणे दादा ॥ २ ॥ सदा शृंगारभूषणें । कांता लवे बहुमानें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥ ४ ॥

२९१८. न विचारितां ठायाठाव । काय भुंके [6]तो गाढव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला तैसा लाहे दंड । खळ अविचारी लंड ॥ ध्रु ॥ करावें लाताळें । ऐसें नेणे कोण्या काळें ॥ २ ॥ न कळे उचित । तुका ह्मणे नीत हित ॥ ३ ॥

२९१९. कंठीं नामसिका । आतां कळिकाळासी धका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रोखा माना कीं सिका माना । रोखा सिका तत्समाना ॥ ध्रु ॥ रोखा न [7]मना सिका न मना । जतन करा नाककाना ॥ २ ॥ सिका न [8]मनी रावण । त्याचें केलें निसंतान ॥ ३ ॥ सिका मानी हळाहळ । [9]जालें सर्वांगीं शीतळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाम सिका । पटीं बैसलों निजसुखा ॥ ५ ॥

२९२०. भूतीं देव ह्मणोनि [10]भेटतों या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥ ध्रु ॥

---

१ याच्या पुढें त. "अष्टही प्रहर । बारा मास निरंतर ॥" हें कडवें अधिक आहे–२ दे. त. ०मेळे.–३ त. नावें.–४ दे. त. मानुसपण.–५ पं. जनलोका.–६ पं. तें.–७ पं. माना.–८ पं. मानी.–९ पं. जाला.–१० पं. भेटतां.

दयेसाटीं केला उपाधिपसारा । जड जीवा[1] तारा नाव कथा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरोनियां ॥ ३ ॥

२९२१. हारपल्याची नका चिंत्तीं । धरूं खंती वांयां च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पावलें तें ह्मणा देवा । सहज सेवा या नांवें ॥ ध्रु. ॥ होणारें[2] तें तें भोगें घडे । लाभ जोडे संकल्पें ॥ २ ॥ तुका ह्मणे मोकळें मन । अवघें पुण्य या नांवें ॥ ३ ॥

२९२२. नेसणें आलें होतें गळ्या । लोक रळ्या करिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपणियां सावारिलें । जग भलें आपण ॥ ध्रु. ॥ संबंध तो तुटला येणें । [3]जागेपणें चेष्टाचा ॥ २ ॥ भलती सेवा होती अंगें । बारस वेगें पडिलें ॥ ३ ॥ सावारिलें नीट वोजा । दृष्टिलाजा पुढिलांच्या ॥ ४ ॥ बरे उघडिले डोळे । हळहळेपासूनि ॥ ५ ॥ तुका ह्मणे विटंबना । नारायणा चुकली ॥ ६ ॥

२९२३. जिव्हा जाणे फिकें मधुर [4]कीं क्षार । येर मास पर [5]हातीं न कळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदुःखें कळों येती ॥ ध्रु. ॥ परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचे कारण एका [6]नव्हे ॥ २ ॥ एकदेहीं भिन्न [7]ठेवियेल्या कळा । नाचवी पुतळा सूत्रधारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐशी जयाची सत्ता । कां तया अनंता विसरलेती ॥ ४ ॥

२९२४. न लगे द्यावा जीव सहज [8]चि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥ १ ॥ मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे [9]कंई होईल स्वहित । निधान जो थीतें[10] टाकूं पाहे ॥ ३ ॥

२९२५. मोल वेचूनियां धुंडिती सेवका । आह्मी तरी फुका मागों बळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नसतां जवळी हित फार करूं । जीव भाव धरूं तुझ्या पायीं ॥ ध्रु. ॥ नेदूं भोग [11]आह्मी आपुल्या शरीरा । तुह्मांसी दातारा व्हावें म्हूण ॥ २ ॥ कीर्ती तुझी करूं आमुचे सायास । तूं का रे उदास पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज काय मागों आह्मी । फुकाचे कां ना भी ह्मणसी ना ॥ ४ ॥

२९२६. काय [12]लवणकाणिकेविण । एके क्षीण [13]सागर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मां हे[14] येवढी अडचण । नारायणीं मजविण ॥ ध्रु. ॥ [15]कुबेर अटाहासे जोडी । काय कवडी कारणें ॥ २ ॥ तुका ह्मणे काचमणि । कोण गणी भांडारी ॥ ३ ॥

---

१ पं. जीव –२ पं. होणार तें भोगें.–३ पं. जागपणे.–४ दे. त. "कीं" नाहीं.–५ दे. त. हातास.–६ पं. नये.–७ पं. दावियेल्या.–८ त. "चि" नाहीं –९ पं. कायी.–१० दे. पं. थीतें.–११ पं. "आह्मी" नाहीं.–१२ दे. त. लवण कळिकेविण.–१३ दे. त. सागरा.–१४ पं. "हे" नाहीं.–१५ दे. त. कुबेरा.

२९२७. तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं माझा आकार । मी तों तूं च निर्धार ॥ छ्र ॥ मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगें सेवा ॥ २ ॥ मी तुजमाजी अचळ । मजमाजी तूं[1] सबळ ॥ ३ ॥ तूं बोलसी माझ्या मुखें । मी तों तुजमाजी सुखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा । विपरीत ठायीं नांवा ॥ ५ ॥

२९२८. वैराग्याचें भाग्य । संतसंग हा चि लाग[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतकृपेचे हे दीप । करी साधका[3] निष्पाप ॥ छ्र ॥ तो चि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥ २ ॥ तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोन जाये ॥ ३ ॥

२९२९. जप तप ध्यान न लगे धारणा । विठ्ठलकीर्त्तनामाजी सर्व[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राहें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥ छ्र ॥ कीर्तनसमाधि साधन ते मुद्रा । राहतील थारा धरोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । वोळगती चारी ऋद्धिसिद्धी ॥ ३ ॥

२९३०. नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असों द्यावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरलिया भोग येईन सेवटीं । पायापें या भेटी अनुसंधानें ॥ छ्र ॥ आतां मजसाटीं याल आकारास । रोकडी हे आस नाहीं देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मुखीं असो तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ[5] ॥ ३ ॥

२९३१. हितावरी यावें । कोणी बोलिलों या भावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे[6] विनोदउत्तर । केले रंजवाया चार ॥ छ्र ॥ केली अटाअटी । अक्षरांची देवासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे खिजों । नका जागा[7] येथें निजों ॥ ३ ॥

२९३२. संचित प्रारब्ध[8] क्रियमाण । अवघा जाला नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं आह्मांसी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ॥ छ्र ॥ द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे हरि । आह्मांमाजी क्रीडा करी ॥ ३ ॥

२९३३. नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांवें बुडतों मी काढीं । सत्ता आपुलिया ओढीं ॥ छ्र ॥ क्रियाकर्महीन । जालों इंद्रियां अधीन ॥ २ ॥ तुका विनंती करी । वेळोवेळां पाय धरी ॥ ३ ॥

---

१ दे. तुझें वळ ।.–२ प. लाभ.–३ पं. सावक–४ पं. उभा–५ पं. काव्या.–६ पं. नन्दती विनोद उत्तरें । केले रंजवाया चारे ॥.–७ पं. रागा.–८ पं. " प्रारब्ध " नाहीं.

**२९३४.** जयापासोनि सकळ । महीमंडळ जालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो एक पंढरीचा राणा । नये [1]श्रुती अनुमाना ॥ छ्र ॥ विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥ २ ॥ तुका ह्मणे तो[2] आकळ । आहे सकळव्यापक ॥ ३ ॥

**२९३५.** नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥ छ्र ॥ नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसे ॥ २ ॥ नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥ ४ ॥

**२९३६.** आहे सकळां वेगळा । खेळे कळा चोरोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खांबसुत्राचिये परी । देव दोरी हालावितो ॥ छ्र ॥ आपण राहोनि निराळा । कैसी कळा नाचवी ॥ २ ॥ जेव्हां असुडितो दोरी । भूमीवरी पडे तेव्हां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तो जाणावा । सखा करावा आपुला ॥ ४ ॥

**२९३७.** आतां पुढें मना । [3]चाली जाली नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [4]येथें राहिलें राहिलें । कैसें गुंतोनि उगलें ॥ छ्र ॥ भोवतें भोंवनी । आलियांची [5]जाली धणी ॥ २ ॥ तुका ह्मणे रंग रंगे । रंगलें पांडुरंगे ॥ ३ ॥

**२९३८.** आळस पाडी विषयकामीं । शक्ती देई तुझ्या नामीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे[6] चि [7]विनवणी विनवणी । विनविली धरा मनीं ॥ छ्र ॥ आणिक वचना मुकी वाणी । तुमच्या गजरें द्यावी गुणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पाय डोळां । [8]पाहें एरवी अंधळा ॥ ३ ॥

**२९३९.** कोण वेची वाणी । आतां क्षुल्लका कारणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हें चि काम करूं । विठ्ठल हृदयांत धरूं ॥ छ्र ॥ नेंदावियां वृत्ति । आतां उठों चि वहुती ॥ २ ॥ उपदेश लोकां । करूनी वेडा होतो तुका ॥ ३ ॥

**२९४०.** [9]मागणें तें एक तुज । देई विचारोनि मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको दुर्जनांचा संग । क्षणक्षणा चित्तभंग ॥ छ्र ॥ जन्म घेईन मी नाना । वहु सोसीन यातना ॥ २ ॥ रंक होईन दीनांचा । घायें देहपात साचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें चि आतां । देई देई तूं सर्वथा ॥ ४ ॥

---

१ पं. अनुमाना श्रुतीसी –२ पं. "तो" नाहीं.–३ पं. वाचा.–४ पं. तेथें.–५ पं. "जाली" नाहीं.–६ पं. "हे चि विनवणी०." व "आणीक वचना०." ह्या पक्ति मागेंपुढें आहेत –७ पं. विनवणी । विनविली०.–८ दे. "पाहें" याचें "पाहावें" केलें आहे.–९ दे. मागेन.

२९४१. जाणसी उचित । पांडुरंगा धर्मनीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि म्यां बोलावें तें काई । सरे ऐसें तुझे पायीं ॥ ध्रु. ॥ पालटती क्षणें । संचितप्रारब्धक्रियेमाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । होसी सकळ करिता ॥ ३ ॥

२९४२. तुह्मी कांटाळलां तरी । आह्मां न सोडणें हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जावें कवणिया ठाया । सांगा विनावितों पायां ॥ ध्रु. ॥ केली जिवा साटी । आतां सुखें लागा पाठी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठाव । न सोडणें हा चि भाव ॥ ३ ॥

२९४३. येउनि संसारीं । मी तों ऐक जाणें हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेणें आणिक कांहीं धंदा । नित्य ध्यातसें गोविंदा ॥ ध्रु. ॥ कामक्रोधलोभस्वार्थ । अवघा माझा पंढरिनाथ ॥ २[3] ॥ तुका ह्मणे एक । धणी विठ्ठल मी सेवक ॥ ३ ॥

२९४४. सर्वपक्षीं हरि साहेसखा जाला । ओल्या अंगणीच्या कल्पलता त्याला ॥ १ ॥ सहजचाली चालतां पायवाटे । चिंतामणिसमान होती गोटे ॥ २ ॥ तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदांत वाहे पाणी ॥ ३ ॥

२९४५. काय पुण्य ऐसें आहे मजपाशीं । तांतडी धांवसी पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय ऐसा भक्त वांयां गेलों थोर । तूं मज समोर होसी वेगीं[4] ॥ ध्रु. ॥ काय कष्ट मोझे देखिली चाकरी । तो तूं झडकरी पाचारिशी ॥ २ ॥ कोण मी नांवाचा थोर[6] गेलों मोटा । अपराधी करंटा नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं ठाउकें संचित । येणें जन्माहित नाहीं केलें ॥ ४ ॥

२९४६. आम्हुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥ ध्रु. ॥ चळण वळण सेवकाच्या वळें । निर्गुणाच्यां[7] मुळें सांभाळावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनि हरी बुझवावें ॥ ३ ॥

२९४७. आह्मी मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मीं[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा तो पुतळा नाचे छंदें ॥ ध्रु. ॥ बोलतसें जैसें[10] बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥ २ ॥ पाप पुण्य ज्याचें तो चि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आह्मांसवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी आइका हो मांत । आह्मी या अतीत देहाहूनी ॥ ४ ॥

---

१ दे. त. ० क्रियमाण—२ पं. जाणें एक—३ पं. " ऐसें हरिभक्तार्चे ज्ञान महिमान । अतर्क्य सयाचें दुर्लभ दरुषण ॥." हें कडवें जास्त आहे.—४ पं. वेगीं—५ माझी.—६ त. "थोर" नाहीं.—७ पं. निर्गुणाचें मूळ.—८ दे. " मी " नाहीं.—९ पं. नाचवी पुतळा.—१० त. तैसें.—११ पं. संत.

२९४८. लागों नेदीं बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आण ॥ १ ॥ परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे याची लाज असे कोणा । सहाकारी दीना ज्याची तया ॥ ३ ॥

२९४९. हे चि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या ताहान भूक जाय ॥ छ ॥ दुरील जवळी आपण चि होतें । कवळिलें चित्तें जिवांपासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम घेतों वेळोवेळां । होतील सकळा शीतळा नाडी ॥ ३ ॥

२९५०. आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥ छ ॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याची कोण जाणे कळा । चालवी पांगळा पायांविण ॥ ३ ॥

२९५१. हित सांगे तेणें दिलें जीवदान । घातकी तो जाण मनामागें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बळें हे वारावे अधर्म करितां । अंधळें चालतां आडरानें ॥ छ ॥ द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी । नेदावें चोरासी चंद्रबळ ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें आहे हें पुराणीं । नाहीं माझी वाणी पदरींची ॥ ३ ॥

२९५२. ऐसा घेईं कां रे संन्यास । करीं संकल्पाचा न्यास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तूं राहें भलते ठायीं । जनीं वनीं खाटे भोंई ॥ छ ॥ तोडीं जाणिवेची कळा । होईं वृत्तीसी वेगळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नभा । होईं आमुचा ही भागा ॥ ३ ॥

२९५३. सोळा सहस्र होऊं येतें । भरलें रितें आह्मांपें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे तुह्मां ठायाठाव । देव ह्मूण संपादे ॥ छ ॥ कैची चिरामध्यें चिरे । मना वरें आलें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । अंगलगां भिन्न पैं ॥ ३ ॥

२९५४. इहलोकीं आह्मां भूषण अवकळा । भोपळा वाकळा आणि भिक्षा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निमोली संपदा भयविरहित । सर्वकाळ चित्त समाधान ॥ छ ॥ छिद्राचा आश्रम उंदीरकुळवाडी । धन नाम जोडी देवाचें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक सेवटीं राहाणें । वर्ततों या जना विरहित ॥ ३ ॥

---

१ पं. जीवनासी.–२ पं नाहीं बोलवत । सखा कृपावंत०.–३ त. कृपा.–४ पं. चालवी पांगुळा.–५ पं. नव्हे.–६ त. घेईं रे सन्यास ।. पं. घेईं कां सन्यास –७ दे. नास. पं. नाश.–८ पं. निराळा.–९ पं. अगसगा –१० दे. करा.–११ त. अन्न भिक्षा. दे. "आणि भिक्षा" याचें "अन्न भिक्षा" केलें आहे.–१२ पं. देवाची ते.

२९५५. आह्मी भाग्याचे भाग्याचे । आह्मां तांबे भोपळ्याचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लोकां घरीं गाई ह्मैसी । आह्मां घरीं उंदिरघुसी ॥ ध्रु ॥ [1]लोकां घरीं हत्ती घोडे । आह्मां आधोडींचे जोडे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी सुडके । आह्मां देखोन काळ धाके ॥ ३ ॥

२९५६. गाऊं नेणें कळा कुसरी । कान धरोनि ह्मणें हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझ्या बोबाडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥ ध्रु ॥ मज हंसतील लोक । परि मी गाईन निःशंक ॥ २ ॥ तुझे नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे [2]माझी विनंती । तुह्मी परिसा कमळापती ॥ ४ ॥

२९५७. विष पोटीं सर्पा । जन [3]भीतें तया दर्पा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंच भूतें नाहीं भिन्न । [4]गुण दुःख देती शीण ॥ ध्रु ॥ चंदन प्रिय वासें । [5]आवडे तें जातीऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे दाणा । कुचर मिळों नये अन्ना ॥ ३ ॥

२९५८. देव अवघें प्रतिपादी । वंदी सकळां एका निंदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें अवघें गेलें वांयां । विष घास एके ठायां ॥ ध्रु ॥ सर्वांग कुरवाळी । उपटी एक रोमावळी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । नाहीं जयाचें अंकित ॥ ३ ॥

२९५९. मज माझा उपदेश । आणिकां नये याचा रीस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी अवघे पांडुरंग । मी च दुष्ट सकळ चांग ॥ ध्रु ॥ तुमचा मी शरणागत । कांहीं करा माझें हित ॥ २ ॥ तुका पाय धरी । मी हें माझें दुर करीं ॥ ३ ॥

२९६०. जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥ १ ॥ मैथुनाचें सुख सांगितल्या [6]शून्य । अनुभवाविण कळूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे जळो शाब्दिक हें[7] ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥ ३ ॥

२९६१. अभिमानी पांडुरंग । गोवा काशाचा हो[8] मग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुसरा लवलाहीं । नका विचार करूं कांहीं ॥ ध्रु ॥ कोठें राहातील पापें । [9]जालियां हो अनुतापें ॥ २ ॥ तुका ह्मणे ये चि घडी । उभ्या पाववील थडी ॥ ३ ॥

२९६२. तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुखीं नाम धरीन कंठीं । अवघा सांठवीन पोटीं ॥ ध्रु ॥ नवविधा वेढिन आधीं । सांपडलासी भावसंधी ॥ २ ॥ तुका ह्मणे बळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ ३ ॥

---

१ पं. "लोकाघरीं तावे थाळे । आह्मा घरीं परळ काळे ॥" हें कडवें येथें जास्त आहे.–२ पं हो–३ पं. भीत.–४ पं. गुणदुःखें.–५ पं. आवडती.–६ दे. "शून्य" खोडून "खूण" केलें आहे.–७ त. "हें" नाहीं.–८ पं. हा.–९ पं. जाहालिया अनुतापे.–१० दे. अनुतापें.

२९६३. माझ्या मना लागो चाळा । पहावया विठ्ठल डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक नाहीं चाड । न लगे संसार हा गोड ॥ छ ॥ तरि च फळ जन्मा आलों । सरता पांडुरंगीं जालों ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । देईं चरणांची सेवा ॥ ३ ॥

२९६४. अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ॥ छ ॥ अवघी सुखाची च राशी । पुंडलिकाशीं वोळली हे[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे जवळी आलें । उभें ठेलें[2] समचरणीं ॥ ३ ॥

२९६५. देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझ्या जीवा । करणें तें करीं देवा ॥ छ ॥ बहु अपराधी । मतिमंद हीनबुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥ ३ ॥

२९६६. जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनि पळती रांडापोरें ॥ छ ॥ बाइल ह्मणे खैं[3]र मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥ ३ ॥

२९६७. जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळाआंत पद्मपत्र ॥ छ ॥ ऐकोनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनी योगिराज ॥ २ ॥ देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेविल्यां[4] जेवीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें जालियावांचून । कैं[5]रणें तें तें सीण वाटतसे ॥ ४ ॥

२९६८. विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कई कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ छ ॥ जाल्या येरझारा । जन्मां बहुतांचा फेरा ॥ २ ॥ तुका ह्मणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ३ ॥

२९६९. ज्यासी विषयाचें ध्यान । त्यासी कैंचा नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साधु कैंचा पापीयासी । काय चांडाळामी काशी[6] ॥ छ ॥ काय पतितासी पिता । काय अधर्मासी गीता ॥ २ ॥ तुका ह्मणे निरंजनी । शठ[7] कैंचा ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥

२९७०. वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥ छ ॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल ह्मणऊनि ॥ २ ॥ पोटा एका साटीं । तुका ह्मणे जलि[8] कष्टी ॥ ३ ॥

---

१ पं. "हे" नाहीं.–२ दे. त. ठालें.–३ पं. खरं.–४ पं. चेइल्या. दे. "चेविल्या" याचें "चेइल्या" केलें आहे.–५ पं. करणें तो सीण.–६ पं. कसावासी.–७ दे. त. शट. पं. पट–८ त. जालों.

२९७१. प्रपंच वोसरो । चित्त तुझे पायीं मुरो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें करिं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावें रंगा ॥ छ ॥ पुरे पुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥ २ ॥ लटिकें तें फेडा । तुका ह्मणे जाय पीडा ॥ ३ ॥

२९७२. ऐका कलीचें हें फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्ती ॥ छ ॥ पूजिती असुरा रांडा । मद्य प्राशितील पेंढा ॥ २ ॥ वामकवळ मार्जन । जन जाईल अधःपतन ॥ ३ ॥ तुका हरिभक्ति करी । शक्ति पाणी वाहे घरीं ॥ ४ ॥

२९७३. गुरुमार्गामुळें भ्रष्ट[3] सर्वकाळ । ह्मणती याती कुळ नाहीं ब्रह्मीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पवित्राला ह्मणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ॥ छ ॥ डोहोरें होलार दासी बलुती बारा । उपदेशिती फारा रांडापोरों ॥ २ । कांहीं टाण्या टोण्या विप्र शिष्य होती । उघडी[6] फजिती स्वधर्माची ॥ ३ ॥ नसता करुनी होम खाती एके ठायीं । ह्मणती पाप नाहीं मोक्ष येणें ॥ ४ ॥ इंद्रियांचे पेठे भला कौल देती । मर्यादा जकाती माफ केली ॥ ५ ॥ नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणे । उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे ऐसे गुरु शिष्य पूर्ण । विठोबाची आण नरका जाती ॥ ७ ॥

२९७४. बोलींचे गौरव । नव्हे माझा हा अनुभव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांसी पांगिली ॥ छ ॥ व्याली वाढविलें । निजपदीं निजविलें ॥ २ ॥ दाटली वो रसें । त्रिभुवन ब्रह्मरसें ॥ ३ ॥ विष्णु जोडी कर । मोंथां रज वंदी हर ॥ ४ ॥ तुका ह्मणे वळ । तोरडीं[12] हा कळिकाळ ॥ ५ ॥

२९७५. सेवट तो भला । माझा बहु गोड जाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलों निजांच्या माहेरा । भेटों[13] रखुमाईच्या वरा ॥ छ ॥ परिहार जाला । अवघ्यों[14] दुःखाचा मागिल्या ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥ ३ ॥

२९७६. तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझ्या नामाचा विश्वास । आह्मां कैंचा गर्भवास ॥ छ ॥ तुझे नामीं विसर पडे । तरी कोटी हत्या घडे ॥ २ ॥ नाम घ्या रे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥ ३ ॥

---

१ पं. मरो –२ दे. त. अधोपतन –३ पं भ्रष्टले सकळ. त. भ्रष्ट जाले सकळ.–४ पं. लोहार डोहार दासे० –५ पं. रांडापोरें.–६ पं. उघड.–७ पं. जाण.–८ पं. बोलाचा.–९ पं. “ हा ” नाहीं.– १० पं. आणिकां.–११ रज माथां.–१२ पं. तोडरीं.–१३ पं. नेटी (? भेटी).–१४ पं. अवघा दुःखाचा मागिला.

२९६३. माझ्या मना लागो चाळा । पहावया विठ्ठल डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक नाहीं चाड । न लगे संसार हा गोड ॥ छ्र ॥ तरि च फळ जन्मा आलों । सरता पांडुरंगीं जालों ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । देईं चरणांची सेवा ॥ ३ ॥

२९६४. अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ॥ छ्र ॥ अवघी सुखाची च राशी । पुंडलिकाशीं वोळली हे[1] ॥ २ ॥ तुका ह्मणे जवळी आलें । उभें ठेलें[2] समचरणीं ॥ ३ ॥

२९६५. देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझ्या जीवा । करणें तें करीं देवा ॥ छ्र ॥ बहु अपराधी । मतिमंद हीनबुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥ ३ ॥

२९६६. जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनि पळती रांडापोरें ॥ छ्र ॥ बाइल ह्मणे खैर[3] मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥ ३ ॥

२९६७. जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळाआंत पद्मपत्र ॥ छ्र ॥ ऐकोनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनी योगिराज ॥ २ ॥ देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेविल्यां जेवीं ॥ ३[4] ॥ तुका ह्मणे ऐसें जालियावांचून । करणें[5] तें तें सीण वाटतसे ॥ ४ ॥

२९६८. विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कई कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ छ्र ॥ जाल्या येरझारा । जन्मां बहुतांचा फेरा ॥ २ ॥ तुका ह्मणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ३ ॥

२९६९. ज्यासी विषयाचें ध्यान । त्यासी कैंचा नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साधु कैंचा पापीयासी । काय चांडाळामी काशी ॥ छ्र ॥ काय पतितासी पिता । काय अधर्मासी[6] गीता ॥ २ ॥ तुका ह्मणे निरंजनी । शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥

२९७०. वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥ छ्र ॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल ह्मणऊनि ॥ २ ॥ पोटा[7] एका साटीं । तुका ह्मणे जर्लि[8] कष्टी ॥ ३ ॥

---

१ पं. "हे" नाहीं.–२ दे. त. ठालें –३ पं. खरं.–४ पं. चेइल्या. दे. "चेविल्या" याचें "चेइल्या" केलें आहे.–५ पं. करणें तो सीण.–६ पं. कसाबासी.–७ दे. त. शट. पं. पट–८ त. जालों.

२९७१. प्रपंच वोसरो । चित्त तुझे पायीं मुरो[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें करिं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावें रंगा ॥ छ ॥ पुरे पुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥ २ ॥ लटिकें तें फेडा । तुका ह्मणे जाय पीडा ॥ ३ ॥

२९७२. ऐका कलीचें हें फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्ती ॥ छ ॥ पूजिती असुरा रांडा । मद्य प्राशितील पेंढा ॥ २ ॥ वामकवळ मार्जन । जन जाईल अधःपतन[2] ॥ ३ ॥ तुका हरिभक्ति करी । शक्ति पाणी वाहे घरीं ॥ ४ ॥

२९७३. गुरुमार्गामुळें भ्रष्ट[3] सर्वकाळ । ह्मणती याती कुळ नाहीं ब्रह्मीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पवित्राला ह्मणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ॥ छ ॥ डोहोरें[4] होलार दासी बलुती बारा । उपदेशिती फारा रांडापोरों[5] ॥ २ । कांहीं टाण्या टोण्या विप्र शिष्य होती । उघडी[6] फजिती स्वधर्माची ॥ ३ ॥ नसता करुनी होम खाती एके ठायीं । ह्मणती पाप नाहीं मोक्ष येणें ॥ ४ ॥ इंद्रियांचे पेठे भला कौल देती । मर्यादा जकाती माफ केली ॥ ५ ॥ नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणे । उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे ऐसे गुरु शिष्य पूर्ण । विठोबाची आण[7] नरका जाती ॥ ७ ॥

२९७४. बोलांचे[8] गौरव । नव्हे माझा हा[9] अनुभव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांसी[10] पांगिली ॥ छ ॥ व्याली वाढविलें । निजपदीं निजविलें ॥ २ ॥ दाटली वो रसें । त्रिभुवन ब्रह्मरसें ॥ ३ ॥ विष्णु जोडी कर । माथां[11] रज वंदी हर ॥ ४ ॥ तुका ह्मणे बळ । तोरडीं[12] हा कळिकाळ ॥ ५ ॥

२९७५. सेवट तो भला । माझा बहु गोड जाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलों निजांच्या माहेरा । भेटों[13] रखुमाईच्या वरा ॥ छ ॥ परिहार जाला । अवघ्यों[14] दुःखाचा मागिल्या ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥ ३ ॥

२९७६. तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझ्या नामाचा विश्वास । आह्मां कैंचा गर्भवास ॥ छ ॥ तुझे नामीं विसर पडे । तरी कोटी हत्या घडे ॥ २ ॥ नाम घ्या रे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥ ३ ॥

---

१ पं. मरो –२ दे. त. अधोपतन.–३ पं भ्रष्टले सकळ त. भ्रष्ट जाले सकळ.–४ पं. लोहार डोहार दासे०.–५ पं. रांडापोरें.–६ पं. उघड.–७ पं. जाण –८ पं. बोलाचा –९ पं. “हा” नाहीं.–१० पं. आणिकां.–११ रज माथां.–१२ पं. तोडरीं.–१३ पं. नेटी (? भेटी).–१४ पं. अवघा दुःखाचा मागिला.

२९७७. बाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गोवी अनिवार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घडों नेदी तीर्थयात्रा । केला कुतरा हातसोंका ॥ छ ॥ आपुली च करवी सेवा । पुजवी देवासारिखें ॥ २ ॥ तुका ह्मणे गाढव पशु । केला नाशु आयुष्या[1] ॥ ३ ॥

२९७८. बाइले अधीन होयें[2] ज्याचें जिणें । तैयाच्या[3] अवलोकनें पँडिजे[4] द्वाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया ते जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारोड्यांच्या ॥ छ ॥ बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेचें ॥ २ ॥ तुका ह्मणे मेंग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ॥ ३ ॥

२९७९. जगीं मान्य केलें हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करितों कवित्व जोडितों अक्षरें । येणें काय पुरें जालें माझें ॥ छ ॥ तोंवरि हे माझी न सरे करकर । जो नव्हे विचार तुझ्या मुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज पुंडलिकाची आण । जरी कांहीं वचन करिसी मज ॥ ३ ॥

२९८०. कोंडिलों[5] गे माज । निरोधुनी द्वार[6] । राखण तें बरें । येथें करा कारण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा गे हा गे हरि । करितां सांपडला चोरी । घाला गांठी धरी । जीवें माय त्रासाया ॥ छ ॥ तें[7] चि पुढें आड । तिचा लोभ तिला नाड । लावुनी चरफड । हात गोउनी पळावें[8] ॥ २ ॥ संशयाचें बिरडें[9] । याचे निरसले भेटी । घेतली ते तुटी । आतां घेतां फावेल ॥ ३ ॥ तुका येतो काकुलती । वाउगिया सोड । यासी चि निवाड । आह्मी भार वाहिका ॥ ४ ॥

२९८१. झड मारोनियां बैसलों पंगती । उठवितां फजिती दातयाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तें उचित तुह्मां कां न कळे । कां हो झांका डोळे पांडुरंगा ॥ छ ॥ घेईन इच्छेचें मागोनि सकळ । नाहीं नव्हे काळ बोळायाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों माना अधिकारी । नांहीं[10] लोक परी लाज देवा ॥ ३ ॥

२९८२. नाम न वदे ज्याची वाचा । तो लेंक दो बापांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे चि ओळख तयाची । खूण जाणा अभक्ताची ॥ छ ॥ ज्यासी विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥ २[11] ॥ नाम न ह्मणे ज्याचें तोंड । तें चि चर्मकाचें कुंड ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥ ४ ॥

---

१ पं. आयुष्याचा.–२ त. होइल.–३ पं. त्याच्या.–४ पं. पडे.–५ दे. "कोंडिलागे रोधुनि" असें मागून केलें आहे–६ पं. "द्वार" नाहीं.–७ त. तो.–८ पं. पळा वेगीं–९ दे. बिरडें–१० पं. योग्य नाहीं परी लोक लाज ।.–११ पं. "ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातीचा तो मांग ॥" हें कडवें जास्त आहे.

२९८३. पतित मी पापी शरण आलों तुज । राखें माझी लाज पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तारियेले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥ छ्रु ॥ द्रौपदी बाहिणी वैरीं[1] गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा ॥ २ ॥ प्रल्हादा[2]कारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा ॥ ३ ॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें[3] पीडिला । आपणाऐसा केला पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुज शरण निज[4]भावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा ॥ ५ ॥

२९८४. कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजी असे सार मोल तया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक ही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तयां ॥ छ्रु ॥ काय रूपें असे परीसें[5] चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥ २ ॥ फिरंगी आटितां नये बारा रुके । गुणें मोलें[6] विकें सहस्रवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तो चि धन्य ॥ ४ ॥

२९८५. नव्हें मी स्वतंत्र अंगाचा पाईक । जे हे सकळिक सत्ता वारूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां आळवावें पाउला पाउलीं । कृपेची साउली करीं मज ॥ छ्रु ॥ शक्तिहीन तरी जालों शरणागत । आपुला वृत्तांत जाणोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे भवाभेणें धरिलें पाय । आणीक उपाय नेणें[7] कांहीं ॥ ३ ॥

२९८६. पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं । नाहीं ऐसी मति अर्थ कळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होईल तें हो या विठोबाच्या नांवें । [8]आचरलें भावें जीवीं धरूं ॥ छ्रु ॥ एखादा अंगासी येईल प्रकार । विचारितां फार युक्ति वाढे ॥ २ ॥ तुका ह्मणे आळी करितां गोमटी । मायबापा पोटीं येते दया ॥ ३ ॥

२९८७. पाहातां रूप डोळां भरे । अंतर तुरे वेगळें । ईच्छावशें[9] खेळ मांडी । अवघें सांडी बाहेरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा[10] नंदानंदन बाइये । यासी काय परिचार वो[11] ॥ छ्रु ॥ दिसतो हा नव्हे तैसा । असे दिशाव्यापक । लाघव हा खोळेसाटीं[12] । हातां भेटी परतेना ॥ २ ॥ ह्मणोनि उभी ठेलीये[13] । परतलीये या वांटा[14] । आड करोनियां तुका । जो या लोकां दाखवितो ॥ ३ ॥

## कान्होबा देवाशीं भांडले ते अभंग ॥ ३७ ॥

२९८८. दुःखें दुभागलें हृदयसंपुष्ट । गहिंवरें कंठ दाटताहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनियां वनामाजी ॥ छ्रु ॥ आक्रंदती

---

१ पं. वैरियें गांजिली.–२ पं. प्रऱ्हादा०.–३ दे. त. दारिद्रें.–४ पं. जीवें भावें.–५ त. पारीस चांगला.–६ पं. मोल.–७ पं. नेणों –८ पं. अर्जिलें तें भावें० –९ त. पं. ०वसे. ०"वशें" याबद्दल.– १० पं. "हा" नाहीं.–११ पं. "वो" नाहीं.–१२ पं. खेळे साटीं.–१३ पं. टाकलीये.–१४ त. वाटीं

घाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी [1]फुटों पाहे ॥ २ ॥ काय हें सामर्थ्य न्व्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां ॥ ३ ॥ तुज ठावें आह्मां कोणी नाहीं सखा। उभयलोकीं तुका तुजविण ॥ ४ ॥ कान्हा ह्मणे तुझ्या वियोगें पोरटीं । जालों दे रे भेटी बंधुराया ॥ ५ ॥

२९८९. सख्यत्वासी गेलों करीत सलगी । नेणें चि अभागी महिमा तुझा ॥१॥ ॥ ध्रु. ॥ पावलों आपुलें केलेंलाहेंरास । निदैंवां परिस काय होय ॥ छ ॥ कष्टविलासी म्यां चांडाळें संसारीं । अद्यापिवरि तरि [2]उपदेशीं ॥ २ ॥ उचित अनुचित सांभाळिलें नाहीं । [3]कान्हा ह्मणे कांहीं बोलों आतां ॥ ३ ॥

२९९०. असो आतां कांहीं करोनियां ग्लांती । कोणा काकुलती येइल येथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूं कांहीं दिस राहे तों सायास । [4]झोंवों त्या लागास भावाचिये ॥ छ ॥ [5]कारितां रोदना वापुडें ह्मणती । परि नये अंतीं कामा कोणी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे पडिलिया वनीं । विचार तो मनीं बोलिला हे ॥ ३ ॥

२९९१. चरफडें चरफड शोकें शोक होये । कार्यमूळ आहे धीरापाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कल्पतसे मज ऐसें हें पाहातां । करावी ते चिंता मिथ्या खोटी ॥ छ ॥ न चुके होणार सांडिल्या शूरत्वा । फुकट चि सत्त्वा होइल हानी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे दिल्या बंद मना । वांचूनि निधाना न पवीजे ॥ ३ ॥

२९९२. न लगे चिंता आतां [6]अनुमोदन हाता । आलें मूळ भ्राता [7]गेला त्याचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घरभेद्या येथें आहे [8]तें सुकानु । धरितों [9]कवळून पाय दोन्हीं ॥ छ ॥ त्याचें त्याचिया मुखें पडिलें ठावें । न लगे सारावें मागें पुढें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे करील भेटी भावा । [10]सोडीन तेधवां या विठ्ठला ॥ ३ ॥

२९९३. [11]मूळस्थळ ज्याचें गोमतीचे तीरीं । तो हा सारी दोरी खेळवितो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें हें कळलें असावें सकळां । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ॥ छ ॥ [12]वैष्णव हे हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगितली ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे आलें अनुभवास । तेणें च आह्मांस नागविलें ॥ ३ ॥

---

१ पं. कांपों. दे. मागून "फुटों" याचें "कांपों" केलें आहे –२ पं. उदेश ही ।. दे. उदेशही असेंच असतां मागून "उपदेशी"। असें केलें आहे. आणि त. ही उदेशही असतां "उपदेशाही" असें केलें आहे.–३ पं. तुका –४ पं. झोंवें.–५ पं. करिती रुदना बापुडीं०.–६ दे. अन्मोन. त. आन्मोहन. पं. आन्मोदन.–७ पं. गेले –८ पं. तो.–९ त. पं. कवळुनु.–१० पं. सोडीं.–११ पं. मुळस्थान.–१२ दे. त. वैष्णव हे रे तयाचे.

२९९४. बरा रे निर्गुणा नष्ट नारायणा । घरबुडवणा भेटलासी ॥ १ ॥ एके घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी अपरांपरी केली आह्मां ॥ २ ॥ कान्हा ह्मणे कां रे नि॰काम देखिलें । ह्मणोनि मना आलें करितोसी ॥ ३ ॥

२९९५. धर्दिधर्दि तुझ्या करीन धर्दिड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरि नास आरंभिला ॥ ध्रु ॥ मरावें मारावें या आलें प्रसंगा । बैरें पांडुरंगा कळलेंसावें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे तुझी माझी उरी । उडाली न धरीं भीड कांहीं ॥ ३ ॥

२९९६. भुक्ति मुक्ति तुझें जळों ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणोनी भावा वेगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रिद्धी[4] सिद्धी मोक्ष ठेवीं गुंडाळून । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥ ध्रु ॥ नको आपुलिया नेऊं वैकुंठासी । दे माझ्या भावासी आणुन वेगीं ॥ २ ॥ नको होऊं कांहीं होसील प्रसन्न । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे पाहा हो नाहींतरी । हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥ ४ ॥

२९९७. मुख्य आहे आह्मां मातेचा पटंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको लावूं आह्मां सवें तूं तोंवरी । पाहा दूरवरी विचारुनी ॥ ध्रु ॥ साहे संतजन केले महाराज । न घडे आतां तुज भेईन मी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे अद्वयें ऐक्यता । बाढतें अनंता दुःखें दुःख ॥ ३ ॥

२९९८. नये सोमसरी उपचाराची हरी । करकरेचें करीं काळें तोंड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागतों इतुकें जोडुनियां कर । ठेउनियां शीर पायांवरी ॥ ध्रु ॥ तुह्मां आह्मां एके ठायीं सहवास । येथें द्वैत द्वेष काय वैरा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे वहुतां बहुतां रीती । अनंता विनंती परिसावी हे ॥ ३ ॥

२९९९. लालुचाईसाठीं वळकाविसी भावा । परी मी जाण देवा जिरों नेदीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असों द्या निश्चय हा मनीं मानसीं । घातली येविशीं दृढ कास ॥ ध्रु ॥ मज आहे बळ आळींचें सबळ । फोडीन अंत्राळ हृदय तुझें ॥ २ ॥ करुणारसें तुकयाबंधु ह्मणे भुलवीन । काढूनि घेईन निज वस्तु ॥ ३ ॥

३०००. तुझीं वर्मे आह्मां ठावीं नारायणा । परी तूं शाहाणा होत नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग कालावुली हांका देते वेळे । होतोसि परी डोळे नुघडिसी ॥ ध्रु ॥

---

१ दे. पं. नि.काम.–२ पं. काय पांडुरंगा पाहातोसी.–३ पं. तुझी.–४ पं. "रिद्धिसिद्धि" व "नको आपुलिया" या वडन्यांच्या जागा परस्पराशीं बदलल्या आहेत.–५ त. आह्निक्यें आह्निक्येता. दे. अह्निक्यें ऐक्यता. पं. ऐक्य एक्यता.–६ पं. वाढे त्या.–७ पं. खरा –८ पं. हाक.

जाणोनि अज्ञान करावें मोहरें । खोटी खोडी हे रे तुझी देवा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे कारण भचीति । पाहातों वेळ किती तेच गुण ॥ ३ ॥

३००१. अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळी धेरिलीं एकें दुरी ॥ ध्रु ॥ एकां सुख द्यावें घेऊनि वोसंगा । एँक दारीं गळा श्रमविती ॥ २ ॥ एकां नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अँन्न करितील ॥ ३ ॥ एकें वाटतील न वजावीं दुरी । एकांचा मत्सर जवळी येतां ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे नावडतीं त्यांस । कासया व्यालास नारायणा ॥ ५ ॥

३००२. निनांवें हें तुला । नांव साजे रे विठ्ठला । वरा शिरविला । फाटक्यामध्यें पाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं तरी विचारिलें । पाप पुण्य ऐसें केलें । भुरळें घातलें । एकाएकीं भावासी ॥ ध्रु ॥ मुद्राधारणें माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे । हातीं फांशाचे गुंडाळे । कोण चाळे गृहस्था हे ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भिस्किन । करितोसी देखोन । पाहा दुरिवरी विच्छिन्न । केला परी संसार ॥ ३ ॥

३००३. नाहीं घटिका ह्मणसी । लाग लागला तुजपाशीं । पाडिला हृषीकेशी । जाव सकळ करणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें नेलें पांघरुण । ठावें असोन दुर्बळ दीन । माणसांमधून । उठविलें खाणोऱ्या ॥ ध्रु ॥ आह्मीं हें जगऊनि होतों पाणी । संदीं देवदेव करूनि । जालासी कोठोनि । पैदा चोरा देहोंच्या ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे केलें । उघडें मजचि उमगिलें । ऐसें[9] काय गेलें । होतें तुज न पुरतें ॥ ३ ॥

३००४. करुणाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । ह्मणवितोसी परि केवळ । गळेकाटू दिसतोसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय केलें होतें आह्मीं । सांग तुझें[10] एकये जन्मीं । जालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया ॥ ध्रु ॥ भलेपणाचा पवाडा । वरा दाविला रोकडा । करूनि बंधु वेडा । जोडा माझा विखंडिलें[11] ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भला । कैसें ह्मणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहींतरी ॥ ३ ॥

३००५. आतां कळों आले गुण । अवघे चि यावरोन । चोखट लक्षण । धरिलें हें[12] घरघेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या नांवें कृपासिंधु । ह्मणवितोसी दीनबंधु । मज तरी मैंदु । दिसतोसी पाहातां ॥ ध्रु ॥ अमळ दया नाहीं पोटीं । कठीण तैसाचि

---

१ पं. धरियेलीं.–२ पं. एकें.–३ दे. अन्नें.–४ पं. पाडुरगा.–५ दे. त. निनावा.–६ दे. त. मुद्रा धारणें.–७ पं. देवाच्या.–८ पं. उघड.–९ पं. ऐसे कांहीं एक केलें.–१० पं. तुझें ये जन्मीं.–११ त. विघडिला.–१२ पं. “हें” नाहीं.

कपटी । अंधळ्याची काठी । माझी शुदरसी च ना ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे पुरता । नाहीं ह्मूण बरें अनंता । एरवीं असतां । तुझा पोंट भारियेला ॥ ३ ॥

३००६. काय सांगों हृषीकेशा । आहे अनुताप आला ऐसा । गिळावेंसी निमिषा । निमिष लागों नेदावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लाविलीं काहार । तारातीर करोनि ॥ ध्रु ॥ जीव घ्यावा किंवा द्यावा । तुझा आपुला केशवा । इतुकें उरलें आहे । भावाचिया निमित्यें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे जग । बरें वाईट ह्मणो मग । या कारणें परी लाग । न संडावा सर्वथा ॥ ३ ॥

३००७. मायबाप निमाल्यांवरी । घातलें भावाचे आभारीं । तो ही परि हरी । तुज जाला असमाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे कां भक्तिचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता व्यवहार । सेवटीं हे जालासी ॥ ध्रु ॥ एका जिवावरी । होतों दोनी कुटुंबारी । चाळवूं तो तैंरीं । तुज येतो निर्लज्जा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भला । आणीक काय ह्मणावें तुला । वेडा त्यानें केला । तुजसवें संबंधु ॥ ३ ॥

३००८. पूर्वी पूर्वजांची गती । हे चि आईकिली होती । सेवे लावूनि श्रीपती । निश्चिंती केली तयांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे पाठी लागलासी । ऐसा सांग हृषीकेशी । अद्यापवरी न राहासी । अंत पाहासी किती ह्मूण ॥ ध्रु ॥ जन्मजन्मांतरीं दावा । आह्मां आपणां केशवा । निमित्यें चालवा । काईसयास्तव हें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे अदेखणां । किती होसी नारायणा । देखों सकवेना । खातयासी न खात्या ॥ ३ ॥

३००९. निसुर संसार करून । होतों पोट भरून । केली विवसी निर्माण । देवपण दाखविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा काढियेला निस । काय ह्मूण सहित वंश । आणिलें शेवटास । हाउस तरी न पुरे ॥ ध्रु ॥ उरलों पालव्या सेवटीं । तें ही न देखवे दृष्टी । दोघांमध्यें तुटी । रोकडीचि पाडीली ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे गोड । बहु जालें अति वाड । ह्मणोनी कां बुड । मुळ्यांसहित खावें ॥ ३ ॥

३०१०. वरा जाणतोसी धर्मनीती । उचित अनुचित श्रीपती । करूं येते राती । ऐसी डोळे झांकूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जात्र काय कैसा । देसी तो दे

---

१ पं. एव्हवीं तरी असता.–२ दे. कीं.–३ पं. मीनल्यावरी.–४ दे. त.० वेव्हार.–५ पं. होते दोही कटुं०.–६ पं. उरी.–७ पं. त्याणीं.–८ त. अद्याप तरी.–९ पं. निमित्य चालवावा.–१० पं. न देखणा.

जगदीशा । आणिला वोळसा । आपणां भोंवता ॥ ध्रु ॥ सेवेचियी[1] सुखास्तव
वळें धारिलें अज्ञानत्व । येइल परि हा भाव । ज्याचा त्यासी कारणा ॥ २
तुकयाबंधु ह्मणे नाहीं । आतां आह्मां बोल कांहीं । जडोनियां पायीं । तुझे त
चि घेतलें ॥ ३ ॥

३०११. कांहीं विपत्ति अपत्यां । आतां अमुचिया होतां । काय होईल
अनंता । पाहा वोलों कासया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरें अनायासें जालें । सायासेंवि
बोले चाले[2] । काबाड चुकलें । केलें कष्टावेगळें ॥ ध्रु ॥ बरा सांपडलासी वोजा
वर्मावरी केशीराजा । बोलायासी तुझा । उजुरचि नाहींसा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे
दगा । बरा दिला होता बागा । झडकरी चैलागा । चांग दैवें पावलों ॥ ३ ॥

३०१२. देवा तुजपें माझ्या पूर्वजांचें ऋण । आहे तें कां नेदिसी अझून
अवगलासी झोंडपणें । परी मी जाण जीवें जिरों[3] नेदीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळ
येईल रोकडें । उभा करिन संतांपुढें । तुझें काय एवढें । भय आपुलें मागतां ॥ ध्रु ॥
आजिवरी होतों[4] नेणता । तों तुज फावलें रे अनंता । कवडीचा तो आतां । पड
नेदीन फेर ॥ २ ॥ ठेविला ये जीवनीं जीव । ह्मणे तुकयाचा बंधव । माझा गळ
तुझा पाव । एके ठायीं बांधेन ॥ ३ ॥

३०१३. मागें असताशी कळला । उमस घेऊं नसता दिला । तेणें चि काळें
केला । असता अवघा निवाडों[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इतका न लगता उशीर । न
धरितों भीडभार । सिद्धासीं व्यवहार[6] । कासयासी लागला ॥ ध्रु ॥ असोनियां
माल खरा । किती केल्यां[7] येरझारा । धरणें ही[8] दिवस तेरा । माझ्या भावें
घेतलें ॥ २ ॥ अझुन तरी इतक्यावरी । चुकवीं जनाचार हरी । तुकयाबंधु ह्मणे
उरी । नाहीं तरी नुरे कांहीं ॥ ३ ॥

३०१४. आतां न राहें क्षण एक । तुझा कळला रे लौकिक । नेदीं हालों एक ।
कांहीं केल्यावांचूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संबंध पडिला कोणाशीं । काय डोळे
झांकितोसी । नेईन पांचांपाशीं । दे नाहींतरी वोढूनि ॥ ध्रु ॥ सुखें नेदीस जाणवलें ।
नास केल्याविण उगलें । तरि तें ही विचारिलें । आह्मी आहे तुज आधीं ॥ २ ॥
असें च करूनि किती । नागविलीं नाहीं नीती । तुकयाबंधु ह्मणे अंतीं । न सोडिसी[9]
ते खोडी ॥ ३ ॥

१ पं. सवेन्चिया.–२ पं. चल्गा.–३ पं. "जिरों नेदीं" याच्याबद्दल "न सोडीं ।".–४ पं.
होता.–५ पं. निवाड.–६ दे. त. वेव्हार.–७ पं. जाल्या.–८ पं. "ही" नाहीं.–९ पं. सोडीं.

३०१५. तुज ते सवे आहे ठावें । घ्यावें त्याचें बुडवावें । परि तें आह्मांसवें । आतां न फावे कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हों सोडायाचे धणी । कष्टें मेळविलें करोनि । पाहा विचारोनी । आधीं धरोनि काम नाहीं ॥ छ्रु ॥ अवघे राहिले प्रकार । जालों जीवासी उदार । असा हा निर्धार । कळला असावा असेल ॥ २ ॥ आतां निद्सुर नसावें । गाठ पडली कुणब्यासवें । तुकयाबंधु ह्मणे राखावें । देवा महत्व आपुलें ॥ ३ ॥

३०१६. बहु बोलणें नये कामा । वाउगें तें पुरुषोत्तमा । एकाचि वचनें आह्मां । काय सांगणें तें सांगे[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देणें आहे कीं भांडाई[2] । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा ॥ छ्रु ॥ मागें गेलें जें होउनी । असो तें धरित नाहीं मनीं । आतां पुढें येथूनि । कैसा काय विचार ॥ २ ॥ सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळतें सकळ । तुकयाबंधु ह्मणे खळखळ । करावी ते उरेलें[3] ॥ ३ ॥

३०१७. आतां हें न सुटे न चुके । बोल कां दवडिसी फिके । जन लोक पारिखें । अवघें केलें म्यां यासाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये सरतां नव्हे भलें । तुझें लक्षण कळलें । बैसलासी काढिलें । देहाचें मुळीं दिवाळें ॥ छ्रु ॥ दिसतोसी बरा बोल कोंवळे । गुग मैंदाचे चाळे । दिसताती ये वेळे । काय करूं विसंबोनि ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे देखतां । अंध बहिर ऐकतां । कैसें व्हावें आतां । इताकियाउपरी ॥ ३ ॥

३०१८. तिहीं ताळीं हेचि हाक । ह्मणती पांढरा स्फटिक । अवघा बुडविला लौकिक । सुखें चि भीकें[4] लाविलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोंटा नांव शिरोमणी । नाहीं जोडा त्रिभुवनीं । ह्मणोनि शाहाणे ते कोणी । तुझे दारीं बैसतिना ॥ छ्रु ॥ निर्गुण निलाजिरा निनांवा । लंड झोंड कुडा देवा । नागवणा या नांवा[5] । वांचूनि दुजा नाइकों ॥ २ ॥ सर्वगुणें संपन्न । कळों आलासी संपूर्ण । तुकयाबंधु ह्मणे चरण । आतां जीवें न सोडीं ॥ ३ ॥

३०१९. तो चि प्रसंग आला सहज । गुज धरितां नव्हे काज । न संडितां लाज । पुढें वोज न दिसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं तर न होसी शाहाणा । नये सांगतों तें ही मना । आपण आपणा । आतां प्रयत्न देखावा ॥ छ्रु ॥ न पुरवी पाहातां वाट । घावें प्रमाण[6] चोखट । कास घालूनियां नीट । चौघाचार करावा ॥ २ ॥ आतां श्रमाचें कारण । नव्हे व्हावें उदासीन । न पडे तयाविण । गांठी तुकयाबंधु ह्मणे ॥ ३ ॥

---

१ पं. सांगा –२ पं. भंडाई.–३ पं. उरे.–४ पं. भीक लागली.–५ दे. "नागविमी स्पनावा" असा या चरणावर नवीन पाठ घातला आहे.–६ पं. प्रमाणाचे खट.

३०२०. हळूहळू जाड । होत चालिलें लिगाड । जाणवेल निवाडें । न करिसी परी पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मी तों सांगून उतराई । जालों आतां तुज काई । कळों येईल भाई । तैसा करीं विचार ॥ छ ॥ मागें युगें अठ्ठाविस । जालीं दिवसाचा दिवस । मुद्दल व्याज कासावीस । होसी देवा ये कामें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे राखें । आतां टाकीं तुझीं तीं सुखें । जगजाहिर ठाउकें । जालें नाहीं खंडलेंसें ॥ ३ ॥

३०२१. पत्र उचटिलें भेतेनें । ग्वाही कैराया कारणें । नाहींतरी पुण्यें । तुझ्या काय उणें आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नांव तुझें चि करोनि । आह्मों सुखें पोट भरोनि । केली जाणवणी । ह्मणउनि नाहीं ह्मणसील ॥ छ ॥ आतां इतकियाउपरी । दे नको भलतें करीं । ह्मणती ऋणकरी । आमुचा इतकें उदंड ॥ २ ॥ तुकयाबंधु जागा । अळवावया पांडुरंगा । केला कांहीं मागायाची नव्हती गरज ॥ ३ ॥

३०२२. माझ्या भावें केली जोडी । न सरेसी कल्पकोडी । आणियेलें धाडी । घालुनि अवघें वैकुंठ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां न लगे यावें जावें । कोठें कांहीं च करावें । जन्मोजन्मीं खावें । सुखें बैसोनसें जालें ॥ छ ॥ असंख्य संख्या नाहीं पार । आनंदें दाटलें अंबर । न माये अपार । त्रिभुवनीं सांटवितां ॥ २ ॥ अवघें भरलें सदोदित । जाले सुखाचे पर्वत । तुकयाबंधु ह्मणे परमार्थ । धन अद्भुत सांपडलें ॥ ३ ॥

३०२३. आतां चुकलें देशावर । करणें अकरणें सर्वत्र । घरासी आगर । आला सकळसिद्धींचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालों निधाई निधानें । लागलें अनंतगुणरत्न । जन्माचें विच्छिन्न । दुःख जालें दारिद्र ॥ छ ॥ तारूं सागरींचें अवचितें । हेंदोवलें आलें येथें । ओढिलें संचितें । पूर्वदत्तें लाधलें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे सीमा । नाहीं आमुचिया दैवा । आतां पुरुषोत्तमा । ऐसा सवदागर सांपडला ॥ ३ ॥

३०२४. सांपडलें जुनें । आमुच्या वडिलांचें ठेवणें । केली नारायणें । कृपा पुण्यें पूर्वींचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें आँनंदरूप आतां । आह्मी आह्मों याकरितां । निवारली चिंता । देणें घेणें चुकलें ॥ छ ॥ जालें भांडवल घरिंचें । अक्षुप नाम विठ्ठलाचें । सुकृत भावाचें । हें तयानें दाविलें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे फिटला । पांग नाहीं बोलायाला । चाड दुसरी विठ्ठला । वांचूनियां आणीक ॥ ३ ॥
॥ ३७ ॥

---

१ पं. निवाडें.—२ पं. आलों —३ पं. करावया.—४ पं. सिद्धांचा.—५ पं. दरिद्र —६ पं. लागलें — ७ पं. आनंदरूपें.—८ पं. दाखविलें.

३०२५. काम क्रोध अहंकार नको देहीं । आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं । वास पंढरीचा जन्म सदा देईं । आणीक दुजें मागणें तुज नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कृपा[1] देईं दान हरि मज कृपा देईं दान । नासीं त्रिमिर दाखवीं चरण । आर्त पुरवावें भेटी देऊन । नको उपेक्षूं आलिया शरण ॥ ध्रु ॥ नाम अखंड हृदयीं राहो वाणी । न पडो विसर क्षण ज्यागृति स्वप्नीं । संतसमागम ऐसा दे लावुनि । आणीक दुजें कांहीं नेणें तुजवांचूनि ॥ २ ॥ पंथपुरिंचा रविसुत पुरे आतां । आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता । नाहीं आडताळा त्रैलोक्यामाजी सरता । विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवूनि माथा ॥ ३ ॥

३०२६. तटाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लाहान नेणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पैरी[2] त्या विशेष मनुष्य होऊनि । करी खंड मान वडिलांचा ॥ ध्रु ॥ बेरसा गाढव माया नाँ[3] बहीण । भुंके चवींविण भेंलतें[4] चि ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे बोकड मातलें । न विचौरी[5] आपुले तोंडीं मुते ॥ ३ ॥

३०२७. मायझवा खर गाढवाचें बीज । तें[6] ऐसें सहज कळों येतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन । ते चि त्याची खुण ओळखावी ॥ ध्रु ॥ मैद्यपी[7] तो पुरा अधम यातीचा । तया उपदेशाचा राग वांयां ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे पिसाळलें सुनें । आप पर तेणें न विचारावें ॥ ३ ॥

३०२८. मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथिवीचा[8] भार वाहावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय धाक आह्मां कासयाची चिंता । ऐसा तो असतां साहाकारी ॥ ध्रु ॥ शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तांसाटीं ॥ २ ॥ पांडवां जोहरी राखिलें कुसरी । तो हा बंधुचा कैवारी तुकयाच्या ॥ ३ ॥

३०२९. राम ह्मणतां कामक्रोधांचें दहन । होय अभिमान देशधडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम ह्मणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम सीण स्वप्नास[9] ही ॥ ध्रु ॥ राम ह्मणतां[10] जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्रास पात्र कधीं ॥ २ ॥ राम ह्मणतां यम शरणागत बापुडें । आढळ पद पुढें काय तेथें ॥ ३ ॥ राम ह्मणतां धर्म घडती[11] सकळ । तिमिरपडळें[12] नासे हेळा ॥ ४ ॥ राम ह्मणतां ह्मणे तुकयाचा बंधु । तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ॥ ५ ॥

---

१ पं. "कृपा देईं दान" हे पहिले शब्द नसून "ये हरि मज कृपा देईं दान नाशीं त्रिमिर०" असें आहे.–२ दे. त. परी तो त्या विशेष मानुप होऊन.–३ पं. नाहीं.–४ पं. भलेचि–५ पं. विचारितां.–६ पं. तें हें रासें (ऐसें?).–७ दे. त. मद्यपीर पुरा.–८ पं. पृथ्वीचा.–९ पं. स्वप्नामाजी.–१० दे. ह्मणे.–११ दे. घडतील.–१२ दे. त. पं. त्रिमिर०.

३०३०. मरोनि जाईन गुणनामावरूनि । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चुकविलीं दुःखें मायेचा वोळसा । तोडोनियां आशापाश तेणें ॥ छ्र ॥ केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंतातळमळ नाहीं ऐसी ॥ २ ॥ काळें तोंड काळ करूनि राहिलें । भूतमात्र जालें सज्जनसखें ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे अवघ्या [1]देशादिशा । मुक्त रे[2] परेशा तुझ्या पुण्यें ॥ ४ ॥

३०३१. आतां मागतों तें ऐक नारायणा । भावपूर्वक मनापासूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असों दे मोकळी जिव्हा जरि गाइल गुण । नाहीं तरी खिळुन टाकीं परती ॥ छ्र ॥ मातेचिया परी देखती परनारी । ठेवीं नेत्र तरी नाहीं तरि[3] नको ॥ २ ॥ तरी बरें कांटाळा करिती निंदास्तुतीचा । नाहीं तरि कानांचा ही देख प्रेत्न ॥ ३ ॥ [4]सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक । [5]रोखावीं पृथक तोडोनि[6] भ्रम ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे ते चि वाट प्राणां । पडतां नारायणा विसर तुझा ॥ ५ ॥

३०३२. नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परउपकारीं वेचियेल्या शक्ती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ छ्र ॥ [7]द्वैताद्वैतभाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ २ ॥ जयाचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ ३ ॥ उचित अनुचित जाणे धर्मनीती । दृढ भाव भक्ति मानव तो ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे वरकड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥ ५ ॥

३०३३. चवदा भुवनें लोक तिन्हीं दाढे जो कवळी । संपुष्ट तो[8] संवळीमध्यें देखा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उत्पत्तिसंहारकरिता जो पाळण । तो नंदा[9] नंदन ह्मणवीतसे ॥छ्र ॥ असुर [10]तोडरी दैत्यांचा काळ । जाला द्वारपाळ बळीचा तो ॥ २ ॥ लक्ष्मीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्टकवळें[11] पसरी मुख ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे चतुरांचा रावो । भावें तो पाहा [12]हो केला वेडा ॥ ४ ॥

३०३४. कोण या पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं । जाहाज पृथ्वीपति । केली ख्याती अद्भुत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भला रे पुंडलिका भला । महिमा नव जाये वर्णिला । दगा देउनि अवघियांला । सांटविलें अविनाश ॥ छ्र ॥ केलें एके घरीं केणें[13] । भरलीं सदोदित दुकानें । दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची

---

१ दे. देशदिशा. त. अवघा देशदिशा.–२ पं. "रे" नाहीं–३ पं. "तरि" नाहीं.–४ पं. सकळा.–५ दे. राखवीं.–६ पं. तोडोनियां।–७ दे. त. द्वयें द्वैतभाव.–८ त. "तो" नाहीं.–९ पं. नंदाचा.–१० त. पं. तोरडी.–११ पं. उच्छिष्ट कळवळा.–१२ त. मो.–१३ दे. "केलें" दोनवेळ आहे.

पंढरी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे किल्लया । संताचे हातीं दिल्या । आंगावेगळें आपुल्या । टाकुनि जाला महिमान[1] ॥ ३ ॥

३०३५. पाहा हो कलिचें महिमान । असत्यासी रिझलें जन । पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मूळ[2] । प्रळयकाळ आरंभला ॥ छ ॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडूनियां द्विजवर । दावऱ्पीर स्मरताती ॥ २ ॥ ऐसे यथार्थाचे अनर्थ । जाला बुडाला परमार्थ । नाहीं जाली ऐसी नीत । हा हा भूत पातलें ॥ ३ ॥ शांति क्षमा दया । भावभक्ति सत्क्रिया । ठाव नाहीं सांगावया । सत्त्वधैर्य[3] भंगिलें ॥ ४ ॥ राहिले वर्णाश्रमधर्म[4] । अन्योन्य विचरती कर्म । ह्मणवितां रामराम । श्रम[5] महा मानिती ॥ ५ ॥ थेर भोरपाचे[6] विशीं । धांवती भूतें आमिषां[7] तैसीं । कथा पुराण ह्मणतां सिसी । तिडीक उठी नरक्याचे[8] ॥ ६ ॥ विषयलोभासाटीं । सवार्थेसीं[9] प्राण साटी । परमार्थी पीठ मुठी[10] । मागतां उठती सुनींसीं ॥ ७ ॥ धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मनिती[11] आवश्यक । अपमानिले वेदपाठक । सात्त्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥ ८ ॥ पुत्र ते[12] पितियापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा जाल्या आंदण्या ॥ ९ ॥ खोटें जालें आली विवसी । केली मर्यादा नाहींसी । भार्या[13] भ्रतारेंसी । रंक तैसीं मानिती ॥ १० ॥ नमस्कारावया हरिदासां । लाजती[14] धरिती कांहीं गर्वसा । पोटासाटीं खौसा । वंदिती मलिंछाच्यीं[15] ॥ ११ ॥ बहुत पाप जालें उचंबळ । उत्तम न ह्मणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी[16] कोणाचा ॥ १२ ॥ कैसें जालें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण । अविंद्वाणी वदताती ॥ १३ ॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दैसीचीं[17] चुंबिती । सोवळ्याच्या स्फीती[18] । जगीं मिरविती पवित्रतो[19] ॥ १४ ॥ मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुंसे[20] कोणी । केळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥ १५ ॥ केवढी दोषाची सबळता । जाली पाहा हो भगवंता । पुण्य धुडावोनी संता । तीर्थां हरी आणिली ॥ १६ ॥ भेणें मंद जाल्या[21] मेघवृष्टि । आकांतली कांपे सृष्टि । देव रिगाले कपाटीं । आटाआटी प्रवर्तली ॥ १७ ॥ अपीक धान्यें दिवसें दिवसें । गाई ह्मैसी चेवल्या

१ दे. त. पं. मेहेमान.–२ त. वाटोळें.–३ पं. सत्वधैर्या.–४ दे. त. वर्गावर्णधर्म.–५ पं. महाश्रम.–६ पं. भोरप्याचे.–७ दे. त. पं. आविसा –८ पं. नरक्याचे.–९ पं. परमार्थेसी –१० पं. उठी.–११ पं. मानिती.–१२ पं. "ते" नाहीं.–१३ दे. त. भ्रतारें तीं भार्यांसी । रंक तैसें.–१४ पं. लाज धरिती॰.–१५ पं. मिलिंदाच्या –१६ पं. धरिती.–१७ पं. दासीचीं प्रीती चुंबिती.–१८ पं. स्थिती.–१९ पं. पवित्र.–२० त. पुसती –२१ पं. जाली.

गोरसें । नगरें दिसती उध्वंसें[1] । पिकलीं बहुवसें[2] पाखांडें ॥ १८ ॥ होम हरपलीं हवनें । यज्ञयाग अनुष्ठानें । जपतपादिसाधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥ १९ ॥ अठरा यातींचे[3] व्यापार । करिती[4] तस्कराई विप्र । सांडोनियां शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघरती ॥ २० ॥ गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्रीं । अश्वाचियापरी । कुमारी विकिती वेदवक्ते ॥ २१ ॥ वेदाध्ययनसंहिताराचि । भंकाद्या करिती तयांची । आवडी पंडितांची । मुसाफावरी बैसली ॥ २२ ॥ मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं उच्छेदुनि केलीं दीनें । कुडीं[5] कापट्यें[6] महा मोहनें । मिरविताती दुर्जन ॥ २३ ॥ कळाकुशळता चतुराई । तर्कवादी भेद निंदेठायीं । विधिनिषेधाचा वाही । एक ही ऐसीं नाडलीं ॥ २४ ॥ जें[7] संन्यासी तापसी ब्रह्मचारी । होतां वैरागी दिगांबर निस्पृही वैराग्यकारी[8] । कामक्रोधें[9] व्यापिले भारी । ईच्छाकरीं[10] न सुटती ॥ २५ ॥ कैसें विनाशकाळाचें कौतुक । राजे जाले प्रजांचे अंतक । पिते पुत्र सहोदर । एकाएक[11] शत्रुघातें वर्त्तती ॥ २६ ॥ केवढी ये[12] रांडेची अंगवण । भ्रमविलें अवघे जन । याती अठरा चाऱ्ही वर्ण । कर्दम करूनि विटाळले[13] ॥ २७ ॥ पूर्वीं होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ जालें । ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥ २८ ॥ आतां असो हें आघवें । गति नव्हे कळीमध्यें वागवरावें[14] । देवासी भाकोनि करुणावें[15] । वेगें स्मरावें अंतरीं ॥ २९ ॥ अगा ये वैकुंठनायका । काय पाहातोसि या कौतुका । धांव कलीनें गांजिलें लोकां । देतो हाका सेवक तुकयाचा ॥ ३० ॥

३०३६. केली हार्णाळां अंघोळी । येऊनि बैसलों राउळीं ॥ १ ॥ आजिचें जालें भोजन । राम कृष्ण नारायण ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे नास । नाहीं कल्पांतीं जयास ॥ ३ ॥

॥ १२ ॥

३०३७. तुजलागीं माझा जीव जाला पिसा । अवलोकितों[16] दिशा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडिला व्यवहार[17] माया लोकाचार । छंद निरंतर हा चि मनीं ॥ ६९ ॥ आइकिलें कानीं तें रूप लोचनें[18] । देखावया सीण करिताति ॥ २ ॥ प्राण हा विकळ होय कासावीस । जीवनाविण मत्स्य तयापरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां कोण तो उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥ ४ ॥

---

१ पं. उद्वस.—२ पं. बहुवस.—३ पं. यातीचा.—४ पं. करितात.—५ पं. काया.—६ दे. कापटें.—७ पं. "जे" नाहीं—८ पं. "वैराग्यकारी" नाहीं.—९ पं. कामक्रोध.—१० पं. इच्छेकरीं—११ दे. एकएक (असें मागून केलें आहे).—१२ पं. "ये" नाहीं.—१३ पं. टाकिली.—१४ पं. "वागवरावें" नाहीं.—१५ पं. करुणा भाका वेगें.—१६ पं. अवलोकितां.—१७ दे. त. वेव्हार.—१८ पं. लोचनीं.

३०३८. कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरी ठावा असेल तुह्मां कोणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लागतसें पायां येतों लोटांगणीं । मात तरी कोणी सांगा याची ॥ ध्रु ॥ गुण रूप याचे वाणिती या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥ २ ॥ सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ॥ ३ ॥ तुका ह्मणे गाईवत्सा तैंडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥ ४ ॥

३०३९. एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलिया सांधे काय तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्यासी दाटणी करुनि कायें ॥ ध्रु ॥ कवित्वाचे रूढी पायां पाडी जग । सुखावोनि मग नरका जाय ॥ २ ॥ तुका ह्मणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥ ३ ॥

३०४०. भल्याचें दर्शन । तेथें शुभ चि वचन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलावी हे धर्मनीत । क्षोभें होत नाहीं हित ॥ ध्रु ॥ मर्यादा ते बरी । वेळ जाणावी चतुरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु । लागे ऐसें बरें मऊ ॥ ३ ॥

३०४१. आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेडा जाला वेडा जाला । लांचावला भक्तीसी ॥ ध्रु ॥ निचाड्यी चाड धरी । तुळसी करीं दळ मागे ॥ २ ॥ धरिला मग न करी बळ । तुका ह्मणे कळ पायीं ॥ ३ ॥

३०४२. कंठीं राहो नाम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें द्यावें कांहीं दान । आलों पतित शरण ॥ ध्रु ॥ संतांचिये पायीं । [12]वेळोवेळां ठेवीं डोई ॥ २ ॥ तुका ह्मणे तरें । भवसिंधु ऐका सरें ॥ ३ ॥

३०४३. विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांये टाळ टाळ्याटाळी । होइलें होळी विघ्नांची ॥ ध्रु ॥ विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आईका ॥ ३ ॥

३०४४. पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुंडलिका दिला वर । करुणाकरें विठ्ठलें ॥ ध्रु ॥ मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लावूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें जालें । एका बोलें संतांच्या ॥ ३ ॥

---

१ पं. त्याची–२ पं. वाणिता.–३ पं. ताडातोडी–४ दे. त. साध्य–५ पं. ठेवी.–६ पं. कवित्वाची.–७ पं. पडे.–८ दे. "ते" नाहीं. त. ती.–९ दे. त. पं. दरपण–१० त. शघुन.–११ पं. निचाड हा.–१२ पं. टेवीं वेळावेळां.–१३ पं. एकसरें.–१४ पं. वाहे.–१५ पं. होय–१६ दे. त. आये.–१७ पं. धरावा.–१८ पं. दिधला.–१९ त. गोविंयेलें ।.

३०४५. अमृताचीं फळें अमृताची वेली । ते चि पुढें चाली बीजोंची ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसियांचा संग देई नारायणा । बोलावा वचना जयांचिया ॥ छ ॥ उत्तम सेवन सितळ कंठासी । पुष्टी कांती तैसी दिसे वरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसें होइजेत संगें । वास लागे अंगें चंदनाच्यां[3] ॥ ३ ॥

३०४६. पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तांतडी उतावीळ ॥ छ ॥ मागील परिहार पुढें नोव्हे[4] सीण । जालिया दर्षण एकवेळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ३ ॥

३०४७. न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ छ ॥ न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २ ॥ न भेटे तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥ ३ ॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर ह्मणतां वाचे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आसक्त जीवें सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ५ ॥

३०४८. बहुजन्में केला लाग । तो हा भाग लाधलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीव देऊन हीं बळी । करीन होळी संसारा ॥ छ ॥ गेलें मग नये हाता । पुढती चिंता वांटतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तांतड करूं । पाय धरूं बळकट ॥ ३ ॥

३०४९. भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥ १ ॥ आत्मनिष्ठ जरी जाले जीवन्मुक्त । तरी भक्ति सुख दुर्लभ त्यां ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपा करिल नारायण । तरि च हें वर्म पडे ठावें[10] ॥ ३ ॥

३०५०. दुधाळ गाढवी जरी जाली पाहे । पावेल ते काय धेनुसरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कागाचिया गळा पुष्पाचिया माळा । हंसाची ता[11] कळा काय जाणे ॥ छ ॥ मर्कटें अंघोळी लाविंयेले टिळे । ब्राह्मणाचे लळे[12] वर्तूं नेणे ॥ २ ॥ जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट । तुका ह्मणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ३ ॥

३०५१. देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करोनि[13] ठेवी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा । ह्मणोनि करंटा करोनि ठेवी ॥ छ ॥

---

१ पं. अमृत चि.– २ पं. विजाचिया।.–३ पं. चंदनाचा.–४ पं. नाहीं. दे. नेह.–५ दे. दर्पणें – ६ त. जड जीव० –७ पं. बहुजन्म.–८ पं. पायातळीं.–९ पं. वाढत असे.–१० दे. त. ठायीं.– ११ पं. ते.–१२ पं. लळे.–१३ पं. करीतसे.

स्त्री घ्यावी गुणवंती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज प्रचित आली देखा । आणीक या लोकां काय सांगों ॥ ३ ॥

३०५२. वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें मला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतीं मरसी तें न चुके । मज [4]हीं मारितोसी भुके ॥ ध्रु. ॥ येरू ह्मणे भला भला । निवाडें तुझ्या तोंडें जाला ॥ २ ॥ देह तंवं जाणार । घडेल हा उपकार ॥ ३ ॥ येरू ह्मणे मनीं । ऐसें जावें समजोनि ॥ ४ ॥ गांठी पडली ठका ठका । त्याचा धर्म बोले तुका ॥ ५ ॥

३०५३. जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम ते[९] ठाय रम्य स्थळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त तें ते घडी ॥ ध्रु. ॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभकाळ तें[१०] चि जीणें[११] । भाग्य नारायण उत्तम तें ॥ ३ ॥

३०५४. तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा बाळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ॥ ध्रु. ॥ शंख वधिला सागरीं । वेद घेउनि आला चारी ॥ २ ॥ [१२]कूर्में दैत्य वधिला जेठी । हात पाय लपवी पोटीं ॥ ३ ॥ [१३]वाराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढे ॥ ४ ॥ हिरण्यकश्यप विदारिला । भक्त [१४]प्रल्हाद रक्षिला ॥ ५ ॥ वामन जाला दिनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥ ६ ॥ छेदुनियां सहस्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥ ७ ॥ शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥ ८ ॥ मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥ ९ ॥ पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण जाला हरी ॥ १० ॥ गजेंद्र स्मरे राम राम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥ ११ ॥ तुका ह्मणे हरिरूप जाले । पुन्हा जन्मा नाहीं आले ॥ १२ ॥

३०५५. [१५]सर्वां भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन । उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे[१६] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुण्य करितां होय पाप । [१७]दुग्ध पाजोनि पोशिला [१८]सांप । करोनि [१९]अघोर जप । दुःख विकत घेतलें ॥ ध्रु. ॥ भूमी पाहातां नाहीं वेगळी । माळ वरड एक काळी । उत्तम निराळी । मध्यम कनिष्ठ ॥ २ ॥ ह्मणोनि विवेकें । कांहीं [२०]करणें निकें । तुका ह्मणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ॥ ३ ॥

---

१ पं. करूनि ठेवी.–२ पं. साक्ष मज आली०.–३ पं. देरे मला ।.–४ पं. कां.–५ पं. तुझे तोंडें निवाड जाला.–६ पं. तो.–७ पं. पर.–८ पं. त्याचें वर्म बोले.–९ पं. तो.–१० त. तो.–११ पं. जेणें.–१२ पं. कूर्म.–१३ पं. वराहरूप.–१४ पं. प्रऱ्हाद.–१५ पं सर्वभूतीं०.–१६ त. पेरावें.–१७ पं. दुग्ध.–१८ त. सर्प.–१९ पं. अघोराचा.–२० पं. करणें तें निकें.

३०५६. देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह देवाचे सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥छ्र॥ विश्वासीं निर्धार । विस्तारील विश्वंभर ॥२॥ तुका ह्मणे व्हावें । वळ एक चि जाणावें ॥ ३ ॥

३०५७. वर्त्ततां वीसर[1] । काय करावें शरीर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवा नेमून नेमून । माझें तुमचे पायीं मन ॥ छ्र ॥ नेदावेया[2] वृत्ती । कोठें फांकों चि श्रीपती ॥ २ ॥ तुका ह्मणे भले । जन्मा येऊनियां जाले ॥ ३ ॥

३०५८. केली प्रतिज्ञा[3] मनाशीं । तईं[4] मी दास सत्यत्वेशीं । नेईन[5] पायांपाशीं[6] । स्वामी मूळ पंढरिये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तोंवरी हें भरीं पोट । केला तो मिथ्या बोभाट । नाहीं सांपडली वाट । सइराट फिरतसें ॥ छ्र ॥ ज्यावें आदरावें जिणें[7] । स्वामी कृपा करी तेणें । पाळिल्या वचनें । सख्यत्वाचा अनुभव ॥ २ ॥ घडे तेसें घडो आतां । मायबापाची हे[8] सत्ता । तुका ह्मणे चिंता । काय पाहें मारगा[9] ॥ ३ ॥

३०५९. नेत्र झाकोनियां काय जपतोसी । जंव[10] नाहीं मानसीं भावप्रेम[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उघडा मंत्र जाणा राम कृष्ण ह्मणा । तुटती यातना गर्भवास ॥ छ्र ॥ मंत्रें[12] यंत्र कांहीं करिसी जडी बुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ॥ २ ॥ सार[13] तुका जपे बीजमंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण[14] ॥ ३ ॥

३०६०. संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥ छ्र ॥ शेष घेईन[15] उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ ३ ॥

३०६१. जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ॥ १ ॥ आपुले आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणतसें ॥ ३ ॥

३०६२. देवाचिया वस्त्रा स्वप्नीं ही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाईचें पाळण नये चि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ॥ छ्र ॥ लेकराची रांस[16] स्वयें धांवे क्षाळूं । न ह्मणे प्रक्षाळूं द्विजपायां[17] ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडावरि थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ३ ॥

---

१ पं. वसर.–२ पं. ज्याले.–३ दे. त. प्रज्ञा.–४ पं. तरि.–५ दे. त. दान.–६ पं. नेईपाया०.–७ पं. ज्याणें –८ दे. त. "हे" नाहीं.–९ पं. मारग.–१० पं. जरी.–११ पं. प्रेमभाव –१२ पं. मत्र तंत्र सध्या करिसी०.–१३ पं. तुका ह्मणे ऐक सुंदर मंत्र एक।.–१४ पं. रामनाम.–१५ पं. सेवीन.–१६ पं. गांड –१७ पं. द्विजपाय.

३०६३. उरा लावी उर आलंगितां कांता । संतासी भेटतां अंग चोरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अतीत देखोनि होय पाठमोरा । व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ॥ छ ॥ द्विजा नमस्कारा मनीं भाव कैचा । तुर्काचे दासीचा लेंक होय ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥ ३ ॥

३०६४. ब्रह्मज्ञान जरी केळे उठाउठी । तरि कां हिंपुटी वेदशास्त्रें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शास्त्रांचें भांडण जप तीर्थाटणें । उर्वीचें भ्रमण या च साटीं ॥ छ ॥ याचसाटीं जप याचसाटीं तप । व्यासें ही अमुप ग्रंथ केले ॥ २ ॥ या च साटीं संतपाय हे सेवावे । तरि च तरावें तुका ह्मणे ॥ ३ ॥

३०६५. गायत्री विकोन पोट जे जाळिती । तया होय गति यमलोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कन्येचा जे नर करिती विक्रा । ते जाती अघोरा नरकपाता ॥ छ ॥ नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणों तयां गति कैसी होय ॥ २ ॥[3] आम्हुचा सांगाती आहे तो श्रीहरि । न लगे दुराचारी तुका ह्मणे ॥ ३ ॥

३०६६. साधूच्या दर्शना लाजसी गव्हारा । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ॥ १ ॥ वेश्या दासी मुरळी जगाची वोंवळी । ते तुज सोंवळी वाटे कैशी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां लाज धरीं बुच्या । टांचराच्या कुच्या मारा वेगीं ॥ ३ ॥

३०६७. राउळासी जातां त्रास मानी मोठा । वैसतो चोहोटां आदरेशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करी स्नान संध्या ह्मणे रामराम । गुरुगुडीचे प्रेम अहर्निशीं ॥ छ ॥ देवाब्राह्मणासी जाईना शरण । दासीचे चरण वंदी भावें ॥२॥ सुगंध चंदन सांडोनियां माशी । बसे दुर्गंधीशीं अतिआदरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे अरे ऐक भाग्यहीना । कां रे रामराणा विसरसी ॥ ४ ॥

३०६८. दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥ छ ॥ उपजला भांवो । तुमचे कृपे सिद्धी जावो ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । लाभ नाहीं या परता ॥ ३ ॥

३०६९. तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवरा सेवटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें तुह्मां आह्मां जालें । एकीं एक सामावलें ॥ छ ॥ उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे विंबच्छाया । ठायीं पावली विलया ॥ ३ ॥

१ दे. केलें –२ दे. तीर्थाटणें.–३ पं. "कैसें होइल त्यांचें तेच हो जाणती । आह्मासी संगति नलगे त्यांची. ॥" हें कडवें ज्यास्त आहे.–४ पं. पुष्प.–५ दे. त. वेणीं.–६ पं. नजाय–७ पं. दुर्गंधासीं अत्यादरें ।.–८ पं. विसरलासी.–९ पं. आतां मज ऐसें.–१० दे. भाव.–११ पं. तुझे.

३०७०. साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं । तयासी सेवटीं करबाडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मालाचे पैं पेटे वाहाताती उंटें । तयालागीं कांटे भक्षावया ॥ छ ॥ वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमा हातीं ॥ २ ॥ ज्यासी असे लाभ तो चि जाणे गोडी । येर तीं बापुडीं सिणलीं वांयां ॥ ३ ॥ तुका ह्मणे शहाणा होईं रे गव्हारा । चौऱ्यासीचा फेरा फिरों नको ॥ ४ ॥

३०७१. चिंरगुटें[1] घालूनि वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्यें ॥ १ ॥ लटिके चि डोहळे दाखवी मकार । दुध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं वांज चि ते खरी । फजिती दुसरी जनामध्यें ॥ ३ ॥

३०७२. माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायांसी न विसंबें[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विसरेनां[3] रूपें[4] क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ती सांवळी ते ॥ छ ॥ विसरतां हरी क्षण एक घडी । अंतरली जोडी लक्षलाभ ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या विठोबाचे पाये । संजीवनी आहे हृदयामाजी ॥ ३ ॥

३०७३. काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचत[5]ती पुढें संसाराच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ झाडा देतेवेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंडें[6]वरी ॥ छ ॥ हात दांत कान हलविती मान । दाखविती[7] जन मानावया ॥ २ ॥ तुका ह्मणे किती जालीं हीं[8] फजित । मागें नाहीं नीत भारवाही ॥ ३ ॥

३०७४. थोर ती गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ व्यर्थ भराभर केलें पाठांतर । जोंवरी अंतर शुद्ध नाहीं ॥ छ ॥ घोडें काय थोडें वागवितें ओझें । भावेंविण तैसें पाठांतर ॥ २ ॥ तुका ह्मणे धरा निष्ठावंत भाव । जरी पंढरीराव पाहिजे तो ॥ ३ ॥

३०७५. जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥ छ ॥ खांद्या पताकांचे भार । तुळसीमाळा आणि अबीर ॥ २ ॥ साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥ ३ ॥

३०७६. जगीं ऐसा बाप व्हावा । ज्याचा वंश मुक्तिस जावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोटा येतां हरलें पापा । ज्ञानदेवा मायबापा ॥ छ ॥ मुळीं बाप होता ज्ञानी । तरी आह्मी लागलों ध्यानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मी पोटींचें बाळ । माझी पुरवा ब्रह्मींची आळ ॥ ३ ॥

---

१ पं. चिरकुटें.–२ पं.० पायांपाशीं न विसंबें.–३ दे. त. विसरता.–४ पं. क्षणरूप एक चित्तीं ।.–५ त. नाचतील.–६ पं. दडावरी –७ पं. दाविती हे जन०.–८ त. तीं.

३०७७. संतांच्या हेळणे बाटलें जें तोंड । मत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेसळीचें वीर्य ऐशा अनुभवें । आपुलें परावें नाहीं खळा ॥ छ ॥ संतांचा जो[1] शोध करितो चांडाळ । धरावा विठाळ बहु त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे केली [2]प्रेज्ञा या च साटीं । कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ॥ ३ ॥

३०७८. बहु टाळाटाळी । होतां[3] भोवताहे कळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरें नव्हेल सेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥ छ ॥ [4]मुरगाळी कान । [5]घुसमांडील सावधान ॥ २ ॥ अबोलणा तुका । ऐसें [6]कोणी लेखूं नका ॥ ३ ॥

३०७९. जिव्हे जाला चळ । नेघे अवसान तें[7] पळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि घोर्सनावोनी[8] उठी । देवें[9] सांटविला पोटीं ॥ छ ॥ नाहीं ओढा वारा । पडिला प्रसंग तो बरा ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली । मज हे[10] अनावर बोली ॥ ३ ॥

३०८०. गोहो यावा गांवा । ऐसे नवस करी आवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैंचें पुण्य तयी[11] गांठी । [12]व्रतें वेची लोभासाटीं ॥ छ ॥ वाढावें संतान । [13]गृहीं व्हावें धनधान्य ॥ २ ॥ मागे गारगोटी । परिसाचीये साटोवाटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोल । देउन घेतला सोमवलें[14] ॥ ४ ॥

३०८१. बाळपणें ऐसीं वरुषें गेलीं बारा । खेळतां या पोरा नानामतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटू दांडू चेंडू लेंगोऱ्या[15] वाघोडीं । चंपे पेंड खेंडी[16] एकीवेकी ॥ छ ॥ हमामा हुंबरी पकव्याच्या वारे । खेळे जंगीभोंवरे चुंबाचुंबी ॥ २ ॥ सेलडेरा आणि निसरभोंवडी । उचली बाले धोंडी अंगबळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें बाळपण गेलें । मग तारुण्य आलें गर्वमूळ ॥ ४ ॥

३०८२. तारुण्याच्या मदें न मनी कोणासी । सदा मुसमुसी घुंळी[17] जैसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [18]अंठोनी वेठोनी बांधला मुंडासा । फिरतसे ह्मैसा जनामधीं ॥ छ ॥ हातीं दीडपान वरती चें[19] मान । नाहीं तो सन्मान भलियांसी ॥ २ ॥ श्वानाचिया परी हिंडे दारोदारीं[20] । पाहे परनारी पापदृष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसीं[21] थोर हा गयाळी । करितां टवाळी जन्म गेला ॥ ४ ॥

---

१ पं. शोध जो.—२ पं. प्रतिज्ञा यासाटीं.—३ पं. होते भोवत हे० —४ पं. मुरगाळितां.—५ दे. घुसमाडील—६ पं. कांहीं बोलूं नका।.—७ त. पं. "ते" नाहीं—८ पं. वासणाउनि—९ पं. विठ्ठल—१० पं. अनावर हे.—११ पं. तिचे—१२ पं. व्रत.—१३ दे. त. पं. ग्रहीं—१४ पं. सोमोल. (दोन्हीरूपें "सोमल" याबद्दल असावीं).—१५ पं. वाघोऱ्या.—१६ पं. घटी.—१७ दे. त. खूळ—१८ दे. अंटोनी वेंटोनीं. पं. आटोनी वेटोनी.—१९ पं. करी.—२० पं. दारोदार। पाहे परनार० —२१ पं. ऐसी थोर हाण झाली.

३०८३. ह्मातारपणीं थेटे पडसें खोकला । हात[1] कपाळाला लावुनि बैसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खोबरियाची वाटी जालें असे मुख । गळतसे नाक श्लेष्मपुरी ॥ छ ॥ बोलों जातां शब्द नये चि हा नीट । गडगडी कंठ कफ भारी ॥ २ ॥ सेजारी ह्मणती मरेना कां मेला । आणिला कांटाळा येणें आह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां सांडुनी[2] सर्वकाम । स्मरा राम राम क्षणक्षणा ॥ ४ ॥

३०८४. जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥ छ ॥ तटावृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे द्रव्य घेती । देती ते ही नरका जाती ॥ ३ ॥

३०८५. लंकेमाजी घरें किती तीं आइका । सांगतसें संख्या जैसीतैसी ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटेबंदी ॥ छ ॥ कोटि घरें जेथें कांशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं सप्त कोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ३ ॥

३०८६. व्यभिचारिणी गणिका कुंटणी । विश्वास चि मनीं राघोबाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी ही पापिणी वाहिली[3] विमानी । अचळ भुवनीं ठेवियेली ॥ छ ॥ पतितपावन तिहीं लोकीं ठसा । कृपाळु कोंवसा अनाथांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे विठोबाची धरा सोय । आणिक उपाय नेणों किती ॥ ३ ॥

३०८७. गजेंद्र तो हस्ती सहस्र[4] वरुषें । जळामाजी नक्रें पीडिलासे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुहृदीं[5] सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥ छ ॥ कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघांजणा तारियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नेले वाऊनि विमानी । मी ही आईकोनी विश्वासलों ॥ ३ ॥

३०८८. ब्रह्मयाचे वेद शंखासुरें नेले । त्यासाटीं धरिलें मत्स्यरूप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हतें ज्ञान ॥ छ ॥ परि तेणें धावा केला आवडीनें । जाले नारायण कृपासिंधु ॥ २ ॥ तुका ह्मणे विठोबा मी नामधारक । पोसनें[6] सेवक भेटी देई ॥ ३ ॥

३०८९. देवीं आणि दैतीं सिंधू गुसाळिला । भार पृथ्वीस[7] जाला साहावेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जालासी कासव धरिली पाठीवरी । चिंता तुज हरी सकळांची ॥ छ ॥ तये काळीं[8] देव करिताती स्तुती । कृपाळु श्रीपती ह्मणोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे उदंड पवाडे । ज्यासी सहस्र तोंडें सिणला तो ही ॥ ३ ॥

---

१ त. हात हा कपाळा लावुनि बैसे ।.–२ पं. सांडुनियां काम.–३ दे. वाइली–४ त. वर्षें सहस्र.–५ दे. त. सुहुदीं.–६ पं. पोसणें.–७ पं. "पृथ्वीस जाला" याबद्दल "पृथ्वीला".–८ त. वेळीं.

३०९०. हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं । वरदानें बळी शंकराच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इंद्रपदराज्य घेतलें हिरोनी । देवा चक्रपाणी ह्मणती धांवें[1] ॥ ध्रु ॥ तई पांडुरंगा शूकर जालेती । तया दैत्यपती मारियेलें[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यांचीं राज्यें त्यांसी दिलीं । ऐसी तूं माउली पांडुरंगा ॥ ३ ॥

३०९१. प्रल्हादाकारणें नरसिंह[3] जालासी । त्याचिया बोलासी सत्य केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राम कृष्ण गोविंदें[4] नारायण हरि । गर्जे राजद्वारीं भक्तराज ॥ ध्रु ॥ विठ्ठल माधव मुकुंद केशव । तेणें दैत्यराव दचकलों[5] ॥ २ ॥ तुका ह्मणे तयां कारणें सगुण । भक्तांचें वचन सत्य केलें ॥ ३ ॥

३०९२. नामाचें सामर्थ्य कां रे दवडीसी । [6]कां रे विसरसी पवाडे हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खणखणां हाणती खर्गें[7] प्रल्हादासी । न रुपे आंगासी किंचित ही ॥ ध्रु ॥ राम कृष्ण हरी ऐसी मारी हाक । तेणें पडे धाक बळियासी ॥ २ ॥ असों[8] ध्यावीं सामर्थ्यें ऐसिया कीर्तीचीं । आवडी तुक्याची भेटी देई ॥ ३ ॥

३०९३. वाटीभर विष दिलें प्रल्हादासी । निर्भय[9] मानसीं तुझ्यावळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन जालें तुझ्या ॥ ध्रु ॥ नामाच्या चिंतनें विषाचें तें आप । जाहालें देखत नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे तुझे बडिवार । सिणला फणीवर वर्णवेना ॥ ३ ॥

३०९४. अग्निकुंडी[10]माजी घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पितियासी ह्मणे व्यापक श्रीहरि । नांदतो मुरारी सर्वां ठायीं ॥ ध्रु ॥ अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हाक मारी ॥ २ ॥ तुका ह्मणे अग्नि जाहाला शीतळ । [11]प्रताप स[12]वेळ विठो तुझा ॥ ३ ॥

३०९५. कोपोनियां पिता बोले[13] प्रल्हादासी । सांग हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरू ह्मणे काष्ठीं पाषाणीं सकळीं । आहे वनमाळी जेथें तेथें ॥ ध्रु ॥ खांबावरी लात मारिली दुर्जनें । खांबीं नारायण ह्मणतां चि ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसों[14] खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं ॥ ३ ॥

३०९६. डळमळिला मेरु आणि तो मांदार । पाताळीं फणिवर डोई झाडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लोपे तेजें सूर्य आणीक हो[15] चंद्र । कांपतसे इंद्र थरथरां ॥ ध्रु ॥ ऐसें

---

१ पं. धांवा.–२ त. दे. मारविले.–३ दे. नरसिंहीं.–४ दे. त. गोविंदा नारायणा०.–५ पं. दचके मनीं.–६ पं. काय विसरलासी०.–७ दे. खग.–८ पं. या.–९ त. पं. निर्भर.–१० दे. ०मध्यें.–११ पं. प्रतापें सकळ दिठो तुझ्या.–१२ त. सकळ.–१३ पं. पुसे.–१४ पं. ऐसा.–१५ त. तो.

रूप उग्र हरीनें धरिलें । दैत्या मारियेलें मांडीवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तांकारणें श्रीहरि । बहु दुराचारी निर्दाळिले ॥ ३ ॥

३०९७. बहुत कृपाळु दीनाचा दयाळु । जगीं भक्तवत्सळु नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मानियेला चित्तीं बळीचा उपकार । अझूनि त्याचें द्वार राखसील ॥ छ ॥ काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं । नाहीं तुज हरि कृपा बहु ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तजनाची ममता । तुह्मांसी अनंता अलोलिक ॥ ३ ॥

३०९८. पांडुरंगा तुझे काय वाणूं गुण । पवाडे हे धन्य जगीं तुझे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दंडिलें दुर्वासा सुरा असुरानें । तो आला गाऱ्हाणें सांगावया ॥ छ ॥ बळिचिये द्वारीं तुह्मी बैसलेती । दुर्वास विनंती करी भावें ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपासागरा श्रीहरी । तुझी भक्तावरी प्रेमच्छाया ॥ ३ ॥

३०९९. दुर्वासयों स्वामी गुंतलों भाकेसी । पुसा जा बळीसी निरोप द्यावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचे आज्ञेविण आह्मां येतां नये । द्वारपाळ राहें होऊनियां ॥ छ ॥ पुसे दुर्वासया बळीसी जाऊनि । येरू ह्मणे झणी बोलों नका ॥ २ ॥ तुका ह्मणे केला अन्यत्राचा त्याग । तेव्हां पांडुरंग सखा जाला ॥ ३ ॥

३१००. बळी ह्मणे आजि दुर्वासया स्वामी । मागों नका तुह्मी नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुतां प्रयासीं जोडला श्रीहरी । बैसविला द्वारीं राखावया ॥ छ ॥ परतला दुर्वास मग हो तेथूनि । चिंतातुर मनीं उद्वेगला ॥ २ ॥ काय तूं एकाचा आहेसी अंकित । होईं कृपावंत तुका ह्मणे ॥ ३ ॥

३१०१. त्रैलोकींचा नाथ सकळांचा आधार । बळिचें तुवां घर धरियेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां मोकलिलें कोणां निरविलें । कोणा हातीं दिले तिन्ही लोक ॥ छ ॥ अनाथांचा बंधु दासांचा कैवारी । ब्रिदें तुझीं हरी जाती वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें[९] बोलिला दुर्वास । वाटला संतोष पांडुरंगा ॥ ३ ॥

३१०२. बोलिले[१०] ते देवऋषी दुर्वासया । जाय पुसावया मागत्यानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागुता दुर्वास पुसे बळिराया । निरोप जावया देई देवा ॥ छ ॥ बळी ह्मणे त्यासी जाय मी न ह्मणें । जाईल नारायण लागला ची ॥ २ ॥ मजपाशीं राहें कोठें तरीं जाय । तुका ह्मणे पाय न सोडीं मी ॥ ३ ॥

---

१ पं. मर्दियेले.–२ पं. दार.–३ पं. बैसलेती.–४ पं. आला तो–५ "दुर्वास्या" या संबोधनरूपाबद्दल.–६ त. प्रयासीं.–७ पं. त्रैलोक्याचा.–८ पं. त्वां द्वार.–९ पं. ऐसा.–१० त. दे. "बोलिले ते" याबद्दल "बोलिले ती".

३१०३. दुर्वासें निरोप आणिला ये रिती । मग वाढलेती नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेविलें चरण वळिचिये द्वारीं । शीर अंगावरी लांबविलें ॥ छ्र ॥ पाडियेलें द्वार द्वारावतियेसी । वरि हृषीकेशी निघालेती ॥ २ ॥ तेथूनियां नाम पडिलें द्वारका । वैकुंठनायका तुका ह्मणे ॥ ३ ॥

३१०४. मुरुकुश दोन्ही मारिले आसुर । दुर्वास ऋषीश्वर सुखी केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मारियेला मुरु ह्मणोनी मुरारी । नाम तुझें हरी पडियेलें ॥ छ्र ॥ पूर्वींहुनी ऐसा भक्तिप्रतिपाळ । केला त्वां सांभ.ळ नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ये चि वेळे काय जालें । कां सोंग धरिलें मोहनाचें ॥ ३ ॥

३१०५. गुरुपादाग्रींचें जळ । त्यास मानी जो विटाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतीं वाळिला जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥ छ्र ॥ गुरुतीर्थीं अनमान । यथासांग मद्यपान ॥ २ ॥ गुरुअंगुष्ठा न चोखी । मुख घ.ली वेश्येमुखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगों किती । मुखीं पडो त्याचे माती ॥ ४ ॥

३१०६. वाढविलें कांगा । तुह्मी एवढें पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय होती मज चाड । एवढी करावया बडबड ॥ छ्र ॥ ब्रह्मसंतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥ २ ॥ निमित्याचा धणी । तुका ह्मणे नेणे कोणी ॥ ३ ॥

३१०७. साही शास्त्रां अतिदुरी तो परमात्मा श्रीहरि । तो दशरथाचे घरीं क्रीडतो राम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शिवाचें निजध्येय[1] वाल्मीकाचें निजगुह्य । तो भिल्लटीचीं फळें खाय श्रीराम तो ॥ छ्र ॥ योगियांचे मनीं नातुडे चिंतनीं । तो[2] वानरांचे कानीं गोष्टी सांगे ॥ २ ॥ चरणीं शिळा उद्धरी नामें गणिका तारी । तो कोळियां[3] घरीं पाहुणा राम ॥ ३ ॥ क्षण एक सुरवरा नातुडे नमस्कारा । तो रिसा आणि वानरा क्षेम[4] दे राम ॥ ४ ॥ राम सांवळा सगुण राम योगियाचें ध्यान । राम राजीवलोचन तुका चरण वंदितो ॥ ५ ॥

३१०८. विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारूं । उतरील पारु भवनदीचा ॥ छ्र ॥ विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणी बंधु ॥ २ ॥ विठ्ठल हे जन विठ्ठल माझें मन । सोयरा सज्जन विठ्ठल माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल विसावा । नैश्वरित[5] गांवा जाइन त्याच्या ॥ ४ ॥

---

१ दे. निजदेह वाल्मीकाचें निजगुहे.–२ दे. त. "तो" नाहीं.–३ पं. कोळियाचे.–४ दे. त. क्षम.–५ पं. नसंवरित.

३१०९. न मनावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्याणें लौकिक हा केला । तो हें निवारिता भला ॥ छ ॥ माझे इच्छे काय । होणारें[1] ते एक ठाय ॥ २ ॥ सुखा आणि दुःखा । ह्मणे वेगळा मी तुका ॥ ३ ॥

३११०. माझा पाहा अनुभव । केला देव आपुला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलविलें तें चि द्यावें । उत्तर व्हावें ते काळीं ॥ छ ॥ सोडिलिया जग निंद्य । मग गोविंद ह्मणियारा ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर केला । तेणें याला गोविलें ॥ ३ ॥

३१११. जिंकावा संसार । येणें[2] नांवें तरी शूर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरें काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥ छ ॥ पण ऐशा नांवें । देवा धरिजेतो भावें ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यावें । सत्य कीर्तीनें बरवें ॥ ३ ॥

३११२. सरे ऐसें ज्याचें दान । त्याचे कोण उपकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको वाढूं ऐसें काचें । दे[3]वो साच विठ्ठला ॥ छ ॥ रडत मागें सांडी पोर । ते काय थोर माउली ॥ २ ॥ तुका ह्मणे कीर्ति वाढे । धर्म गाढे ते[4] ऐसे ॥ ३ ॥

३११३. तुटे मायाजाळ विघडे भवसिंधू । जरि लागे छंदुं हरिनामें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येर कर्म धर्म करितां ये काळीं । माजी[6] तरला बळी कोण सांगा ॥ छ ॥ न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ २ ॥ न साधवे योग न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ ३ ॥ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्णकथा ॥ ४ ॥ तुका ह्मणे वर्म दावियेलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ ५ ॥

३११४. लोभावरी ठेवुनि हेत । करी[7] असत्य न्याय नीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥ छ ॥ कोटिगोहत्यापातक । त्यासी घडेलें[8] निष्टंक ॥ २ ॥ मासां श्रवे[9] जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसियासी । यम गांजील सायासी ॥ ४ ॥

३११५. देह जाईल जाईल । यासी काळ वा खाईल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे नुमजसी दगडा । कैचे हत्ती घोडे वाडा ॥ छ ॥ लोडें बालिस्तें सुपती । जरा आलिया फजिती ॥ २ ॥ शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडविती सेतांतें[10] ॥ ३ ॥ अझुनि तरी होईं जागा । तुका ह्मणे पुढें दगा ॥ ४ ॥

१ पं. जाणार.–२ पं. तेणें.–३ पं. देईं वो सांच विठ्ठले ।.–४ पं. ऐसे ते.–५ दे. सिधु. (दोन वेळ).–६ त. माजी कोण बळी तरला सांगा ।.–७ पं. त. असत्य करी.–८ पं. घडलें.–९ पं. सवे.–१० पं. सेत.

३११६. मार्गें बहुतां जनां राखिलें आडणी । धांवसी निर्वाणी नाम घेतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें ठावें जालें मज बरव्या परी । ह्मणऊनि करीं धांवा तुझा ॥ छ्र ॥ माझेविशीं तुज पडिला विसरु । आतां काय करूं पांडुरंगा ॥ २ ॥ अझुनि कां नये तुह्मासी करुणा । दुरि नारायणा धरिलें मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवें जाऊं पाहे माझा । आतां केशीराजा घालीं उडी ॥ ४ ॥

३११७. कळजे माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवूं आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं काय करिसी माझिया संचिता । धिग हे अनंता जालें जिणें ॥ छ्र ॥ पतितपावन राहिलों या आशा । आइकोनि ठसा कीर्ती तुझी ॥ २ ॥ आतां कोण करी माझा अंगीकार । कळलें निष्ठुर जालासी तूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाटीं ॥ ४ ॥

३११८. तरि कां मार्गें वांयां कीर्ती वाढविली । जनांत आपुली ब्रिदावळी ॥१॥ ॥ ध्रु. ॥ साच करितां आतां फिरसी माघारा । ठायींचें दातारा नेणवे चि ॥ छ्र ॥ संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगईन ॥ २ ॥ घईन डांगोरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आधीं राहिलों मरोनि । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥ ४ ॥

३११९. आह्मी तुझ्या दासीं । जरि जावें पैंतनासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि हें दिसे विपरीत । कोठें बोलिली हे नीत ॥ छ्र ॥ तुझें नाम कंठीं । आह्मां संसार आटी ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । करी आह्मांसी विटाळ ॥ ३ ॥

३१२०. लाजती पुराणें । वेदां येऊं पाहे उणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मी नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ॥ छ्र ॥ बोलिले ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । रोकडी हे मोडे सेवा ॥ ३ ॥

३१२१. आहारनिद्रे न लगे आदर । आपण सादर ते चि होय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परिमितीविणें बोलणें ते वांयां । फार थोडें[6] काया पिंड पीडा ॥ छ्र ॥ समाधान त्याचें तो चि एक जाणे । आपुलिये खुणे पावोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे होय पीडा ते न करीं । मग राहें परी भलतिये ॥ ३ ॥

---

१ पं. जाऊं पाहे प्राण माझा.–२ पं. हे.–३ पं. आह्मी.–४ त. नरकासी.–५ दे. त. परमिति विण.–६ पं. थोर काया पिंडापीडी.

३१२२. भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे वोसरले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥ ध्रु ॥ जीव अवघे देव । खोटा नागवी संदेह ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध । मग तुटलिया भेद ॥ ३ ॥

३१२३. सरतें माझें तुझें । तरि हें उतरतें ओझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे सांडावें मांडावें । आहे शुद्ध चि स्वभावें ॥ ध्रु ॥ घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ॥ २ ॥ सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो शीण ॥ ३ ॥ करितां नारायण । एवढें वेचितां वचन ॥ ४ ॥ लाभ हानि हे[3] समान । तैसा मान अपमान ॥ ५ ॥ तुका ह्मणे याचें । नांव सोंवळें साचें ॥ ६ ॥

३१२४. तुज करितां होती ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पैरि वर्म नेणे तें कोणी । पीडाखाणी भोगितील ॥ ध्रु ॥ उलंघितें पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥ २ ॥ पापी होयँ पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥ ३ ॥ अवघें हेळामात्रें हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ४ ॥ तुका ह्मणे खेळें लीळा । पाहे वेगळा व्यापूनि ॥ ५ ॥

३१२५. पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरोनि उरे खातां देतां । नव्हे खंडन मवितां ॥ ध्रु ॥ खोलीं पडे ओली बीज । तरीं च हाता लागे निज ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । विठ्ठल अक्षरें या तिन्ही ॥ ३ ॥

३१२६. करिसी लाघवें । तूं हें खेळसी आघवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अहंकारें आड । आह्मां जगासी हा नाड ॥ ध्रु ॥ येथें[11] भुतें यावें । दावूं लपों हीं जाणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे हो श्रीपती । आतां चाळवाल किती ॥ ३ ॥

३१२७. घालिती पव्हया । वाटे अनाथाच्या[12] दया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें कां[13] हें नये करूं । पांडुरंगा आह्मां तारूं ॥ ध्रु ॥ रोगियासी काढा । देउनि वारितीलें[14] पीडा ॥ २ ॥ बुडत्यासाटीं उडी । घालितीलें कां हे जोडी ॥ ३ ॥ [16]सारितील कांटे । पुढें मागिलांचे वाटे ॥ ४ ॥ तुका ह्मणे भार । घेती भागल्यांचा फार ॥ ५ ॥

---

१ त. सरे.–२ दे सुखदुःखाचा.–३ पं. हा.–४ पं. तयाचें.–५ पं. परि हें वर्म नेणती कोण ।.–६ पं. होती.–७ पं. तारी.–८ त. "खेळे" नाहीं.–९ पं. हातीं.–१० पं. केला अहंकार०.–११ पं. इत्थंभूत यावें–१२ पं. अनाथाची.–१३ पं. कांहो नये०.–१४ पं. वारिताती.–१५ पं. घालिताती काय जोडी ।.–१६ पं. झाडिताती.

३१२८. नका[1] दंतकथा येथें सांगों कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुभव येथें व्हावा[2] शिष्टाचार । न चलती चार आह्मांपुढें ॥ छ[3] ॥ निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं[4] ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे जातीचें । येरा गाबाळाचें काय[5] काम ॥ ३ ॥

३१२९. न करि त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भवसिंधूचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥ छ ॥ याचे सोई पाउल वेचे । मग कैचे आडथळे[6] ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें खोटें । न ह्मणे मोटें लहान ॥ ३ ॥

३१३०. रिकामें तूं[7] नको मना । राहों क्षणक्षणा ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेळोवेळां पारायण । नारायण हें करीं ॥ छ ॥ भ्रमणांच्या मोडीं वाटा । न भरें फाटा आडरानें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवें । हें चि घ्यावें धणीवरी ॥ ३ ॥

३१३१. पंचभूतांचिये सांपडलों संदीं[8] । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपल्या आपण बांधविला गळा । नेणें चि निराळा असतां हो ॥ छ ॥ कासया हा सत्य लेखिला[9] संसार । कां हे केले चार माझें माझें ॥ २ ॥ कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥ ३ ॥ किंचित सुखाचा धरिला अभिळासें[10] । तेणें बहु नास[11] केला पुढें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां देह देऊं बळी । करुनि सांडूं होळी संचितांची[12] ॥ ५ ॥

३१३२. देव जाले अवघे जन । माझे[13] गुण दोष हारपले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवें जालें बरवें जालें । चित्त धालें महालाभें ॥ छ ॥ दर्पणींचें दुसरें भासे । परि तें असे एक तें ॥ २ ॥ तुका ह्मणे सिंधुभेटी । उदका तुटी वोहाळासी[14] ॥ ३ ॥

३१३३. बहु[15] प्रकार गव्हाचे । जिव्हा नाचे आवडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरलें परि आवडी नवी । सिंधु दावी तरंग ॥ छ ॥ घेतलें घ्यावें वेळोवेळां । माय[16] बाळा न विसंबे ॥ २ ॥ तुका ह्मणे रस राहिलों[17] वचनीं । तो चि[18] पडताळूनि सेवीतसें ॥ ३ ॥

३१३४. आह्मां सोइरे हरिजन । जनीं[19] भाग्य निकंचनें[20] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्याच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥ छ ॥ मुके[21] तान्हे चित्तीं[22] । सदा देव आठविती ॥ २ ॥ तुका ह्मणे धन । ज्याचें निजें नारायण ॥ ३ ॥

---

१ पं. नको –२ पं. पाहिजे साचार ।.–३ पं. "वरी कोणी मानी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें ओळखी तों ॥." हें कडवें जास्त आहे.–४ पं. वेगळाची.–५ पं. "काय काम" याबद्दल "काम नाहीं".–६ पं. आडताळे –७ पं. तो.–८ पं. त. नधी.–९ पं. मानिला –१० पं. अभिलाष.–११ पं. नाश –१२ पं. संसाराची.–१३ पं. 'माझे" नाहीं.–१४ पं. वोहळासी.–१५ त. दे. बहुत प्रकार परिते गव्हाचे.–१६ पं. वाया.–१७ पं. "राहिला" नाहीं –१८ पं. पडताळूनी तोची सेवी.–१९ पं. जनभाग्य.–२० पं. नि.किंचन.–२१ पं. तान्हेभुके.–२२ दे. त. वित.

३१३५. ह्मणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोट भरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खोटें कोठें सरे तुझे पायांपाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥ ध्रु ॥ आचरण खोटें आपणासी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधी तुह्मां ठावा ॥ ३ ॥

३१३६. जळालें[1] तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडिलिया[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कारण तें अंतरलें । वाइट भलें ह्मणवितां[3] ॥ ध्रु ॥ तांतडीनें नासी । तांतडीनें च संतोषी ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरें[4] । नाहीं बुद्धि[5] एक स्थिर ॥ ३ ॥

३१३७. चित्ताचें बांधलें जवळी तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरीं वसावी उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न सके चि ॥ ध्रु ॥ ब्रह्मांड कवळे[6] आठवणेसाटीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ घरिंचिया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां[7] ॥ ३ ॥

३१३८. दुखवलें[8] चित्त आजिच्या प्रसंगें । वहु पीडा जगें केली देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ॥ ध्रु ॥ आणिकांची येती अंतरा अंतरें । सुखदुःख बरेंवाइट तीं[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥ ३ ॥

३१३९. धनवंत एक बहिरें[10] अंधळे । शुभ्र कुष्ठ काळे भोग अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रारब्धाची[11] गति न कळे विचित्र । आहे हातीं सूत्र विठोबाचे ॥ ध्रु ॥ आणीक रोगांचीं नांवें घेऊं[12] किती । अखंड असती जडोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे नष्ट संचिताचें दान । पावे खातां पण सुख नेदी ॥ ३ ॥

३१४०. भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आतां नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें एक केलें अवघें होय सांग । अच्युताच्या योगें[13] नामें छंदें ॥ ध्रु ॥ भोंवरे खळाळ चोर वाटा घेती । पावल मारिती सिवेपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें भावेंविण पार । न पविजे सार हें चि आहे ॥ ३ ॥

३१४१. जे गाती अखंड विठ्ठलाचे गीत । त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम । ते माझे परम प्राणसखे ॥ ध्रु ॥

---

१ पं. जळो.—२ पं. पडिलें.—३ पं. ह्मणतां—४ पं. धर.—५ पं. एकी वुद्धि.—६ पं. कवळ आठवण साटी.—७ दे. सुटतां.—८ त. पं. दु.खवलें.—९ पं. तें.—१० पं. वहिरट.—११ त. "प्रारब्धगति० हातीं आहे सूत्र०". दे. परारब्धगति.—१२ पं. सांगों.—१३ पं. संगें नामच्छंदें. त. योगें नामच्छंदें.

जयांसी विठ्ठलें आवडे लोचनीं । त्यांचें पायवणी स्वीकारीन ॥ २ ॥ विठ्ठलासी जिहीं दिला सर्व भाव । त्यांच्या पायीं ठाव मागईन ॥ ३ ॥ तुका ह्मणे रज होईन चरणींचा । ह्मणविती त्यांचा हरिचे दास ॥ ४ ॥

३१४२. *काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद एका भावें ॥ १ ॥ निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारीं पां हित लवलाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भावभक्ति हे कारण । नागवी भूषण दंभ तो चि ॥ ३ ॥

३१४३. देवकीनंदनें । केलें आपुल्या चिंतनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज आपुलिया ऐसें । मना लावूनियां पिसें ॥ छ ॥ गोवळे गोपाळां । केलें लावूनियां चाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे संग । केला दुरि नव्हे मग ॥ ३ ॥

३१४४. माझिया जीवा[3]सी हे चि पैं विश्रांति । तुझे पाय चित्तीं पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भांडवल गांठी आ[4]लें सपुरतें । समाधान चित्तें मानियेलें ॥ छ ॥ उदंड उ[5]च्चारें घातला पसरु । रूपावरी भरु आवडीचा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज भक्तीची आवडी । अ[6]भेदीं तांतडी नाहीं ह्मू[7]णें ॥ ३ ॥

३१४५. एकविध आह्मी न धरूं पालट । न संडूं तें[8] वाट सांपडली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणवूनि केला पाहिजे सांभाळ । माझें बुद्धीबळ पाय तुझे ॥ छ ॥ बहुत न कळे बोलतां प्रकार । अंतरा अंतर साक्ष असे ॥ २ ॥ तुका ह्मणे आगा जीवींच्यां[9] जीवना । तूं चि नारायणा साक्षी माझा ॥ ३ ॥

३१४६. राहो ये चि ठायीं । माझा भाव तुझे पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीन नामाचें चिंतन । जाऊं नेदीं कोठें मन ॥ छ ॥ देईन ये रसीं । आतां बुडी सर्वविशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । साटी करोनियां जीवा ॥ ३ ॥

३१४७. तैसे नं[10]व्हों आह्मी विठ्ठ[11]लाचे दास । यावें आणिकांस काकुलती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ । आला कळिकाळ हातातळीं ॥ छ ॥ अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां इच्छेचें खेळणें । कोडें[12] नारायणें पुरवावें ॥ ३ ॥

---

१ पं. आवडे विठ्ठल.—२ पं. जीवटेवीन मी ।.—३ पं. जीवाची.—४ पं. जालेंसे पुरतें.—५ पं. उच्चारु.—६ पं. अभेद०.—७ पं. ह्मणे.—८ पं. हे.—९ दे. जीवांच्या.—१० पं. नव्हे. दे. नव्हों—११ पं. विठोवाचे.—१२ पं. कोडें नारायण.

* दे. त. या दोहों प्रतींत हा अभंग दुवार आहे. अक्षरवटिका ह्मणजे शुद्धाशुद्धलेख मात्र सारखा नाहीं.

३१४८. मोक्ष देवापाशीं नाहीं । लटिक्या घाई विळवेतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय खरें न धरी शुद्धी । गेली बुद्धी भ्रमलें ॥ छ ॥ अहंकारासें उरलें काई । पांचांठायीं हें वांटे ॥ २ ॥ तुका ह्मणे कुंथे भारें । लटिकें खरें मानुनियां ॥ ३ ॥

३१४९. आपला तो एक देव करुनि घ्यावा । तेणेंविण जीवा सुख नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरें तीं माइकें दुःखाचीं जनितीं । नाहीं आदिअंतीं अवसान ॥ छ ॥ अविनाश करी आपुलिया ऐसें । लावीं मना पिसें गोविंदाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे एका मरणें चि सरें । उत्तम चि उरे कीर्ति मागें ॥ ३ ॥

३१५०. आजिचें हें मज तुह्मीं कृपादान । दिलें संतजन मायबापीं ॥ १ ॥ आलीं मुखावाटा अमृतवचनें । उत्तीर्ण तीं येणें नव्हे जन्में ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं उदार कृपाळ । शृंगारिलें बाळ कवतुकें ॥ ३ ॥

३१५१. स्तुती अथवा निंदा करावी देवाची । अधम तो वेची व्यर्थ वाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आइकोनि होती बहिर हे बोल । वेचूनि ते मोल नरका जाती ॥ छ ॥ इह लोकीं थुंका उडे तोंडावरी । करणें अघोरीं वास लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे माप वाचेऐसें निकें । भरलें नरकें निंदेसाटीं ॥ ३ ॥

३१५२. लोह कफ गारा सिद्ध हे सामुग्री । अग्नि टणत्कारी दिसों येतो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगावें तें काई सांगावें तें काई । चित्तीं होय ठायीं अनुभव तो ॥ छ ॥ अन्नें सांगों येतो तृप्तीचा अनुभव । करूनि उपाव घेऊं हेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नांवें ठेवी ॥ ३ ॥

३१५३. बाळाचें जीवन । माता जाणें भूक तान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ छ ॥ ठेविलिये ठायीं । चित्त ठेवुनि असें पायीं ॥ २ ॥ करितों हे सेवा । चिंतन सर्वां ठायीं देवा ॥ ३ ॥ न्यून तें चि पुरें । ध्यावें करोनि दातारें ॥ ४ ॥ तुका ह्मणे बुद्धि । अल्प असे अपराधी ॥ ५ ॥

३१५४. जाणतों समये । परि मत कामा नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मीं सांगावें तें वरें । देवा सकळ विचारें ॥ छ ॥ फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होते ऐसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे । धर पाय मज साहे ॥ ३ ॥

---

१ पं. विवळतो.–२ पं. अहकारा.–३ पं. नाहे.–४ दे. तें.–५ पं. अवसानीं.–६ पं. गोविंदाचें–७ पं. उत्तीर्णता येणें०.–८ पं. पडो.–९ दे. त. आग्न.–१० त. चीत्ता.–११ पं. नावें.–१२ पं. करोनि घ्यावें–१३ पं. परमित.–१४ पं. विचार.

३१५५. द्वारपाळ विनंती करी । उभे द्वारीं राउळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलिया शरणागता । वाहों चिंता नेदावी[1] ॥ छ ॥ वचना या चित्त द्यावें । असो ठावें पायांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपासिंधू । दीनबंधू केशवा ॥ ३ ॥

३१५६. दोहीं बाहीं आह्मां वास । असों कास घालूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोल बोलों उभयतां । स्वामीसत्ता सेवेची ॥ छ ॥ एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीतीं[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे जोहारितों । आहें होतों ते ठायीं ॥ ३ ॥

३१५७. ऐका जी देवा माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सन्निध पातलों सांडूनियां[3] शंका । सन्मुख चि एकाएकीं पुढें ॥ छ ॥ जाणविलें कोठें पावे पायांपाशीं । केली या जिवासी साटी ह्मूण ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे हातीं द्या उद्धार । करीं करकर ह्मणवूनि ॥ ३ ॥

३१५८. बैसलों तों कडियेवरी । नव्हें दुरी वेगळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घडलें हें बहुवां दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥ छ ॥ वहु होतां जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ॥ २ ॥ दुःखी केलें मीतूंपणें । जवळी नेणें होतें तें ॥ ३ ॥ पाहात जे होतों वास । ते चि आस पुरविली ॥ ४ ॥ तुका ह्मणे मायबापा । झणी कोपा विठ्ठला ॥ ५ ॥

३१५९. तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जाणों कार्य होसील निजला । नेणों जी विठ्ठला मायबापा ॥ छ ॥ भवबंधनाचे तुटतील फांसे । तें कां येथें ऐसे अव्हेरिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें दचकलें मन । वाटे वांयांविण श्रम केला ॥ ३ ॥

३१६०. सेवकें करावें सांगितलें काम । सिध्याचा तो धर्म स्वामी राखे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय देवा नेणों आलें गांढेपण । तुह्मी शक्तिहीन जाले दिसां ॥ छ ॥ विष्णुदास आह्मी निर्भर ज्याबळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मूळ पाठवा लौकरी । किंवा करूं हरी काय सांगा ॥ ३ ॥

३१६१. खेळतां न भ्यावें समर्थाच्या बाळें । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ॥ छ ॥ अवघी च दिशा असावी मोकळी । मायबाप वळी ह्मणऊनि ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें ऐसें आहे देवा । ह्मणऊनि सेवा समर्पिली ॥ ३ ॥

---

१ पं. न द्यावी.–२ पं. गीति.–३ पं. टाकोनियां.–४ पं. बहुता.–५ पं. जाला होता.–६ पं. देवा.–७ पं. ऐसें.–८ पं. सीण.–९ पं. खेळतां निजभावें सन्यांचे बाळ ।.–१० पं. मानाविण.

३१६२. निरंजनीं[1] एकटवाणें । संग नेणें दुसरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा चाळविलें कैसें । लावुनि पिसें गोवळें ॥ छ्र ॥ लपलें[2] अंगें अंग । दिला संग होता तो ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हतें ठावें । जालें भावें वाटोळें ॥ ३ ॥

३१६३. नव्हती भेटी तों चि बरें । होतां चोरें नाडिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियांचा केला झाडा । रिता वाडा खोंकर ॥ छ्र ॥ चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हरूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे मूळा आलें । होतें केलें तैसें चि ॥ ३ ॥

३१६४. जये ठायीं आवडी ठेली । मज ते बोली न संडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरवावें जीवींचें कोडँ[3] । भेटी गोड तुज मज ॥ छ्र ॥ आणिलें तें[4] येथवरी । रूप दुरी न करावें ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणा । सेवाहीना धिग वृत्ति ॥ ३ ॥

३१६५. सरलियाचा सोस मनीं । लाजोनियां राहिलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीनें बोलावितों । येथें तें तों लपावें ॥ छ्र ॥ माझें तें चि मज द्यावें । होतें भावें जोडिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरा । आळीकरा बुझावा ॥ ३ ॥

३१६६. नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चेष्टविलीं[5] माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालती ॥ छ्र ॥ नामरूपें रंगा आलीं । ते चि चाली स्वभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगें । अंग संगें कवळिलें[6] ॥ ३ ॥

३१६७. खेळतों ते[7] खेळ पायांच्या प्रसादें । नव्हती हीं[8] छंदें नासिवंतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा मायबाप उभा विटेवरी । कवतुकें करी कृपादान ॥ छ्र ॥ प्रसादाची वाणी वंदे[9] तीं उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रस वोंढितिया[10] अंगें । छाया पांडुरंगें केली वरी ॥ ३ ॥

३१६८. अखंड मुडतर । सासुरवास करकर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याची जाली[11] बोळवण । आतां न देखों तो शीण ॥ छ्र ॥ बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मुळें । खंड जाला एका[12] वेळें ॥ ३ ॥

३१६९. अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ छ्र ॥ चुकलोंसा दिसें पंथ । गेले संत तो ऐसा ॥ २ ॥ तुका ह्मणे सांग वांयां । कारण या अनुभवें ॥ ३ ॥

---

१ दे. त. निरांजनीं.–२ त. लपविलं.–३ पं. कोडें.–४ पं. "तें" नाहीं.–५ त. हालविती.–६ पं. कवळिलीं –७ पं. 'ते" नाहीं.–८ पं. ते.–९ पं. वदती उत्तरें.–१० पं. वाटी तया.–११ पं. जालिया.–१२ पं. एक वेळे.

३१७०. आतां तुह्मी कृपावंत । साधु संत जिवलग ॥ १ ॥ ॥ ध्रु० ॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुह्मांसी ॥ ध्रु ॥ वंचिलें तें पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥ ३ ॥

३१७१. सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गायें नाचें एवढें जाणें । विठ्ठल ह्मणे निर्लज्ज ॥ ध्रु ॥ अवघें माझें एवढें धन । साधन ही[1] सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पायां पडें । तुमच्या कोडें संतांच्या ॥ ३ ॥

३१७२. धरिलीं जीं होतीं चित्तीं । डोळां तीं[2] च दिसती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आलें आवडीस[3] फळ । जालें कारण सकळ ॥ ध्रु ॥ घेईन भातुकें । मागोनियां कवतुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे लौंड । विठोबा पुर्वील कोड ॥ ३ ॥

३१७३. बहुतां दिसांची आजि जाली भेटी । जाली होती तुटी काळगती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ॥ ध्रु ॥ बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥ २ ॥ बहु दिस होता पडिला मारग । क्लेशाचा त्यां त्याग आजि जाला ॥ ३ ॥ बहु होतीं[10] केली सोंगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे येथें जालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥ ५ ॥

३१७४. पुत्र जाला चोर । मायबापा हर्ष थोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां काशासाटीं जोडी । हा धोंटे गुंडगे घडी ॥ ध्रु ॥ ऐते अपाहार । आणूनियां भरी घर ॥ २ ॥ मानिली निश्चिंती । नरका जावया उभयतीं ॥ ३ ॥ झोडाझोडगीचे पोटीं । फळें बीजें तीं[12] करटीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे वेव्या । भांडवल न लगे खव्या ॥ ५ ॥

३१७५. एवढी अपकीर्ती । ऐकोनियां फजीती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जरि दाविलें[13] वदन । थुंका थुंका तो देखोन ॥ ध्रु ॥ काळिमेचें जिणें । जीऊनियां राहे सुनें ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण । दरुपणें अपशकुन ॥ ३ ॥

३१७६. पुंडलीक भक्तराज । तेणें साधियेलें काज । वैकुंठींचें निज । परब्रह्म आणिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंग बाळमूर्ति । गाईगोपाळां संगती । येऊनियां प्रीति । उभें सम चि राहिलें ॥ ध्रु ॥ एका आगळें अक्षरें । भूवैकुंठ चि दुसरें । ह्मणाविती येरें । परि तीं ऐसीं नव्हेती ॥ २ ॥ पाप पंचक्रोशीमधीं । यऊं[16] न सके

१ प. हे.—२ पं. त.—३ पं. आवडीनें.—४ दे. लड.—५ पं. पुर्विलें कोड—६ दे. भागस्थान.—७ दे. श्रमश्रमे—८ पं. साडिला.—९ पं. तो.—१० पं. केली होती.—११ त. दाटे. पं. धोट गुंडे घडी०.—१२ पं. ते करटीं—१३ पं. दावील.—१४ पं. गाईगोपाळ सांगातीं—१५ दे. त. अक्षर वैकुंठ०.—१६ दे. त. येऊ न सकेचिना आधीं.

चि कथीं । कैंची तेथें विधि- । निषेधाची वसति ॥ ३ ॥ पुराणें [1]वदती ऐसें । चतुर्भुज तीं मानसें । सुदर्शनावरी वसे । [2]रीगें न घडे कल्पांतीं ॥ ४ ॥ महाक्षेत्र हें पंढरी । अनुपम्य [3]ईची थोरी । धन्य धन्य वारकरी । तुका ह्मणे तेथींचे ॥ ५ ॥

३१७७. देह मृत्याचें भातुकें । कळों आलें कवतुकें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय मानियेलें सार । हें चि वाटतें आश्चर्य ॥ ध्रु ॥ नानाभोगांचीं संचितें । करुनि ठेविलें[4] आइतें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोडीं । उगवूं न सकती बापुडीं ॥ ३ ॥

३१७८. [5]त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां असो तुझे पायीं हें मो[6]कळें । इंद्रियें [7]सकळें काया मन ॥ ध्रु ॥ सांडीमांडी विधिनिषेधाचा ठाव । न कळतां भाव जाइल वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥ ३ ॥

३१७९. दावूनियां [8]बंड । पुरे न करी तें भांड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळो जळो तैसें जिणें । [9]फटमरे लाजिरवाणें ॥ ध्रु ॥ घेतलें तें[10] सोंग । बरवें संपादावें सांग ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरें । देवें[11] नुपेक्षील खरें ॥ ३ ॥

३१८०. न पालटे जाती जीवाचिये साटीं । [12]वाहे तें चि पोटीं दावी वरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरीं[13] सबाहीं सारिखा चि रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥ ध्रु ॥ [14]घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणे धीरा आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे [15]कढे करावी शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥ ३ ॥

३१८१. दिली मान तरी [16]नेघावी शत्रूची । शरण आलें [17]त्यासी जतन जीवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समर्थासी असे विचाराची आण । भलीं पापपुण्य विचारावें ॥ ध्रु ॥ कावुळतांसाटीं सत्याचा विसर । पडिलें अंतर न पाहिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥ ३ ॥

३१८२. विचारिलें आधीं आपुल्या मानसीं । वांचों येथें कैसीं कोण्या द्वारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तंव [18]जाला साह्य हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी [19]नास नाहीं ॥ ध्रु ॥ उद्वेगाचे होतों पडिलों समुद्रीं । कोणे रीती तरी पाविजेल ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखें आला आयुर्भाव । जाला बहु जीव कासावीस ॥ ३ ॥

---

१ पं. बोलती.–२ पं. परि ते न बुडे कल्पांतीं त. न बुडे कल्पांतीं.–३ दे. इयेची.–४ पं. टेविली. ५ पं. त्याग.–६ पं. मोटाळें–७ पं. सकळ काया मनें.–८ पं. मांड। पुरे न करिती भांड ॥.– ९ पं. फटमर.–१० पं. तैस.–११ दे. देवें नुपेक्षिलें खरें.–१२ पं. वाह्य.–१३ पं. अतर सबाह्य – १४ पं. घणाचिये घाई.–१५ पं. कढ.–१६ पं. न घ्यावी.–१७ त. त्याची –१८ पं. साह्य जाला.– १९ पं. नाश.

३१८३. आपुलें वेचूनि खोडा घाली पाव। ऐसे[1] जया भाव हीनबुद्धि ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विषयांच्या संगें आयुष्याचा नास। पडियेलें ओस स्वहिताचें ॥ छ ॥ भुलल्याचें अंग आपणा[2] पारिखें। छंदा च सारिखें वर्त्ततसे ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःख उमटे परिणामीं। लंपटासी कामीं रतलिया ॥ ३ ॥

३१८४. केलें शकुनें प्रयाण। आतां मागें फिरे कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होय तैसें होय आतां। देहें[3] बळी काय चिंता ॥ छ ॥ पडिलें पल्लवीं। त्याचा धाक वाहे जीवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जीणें। देवा काय हीनपणें ॥ ३ ॥

३१८५. आळणी ऐसें कळों आलें। त्यासी भलें मौनें[4] चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये कांहीं वेचूं वाणी। वेडे घाणीसांगातें ॥ छ ॥ वेगळें तें देहभावा। भ्रम जीवा माजिरा ॥ २ ॥ तुका ह्मणे कवतुक केलें। किंवा भलें दवडितां ॥ ३ ॥

३१८६. चित्ताचा चाळक। त्याचें उभय सूत्र एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाचवितें नानाछंदें[5]। सुखें आपुल्या विनोदें ॥ छ ॥ चंद्र कमळणी। नाहीं धाडीत सांगोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे उठी। लोह चुंबकाचे दृष्टी ॥ ३ ॥

३१८७. करितां तडातोडी। वत्सा माते सोई ओढी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करित्याचा[6] आग्रह उरे। एक एकासाटीं झुरे ॥ छ ॥ भुके इच्छी अन्न। तें ही त्यासाटीं निर्माण ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती। एक एकाचिये चित्तीं ॥ ३ ॥

३१८८. निघालें दिवाळें। जालें देवाचें वाटोळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां वेचूं नये वाणी। विचारावें मनिच्या मनीं ॥ छ ॥ गुंडाळिलीं पोतीं। भीतरी लावियेली वाती ॥ २ ॥ तुका ह्मणे करा। ऐसा राहे[7] माजी घरा ॥ ३ ॥

३१८९. तीर्थाचिये[8] पंथें चाले तो निदेव। पाविजेतो ठाव अंतराय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि भलें निश्चळ चि स्थळीं। मनाचिये मुळीं बैसोनियां ॥ छ ॥ संकल्पारूढ तें प्रारब्धें[9] चि जिणें। कार्य चि कारणें[10] वाढतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे कामा[11] नाहीं एक मुख। जिरवितां सुख होतें पोटीं ॥ ३ ॥

३१९०. क्षणक्षणा हा चि करावा विचार। तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाशिवंत देह जाणार[12] सकळ। आयुष्य खातो काळ सावधान ॥ छ ॥

---

१ पं. ऐसा तो हा जीव हीनबुद्धि।.–२ दे. पं. आपण्या –३ पं. देहबळ.–४ दे. त. मौन्य.– ५ पं. नानाछंदें.–६ पं. वारित्याचा –७ पं. राहो –८ दे. तीर्थाचिये आस। पथ तो निट देव।.– ९ पं. पराधीन जीणें –१० पं. कारण.–११ पं. नाहीं कामा एक०.–१२ पं. जाणा रे.

संतसमागमीं धरूनि आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥ २ ॥ तुका ह्मणे येहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरूनि राहों ॥ ३ ॥

३१९१. कोणाशीं विचार करावा सेवटीं । एवढ्या लाभें तुटी जाल्या तरे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांभाळितो शूर आला घावडाव । पुढें दिला पाव न करी मागें ॥ छ ॥ घात तो या नांवें येथें अंतराय । अंतरल्या पाय गोविंदाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे गेंडसंदीचा हा ठाव । केला तो उपाव कार्या येतो ॥ ३ ॥

३१९२. असा जी सोंवळे । आहां तैसे चि निराळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मीं नयों तुमच्या वाटा । काय लटिका चि तांठा ॥ छ ॥ चिंतन चि पुरे । काय सलगी सवें धुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । नका नावडे ते सेवा ॥ ३ ॥

३१९३. अहंकार तो नासा भेद । जगीं निंद्यें ओंवळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नातळे तो धन्य योसी । जाला वंशीं[6] दीपक ॥ छ ॥ करवितो आत्महत्या । नेदी सत्या आतळों ॥ २ ॥ तुका ह्मणे गुरुगुरी । माथां थोरी धरोनि ॥ ३ ॥

३१९४. इच्छिलें ते शकुनवंती । होय देती तात्काळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षीरा नीरा निवाड करी । बरावरी विठ्ठल ॥ छ ॥ भाग्यावीण कैंचें फळ । अंतर मळमूत्राचें ॥ २ ॥ तुका ह्मणे संचित कुडें । तें वापुडें करीतसे ॥ ३ ॥

३१९५. काशासाटीं आह्मी जाळिला संसार । न करीं विचार ऐसा देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसें नेणों तुह्मां करवतें उदास । माझा प्रेमरस भंगावया ॥ छ ॥ समर्पूनि टेलों देह हा सकळ । धरितां विटाळ न लज्जा माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघी मोकलूनि आस । फिरतों उदास कोणासाटीं ॥ ३ ॥

३१९६. नाहीं तुह्मां कांहीं लाविलें मागणें । कांटाळयाच्या भेणें त्रासलेती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ॥ छ ॥ पायांच्या वियोगें प्राणासवसाटी । [10]नेघवेसी तुटी जाली आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां मागणें तें आतां । हें चि कृपावंता चरणीं वास ॥ ३ ॥

३१९७. जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धर्म भूतांची ते दया । [12]सत्य कारण ऐसीया ॥ छ ॥ नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगे संत ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें । दावी उमटूनि अनुभवें ॥ ३ ॥

---

१ दे. त. येह लोकीच्या.–२ पं. गडनधीचा.–३ पं. ताटा.–४ दे. निंदे.–५ पं. त्यासी–६ दे. वंपीं. त. वर्सी.–७ पं. ब्रह्महत्या । नेदी आत्या आतळों ॥.–८ पं. करावा.–९ दे. त. प्राणान्वें साटी.–१० दे. पं. ने घवेसी –११ दे. मागेन.–१२ पं. संत.

३१९८. दंड अन्यायाच्या माथां । देखोनि करावा सर्वथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये उगे वहुतां घाटूं । सिसें सोनियांत आटूं ॥ ध्रु. ॥ पापपुण्यासाटीं । नीत केली सत्ता[1] खोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥ ३ ॥

३१९९. आह्मी पापी[2] तूं पावन । हें तों पूर्वापारें[3] जाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें तेणें ॥ ध्रु. ॥ राखावा[4] तो ठाव । मिरासी करोनि उपाव ॥ २ ॥ वादें मारी हाका । देवा आइकवी[5] तुका ॥ ३ ॥

३२००. पाडावी ते बरी । गांठी धुरेसवें खरी[6] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये मरों लंडीपणें । काय वापुडें तें जिणें ॥ ध्रु. ॥ लुटावें भांडार । तरी जया नाहीं पार ॥ २ ॥ तुका ह्मणे नांवें । कीर्ती आगळीनें ज्यावें ॥ ३ ॥

३२०१. भंजनें[7] चि जालें । मग जीवाचे काय आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥ ध्रु. ॥ करितां सरोवरी[8] । कांहीं न ठेवावी उरी ॥ २ ॥ तुका ह्मणे शूर । व्हावे धुरेसीं च धुर[9] ॥ ३ ॥

३२०२. जन्मांतरीं शुद्ध नाहीं आचरण । यालागीं चरण अंतरले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोडवलें संचित येणें जन्में पाहतां । आतां पंढरिनाथा कृपा करीं ॥ ध्रु. ॥ पतितपावन ब्रिदं[10] साच करीं देवा । यालागीं कुंढावा[11] करीं माझा ॥ २ ॥ अपराधी पातकी दुष्ट दुराचारी । ओहळलों[12] भारी संवसारें ॥ ३ ॥ कामक्रोध आदि कल्पनेच्या त्रासें । तुज न पवें ऐसें जालें[13] देवा ॥ ४ ॥ हा ना तोसा ठाव जाला पांडुरंगा । नये चि उपेगा काय करूं ॥ ५ ॥ आपुलिया नांवा धांवणिया धांवें । लवकरी यावें तुका ह्मणे ॥ ६ ॥

३२०३. प्रथमभेटी[14] आलिंगण । मग चरण वंदावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनि ॥ ध्रु. ॥ न सांगतां[15] सीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंतें । द्यावें भातें न मागतां ॥ ३ ॥

३२०४. वचनाचा अनुभव हातीं । बोलविती देव मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि हें न कळे अभाविकां । जडलोकां जिवांसी ॥ ध्रु. ॥ अश्रुत[16] हे प्रसादिक । कृपा भीक स्वामीची ॥ २ ॥ तुका ह्मणे बराबरी । जातों तरी सांगत ॥ ३ ॥

---

१ पं. आता.–२ आह्मी पतितपावन।.–३ पं. पूर्वापर.–४ पं. मिरासीचा ठाव। राखा करोनि उपाव॥–५ पं. ऐक्वीतो.–६ पं. करी–७ पं. भोजन.–८ पं. सरोभरी.–९ दे. धुरे–१० पं. "ब्रिद" नाहीं.–११ पं. कुडावा.–१२ दे. पं. अहाळलों.–१३ पं. जालों.–१४ दे. प्रेमभेटी.–१५ दे. त. संगतां.–१६ पं. अनश्रुत.

३२०५. कां रे तुह्मीं ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोडवलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥ छ ॥ पुसिलें पडळ तिमिरें[1] विठ्ठलें । जग चि भरलें ब्रह्मानंदें ॥ २ ॥ तुका ह्मणे केलों कामनेवेगळा । आवडी गोपाळावरी वसे ॥ ३ ॥

३२०६. आसन शयन भोजन गोविंदें । भरलें आनंदें त्रिभुवन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघियां केली काळें तडातोडी । अवसर[2] घडी पुरों नये ॥ छ ॥ वांटणी घातले शरीराचे भाग । दुजियाचा लाग खंडियेला ॥ २ ॥ आवडीच्या आलें आहारासी रूप । पृथक संकल्प मावळले ॥ ३ ॥ काम तरी क्रोध बुद्धि मन नासे । भ्रमाचे वोळसे गिळिले शांती ॥ ४ ॥ तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ॥ ५ ॥

३२०७. ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढां नारायण स्मरवितो[3] ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ भवव्याधि येणें तुटेल रोकडी[4] । करूनियां झाडी[5] निश्चयेसी ॥ छ ॥ आणिकां उपायां अनुपान कठिण । भाग्यें बरें सोण शीघ्रव्रत ॥ २ ॥ तुका ह्मणे केला उघडा पसारा । भाग्य आलें घरा दारावरी ॥ ३ ॥

३२०८. जपाचें निमित्त झोपेचा पसरु । देहाची[6] विसरू पाहूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ ऐसीं[7] तीं भजनें अमंगळवाणी । सोंगसंपादणी बहुरूप्याची[8] ॥ छ ॥ संतेंसी[9] विकिलें लोभाचिये आसे[10] । तया कोठें असे उरला देव ॥ २ ॥ तुका ह्मणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आह्मी ॥ ३ ॥

३२०९. परद्रव्य परकांता । नातळे जयाचिया चित्ता । आणि कर्मी तो तत्वता । बांधला न वजाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा अनुभव रोकडा । विश्वासीतो जीवा जोडा । एकांत त्या पुढां । अवघा करी उकल ॥ छ ॥ सकट आंवलें तें[11] अन्न । शोधी तें चि मद्यपान । विषमानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥ २ ॥ तुका ह्मणे नित । बरवें अनुभवें उचित । तरी काय हित । मोलें घ्यावें लागतें ॥ ३ ॥

३२१०. भूक पोटापुरती । तृष्णा भैरवी[12] वाखती । करवी फजीती । हांवें भार वाढला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कुळिकेसी लांस फांस । डोई[13] दाढी वोडवी दोष । अविहितनाश । करवी वजनें[14] चुकतां ॥ छ ॥ विधिसेवनें[15] विहितें ।

१ दे. त. पं. त्रिमिर.—२ दे. त. अवश्वरु.—३ दे. श्रमवितो.—४ पं. रोकडा.—५ पं. झाडा.—६ पं. देतां हा विचारु पाहूनियां.—७ पं. ऐसें तें भजन.—८ पं. भोरप्याची.—९ दे. त. सेवेकिशीं केलें लोभा०.—१० पं. आशे.—११ पं. "ते" नाहीं—१२ पं. भरी.—१३ पं. दाढी डोई.—१४ वचन.—१५ त. विधिसेवन.

कार्यकारणापुरतें । न वाटे जो चित्तें । अधर्माच्या तो त्यागी ॥ २ ॥ आज्ञापालणें ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका ह्मणे ठेवा । ठेविला तो जतन ॥ ३ ॥

३२११. कळे न कळे त्या धर्म । ऐका सांगतों रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासें उच्चारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो या दाखवील वाटा । तयां पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोटा । पाहिजे तो कळवळा ॥ छ्र ॥ पुसतां चुका होतो वाटा । सवें बोळेवा गोमटा । मोडों नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मोल । न लगे द्यावें वेचावें बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ॥ ३ ॥

३२१२. तरी कां वोळगणे । राजद्वारीं होती सुने ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंगीं दावुनि निष्कामता । पोकळ पोक्ळी ते वृथा ॥ छ्र ॥ कासया मोकळ । भोंवतें शिष्यांचें गावाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे ढाळे । बैहिर गुदे तें निराळें ॥ ३ ॥

३२१३. हरिच्या दासां सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कडिये देव वोंहेर खांदीं । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥ छ्र ॥ सर्तती येणें आटाआटी । नाहीं तुटी लाभाची ॥ २ ॥ तुका ह्मणे समाधान । सदा मन आमुचें ॥ ३ ॥

३२१४. भूतांचिये नांदे जीवीं । गोसावी च सकळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षणक्षणां जागा ठायीं । दृढ पायीं विश्वास ॥ छ्र ॥ दावूनियां सोंग दुजें । अंतर बीजें वसतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणे धर्म । धरी तें वर्म चिंतन ॥ ३ ॥

३२१५. संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासयानें पूजा करूं । चरण हृदयीं च धरूं ॥ छ्र ॥ काया कुरवंडी । करुन ओंवाळून सांडी ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥ ३ ॥

३२१६. भेद तुटलियावरी । आह्मी तुमचीं च हों हरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पाळावे पाळावे । आह्मां लडिवाळांचे लळे ॥ छ्र ॥ आणिकांची देवा । नाहीं जाणत चि सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे हेवा । माझा हेत पायीं देवा ॥ ३ ॥

३२१७. आमुची विश्रांति । तुमचे चरण कमळपती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढती पुढती नमन । घालूनियां लोटांगण ॥ छ्र ॥ हें चि एक जाणें । काया वाचा आणि मनें ॥ २ ॥ नीच जनालोकां । तंळिळे पायरीस तुका ॥ ३ ॥

---

१ पं. जया.–२ पं. वोळत्रा.–३ त. वेचा –४ पं. वाह्यरंग ते निराळे ।.–५ पं. वाहे खांदी – ६ दे. सतंत ते आटा ०.–७ पं. "हो" नाहीं.–८ पं तुझे. त. 'आमुची विश्रांति०' हा अभंग दुवार (अभंग ३२२६ व ३९६७ पाहा) आहे, त्यापैकीं दुसऱ्या ठिकाणीं 'तुझे' असें आहे. दे. 'आमुची विश्रांति०' हा अभंग दुवार (दे. भा. २, अ १०७ व ९०५ पाहा) आहे, त्यापैकीं दुसऱ्या ठिकाणीं 'तुझ्यारूपें कमळापति' असें आहे. ९ दे. हा अभंग दोनदां आढळतो (टीप ८ पाहा; त्यांपैकीं दुसऱ्या ठिकाणीं 'जाणा' असें आहे.–१० पं. तळील.

३२१८. विनवितों सेवटीं । आहे तैसें माझे पोटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कंठीं राहावें राहावें । हें चि मागतसें भावें ॥ छ ॥ पुरली वासना । येणें होइल नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे जो देहाडा । तो चि वर्णीन पवाडा ॥ ३ ॥

३२१९. आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसीं उफराटीं वर्मे । कळों श्रमें न येती ॥ छ ॥ न लगे समाधान मोल । रुचती बोल प्रीतीचे ॥ २ ॥ तुका ह्मणे एका जीवें । सूत्र व्हावें गुंतलें ॥ ३ ॥

३२२०. बाळ माते लाते वरी । मारी तेणें संतोषे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख वसे चित्ता अंगीं । तें हें रंगीं मिळालें ॥ छ ॥ भक्षी त्याचा जीवमार्गे । आला भाग तो बरा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऋणानुबंधें । सांगे सुदें सकळां ॥ ३ ॥

३२२१. शिजल्यावरी जाळ । वांयां जायाचें तें मूळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा वारावा तो श्रम । अतिशयीं[3] नाहीं काम ॥ छ ॥ सांभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥ ३ ॥

३२२२. उभा ऐल थडी । तेणें घालूं नये उडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥ छ ॥ दिसतें आहारीं । नये जाऊं ऐशावरी ॥ २ ॥ अळसाची धाडी । तुका ह्मणे वहु नाडी ॥ ३ ॥

३२२३. शक्ती घ्याव्यां देवा । नाहीं पार्थिवांची सेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ छ ॥ मना पोटीं देव । जाणे जैसा तैसा भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ॥ ३ ॥

३२२४. कार्य चि कारण । तृष्णा पावविते[6] सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करुनि ऐसा संग । सोसें चि तूं पांडुरंग ॥ छ ॥ रूपीं नाहीं गोडी । हांवें हांवें ऊर फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे पडे भारी । ऐशा वरदळाचे थोरी ॥ ३ ॥

३२२५. संसाराच्या नांवें घालूनियां शून्य । वाढता हा पुण्य केला धर्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिभजनें हें धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥ छ ॥ कोणां ही नलगे साधनांचा पांग । करणें केला त्याग देहबुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख समाधि हरिकथा । नेणें भवव्यथा गाईल तो ॥ ३ ॥

३२२६. विश्वासिया नाहीं लागत सायास । रंग अनायासें अंगा येतो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लेंकराच्या हातें घास मागे माता । वोरसोनि चित्ता सुख पावे ॥ छ ॥

---

१ दे. व्होत्रें.–२ पं. जीव मागे–३ त. अतित्याई.–४ पं. द्यावी.–५ दे. पदार्थी.–६ पं. वाढविते.–७ दे. त. भववेथा.–८ पं. अनायासे रस अगा०.

गौरव त्यां[1] मानी आरुषा वचनीं । भूषण ते वाणी मिरवावी ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे सकळ ही साक्षी । माझा कई पक्षी पांडुरंग ॥ ३ ॥

३२२७. वैभवाचे धणी सकळां[2] शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥ छ ॥ जाणोनि नेणोनि अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणच ॥ २ ॥ तुका ह्मणे वरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें[3] वाढविते ॥ ३ ॥

३२२८. कई ऐसी दशा येइल माझ्या आंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाठवुनि देह पायांचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मधीं ॥ छ ॥ कांय[4] ऐसा पात्र होईन लाभासी । नेणों हृषीकेशी तुष्टेइल ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥ ३ ॥

३२२९. नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें । स्वामिसेवा[5] काज निर्धारु हा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार । येणें फिटे भार निश्चयेसी ॥ छ ॥ आळीकरें[6] आह्मी एकविध चित्तें । तेसें होऊं येतें मायबापें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी ये जातीची सेवा । घातलासे देवावरी भार ॥ ३ ॥

३२३०. काय नाहीं माझे अंतरीं वसति । व्यापक हा भूतीं सकळां[7] नांदे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चित्तासी प्रसाद होईल चळण । तें चि तें वळण मनासही ॥ छ ॥ सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंटित । नाहीं केलें होतें[8] आपुलें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे दोरी खांब सूत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥ ३ ॥

३२३१. देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासी होती विकल्प ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाहिलें देह हें देवा एकसरें । होईल तें बरें तेणें[9] द्वारें ॥ छ ॥ होता भार त्याची निवारली खंती । येथें आतां रिती साटवण ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छे पावविले कष्ट । ह्मणऊनि नष्ट दुरावली ॥ ३ ॥

३२३२. देव तीर्थ[10] येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया वरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतरायें[11] ॥ छ ॥ शुद्धाशुद्धठाव पापपुण्यबीज । पांवतील[12] दुजे फळभोग ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभराऐसें वर्म । चुकविल्या धर्म अवघे मिथ्या ॥ ३ ॥

---

१ पं. तो–२ पं. सकळ–३ पं. स्तनपान.–४ पं. कई.–५ दे. त. स्वामिसेवेकाजें.–६ पं. आळीकर –७ पं. सकळाच्या.–८ त. हीत.–९ त. कोण्या.–१० पं. तीर्थी.–११ पं. अंतराया.–१२ पं. पावविले.

३२३३. काय करूं सांगतां ही ने कळे वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मन आधीं ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्ता केली चाले ॥ छ ॥ [2]अभुकेचे अंगीं चवी ना सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥ २ ॥ तुका ह्मणे आप राखावें आपणा । संकोचों चि कोणा नये आतां ॥ ३ ॥

३२३४. अमृत अव्हेरें [3]उचळलें जातां । विष आर्त्तभूतां आवश्यक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आदरासी मोल नये लावूं केजें । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥ छ ॥ खऱ्याचिये अंगीं [4]आपणचि चाली । लावणी [5]लाविली काय लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे [6]चाडे करा वेवसाव । आह्मांसी तो वाव धीर आहे ॥ ३ ॥

३२३५. अनुभवाचे रस देऊं आर्त्तभूतां । सोइं चोजवितां पुढें पोतीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलिया ॥ छ ॥ आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥ ३ ॥

३२३६. काय मज एवढा भार । हे वेव्हार [7]चालवाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उकल तो जाणे धणी । मज भोजनीं कारण ॥ छ ॥ चिंता ज्याची तया शिरीं । लेंकरीं तें खेळावें ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवट झाला । देव या बोला भोगिता ॥ ३ ॥

३२३७. [8]न गमे न गमे न गमे हरिविण । न गमे न गमे न गमे मेळवा शाम कोणी गे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तळमळ करी तैसा जीव जळाविण मासा । दिसती दिशा ओसा वो ॥ छ ॥ नाठवे भूक तान विकळ जालें मन । घडी जाय प्रमाण जुगा एकी वो ॥ २ ॥ जरी तुह्मी नोळखा सांगतें ऐका । तुकयाबंधूचा सखा जगजीवन ॥ ३ ॥

३२३८. विठ्ठला रे तुझे वर्णितां गुणवाद । विठ्ठला रे दग्ध जालीं पापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठला रे तुझें पाहातां श्रीमुख । विठ्ठला रे सुख जालें नयना ॥ छ ॥ विठ्ठला रे तुज देतां आलिंगन । विठ्ठला तनमन निवाल्या बाह्या ॥ २ ॥ विठ्ठला रे तुझी ऐकतां कीर्त्ति । विठ्ठल हे[9] विश्रांति पावले स्मरणें ॥ ३ ॥ विठ्ठला रे तुकयाबंधु ह्मणे देहभाव । विठ्ठला जीवीं पाव धरितां गेला ॥ ४ ॥

३२३९. एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तो ही मळ नाहीं येथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्यावें द्यावें आह्मीं आपुलिया सत्ता । न देखों पुसता दुजा कोणी ॥ छ ॥

---

१ पं. नकळे तें वर्म । –२ त. पं. आभुकेचे.–३ पं. उचवले.–४ दे. पं. आपणे –५ पं. लागली –६ पं. चाड.–७ दे. त. चाव्लवाया.–८ दे. न गमे न गमे न गमे हरिविण । न मगे न मगे न मगे मेळवा०.–९ त. "हे" नाहीं.

भांडाराची किली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहें वान येथें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां विश्वासाच्या बळें । ठेविलें मोकळें देवें येथें ॥ ३ ॥

३२४०. स्मरणाचे वेळे । व्हावें सावध[1] न कळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पडिलों विषयांचे ओढीं । कोणी न दिसेसें[2] काढी ॥ ध्रु ॥ भांडवल माझें । वेच जालें भूमी॰ओझें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । तूं चि धावें ऐसे वेळे ॥ ३ ॥

३२४१. पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक नाहीं एका ऐसे । दावी कैसे शुद्ध हीन ॥ ध्रु ॥ पंचभूतें एकी रासी । सूत्रें कैसीं खेळेंवी ॥ २ ॥ तुका[3] ह्मणे जे जे जाती । तैसी स्थिति येतसे ॥ ३ ॥

३२४२. कोणाचिया न पडों छंदा । गोविंदासी आळवूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुतांचीं बहु[4] मतें । अवघे रितें[5] पोकळ ॥ ध्रु ॥ घटापटा ढवळी मन । होय सीण न करूं तें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंग । भरूं भाग[6] आला तो ॥ ३ ॥

३२४३. एकवेळ करीं या दुःखावेगळें । दुरिताचें जळें उगवूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ आठवीन पाय हा माझा नवस । रात्री हीं[7] दिवस पांडुरंगा ॥ ध्रु ॥ बहु दूरवरी भोगविलें भोगा[8] । आतां पांडुरंगा सोडवावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काया करीन कुरवंडी । ओंवाळूनि सांडीं मस्तक हें ॥ ३ ॥

३२४४. आणीक त्यां कोणा यावें काकुळती । कोण कामा येती अंतकाळीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं वो माझी सखी होसी पांडुरंगे । लवकरी ये गे वाट पाहें ॥ ध्रु ॥ काया वाचा मनें हें चि कांम करीं । पाउलें गोजिरीं चिंतीतसें[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी पुरवीं हे आस[10] । घालीं ब्रह्मरस भोजन हें ॥ ३ ॥

३२४५. आह्मांसी[11] सकळ । तुझ्या नामाचें चि बळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूं अमृताचें पान । दुजें नेणों कांहीं आन ॥ ध्रु ॥ जयाचा जो भोग । सुख दुःख पीडों[12] रोग ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुझे पायीं माझा हेवा ॥ ३ ॥

३२४६. आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यासी तुह्मी कृपावंता । माझी चिंता असों द्या ॥ ध्रु ॥ तळमळ करी चित्त । अखंडित वियोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । जाणें[13] वेथा अंतरींची ॥ ३ ॥

---

१ पं. सावधान कळे.–२ पं. ओळखावीं.–३ पं. तुका ह्मणे जो जे जाती । त्याची स्थिति तैसी ते ॥.–४ पं. वहुत.–५ पं. रिती.–६ पं. भागा आले तें.–७ पं. वो.–८ त. भोगविले भोगे । आतां पांडुरंगे॰. दे. भोगविले भोग । आतां पांडुरंग–९ पं. येमी.–१० पं. आस–११ दे. हें आह्मां सकळा ।.–१२ दे. त. पीडी.–१३ पं. जाणां.

३२४७. बहु जन्मांतरें फेरे । केले येरे सोडवीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आळवितों करुणाकरे । विश्वंभरे दयाळे ॥ छ्र ॥ वाहवतों मायापुरीं । येथें करीं कुढावो ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजा कोण । ऐसा सीण निवारी ॥ ३ ॥

३२४८. कराल तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोडवूनि घ्यावें काळचक्रीं हातीं । बहुत विपत्ती भोगविल्या ॥ छ्र ॥ ज्यालें जीवों नेदी मारिलें चि मरे । प्रारब्ध तें उरे मागुतालें ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजा खुंटला उपाय । ह्मणऊनि पाय आठविले ॥ ३ ॥

३२४९. धौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतसंगें सारूं काळ । प्रेमसुखाचा कल्लोळ ॥ छ्र ॥ ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥ २ ॥ नाहीं वैकुंठींचा पांग । धांवे कथे पांडुरंग ॥ ३ ॥ मुक्त व्हावें काशासाटीं । कैची येणें रसें भेटी ॥ ४ ॥ तुका ह्मणे गोड । हें चि धुरे माझें कोड ॥ ५ ॥

३२५०. फोडिलें भांडारें । माप घेऊनियां खरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केली हरिनामाची वरो । मागितलें आतां सरो ॥ छ्र ॥ देशांत सुकाळ । जाला हारपला काळ ॥ २ ॥ घ्यावें धणीवरी । तुका ह्मणे लाहान थोरीं ॥ ३ ॥

३२५१. आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंद चि अंग आनंदाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सांगों जालें कांहींचियाबाही । पुढें चाली नाहीं आवडीनें ॥ छ्र ॥ गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा आला ॥ ३ ॥

३२५२. ह्मणऊनि धारिले पाय । अवो माय विठ्ठले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलें चि करूनि घ्यावें । आश्वासावें ना भीसें ॥ छ्र ॥ वाढली ते तळमळ चित्तीं । शम आतां करावी ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवीं वसे । मज नसे वेगळी ॥ ३ ॥

३२५३. कल्याण या आशीर्वादें । जाती द्वंद्वें नासोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आश्वासिलें नारायणें । प्रेमदानें अंतरिंच्या ॥ छ्र ॥ गेली निवारोनि आतां । सकळ चिंता यावरि ॥ २ ॥ तुका ह्मणे गातां गीत । आलें हित सामोरें ॥ ३ ॥

---

१ पं. कुडावा.–२ पं. काळाचक्राहातीं.–३ दे. ज्यालें जेऊं नेदी मारिलें चि मरो । प्रारब्धा उरो मागुतालीं. त. ज्यालें जेऊं नेदी मारिलें चि मरे । प्रारब्धा उरे मागुतालें ॥.–४ त. दे. सुराणी.– ५ पं. तुटी –६ पं. माझें पुरे.–७ दे. त. फोडिलें भांडार ।.–८ त. अनुभवा –९ दे. आह्मास.– १० दे. चिता.

३२५४. हरिनामवेली[1] पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावेली[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें[3] माझ्या मना होईं पक्षिराज । साधावया काज तृप्तीचें[4] या ॥ छ्र ॥ मुळींचिया बीजें दाखविली गोडी । लवकर[5] चि जोडी जालियाची ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षणक्षणां जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ३ ॥

३२५५. बरवें ऐसें आलें मना । नारायणा या काळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव आह्मा प्राणसखा । जालें दुःखा खंडण ॥ छ्र ॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । होत्या त्यांसी फळ आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे निजठेवा । होईल देवा[6] लाधलों ॥ ३ ॥

३२५६. जरि हे आड येती लाज । कैसें काज साधतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैरणें[7] केलें उठाउठी । पायीं मिठी घातली ॥ छ्र ॥ समर्पिला जीव भाव । धरिला भाव अखंड ॥ २ ॥ तुका ह्मणे आड कांहीं । काळ नाहीं घातला ॥ ३ ॥

३२५७. पात्र शुद्ध चित्त ग्वाही[8] । न लगे कांहीं सांगणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शूर तरी सत्य चि[9] व्हावें । साटी जीवें करूनि ॥ छ्र ॥ अक्षुप च सुखमान । स्वामी जन मानावें ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी वाणी । तैसे[10] मनीं परिपाक ॥ ३ ॥

३२५८. प्रगटलें ज्ञान । नारायण भूतीं तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुभव च घेऊं व्हावा । विनंती देवा करूनियां ॥ छ्र ॥ देखोवेखीं वदे वाणी । पडिल्या कानीं प्रमाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे योगक्षेम । घडे तें वर्म साधावें ॥ ३ ॥

३२५९. मुख्य आधीं विषयत्याग । विधिभाग पाळणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनें[11] पावे समाधान । हें चि दान देवाचें ॥ छ्र ॥ उदासीन वृत्ति देहीं । चाड नाहीं पाळणें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं भय । सम सोय विषमाची ॥ ३ ॥

३२६०. आतां हें चि सार हें चि सार । मूळबीज रे आइका[12] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडीनें आवडी उरे । जें ज्या झुरे तें त्यासी ॥ छ्र ॥ प्रेमाचिया सूत्रदोरी । नाहीं उरी उरवी ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंतन बरें । आहे[13] खरें खऱ्यापें ॥ ३ ॥

३२६१. केला तैसा अंगीकार । माझा भार चालवीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होऊं अंतराय बुद्धी । कृपानिधी नेदावी ॥ छ्र ॥ आह्मी तरी जड जीव । कैंचा भाव पुरता ॥ २ ॥ अनन्यभावें घ्यावी सेवा । आह्मां देवा घडेसी ॥ ३ ॥ तुह्मीं आह्मी शरणागतें । कृपावंतें रक्षीजे ॥ ४ ॥ तुका ह्मणे भाकूं कींव । असों जीव[14] जड आह्मी ॥ ५ ॥

---

१ पं. हरिनामवल्ली –२ दे. वोल्हावला –३ पं. येथे –४ पं. तृप्तीच या. –५ पं. लाहोकरी जोडी०. – ६ दे. त. देवा. –७ दे. कारण. –८ दे. गोही. –९ पं. " चि " नाहीं. –१० पं. तैसा. –११ पं. मना – १२ पं. ऐका –१३ आहो –१४ पं. जडजीव.

३२६२. सोसें बहुगर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाहीं सखीं ऐसीं । तेथें कोणी भेटलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं करीं रे स्वहित । देह तंव हे अनित्य । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनि ॥ छ्र ॥ पाळी तोंडींचिया घांसें । तें चि होय अनारिसें । ज्या नव्हे ऐसें । खेदी परि सोडवीना ॥ २ ॥ तुका ह्मणे धनमानें । माझ्या बाटलों मीपणें । नाहीं दिला जनें । देखों लोभें हा लाभ ॥ ३ ॥

३२६३. इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप । आह्मांसी स्वरूपस्थिती चाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां नव्हे माझा भाव अनारिसा । पाउलांनीं इच्छा गोवियेली ॥ छ्र ॥ लेंकरासी कोठें जाणत्याची परी । करूं येते दुरी धरावया ॥ २ ॥ लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भंगूं नका ॥ ३ ॥ घेसील वेढे मुक्तीच्या आभिळासें । चाळवीं जा पिसे ब्रह्मज्ञानी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझा कोठें भक्तिरस । पाडाच्या ओस चाळविसी ॥ ५ ॥

३२६४. आह्मां भाविकांची जाती । एकविध जी श्रीपती । अळंकारयुक्ति । सरों तेथें शके चि ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणें माउली त्या खुणा । क्षोभ उपजों नेदी मना । शांतवूनि स्तना । लावीं अवो कृपाळे ॥ छ्र ॥ तुज अवघें होऊं येतें । मज घाटों नये चित्तें । उपासने परतें । नये कांहीं आवडों ॥ २ ॥ करूं रूपाची कल्पना । मुखीं नाम उच्चारणा । तुका ह्मणे जना । जल स्थल देखतां ॥ ३ ॥

३२६५. ज्यावें हीनपणें । कासयाच्या प्रयोजनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रारब्धीं संसार । बरी हिमतीची थार ॥ छ्र ॥ होणार ते कांहीं । येथें अवकळा नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । कृपा केलिया बरवें ॥ ३ ॥

३२६६. किती रांडवेंडे । घालूनि व्हाल रे बापुडे । संसाराचे भिडे । कासावीस जालेती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठेवी अंगसंगा । विश्वासियां जवळी ॥ छ्र ॥ कांहीं न मागतां भलें । होईल तें चि काम केलें । नसावें आथिलें । कांहीं एका संकल्पें ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । पाववील ठायाठाव । एकविध जीव । ठेविलिया सेवेसी ॥ ३ ॥

३२६७. बाप करी जोडी लेंकराचे ओढी । आपुली करवंडी वाळवूनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाएकीं केलों मिरासीचा धनी । कडिये वागवूनी भार खांदीं ॥ छ्र ॥

१ त. वाटविलों.–२ प. लाभ आलाभ.–३ पं. धरायाचे.–४ प. नको.–५ पं. घेसी आदि वेढे०.–६ दे. त "तेथें" नाहीं–७ पं. आवडे.–८ पं. नारायणा.–९ पं. एक सरल्यें–१० त. करवडी–११ दे. त. केलों.–१२ पं. वाऊनी

लेवऊनी पाहे डोळा अळंकार । टेवों दावी थोर करूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे नेदी गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥ ३ ॥

३२६८. या रे हरिदासानो जिंकों कळिकाळा । आमुचिया बळा पुढें किती बापुडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रंग सुरंग घमंडी न ना छंदें । हास्यविनोदें मनाचिये आवडी ॥ ध्रु ॥ येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ॥ २ ॥ वांकड्या माना बोल बोलावे आर्ष । येईल तो त्यांस छंद पढीयें गोविंदा ॥ ३ ॥ आपुलालें आवडी एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान या प्रसंगीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे येथें प्रेम भंगूं नये कोणीं । देव भक्त दोन्ही निवाडितां पातक ॥ ५ ॥

३२६९. अवघा च अन्यायी । तेथें एकल्याचें काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां अवघें एकवेळें । जळोनि सरो तें निराळें ॥ ध्रु ॥ काय माझें खरें । एवढें च राखों बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । परिहार न लगे चित्ता ॥ ३ ॥

३२७०. काय वृंदावनें मोहियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी अधमाची जाती च अधम । उपदेश श्रम करावा तो ॥ ध्रु ॥ न कळे विंचासी कुरवाळिलें अंग । आपले ते रंग दावीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे नये पाकासी दगड । शूकरासी गोड जैसी विष्टा ॥ ३ ॥

३२७१. स्तवूनियां नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायणाचिया लोपें । घडलीं अवघीं चि पापें ॥ ध्रु ॥ जीव ज्याचें दान । त्याचा खंडूनियां[6] मान ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । आइके त्या दोष कानीं ॥ ३ ॥

३२७२. संतां नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे पोटाचे मारिले । देवां आशा विटंबिले ॥ ध्रु ॥ घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥ २ ॥ तुका ह्मणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥ ३ ॥

३२७३. अवो कृपावंता । होईं बुद्धीचा ये दाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ ध्रु ॥ वदवीं हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझे अंतर वेसवा ॥ ३ ॥

३२७४. नाहीं म्या वांचिला मंत्र कोणापाशीं । राहिलों जीव सीं धरूनि तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विटेवरी भोंवें[11] ठेवियेलें मन । पाडलें समान चिंतीतसें ॥ ध्रु ॥

१ पं. घालूनिया.—२ दे. त. टेवा.—३ दे. त. डंग्रवण.—४ प. आयुष्या —५ पं. नारायणाचिर्दे.—६ पं. खडूं नये.—७ पं. देवे.—८ पं. तूं.—९ पं. त. वसावा —१० पं. धरूनियां ।.—११ दे. भाव.

पावविलों[1] पार धरिला विश्वास । घालूनियां कास वळकट ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें पावले उद्धार । तिहीं हा आधार ठेविलासे ॥ ३ ॥

३२७५. चंचेळीं[2] चंचळ निश्चळीं निश्चळ । वाजवी खळ ळ उदकासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ ध्रु० ॥ रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेची ते नका सरी धरूं ॥ २ ॥ तुका ह्मणे भय धरी रज्जूसाटीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ३ ॥

३२७६. आवडी येते[3] कळों । गुणें चिन्हें उमटती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोटीचें ओठीं उभें राहे । चित्त साहे मनासी ॥ ध्रु० ॥ डोहोळियांची[4] भूक गर्भा । ताटीं प्रभा प्रतिबिंबे ॥ २ ॥ तुका ह्मणे मानोन घ्यावें । वाटे खावें वाटतें ॥ ३ ॥

३२७७. काय ऐसी वेळ । वोडवली अमंगळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आजि दुखवलें मन । कथाकाळीं जाला सीण ॥ ध्रु० ॥ पापाचिया गुणें । त्यांचिया वेळे दर्षणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कानीं । घालूं आले दुष्टवाणी ॥ ३ ॥

३२७८. कितीवेळां जन्मा यावें । नित्य व्हावें फजीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोबासी ॥ ध्रु० ॥ प्रारब्ध पाठी गाढें । न सरे पुढें चालतां ॥ २ ॥ तुका ह्मणे रोकडी हे । होती[11] पाहें फजीती ॥ ३ ॥

३२७९. होतों[12] सांपडलों वेठी । जातां भेटी संसारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तों या वाटे कृपा केली । भेटी जाली विठोबासी[13] ॥ ध्रु० ॥ होता भार माथां माझे । बहु ओझें अमुप ॥ २ ॥ तुका ह्मणे केली चिंता । कोण दाता भेटेल ॥ ३ ॥

३२८०. भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ ध्रु० ॥ मातलें वोकंड[14] विःवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें[15] ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ३ ॥

३२८१. जा रे तुह्मी पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखें ॥ ध्रु० ॥ उभारोनि उभा कर । भवपार उतराया ॥ २ ॥ तुका ह्मणे तांतड मोठी । जाली भेटी उदंड ॥ ३ ॥

---

१ दे. पावविला.–२ दे. चचळ चंचळ निश्चळ निश्चळ ।. पं. चचळे–३ पं. ० येते गुणे । कळों चिन्हें०.–४ दे. डाहोळे याची. पं. डोहळे याची–५ त. मुळें.–६ पं. दर्शने–७ पं. किती.–८ पं. विठोसी.–९ दे. चालत.–१० दे. ०रोकडी हे । होती पिहें काढीत ॥–११ पं. होऊं.–१२ पं. होती.–१३ पं. विठोसी –१४ पं. माकड.–१५ पं. तेणें.

३२८२. गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सर्वे गोपाळा ॥ छ्र ॥ लोटांगणें[1] घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ३ ॥

३२८३. अनुसरे तो अमर जाला । अंतरला संसारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न देखती गर्भवास । कथीं दास विष्णूचे ॥ छ्र ॥ विसंभेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ॥ २ ॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । तुक्यां[2] रक्षिता तो जाला ॥ ३ ॥

३२८४. आतां केशीराजा हे चि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥ छ्र ॥ काळाचें खंडण घडावें चिंतन । धनमानजनविन्मुख[3] तो ॥ २ ॥ कफवातपित्त देहअवसानीं । ठेवावीं वारूनि दुरितें हीं ॥ ३ ॥ सावध तों माझीं इंद्रियें सकळें[4] । दिलीं एका[5] वेळे हाक आधीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं या सकळांचा जनिता । येथें ऐकतां सकळांसी ॥ ५ ॥

३२८५. चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हांव इंद्रियांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हात पाव दिसे शरीर चालतां । नावें भेद सत्ता जीवाची ते ॥ छ्र ॥ रवीचिये अंगीं प्रकाशक[7] कळा । वचनें निराळा भेद दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावें ॥ ३ ॥

३२८६. बोलोनियां काय दावूं । तुह्मी जीऊ जगाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे चि आतां माझी सेवा । चिंतन देवा करितों ॥ छ्र ॥ विरक्तासी देह तुच्छ । नाहीं आस कोणाची ॥ २ ॥ तुका ह्मणे पायापाशीं । येइन ऐसी वासना ॥ ३ ॥

३२८७. निजों नेदी[9] सकाळवेळीं । रातीकाळीं [10]चिनचिनी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोंगळानें घेतली पाठी । केली आटी जीवासी ॥ छ्र ॥ मेळऊनि [11]सवें जन । चिंता नेणे देवळीं च ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों घरा । तोंडा घोरा बाइलेच्या ॥ ३ ॥

३२८८. मायबाप सर्वे नये धनवित्त । करावें संचित भोगावें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि लाभ काय तो विचारीं । नको चालीवरी चित्त ठेवूं ॥ छ्र ॥ आयुष्य सेवटीं सांडूनि जाणार । नव्हे चि[12] साचार शरीर हें ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें लावियेलें माप । जयीं[13] धरी पापपुण्याची ही ॥ ३ ॥

१ पं. लोटांगणें.—२ दे. पं. तो रक्षिता जालिया (या अभंगात "तुका" नाहीं)—३ पं. तनमनधन विन्मुखता ।.—४ पं. सकळ—५ पं. एक—६ त. आदिक्येता.—७ पं. प्रकाश सकळा.—८ दे. त. देहाची.—९ दे. त. नव्हे.—१० त. चिणचिणी. दे. चिंन चिंनी—११ पं. कथा करणें—१२ दे. त. हें—१३ दे. त. जमे.

३२८९. मोटळें हाटीं सोडिल्या गांठी । विकऱ्या घातले कण । ज्याचे भाग त्यासी देऊनि वारिलें । सारूनि लिगाड दानें । खरें माप हातीं घेऊनि[3] बैसलों । मानिती ते चौघे जनें[4] । खरें वित्त तेथें आले चोजवीत । गिऱ्हाइक संतजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ झाडिला पालव केला हाट वेच । जाली सकाळीं च अराणूक । याल तरि तुह्मी करा लगबग । आमचे ते कोणी लोक ॥ छ ॥ एक तें[6] उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन । बहुतां जनाचे बहुत प्रकार । वेगळाले वाण । लाभ हाणि कोणा मुदल जालें । कोणासी पडिलें खाण । अर्धमर्ध कोणी गुंतोनि राहिले । थोडे तैसे बहु जन ॥ २ ॥ एँके सांते आले एँके गांवींहून । येकामे चि नव्हे जाणें । येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडीं एकें तेणें । लाग भाग एकी एकानीं गोविलें । मागील पुढिलां ऋणें । तुका ह्मणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें पेणें ॥ ३ ॥

३२९०. करा करा लागपाट । धरा पंढरीची वाट । जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतूनि । करा ह्मणऊनि । हा विचार ठायींचा ॥ छ ॥ होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमाना काळीं । हातपायटाळीं । जों मोकळीं आहेती ॥ २ ॥ कां रे घेतलासी सोसें[10] । तुज वाटत हे कैसें । तुका ह्मणे ऐसें । पुढें कैं लाहासी ॥ ३ ॥

३२९१. यत्न आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वास तो पायांवरि । ठेवुनि हरी राहिलों ॥ छ ॥ जाणत चि दुजें नाहीं । आणीक कांहीं प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे शरण आलों । नेणें बोलों विनवितां ॥ ३ ॥

३२९२. अनाथां जीवन । आह्मां तुमचे चरण । करूनि सांटवण । धरियेलें हृदयीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुष्ट जाली अंगकांति । आनंद न समाये चित्तीं । कवतुकें प्रीती । गाऊं नाचों उल्हासें ॥ छ ॥ करुणाउत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदूं दुरी । प्रेमप्रीतिपडिभरें ॥ २ ॥ मोहो मैं ते करी गोवा । ऐसें आहे जी केशवा । तुका ह्मणे सेवा । आणीक नाहीं जाणत ॥ ३ ॥

३२९३. सुखाची वसति जाली माझे जीवीं । तुमच्या गोसावी कृपादानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूप वेळोवेळां आठवीं अंतरीं । वैसोनि जिव्हारीं राहिलें तें ॥ छ ॥

---

१ दे. घातलें केण.–२ पं. दाणे.–३ पं. "घेऊनि" नाहीं.–४ पं. जणे.–५ पं. सकळी.–६ पं. "एक" नाहीं.–७ पं. एक.–८ पं. अस्तमानकाळीं । हातें वाहा टाळी । जों मोकळी आहे तों ॥.–९ त. दे. जें–१० पं. सोस । तुज वाटसे.–११ पं. ममते.

विसांवलें मन विठ्ठलें प्रपंचा । गोडावली वाचा येणें रसें ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं नाठवेसें केलें[1] । दुसरें विठ्ठलें मज आतां ॥ ३ ॥

३२९४. आह्मां कांहीं आह्मां कांहीं । आतां नाहीं या बोलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोल सांगा मोल सांगा । घेणें तिहीं गा पुसावें ॥ छ्र ॥ कैसें घडे कैसें घडे । बडबड तुज मज ॥ २ ॥ मुद्लें साटी मुद्लें साटी । लाभ पोटीं त्या[2] चे मधीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे साटवूं घरीं । आडल्या काळें पुसती तरी ॥ ४ ॥

३२९५. घ्या रे भाई घ्या रे भाई । कोणी कांहीं थोडें बहु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ य च हाटीं ये च हाटीं । बांधा गाठी पारखून ॥ छ्र ॥ वेच आहे वेच आहे । सरलें पाहे मग खोटें ॥ २ ॥ उघडें दुकान उघडें दुकान । रात्री[3] जाली कोण सोडी मग ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतकाळीं । जाती टाळीं बैसोनि ॥ ४ ॥

३२९६. मार्ग चुकले विदेशीं एकले । तयावरि जाले दिशाभुली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातीं धरूनियां पावविले घरा । त्याच्या उपकारा काय द्यावें ॥ छ्र ॥ तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा ह्मणऊनि ॥ २ ॥ सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ ३ ॥ उष्ण तान भूक एवढिये अकांतीं । वोसंगा लाविती काय ह्मणिजे ॥ ४ ॥ खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे । अन्याय हि मोटे साच केले ॥ ५ ॥ हातींचें हिरोनि घातला पाठीसी । तुका ह्मणे ऐसी परी जाली ॥ ६ ॥

३२९७. जैसी तैसी तरि वाणी । मना आणी माउली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लेकरांच्या स्नेहें गोड । करी कोड त्या गुणें ॥ छ्र ॥ मार्गे पुढें रिघे पोटीं । साहे खेटी कैरीतें[4] ॥ २ ॥ तुका विनवी पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥ ३ ॥

३२९८. गुंणांची[5] आवडी वाचेचा पसरु । पडिला विसरु ईतरांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आदिमध्यअंतीं नाहीं अवसान । जीवनीं जीवन मिळोनि गेलें ॥ छ्र ॥ रामकृष्णनाममाळा हे साजिरी । ओविली गोजिरी कंठाजोगी ॥ २ ॥ तुका ह्मणे तनु जालीसे शीतळ । अवघी सकळ ब्रह्मानंदें[6] ॥ ३ ॥

३२९९. देवाची भांडारी । आदा विनियोग करी ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ आतां न माखे हातपाय । नेणों[7] होतें ऐसें काय ॥ छ्र ॥ देवें नेली चिंता । जाला सकळ करिता ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । त्यासी अवघी पुरवणी ॥ ३ ॥

---

१ पं. जालें–२ पं. "च" नाहीं.–३ पं. रात्र.–४ पं. करीतसे–५ दे. गुणाचे.–६ पं. सर्वत्सां.–७ पं. नेणें.

३३००. पेणांवलें ढोर मार खाय पाठीं । बैसलें तें नुठी तेथूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी माझ्या मना परी जाली देवा । धावें अहंभावा सांडोवलों ॥ ध्रु ॥ कडां घालीं उडी मागिलांच्या भेणें । म[3]रणामरण न कळे चि ॥ २ तुका ह्मणे जालों त्यापरी दुःखित । असें बोलावीत पांडुरंगा ॥ ३ ॥

३३०१. जालिया दर्शन करीन मी सेवा । आणीक हीं[4] देवा न लगे दुजें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रारब्धा अधीनें अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवीं पायीं ॥ ध्रु ॥ ये गा ये गा ये गा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरीं देउनि भेटी ॥ २ ॥ आसावलें मन जीवनाचे ओढी । नामरूपें गोडी लावियेली ॥ ३ ॥ काय तुह्मांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥ ४ ॥ काय लोखंडाचे पाहे गुण दोष । सिवोनि परिस सोनें करी ॥ ५ ॥ तुका ह्मणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥ ६ ॥

३३०२. येथें आड कांहीं न साहे आणीक । प्रमाण तें एक हें चि जालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाऊं नाचों टाळी वांऊं गीत छंदें । डोळूं विनोदें अंग तेणें ॥ ध्रु ॥ मथुनियां सार काढिलें बाहेरी । उपाधि ते येरी निवडिली ॥ २ ॥ तुका ह्मणे जगा लाविली शिराणी । सेवितां हे धणी होत नाहीं ॥ ३ ॥

३३०३. शरणागत जालों । तेणें मीपणा मुकलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दिल्याची च वाट । पाहों नाहीं खटपट ॥ ध्रु ॥ नलगे उचित । कांहीं पाहावें संचित ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । मांने तैसी करूं देवा ॥ ३ ॥

३३०४. वाचेचिया आळा कवळिलें ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुलभ जालें सुलभ जालें । जवळी आलें पंढरिये ॥ ध्रु ॥ नामरूपाचें बांधलें मोटळें । एक एका वेळे सारियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे चुकली वसती । उद्धार तो हातीं आणियेला ॥ ३ ॥

३३०५. सवंग जालें सवंग जालें । घरा आलें वंदरींचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हेवा करीं सोस । भक्तिरस बहु गोड ॥ ध्रु ॥ पाउल वेचे चिंता नाहीं । आड कांहीं मग नये ॥ २ ॥ तुका ह्मणे संचिताचें । नेणें काचें राहों तें[12] ॥ ३ ॥

---

१ एं. येणावले.–२ त. सांडवलें. पं. सांडवलों–३ पं. पडणें मरणें–४ पं. काहीं–५ दे. त. अर्गी.–६ दे. गाऊं (दोन वेळ).–७ पं. मौन्य.–८ पं. सुलभ तें जालें सुलभ तें जालें । जवळी तें आलें पढरीये ॥.–९ पं. चुकविली.–१० दे. त. पं. उधार.–११ दे. त. करावा.–१२ पं. हें.

३३०६. [1]तुह्मी संत मायबाप कृपावंत । काये मी पतित कीर्ती वाणूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवतार तुह्मां [2]धराया [3]कारण । उद्धरावे जन जड जीव ॥ छ ॥ वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुह्मी जगीं संतजन ॥ ३ ॥

३३०७. पाठी लागे तया दवडीं दुरी । घालीं [4]या बाहेरी संवसारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येउनि दडें तुमच्या पायीं । धांवें तंई छो ह्मणा ॥ छ ॥ पारखियाचा वास पडे । [5]खडबडे उठी तें ॥ २ ॥ तुका ह्मणे लाविला धाक । नेदी ताक खाऊं [6]कोणी ॥ ३ ॥

३३०८. सांखळिलों प्रीती गळां । भुंके वेळा जाणोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचें मी केशीराजा । सुनें या काजा [7]पाळिलों ॥ छ ॥ आलें गेलें कळे वाटा । कोण निटा वाकडिया ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें वारी । दुरितें दुरी नातळतां ॥ ३ ॥

३३०९. सुनियांचा हा चि भाव । आपला ठाव राखावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुजियाचा येऊं वारा । नेदूं घरावरी [8]येऊं ॥ छ ॥ केली याची फाडाफाडी । [9]तैडामोडी [10]क्षेत्रांची ॥ २ ॥ पातेजत नाहीं लोकां । तुका देवावांचूनि ॥ ३ ॥

३३१०. सुनियांची आवडी देवा । घेत सेवा नाहीं कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सिकविलें जवळी बैसों । जेथें असों तेथें चि ॥ छ ॥ नेदी दुजें बोलों करूं । गुरुगुरु न साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे [11]कुर्वाळितां । अंग सत्ता [12]संगांची ॥ ३ ॥

३३११. सिळें खातां आला वीट । सुनें धीट [13]पाय धरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कान्होबा ते जाणे खूण । उन उन घास घाली ॥ छ ॥ [14]आपुलिये ठायींचें घ्यावें । लाड भावें पाळावा ॥ २ ॥ तुका ह्मणे मी [15]जुनाट । मोहो आट परतला ॥ ३ ॥

३३१२. लागलें भरतें । [16]ब्रह्मानंदाचें वरतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ छ ॥ बैसोनि सकळ । बाळ [17]चौलिले गोपाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे वाट । बरवी सांपडली [18]नीट ॥ ३ ॥

---

१ पं. काय पतित कीर्ती वर्णू.–२ पं. घ्यावया०.–३ दे. पं. कारणें.–४ पं. "या" नाहीं.–५ दे. खटबड.–६ पं. कोणा–७ पं. पाळिलें.–८ दे. देऊ–९ पं तडातोडी–१० दे. पं. क्षत्राची.–११ दे. त. कुवाळितां.–१२ पं. संतांची–१३ दे. पावि–१४ पं. आपुले ठाईंचे यावें.–१५ पं. जुनाट सुनें। मोहो तेणें परतला.–१६ त. पं. ब्रह्मानंदाही.–१७ पं. चाले.–१८ पं. वाट (ह्य चवथ्या ओळीच्या दोन्ही चरणाचा अंतशब्द एकच आहे).

३३१३. धनें[1] वित्तें कुळें । अवघियानें ते आगळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्याचे नारायण गांठीं । भरला हृदय संपुटीं ॥ छ्रु ॥ अवघें चि गोड । त्याचें पुरलें[2] सर्व कोड ॥ २ ॥ तुका ह्मणे अस्त । उदय त्याच्या तेजा नास्त ॥ ३ ॥

३३१४. बोलावें तें आतां आह्मी[3] अबोलणें । एका चि वचनें सकळांसी ॥ १ ॥ मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव । जैसा ज्याचा भाव त्यासी[4] फळे ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं समाधानें चाड । आपणा ही नाड पुढिलांसीं ॥ ३ ॥

३३१५. अधिकार तैसा[5] करूं उपदेश । साहे ओझें त्यास तें चि द्यावें ॥ १ ॥ मुंगीवरी भार गजाचें पांळग[6] । घालितां तें कोण कार्यसिद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे फांसे वागुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं तों काढी पारधी तो ॥ ३ ॥

३३१६. नव्हों वैद्य आह्मी अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥ १ ॥ कुपथ्य करूनि त्रिंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे लांसूं[7] फांसूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥ ३ ॥

३३१७. नव्हें परि ह्मणवीं दास । कांहीं निमित्तास मूळ केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुमचा तो धर्म कोण । हा आपण विचारा ॥ छ्रु ॥ नाहीं शुद्ध आचरण । परी चरण चिंतितों ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । ऐसें कां गा नेणां हें ॥ ३ ॥

३३१८. मागें चिंता होती आस । केला नास या काळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी आह्मां उदासीन । भिन्नाभिन्न वारिलें ॥ छ्रु ॥ मोहजाळें दुःख वाढे[8] । ओढे ओढे त्यास तें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोण देवा । आतां हेवा वाढवी ॥ ३ ॥

३३१९. आहो उभा[9] विटेवरी । भरोवरी चुकविली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निवांरलें[10] जाणें येणें । कोणा कोणें रुसावें ॥ छ्रु ॥ संकल्पासी वेचे बळ । भरे[11] फळ निर्माण ॥ २ ॥ तुका ह्मणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ॥ ३ ॥

३३२०. असो खटपट । आतां वाउगे वोभाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परिसा हे विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ छ्रु ॥ अपराध करा । क्षमा घडले दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे वेथा । तुह्मा कळे पंढरिनाथा ॥ ३ ॥

३३२१. वारकरी पायांपाशीं । आले त्यांसी विनविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय काय तें आइका । विसरों नका रंकासी ॥ छ्रु ॥ चिंतावोनि चिंता केली । हे राहिली अवस्था ॥ २ ॥ तुका ह्मणे संसारा । रुसलों खरा यासाठीं ॥ ३ ॥

---

१ पं. धन वित्तें कुळें दे. धनें वित्त कुळें.–२ पं. पुरे–३ पं. वोलणें–४ त. तैसा.–५ दे. फळो.–६ दे. त. पालाण.–७ दे. लास फांस.–८ पं. वाटे। वाढे वाढे.–९ पं. उभे या त्रिंट॰.–१० पं. निवारिलें.–११ त. भार.

३३२२. जीवींचें कां नेणां । परि हे आवडी नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाढवावें हें उत्तर । कांहीं लाज[1] करकर ॥ छ्र ॥ कोठें वांयां गेले । शब्द उत्तम चांगले ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळा । असनात प्रिय खेळा ॥ ३ ॥

३३२३. वोडविलें[3] अंग । आतां करूनि[4] घ्यावें सांग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय पूजा ते मी नेणें । जाणावें जी सर्वजाणें ॥ छ्र ॥ पोटा आलें बाळ । त्याचें जाणावें सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । वाहावें जी कडियेवरी ॥ ३ ॥

३३२४. सेवटींची हे विनंती । पाय चित्तीं रहावे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें करा कृपादान । तुह्मां मन सान्निध ॥ छ्र ॥ भाग्याविण कैंची भेटी । नव्हे तुटी चिंतनें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळसा आलें । हें विठ्ठलें परिसावें ॥ ३ ॥

३३२५. करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरीच हा तरिजे सिंधु । भवबंधू तोडोनियां ॥ छ्र ॥ तेथें[5] सरे शुद्ध साचें । अंतरींचें बीज तें ॥ २ ॥ तुका ह्मणे लवणकळी । पडतां जळीं तें होय ॥ ३ ॥

३३२६. जिकडे पाहे तिकडे देव । ऐसा भाव दे कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय केलें एकदेशी । गुणदोषीं संपन्न ॥ छ्र ॥ पडें तेथें तुझ्या पायां । करीं वांयां न वंजें[6] तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विषमें सारी । ठाणें धरी जीवासी ॥ ३ ॥

३३२७. जिकडे जाय[7] तिकडे सवें । आतां यावें यावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझ्या अवघ्या भांडवला । तूं एकला जालासी ॥ छ्र ॥ आतां दुजें धरा झणी । पायांहूनि वेगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां देवा । नका गोवा यावरी ॥ ३ ॥

३३२८. स्मरतां कां घडे नास । विष्णुदास यावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी सीमा जाली जगीं । तरी मी वेगीं अनुसरलों ॥ छ्र ॥ धरिलें तें निर्विडे[8] आतां । न घडे चित्ता वेगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाश नाहीं । पुराणें ही गर्जती ॥ ३ ॥

३३२९. आधीं नाहीं कळों आला हा उपाय । नाहीं तरी काय चुकी होती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घालितों पायांसी मिठी एकसरें । नेदीं तों दुसरें आड येऊं ॥ छ्र ॥ कासया पडतों लटिक्याचे भरी । नव्हता का शिरीं भार घेतों ॥ [9]२ ॥ तुका ह्मणे कां हे घेतों गर्भवास । कां या होतों दास कुटुंबाचा ॥ ३ ॥

---

१ पं. लाड.–२ पं. असे तात्पर्य या खळा. त. असता तत्पर या खेळा.–३ दे. हाच अभंग पुन: एक वेळ लिहिला आहे ( दे. भा. २, अ. २०९ व ९०३ पाहा ) तेथें ' वाढविलें ' असें आहे.–४ दे. त. दुसऱ्यानदा ( त. अ. ३३३२ व ३९६६ पाहा ) लिहिला आहे तेथें ' करूंया सग ' असें आहे.–५ पं. येथें –६ पं. वजेसें. दे.० वजतें –७ पं. जावें –८ पं. निवडो.–९ पं. " ससाराचा हाट कां फिरतों दुकान । भरो वरी धन मिळवितों ॥ " हें कडवें जास्त आहे.

३३३०. आतां बरें जालें । माझें मज कळों आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खोटा ऐसा संवसार । मज पायीं धावा[1] थार ॥ छ्र ॥ उघडले डोळे । भोग देताकाळीं कळे ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवा । होतां तडातोडी देवा ॥ ३ ॥

३३३१. बोलिलों ते धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व सिद्धि पायीं बोळगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें कांहीं ॥ छ्र ॥ [2]संतसमागमें अळंकार वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजा ॥ २ ॥ तुका ह्मणे रामकृष्णनामें गोड । [3]आवडीचें कोड माळ ओऊं ॥ ३ ॥

३३३२. करूनि उचित खेळें भोंवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ छ्र ॥ सुख दुःख तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला देहाचा[4] विसर । नाहीं [5]आतां पर आप कोणी ॥ ३ ॥

३३३३. परिसाचे अंगें सोनें जाला विळा । वाकणें या कळा हीन नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरीं पालट [6]घडला कारण । मग समाधान तें चि गोडें[7] ॥ छ्र ॥ पिकलीं[8] हे सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काये घडे मग ॥ २ ॥ तुका ह्मणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केले पाकें ॥ ३ ॥

३३३४. ज्याचे माथां जो जो भार । ते चि फार तयासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें पुढें अवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥ छ्र ॥ परिसा अंगीं असुपसोनें । पोटीं हीन धातु[9] चि ॥ २ ॥ आपुला तो करी धर्म । जाणे वर्म तुका तें ॥ ३ ॥

३३३५. पाहें तिकडे दिशा ओस । अवघी आस पायांपें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनें[10] चि साच होइल कई । प्रेम देई भेटोनि ॥ छ्र ॥ सर्वांपरी पांगुळ असें । न कळे कैसें तें तुह्मा ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । तूं तों दाता दीनाचा ॥ ३ ॥

३३३६. चालवणें काय । ऐसें [11]अंगे माझे माय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांव [12]धांव लवलाहें । कंठीं प्राण वाट पाहे ॥ छ्र ॥ पसरूनि कर । तुज चालिलों समोर ॥ २ ॥ देसील विसांवा । तुका ह्मणे ऐशा हांवा ॥ ३ ॥

३३३७. आवडीच्या ऐसें जालें । मुखा आलें हरिनाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां घेऊं धणीवरि । मागें उरी नुरेतों ॥ छ्र ॥ सांटवण मनाऐसी । पुढें रासी असुप ॥ २ ॥ तुका ह्मणे कारण जालें । विठ्ठलें[13] तीं अक्षरीं ॥ ३ ॥

---

१ दे. पं. द्यावी.—२ पं. त. समागम.—३ पं. आवडीच्या कोडे.—४ दे. त. देहेचा.—५ त. नाहीं आपपर कोणी आतां. पं. आतां आपपर नाहीं कोणी.—६ पं. घडावा.—७ पं. गोडी.—८ दे. पिकलीं सेंद पं. पिकलीया सेंद.—९ पं. धातुचें.—१० पं. मनीचे.—११ दे. त. अंग.—१२ पं. पाव—१३ पं. विठ्ठल या तीं०.

३३३८. त्यांचिया चरणा माझें दंडवत । ज्यांचें धंनवित्त[1] पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें माझा जीव पावला विसांवा । ह्मणऊनि हांवा भरलासे ॥ ध्रु ॥ चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥ २ ॥ आणिक तीं[2] भाग्यें येथें कुरवंडी । करूनियां सांडीं इंद्राऐसी ॥ ३ ॥ वैष्णवांचे घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सत्यभावें[3] ॥ ४ ॥ तुका ह्मणे सखे हरिचे ते दास । आतां पुढें आस नाहीं[4] दुजी ॥ ५ ॥

३३३९. उपजोनियां मरें । परि हें चि वाटे बरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं आवडीसी पार । न ह्मणावें[5] जालें फार ॥ ध्रु ॥ अमृताची खाणी । उघडली नव्हे धणी ॥ २ ॥ तुका ह्मणे पचे । विठ्ठल हें सुखा साचें[6] ॥ ३ ॥

३३४०. सत्य[7] तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला । कां गा हा दाविला जगदाकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांभाळीं[8] आपुली हाक देतो माया । आह्मांसी कां भयाभीत केलें ॥ ध्रु ॥ रूप नाहीं त्यासी ठेवियेलें नाम । लटकां[9] चि श्रम वाढविला ॥ २ ॥ तुका ह्मणे कां गा जालासी चतुर । होतासी निसुर निर्विकार ॥ ३ ॥

३३४१. अमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धी योगा नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय या राहिलें विनोदावांचून । आपुलिया भिन्न केलें आह्मां ॥ ध्रु ॥ कोठें मूर्त्तिमंत दावीं पुण्यपाप । काशासी संकल्प वाहाविसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आवरावा चेडा । लटिकी चें[10] पीडा पांडुरंगा ॥ ३ ॥

३३४२. नो[11] बोलावें ऐसें जनासी उत्तर । करितों विचार बहु वेळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण पाप आड ठाकतें येऊन । पालटी[12] तो गुण अंतरींचा ॥ ध्रु ॥ संसारा हातीं सोडवूनि गळा । हे[13] कां अवकळा येती[14] पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवे घडे[15] अंतराय । यास करूं काय पांडुरंगा ॥ ३ ॥

३३४३. आतां हें उचित माझें[16] जना हातीं । पाहिजे फजीती केली कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग हे[17] तुमचे न सोडीं चरण । त्रासोनियां मन येइल ठाया ॥ ध्रु ॥ वाउगे वाणीचा न धरीं कांटाळा । ऐसी कां चांडाळ बुद्धि मज ॥ २ ॥ तुका ह्मणे जरि माथां बैसे घाव । तरि मग वाव नेघे पुढें ॥ ३ ॥

---

१ पं. भरिलोसें –२ पं. तें भाग्य.–३ पं. सर्व भावें –४ त. दुजी नाहीं दे. नाहीं दुजें –५ पं. न ह्मणवे –६ पं. रुचे.–७ पं. "लटिके चि साच दाविले आचळ । पीडतसे काळ किती ह्मूग ॥" हें कडवें आरंभींच जास्त आहे.–८ पं. सांभाळीं सांभाळीं आपुली हे माया ।.–९ पं. मिथ्याचि वा भ्रम वाढविला ।.–१० पं. ते.–११ त. पं. न –१२ दे. त. पालटिति.–१३ दे. त. हें –१४ पं. देत.– १५ दे. त. घडेल.–१६ पं. माझी.–१७ पं. मी.

३३४४. मायेवरी सत्ता आवडीची बाळा । संकोचोनि लळा[1] प्रतिपाळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अपराध माझे न मनावे मनीं । तुह्मी संतजनीं मायबापीं ॥ ध्रु ॥ आरुष वचन लेंकुराची आळी । साहोनि कवळी मागुताली ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं काय नाहीं सत्ता । परि निष्ठुरता उपजेना ॥ ३ ॥

३३४५. कैसा होतो कृपावंत । वहुसंत सांगती । पुसणें नाहीं यातीकुळ । लागो वेळे नेदावी[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी काय जाणों कीर्ती । उतरती उतरले[3] ॥ ध्रु ॥ दावी वैकुंठींच्या वाटा । पाहातां[4] मोठा संपन्न । अभिमान तो नाहीं अंगीं । भक्ताआगीं न वैसे ॥ २ ॥ तुका[5] ह्मणे आळस निद्रा । नाहीं थारा त्या अंगीं । आलें धांवें[6] भलत्या काळें । विठ्ठल वळें आगळा ॥ ३ ॥

३३४६. सदैव हे वारकरी । जे पंढरी देखती । पदोपदीं विठ्ठल वाचा[7] । त्यांसी कैचा संसार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोषं[9] पळाले पळाले । पैल आले हरिदास ॥ ध्रु ॥ प्रेमभातें भरलें अंगीं । निर्लज्ज रंगीं नाचती । गोपीचंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरवती ॥ २ ॥ तुका[10] ह्मणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा । दुर्बळा यी[11] शक्तिहीना । त्या ही जना पुरता ॥ ३ ॥

३३४७. ऐसीं ठावीं वर्मे । तरी सांडवलों भ्रमें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें नाचतों कीर्तनीं । नाहीं आशंकित मनीं ॥ ध्रु ॥ ऐसें आलें हाता । बळ तरी गेली चिंता ॥ २ ॥ सुख येथें जालें तरी । नाहीं आणिकांची उरी ॥ ३ ॥ ऐसें केलें देवें । पुढें कांहीं चि न व्हावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मन । आतां जालें समाधान ॥ ५ ॥

३३४८. चित्तीं वैसलें चिंतन । नारायण नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे गोड कांहीं आतां । आणीक दुसरें सर्वथा ॥ ध्रु ॥ हरपला द्वैतभाव । तेणें देह जाला वाव ॥ २ ॥ तुकयावंधु ह्मणे आह्मी । जालों निष्काम ये कामीं ॥ ३ ॥

३३४९. व्यापिलें सर्वत्र । वाहेरी भीतरी अंतरें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें गोविंदें गोविलें । वोलें न वजाये वोलिलें ॥ ध्रु ॥ संचिताची होळी । करूनि जीव घेतला वळी ॥ २ ॥ तुकयावंधु ह्मणे नाहीं । आतां संसारीं[13] उरो कांहीं ॥ ३ ॥

---

१ त. मळ–२ पं. नेदावी–३ पं. उतरली.–४ पं. पाहा–५ पं. "तुका ह्मणे०" व "आलें धावें०" ह्या अर्धांच्या जागा परस्परांशीं बदलल्या आहेत.–६ पं. धावे.–७ दे. वाचे–८ पं. तया–९ दे. दोष पळाले दोष पळाले ।.–१० पं. "तुका ह्मणे०" व "दुर्बळा०" हीं अर्धे मागें पुढें बदललीं आहेत–११ पं. ही.–१२ दे. अंत.–१३ पं. ससार.

३३५०. तुह्मांआह्मांसी दरुषण । जालें दुर्लभ भाषण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि करितों आतां । दंडवत घ्या समस्तां ॥ छ ॥ भविष्याचें माथां देह । कोण जाणें होइल काय ॥ २ ॥ ह्मणे तुकयाचा बांधव[1] । आमचा तो जाला भाव ॥ ३ ॥

३३५१. अनंतजन्में जरी केल्या तपरासी । तरी हा न पवे[2]सी ह्मणे देह ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें जें निधान लागलेंसे[3] हातीं । त्याची केली माती भाग्यहीना ॥ छ ॥ उत्तमाचें सार वेदाचें भांडार । ज्याच्यानें पवित्र तीर्थें होती ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु आणीक उपमा । नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥ ३ ॥

३३५२. आह्मांपाशीं सरे ऐक[4] शुद्ध भाव । चतुराई जाणींव न लगे कळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वजाणें[5] माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंगें[6] गोपाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे कर्में धर्में[7] नये हातां । तयावरि सत्ता भाविकांची ॥ ३ ॥

३३५३. प्रीति करी सत्ता । बाळा भीती मातापिता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय चाले त्याशीं बळ । आळी करितां कोल्हाळ ॥ छ ॥ पदरीं घाली मिठी । खेदी मागें पुढें लोटी ॥ २ ॥ बोले मना आलें । तुका साहिला[8] विठ्ठलें ॥ ३ ॥

३३५४. आवडीचे भेटी निवे । चित्त पावे विश्रांती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वरवियाचा छंद मना । नारायणा अवीट ॥ छ ॥ तुळगे[9] कांहीं साम्या पुरे । हें तों उरे ये रुचि ॥ २ ॥ तुका ह्मणे बरवें जालें । फावलें हें कळे त्या ॥ ३ ॥

३३५५. केलियाचें दान । करा आपुलें जतन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी बुद्धि स्थिर देवा । नाहीं विषयांचा हेवा ॥ छ ॥ भावा अंतराय । येती अंतरती पाय ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडी । आदीं अंतीं रांहो[10] गोडी ॥ ३ ॥

३३५६. माझे हातीं आहे करावें चिंतन । तुह्मी कृपादान प्रेम द्यावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागति यां भांडवल आळवण । नामाची जतन दातियासी ॥ छ ॥ बाळक धांवोनि आड निघे स्तनीं । घालावा जननी कृपे पान्हा ॥[11] २ ॥ तुका ह्मणे करीं कासवाचे परी । आहे सूत्रदोरी तुझे हातीं ॥ ३ ॥

३३५७. वाट दावी त्याचें गेलें काय । नागवला जो वारितां जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशीं मागें ठकलीं किती । सांगतां खाती विषगोळा ॥ छ ॥ विचारोनि पाहे त्यास । न वजे जीवें नव्हे नास ॥ २ ॥ तुका ह्मणे जो रुसला जीवा । तयासी केशवा काय चाले ॥ ३ ॥

---

१ दे. त. बंधव—२ दे. पं. पवे.—३ त. लागलें जे—४ पं. शुद्ध एक—५ पं. सर्व जाणे—६ दे. अंगसंगें.—७ दे. कर्मधर्म.—८ पं. साहिलें—९ दे. पं. तळगें—१० पं. राहे—११ पं. "तैशापरी पुढें तुझिया मी आशे । धांवोनि वोरसे देई भेटी ॥" हें कडवें जास्त आहे.

३३५८. अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हे हें करणें स्वहिताचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । हित तें चि वेगें करूनि घेईं ॥ छ ॥ बहुरूपी रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥ २ ॥ पाषाणाचें नांव ठेवियेलें[2] देव । आणिका तारी भाव परि तो तैसा ॥ ३ ॥ कनक झाड ह्मुण वंदियेलें[3] माथां । परि तें[4] अर्थां न मिळे माजी ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावीं नास तो चि पावे ॥ ५ ॥

३३५९. मज नष्टा माया मोह नाहीं लोभ । अधिक हा क्षोभ आदराचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धिग हें शरीर अनउपकार । न मनी आभार उपकाराचा ॥ छ ॥ मजहून नष्ट आहे ऐसा कोण । नावडे मिष्टान्न बहुमोल[6] ॥ २ ॥ न दिसती मज आपलेसे गुण । संचित तें कोण जाणे मागें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मांझें देखोनियां काई । पांडुरंगा पायीं राखियेलें ॥ ४ ॥

३३६०. मतिविणें काय वर्णूं तुझें ध्यान । जेथें[10] पडिलें मौनें[11] वेदश्रुती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूनि गोजिरा आपुलिये मतीं । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥ छ ॥ सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख । तेणें हरे भूक तान माझी ॥ २ ॥ रसना गोडोवली[12] ओव्या गातां गीत । पावलेंसे चित्त समाधान ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥ ४ ॥

३३६१. ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें[13] । जीवलग नेणें मज कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भय वाटे देखें श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥ छ ॥ अंधकारापुढें[14] न चलवे वाट । लागतील खुंटें[15] कांटे अंगीं[16] ॥ २ ॥ एकला निःसंग फांकती मारग । भितों[17] नव्हे लाग चालावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट दावूनि सद्गुरु । राहिला हा दुरी[18] पांडुरंग ॥ ४ ॥

३३६२. उदार कृपाळ सांगसी जना । तरी कां त्या रावणा मारियेलें । नित्य नित्य पूजा करी श्रीकमळीं । तेणें तुझें काय केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय वडिवार सांगसी वांयां । ठावा पंढरिराया आहेसि आह्मां । एकला चि जरी देऊं परिहार । आहे दुरिवरी सीमा ॥ छ ॥ कर्णाऐसा वीर उदार झुंझार । तो तुवां जर्जर केला

---

१ पं. "पाषाणाचें०" व "कनक झाड०" हीं कडवीं मागें पुढें आहेत.—२ पं. ठेविलें तें देव । दे. ठेविलें देव ।.—३ दे. वंदिलें—४ पं. तें ही अर्थां०.—५ पं. तो दे. अधिक क्षोभ०.—६ पं. बहु बोल—७ पं. दिसेचि—८ त. आतां. दे. ह्मणे देखोनियां—९ पं. मतिहीण.—१० पं. तेथें पडे.—११ दे. त. मौन्य.—१२ त. पं. वोडावली.—१३ दे. त. हिंगुळवाणें—१४ पं. अंध.कारापुढें.—१५ दे. खुटे—१६ पं. अंगीं.—१७ दे. होतों.—१८ पं. दुरी.

बाणीं । पडिला भूमी परी नयेची करुणा । दांत पाडियेले दोन्ही ॥ २ ॥ श्रियाळ बापुडे सात्विकवाणी । खादलें कापूनि त्याचें पोर । ऐसा कठिण कोण होईल दुसरा । उखळीं कांडविलें शिर ॥ ३ ॥ शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग । त्याचें चिरिलें अंग ठायीं ठायीं । जाचडनि प्राण घेतला मागें । पुढें न पाहतां कांहीं ॥ ४ ॥ बळीचा अन्याय सांग होता काय । बुडविला तो पाय देऊनि माथां । कोंडिलें दार हा काय कहार । सांगतोसी चित्र कथा ॥ ५ ॥ हरिश्चंद्राचें राज्य घेऊनियां सर्व । विकविला जीव डोंबाघरीं । पाडिला विघड नळा दमयंतीमधीं । ऐसी तुझी बुद्धि हरि ॥ ६ ॥ आणिकही गुण सांगावे किती । केलिया विपत्ति माउसीच्या । वधियेला मामा सखा पुरुषोत्तमा । ह्मणे बंधु तुकयाचा ॥ ७ ॥

३३६३. जे केली आळी ते अवघी गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय समाधान केलें कोणे वेळे । कोणें[2] माझे लळे पाळियेले ॥ ध्रु ॥ आभास ही नाहीं स्वप्नीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कइचा तो ॥ २ ॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी जाले ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं भरवसा । मोकलीसी ऐसा वाटतोसी ॥ ४ ॥

३३६४. समश्रुळित असतां वाचा । घोष न करिसी कां नामाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे वैष्णव नव्हेसी । कवण्या दंभें नागवलासी ॥ ध्रु ॥ हरि हरि ह्मणतां लाजसी । गर्वें फुगोनि चालसी ॥ २ ॥ तारुण्यें उताणा । पुंसेंविण वांडा सुना ॥ ३ ॥ जालेंसि महिमेचें वेडें । नाचों लाजसी दिंडीपुढें ॥ ४ ॥ अळंकारांच्यानि बळें । वंचलासी तुळसीमाळें ॥ ५ ॥ कैसा सकुमार जालासी । ह्मगसी न टके एकादशी ॥ ६ ॥ स्नान न करिसी आंघोळी । विभुती न लाविसी कपाळीं ॥ ७ ॥ वरिवरि न्याहाळिसी त्वचा । उपेग नाहीं मांसाचा ॥ ८ ॥ पद्मनाभी विश्वनाथ । तुका अझून रडत ॥ ९ ॥

३३६५. वाघाचा कालभूत[3] दिसे वाघाऐसा । परी नाहीं दशा साच अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाहेरील रंग निवडी कसोटी । संवघ्टणें भेटी आपेआप ॥ ध्रु ॥ सिकविलें तैसें नाचावें माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे करी लटिक्याचा सांटा । फजित तो खोटा शीघ्र होय ॥ ३ ॥

३३६६. सिंदळीचे सोरें चोराची दया । तो ही जाणा तया संवसर्गी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुकासाटीं भोगे दुःखाचा तो[5] वाटा । उभारोनि[6] कांटा वाटेवरी ॥ ध्रु ॥

१ दे. त. सिंत्री.–२ पं. कोण.–३ दे. पं. काळभुत.–४ पं. मोयर चोराचिया दया ।.–
५ दे. त. "तो" नाहीं.–६ दे. वाटेवरि उभा रोविदिला कांटा । त. वाटे कटा उभा रोवी ।.

सर्प पोसूनियां दुधाचा ही[1] नास । केलें थीता विष अमृताचें ॥ २ ॥ तुका ह्मणे यासी न करितां दंडण । पुढिल्या[2] खंडण नव्हे दोषा ॥ ३ ॥

३३६७. तेणें सुखें माझें निवालें हें[3] अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कवतुकें करुणा भाकीतसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥ ध्रु ॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची समूळ गेली ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख जालें माझ्या जीवा । रंगलें केशवा तुझ्या रंगें ॥ ३ ॥

३३६८. विठ्ठल सोयरा सज्जन विसांवा । जाइन त्याच्या गांवा भेटावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे ॥ ध्रु ॥ माय माउलिया बंधुवर्गा[4] जाणा । भाकीन करुणा सकळिकांसी ॥ २ ॥ संत महंत सिद्ध[5] महानुभाव मुनि । जीवभाव जाऊनि सांगेन त्या ॥ ३ ॥ माझिये माहेरीं सुखा काय उणें । न लगे येणें जाणें तुका ह्मणे ॥ ४ ॥

३३६९. ध्याइन[6] तुझें रूप गाइन[7] तुझें नाम । आणीक[8] न करीं काम जिव्हामुखें ॥१॥ ॥ ध्रु. ॥ पाहिन तुझे पाय ठेविन तेथें[9] डोय । पृथक तें काय न करीं मनीं[10] ॥ ध्रु ॥ तुझे चि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥ २ ॥ करिन सेवा करीं[11] चालेन मी पायीं । आणीक न वजें ठायीं तुजाविण ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव ठेविलों[12] तुझ्या पायीं । आणीक तो काई देऊं कोणा ॥ ४ ॥

३३७०. देवाचें भजन कां रे न करीसी[13] । अखंड हव्यासीं पीडतोसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवासी शरण कां रे न[14] वजवे तैसा । बैंक[15] मीना जैसा मनुष्यालागीं ॥ ध्रु ॥ देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥ २ ॥ कां रे नाहीं तैसी देवांची[16] हे गोडी । नागवूनी सोडी पत्नी जैसी[17] ॥ ३ ॥ कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजना ॥ ४ ॥ कां रे भय वाहासी लोकांची[18] धाक । विसरोनि[19] एक नारायण ॥ ५ ॥ तुका ह्मणे कां रे घातलें[20] वांयां । अवघें[21] आयुष्य जाया भक्तिविण ॥ ६ ॥

३३७१. माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं । धरोनियां बाहीं । भव[22] तारीं दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची

---

१ दे. त. "ही" नाहीं.–२ दे. त. पुढिल ।.–३ दे. त. "हें" नाहीं.–४ दे. बधुवर्गा जना. पं. बधुवर्ग जाणा.–५ पं. "सिद्ध" नाहीं.–६ दे. गाइन तुझें नाम। ध्याइन तुझें नाम.–७ पं. ध्याइन. ८ पं. आन –९ पं. मी.–१० पं. आन.–११ पं. करें.–१२ पं. टेवीन मी पायीं.–१३ पं. ० करिशी तैसें । अखड हव्यासें०.–१४ पं. नवजसी तैसा ।. त. नवजे तैसा –१५ दे. बदक मीन जैसा०.– १६ दे. त. देवाची गोडी.–१७ दे. त. तैसी.–१८ पं. लोकांचा तू धाक ।.–१९ त. नाठवोनि.– २० पं. घातलेंसे.–२१ पं. सर्व –२२ पं. भव हा तारीं०.

खाणी । मुगुट सकळां मणि । [1]तूं चि धन्य विठोबा ॥ ध्रु ॥ कैरीं[2] तिमिराचा[3] नाश । दीप होउनि प्रकाश । तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥ २ ॥ पैंहें[4] गुंतलों नेणतां । तुज असो माझी चिंता । तुका ठेवी माथा । पायीं आतां राखावें ॥ ३ ॥

३३७२. आमुचें उचित हे चि उपकार । आपला चि भार घालूं तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरणें काळीं शीताचिये ॥ ध्रु ॥ जेणें काळें उठी मनाची आवडी । ते चि मागों[5] घडी आवडे[6] तें ॥ २ ॥ दुःख येऊं नेदी आमचिया घरा । चँक्र[7] करी फेरा भोंवताला ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं मुक्तीसवें चाड । हें चि आह्मां गोड जन्म घेतां ॥ ४ ॥

३३७३. मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुख दुःख दोहीं विरहित जो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राहिलासे उभा भींवरेच्या[8] तीरीं । कट दोहीं[9] करीं धरोनियां ॥ ध्रु ॥ नवल काई तरी पाचारितां पावे । न स्मॅरित[10] धांवे [11]भक्तिकाजें ॥ २ ॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तो चि माझा दाता स्वहिताचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यास गाईन मी गीतीं । आणीक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥ ४ ॥

३३७४. यासी कोणी ह्मणे निंदेचीं उत्तरें । नागवला खरें तो चि एक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आड वाटे जातां लावी नीट सोई[12] । धर्मनीत ते ही[13] ऐसी आहे ॥ ध्रु ॥ नाइकतां सुखें करावें ताडण । पाप नाहीं पुण्य असे फार ॥ २ ॥ जन्म व्याधि फार चुकतील दुःखें । खंडावा हा सुखें मान त्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे निंब दिलियावांचूनें[14] । अंतरींचा सीण कैसों[15] जाय ॥ ४ ॥

३३७५. निवडे जेवण सेवटींच्या घांसें । होय त्याच्या ऐसें सकळ ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वांयां ॥ ध्रु ॥ संपादिलें होय धरिलें तें सोंग । विटंवणा व्यंगें[16] पडिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म नेणतां जो[17] रांधी । पाववी ते बुद्धि अवकळा ॥ ३ ॥

३३७६. न लगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझ्या उपकारासाटीं । वागविला ह्मण कंठीं ॥ ध्रु ॥ घरीं दिला ठाव । अवघा सकळ ही वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे एके ठायीं । कोठें[18] माझें तुझें नाहीं ॥ ३ ॥

---

१ पं. धन्य तू चि.—२ पं. करीं या त्रिमिराचा.—३ दे. त. त्रिमिराचा.—४ पं. मी हें.—५ त. मागें.—६ पं. आवडतें.—७ त. चके.—८ दे. भीमरेच्या—९ पं. दोन्ही.—१० त. संवरित. दे. श्मरित. पं. न स्वरीत (न स्वरित).—११ त. पं. भक्ति काजा.—१२ पं. सोये.—१३ पं. हे.—१४ पं. दिधल्या०.—१५ पं. केवी—१६ दे. सांग पडियेली ।—(पूर्वी "वॅग पडियाली") —१७ दे. जे.—१८ त. पं. केलें.

३३७७. नाहीं लाग माग । न देखेंसें[1] केलें जग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥ छ्र ॥ निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥ ३ ॥

३३७८. दिली हाक मनें नव्हे ती जतन । वेंटाळिल्यों गुणें[2] धांव घेती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा द्वेषै[3] फार माया तृष्णा ॥ छ्र ॥ इंद्रियांचे भार फिरतील चोर । खैंान[4] घ्यावया घर फोडूं पाहे ॥ २ ॥ माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ४ ॥

३३७९. तुझा दास मज ह्मणती अंकित । अवघे सकळिक लहान थोर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि आतां लागे करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥ छ्र ॥ होउनी निर्भर राहिलों निश्चिंतें[5] । पावनपतित नाम तुझें ॥ २ ॥ करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्या पातें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज काय ते आशंका[6] । तारितां मशका मज दीना ॥ ४ ॥

३३८०. काय मागावें कवणासी । ज्यासी मागों तो मजपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥ छ्र ॥ जरी मागों ध्रुवपद । तरी त्यासी येथीळ छंद ॥ २ ॥ स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें ॥ ३[7] ॥ आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे एक मागें । ऐकपणा[8] नाहीं भंग ॥ ५ ॥

३३८१. आह्मी ज्याचे दास । त्याचा पंढरिये वास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा देवांचा ही देव । काय कळिकाळाचा भेव ॥ छ्र ॥ वेद जया गाती । श्रुति ह्मणती नेति नेति ॥ २ ॥ तुका ह्मणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥ ३ ॥

३३८२. भक्तवत्सल दिनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा पुंडलिकासाटीं । आला उभा वाळवंटीं ॥ छ्र ॥ गर्भवास धरी । अंबरूपीचा कैवारी ॥ २ ॥ सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्रासी कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी ॥ ४ ॥

---

१ पं. देखें हें.—२ पं. वेगळाले गुण—३ पं. हिसा.—४ पं. खाणे—५ पं. निश्चित—६ पं. अशक्य । तारितां मश्यक मज०.—७ पं. "मागावें जरि पद वैकुंठ । तें तव एकःसी कष्ट ॥" हें कडवें जास्त आहे.—८ दे. त. एक पणे (दे. पूर्वी ' एक पणा " होत).

३३८३. फटकाळ देह्हारा फटकाळ अंगारा । फटकाळ विचारा चालविलें ॥ १ ॥ फटकाळ तो देव फटकाळ तो[1] भक्त । करविती घात आणिका जीवा ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें फटकाळ हें जन । [3]अनुभविये खूण जाणतील ॥ ३ ॥

३३८४. लावुनियां गोठी । चुकवूं आदरिली दिठी । देउनियां मिठी । पळे महिमा थुलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुढें तो चि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । [4]लावूनि चरफड । हात गोऊनि पळावें ॥ छ ॥ आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडे माती । [5]फिरतां मागें कैचा तो ॥ २ ॥ [7]तुका ह्मणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हे सेवा । सुखें तुह्मां नार्पिती ॥ ३ ॥

३३८५. नेत्राची वासना । तुज पाहावें नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं [8]यांचें समाधान । काय पहातोसी अनुमान ॥ छ ॥ भेटावें पंढरिराया । हें चि इच्छिताती बाह्या ॥ २ ॥ [10]मंगतों जावें पंढरीसी । हें चि ध्यान चरणासी ॥ ३ ॥ चित्त ह्मणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥ ४ ॥ ह्मणे बंधु तुकयाचा । देवा भाव पुरवीं साचा ॥ ५ ॥

३३८६. मन उतावेळ । जालें न राहे निश्चळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दे रे भेटी पंढरिराया । उभारोनि चारी बाह्या ॥ छ ॥ सर्वांग तळमळी । हात पाय रोमावळी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे कान्हा । भूक लागली नयना ॥ ३ ॥

३३८७. ह्मणसी दावीन अवस्था । तैसें नको रे अनंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होऊनियां सहाकार । रूप दाखवीं सुंदर ॥ छ ॥ मृगजळाचियापरी । तैसें न करावें हरी ॥ २ ॥ [12]तुकयाबंधु ह्मणे हरी । कामा नये बाह्यात्कारी ॥ ३ ॥

३३८८. आकारवंत मूर्ति । जेव्हां देखेन मी दृष्टी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग मी राहेन निवांत । ठेवूनियां तेथें चित्त ॥ छ ॥ श्रुति वाखाणिती । तैसा येसील प्रचिती ॥ २ ॥ ह्मणे तुकयाचा सेवक । उभा देखेन सन्मुख ॥ ३ ॥

३३८९. जेणें तुज जालें रूप आणि नांव । पतित हें दैव तुझें आह्मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरी तुज कोण हें पुसतें । निराकारी तेथें एकाएकी ॥ छ ॥

---

१ पं. "तो" नाहीं.—२ दे. देवां.—३ पं. अनुभवी.—४ पं. पुरवी.—५ दे. "फिरतां मागें कैचा तो" हें नसून याची जागा कोरी टाकली आहे.—६ त. मग.—७ दे. तुका ह्मणे देवा । यासी नाडी याची सेवा । (कोरी जागा.—पुढें) भावें कांही यास नार्पितां ॥.—८ पं. त्याचें.—९ पं. पाहासी.—१० पं. जावें पंढरीसी । हें चि ध्यान या मानसीं.—११ पं. याचा.—१२ पं. तुका ह्मणे.

अंधारें दीपका आणियेली शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची[2] ॥ २ ॥ धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी[3] काय चाडा जाणावें ते[4] ॥ ३ ॥ अमृतासी मोल विषाचिया गुणें । पितळें[5] तरी सोनें उंच निंच ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी असोनियां[6] जाण । तुज देवपण आणियेलें ॥ ५ ॥

३३९०. सुखवाटे ये चि ठायीं । बहु पायीं संतांचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥ छ्रु ॥ न करवे हाली चाली । निवारिली चिंता हे ॥ २ ॥ तुका ह्मणे निवे तनु । रजकणु लागती[7] ॥ ३ ॥

३३९१. देऊं[8] कपाट । कीं कोण काळ राखों वाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय होईल तें शिरीं । आज्ञा धरोनियां करीं ॥ छ्रु ॥ करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा[9] एकांत ॥ २ ॥ तुका ह्मणे जागों । किंवा कोणा नेदूं[10] वागों ॥ ३ ॥

३३९२. मायबापापुढें लेंकराची आळी । आणीक हे पाळी कोण लळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांभाळा जी मोझीं[11] विषमें अनंता । जवळी असतां अव्हेर कां ॥ छ्रु ॥ आणिकांची चाले सत्ता आह्मांवरी । तुमची ते थोरी काय मग ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ॥ ३ ॥

३३९३. माझ्या मुखें मज बोलवितो हरि । सकळां अंतरीं नारायण ॥ १ ॥ न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे दोष नाहीं या विचारें । हितार्थी उत्तरें शिकवितां ॥ ३ ॥

३३९४. मांस खातां हौंउस करी । जोडुनि वैरी ठेवियेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण त्याची करिल कींव । जीवें जीव नेणती ॥ छ्रु ॥ पुढिलांसाटीं पांजरी[13] सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ २ ॥ तुका ह्मणे कुटिती हाडें । आपुल्या नाडें रडती[14] ॥ ३ ॥

३३९५. तुज जाणें तेंन्हें नाहीं पांडुरंगा । कां जी मज सांगा उपेक्षिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज ठावें होतें मी पातकी थोर[16] । आधीं च कां थोर[17] दिधली पायीं ॥ छ्रु ॥ अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जितिलें तें खरें । आतां उणें पुरें तुह्मां अंगीं[18] ॥ ३ ॥

---

१ पं. अंधारें ते दीपा. दे. अंधारे दीपा.–२ दे. न. कोंदणासी.–३ दे. सुखा.–४ पं. "ते" नाहं.–५ पं. पिवळें.–६ दे. ०जना । तुज देव पणा०.–७ पं. लागता.–८ पं देऊनि कपाट । कोण० –९ पं. यत्न –१० पं. नेदी.–११ पं. माझें विषम.–१२ पं. हर्षभारी ॥.–१३ पं. पाजळी–१४ पं. रडतील.–१५ दे. पं. तानें.–१६ पं. खरा.–१७ पं. थारा दिला.–१८ पं. लागीं.

३३९६. आह्मां घरीं धन शब्दाचीं [1]चें रत्नें । शब्दाचीं च [2]शस्त्रें यत्न करूं ॥ १ ॥ शब्द चि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहा शब्द चि हा देव । [3]शब्दें चि गौरव पूजा करूं ॥ ३ ॥

३३९७. ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥ १ ॥ रिघों पाहे [4]माजी बळें त्याचें घर । दवडिती दूर ह्मणोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें न चले सायास । पडिलें उदास त्याच्या गळां ॥ ३ ॥

३३९८. कासया लागला यासी चौघाचार । [5]कुळींचा वेव्हार निवडिला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ग्वाही [6]बहुतांची घालूनियां वरि । महजर करीं आहे माझ्या ॥ ध्रु ॥ तुह्मां वेगळा[7] लागें आपल्या च ठायीं । होतें करुनि तें ही माझें माझें ॥ २ ॥ भांडण सेवटीं जालें एकवट । आतां कटकट करूं नये ॥ ३ ॥ ठेविला ठेवा[8] तो आला माझ्या हाता । आतां नाहीं सत्ता तुज देवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे वांयांविण खटपटा । राहिलों मी वांटा घेऊनियां ॥ ५ ॥

३३९९. देहबुद्धि वसे जयाचिये अंगीं । पूज्यता ते[9] जगीं सुख मानी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोर असे दगा जाला त्यासी हाटीं । सोडोनियां गांठी चोरीं नेली ॥ ध्रु ॥ गांठीचें जाउनि नव्हे तो मोकळा । बांधिलें[10]से गळा दंभलोभें ॥ २ ॥ पुढिल्या उदिमा जालेंसे खंडण । दिसे नागवण पडे गांठी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे बोलतील संत । जाणूनियां घात कोण करी ॥ ४ ॥

३४००. निंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपलीं तीं[11] फळें न संडी च ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करुनि सांडी ॥ ध्रु ॥ परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे वेळू चंदना संगतीं । काय ते नसती [12]जवळिकें ॥ ३ ॥

३४०१. दुबळें सदैवा । ह्मणे नागवेल केव्हां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [13]आपणासारिखें त्या पाहे । स्वभावासी करिल काये ॥ ध्रु ॥ मूढ सभे आंत । इच्छी पंडिताचा घात ॥ २ ॥ गांढें देखुनि [14]शूरा । [15]उगें करितें बुरबुरा ॥ ३ ॥ आणिकांचा हेवा । न करीं शरण जाईं देवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती । करूं दुष्टाची फजिती ॥ ५ ॥

---

१ त. हीं दे. शब्दाचीं रत्नें । शब्दाचीं शस्त्रे०.–२ पं. शस्त्रें यत्नें करूं ।.–३ पं. शब्द०.– ४ पं. "माजी" नाहीं.–५ पं. मुक्तीचा.–६ पं. भक्ताची –७ पं. ०वेगळे आपुले ठायीं ।–८ पं. तो ठेवा.– ९ दे. त. त्या.–१० पं. बांधविला –११ पं. तें.–१२ पं. जवळिका.–१३ पं. आपणा ऐसें करूं पाहे ।.– १४ पं. शूर.–१५ पं. उगी करी बुरबुर.

३४०२. माझी[1] आतां लोक सुखें निंदा करू[2]। ह्मणती विचारु सांडियेला ॥ १ ॥ कारण होय तो करावा[3] विचार । काय भीड भार करूं देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे काय करूं लापनिक । जनाचार सुख नासिवंत ॥ ३ ॥

३४०३. ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला तैसा साधु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ओढाळाच्या संगें सात्विक[4] नासलीं । क्षण एक नाडलीं समागमें ॥ ध्रु ॥ डांकाचे संगती सोनें हीन जालें । मोल तें तुटलें लक्ष कोडी ॥ २ ॥ विषानें पक्वान्नें गोड कडू जालीं । कुसंगानें केली तैसी परी ॥ ३ ॥ भावें तुका ह्मणे सत्संग हा बरा । कुसंग हा फेरा चौऱ्याशीचा ॥ ४ ॥

३४०४. भलते जन्मीं मज घालिसील तरी । न सोडीं मी हरी नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुख दुःख तुज देईन भोगितां । मग मज चिंता कासयाची ॥ ध्रु ॥ तुझा दास ह्मणवीन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ॥ २ ॥ कासया मी तुज भाकितों करुणा । तारीं नारायणा ह्मणऊनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आह्मां तया ॥ ४ ॥

३४०५. गातों नाचतों आनंदें । टाळघागरिया छंदें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझी तुज पुढें देवा । नेणों भाव कैसी सेवा ॥ ध्रु ॥ नेणों ताळ घात मात । भलते सवां पाय हात ॥ २ ॥ लाज नाहीं शंका । प्रेमें[5] घाला ह्मणे तुका ॥ ३ ॥

३४०६. रुसलों[6] आह्मीं आपुलिया संवसारा । तेथें जनाचारा कांय[7] पाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां इष्ट मित्र सज्जन सोयरे । नाहीं या दुसरें देवाविण ॥ ध्रु ॥ दुराविले बंधु सखे सहोदर । आणीक विचार काय तेथें ॥ २ ॥ उपाधिवचन नाइकती कान । त्रासलें हें मन वहु माझें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करा होईल[8] ते दया । सुख दुःख वांयां न धरावें ॥ ४ ॥

३४०७. सांडुनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे न[9] घ्यावा जन्म । प्रेम लुटावें नाम ॥ ध्रु ॥ येथें मिळतो दहीं भात । वैकुंठीं[10] ते नाहीं मात ॥ २ ॥ तुका[11] ह्मणे आतां । मज न लगे सायुज्यता ॥ ३ ॥

३४०८. पदोपदीं पायां पडणें । करुणा जाण भाकावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ये गा ये गा विसांवया । करुणा दयासागरा ॥ ध्रु ॥ जोडोनियां करकमळ । नेत्र जळ भरोनि ॥ २ ॥ तुकों[12] उभें दारीं पात्र । पुरवीं आर्त विठोवा ॥ ३ ॥

---

१ दे. मज.–२ दे. त. करो । ह्मणती विचार०.–३ पं. कोन–४ पं. सात्विकें.–५ पं. प्रेमें घालों ह्मणे०.–६ पं. रुसलो या आह्मी आपुल्या संसारा ।.–७ पं. गोण.–८ पं. ठाकेल.–९ पं. नेघ्यावे हे जन्म । काय वैकुंठा जाऊन ॥.–१० पं. नाहीं वैकुंठीं ते मात –११ पं. तुका ह्मणे मुक्ति नलगे । राहेन संताचिये संगें ॥.–१२ त. तुका उभें दान पात्र. पं. तुका उभा दान पात्र ।.

३४०९. आतां हें[1] सेवटीं असो पायांवरी । वदती वैखरी वागपुष्प ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नुपेक्षावें आह्मां दीना पांडुरंगा । कृपादानीं जगामाजी तुह्मीं ॥ ध्रु ॥ बोळवुनी देह सांडियेली[2] शुद्ध । सारियेला भेद जीव शिव ॥ २ ॥ तुका ह्मणे मन तुमचे चरणीं । एवढी आयणी पुरवावी ॥ ३ ॥

३४१०. तरि च होयें[3] वेडी । नग्न होय धेंडफुडी[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय बोलाचें गौरव । अंत वरी दोनें[5] भाव ॥ ध्रु ॥ मृगजळा न्याहाळितां । तान न वेंजाये[6] सेवितां ॥ २ ॥ न पाहे आणिकांची आस । शूर बोलिजे तयास ॥ ३ ॥ तुका ह्मणे यें[7] लक्षणें । संत अळंकार लेणें ॥ ४ ॥

३४११. आग्रहा नांवें पाप । योगीं सारावे संकल्प ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सहजा ऐसें भांडवल । असोनि कां सारा बोल ॥ ध्रु ॥ तैं न भेटे तें काय । मना अंगींचे उपाय ॥ २ ॥ तुका ह्मणे धरीं सोय । वासनेची फोडा डोय ॥ ३ ॥

३४१२. न करीं पठन घोष अक्षरांचा । बीजमंत्र आमुचा पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वकाळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासी समाधि हे ॥ ध्रु ॥ न करीं भ्रमण न रिघें कपाटीं । जाईन तेथें दाटी वैष्णवांची ॥ २ ॥ आनु[8] नेणें कांहीं न वजें तपासी । नाचें दिंडीपाशीं जागरणीं ॥ ३ ॥ उपवास व्रत न करीं पारणें । रामकृष्ण ह्मणें नारायण ॥ ४ ॥ आणिकांची सेवा स्तुती नेणें वाणूं । तुका ह्मणे आणु दुजें नाहीं[9] ॥ ५ ॥

३४१३. पुंडलिकाचे निकटसेवे । कैसा धांवे बराडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलें थोरपण । नारायण विसरला ॥ ध्रु ॥ उभा कटीं ठेवुनि कर । न ह्मणे पर बैससें ॥ २ ॥ तुका ह्मणे जगदीशा । करणें आशा भक्तांची ॥ ३ ॥

३४१४. बाळ काय जाणे जीवनउपाय । मायबाप[10] वाहे सर्व चिंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आइतें भोजन खेळणें अंतरीं । अंकितांचे[11] शिरीं भार नाहीं ॥ ध्रु ॥ आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल जानिता । आमुची[12] ते सत्ता तयावरी ॥ ३ ॥

३४१५. काय करितील[13] केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तृणीं हुताशन लागला[14] ते रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें ॥ ध्रु ॥

---

१ त. "हें" नाहीं.–२ पं. तोडियेले.–३ पं. शोभे.–४ पं. धट फाडी.–५ पं. दोनी.–६ पं. वजो.–७ दे. त. हें लक्षण.–८ पं. आन.–९ पं. कांहीं.–१० पं. वाहे बापमाय.–११ पं. अकिताचा.–१२ दे. जेथें आमची०.–१३ दे. त. करिती.–१४ पं. लागतां.

विष्णुमूर्तिपाद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ३ ॥

३४१६. वेद नेले शंखासुरें । केलें ब्रह्मयानें गाऱ्हाणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांव धांव[1] झडकरी । ऐसें[2] कृपाळुवा हरी ॥ ध्रु ॥ गजेंद्र नाडियें गांजिला । तेणें तुझा धांवा केला ॥ २ ॥ तुका ह्मणे पद्मनाभा । जेथें पाहें तेथें उभा ॥ ३ ॥

३४१७. माकडा दिसती कंवटी नारळा[3] । भोक्ता निराळा वरील सारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥ ध्रु ॥ सुनियांसी क्षीर वाढिल्या[4] ओकवी । भोगितयां पोसवी धणीवरी[5] ॥ २ ॥ तुका ह्मणे भार[6] वागविती मूर्ख । नेतील तें सार परीक्षक ॥ ३ ॥

३४१८. भेटीची आवडी[7] उताविळ मन । लागलेंसे ध्यान जीवीं जीवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां आवडीचा पुरवावा सोहळा । येऊनी गोपाळा क्षेम देईं ॥ ध्रु ॥ नेत्र उन्मळित राहिले तटस्त[8] । गंगा अश्रुपात वहावली ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ॥ ३ ॥

३४१९. धवळलें[9] जगदाकार । आंधार तो निरसला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लपों जातां नाहीं[10] ठाव । प्रगट पाहें[11] पसारा ॥ ध्रु ॥ खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे जिवें साटीं । पडिली मिठी धुरेसी ॥ ३ ॥

३४२०. मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें[12] परस्परें आहे चि विचारा । भोपळ्याचा तारा दगडासी ॥ ध्रु ॥ भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परि संगें[13] नव्हे तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे करा[14] परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥ ३ ॥

३४२१. लावूनि कोलित । माझा करितील घात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे बहुतांचे संधी । सांपडलों[15] खोळेमधीं ॥ ध्रु ॥ पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ॥ २ ॥ तुका ह्मणे रिघे । पुढें नाहीं जालें धींगे ॥ ३ ॥

---

१ पं. लवकरी –२ पं. ऐकें.–३ पं. नारेळे । भोक्ता तो निराळें०.–४ पं. चारिल्या ओखी ॥ भोक्ता तोचि सेवी धणीवरी ॥.–५ त. भोक्ता तो सेवी धणी वरी –६ पं. मूर्ख वागविती भार । त. वागविती मूर्ख भार –७ पं. तांतडी.–८ पं. ताटस्ती । गगा अश्रुपानीं.–९ पं. धवळें –१० पं. ठाव नाहीं.–११ प. पाहीं.–१२ पं. ऐसा परस्परें आहे हा विचार । भोपळ्याचा तार दगड मी ॥ – १३ पं. संगें.–१४ पं. करीं.–१५ दे. सापडला.

३४२२. ऐसी एकां अटी। रीतीं सिणती करंटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साच आपुल्या पुरतें। करून नेघेती कां हितें[1] ॥ ध्रु ॥ कां हीं वेचितील वाणी। निरर्थक चि कारणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा। कांहीं समर्पूनि सेवा ॥ ३ ॥

३४२३. चालिले सोबती। काय मानिली निश्चिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करिसी एकला। काळ सन्निध पातला ॥ ध्रु ॥ कांहीं सावध तो बरवा। करीं आपुला काढावा ॥ २ ॥ चालिले अगळे। हळ च कान केश डोळे ॥ ३ ॥ वोसरले दांत। दाढा गडबडल्या आंत ॥ ४ ॥ एकली तळमळ। जिव्हा भलते[3] ठायीं लोळे ॥ ५ ॥ तुका ह्मणे यांणीं। तुझी मांडिली[2] घालणी ॥ ६ ॥

३४२४. नका मजपाशीं। वदों[4] प्रपंचाचे विशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां नाइकावी कानीं। मज देवाविण वाणी ॥ ध्रु ॥ येऊनियां रूपा। कोण पाहे पुण्यपापा ॥ २ ॥ मागे आजिवरी। जालें माप नेलें चोरीं ॥ ३ ॥ सांडियेलीं पानें। पुढें पिका अवलोकन ॥ ४ ॥ पडों नेदी तुका। आड गुंपूं[6] कांहीं चुका ॥ ५ ॥

३४२५. जाले आतां सांटे। कासयाचे लहान मोटे ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ एक एका पाडिलों हातीं। जाली तेव्हां चि निश्चिंती ॥ ध्रु ॥ नाहीं फिरों येत मागें। जालें साक्षीचिया अंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा। आतां येथें कोठें हेवा ॥ ३ ॥

३४२६. माझें मज द्यावें। नाहीं करवीत नवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सहस्रनामाचें रूपडें। भक्त कैवारी चोखडें ॥ ध्रु ॥ साक्षीविण बोलें। तरी मज पाहिजे दंडिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मौल[7]। माझा खरा तो[8] विठ्ठल ॥ ३ ॥

३४२७. करूं स्तुती तरि ते निंदा। तुह्मी जाणां हे गोविंदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां लडिवाळांचे बोल। करा कवतुकें नवल ॥ ध्रु ॥ बोबड्या उत्तरीं। तुह्मा रंजवितों हरी ॥ २ ॥ मागतों भातुकें। तुका ह्मणे कवतुकें ॥ ३ ॥

३४२८. न लाहिजे जपें न लाहिजे तपें[9]। आह्मांसी हें सोपें गीतीं गातां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करितां ध्यान न करितां धारणा। तो नाचे कीर्त्तनामाजी हरि ॥ ध्रु ॥ जयासी नाहीं रूप आणि आकार। तो चि कटी कर उभा विटे ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं। तो आह्मां संपुष्टीं भक्तिभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म जाणती लडिवाळें। जें होतीं निर्मळें अंतर्बाहीं ॥ ४ ॥

---

१ पं. हित.–२ पं. मांडिली.–३ पं. भलतेंच चावळे।.–४ पं. वदा.–५ पं. जालों मापनेरों०.–६ पं. गुफू.–७ पं. मोल.–८ पं. हा.–९ दे. नव्हतील जपें नव्हतील तपें।.

३४२९. आह्मी जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ केला घरांत रिघावा । ठायीं पडियेला ठेवा ॥ छ्र ॥ हातां चैढलें धन । नेणें[4] रचिलें कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे मिठी । पायीं देऊनि केली सुटी ॥ ३ ॥

३४३०. लागपाठ केला । आतां वांटा नित्य त्याला ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ करा जोडीचा ह्व्यास । आलें दुरील घरास ॥ छ्र ॥ फोडिलीं भांडारें । मोहोरलीं एकसरें ॥ २ ॥ अवघियां पुरतें । तुका ह्मणे घ्यावें हातें ॥ ३ ॥

३४३१. एकीं असें[6] हेवा । एक अनावड जीवां ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥ छ्र ॥ प्रीतिसाटीं भेद । कोणी पूज्य कोणी निंद्य ॥ २ ॥ तुका ह्मणे लैंळा । त्याचा जाणे हा कळवळा ॥ ३ ॥

३४३२. स्वामीचें हें देणें । येथें पावलों दर्पणें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ करूं आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद ॥ छ्र ॥ कळावया वर्म । हा तों पायांचा चि धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे सिद्धी । हे चि पाववावी बुद्धी ॥ ३ ॥

३४३३. रुसलों संसारा । आह्मी आंणीक व्यापारा ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ ह्मणऊनि केली सांडी । देऊनि पडिलों मुरकंडी ॥ छ्र ॥ परते चि ना मागें । मोहो निष्ठुर जालों अंगें ॥ २ ॥ सांपडला देव । तुका ह्मणे गेला भेव ॥ ३ ॥

३४३४. हें तों वांटलें आश्चर्य । तुह्मां न धरवे धीर ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ माझा फुटतसे प्राण । धांवा धांवा ह्मणऊन ॥ छ्र ॥ काय नेणों दिशा । जाल्या तुह्मांविण ओशा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांगा । नाइकिजे पांडुरंगा ॥ ३ ॥

३४३५. धांवों[13] केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसंगा लेंकरा ॥ छ्र ॥ उशीर तो आतां । न करावा हे चिं[14] चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे त्वरें । वेग करीं विश्वंभरे ॥ ३ ॥

३४३६. जोडिले अंजुळ । असें दोंनउतावीळ ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ पाहा वें हा कृपादृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥ छ्र ॥ तूं धैंनी मी सेवक । आंइक्य तें एका एक ॥ २ ॥ करितों विनंती । तुका सन्मुख पुढती ॥ ३ ॥

---

१ त. पं. "आह्मी" नाहीं.–२ पं. जाले वळिवंत०.–३ त. पं. चढे.–४ त. पं. ऐसें –५ पं. नीट –६ पं. असे एक हेवा । येर अनावड०.–७ दे. कळा । त्याच्या०.–८ पं. तें.–९ पं. पावविली.–१० पं. त. आप आणि परा ।. ११ पं. वाटतें.–१२ त. पं. तुह्मा धरवला धीर ।.–१३ पं. धावें–१४ दे. त. "चि" नाहीं.–१५ पं. दाना उतावीळ.–१६ पं. त. पाहा.–१७ पं. अनुभवा या गोष्टी ।.–१८ पं. स्वामी.–१९ पं. एका तो.

३४३७. काय तुज कैसें[1] जोगवेल देवा । आणावें अनुभवा कैशा परी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सगुण[2] निर्गुण थोर कीं लहान । न कळे अनुमान मज तुझा ॥ छ ॥ कोण तो निर्धार करूं हा विचार । भवसिंधु पार तरावया ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपती वर्म ठावें ॥ ३ ॥

३४३८. मी तत्र बैसलों धरुनियां ध्यास[3] । न करीं उदास पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी जालों दास ॥ छ ॥ शुकेलों कृपेच्या वचनाकारणें । आशा नारायणें पुरवावी ॥ २ ॥ तुका ह्मणे येऊनियां देईं भेटी । कुरवाळुनी पोटीं धरीं मज ॥ ३ ॥

३४३९. आतां तुझें नाम गात असें गीतीं । ह्मणोनी मानिती लोक मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची । वारिली देहांची थोर पीडा ॥ छ ॥ सज्जन संबंधी तुटली उपाधी । रोकडी या बंदीं सुटलोंसें ॥ २ ॥ घ्यावा द्यावा कोणें करावा सायास । गेलें[4] आशापाश वारोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज कळेल तें आतां । करा जी अनंता मायबापा ॥ ४ ॥

३४४०. कामक्रोध मांझे[5] लावियेले पाठीं । बहुत हिंपुटीं जालों देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवरितां तुझे तुज नावरती । थोरें[6] वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥ छ ॥ तुझिया विनोदें आह्मां प्राणसाटी । भयभीत पोटीं सदा दुःखी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥ ३ ॥

३४४१. सन्मुख[7] चि तुह्मीं सांगावी जी सेवा । ऐसे माझे देवा मनोरथ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेघों[8] आह्मी कांहीं चित्तवित्त घरें । आपुल्या उदारें जीवावरी ॥ छ ॥ बोलें[9] परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य बोलेंतों[10] वचन । करुनी चरण साक्ष तुझे ॥ ३ ॥

३४४२. मज अनाथाकारणें । करीं येणें केशवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीव झुरे तुजसाटीं । वाट पोटीं पहातसें ॥ छ ॥ चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥ ३ ॥

३४४३. कासया वांचूनि जालों भूमी भार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातां भलें काय डोळियांचें काम । जंव पुरुपोत्तम न देखती ॥ छ ॥

---

१ पं. जाणावें गा देवा ।.—२ पं. सगुण कीं निर्गुण—३ पं. आस.—४ दे. पं. गेली.—५ पं. सुने.—६ दे. शून्य.—७ पं. स्वमुखें जी तुह्मी सांगा मज देवा । ऐसें माझें देवा मनोगत ॥ १ ॥.—८ पं. नेघों आह्मी कांहीं आपलें उदार । चित्तवित्त घर जीवावरी ॥. त. दे. निघों.—९ पं. वालें.—१० पं. बोल्तां.

काय सुख पेंव श्वापदाचें धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥ ३ ॥

३४४४. नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥ १ ॥ दुर्धर हे माया न होय सुटको । वैकुंठनायका सोडवीं मज ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें जालिया दर्षण । मग निवारण होइल सर्व ॥ ३ ॥

३४४५. चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणांवरि माथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेळोवेळां देईं क्षेमआलिंगन । वरी अवलोकन कृपादृष्टी ॥ ध्रु ॥ प्रक्षाळूं दे पाय वैसें माजघरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ॥ २ ॥ आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥ ३ ॥ करुणाकरें नाहीं कळों दिलें वर्म । दुरी होतां भ्रम कोर्णे वारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ॥ ५ ॥

३४४६. देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा मनुष्येंपणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें कोंणी नाहीं ॥ ध्रु[7] ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥ २ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥ ३ ॥ देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग हरी ॥ ४ ॥ पहा देवें तेंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्यांचीं ॥ ५ ॥

३४४७. अनंताचे मुखीं होसील गाइला । अमुप विठ्ठला दास तुह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें कोठें आलें होईल विचारा । तरीं च अव्हेरा योग्य जालों ॥ ध्रु ॥ सर्वकाळ तुह्मी असा जी संपन्न । चतुरा नारायण शिरोमणि ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे कलियुगींचे जीव । तरी नये कींव वहुपापी ॥ ३ ॥

३४४८. न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ ध्रु ॥ न लगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ २ ॥ न धरावी शंका । नये बोलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

३४४९. भांडवल माझें लाटिक्याचे गांठी । उद्दीम[10][11] तो तुटी यावी हा चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसी[12] तुझी वाट पाहों कोणा तोंडें । भोंवतीं किं रे[13] भांडे गर्भवास ॥ ध्रु ॥

---

१ पं. तुजविण.–२ पं. सुटिका.–३ पं. कार्णे–४ पं. तो चि वरी.–५ पं. ससाराची–६ पं. राहों नेदी –७ पं. "देवाची खुण जाला ज्यासी संग । त्याचा जाला भंग मनुष्यपणा ॥ " हें कडवें जास्त आहे –८ त. "देवाची ते खूण गुंतों०" आणि "देवाची ते खूण तोडी०" हीं दोन कडवीं मागेंपुढें आहेत.–९ पं. "देवाची ते खूण तोडी०" हें कडवें नाहीं.–१० दे. होनीं.–११ पं. उदिमाची तुटी यावी ऐसी ।.–१२ पं. ऐसी.–१३ पं. " किं रे " नाहीं.

चहूं खाणीचिया रंगलोंसें संगें[1] । सुष्ट दुष्ट अंगें धरूनियां ॥ २ ॥ बहुतांचे बहु पालटलों सळे[2] । बहु आला काळें रंग अंगा ॥ ३ ॥ उकलूनि नेये दावितां अंतर । घडिचा पदर सारूनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे करीं गोंवळें यासाटीं । आपल्या पालटीं संगें देवा ॥ ५ ॥

३४५०. संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥ १ ॥ मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहें रूप ॥ ३ ॥

३४५१. जें ज्याचें जेवण । तें चि याचकासी दान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जाऊं चोजवीत । जेथें वसतील संत ॥ ध्रु ॥ होतीं घालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥ ३ ॥

३४५२. धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निजल्यां जागविती । निज पुरवूनि देती ॥ ध्रु ॥ एक वेवसाव । त्यांचा संग त्यांचा जीव ॥ २ ॥ हितें केलें[11] हित । ग्वाही एक एकां चित्त ॥ ३ ॥ विषमाचें कांहीं । आड तया एक नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे बरीं । घरा येतील त्यापरी ॥ ५ ॥

३४५३. धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो[12] तों त्याच्या दुःखें[13] घामेजेना ॥ १ ॥ इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥ २[15] ॥ तुका ह्मणे आह्मांसवें जो रुसला । नयाचा अबोला आकाशासीं ॥ ३ ॥

३४५४. सरे आह्मांपाशीं एक शुद्धभाव । नाहीं तरी वाव उपचार ॥ १ ॥ कोण मानी वरी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें ओळखी तों ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां जाणिवेचें दुःख । न पाहों त्या मुख दुर्जनाचें ॥ ३ ॥

३४५५. आतां तळमळ । केली पाहिजे सीतळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करील[16] तें पाहें देव । पायीं ठेवुनियां भाव ॥ ध्रु ॥ तो चि अन्नदाता । नाहीं आणिकांची सत्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे दासा । नुपेक्षील[17] हा भरवसा ॥ ३ ॥

---

१ पं. रंगें.–२ पं. साळे –३ त. आलो पं. आले –४ पं. तये –५ त. आतां करीं गोळ्यासाटीं ।. पं. आतां करी गाळे साटीं ।.–६ पं. सुकृतासी –७ त. तुका ह्मणे ते नम०.–८ पं. चाट.–९ दे. त. निजविल्या –१० पं. याचा.–११ पं. कळे –१२ दे. तों तों त्याच्या०.–१३ दे. त. सुखें.–१४ पं. अतिताची –१५ पं. " सप्रेमें कुरवाळी महाफणी व्याळ । आपुली तो डाळ सांडी केवीं ॥ " हें कडवें येथें जास्त आहे –१६ पं. पाहा करील तें देव.–१७ पं. नुनेली.

३४५६. लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कैसें होय याचें । सिजतां काचें राहिलें ॥ ध्रु ॥ खाय ओकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥ २ ॥ तुका ह्मणे भावहीण । त्याचा सीण पेंचावा ॥ ३ ॥

३४५७. माझ्या इंद्रियांसीं लागलें भांडण । ह्मणतील कान रसना धाली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥ ध्रु ॥ गुण गाय मुख आइकती कान । आमचें कारण तैसें नव्हे ॥ २ ॥ दरुषणें फिटे सैकळांचा पांग । जेथें ज्याचा भाग[३] घेइल तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें करीं नारायणा । माझी ही वासना ऐसी आहे ॥ ४ ॥

३४५८. सिद्धीचा दास नव्हें श्रुतीचा अंकिला । होईन विठ्ठला सर्व तुझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वकाळ सुख आमच्या मानसीं । राहिलें जयांसी नास नाहीं ॥ ध्रु ॥ नेणें[७] पुण्य पाप न पाहें लोचनीं । आणिका वांचूनि पांडुरंगा ॥ २ ॥ न करीं आस मुक्तीचे सायास । भक्तिप्रेमरस सांडूनियां ॥ ३ ॥ गर्भवासीं धाक नाहीं येतां जातां । हृदयीं राहतां[१२] नाम तुझें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों[१३] तुझा चि अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥ ५ ॥

३४५९. जन्मा येऊनि तया लाभ जाला । विडवई भेटला पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संसारदुःखें नासिलीं तेणें । उत्तम हें केणें नामघोष ॥ ध्रु ॥ धन्य ते[१४] संत सिद्ध महानुभाव । पंढरीचा ठाव टाकियेला ॥ २ ॥ प्रेमदाते ते च पतितपावन । धन्य दरुपण होय त्याला[१६] ॥ ३ ॥ पावटणिया पंथें जालिया सिद्धी । वोगळे समाधि सायुज्यता ॥ ४ ॥ प्रेम अराणूक नाहीं भय धाक । मज तेणें सुखें कांहीं चिंता ॥ ५ ॥ तें[१८] दुर्लभ संसारासी । जडजीवउद्धारलोकासी ॥ ६ ॥ तुका ह्मणे त्यासी । धन्य भाग्य दरुषणें ॥ ७ ॥

३४६०. काय दिवस गेले अवघे चि वेर्‍हाडें । तें आलें सांकडें कथेमाजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षण एके ठायीं मन स्थिर नाहीं । अराणूक कइं होईल पुढें ॥ ध्रु ॥ कथेचे[२०] विरसें दोषा मूळ होय । तरण उपाय कैचा मौती[२१] ॥ २ ॥ काय तें[२२] सांचवुनि

---

१ पं. पावावा.–२ पं. नेत्रांचा तो पांग ।.–३ पं. भोग.–४ पं. दास –५ पं. सर्व सुख असे माझिये मानसीं.–६ पं. तयासी.–७ पं. तेणें –८ पं. देखें.–९ पं. ०धरीं मी आस साधीना सायास ।.–१० पं. वाचुनियां.–११ पं. दु.ख.–१२ पं. असतां.–१३ पं. तुझा होईन अंकिला.–१४ पं. ते चि.–१५ पं. राव ठाकियेला.–१६ पं. त्याचें.–१७ पं. सुख काय चिंता ।.–१८ पं. "तें दुर्लभ०" व "तुका ह्मणे०" या दोन कडव्यांबद्दल "दुर्लभ सर्वांसी उद्धार लोकांसी ॥ तुका ह्मणे त्यासी दरुषण ।" हें एकच कडवें आहे.–१९ पं. वराडें.–२० पं. कथेचा विसर दोषामुळें होय ।.–२१ पं. मग.–२२ पं "तें" नाहीं.

उरलें हें[1] मागें। घटिका एक [2]संगें काय गेलें ॥ ३ ॥ ते चि वाणी येथें करा उजळणी। काढावी मथूनि शब्दरत्नें ॥ ४ ॥ तुका ह्मणे हें चि बोलावया चाड। [3]उभयतां नाड हित असे ॥ ५ ॥

३४६१. शुद्धाशुद्ध निवडे कैसें। चर्म मास भिन्न नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं अधिक नाहीं उणें। कवण्या गुणें देवासी ॥ ध्रु ॥ उदक भिन्न असे काई। वाहाळ वावी सरिता नई ॥ २ ॥ सूर्य तेजें निवडी[4] काय। रश्मी रसा सकळा खाय ॥ ३ ॥ वर्णा भिन्न दुधा नाहीं। सकळा गाई सारखें ॥ ४ ॥ करितां भिन्न नाहीं माती। मडक्या गति भिन्न नांवें ॥ ५ ॥ वर्त्ते एकविध अग्नि। नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥ ६ ॥ तुका ह्मणे पात्र चाड। किंवा विषें[6] अमृत गोड ॥ ७ ॥

३४६२ न धरी प्रतिष्ठा कोणाची [7]ही यम। ह्मणतां कां रे राम लाजा ह्मणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांपडे हातींचें सोडवील[8] काळा। तो कां वेळोवेळां नये वाचे ॥ ध्रु ॥ कोण लोक जो हा सुटला तो एक। गेले कुंभपाक रवरवांत ॥ २ ॥ तुका ह्मणे हित [9]तों ह्मणा विठ्ठल। न ह्मणे तो भोगील कळेल तें ॥ ३ ॥

३४६३. ह्मणवितां हरी न ह्मणे तयाला। दरवडा पडिला देहामाजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं। भुलविला [10]निश्चितीं कामरंगें ॥ ध्रु ॥ नावडे ती कथा देउळासी जातां। प्रियधनसुता लक्ष तेथें ॥ २ ॥ कोण नेतो तयां घटिका दिवसीं[11] एका। कां रे ह्मणे तुका नागवसी ॥ ३ ॥

३४६४. कथे बैसोनि सादरें। सुखचर्चा परस्परें। नवल काय तो उद्धरे। आणीक तरे सुगंधें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुण्य [12]घेई रे फुकाचें। पाप दुष्टवासनेचें। पेरिल्या बीजाचें। फळ घेई शेवटीं ॥ ध्रु ॥ कथा विरस पाडी आळसें[13]। छळणा करूनि मोडी रस। बुडवी आपणासरिसें। विटाळसें नावेसी ॥ २ ॥ सज्जन चंदनाचिये परी। दुर्जन देशत्यागें दुरी। राहो ह्मणे हरि। विनंती करी तुका हे ॥ ३ ॥

३४६५. कळों आलें तुझें जिणें। देवा तूं माझें [14]पोषणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाट पाहासी आठवाची[15]। सत्ता [16]संतत कईची ॥ ध्रु ॥ बोलावितां यावें रूपा। सदा निर्गुणीं चि लपा ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं परदेशी। येथें आह्मां अंगेजिसी ॥ ३ ॥

---

१ पं. तें.–२ पं. सागें–३ पं. नाम घेतां गाड हित असे।–४ पं. निवडे.–५ त. शुद्र भाव.–६ दे. विसें–७ दे. त. "ही" नाहीं–८ त. सांडवील.–९ पं. तो ह्मणावा विठ्ठल।–१० पं. निश्चिती.–११ पं. दिवस.–१२ पं. घ्यावें.–१३ पं. आळस.–१४ पं. पोसणें. दे. पोसनें.–१५ पं. आनर्चा.–१६ पं. सतत.

३४६६. आतां येथें लाजे नाहीं तुझें काम । जाय मज राम आठवूं दे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझे भिडे माझे बहु जाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥ छ ॥ माझें केलें मज पारिखें माहेर । नेटोनी साचार चाळविलें ॥ २ ॥ सुखासाटीं एक वाहियेलें खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥ ३ ॥ केलों चौघाचार नेलों पांचांमधीं । नाहीं दिली शुद्धी धरूं आशा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां घेईन कांटीवरी । धनी म्यां कैवारी केला देव ॥ ५ ॥

३४६७. आजिवरि होतों तुझे सत्ते खालीं । तोंवरी तों केली विटंवणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां तुज राहों नेदीं या देशांत । ऐसा म्यां समर्थ केला धणी ॥ छ ॥ सोपें रिग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापिणी काय जाणों ॥ २ ॥ तुका ह्मणे म्यां हा बुडविला वेव्हार । तुझे चि ढोपर सोलावया ॥ ३ ॥

३४६८. देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा । लाजे नका थारा देऊं कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मोडिलें या रांडे सुपंथ मारग । चालविलें जग यमपंथें ॥ छ ॥ परिचारीं केली आपुली च रूढी । पोटींची ते कुडी ठावी नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आणा राउळा धरून । फजित करून सोडूं मग ॥ ३ ॥

३४६९. कां रे तुह्मी निर्मळ हरिगुण गानां । नाचत आनंदरूप वैकुंठासी जानां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय गणिकेच्या याती अधिकार मोटा । दोषी अजामेळ ऐसीं नेलीं वैकुंठा ॥ छ ॥ ऐसे नेणों मार्गे किती अनंत अपार । पंच महादोषी पातकां नाहीं पार ॥ २ ॥ पुत्राचिया लोभें नष्ट ह्मणे नारायण । कोण कर्तव्य तुका ह्मणे त्याचें पुण्य ॥ ३ ॥

३४७०. वैसोनियां खाऊं जोडी । ओढाओढी चुकवूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें केलें नारायणें । वरवें जिणें सुखाचें ॥ छ ॥ घरींच्या घरीं भांडवल । न लगे बोल वेचावे ॥ २ ॥ तुका ह्मणे आटाआटी । चुकली दाटी सकळ ॥ ३ ॥

३४७१. नाहीं म्यालों तरी पावलों या ठाया । तुह्मां आळवाया जवळिकें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सत्तावळें आतां मागेन भोजन । केलें तें चिंतन आजिवरी ॥ छ ॥ नवनीतासाटीं खादला हा जीव । थोड्यासाटीं कीव कोण करी ॥ २ ॥ तुका ह्मणे ताक न लगे हें घाटे । पांडुरंगा खोटें चाळवण ॥ ३ ॥

---

१ पं. नष्ट तूं.–२ पं. केलों.–३ त. नेला.–४ त. त्यां. पं. म्यां.–५ पं. सोपें.–६ पं. रांडेनें सुपंथ०.–७ दे. त. गाणा.–८ दे. त. जाणा.–९ पं. मार्गे नेणों.

**३४७२.** सारीन तें आतां एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळोवेळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पांडुरंगे ॥ ध्रु ॥ वंचूं नये आतां कांहीं च प्रकार । धाकल्याचें थोर जाल्यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बहु चाळवावें । कांहीं नेदीं ठावें उरों मागें ॥ ३ ॥

**३४७३.** पोट धालें मग न लगे पैरती । जालिया निश्चिती खेळ गोड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलिया हातें देईं वो कवळ । विठ्ठल शीतळ जीवन वरी ॥ ध्रु ॥ घराचा विसर होईल आनंद । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे तों च वरी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥ ३ ॥

**३४७४.** बोलविसी तरी । तुझ्या येईंन उत्तरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं कोड कवतुकें । हातीं द्यावया भातुकें ॥ ध्रु ॥ बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझें चळण तुज सवा ॥ ३ ॥

**३४७५.** दिला जीवभाव । तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां वर्ते तुझी सत्ता । येथें सकळ अनंता ॥ ध्रु ॥ माझीया मरणें । तुझी बैसविलें ठाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं[10] । मी हें माझें येथें नाहीं ॥ ३ ॥

**३४७६.** एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेतों काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ॥ ध्रु ॥ धांवे मागें मागें । जाय तिकडे चि लोगे ॥ २ ॥ तुका ह्मणे नेलें । माझें [12]सर्वस्वें विठ्ठलें ॥ ३ ॥

**३४७७.** बराडियाची आवडी पुरे । जया झुरे साटीं तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें जालें माझ्या मना । तुठीं चरणावरूनि ॥ ध्रु ॥ मागलिया पेणें पावे । विसांवे तें ठाकणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे छाया भेटे । वरें वाटे तापे त्या ॥ ३ ॥

**३४७८.** आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उभारोनी बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥ ध्रु ॥ नाभी नाभी या उत्तरें । करुणाकरें सांतवीजे ॥ २ ॥ तुका ह्मणे केली आस । तो हा दिस फळाचा ॥ ३ ॥

**३४७९.** बहुजन्में सोस केला । त्याचा जाला परिणाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठलसें नाम कंठीं । आवडी पोटीं संचितें[13] ॥ ध्रु ॥ येथुन तेथवरी आतां । न लगे चिंता करावी ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें मन । हें चि दान शकुनाचें ॥ ३ ॥

---

१ त. सेवटींच्या घासें. दे. पूर्वी असें होतें.—२ पं. अगे—३ त. टाव.—४ पं. पंगती—५ पं. विठ्ठला.—६ पं. बोलाविती—७ पं. येईल—८ दे. कवतिकें.—९ पं. तुझे—१० दे. त. काई.—११ पं. चालत लागे ।.—१२ पं. सर्वस्व.—१३ पं. सचली.

३४८०. उसंतिल्या कर्मवाटा । बहु मोटा आघात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शीघ्र यावें शीघ्र यावें । हातीं न्यावें धरूनि ॥ छ्र ॥ भागलों या खटपटे । घटपटें करितां ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता खंडावी[1] ॥ ३ ॥

३४८१. तुह्मांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां बा तुह्मी ऐसें नेणें[2] । निष्ठुरपणें टाळित असां ॥ छ्र ॥ आळवितां[3] मायबापा । नये कृपा अझूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे जगदीशा । काय असां निजेले ॥ ३ ॥

३४८२. नेलें सळेंवळें । चिंताविताचें[4] गांडोळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साह्य जालीं घरिच्या घरीं । होतां ठायीं च कुठोरी ॥ छ्र ॥ मी[5] पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥ ३ ॥

३४८३. जाला[6] हा डांगोरा । मुखीं लहानाचे[7] थोरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नागविलों[8] जनाचारीं । कोणी बैसों नेदी दारीं[9] ॥ छ्र ॥ संचिताचा ठेवा । आंतां[10] आला तैसा घ्यावा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । ह्मणों[11] केलें हें बरवें ॥ ३ ॥

३४८४. किती चौघाचारें । येथें गोविलीं वेव्हारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे[12] बांधविले गळे । होऊं न सकती निराळे ॥ छ्र ॥ आपलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥ २ ॥ तुका ह्मणे खंडदंडें । येरझारीं लपती लंडें ॥ ३ ॥

३४८५. पांडुरंगा ऐसें[13] सांडुनि वेव्हारा । आणिकांची करा ऑस[14] वांयां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुतांसी[15] दिला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ॥ छ्र ॥ याचिया अंकिता वैकुंठ वंदर । आणीक वेव्हार चालतीना[16] ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे हातींचें वजन । यासी वोल कोण ठेवूं सके ॥ ३ ॥

३४८६. ठेवूनि इमान राहिलों चरणीं । ह्मणउनि धणी कृपा करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मांसी भांडार करणें जतन । आलें[17] गेलें कोण उंच निंच ॥ छ्र ॥ करूनि सांभाळीं राहिला निराळा । एक एक वेळा आज्ञा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे योग्यायोग्य विनीत । देवा नाहीं चित्त येथें देणें ॥ ३ ॥

३४८७. आतां नव्हे गोड कांहीं[18] करितां संसार । आणीक संचार जाला माजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्मरसें गेलें भरुनियां अंग । आधील तो रंग

१ पं. न सडावी.–२ पं. नेणां.–३ पं. आळवितों –४ पं. चित्त वित्ताचें.–५ पं. “ मी ” नाहीं.–६ पं. जाहला टांगोरा ।.–७ पं. लाहान ही.–८ पं. नागविलें. त. नागविला.–९ पं. द्वारीं.–१० पं. आला आतां.–११ पं. केलें आतां हें बरवें.–१२ पं. ऐसे.–१३ पं. ०सारिखा.–१४ पं. वास.–१५ पं. बहुतां.–१६ दे. त. चालतिना.–१७ पं. आला गेला –१८ त. पं. “ कांहीं ” नाहीं.

पालटला ॥ ध्रु० ॥ रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निववीलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ॥ ३ ॥

३४८८. आतां काशासाटीं दुरी । अंतर उरी राखिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं लवकरी मुळ । लेहानें[1] तीळ मुळीचिया ॥ ध्रु० ॥ दोहीं ठायीं उद्वेगवाणें । दरुपणें निश्चिंती ॥ २ ॥ तुका ह्मणे वेग व्हावा । ऐसी जीवा उत्कंठा ॥ ३ ॥

३४८९. पडिली हे रूढि जगा परिचौर । चालविती वेव्हार सत्य ह्मूण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मरणाची कोणां रे नाहीं आठवण । संचिताचा धन लोभ हेवा ॥ ध्रु० ॥ देहाचें भय तें काळाचें भातुकें । ग्रासूनि तें एकें ठेविलेंसे ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ॥ ३ ॥

३४९०. हित नाहीं ठावें जननीजनका । दाविला लौकिकाचार तिंहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंधळ्याचे काठी लागले अंधळें । घात एका वेळे पुढेंमागें ॥ ध्रु० ॥ न धरावी चाली करावा विचार । बरील आहार गळीं लावी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला निवाडा रोकडा । राउत हा घोडा हातोहातीं ॥ ३ ॥

३४९१. जेथें पाहें तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सांगों देवा भुलले जीव । बहु यांची येतसे कींव ॥ ध्रु० ॥ वेठीचें मोटळें लटिकें चि फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे ॥ २ ॥ तुका ह्मणे कां उगे चि खोल । जवळी दाखवी आपणां बोल ॥ ३ ॥

३४९२. जाणिवेच्या भारें चेंपला उर । सदा बुरबुर सरे चि ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती[10] याचें ऐकों कानीं । मारिलें घाणीं नोळकरी[11] ॥ ध्रु० ॥ मिटेंविणें[12] आळणी बोल । कोरडी फोल घसघस ॥ २ ॥ तुका ह्मणे डेंगा न कळे[13] हित । [14]किती फजित करूं तरी ॥ ३ ॥

३४९३. अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचे पाय माझे लागोत कपाळीं । भोग उष्टावळी धन्यकाळ ॥ ध्रु० ॥ पड उर्मी जिंहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती वोळे लवकरी । ठायीं चि अंतरीं शुद्ध होती ॥ ३ ॥

---

१ पं. ०मुळा । लहानें तळा० —२ त. लाहाणे.—३ पं. परिहार.—४ पं. कांहीं नाहीं०.—५ पं. सचिताचें धन लाभ हेवा ।—६ पं. "अंधळ्याचे०" व "न धरावी०" हीं कडवीं मागें पुढें झालीं आहेत.—७ त. मागें पुढे.—८ पं. वेठुठींचें.—९ पं. चेपलासे.—१० पं. किती याचे बोल एकावे कानीं ।.—११ पं. नाळेकरी.—१२ पं. मिठेंविण काय आळणी हे बोल । कोरडीच फोल०.—१३ पं. कळे हें हित ।.—१४ पं. किती हे फजित.

३४९४. खोल [1]ओले पडे तें [2]पीकें उत्तम । उथळाचा श्रम वांयां जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लटिक्याचे आह्मी [3]नव्हों सांटेकरी । थीतें घाली भरी पदरींचें ॥ छ ॥ कोणा इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे कसीं अगी जें उतरे । तें चि येथें सरे जातिशुद्ध ॥ ३ ॥

३४९५. गोमट्या बीजाचीं फळें ही गोमटीं । [4]वाहे तें चि पोटीं सगतुक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणें ॥ छ ॥ खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळें दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सत्याचि आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥ ३ ॥

३४९६. मन जालें भाट । कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । ये चि चाली स्वभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलें देवाचे पवाडे । नित्य नवे चि रोकडे । ज्या परी आवडे । तैसा तैसा करूनि ॥ छ ॥ रोखीं रहावें समोर । पुढें मागें चाले भार । करावें उत्तर । सेवा रुजू करूनि ॥ २ ॥ [5]पूर वर्षला देकारें । संतोषाच्या [6]अभयें करें । अंगींच्या उत्तरें । तुकया स्वामी शृंगारी ॥ ३ ॥

३४९७. दूरि तों चि होतों आपुले आशंके । नव्हतें ठाउकें मूळभेद ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जेथें तेथें [7]येइन सांगातें । लपाया पुरतें [8]उरों नेदीं ॥ छ ॥ मिथ्या [9]मोहें मज लाविला उशीर । तरी हें अंतर जालें होतें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे दाखविसी भिन्न । लटिका चि सीण लपंडाई ॥ ३ ॥

३४९८. कळों नये तों चि [10]चुंकावितां बरें । मग पाठमोरें काय काज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरिलेती आतां द्या जी माझा डाव । [11]सांपडतां भाव ऐसा आहे ॥ छ ॥ होतासी अंतरें झाकिलिया डोळीं । [12]तो मी हा न्याहाळीं धरुनी दृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज [13]रंडीची च खोडी । अहाच बराडी तो मी नव्हे ॥ ३ ॥

३४९९. [14]करिसी लाघवें । तूं हें खेळसी [15]आघवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला अहंकार आड । आह्मां जगासी हा नाड ॥ छ ॥ [16]इत्थंभूतें यावें । दावूं लपों ही जाणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे हो श्रीपती । आतां चाळवाल किती ॥ ३ ॥

३५००. विश्वास तो देव । ह्मणुनि धरियेला भाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी वदवितो वाणी । ज्याणें धरिली धरणी ॥ छ ॥ जोडिलीं अक्षरें । [17]नव्हती

१ पं. ओली.–२ त. पिके–३ पं. नव्हे.–४ पं. वाह्य.–५ पं. पुरवला देकारें ।.–६ त. पं. अभयकरें.–७ पं. होईन.–८ पं. राहों.–९ पं. मोहो –१० पं. चुकवितां.–११ पं. सांपडला.–१२ पं. तो चि मी न्याहाळी.–१३ पं. रडीची.–१४ त. दाविसी.–१५ त. अवघें –१६ दे. यथभुतें. त. येथं भूतें.–१७ दे. त. नव्हेती.

बुद्धीचीं[1] उत्तरें ॥ २ ॥ नाहीं केली आटी । कांहीं मानदंभासाटीं ॥ ३ ॥ कोणी भाग्यवंत । तया केळेल[2] उचित ॥ ४ ॥ तुका ह्मणे झरा । आहे मुळींचा चि खरा ॥ ५ ॥

३५०१. सुराणीचीं जालों लाडिकीं एकलीं । वडील धाकुलीं आह्मी देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि कांहीं न घडे अव्हेर । गोमटें उत्तर भातुकें ही ॥ छ ॥ कांहीं एक नाहीं वंचिलें वेगळें । मुळींचिया मुळें स्थिरावि[3]लें ॥ २ ॥ लेवविलीं अंगीं आपुलीं भूषणें । अळंकार लेणें सकळ ही ॥ ३ ॥ सारितां न सरे आमुप भांडार । धना अंतपार नाहीं लेखा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी आळवूं आवडी । ह्मणऊनी जोडी[4] दाखविली ॥ ५ ॥

३५०२. एका[5] वेळे केलें रितें कलिवर । आंत दिली थार पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाळण पोषण लागलें ते सोई । देहाचें तें काई सर्व[6]भावें ॥ छ ॥ माझिया मरणें जाली हे वसति । लागली ते ज्योती अविनाशा ॥ २ ॥ जाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका ह्मणे कांहीं बोलों नये ॥ ३ ॥

३५०३. पावतों ताडन । तरी[8] हें मोकलितों[9] जन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग मी आठवितों दुःखें । देवा सावकाश सुखें ॥ छ ॥ होती अप्रतिष्ठा । हो[10] तों वरपडा कष्टा ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । होतां उत्तम खंडन ॥ ३ ॥

३५०४. धरावें तों[11] भय । अंतरोनि जाती पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाल्या तुटी देवासवें । काय वांचोनि करावें ॥ छ ॥ कोणासी पारिखें । लेखूं आपणासारिखें ॥ २ ॥ तुका ह्मणे असो । अथवा हें आतां नसो[12] ॥ ३ ॥

३५०५. आह्मांसी सांगाती । होती[13] अराले ते[14] होती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येती आइकतां हाक । दोनें[15] मिळोन ह्मणती एक ॥ छ ॥ आणिकां उत्तरीं । नसे गोविली[16] वैखरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । खूण पहाती विठ्ठल ॥ ३ ॥

३५०६. आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी प्रभुची ज्या कळा । त्याच्या कोण पाहे वोळा[17] ॥ छ ॥ अंकिता ऐसया । होइल पावविलें ठाया ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें[18] । दिलें आभंड प्रकारें[19] ॥ ३ ॥

३५०७. काहे लकडा घांस कटावे । खोद हि जुमीन मठ बनावे[20] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवलवासी तरवरछाया । घरघर माई खे[21]परिवसमाया ॥ छ ॥ कां

१ पं. बुद्धीच्या विचारें.–२ पं. कळे हे उचित.–३ पं. स्थिरावलों.–४ त. गोडी.–५ पं. एक वेळ केलें०.–६ पं. सर्व भाव.–७ पं. ऐसें.–८ पं. जरी –९ त. पं. मोकलितें.–१० पं. कांहीं.–११ पं. ते.–१२ दे. त. नासो.–१३ पं. "होती" नाहीं –१४ पं. त चि दोनी.–१५ पं. दोन्ही न ह्मणती एक.–१६ दे. त. गोवी.–१७ दे. पं. वळा –१८ त. असे –१९ दे. प्रकासे.–२० पं. बनाये.–२१ पं. खपरवनाया.

छांडियें भार फेरे सीर भागें । मायाको दुःख मिटलिये अंगें ॥ २ ॥ कहे तुक तुम सुंनो हो सिद्धा । रामबिना और झुटा कछु धंद्या ॥ ३ ॥

३५०८. आणीक पोखांडें असती उदंडें । तळमळिती पिंडें[2] आपुलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचिया बोलाचा नाहीं विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥ छ ॥ दृढ एक चित्तें जालों या जीवासी । लाज सर्वविशीं तुह्मांसी हे ॥ २ ॥ पीडों नेदं पशु आपुले अंकित । आहे जें उचित तैसें करा ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येइल तुह्मां ॥ ४ ॥

३५०९. व्हावया भिकारी हें[3] आह्मां कारण । अंतरोनि जन जावें दुरी ॥ १ ॥ संबंध तुटावा शब्दाचा ही स्पर्श । ह्मणऊनि आस मोकलिली ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखें उबगला जीव । ह्मणऊनी कीव भाकीं देवा ॥ ३ ॥

३५१०. कोरडिया ऐशीं[4] सारूनियां गोष्टी । करा उठाउठीं हित आधीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खोळंबला राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी कोठें ॥ छ ॥ लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥ २ ॥ तुका ह्मणे डांख लागे अळंकारें । मग नव्हे खरें पुटाविण[6] ॥ ३ ॥

३५११. ऐसें ठावें नाहीं मूढा । सोस काकुलती पुढां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझीं नकॉं[7] जाळूं भांडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥ छ ॥ [8]पातलिया काळ । तेव्हां काय चाले बळ ॥ २ ॥ संचितें तें करी । नरका जायें[10] मेल्यावरी ॥ ३ ॥ परउपकार । न घडावा हा विचार ॥ ४ ॥ तुका ह्मणे लांसी । आतां भेटों नये ऐसी ॥ ५ ॥

३५१२. करूनी चिंतन खेळों[11] भोवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ छ ॥ सुखदुःखें तुज देऊनी सकळ । नाहीं ऐसा काळ केला आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला देहाचा विसर । [12]नाहीं आतां पर आप दोन्ही ॥ ३ ॥

३५१३. काळा च सारिखीं वाहाती [13]क्षेत्रें । करितां दुसरें फळ नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें करत्यानें ठेविलें करून । भरिलें भरून माप नेमें ॥ छ ॥ शीतउष्णकाळीं मेघें[14] वरुषावे । वरुषतां वाव होय शीण ॥ २ ॥ तुका ह्मणे विष अमृताचे किडे । पालट न घडे जीणें तया ॥ ३ ॥

---

१ पं. पापाड.–२ पं. पिंड. त. पींडे.–३ पं. हें चि, आह्मा० –४ त. आगा.–५ दे. माल्न०. पं. काय सारू गोष्टी.–६ पं. पुटें विण.–७ पं. जाळूं नका –८ पं. पाहतील या०–९ पं. सचितानें.–१० पं. जाय.–११ पं. खेळे.–१२ पं. आतां आपपर नाहीं दोन्ही.–१३ पं. नक्षत्रें.–१४ त. मेघ वरुषावे. पं. मेघावरुषावे.

३५१४. बोलणें तें आह्मी बोलों उपयोगीं । पडिलें प्रसंगीं कोळाऐसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जयामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खेचेसी ॥ छ्र ॥
करणें तें आह्मी करूं एका वेळे । पुढिलिया बळें वाढी खुंटे ॥ २ ॥ तुका ह्मणे
असों आज्ञेचीं धारकें । ह्मणऊनि एकें घायें सारूं ॥ ३ ॥

३५१५. तुझिया विनोदें आह्मांसी मरण । सोसियेला सीण बहु फेरे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां आपण चि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥ छ्र ॥
वियोगें चि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे
वर्म सांपडलें सोपें । गोवियेलों पापें पुण्यें होतों ॥ ३ ॥

३५१६. पाठीलागा काळ येतसे या लागें । मी माझें वाउगें मेंढीऐसें[6] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां अगी लागो ऐसिया वेव्हारा । तूं माझा सोइरा पांडुरंगा ॥ छ्र ॥
वागविला माथां नसता चि भार । नव्हे तें साचार जाणील तों ॥ २ ॥ तुका
ह्मणे केलें जवळील दुरी । मृगजळ वरी आड आलें ॥ ३ ॥

३५१७. आपुलिये टाकीं । करीन कांहीं तरी एकी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीन
पायांशीं वोळखी । करिसी तें करीं सुखीं ॥ छ्र ॥ कायाक्लेशगंगाजळ । समर्पीन
तुळसीदळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कर जोडीन ते सेवा ॥ ३ ॥

३५१८. माझे तों स्वभाव मज अनावर । तुज ही देतां भार कांहीं नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृती स्वपना ताळ नाहीं ॥ छ्र ॥
संपादितों तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे
सत्या नाहीं पाठी पोट । असतें[11] निर्घोट एकी जाती ॥ ३ ॥

३५१९. नव्हावा तो वरा मुळीं च संबंध । विश्वासिकां[12] वध बोलिलासे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां माझें हित काय तें विचारा । सत्यत्वें दातारा पांडुरंगा ॥ छ्र ॥
नाहीं भाव परी ह्मणवितों दास । नेका[13] देऊं यास उणें येऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे
कां हो उद्धरितां दीन । मानीतसां सीण मायबापा ॥ ३ ॥

३५२०. काय[14] तुमचिया सेवे न वेचते गांठोळी । मोहें[15] टाळाटाळी करीतसां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चतुराच्या राया आहो पांडुरंगा । ऐसें तरी सांगा निवडूनि ॥ छ्र ॥
कोण तुह्मां सुख असे या कौतुकें । भोगितां अनेकें दुःखें आह्मी[16] ॥ २ ॥ तुका ह्मणे
काय जालासी निर्गुण । आह्मां येथें कोण सोडवील ॥ ३ ॥

---

१ पं. कळे.–२ पं. खचे ते.–३ पं. वोलें. त. खायें.–४ दे. आपणें –५ त. पाठीलागे.–६ पं. मध्यें ऐसें.–७ दे. नसतां.–८ पं. देखिलें तों. दे. जातिल तों.–९ त. करोनि.–१० दे. त. "हा" नाहीं –११ पं. आहे तें निर्घोट एक जाती ।.–१२ पं. विश्वासी तो वद्द बोलिलावें –१३ पं. नको.–१४ पं. काय तुमची यास वेचते०.–१५ त. पं. माहे.–१६ दे. त. आह्मा.

३५२१. निष्ठुर यासाटीं करितों भाषण । आहेसी तूं[1] सर्वजाण दाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें कोण दुःख आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ध्रु.॥ बैसलासी केणें[2] करुनि एक घरीं । नाहीं येथें उरी[3] दुसऱ्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें अवघें चि पायापें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ३ ॥

३५२२. पायांपासीं चित्त । तेणें भेटी अखंडित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असे खेळे भलते ठायीं । प्रेमसूत्रदोरी पायीं ॥ ध्रु. ॥ केलेंसे जतन । मुळीं काय तें वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वजाणा । ठायीं विचारावें मना ॥ ३ ॥

३५२३. तुझें मजपाशीं मन । माझी येथें[4] भूक तान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिव्हा रतें एके ठायीं । दुजें बोलायाचें काई ॥ ध्रु. ॥ माझिया कवतुकें । उभा पहासी भातुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे साचें । तेथें मागील कईचें ॥ ३ ॥

३५२४. तुह्मां आह्मां सरी । येथें[5] कईच्या या परी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्वामिसेवा अळंकार । नाहीं आवडिये थार ॥ ध्रु. ॥ खुंटलिया वाचा । मग हा आनद कइचा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोडें । आह्मी नाचों तुज पुढें ॥ ३ ॥

३५२५. कैचें भांडवल खरा हातीं भाव । कळवळ्यानें माव दावीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझा अंत नको सर्वजाणा । पाहों नारायणा निवडूनि ॥ ध्रु. ॥ संतांचें उच्छिष्ट मागिले पंगती । करावें संगती लागे[6] ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों दावूनि विश्वास । संचित तें नास पावे ऐसें ॥ ३ ॥

३५२६. थोडे तुह्मी मागें होती उद्धरिले । मज ऐसे गेले वांयां जीव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां याचा कांहीं न मनावा भार । कृपेचा सागर आहेसी तूं ॥ ध्रु. ॥ तुज आळवितां पापाची वसाति । राहे अंगीं किती बळ त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे उदकीं तारिले दगड । तैसा मी ही जड एक देवा ॥ ३ ॥

३५२७. आह्मी ह्मणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥१॥ ॥ ध्रु. ॥ हागे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥ ध्रु. ॥ आह्मी तुज असों देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥ २ ॥ तुका ह्मणे मज धरियेलें बळें[7] । पंचभूतीं खळें करूनियां ॥ ३ ॥

३५२८. आहेतें सकळ प्रारब्धा हातीं । यावें काकुलती यासी आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा माझ्या मनें सांगितला भाव । तोंवरीच देव दुजा नाहीं ॥ ध्रु. ॥

---

१ पं. सर्वज्ञ जाणता तूं ।.–२ पं. कोण करुनियां धीर. त. कोण धरुनिया धीर.–३ पं. ऊर.–४ पं. तुज.–५ पं. आतां.–६ पं. "लागे" नाहीं.–७ पं. काळें.

अवघियांची जेव्हां सारावी करकर । भाववळें थार धरूं येसी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज ठेवावें पूजून । आणीक ते[1] गुण नाहीं येथें ॥ ३ ॥

३५२९. सेवट तो होतो तुझियानें गोड । ह्मणऊनि चाड धरीतसों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देऊं[2] भोगाभोग कलिवरांचा[3] भार । साहों तुज थार त्याचे[4]समर्थी ॥ ध्रु ॥ तुझ्या वळें कांहीं खटपट काम । वाढवावा श्रम न लगे तो ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी चेंपलों या भारें । तुमचें तें खरें देवपण ॥ ३ ॥

३५३०. ऐसा चि तो गोवा । न पाहिजे केला देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु ओंली दुरिवरी । ओढत हे भरोवरी ॥ ध्रु ॥ आह्मांसी न कळे । तुह्मी झाकूं नये डोळे ॥ २ ॥ तुका ह्मणे संगें । असों एक एका अंगें ॥ ३ ॥

३५३१. मायलेंकरांत भिन्न । नाहीं उत्तराचा सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धाडीं धाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ ध्रु ॥ करूनि नवल । याचें बोलिलों ते बोल ॥ २ ॥ तुका ह्मणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥ ३ ॥

३५३२. आवडी कां ठेवूं । बैसोनियां संगें जेवूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागें नको ठेवूं उरी । माझी आण तुजवरी ॥ ध्रु ॥ देखिले प्रकार । त्याचे[6] पाहेन साचार ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळीं । केली चाहाडी सकळीं ॥ ३ ॥

३५३३. नव्हेसी तूं लांसी । मायां आणिकां त्या ऐसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जे हे वांयां जाती बोल । होती निर्फळ चि फोल ॥ ध्रु ॥ नव्हेसी दुबळी । कांहीं नाहीं[7] तें जवळी ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटी । कांहीं नव्हेसी करंटी ॥ ३ ॥

३५३४. आह्मां बोल लावा । तुह्मां अनुचित हें देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें सांगा कां व्यालेती । काय नाहीं तुह्मां हातीं ॥ ध्रु ॥ आतां धरा दुरी । वांयां दवडाया थोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठायीं[8] । ऐसें विचारावें कांहीं ॥ ३ ॥

३५३५. मरोनियां गेली माया । मग तया कोण पुसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोरटियांची दाद कोणा । ऐसा जाणा[9] प्रवाहो ॥ ध्रु ॥ निढळास निढळ जोडा । होय कोडा कवतुकें[10] ॥ २ ॥ तुका ह्मणे देवाऐसी । आहों सरसीं आपण ॥ ३ ॥

३५३६. संसाराची कोण गोडी । दिली जोडी करूनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निष्ठुर तूं बहु देवा । पुरे हेवा न ह्मणवी ॥ ध्रु ॥ पाहोनियां कर्म डोळां । निराळा तो वर्जीना ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज माझें । ह्मणतां ओझें फुकट ॥ ३ ॥

---

१ पं. तो.–२ पं. देऊनि.–३ पं. कलिवरा.–४ पं. त्याजसर्थी.–५ पं. ०आलों दुरवरी ।.–
६ पं. याचे.–७ पं. नाहींत जवळी.–८ दे. पायीं.–९ दे. जाना. त. नेणा.–.१० त. कौतुक.

३५३७. नव्हतें[1] तें कळों आलें । तरी बोलें अबोला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज मज घातली तुटी । एके भेटीपासूनि ॥ छ ॥ आतां याची न धरीं चाड । कांहीं कोड कवतुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे यावें जावें । एका भावें खंडलें ॥ ३ ॥

३५३८. आतां दोघांमध्यें काय । उरलें होय वांणीजेसें[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निष्ठुर हें केलें[3] मन । समाधान न[4] करूनि ॥ छ ॥ झुरावें तें[5] तेथींच्या परी । घरिच्याघरीं अवघिया ॥ २ ॥ तुका ह्मणे देवपणें[6] । गुंडाळून असों दे ॥ ३ ॥

३५३९. मागितल्यास[7] आस करा । उरी धरा कांहींवाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि सारिली आस । होती यास मूळ तें ॥ छ ॥ माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना वोरस ॥ २ ॥ तुका ह्मणे आळवणे । माझ्या देणें उत्तर ॥ ३ ॥

३५४०. आतां बरें घरिच्याघरीं । आपली उरी आपणापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाइटबरें न पडे दृष्टी । मग कष्टी होइजेना ॥ छ ॥ बोलों जातां वाढे बोल । वांयां[8] फोल खटखट ॥ २ ॥ काकुलती यावें देवा । तो तों सेवा इच्छितो ॥ ३ ॥ हिशोबाचे खैंटखटे[11] । चढे तुटे घडेनों[12] ॥ ४ ॥ तुका ह्मणे कळों आलें । दुसरें भलें तों नव्हे ॥ ५ ॥

३५४१. आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां तें मग गोवी नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवींचा वेव्हार पापपुण्य ॥ छ ॥ पळणें[13] तों पळा सांडुनि कांवळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें शूर तो निवडे । पडिले वापुडे काळचक्रीं ॥ ३ ॥

३५४२. उद्धत त्या जाती । द्रैवें[14] रंगल्या उद्धती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि वहु फार । त्यांसी असावें अंतर ॥ छ ॥ कैंचें पाठी पोट । गोडविपासीं सेवट ॥ २ ॥ तुका ह्मणे सापा । न कळे कुरवाळिलें वापा ॥ ३ ॥

३५४३. आह्मां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसी तैसी माय वरी । मानिल्या त्या मौंना[15] येरी ॥ छ ॥ व्यालींचा कळवळा । जीव वहुत कोंवळा ॥ २ ॥ कवतुकें वावरें । तुका ह्मणे या आधारें ॥ ३ ॥

---

१ दे. नव्हेत तें०. पं. नव्हे तें –२ पं. जाणिजेसे.–३ पं. कळे –४ पं. "न" नाहीं – ५ दे. त्यें –६ दे. त. देवपणें.–७ पं. मागितल्या.–८ पं. वाम.–९ पं. आळवग.–१० पं. उत्तर.– ११ पं. खटपट.–१२ त. घटेना.–१३ पं. तें पळो सांडुनि०.–१४ पं. द्रव्य –१५ पं. मानें.

३५४४. पाळितों वचन । परि बहु भीतें मन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करितें पायांशीं सलगी । नये बैसों अंगसंगीं ॥ छ्र ॥ जोडोनियां कर । उभें असावें समोर ॥ २ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी मी बहु पतित ॥ ३ ॥

३५४५. जैसा तैसा आतां । मज प्रमाण अनंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पायां पडणें नें संडीं । पोटीं तें च वर तोंडीं ॥ छ्र ॥ एका भावें चाड । आहे तैसें अंतीं गोड ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां । टळणें चि नाहीं नेमा ॥ ३ ॥

३५४६. चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मा सांपडलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाठी लागे करी नास । गर्भवास भोगवी ॥ छ्र ॥ माझें तुझें भिन्नभावें । गळां दावें मोहाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ॥ ३ ॥

३५४७. देह प्रारब्धा शिरीं । असोन करी उद्वेग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धांव घालीं नारायणा । माझ्या मना जागवीं ॥ छ्र ॥ ऐसी चुकोनियां वर्में । पीडा भ्रमें पावलों ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचा भोग । नव्हे रोग अंगींचा ॥ ३ ॥

३५४८. अनंताच्या ऐकों कीर्ती । ज्याच्या चित्तीं हरिनाम । उलंघूनि गेले सिंधु । हा भवबंधु तोडोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हळहळु ते चि वाहीं । चालों कांहीं अधिकारें ॥ छ्र ॥ खुंटूनियां गेले नावा । नाहीं हेवों खोळंबला । न लगे मोल द्यावा रुका । भावें एका कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहतों वाट । उभा नीट पाउलीं । भीमातिरीं थडवा केला । उठा चला लवलाहें ॥ ३ ॥

३५४९. तरीं च भ्यां देवा । साटी करूनियां जीवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें बैसलों धरणें । दृढ कायावाचामनें ॥ छ्र ॥ आवरिल्या वृत्ति । मन घेउनियां हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जरा । बाहेर येऊं नेदीं घरा ॥ ३ ॥

३५५०. हें तों एक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणवितां त्याचे दास । पुढें आस उरेना ॥ छ्र ॥ कृपादान केलें संतीं । कल्पांतीं ही सरेना ॥ २ ॥ तुका ह्मणे संतसेवा । हो चि हेवा उत्तम ॥ ३ ॥

३५५१. नारायणा ऐसा । सेवूं नेणतील रसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें भवव्याध तुटे । दुःख मागुतें न भेटे ॥ छ्र ॥ न लगे कांहीं आटी । बाधा राहों

---

१ पं. तें सोडीं.–२ पं. आदि.–३ पं. ऐकोनि.–४ पं. "आतां" नाहीं.–५ पं. यावा.–६ दे. कारणें.–७ पं. "तुका ह्मणे०" आणि "भीमातिरीं०" हीं दोन अर्धें मागें पुढें आहेत–८ पं. होतों०.–९ पं. हे चि देवा उत्तम।.

न सके पोटीं ॥ २ ॥ कैवल्य तें जोडे । पालट लवकरी घडे ॥ ३ ॥ जन्ममरणदुःखें अटे । जाळें अवघें चि तुटे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाला । याचा गुण बहुतांला ॥ ५ ॥

३५५२. अनेक दोषांचे काट । जे जे गादले निघोट । होती हरिनामें चोखट । क्षण एक न लगतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी हरि ह्मणा हरि ह्मणा । महादोषांचे छेदना ॥ ध्रु ॥ अतिमितीचा बांधला । नष्ट चांडाळीं रतला । क्षण न लगतां नेला । वैकुंठासी हरि ह्मणतां ॥ २ ॥ अनंत दोषाचें मूळ । जालें वाल्मीका सबळ । जाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा ॥ ३ ॥ हरि ह्मणतां तरले । महादोषी गणिके नेलें । कुंटणी[7] भिली उद्धरिलें । वैकुंठासी हरि ह्मणतां ॥ ४ ॥ हरिविण जन्म नको वांयां । जैसी दर्पणींची छाया । ह्मणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ॥ ५ ॥

३५५३. भजन यां नासिलें हेंडि[10] । दंभीं[11] लंडा आवडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेवींतें[12] ना आइता पाक । नासी ताक घुसळूनि ॥ ध्रु ॥ एकाएकीं इच्छी[13] पाठ । नेणे चाट कां जेवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुलाम्याचें । बंधन साचें सेवटीं ॥ ३ ॥

३५५४. जैसा निर्मळ गंगाओघ । तैसा भाग वोगरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेम वाढे ग्रासोग्रासीं । ब्रह्मरसीं भोजन ॥ ध्रु ॥ तृप्तीवरि आवडी उरे । ऐसे वरे प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे पाख मन । नारायण तें भोगी ॥ ३ ॥

३५५५. सुख सुखा विरंजण जालें । तें मथलें नवनीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हाले डोले हरुषे काया । निवती बाह्या नयन ॥ ध्रु ॥ प्रबळ तो नारायण । गुणें गुण वाढला ॥ २ ॥ तुका ह्मणे भरली सींग । वरी मग वोसंडे ॥ ३ ॥

३५५६. कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होइल यमपुरी । यमदंड यैतना[16] ॥ ध्रु ॥ कोण जाली लगबग । काय करिसि तेथें मग ॥ २ ॥ कां रे भरला ताठा । करिती[17] वोज नेतां वाटा ॥ ३ ॥ तोंडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ॥ ४ ॥ कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥ ५ ॥ लाज धरीं ह्मणे तुका । नको वांयां जाऊं फुका ॥ ६ ॥

३५५७. देवीं कपाट । कीं कोणें काळें राखों वाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय येईल तें शिरीं । आज्ञा धरूनियां करीं ॥ ध्रु ॥ करूं कळे तैसी मात । किंवा राखावा एकांत ॥ २ ॥ तुका ह्मणे जागों । किंवा कोणा नेदुं वागों ॥ ३ ॥

---

१ पं. कृपा.–२ दे. ०दु खें। जाड अवघें०.–३ पं. दोषांची.–४ दे. अमित्य (अमित). पं. अमित्या.–५ दे. वाल्मीकास सबळ –६ पं. "गणिके नेलें" याबद्दल 'उद्धरिले'.–७ पं. "कुंटणी भिली उद्धरिलें" याबद्दल "गणिकेनी नेले"।.–८ पं. नको जन्म.–९ पं. हे.–१० दे. हेंडि.–११ पं. दंभ– १२ पं. जेवितांना०.–१३ पं. इच्छा पाट०.–१४ त. वीर. दे. "विरजण" असतां मागून "वीर" केलें आहे.–१५ पं. तरी.–१६ पं. यातना घोरी।.–१७ पं. करी.

३५५८. क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपण चि खेळे आपणाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मधील ते वाव अवघी उपाधि । तुह्मां आह्मांमधीं ते चि परी ॥ छ्र ॥ घट मठ जाले आकाशाचे पोटीं । वचनें चि तुटी तेथें चि तें ॥ २ ॥ तुका ह्मणे बीजें बीज दाखविलें । फळ पुष्प आलें गेलें वांयां ॥ ३ ॥

३५५९. एक आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वास तो पायांवरी । ठेवुनि हरी राहिलों ॥ छ्र ॥ जाणत चि दुजें नाहीं । आणिक कांहीं प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे शरण आलों । काय बोलों विनवितों ॥ ३ ॥

३५६०. काय विनवावें[2] कोणं[3] तो निवाड । केलें माझ्या कोड वचनाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहो कृपनिधी गुणांच्या निधाना । माझ्या अनुमाना नये चि हें ॥ छ्र ॥ बहुत करुणा[4] केलेंसे भाषण[5] । एक ही वचन नाहीं आलें ॥ २ ॥ माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिती मानिली होती ऐसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी उरली ते आटी । अभय कर कटी न देखें चि ॥ ४ ॥

३५६१. लाजोनियां काळें राहिलें लिखित । नेदितां ही चित्त समाधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसें सुख वाटे वचनाचे तुटी । प्रीतिविण भेटी रुचि नेदी ॥ छ्र ॥ एकाचिये भेटी एकाचा कोंपर । मावेचा पदर कळों येतो ॥ २ ॥ होत्या आपल्या त्या वेचूनियां शक्ती । पुढें जालों युक्तिकळाहीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावे ॥ ४ ॥

३५६२. आशाबद्ध बहु असें निलाजिरें । होय ह्मणें धीरें फळ[6] टोंकें ॥ १ ॥ कारणापें चित्त न पाहें अपमान । चित्त समाधान लाभासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हातें लोटिलें न कळे । झांकितैंसें[7] डोळे पांडुरंगा ॥ ३ ॥

३५६३. सातां पांचां तरीं वचनां सेवटीं । निरोप कां भेटी एक तरी ॥ १ ॥ कां नेणें निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ॥ ३ ॥

३५६४. वांयां ऐसा जन्म गेला । हें विठ्ठला दुःख वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं सरता जालों पायीं । तुह्मी जई न पुसां[8] ॥ छ्र ॥ कां मी जीतों संवसारीं । अद्यापवरी भूमिभार ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । सबळ व्यथा भवरोग ॥ ३ ॥

---

१ पं. पत्र –२ पं. निवडावें.–३ दे. कोणें.–४ न. करोनि.–५ दे. भासेन.–६ त. फळा – ७ पं. झांकितसां –८ पं. पुसतां.

३५६५. कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ॥ १ ॥ मग तळमळ न करितें मन । जालें तें कारण कळों येतें ॥ २ ॥ तुका ह्मणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥ ३ ॥

३५६६. ऐसें कोण पाप बळी । जें जवळी येऊं नेदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां तंव होइल ठावें । नेदावें कां कळों हें ॥ छ ॥ कोण जाला अंतराय । कां ते पाय अंतरले ॥ २ ॥ तुका ह्मणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥ ३ ॥

३५६७. ब्रह्मज्ञानाची भरोवरी । पुंढिला सांगे आपण न करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थू थू त्याच्या तोंडावरी । व्यर्थ सिंणवी वैखरी ॥ छ ॥ कथा करी वरिवरी । प्रेम नसे चि अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कवित्व करी । मान वस्तु हे आदरी ॥ ३ ॥

३५६८. कधीं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेटी लागीं पंढरीनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ छ ॥ सिणलें माझें मन । वाट पाहतां लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे लागली भूक । तुझें पहावया श्रीमुख ॥ ३ ॥

३५६९. उच्चारूं यासाटीं । आह्मी नाम तुझें कंठीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येसी धांवत धांवत । माउलिये कृपावंते ॥ छ ॥ पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगे ॥ ३ ॥

३५७०. दगडाच्या देवा बैगाड नवस । बाईल कथेस जाऊं नेदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेचीं धनरासी बांधलें स्मशान । दारीं वृंदावन द्वाड मानी ॥ छ ॥ चोरें नागविला न करी त्याची खंती । परी द्विजा हातीं नेदी रुका ॥ २ ॥ करी पाहुणेर व्याह्याजावयासी । आल्या अतीतासी पाठमोरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाही सीण वर्म नेणे ॥ ४ ॥

३५७१. करूनि विनवणी । माथा ठेवितों चरणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतें तें चि असों द्यावें । रूप सौम्य चि वरवें ॥ छ ॥ भया भेणें तुमचा ठाव । तुमच्या कोपें कोठें जावें ॥ २ ॥ तुका पायां लागे । दान समुदाय मागे ॥ ३ ॥

३५७२. प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंगें ॥ छ ॥

---

१ दे. त. वइदासी भीड मरणें रोग्या ।.–२ पं. ब्रह्मज्ञान.–३ पं. "पुंढिला" नाहीं.–४ पं. सिणविली.–५ पं. मान लोभ हे अंतरीं।.–६ पं. बगाडी.–७ दे. त. विव्हाया जा०.–८ दे. "पाठमोरा आल्या अतीतासी ।" असे शब्द माग पुढें करून मागून फिरविलें आहे.–९ पं. धरातळीं ।.

पोटामध्यें कोणें[1] सांगितलें सैर्पा[2] । उपजत लपा ह्मणऊनि ॥ २ ॥ बोलों नेणें परी जाणे गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरें विचारावें मनीं । आणिक भल्यांनीं पुसों नये ॥ ४ ॥

३५७३. आतां मी पतित ऐसा साच भावें । कळों अनुभवें आलें देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करावें तें रोकडें चि करीं । राहिली हे उरी नाहीं दोघां ॥ ध्रु ॥ येरें[3] येरा दृष्टी द्यावया उत्तरा । यासी काय करा गोही आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे मेलों सांगतसांगतां । तें चि आलें आतां कळों तुह्मां ॥ ३ ॥

३५७४. काय तुज मागें नाहीं जाणवलें[4] । माझें नाहीं केलें हित कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळे झांकुनियां होसी अबोलणा । तेव्हां नारायणा आतां कैसा ॥ ध्रु ॥ न कळे उचित न संगेतां[5] स्पष्ट । ऐसा क्रियानष्ट काय जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा घात तुह्मां ठावा । तरि कां आधीं देवा वारूं नये ॥ ३ ॥

३५७५. नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केली पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अपराध कीजे घडला तो क्षमा । सिकवा उत्तमा आमुचिया ॥ ध्रु ॥ धरूं धावें आगी पोळेलें[6] तें नेणे । ओढिलिया होणें माते बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भौर[7] ज्याचा जार त्यासी । प्रवीण येविशीं असा तुम्ही ॥ ३ ॥

३५७६. लडिवाळ ह्मणोनी निष्ठुर न बोला । परी सांभाळिला लागे घात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वहु वागवीत आणिलें दुरूनि । दासांची[8] पोसनी बहु आहे ॥ ध्रु ॥ नाहीं लागों दिला आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजेतों[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी कृपावंत हरि । शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥ ३ ॥

३५७७. आत्मस्थिति मज नको हा विचार । देई निरंतर चरणसेवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हे चि गोडी मोझ्या[10] देई जीवीं[11] ॥ ध्रु ॥ काय सायुज्यता मुक्ति[12] हे चि गोड । देव भक्त कोड तेथें नाहीं ॥ २ ॥ काय तें निर्गुण पाहों कैशा परी । वर्णूं तुझी हरी कीर्ती कैसी ॥ ३ ॥ गोड चरणसेवा देवभक्तपणें[13] । मज देवा झणें दुराविसी ॥ ४ ॥ जाणिवेपासूनि सोडवीं मोझ्या[14] जीवा । देई चरणसेवा निरंतर ॥ ५ ॥ तुका ह्मणे गोडा गोड न लगे प्रीति[15] । सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥ ६ ॥

---

१ दे. कोण.–२ पं. त. सर्पा.–३ दे. त. येर येरा समदृष्टी द्यावें या उत्तरा ।.–४ त. जाणविलें.–५ त. पं. सांगतां.–६ दे. त. पोळ्लें.–७ दे. फार –८ पं. दिसांचीं पोसणीं बहु आहों ।–९ पं. कोमजतों.–१० पं. आह्मा. दे. "माझ्या" असतां मागून "प्रेमा" केलें आहे –११ पं. देवा.–१२ पं. मुक्तीची हे चाड ।.–१३ दे. त. देवभक्तपण.–१४ पं. ०सत्वर । देई निरंतर चरण सेवा ।.–१५ दे. ० प्रीतिकर । प्रीति ते ही सार सेवा हे रे ।. त. ०प्रीति । सेवेविण चित्तीं सार नेणें ।.

३५७८. चालें दंडवत घालीं नारायणा । आपुल्या कल्याणा लागूनियां ॥ १ ॥ वैसाविला पदीं पुत्र राज्य करी । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे ठायींचा चि मान । आतां अनुमान कायसा तो ॥ ३ ॥

३५७९. समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हसती सकळ लोक कोणा ॥ १ ॥ समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आल्याची लागे चिंता ॥ २ ॥ जरी तुज कांहीं होईल उचित । तरी हा पतित तारीं तुका ॥ ३ ॥

३५८०. न करीं रे मना कांहीं च कल्पना । चिंतीं या चरणां विठोबाच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें सुखाचिया अमुप चि[1] रासी । पुंढें कल्पनेसी ठाव नाहीं[2] ॥ ध्रु ॥ सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख । शोक मोह दुःख पाहातां नाहीं[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें होईल विसांवा । तुटतील हांवों[4] पुढिलिया ॥ ३ ॥

३५८१. कांय[5] करूं मज नागविलें आळसें । बहुत या सोसें पीडा केली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हिरोनियां नेला मुखींचा उच्चार । पडिलें अंतर जवळी च ॥ ध्रु ॥ द्वैताचिया कैसा सांपडलों हातीं । बहुत करती ओढाओढी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुलिया सत्ते[6] । न्यावें मज देवें[7] सोडवूनि ॥ ३ ॥

३५८२. नाहीं देवाचा विश्वास । करी संतांचा उपहास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचे तोंडी पडे माती । हीन शूकराची जाती ॥ ध्रु ॥ घोकुनी अक्षर । वाद छळणा करीत फिरे ॥ २ ॥ ह्मणे देवासी पाषाण । तुका ह्मणे भावहीन ॥ ३ ॥

३५८३. हें चि सर्वसुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वांयां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि एक सर्वसाधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥ ध्रु ॥ न लगती कांहीं तपांचिया रासी । करणें वाराणसी नाना तीर्थें ॥ २ ॥ कल्पना हे तिळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्यांच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामें देव नेदी भेटी । ह्मणे त्याचे होंटीं कुष्ट होय ॥ ४ ॥

३५८४. माझे विषयीं तुज पडतो विसर । नको धरूं दूर पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझा ह्मणवितें हे चि लाज तुला[11] । आतां झणी मला[12] विसरेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझी माझी नाहीं उरी । आतां केली खरी देवराया ॥ ३ ॥

---

१ दे. त. "अमुप चि" नाहीं.–२ दे. त. पुढें ठाव नाहीं कल्पनेसी ।.–३ पं. नासे.–४ पं. भावा –५ पं. "काय करू०" व "हिरोनियां" हीं कडवीं मागें पुढें आहेत.–६ पं. नवा.–७ पं. देवा –८ पं. सर्व.–९ पं. त्यां.–१० दे. त. पडतां.–११ पं. तुज –१२ पं. मज

३५८५. अभक्ताचे गांवीं साधु ह्मणजे काय । [1]व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण । बस्त्रणाची आण तया काई ॥ ध्रु[2] ॥ केळी आणि बोरी वसती सेजारी । संवाद कोणे परी घडे येथें[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे खीर केली कान्हेळ्याची । शुद्ध गोडी कैंची वसे तेथें ॥ ३ ॥

३५८६. भागल्यांचा तूं विसांवा । कैरीं नांवा निंबलोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परमानंदा पुरुषोत्तमा । हरीं या श्रमापासूनि ॥ ध्रु ॥ अनाथांचा अंगीकार । करितां भार न मनिसी ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छा पुरे । ऐसें[6] धुरे गे विठ्ठले ॥ ३ ॥

३५८७. घालूनियां कास । बळें आलों मागायास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रेमें देईं पाठवूनि । पांडुरंगा सेवाॠणी ॥ ध्रु ॥ होईं रे शाहाणा । कळों नेदावें या जना ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥ ३ ॥

३५८८. भेटीलागीं पंढरिनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ ध्रु ॥ सीणलें माझें मन । वाट पाहातां लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक । तुझें पाहावया मुख ॥ ३ ॥

३५८९. सांडियेली काया । वरी ओंवाळूनी पायां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ॥ ध्रु ॥ आलों लोटांगणीं । रुळें तुमचे चरणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कंई । डोई ठेवीन हे पायीं ॥ ३ ॥

३५९०. तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरणें घेतलें घरांत । नको धरूंन उठवूं हात ॥ ध्रु ॥ घेतली मुरकुंडी[11] । थोर जालों मी लंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे जगजीवना । निंदं[12] पाहें नारायणा ॥ ३ ॥

३५९१. पाडिलों बाहेरि आपलया कर्तव्यें । संसाराचा जीवें वीट आला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवंडलिया[13] ॥ ध्रु ॥ दोन्ही जालीं नांवें ऐकाच्या[14] मथनें । भुस सार गुणें वेगळालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें वसे मुक्ताफळ । सिंपल्याचें स्थळ खंडलिया ॥ ३ ॥

---

१ दे. व्याघ्रें वाडां.—२ पं. "मोतियाची गोणी माळे थोळी नेली। पुसती केवढ्या ल्येली पांसरी हे ॥" हें कडवें जास्त आहे.—३ पं. तेथें.—४ पं. करीन.—५ त. न मनी—६ दे. ऐसे धुरेगे विठ्ठल । पं. ऐसी धुर विठ्ठल ।.—७ त. श्रीमुख.—८ पं. शिर । ठेवियेलें पायांवर ॥.—९ पं. दारांत ।.—१० पं. उठवूं वहन.—११ पं. मुरकुंड । जालों शिरमणी लंड ॥. त. "थोर जालों" या पुढें "शिरोमणी" असा बाहेर शोध घालून "मी लंडी" हें कायम ठेविलें आहे.—१२ पं. नींद.—१३ दे. निडळिया.—१४ पं. एका नि

३५९२. पाहातां हें बरवें जालें । कळों आलें यावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागिलांचा[1] जाला झाडा । त्या निवाडास्तव[2] ॥ छ ॥ विसांवलें अंग दिसे । सरिसे[3] बुद्धि अनुभव ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें जालें । देवें नेलें[4] गवसूनि ॥ ३ ॥

३५९३. चक्रफेरीं[5] गळीं गळा । होता गोवियेला माळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुटोनियां गेला कुंभ । जालों निष्काम स्वयंभ ॥ छ ॥ धरित चि नाहीं थारा । वेठी[6] भ्रमण खोंकरा ॥ २ ॥ तुका ह्मणे कौतुक[7] कोडें । आगी काय जाणे मढें ॥ ३ ॥

३५९४. श्रमपरिहारा । मूळ[8] हें जालें दातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह निवेदूनि[9] पायीं । जालों रिकामा उतराई ॥ छ ॥ आपली ते[10] सत्ता । येथें असों नेदीं आतां ॥ २ ॥ राहिला निराळा । तुका कटकटे[11] वेगळा ॥ ३ ॥

३५९५. पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कांयीं[12] देहाकडे नावलोकीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि मागें कंठींचा सौरस । पावतील नास विघ्नें पुढें ॥ छ ॥ कृपेच्या कटाक्षें नें[13] भें कळिकाळा । येतां येत बळाशक्तीपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे गुढी आणीन पायांपें । जेंणें[14] होइल सोपें नाम तुझें ॥ ३ ॥

३५९६. उपजल्या काळें शुभ कां शकुन । आतां आवरोन राहिलेती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं मागितली वचनाची जोडी । निष्काम रोकडी[15] वारिवारि ॥ छ ॥ सत्याविण काय उगी च लांवणी । कारियाची वाणी येर भूस ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी कोणा चाळवणी । न विचारा मनीं पांडुरंगा ॥ ३ ॥

३५९७. नव्हें मी आहाच आशेचें बांधलें । जें हें टोंकविलें नारायणा[16] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतर तों तुम्हां बरें कळों येतें । वेव्हार उचितें चाळवीजे ॥ छ ॥ मनें कल्पीलें आवारितां पाप । संकल्पीं[17] विकल्प याचि नांवें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां नें[18] सोसे जळजळ । सिजल्यावरी[19] जाळ कढ[20] खोटा ॥ ३ ॥

३५९८. तारें कृपण तो जेवूं काय घाली । आहाच ते चालीवरुनि[21] कळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुह्मां वेचे घातलें सांकडें । मोझें[22] आलें कोडें आजिवरि ॥ छ ॥ सेवेविण आह्मी न लिंपों हे[23] काया । जाला देवराया निर्धार हा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझीं राखावया ब्रीदें । येणें अनुवादें कारियासी[24] ॥ ३ ॥

---

१ पं. मागिल्यांचा –२ पं. निवाडास्तव हे ।. त. निवाडा यास्तव.–३ पं. सरिसेसरिसे अनुभव। दे. सरिसे अनुभव।–४ पं. दिलें.–५ दे. त. चक्रपेरीं.–६ पं. टेची.–७ पं. ' कौतुक " नाहीं–८ त. जालें मूळ हे दातारा ।. पं. मूळ जाहालें दातारा ।.–९ पं. निष्काम.–१० पं. तों.–११ पं. खटपटे–१२ त. पं. कांहीं.–१३ दे. निभें. पं. नभियें.–१४ पं. होईल तें सोप नामें तुझ्या –१५ दे. कोरडी.–१६ पं. नारायणें.–१७ पं. संकल्प विकल्प याही नावें ।. –१८ त. अनेक जळजळ ।.–१९ त. नमोंगें केवळ कट खोटा ।.–२० पं. कड.–२१ त. बोलीवरुनि. पं. चालीवरी न कळे.–२२ त. दे. माझें.–२३ दे. " हे " नाहीं पं. त्या कार्या ।.–२४ पं. गर्जतसों.

३५९९. वृत्तीवरि आह्मां येणें काशासाटीं । एवढी हे आटी सोसावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणतसां परी नेणते[1] जी देवा । भ्रम चि बरवा राखावा तो ॥ छ्र ॥ मोडूनि क्षरलों अभेदाची मूस । तुह्मां कां आळस वोडवला ॥ २ ॥ तुका ह्मणे होईं लवकरि उदार । लांबणीचें फार काम नाहीं ॥ ३ ॥

३६००. सुलभ कीर्तनें[2] दिलें ठसावूनि । करितां धरणी उरी कोण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥ छ्र ॥ एका नेमें कोठें दुसरा पालट । पांदर[3] तो धीट ह्मणती त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे किती बोलसील[4] उणें । एका च वचनें खंड करीं ॥ ३ ॥

३६०१. जेथें माझी दृष्टि राहिली बैसोन । तेथें चि हें मन गुंडाळतें[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ टाळावी ते पीडा आपुल्यापासून । दिठावलें[6] अन्न ओकवितें ॥ छ्र ॥ तुह्मांसी कां कोडें कोणे ही विशीचें । नवलाव याचें वाटतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेगीं उभारा जी कर । कीर्ति[7] मुखें थोर गर्जईन ॥ ३ ॥

३६०२. इच्छेपाशीं आलों फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीचे[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ द्यावें लवकरी मागितलें दान । मुळींचें जतन करूनि असें ॥ छ्र ॥ उपाय हे करीं एका चि वचना । दावूनियां खुणा ठाया येतों ॥ २ ॥ तुका ह्मणे गांठी किती तुजपाशीं । जगाच्या तोंडिसी चिंतनानें ॥ ३ ॥

३६०३. कोठें आतां[9] आह्मी वेचावी हे वाणी । कोण मना आणी जाणोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न करावी सांडी आतां टाळाटाळी । देईन[10] ये कळी होइल माजी ॥ छ्र ॥ घरोघरीं[11] जाल्या ज्ञानाचिया गोष्टी । सत्यासवें गांठी न पडावी[12] ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां भाकितां करुणा । भलता चि शाहाणा शोध काढी ॥ ३ ॥

३६०४. डगमगी मनें[13] निराशेच्या गुणें । हें तों नारायणें सांतवीजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीरें तूं गंभीर जीवनें[14] जगाचें । जळो विभागाचें आंत्रीतल्या[15] ॥ छ्र ॥ भेईल जीव हें देखोनि कठिण । केला जातो सीण तो तो वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे आवश्यक हें वचन । पाळावें चि दान[16] समयो आहे ॥ ३ ॥

३६०५. आह्मी पाहा कैसीं एकतत्त्व जालों । राखणे लागलों वासनेसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मांविण कांहीं नावडावें जीवा । केला तो चि देवा केलें[17] पण ॥ छ्र ॥

१ दे. नेणें तजी०.–२ पं. कीर्त्तन–३ दे. पादिर.–४ दे. बोलसी.–५ दे. गुंडाळातें.–६ दे. दिठावेलें.–७ पं. कीर्ती.–८ पं. आवडीची.–९ पं. आह्मी आतां.–१० पं. देईन हे कळी०. त. दइनये.–११ पं. घरापार.–१२ दे. पडवी.–१३ दे. त. मान.–१४ दे. जीवनें–१५ पं. आहात ते.–१६ दे. वान.–१७ पं. दृढ.

वर्म नेणों[1] परि वृत्ती भंगों नेदुं । वंदिलें चि वंदूं आवडीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे नामाचें जीवन । वारता ही भिन्न नेणों आतां ॥ ३ ॥

३६०६. आपण तों असा । समर्थ जी हृषीकेशा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करा करा बुझावणी । काय विलंब वचनीं ॥ छ ॥ हेंगे[2] ऐसें ह्मणा । उठूनि लागेन चरणा ॥ २ ॥ घेऊनियां सुखें । नाचेलै[3] तुका कवतुकें ॥ ३ ॥

३६०७. ख्याल ऐसें दिसे । तुमचें साचपण इच्छे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि न भंगे निर्धार । केलें[4] लोचने सादर ॥ छ ॥ मुखाची च वास । पुरला पाहे अवकाश ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । काय लाभ कोणे[5] वेळे ॥ ३ ॥

३६०८. तुह्मी तों सदैव । [6]अधीरपणें माझी हांव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जळो आशेचें तें जिणें । टोंकतसों[7] दीनपणें ॥ छ ॥ येथूनि सोडवा । आतां [8]अनुभवेंसी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें । एक मग हें निमालें ॥ ३ ॥

३६०९. कैसें भलें देवा अनुभवा कां नये । उशीर तो काय [9]तुह्मांपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे तें [10]मागतों दिसतें जवळी । केल्यामध्यें कळि कोणे[11] साध्य ॥ छ ॥ नाहीं सांडीत मी सेवेची मर्यादा । लाविला तो धंद्दा नित्य करीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हात आवरिला गुंती । माझे तंव चित्तीं नाहीं दुजें ॥ ३ ॥

३६१०. हुंदकी पिसवी [12]हेलवी दाढी । [13]मणी वोढी निंदेचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याचें फळ पाकीं [14]यमाचे दंड । घर केलें कुंड कुंभपाक ॥ छ ॥ क्रोध पोटीं मांग आणिला अंतरा । भुंकोनि कुतरा जप करी ॥ २ ॥ तुका ह्मणे स्नान केलें मळमूत्रें । जेवविलीं[15] पितरें अमंगळें ॥ ३ ॥

३६११. अंगीं[16] भरला ताठा । नये वळणी जैसा खुंटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तै[17] न कळे त्या हेंगा । हित आदळलें अंगा ॥ छ ॥ जीव जाते वेळे । [18]भरे लक्ष ताठी डोळे ॥ २ ॥ मुसळाचें धनु । तुका ह्मणे नव्हे अर्जुन[19] ॥ ३ ॥

३६१२. करूनि कडविड । जमा घडिली लगड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आं होतें तें चि जालें । नाम ठायींचें चांगलें[20] ॥ छ ॥ उतरलें डाईं । उत्तम सुलाख ताई ॥ २ ॥ हिंडवितां देशें[21] । तुका ह्मणे नाहीं नाश ॥ ३ ॥

---

१ पं. नेणे –२ त. हे घे –३ पं. नाचे –४ दे. केलं लोचनें –५ दे. कोण वेळ.–६ दे. आभरपणें.
७ दे. टोंकतसावें –८ पं. अनुभवें –९ पं. आह्मापाशीं.–१० दे. मागों तों दिसातें०. त. मागतं दिसातें –११ दे. कोणे –१२ पं. हलवितो.–१३ पं. मणी मनीं ओढी निंदेचे ते।–१४ पं. यमाचे दंड।.–१५ पं. जेविलीं –१६ पं. अंगीं –१७ पं. भरल्या कडे.–१८ त. अणु –१९ पं. "आता" नाहीं.–२० पं. पडिलें.–२१ पं. देशोदेश

३६१३. पढीयंतें मागा पांडुरंगापाशीं । मज दुर्बळासी काय पीडा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यां[1] च साटीं दुराविला संवसार । वाढे हे अपार माया तृष्णा ॥ ध्रु ॥ कांहीं करितां कोठें नव्हे समाधान । विचारितां पुण्य तें चि पाप ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां निश्चळ चि भलें । तुज आठविलें पांडुरंगा ॥ ३ ॥

३६१४. नव्हे मी शाहाणा । तरी ह्मणा नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां बोलवायां[2] कांहीं । ये च भरलोंसे वाहीं ॥ ध्रु ॥ आणावेति रूपा । कोपलेती तरी कोपा ॥ २ ॥ कळोनि आवडी । तुका ह्मणे जाते घडी ॥ ३ ॥

३६१५. आह्मी भाविकें हे काय जाणों खोडी । आइकोनि गौढी विनविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं ऐसें[3] येथें जालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोसें ॥ ध्रु ॥ न कळे चि आधीं करितां विचार । न धरितां धीर[4] आहाचता ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां वचनें वेंचन । वाढले तीक्षण बुद्धि जाली ॥ ३ ॥

३६१६. कोठें देवा बोलों । तुह्मां भीड घालूं गेलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करावया[6] सरुवहाणी । भांडवलाची टांचणी ॥ ध्रु ॥ दुर्बळा मागतां । त्याच्या प्रवर्तला[7] घाता ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । मज कळलें ऐसें कांहीं ॥ ३ ॥

३६१७. काय त्या[8] दिवस उचिताचा आला । मागील जो केला श्रम होता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवियेलों[9] पूर्ण करूनि संकेत । तयापाशीं चित्त लागलें से ॥ ध्रु ॥ जाणसी गे माते लेंकरांचे[10] लाड । नये पडों आड निष्ठुरता ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं करावें वचन । तुह्मांसी जतन करणें[11] तें ॥ ३ ॥

३६१८. पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प ते मनें जिरवले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चेष्टाविलें तरी सांगावें कारण[12] । भक्ती ते[13] उजवण करावया ॥ ध्रु ॥ लावूनियां दृष्टि घेतली[14] सामोरी । बैसलें जिव्हारीं डसोन तें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥ ३ ॥

३६१९. मागील विसर होईल सकळ । केली तळमळ दुःखाची ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोहींचें आहिक्य घालीं[15] गडसंदीं । स्थिरावेल बुद्धि पायांपाशीं ॥ ध्रु ॥ अहाच यां[16] केलों देहपरिचारें । तुमचें तें खरें वाटों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वे लवकरी उदार । मी आहें[17] सादर प्रतिग्रहासी ॥ ३ ॥

१ पं. याजसाटीं.–२ पं. बोलावया.–३ पं. येथें ऐसें –४ त. अधीरता.–५ दे. [illegible] तिक्षीण०.–६ दे. करावाया.–७ पं. प्रवर्तल्या.–८ पं. "त्या" नाहीं.–९ पं. ठेविवेलों [illegible] –१० पं. लेंकराचा –११ त. करावें तें पं. करूं देवा.–१२ दे. कारणे –१३ पं. तें [illegible] दे. ते उजेवन –१४ पं. घातली समोरी । बैसलों०.–१५ पं. घाली गडसुदे [illegible] –१६ पं. त्या.–१७ पं. मी असें सादर प्रतिग्रहीं.

३६२०. वाढवावा[1] पुढें आणीक प्रकार । एक चि तें फार रुचि नेदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निचें[2] नवें लेणें देह हा पवाडा । पालट रोकडा बराबरी ॥ छ ॥ दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे आजी पाववा संतोष । करुनि कीर्तिघोष नाचईन ॥ ३ ॥

३६२१. क्षोभ आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करुनि ठेवी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षणभंगुर ते उपजली[3] चिंता । खरी अखंडता आवडीची ॥ छ ॥ सिकवूं जाणे ते गोमाटियासाटीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥ २ ॥ अवघें[4] चि मिथ्या समया आरतें । देता तो[5] उचितें काळ जाणे[6] ॥ ३ ॥ न करी वेव्हार नेदी[7] गांजूं कोणा । भेडसावी[8] तान्हें हाऊ[9] आला ॥ ४ ॥ तुका ह्मणे करी जिवांची[10] जतन । दचकूनि मन जवळी आणी ॥ ५ ॥

३६२२. संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणों जातां दगड सांचीं[11] । अंतरीं ही संकल्प ॥ छ ॥ लाज तेवढी नारायणीं । वांकडी वाणी पोरांपें ॥ २ ॥ तुका ह्मणे वेशरमा । श्रमावरी[12] पडिभरू ॥ ३ ॥

३६२३. मी त्यांसी अनन्य तीं कोणीं[13] असती । ऐसें तंव चित्तीं विचारावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे तो विचार आपणयापाशीं । कळा बिंबाऐसी प्रतिबिंबीं[14] ॥ छ ॥ शुभ शकून तो शुभ लाभें फळे । पुढील तें कळे अनुभवें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पायीं ॥ ३ ॥

३६२४. बहु कृपावंतें माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों[15] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संचितानें नाहीं चुकों दिली वाट । लाविलें अदृष्ट[16] मजसवें ॥ छ ॥ आतां मी रुसतों न कळतां वर्म । परी ठावे धर्म सर्व देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे उभा राहिला न बैसे । आमची[17] माय असे उद्वेग त्या ॥ ३ ॥

३६२५. कैसीं दिसों वरीं । आम्ही आळवितां हरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं सोंग अळंकार । दास जाला संवसार ॥ छ ॥ दुःख आह्मां नाहीं चिंता । हरिचे दास ह्मणवितां ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ऐसीं जालों[18] करितां सेवा ॥ ३ ॥

---

१ पं. वाढवावे.—२ त. पं. नीच.—३ पं. उपजवी.—४ दे. अघवें—५ त. ते—६ पं. जाणे.—७ पं. गांजूं नेदी.—८ दे. भेटसावी—९ पं. तान्हा वाऊ.—१० पं. जीवाचें.—११ दे. "साचि" याचें "सुचि" केलें आहे.—१२ पं. वरी श्रमा.—१३ पं. कोणामी—१४ पं. प्रतिबिंब—१५ पं. अवतरलों.—१६ दे. अदट त. आदट.—१७ पं. आमचिया ऐसे उद्वेग त्या.—१८ दे. जा करितां॰. त. जाली करीतां.

३६२६. आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं । सखीं सहोदरीं मोकलिलों[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जनाचारामध्यें उडाला पातेरा । जालों[2] निलाजिरा ह्मणऊनि ॥ छ्रु ॥ कोणाचिया दारा जावेनासें[3] जालें । म्यां च विटंबिलें आपणासी ॥ २ ॥ कोण[4] जाला माझे बुद्धीसी संचार । नाहीं कोठें थार ऐसें जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज भक्त जाले फार । ह्मणोनियां थार नाहीं येथें ॥ ४ ॥

३६२७. जेथें जातों तेथें पडतो मतोळा । न देखिजे डोळां लाभ कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कपाळींची रेखा असती उत्तम । तरि कां हा श्रम पावतों मी ॥ छ्रु ॥ नव्हे चि तुह्मांस माझा अंगीकार । थीता संवसार अंतरला ॥ २ ॥ भोग तंव जाला खरा भोगावयो[5] तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥ ३ ॥ कोठें तुझी कीर्ती आइकिली देवा । मुकतों कां जीवा तुका ह्मणे ॥ ४ ॥

३६२८. कां जी आह्मां होतें दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळ ही ॥ छ्रु ॥ कां जी आह्मांवरि आणिकांची सत्ता । तुह्मांसी असता जवळिकें[6] ॥ २ ॥ तुका ह्मणे पांयीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता[7] ॥ ३ ॥

३६२९. निंदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतें तैसें आलें फळ । गेलें निवडूनि सकळ ॥ छ्रु ॥ दुसऱ्याच्या मता । मिळेनासें जालें चित्ता ॥ २ ॥ तुका जाला सांडा । विटंबिती पोरें रांडा ॥ ३ ॥

३६३०. माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥ छ्रु ॥ येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥ ३ ॥

३६३१. सत्य त्यागा चि समान । नलगे वेचावें वचन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायणा ऐसे[8] दास । येरयेरांची च आस ॥ छ्रु ॥ मळ नाहीं चित्ता । तेथें देवाची च सत्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे जाण । तें च भल्याचें वचन ॥ ३ ॥

३६३२. माझिये बुद्धीचा खुंटला उपाव । करिसील काय पाहेन तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सूत्रधारी तूं हें सकळचाळिता । कासया अनंता भार वाहों ॥ छ्रु ॥ वाहिले संकल्प न पवती सिद्धी । येऊं देहबुद्धीवरि नये[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखी करिती तरंग । चिंतूं पांडुरंग आवरून ॥ ३ ॥

---

१ पं. मोकलिला.–२ पं. जालों मी निला०.–३ त. न जावेसें. पं. जानवेनें–४ दे. कां न.–
५ पं. भोगावा तो.–६ पं. जवळीक.–७ पं. सदा.–८ पं. ऐसा.–९ दे. न्यों.

३६३३. देखिलें तें धरिन मनें । समाधानें राहेन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाव माझी सांटवण । जगजीवन कळावया ॥ छ्र ॥ बोळवीन एकसरें । उत्तरें या करुणेच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे नयों[2] रूपा । काय बापा करीसी[3] ॥ ३ ॥

३६३४. वांयां जाय ऐसा । आतां उगवावा फांसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदुःखाचीं वचनें ॥ छ्र ॥ हा चि आह्मां ठाव । पायीं निरोपाया भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे जार । तुझा तुज देवा भार ॥ ३ ॥

३६३५. खादलें च खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त तें ॥ छ्र ॥ इंद्रियांची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ॥ ३ ॥

३६३६. सत्य आठवितां देव । जातो भेव पळोनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे कांहीं करणें चिंता । धरी सत्ता सर्व तो ॥ छ्र ॥ भावें भाव राहे पायीं । देव तैं संनिध ॥ २ ॥ तुका ह्मणे कृष्णनामें । शीतळ प्रेम सर्वांसी ॥ ३ ॥

३६३७. ब्रीद ज्याचें जगदानी । तो चि मनीं स्मरावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सम पाय कर कटी । उभा तटीं भींवरेच्या ॥ छ्र ॥ पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ॥ ३ ॥

३६३८. माझिया मनाची बैसली आवडी । अवसान घडी एकी नेघे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाय चित्तीं रूप डोळांच राहिलें । चिंतनें गोविलें मुख सदा ॥ छ्र ॥ अवघियांचा जाला विसर हा मागें । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥ २ ॥ तुका ह्मणे कानीं आइकली मात । तो चि जाला घात जीवपणा ॥ ३ ॥

३६३९. याची कोठें लागली चट । बहु तट जालेंसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवपिसीं देवपिसीं । मजऐसीं जग म्हणे ॥ छ्र ॥ एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ॥ २ ॥ तुका ह्मणे याचे भेटी । जाली तुटी आपल्यांसी ॥ ३ ॥

३६४०. दीनें[13] आणि दुर्बळांसी । सुखरासी हरिकथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तारूं भवसागरींचें । उंचनीच अधिकारें ॥ छ्र ॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आवडी धरीं । कृपा करी ह्मणऊनी ॥ ३ ॥

१ पं. धरीं.—२ पं. नयो न रूपा ।—३ पं. करिसील.—४ पं. काहीं—५ पं. पांडुरंगा । वाढ संगा॰.—६ पं. इंद्रयांची त. इंद्रियांची—७ पं. जातें—८ दे. त. याचें—९ त. जगदानी—१० पं. त. मनासी.—११ पं. बैसलें.—१२ पं. आपुल्यांसी.—१३ दे. दीनें.—१४ दे. न निच.—१५ पं. अधिकारी

३६४१. संतोषें[1] माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें प्रेमळाचें[2] अवघें चि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥ छ ॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचे[3] वाहे बरें तें च मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छावसे खेळ खेळें । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥ ३ ॥

३६४२. विनवीजे ऐसें कांहीं । उरलें नाहीं यावरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां असो पंढरीनाथा । पायीं माथा तुमचिये ॥ छ ॥ मागें सारियेली युक्ती । कांहीं होती जवळी ते ॥ २ ॥ निराशेची न करी आसे । तुका दास माघारी ॥ ३ ॥

३६४३. आतां येथें जाली जीवासवेंसाटी । होतें तैसें पोटीं फळ आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां धरिले ते[4] न सोडीं चरण । सांपडलें धन निजठेवा ॥ छ ॥ आतां हा अळस असो परता दुरी । नेदावी ते उरी उरों कांहीं ॥ २ ॥ आतां याचा[5] मज न व्हावा विसर । भरोनी अंतर राहो रूप ॥ ३ ॥ आतां लोकलाज नयो येथें[6] आड । बहु जालें[7] गोड ब्रह्मरस ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥ ५ ॥

३६४४. अनंतां[8] जीवांचीं तोडिलीं बंधनें । मज हि येणें[9] काळें कृपा कीजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनंत पवाडे तुझे विश्वंभरा । भक्तकरुणाकरा नारायणा ॥ छ ॥ अंतरींचें कळों देईं गुह्य गुज । अंतरी[10] तें बीज रोंखईन[11] ॥ २ ॥ समदृष्टी तुझीं[12] पाहेन पाउलें । धरीन संचले हृदयांत ॥ ३ ॥ तेणें या[13] चित्ताची राहेल तळमळ । होतील शीतळ सकळ गात्रें ॥ ४ ॥ तुका ह्मणे शांति करील प्रवेश । मग नव्हे नाश अखंड तो ॥ ५ ॥

३६४५. पराधीन माझें करूनियां जीणें । सांडी काय गुणें केली देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उदार हे कीर्ति असे जगामाजी । कां तें ऐसें आजि पालटिलें ॥ छ ॥ आळवितों परी न पुरे चि रीग । उचित[14] तो त्याग नाहीं तुह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे कां वा मुळीं च व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥ ३ ॥

३६४६. नेणपणें नाहीं केला हा बोभाट । आतां आली वाट कळों खरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां बहु शीघ्र यावें लवकरी । वाट पाहें हरी भेटी देईं ॥ छ ॥

---

१ दे. सतोष—२ दे. त. परिमळाचें—३ त. त्याचे तें चि वरें वाहे मनीं ।. दे. त्यांचं वाहे मनीं तेंच वरें.—४ दे. नो.—५ पं. मज याचा —६ पं. तेथें—७ पं. जालों गोड ब्रह्मरसा ।—८ पं. अनंत.—९ त. काळे येणें. पं. मज काळे देणें कृपा केली ।—१० त. अनरींचें—११ पं. राखेन मी.—१२ दे. तुझे पाहेन पाउले ।—१३ पं. याची त्याची—१४ पं. ते.

समर्थाच्या बाळा करुणेचें भाषण । तरी त्याची कोण नांदणूक ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु बोलिले वडिवार । पडिलें अंतर लौकिकीं तें ॥ ३ ॥

३६४७. जें जें केलें तें तें साहे । कैसें पाहें भाविक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ओंवाळूनि माझी काया । सांडिली यावरूनि ॥ छ ॥ काय होय नव्हे करूं । नेणें धरूं सत्ता ते ॥ २ ॥ तुका ह्मणे कटीं कर । उभें धीर धरूनि ॥ ३ ॥

३६४८. नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संताचिया संगें पोट भरीं ॥ १ ॥ चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ॥ ३ ॥

३६४९. तुह्मी माझा देवा केरिंजे अंगीकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दोहीं पक्षीं लागलें लंछनें । देवभक्तपण लाजविलें ॥ छ ॥ एकांतीं एकलें न राहे निश्चळ । । न राहे च पळ मन ठायीं ॥ २ ॥ पायीं महत्वाची पडिली शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥ ३ ॥ शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाला अवगुणांचा थारा । वाढली हे निद्रा अळस बहु ॥ ५ ॥

३६५०. बोलिलिया गुणीं नाहीं पाविजेत । देवा नाहीं होत हित तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कवतुक तुझें नवल यावरि । घेसील तें शिरीं काय नव्हे ॥ छ ॥ नाहीं मिळों येत संचिताच्या मता । पुराणीं पाहतां अघटित ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं निरोपिला भाव । न्याल तैसा जाओ सिद्धी देवा ॥ ३ ॥

३६५१. हा तों नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां जी नेणों राखा हात । कैसें देखावें रडत ॥ छ ॥ दावूनियां आस । दूर पळवितां कांस ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव । घेतां न पुरे चि हांव ॥ ३ ॥

३६५२. आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होणार तें सुखें घडो । लाभ जोडो महाबुद्धि ॥ छ ॥ सत्य संकल्पा च साटीं । उजळा पोटीं रविबिंब ॥ २ ॥ तुका ह्मणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥ ३ ॥

३६५३. कैवतुकवाणी बोलतसें लाडें । आरुष वांकडें करुनि मुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननीबाळकामध्यें भेद ॥ छ ॥

---

१ पं. करा.—२ दे. त. लक्षणें—३ पं. वैसे—४ दे. त. शम्बा.—५ पं. तें मुखा हनि नेदी—६ पं. वाटखिली निद्रा०.—७ पं. न कळे.—८ पं. मंताचिया.—९ न दे. जाव—१० दे. त. टाळा-याच्या—११ पं. काशास.—१२ पं. कवतुकावाणी. त. कवतुकवाणें.

सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ॥ २ ॥ धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज आमची च गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥ ४ ॥

३६५४. ऐकें पांडुरंगा वचन माझें एक । जालों मी सेवक दास तुझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥ ध्रु ॥ दंभ मान माझा करूं पाहे घात । जालिया ही थीत कारणाचा ॥ २ ॥ हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज विघडतां क्षण । न लगे जतन करीं देवा ॥ ४ ॥

३६५५. जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देईं प्रेमसुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देहभाव रैाख दीन करूनियां । जनाचारी वायां जाय तैसा ॥ ध्रु ॥ द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥ २ ॥ तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे जडोनियां पायीं । जालों उतराई पांडुरंगा ॥ ४ ॥

३६५६. काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय द्यावें त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ ध्रु ॥ सहज बोलणें हितउपदेश । करूनि सायास शिकविती ॥ २ ॥ तुका ह्मणे वत्स धेनुवेचा चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ३ ॥

३६५७. देव जाणता देव जाणता । आपली च सत्ता एकाएकीं ॥ १ ॥ देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥ २ ॥ देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका ह्मणे ॥ ३ ॥

३६५८. आपण चाळक बुद्धीच्या संचारा । आह्मांसी वेव्हारा पात्र केलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय जालें तरी नेघा तुह्मी भार । आणीक कोणां थोर ह्मणों सांगा ॥ ध्रु ॥ पंच भूतें तंव कर्माचिया मोटा । येथें खरा खोटा कोण भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ३ ॥

३६५९. एका एक वर्में लावूनियां अंगीं । ठेवितों प्रसंगीं सांभाळीन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेत्रावों जी तुह्मी वाव वहु फार । धरूनि अंतर ठायाठाव ॥ ध्रु ॥ वेव्हारें आलें तें समान चि होतें । वेळ नाहीं येथें चालों येत ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां निवाडा च साटीं । संवसारें तुटी करूनि ठेलों ॥ ३ ॥

---

१ पं. राखा.–२ दे. त. या –३ पं. त्यांसी.–४ दे. कर्मांच्या या.–५ पं. घ्यावा.–६ दे. समानें – ७ पं. वेळ नाहीं तेथें चालों येता ।.

३६६०. आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होये तैसी हो आबाळी । देहनिमित्य या वळी ॥ छ ॥ तुह्मांसवें गांठी । देवा जीवाचिये साटीं ॥ २ ॥ तुका नव्हे[2] लंड । करूं चौघांमध्यें खंड ॥ ३ ॥

३६६१. कां हो वाढवितां देवा । मज घरीं समजावा । केवढा हो[3] गोवा । फार केलें थोड्यांचें[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेविन पायांवरी डोई । यांसी तुमचें वेचे काई । जालों उतराई । जाणा एकएकांचे ॥ छ ॥ निवाड आपणियांपाशीं । असोन कां व्हावें अपेसी । होती गांठी तैसी । सोडूनियां ठेविली ॥ २ ॥ तुका ह्मणे गोड । होतें जालिया[6] निवाड । दर्शनें ही चाड । आवँडी च वाढेल ॥ ३ ॥

३६६२. नव्हों सभाधीट । समोर बोलाया नीट । एकलीं एकट । दुजें नाहीं देखिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां अवघें तुह्मी जाणां । तुमचें माझें नारायणा । येईल करुणा । ते चि पहा तुह्मांसी ॥ छ ॥ ताळ नाहीं माझे बुद्धी । धरली न धरवे शुद्धी । आतां वेळ कधीं । कोण्थें[10] जन्में निवाड ॥ २ ॥ आतां शेवटीचें । उत्तर तें[11] हें चि साचें । शरण आलें त्याचें । तुका ह्मणे सांभाळा ॥ ३ ॥

३६६३. ऐसा तंव मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मागल्याची टाळाटाळी । झिंज्या ओढोनि कपाळीं ॥ छ ॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ३ ॥

३६६४. माझ्या कपाळाच्या गुणें । किंवा सरलेंसे नेणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये वचन बाहेरी । उभें तिष्ठतसें दारीं ॥ छ ॥ काय सांगायास वेचे । रींदे[12] आरंभीं ठायींचे ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । भीड धरावी पुढती ॥ ३ ॥

३६६५. कांहीं एक तरी असावा आधार । कासयानें धीर उपजावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणविल्यासाटीं कैसें पडे रुजु । धणी नाहीं उजू सन्मुख तो ॥ छ ॥ वेचल्या दिसांचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखा[13] आह्मीं ॥ २ ॥ नाहीं मनोगत तोंवरि हे देवा । तुका ह्मणे सेवा नेघीजे[14] तों ॥ ३ ॥

---

१ दे. त. होइल हो तैसी आबाळी ।.–२ पं. ह्मणे–३ पं. हा.–४ पं. थोकडे–५ पं. त्यासी.–६ पं. जाले या निवाडे ।.–७ पं. अवघी–८ पं. बोलावयानीट । येकलें येकट ।.–९ दे. बळें.–१० पं. कोण–११ पं. "तें" नाहीं–१२ पं. रीतें.–१३ पं. सुखासुखें त. सुखादुखा–१४ पं. नघी जों तों त. नेघोजेतों.

३६६६. मनाचिये साक्षी जाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपला तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां परामृश[1] घेणें सत्ताबळें । धरितां निराळें कैसीं वांचों ॥ छ ॥ मी माझें सांडून येवया[2] पसारा । आणीक दातारा काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तुजविण एका । निढळें[3] लौकिका माजी असों ॥ ३ ॥

३६६७. घालूनि लोळणी पडिलों अंगणीं । सिंचा सिंचवणी तीर्थ वरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोल्हावेल तनु होईल शीतळ । जाली हळहळ बहुतापें ॥ छ ॥ पावेन या ठाया कईं जालें होतें । आलों अवचितें उष्टयावरि ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणी जाणवा राउळीं । येइल जवळी पांडुरंग ॥ ३ ॥

३६६८. तरीं भलें वांयां गेलों । जन्मा आलों मागुता । ह्मणऊनि ठेलों दास । सावकास निर्भयें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उणें पुरें काय माझें । त्याचें ओझें तुह्मांसी ॥ छ ॥ सांभाळावें तें स्या काई । अवो आई विठ्ठले । भागें[4] जया जाइन[5] स्थळा । तुज गोपाळा विसरेंना ॥ २ ॥ आपलें स्यां एकसरें । करुनि वरें घेतलें । तुका ह्मणे नारायणा । आतां जाणां आपुलें ॥ ३ ॥

३६६९. उरलें तें भक्तिसुख । डोळां मुख पाहावें । अंतरींचें कां हो नेणां । नारायणा माझिये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरवां तैसी केली आळी । वळी जगदानियां ॥ छ ॥ हातीं घेउनि चोरां भातें । दावां रितें वाळका । साजत[6] हें थोरपण । नाहीं विण वत्सळा[7] ॥ २ ॥ शाहणें तरीं लाड दावी । बाळ जेवीं मातेसी । तुका ह्मणे पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥ ३ ॥

३६७०. धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोबासी[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संकल्प तो नाहीं दुजा । महाराजा विनवितों ॥ छ ॥ पायांवरि ठेविन भाळ । येणें सकळ[9] पावलें[10] ॥ २ ॥ तुका ह्मणे डोळेभरी । पाहिन हरी श्रीमुख ॥ ३ ॥

३६७१. तुह्मां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ॥ छ ॥ वरें न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ॥ २ ॥ लाजितो आभार । तुका विसरलेती[11] फार ॥ ३ ॥

३६७२. न कळे जी भक्ती काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जोडोनियां कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥ छ ॥

---

१ पं. परामृष घेतां.–२ पं. यावा याच पसारा.–३ दे. निटळें.–४ पं. भाग्य.–५ दे. जाईन–
६ दे. साजतें–७ त. पं. दीनवत्सळा.–८ पं. विठोसी–९ पं. समूळ पावलों–१० त. पावलें.–
११ दे. त. विखरलेती.

दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥ ३ ॥

३६७३. एकविध वृत्ति न राहे अंतरीं । स्मरणीं च हरी विस्मृति हे[1] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें[2] । मज माझ्या जीवें साक्षित्वेसी ॥ ध्रु ॥ न राहे निश्चळ जागवितां मन[3] । किती क्षणेंक्षण[4] सावरावें ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु केले वेवसाव । तेणें रंगें जीव रंगलासे ॥ ३ ॥

३६७४. आतां सोडवणें न या नारायणा । तरि[5] मी न वंचें जाणा काळा हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें सांगोनियां जालों उतराई । आणीक तें काई माझे हातीं ॥ ध्रु ॥ केलियाचें माप नये सेवटासी । करितील नासि अंतराय ॥ २ ॥ तुका ह्मणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ॥ ३ ॥

३६७५. सत्या[6] माप वाढे । गवाळाची[7] चाली खोडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उतरे तें कळे कसीं । विखरोन[8] सर्वदेशीं ॥ ध्रु ॥ घरामध्यें राजा । नव्हे[9] हो वा पाटपूजा ॥ २ ॥ तुका ह्मणे साचें । रूप तें दर्पणींचें[10] ॥ ३ ॥

३६७६. नाहीं खंड जाला । माझा तुमचा विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसें कैसें हो दुश्चित । आहे चौघांपाशीं नीत ॥ ध्रु ॥ मुळींचें लिहिलें । मज आतां सांपडलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज । न लगे बोलणें सहज ॥ ३ ॥

३६७७. हेचि वादकाची कळा । नाहीं येऊं येतें[11] बळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धीर करावा करावा । तरि तो आहे आह्मां देवा ॥ ध्रु ॥ रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ॥ २ ॥ तुका ह्मणे वरि । गोडा आणावा उत्तरीं ॥ ३ ॥

३६७८. एक परि बैहिर[12] वरें । परि तीं ढोरें ग्यानगडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कपाळास लागली अगी । अभागी कां जीतसे ॥ ध्रु ॥ एके परि वरें वेडें । तार्किक[13] कुडें जळो तें ॥ २ ॥ तुका ह्मणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ३ ॥

३६७९. खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुक विनोदें निरंजनीं[14] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीस ॥ ध्रु ॥ एकांताचें सुख जेंडलें[15] जिव्हारीं । वीट परिचारीं वरा आला ॥ २ ॥ जगाऐसी

---

१ दे. त. "हे" नाहीं.—२ पं. अनुभव । मज माझा जीव०.—३ पं. मना । किती क्षणक्षणा—४ दे. क्षीणेंक्षीणें.—५ पं. तरि मी वाचेना काळा हातीं ।.—६ पं. सत्य.—७ पं. गावाळाची.—८ दे. विखरोणें.—९ पं. नव्हे व्हावी पटपूजा । त. नव्हे व्हावा.—१० त. दर्पणींचे—११ पं. देत.—१२ पं. बहिरें—१३ त. दे. तार्कि.—१४ दे. त. पं. निराजनी—१५ पं. पढलें.

बुद्धि नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा जालों पायीं ॥ ३ ॥ आणीक ते चिंता न लगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥ ४ ॥ तुका ह्मणे धडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विसांवलें ॥ ५ ॥

३६८०. उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेम नाहीं लाभ हानि । अवचित [1]घेडती दोनी । विचारूनि मनीं । पाहिजे तें प्रयोजावें ॥ ध्रु ॥ जाळ जाळा काळें । करपों नेदावें आगळें । जेवितां वेगळें । [2]ज्याचें त्याचें तेथें शोभे ॥ २ ॥ पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका ह्मणे धरी । सेज जमा सेवटीं ॥ ३ ॥

३६८१. पडिलिया ताळा । मग अवघा [3]चिं निर्वाळा । तेथें कोणी बळा । [4]नाहीं येत कोणासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जोडिलें तें लागे हातीं । आपआपली निश्चिंती । हर्ष आणि खंती । तेथें दोनी नासलीं ॥ ध्रु ॥ सहज सरलिया [5]कारण । मग एकला आपण । दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥ २ ॥ करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी ह्मूण [6]लागती ॥ ३ ॥

३६८२. [7]जीवितां तो माझा पिता । उखता तो उखत्यांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जनार्दनीं सरती कर्मे । [8]बांधा भ्रमे [9]अंन्यत्र ॥ ध्रु ॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरितां ॥ २ ॥ तुका ह्मणे खांद्या पानें । सिंचतां भिन्न कोरडी ॥ ३ ॥

३६८३. माउलीची चाली लेंकराचे ओढी । तयालागीं काढी प्राणें प्रीती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी बळिवंत आवडी जी देवा । संतमहानुभावा विनवितों ॥ ध्रु ॥ मोहें मोहियेलें सर्वकाळ चित्त । विसरु तो घेत नाहीं क्षणें ॥ २ ॥ तुका ह्मणे [10]दिलें प्रेमाचा वोरस । सांभाळिलें दास आपुलें तें ॥ ३ ॥

३६८४. केवढा तो अहंकार । माझा तुह्मां नव्हे दूर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ॥ ध्रु ॥ कां जी कृपेनें कृपण । वेचत असे ऐसें धन ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ॥ ३ ॥

३६८५. अपराधी ह्मणोनि येतों काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [11]येईलें तारूं तरी तारा जी देवा । नाहीं तरी सेवा घ्या वो भार ॥ ध्रु ॥ कासया मी आतां [12]वंचूं हें शरीर । आहें वारगीर जाईं [13]जैनें ॥ २ ॥ तुका ह्मणे मन करूनि मोकळें । आहें [14]सांळेंढाळें उदार मी ॥ ३ ॥

---

१ पं. घडलीं.–२ पं. ज्याचें तेथें शोभे ।. दे. ज्याचें त्याचें तेथें तें शोभे ।–३ पं. ' चि '' नाहीं.–४ त. येत नाहीं.–५ दे. कारणें–६ पं. लागली.–७ दे. त. जेवितो.–८ दे. वाते–९ दे. त. अनेत्र–१० पं. दिल्हे–११ पं. होईल तारूं तरी तारिजोजी देवा ।.–१२ पं. वंचे.–१३ पं. जेणें–१४ पं. साव्टाळे.

३६८६. माझे तों फुकाचे कायेचे चि कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुह्मांऐसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं च न वंचीं आजिच्या प्रसंगीं । सकळा ही अंगीं करीन पूजा ॥ ध्रु ॥ द्यावें कांहीं तुह्मी हें तों नाहीं आस । असों या उदास देहभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी मावळली खंती । समाधान चित्तीं सर्वकाळ ॥ ३ ॥

३६८७. स्वामीचिया सत्ता । आधीं वर्म येतें हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचें ॥ ध्रु ॥ मनें मेळविलें मना । नाहीं अभावीं शाहणा । अंतरींच्या खुणा । वरि दिल्यों उमटोनि ॥ २ ॥ नाहीं पराश्रमें काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥ ३ ॥

३६८८. एके ठायीं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेळोवेळां जागवितों । दुजें येइल ह्मूण भीतों ॥ ध्रु ॥ नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ॥ २ ॥ तुका जालासे शाहाणा । आड लपे नारायणा ॥ ३ ॥

३६८९. वैरागरापाशीं रत्नाचिया खाणी । हे चि घ्यावी धणी फावेल तों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येथें नाहीं तर्कवितर्कांची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्यां ॥ ध्रु ॥ उगा च सारावा वाढिला तो ठाव । वाढितिया भाव कळतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैशातैसें ॥ ३ ॥

३६९०. समर्थ या नांवें दिनांचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामीअंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज काय लागे करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ॥ ध्रु ॥ दयासिंधु तुह्मां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपापीयूषें ॥ २ ॥ तुका ह्मणे अवो पंढरीनिवासे । वहु जीव आसे लागलासे ॥ ३ ॥

३६९१. लेखिलें कवित्व माझें सहज बोल । न लगे चि ओल जिव्हाळ्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेये चि उत्तर कांहीं परतोनि । जालों नारायणीं न सरतें ॥ ध्रु ॥ लाजिरवाणी कां वेदली हे वाचा । नव्हे च ठायींचा मननशीळ ॥ २ ॥ तुका ह्मणे फळ नव्हे चि सायासा । पंढरीनिवासा काय जालें ॥ ३ ॥

३६९२. येणें जाला तुमचे पोतडीचा झाडा । केलासी उघडा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भरूनियां घरीं राहिलों वोरवती । आपुली निश्चिंती आपल्यापें ॥ ध्रु ॥ आतां काय उरी उरली ते सांगा । आणिलेति जगाचिये साक्षी ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें पाहोंजासी आतां । माझी जाली सत्ता तुह्मांवरि ॥ ३ ॥

---

१ दे. त. आजिचा.—२ पं. तुह्मी कांहीं—३ पं. वर्मे येती.—४ पं. मायबाप.—५ पं. दिल्हे.—६ पं. "नाहीं" नाहीं.—७ पं. कळा.—८ दे. नाहीं ही गुतत०.—९ दे. त. मोव्या.—१० पं. कृपामृतें—११ पं. नलगे.—१२ पं. वदविली वाचा.

**३६९३.** तुमच्या पाळणा ओढतसे मन । गेलों विसरोन आपणासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लागेल पालटें फेडावें उसणें । येणें चि प्रेमाणें[1] पांडुरंगा ॥ ध्रु ॥ तुमचे आवडी संबंधाचा त्याग । घेतला ये लाग जगनिंदेचा ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसा माझा जीव ओढे । तैसें च तिकडे पाहिजेल ॥ ३ ॥

**३६९४.** नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया जी[2] माझी करणें येविसीं । भयाची मानसीं चिंता संतीं[3] ॥ ध्रु ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । सत्तेनें तो चाळी आपुलिये ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें पाळणपोषण । करितां आपण पांडुरंगा ॥ ३ ॥

**३६९५.** मज कांहीं सीण न व्हावा यासाटीं । कृपा तुह्मां पोटीं उपजली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतें तैसें केलें आपलें उचित । शिकविलें हित बहु बरें ॥ ध्रु ॥ आह्मी न मनावी कोणाची आशंका । तुह्मां भय लोकां आहे मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां संचिताचा ठेवा । वोडवला घ्यावा जैसा तैसा ॥ ३ ॥

**३६९६.** कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें । पायांचिया बळें कंठीतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाह्यतसें वाट येईं गा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥ ध्रु ॥ बहुतांचे सत्ते जालों कासावीस । जाय रात्री दिस वैरियांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे वैसें मनाचिये मुळीं । तरीं च ही जाळीं उगवती ॥ ३ ॥

**३६९७.** कां जी तुह्मी ऐसे नव्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठायिंच्या ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ॥ ध्रु ॥ दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्वें द्वातारें राखावीं तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण ह्मणऊनि ॥ ३ ॥

**३६९८.** मागत्याची कोठें घडते निरास । लेंकरा उदास नाहीं होतें[6] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया मी होऊं उतावीळ जीवीं । जाणता गोसावी सर्व आहे ॥ ध्रु ॥ जाला तरी वेळ कवतुकासाटीं । निर्दया तों पोटीं उपजेना ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी ठाउकें उचित । होईल संकेत नेमियेला ॥ ३ ॥

**३६९९.** आरुषा वचनीं मातेची आवडी । ह्मणऊनि तांतडी घेती नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय होइल माझें मांडिलें कवतुक । आदराची भूक रडारोवी ॥ ध्रु ॥ लपोनियां करी चुकुर माउली । नाहीं होती केली निष्टासांडी ॥ २ ॥ तुका ह्मणे करी पारखीं वचनें । भेवउनि तान्हें आळवावें ॥ ३ ॥

---

१ पं. प्रमाण.–२ पं. ०जिक्रि करणें०.–३ पं. सती.–४ पं. चाली –५ पं. गर्भ्रदित्वग.–
६ पं. होत.

३७००. प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचे चि भाव निष्ठुरता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीर्णे तरि एका जीवें उभयता । पुत्राचिया पिता दुखवे दुःखें ॥ छ ॥ काय जाणे तुटों मायेचें लिगाड । विषम तें आड उरों नेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज करुणा उत्तरें । करितां विश्वंभरें[1] पैाविजेल[2] ॥ ३ ॥

३७०१. नको घालूं झांसां । मना उपाधिवोळसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जे जे वाहावे[3] संकल्प । पुण्य तरी ते चि पाप ॥ छ ॥ उपजतो[4] भेव । होतो कासावीस जीव ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहों । होइल तें निवांत राहों[5] ॥ ३ ॥

३७०२. बीजीं फळाचा भरवसा । जतन सिंचनासरिसा[6] । चाविलिया[7] आसा । काकुलती ते नाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा तों गडसंदीचा[8] ठाव । पिकें[9] पिकविला भाव । संकोचोनि जीव । दशा केली जतन ॥ छ ॥ माती घाली धनावरी । रांडा रोटा वरीवरी । सुखाचे सेजारीं । दुःख भ्रमें भोगीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे दिशाभुली । जाल्या उफराटी[10] चाली । निवाडाची बोली । अनुभवें साक्षीसी ॥ ३ ॥

३७०३. काय उरली ते करूं विनवणी । वेचलों वचनीं पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अव्हेरलों आतां कैचें नामरूप । आदर निरोप तरि तो नाहीं ॥ छ ॥ माझा मायबाप ये गेलों सलगी । तों हे तुह्मां जगीं सोयइरिका ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जोडोनियां हात । करी दंडवत ठायिंचाठायीं ॥ ३ ॥

३७०४. आवडी धरूनि करूं गेलों लाड । भक्तिप्रेमकोड न पुरे चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि जीव ठेला आसावोनि[11] । खेद होतो मनीं बहु साल ॥ छ ॥ वेठीऐसें वाटे निर्फळ कारण । शीतळ होऊन खोडावलों ॥ २ ॥ तुका ह्मणे सरतें नव्हें चि पायांपें । बळ केलें पापें नव्हे चि भेटी ॥ ३ ॥

३७०५. प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु नेदी रडों माता । दुश्चित होतां धीर नव्हे ॥ छ ॥ वरी वरी तोंडापुरतें । मोहोरी तें कळतसे ॥ २ ॥ जाणोनियां नेणता तुका । नव्हे लोकांसारिखा ॥ ३ ॥

३७०६. हा गे हा चि आतां लाहो । माझा अहो विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दंडवत दंडवत । वेगळी मात न बोलें ॥ छ ॥ वेगळाल्या कोठें भोगें[12] । लाग लागें लावावा ॥ २ ॥ तुका ह्मणे केल्या जमा । वृत्तिनमा[13] भाजूनि ॥ ३ ॥

---

१ त. विश्वंभर.–२ दे. त. पं. पाविजैल –३ पं. पाहावे.–४ पं. उपजतां.–५ पं. साहों –६ पं. सिचनी.–७ पं. चाळविलिया आशा । काकुलतिनें नाड ॥.– ८ पं. गडसंधीचा –९ पं. पीक.–१० पं. उफराट्या.–११ दे. पं. असावोनि.–१२ पं. मोगें.–१३ पं. वृत्तिक्षमा.

३७०७. तुह्मांसी न कळे सांगा काय एक । [1]कासया संकल्प [2]वागेवूं मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे तेथें सत्ता ठेविलें [3]स्थापूनि । प्रमाणें चि वाणी [4]वंदे आज्ञा ॥ ध्रु ॥ कृपा जाली [5]मग न लगे अंगसंग । निजध्यासें रंग [6]चढता राहे ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें बोलिलों तें वाव । आतां हा चि भाव दृढ जाला ॥ ३ ॥

३७०८. आवडी न पुरे मायबापापासीं । घडों का येविसीं सकईल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होईल नेमलें [7]आपुलिया काळें । आलीयाचा बळें आग्रो उरे ॥ ध्रु ॥ जाणविलें तेथें थोडें एकवेळा । सकळ ही कळा [8]सर्वोत्तमीं ॥ २ ॥ तुका ह्मणे निवेदिलें गुह्य गुज । आतां तुझी तुज सकळ चिंता ॥ ३ ॥

३७०९. वोखटा तरी मी विटलों देहासी । पुरे आतां ऐसीं जोडी पुन्हां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ किती मरमर सोसावी पुढती । राहिलों संगती विठोबाचे ॥ ध्रु ॥ आतां कोण याचा करील आदर । जावो कळिवर विटंबोनि ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां [9]सांडी ते चि सांडीं । कोण फिरे लंडी यासी मागें ॥ ३ ॥

३७१०. हें ही ऐसें तें ही ऐसें[10] । उभय पिसें अविचार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अभिमानाचे ठेलाठेली[11] । मधीं जाली हिंपुष्टी[12] ॥ ध्रु ॥ धीरा शांती ठाव नुरे । हा चि उरे आवाळ्या ॥ २ ॥ [13]कौतुकें हें पाहे तुका । [14]कढतां लोकां [15]अवघणीं ॥ ३ ॥

३७११. हित जाणे चित्त । कळों येतसे उचित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परिहार ते संपादनी । [16]सत्य कारण कारणीं ॥ ध्रु ॥ वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें [17]तें रसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे करुनी खरें । ठेवितां तें पुढें बरें ॥ ३ ॥

३७१२. देवें दिला देह भजना गोमटा । [18]तो या जाला भांडा बाधिकेच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ताठोनियां मान राहिली वरती । अहंकारा हातीं लवों [19]नेल्हे ॥ ध्रु ॥ दास ह्मणावया न [20]वळे रसना । [21]ईश्वरवचना वासे गळा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें ठेवावा विटाळ । [22]स्नानें निर्मळ व्हावयासी ॥ ३ ॥

३७१३. काय करूं पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगितलें नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥ ध्रु ॥ काम घरीं न करी धंदा । येथें

---

१ दे. असया.–२ पं. वाउगा.–३ पं. व्यापुनी –४ त. “वदे” याचें “देव” असें केलें आहे –५ पं. मज.–६ पं. ‘चढता राहे’ याबद्दल ‘चढताहे’.–७ पं. आपुले या काळे.–८ पं. सर्व –९ दे. साडि तें चि साडि. पं. साडि ते च मांडि.–१० पं. तैसे.–११ त. पं. ठेलाटेली.–१२ पं. हिंपुटी.–१३ फवतुक. पं. कवतुकें.–१४ पं. कढत –१५ दे. अवनि.–१६ त. सत्ये. दे. सते –१७ पं. तेथें –१८ दे. तों.–१९ पं. नेदी.–२० पं. चळे.–२१ पं. सवीर वचना वासुकळ.–२२ दे. स्नानें नीर्मळ. त. स्नानें नीरमळ. पं. स्नानेंची निर्मळ.

सदा दुश्चित ॥ २ ॥ आमचे कुळीं नव्हतें ऐसें । हें च पिसें निवडलें ॥ ३ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नरका जाणें । त्या वचनें दुःखांचीं ॥ ५ ॥

३७१४. कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणीं च संतोष ॥ ध्रु ॥ पाहिजे तो कळवळा । मग वळा काय उणे ॥ २ ॥ तुका ह्मणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥ ३ ॥

३७१५. नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुभव तो वैरावरी । नाहीं दुरी वेगळा ॥ ध्रु ॥ पाहिजे तें आलें रुची । काचाकुची काशाची ॥ २ ॥ तुका ह्मणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ॥ ३ ॥

३७१६. जों जों घ्यावा सोस । माझे वारीं गर्भवास । लटिक्याचा दोष । अधिक जडे अंगेसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां आहे तैसें असो । अनुताप अंगीं वसो । येवढें चि नसो । माझें आणि परावें ॥ ध्रु ॥ जागाजालेपणें । काय नासावें स्वप्न । शब्दाचिया शिणें । कष्ट मिथ्या मानावे ॥ २ ॥ छाये माकड विटे । धांवे कुपीं काय भेटे । तुका ह्मणे फुटे । डोई गुडघे कोंपर ॥ ३ ॥

३७१७. गुणांचा चि सांटा । करूं न वजों आणिका वाटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती छंद नानापरी । भरोन सिणती आडभरी ॥ ध्रु ॥ नेमली पंगती । आह्मां संतांची संगती ॥ २ ॥ तुका ह्मणे लीळा । येर कवतुक पाहे डोळां ॥ ३ ॥

३७१८. शिकल्या शब्दांचें उत्पादितों ज्ञान । दरपणींचें धन उपर वाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुभव कइं होईन भोगिता । सांकडें तें आतां हें चि आलें ॥ ध्रु ॥ गायें नाचें करीं शरीराचे धर्म । बीजकें ळावर्म तुमचें दान ॥ २ ॥ तुका ह्मणे केला उशीर न साहे । ह्याल तरी आहे सर्व सिद्ध ॥ ३ ॥

३७१९. सिकविला तैसा पढों जाणे पुंसा । कैंची साच दशा तैसी अंगीं । स्वप्नींच्या सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया हा केला जिव्हे अळंकार । पायांसी अंतर दिसतसे ॥ ध्रु ॥ दर्पणींचें धन हातीं ना पदरीं । डोळां दिसे परी सत्याचिये । आस केली तरी लाळ चि घोंटावी । ठकाठकी तेवीं दिसतसे ॥ २ ॥ कवित्वें रसाळ वदविली वाणी । साक्ष ही पुराणीं घडे ऐसी । तुका ह्मणे गुरें राखोनि गोंवारी । माझीं ह्मणे परि लाभ नाहीं ॥ ३ ॥

---

१ पं. या.—२ त. आह'च—३ पं. वरीवरी.—४ पं. अगासी—५ पं. जागा आले पणे । काय असावे स्वप्ने ।—६ पं. छाया—७ पं. गुडगे.—८ दे. पाहों.—९ त. पं. बोलाचें.—१० त. उत्पादितां—११ दे. त. अनुभउ—१२ पं. गायनाचे०—१३ पं. बीजवर्म नाम.—१४ पं. पुंसा.—१५ पं. स्वप्नीचिया.—१६ दे. जिहुवे.—१७ पं. कवित्व.

३७२०. अनुभव तो नाहीं [1]तुमचिया दर्शनें[2] । [3]आइकिलें कानें वदे वाणी । जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । ह्मणतां मांडे पुरी काय होतें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहींनाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरिहरा चाळविलें ॥ छ ॥ पत्रीं कुशळता भेटीं[4] अनादर । काय तें उत्तरें[5] येइल मानूं । अंतरीं सर्वांहीं[6] कां नाहीं सारिखें । धरूनि पारिखें वर्त्ततसां ॥ २ ॥ आलों आलों ऐसी दाऊनियां आस । [7]बाहों बुडतयास काय द्यावें । तुका ह्मणे अहो चतुरा शिरोमणि । किती माझी वाणी तुह्मी कोठें ॥ ३ ॥

३७२१. केलें[8] तरी आतां साच चि करावें । विचारिलें द्यावें कृपादान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संकल्पासी नाहीं बोलिलो[9] विकल्प । तुह्मां पुण्यपाप कळे देवा ॥ छ ॥ [10]उदार शक्ति तंव तुमची भूमंडळीं । ऐसी ब्रिदावळी गर्जतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे अहो [11]रखुमादेवीवरा । उपरोध कां धरा माझा आतां ॥ ३ ॥

३७२२. अहो पुरुषोत्तमा । तुह्मां काशाची उपमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सतंत तो नाहीं बुद्धी । नाळवितां नाहीं शुद्धि ॥ छ ॥ जागविलें तरी । तुह्मां [12]व्यक्तियेणें हरी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुम्हा नित्य दिसें[13] नवा ॥ ३ ॥

३७२३. मथनें भोगे सार । ताकें घडे उपकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवी सायासाची जोडी । अनुभविया ठावी गोडी ॥ छ ॥ पाक आणि रुचि । जेथें तेथें ते कइंची ॥ २ ॥ वाढितो पंगती । तुका आवडी संगती ॥ ३ ॥

३७२४. चिंतनाची जोडी । हा चि लाभ घडोघडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी बसूनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥ छ ॥ [14]जाय जेथें मन । आड घाला सुदर्शन ॥ २ ॥ तुका ह्मणे भोजें[15] । नाचें हो ऐसें न लजें ॥ ३ ॥

३७२५. आवडीची न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नित्य नवा कळवळा । [16]मायबाळामध्यें तो ॥ छ ॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्मानंदें । संतवृंदें चरणापें ॥ ३ ॥

---

१ पं. तुमच्या.–२ दे. दरपणें. त. दरुशनें –३ त. आइकिले. पं. आयीकिले.–४ पं. पोटीं–५ दे. उदर.–६ पं. सवाह्य.–७ पं. बुडो बुडल्यास.–८ दे 'ल्ळ' याचें 'ल्लें' असें केलें आहे.–९ पं. बोलिले–१० पं. उदार विख्यात तुह्मी भूमंडळीं –११ पं. रखुमाईच्या वरा । उपरोध धरा०.–१२ त. व्येक्ती पं. दे. वेक्ति.–१३ पं. दिवस.–१४ पं. जेथें जेथें जाय मन.–१५ पं. भोजें । नाचेन ऐसें हो निर्लज्ज.–१६ त. माये०.

३७२६. जडलों तों आतां पायीं । होऊं काई वेगळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुम्हीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ॥ छ्र ॥ सांभाळिलों मायबापा । केलों तापावेगळा ॥ २ ॥ वोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्य चि ॥ ३ ॥

३७२७. काळावरी सत्ता । ऐशा करितो वारता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो मी हीणाहूनि सांडें । देवा दुन्हें काळतोंडें ॥ छ्र ॥ मानूनी भरवसा । होतों दास मी ऐसा ॥ २ ॥ तुका ह्मगे मान । गेलों वाढवूं थोरपण ॥ ३ ॥

३७२८. समर्थाचे सेवे कोठें नाहीं घात । पाहों नये अंत पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहे तैसी नीत विचारावी बरी । येऊनी भीतरी वास करा ॥ छ्र ॥ निढळ राखिलें तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभकीर्ति ॥ ३ ॥

३७२९. बहु धीर केला । जाण नें होसी विठ्ठला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां घरीन पदरीं । करीन तुज मज सरी ॥ छ्र ॥ जालों जीवासी उदार । उभा राहिलों समोर ॥ २ ॥ तुका विनवी संतां । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥ ३ ॥

३७३०. नेदावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळा ॥ १ ॥ सर्प शांतिरूप न ह्मणावा भला । झोंबे खवळीला तात्काळ तो ॥ २ ॥ तुका ह्मणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥ ३ ॥

३७३१. मज अभयदान देईं तूं दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं दुजें नेणें ॥ छ्र ॥ सेवाभक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें सर्व ही साधन । नाम संकीर्तन विठोबाचें ॥ ३ ॥

३७३२. करावा वर्षाव । तृषाक्रांत जाला जीव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहें आकाशाची वास । जाणता तूं जगनिवास ॥ छ्र ॥ संयोगें विस्तार । वाढी लेंगे तो अंकूर ॥ २ ॥ तुका ह्मणे फळें । चरणांबुजें तीं सकळें ॥ ३ ॥

३७३३. कैंरीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावीं चरणापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग तो माझा मायबाप । घेइल ताप हरूनी ॥ छ्र ॥ बहुतांच्या मतें गोवा । होऊं जीवा नेदावा ॥ २ ॥ तुका ह्मणे करुणाबोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥ ३ ॥

---

१ पं. सांभाळिलें.–२ त. पं. मौन्ये (मौन्यें?) –३ दे. देवे. पं. देव –४ पं. भरवसा । होतों दास ह्मणत ऐसा ॥.–५ पं. "न होसी" याबद्दल "नव्हेसी".–६ पं. ह्मणे.–७ पं. देईंगा दातारा. दे. देईं दातारा –८ दे. नेणतां.–९ त. जगन्नीवास. पं. जगदीश.–१० पं. 'लागे तो' याबद्दल 'लागतो'. ११ पं. करिसी.

३७३४. एकविध नारायण । तेथें विषमाचा सीण । पालटों चि भिन्न । नये अणुप्रमाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥ छ्र ॥ कायावाचामन । स्वरूपीं च अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणें पाडें लैवलाहो ॥ २ ॥ तुका ह्मणे आळस निद्रा । येथें देऊनियां चिरा । देऊनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥ ३ ॥

३७३५. हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥ छ्र ॥ अवघा रुधविला ठाव । नेला वाव मी माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे एके ठायीं । असूं नाहीं क्षणें भिन्न ॥ ३ ॥

३७३६. पाहा कैसेकैसे । देवें उद्धरिले अनयासें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐका नवल्याची ठेव । नेणतां भक्तिभाव ॥ छ्र ॥ कैलासासी नेला । भिल्ल पानेडी बैसला ॥ २ ॥ पांखांच्या फडत्कारीं । उद्धरुनी नेली घारी ॥ ३ ॥ चोरें पिंडी दिला पाव । त्या पूजनें धांये देव ॥ ४ ॥ तुका ह्मणे भोळा । स्वामी माझा [11]हो कोंवळा ॥ ५ ॥

३७३७. अनुभव ऐसा । मज लागला सरिसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाठी बैसली सेजारीं । नव्हे शांत कोणे परी ॥ छ्र ॥ कोठें न लगे जावें । कांहीं घालावया ठावें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोटि । दुःखाच्या च तये पोटीं ॥ ३ ॥

३७३८. पाठीवरी भार । जातो वाहूनियां खर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संत नेतील त्या ठाया । माझी आधीन [12]त्यां काया ॥ छ्र ॥ मोटचौ[13]फळें । अंगीं उच्छिष्टाचें बळ ॥ २ ॥ न संडीं मारग । येथें [14]न चोरूनि अंग ॥ ३ ॥ आपुलिया सत्ता । [15]पोंलविती नाहीं चिंता ॥ ४ ॥ [16]कळवळिला तुका । घराचार येथें नका ॥ ५ ॥

३७३९. मागें पुढें जालों लाटा । अवघा मोटा सरळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं कोठें रितें अंग । नित्य रंग नवा चि ॥ छ्र ॥ पोसिंघाचे पडिलों हातीं । [17]वोझें घाती चुकली ॥ २ ॥ जोगावलों पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ॥ ३ ॥ अवघिया मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ॥ ४ ॥ संतांचिये लोळें द्वारीं ।

---

१ त. पाल्टा.–२ पं. लवलाहे.–३ पं. करुनियां.–४ पं. देखे.–५ दे. असूं नाहीं सीनभिन्न ।–६ त. सीनभीन्न.–७ पं देवें कैसे०.–८ पं. आनायासें. दे. आनयासें. त. अनारिसें–९ त नवल्यावयाची. पं. नवलायाची.–१० दे. त. देव धाये.–११ पं. हा.–१२ पं. ते.–१३ पं. मोटे चौफळ–१४ पं. "न चोरूनि" याबद्दल "चोरुनियां".–१५ पं. चालविली–१६ त. हें कडवें तळेगावच्या प्रतींत आढळतें. दे. या कडव्याची जागा कोरी टाकली आहे. पं. "तुका ह्मणे संत । तुह्मी बहु कृपावत ॥" असें त. या कडव्याबद्दल आढळतें.–१७ पं. माझे.

पळती दुरी गोमाशा ॥ ५ ॥ कांहीं न साहेसा जाला । तुका नेला समर्थ ॥ ६ ॥ [1]पाहातो गे महाद्वारीं । वरि झुली वाकळा ॥ ७ ॥

३७४०. करणें न करणें वारलें[2] जेथें । जातों[3] तेणें पंथें संतसंगें ॥ १ ॥ संतीं हें पहिलें लाविलें निशाण । ते खुणा पाहोन गर्जे नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी चला या चि वाटे । [4]भेरवशानें भेटे पांडुरंग ॥ ३ ॥

३७४१. कइंचें कारण । तृष्णा वाढविते सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूनि ऐसा संग । सोसें चि तूं पांडुरंग ॥ ध्रु ॥ रूपीं नाहीं गोडी । हांवे हांवे उर फोडी ॥ २ ॥ तुका न पडे भरी । ऐशा वरदळाचे थोरी ॥ ३ ॥

३७४२. धन्य तो ग्राम जेथें हरिदास । धन्य तो चि वांस भाग्य तया[5] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्मज्ञान तेथें[6] असे घरोघरीं । धन्य त्या[7] नरनारी चतुर्भुज ॥ ध्रु ॥ नाहीं पापा रिघ काळाचें जीवन[8] । हरिनामकीर्त्तन घरोघरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तिहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित जीवें ॥ ३ ॥

३७४३. मारूं नये सर्प संतांचिये दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक सूत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपाडितां अंग कांपे ॥ ध्रु ॥ नाहीं साहों येत दुखाची ते जाती । परपीडा भूतीं[10] साम्य जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे दिला नीतीचा संकेत । पुजा नांवें चित्त सुखी[11] तेणें ॥ ३ ॥

३७४४. भय होतें आह्मीपणें । पाठी येणें घातलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा आपुला चि देश[12] । काळा लेश[13] उरे चि[14] ना ॥ ध्रु ॥ समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणें । जालें जिणें सुखाचें ॥ ३ ॥

३७४५. विषम वाटे दुरवरी । चालूनि परती धरीं[15] । मागील ते उरी । नाहीं उरली भयाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुख्य न व्हावा तो नाड । सेवटाचे हातीं गोड । सरलिया चाड । मग कैचे उद्वेग ॥ ध्रु ॥ होता पहिलें[16] अभ्यास । समयीं घालावया कास । तेव्हां लटिके[17] दोष । योगें अनुतापाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे । बुद्धी केलियानें साहे । जवळी च [18]पाहें । देव वाट स्परणाची ॥ ३ ॥

१ दे. पातोगे. पं. 'पाहातो गे०' हें कडवें अगोदर असून 'काहीं न साहेसा०' हें कडवें शेवटीं आहे. तुकारामाच्या शैलीस हें ठीक दिसतें तरी दे. त. यांत तसें नाहीं हाच अभग चारचरणी धरल्यास दे. व त. यांतील क्रमही शैलीस विरुद्ध न'हीं आणि यासाठींच त. हा अभग चारचरणी धरून मागून कडव्याचे आंकडे फिरवले आहेत.—२ पं. वारियेले—३ त. जालों. पं. जातों तेणें पथें सादावील—४ दे. पाडुरग भेटे सर्वसने. त. पाडुरग भेटे सर्वश्वनें—५ पं. वश्च भक्तिभाग्य.—६ पं. जेथें—७ पं. 'त्या' नाहीं—८ पं. खंडन.—९ पं. वश.—१० पं. होती—११ पं. सुख.—१२ दे. त. देप—१३ दे. लेसे.—१४ पं. 'चि' नाहीं.—१५ पं. घरी.—१६ दे. परजीला.—१७ पं. ०लटिके ते दोप । योग.—१८ त पं. पाहे

३७४६. आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग गेला सीण गेला । अवघा जाला आनंदु ॥ छ्र ॥ प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी[1] मुखासी ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हां जोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥ ३ ॥

३७४७. विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा[2] सार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश[3] ॥ छ्र ॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ २ ॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन[4] ॥ ३ ॥ सूर्याचिया परी । तुका लोकीं[5] क्रीडा करी ॥ ४ ॥

३७४८. निरोधिती[6] परि न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राहातेति तुम्ही भरोनि अंतरीं । होतों तदाकारी निर्विषयचि[7] ॥ छ्र ॥ कृपेचिया साक्षी असती जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥ २ ॥ तुका म्हणे ताळा मेळवणीपाशीं । विनंती पायापाशीं हे चि करीं ॥ ३ ॥

३७४९. अद्वय चि द्वय जालें चि कारण । धरिलें नारायणें[8] भक्तिसुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अपरोक्ष आकार जाला चतुर्भुज । एकतत्त्व[9] बीज भिन्न नाहीं ॥ छ्र ॥ शून्य निरसूनि[10] राहिलें निर्मळ । तें दिसे केवळ विटेवरी[11] ॥ २ ॥ सुखें घ्यावें नाम वदना ही चाड । सरिता वापी आड एक पाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे मी च आहें तेणें सुखें । भेदें[12] नाहीं मुखें नाम गातों ॥ ४ ॥

३७५०. उदार चक्रवर्ती । वैकुंठीचा भूपति । पुंडलिकाचिया प्रीती । विटेवरी राहिला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वसिद्धीचा दातार । सवें आणिला परिवार । भक्ता अभयंकर[13] । घ्याघ्या ऐसें म्हणतसे ॥ छ्र ॥ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षीदेवां[14] संस्थापिलें । एकवीस स्वर्गांतें धरिलें । सत्तामात्रें आपुलिया ॥ २ ॥ तुका म्हणे कृपावंत । इच्छिले पुरवी[15] अर्थ । रिद्धिसिद्धिमुक्ती[16] देत[17] । शेवटीं[18] संग आपुला ॥ ३ ॥

३७५१. सकलगुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वरकड[19] कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥ छ्र ॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंतीं जाण ॥ २ ॥ तुका म्हणे जेंजें दोला । तेंतें साजे या विठ्ठला ॥ ३ ॥

---

१ पं. लाटी.–२ पं. वेदातार्चे–३ दे. त. सावकास.–४ दे. वचनें.–५ पं. जगीं–६ पं. निरोधितो.–७ दे. निर्विषचि पं. निर्विषय–८ त. नारायण–९ पं. एकतत्वी–१० दे. त. निरशुन्यी. पं. निरसून्य–११ दे. इटेवरी.–१२ पं. भेट नाहीं मुखें। नाम गातां.–१३ पं. अभयकर–१४ पं. ०देवातें स्थापिलें–१५ पं. पुरविले मनोरथ.–१६ पं. रिद्धीसिद्धी मोक्ष.–१७ दे. देतसे–१८ त. पं. सेवटीं–१९ पं. कोठें काहीं कोठें नाहीं ।.

३७५२. वैकुंठींचें[1] सुख पंढरिये आलें । अवघें पुंडलिकें सांटविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घ्या रे घ्या रे माझे बाप । जिव्हा घेउनि खरें माप । करा एक खेप । मग[2] करणें न लगे ॥ छ ॥ विषय गुंडोनी ठेवीं[3] पसारा । मग[4] धांव घ्या पंढरपुरा ॥ २ ॥ जंवं[5] आहे आयुष्याचा लेश । तंवं[6] करीं पंढरीचा वास ॥ ३ ॥ अळस न करीं[7] लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ४ ॥

३७५३. देवाचें चरित्र नाठवे[8] सर्वथा । विनोदार्थे कथा गोड वाटे ॥ १ ॥ हातावरि हात हासोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरि । जातो यमपुरी भोगावया ॥ ३ ॥

३७५४. अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूनी उचित देईं हें चि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥ छ ॥ देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवुनी निराळा दावी मज ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे तुझें हें सकळ । कोणी[9] एके काळें देईं मज ॥ ३ ॥

३७५५. हें चि माझें तप हें चि माझें दान । हें चि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें चि माझें तीर्थ हें चि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ छ ॥ हा चि माझा धर्म हें चि माझें कर्म । हा चि नित्यनेम नाम तुझें ॥ २ ॥ हा चि माझा योग हा चि माझा यज्ञ । हें चि जपध्यान नाम तुझें ॥ ३ ॥ हें[10] चि माझें ज्ञान श्रवण मनन । हें चि निजध्यासन नाम तुझें ॥ ४ ॥ हा चि कुळाचार हा चि कुळधर्म । हा चि नित्यनेम नाम तुझें ॥ ५ ॥ हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ॥ ६ ॥ तुका ह्मणे दुजें सांगों[11]यासि नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ॥ ७ ॥

३७५६. कोणें[12] साक्षीविण । केलें उद्धारा भजन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें सांगा जी दातारा । माझी भक्ति परंपरा ॥ छ ॥ कोणें नाहीं केली आळी । ब्रह्मज्ञानाहुनि वेगळी ॥ २ ॥ कोणाचें तों[13] कोड । नाहीं पुरविला लाड ॥ ३ ॥ कोणाच्या उद्धारा । केला विलंब माघारा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भिन्न । [14]कांहो बोलें साक्षीविण ॥ ५ ॥

---

१ पं. सुख पंढरीये आलें । पुंडलिकें सांटविलें.–२ दे. 'मग करणें न लगे' यापुढें समासावर मागून 'कांहीं खेप' असा शोध घातला आहे. त. 'न लगे' यापुढें 'कांहीं खेप' असें होतें. त्यापैकीं 'खेप' खोडलें आहे. पं. 'मग न लगे हिंडणें,' असें आहे.–३ पं. 'ठेवीं' नाहीं.–४ पं. धाव घाला पंढरपुरा.–५ पं. 'जव' नाहीं –६ पं. 'तंव' नाहीं –७ पं. करीं या लाभाचा.–८ पं. नावडे सर्वथा। विनोदाची कथा०.–९ त. कोणे.–१० पं. हें कडवें नाहीं.–११ पं. सागावया०.–१२ दे. कोण.–१३ त. त्वां. पं. तें.–१४ दे. कांहो बोले. पं. कां हे बोला.

३७५७. सुखरूप चाली । हळूहळू उसंतिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाळगोपाळांची वाट । सेव्यसेवकतां[1] नीट ॥ ध्रु० ॥ जरी झाला श्रम । तरी पडों नये भ्रम ॥ २ ॥ तुका ह्मणे दासां । देव सरिसासरिसा ॥ ३ ॥

३७५८. चुकली ते[2] वाट । पुढें सांपडवी नीट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी गर्भवास । नेणती ते[3] हरिचे दास ॥ ध्रु० ॥ संचिताचा संग । काय जाणों पावे[4] भंग ॥ २ ॥ तुका ह्मणे दृष्टी । उघडितों नव्हे कष्टी ॥ ३ ॥

३७५९. कइं तो दिवस देखेन[5] मी डोळां । कल्याण मंगळामंगळाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आयुष्याच्या[6] शेवटीं पायांसवें भेटी । कळिवरें तुटी जाल्या[7] त्वरे ॥ ध्रु० ॥ सरो हें संचित पदरींचा गोवा । उतावीळ[8] देवा मन जालें ॥ २ ॥ पाउलापाउलीं करितां विचार । अनंतविकार चित्ता अंगीं ॥ ३ ॥ ह्मणउनि भयाभीत होतो जीव । भाकितसें कींव अट्टाहासें[9] ॥ ४ ॥ तुका[10] ह्मणे होइल आइकिलें कानीं । तरि चक्रपाणी धांव घाला ॥ ५ ॥ दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय । पाहणें तों[11] काय अजून अंतें[12] ॥ ६ ॥

३७६०. कळों येतें वर्म । तरी न पवतों श्रम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां शिरीं होता भार । आह्मां कैचा संचार[13] ॥ ध्रु० ॥ होतें अभयदान । तरि स्थिर होतें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहें । ऐसी वाट उभा आहें ॥ ३ ॥

३७६१. वारंवार हा चि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इच्छेचा ये दाता तूं एक समर्था । अगा कृपावंता मायबापा ॥ ध्रु० ॥ लाभाचिये वोढी उतावीळ[14] मन । त्यापरि चिंतन चरणाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥ ३ ॥

३७६२. आइका माझीं कवतुकउत्तरें । देउनी सादरें चित्त देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वोरसें आवडी आलों पायापासीं । होय तें[15] मनेसीं सुख कीजे ॥ ध्रु० ॥ तुमचें न भंगे सर्वोत्तमपण । करितां समाधान लेंकराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी बोलतों बोवडें । तरी वेंडें[16] कोडें कवतुक ॥ ३ ॥

३७६३. जन्मा आलियाचा लाभ । पद्मनाभदरुषणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाठीलागा येतो काळ । तूं कृपाळ[17] माउली ॥ ध्रु० ॥ कोण्या उपायें हें घडे । भव

---

१ दे. त. सेवे सेवक्ता.–२ त. ती.–३ पं. हे.–४ दे. पावे.–५ दे. त. देखेन डोळां.–
६ पं. आयुष्या.–७ त. पं. जाल्या तरे –८ दे. उतावेळ.–९ पं. अट्टाहास्ये.–१० पं. 'तुका ह्मणे०' व 'दुःखाच्या उत्तरीं०' याच्या जागा परस्परासीं बदलल्या आहेत –११ पं. तें –१२ पं. आतां.–
१३ पं. संसार.–१४ दे. उतावेळ.–१५ पं. मानसीं.–१६ पं. लाड कोडें. दे. वाडें कोडें.–१७ दे. कृपाळु.

आंगडें सुटकेचें ॥ २ ॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं जननी । ये निर्वाणी विठ्ठले ॥ ४ ॥

३७६४. नाहीं गुणदोष लिपों देत अंगीं । झाडितां प्रसंगीं वरावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निकटवासिया आळवितों धांवा । तेथूनियां देवा सोडवूनी ॥ छ्रु ॥ उमटे अंतरीं तें करूं प्रगट । कळोनी बोभाट धांव घालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तरि वांचलों या काळें । समर्थाचे बळें सुखी असों ॥ ३ ॥

३७६५. आतां येणें पडिपाडें । रस सेवूं हा निवाडें । भ्रुंगी नेली गोडें । ठेविलिये अडचणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडीं केशवा । विषयबुद्धि हेवा । वोस पडो सकळ ॥ छ्रु ॥ भुकेलिया श्वाना । गांठ पडे सवें अन्ना । भुंकों पाहे प्राणा । परि तोंडिंची न सोडी ॥ २ ॥ काय जिंकियेलें मन । जीवित्व कामातुरा तृण । मागे विभिचारिण । भक्ती तुका ये जाती ॥ ३ ॥

३७६६. न पवीजे तया ठाया । आलों कायाक्लेशेसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझें आणीं मना । नारायणा ओजेचें ॥ छ्रु ॥ बहु रिणें पिडिलों फार । परिहार करावा ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्बळशक्ति । काकुलती म्हुण येतों ॥ ३ ॥

३७६७. बहु फिरलों ठायाठाव । कोठें भाव पुरे चि ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समाधान तों पावलों । उरलों बोलों यावरि ॥ छ्रु ॥ घें गा देवा आशीर्वाद । आसुच्या नांद भाग्यानें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेवूं आधीं । खवखव मधीं सारावी ॥ ३ ॥

३७६८. कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तातडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ॥ छ्रु ॥ नांवासाटीं नेघें भार । न लगे फार वित्पत्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे जावें । कोठें देवें सुचनें ॥ ३ ॥

३७६९. इंद्रियाचें पुरे कोड । तें चि गोड पुढती ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जावें ह्मणती पंढरपुरा । हा चि बरा संसार ॥ छ्रु ॥ बैसलें तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे देती कान । वाणावाण निवडूनी ॥ ३ ॥

३७७०. आतां देवा मोकळिलें । तुह्मी भलें दिसेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां नाहीं जीवभाव । उरला ठाव वेगळा ॥ छ्रु ॥ सांभाळुन घ्यावें देवा । आपणासवा यावरि ॥ २ ॥ तुका ह्मणे नग्न भाज । तरि ते लाज स्वामीसी ॥ ३ ॥

१ पं. आळविता.–२ दे. स्नाना. पं. स्तना.–३ पं. भुके.–४ पं. अविभिचारिण.–५ पं. कायाक्लेशेचि.–६ पं. घेईंगा०.–७ पं. सुचेना. दे. सुचनें.

३७७१. आशाबद्ध आह्मी भाकितसों कींव । तत्पर हा जीव कार्यापाशीं ॥१॥ ॥ ध्रु. ॥ प्रतिउत्तराची पाहातसें वाट । करुनि बोभाट महाद्वारीं ॥ ध्रु ॥ आपुल्या उचितें करूनियां ठेवीं । संबंध गोसावी तोडोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे एक जालिया निवाड । कोण वडबड करी मग ॥ ३ ॥

३७७२. खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग । साक्षी तंव जग उभयतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपल्या आपण नाहीं शोभों[१] येत । चार करी स्फीत दाखवूनि ॥ ध्रु ॥ खाणार ताकाचें असे[२] तें माजीरें । आपणें चि अधीर कळों येतें ॥ २ ॥ तुका ह्मणे जळो मैंदाची सवाळी । दावूनियां नळी कापी सुखें ॥ ३ ॥

३७७३. नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं । जिव्हाळ्याची वरी ओल ठायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलिया हिता मानिसी कारण । सत्या नारायण साह्य[३] असो ॥ ध्रु ॥ निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥२॥ तुका ह्मणे नेम न टळतां[४] बरें । खऱ्यासी चि खरें ऐसें[५] नांव ॥ ३ ॥

३७७४. आलों उल्लंघुनि दुःखाचे पर्वत । पायांपाशीं हित तुमच्या तरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न[६] देखेल लासा दुःखी होतें मन । कठिणें[७] कठिण वाटतसे ॥ ध्रु ॥ नव्हे सांडी परि वाटतें निरास । न ये माझा दिस संकल्पाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं सदैव जी देवा । माझ्या हा चि जीवा एक ठाव ॥ ३ ॥

३७७५. किती सोसिती करंटीं । नेणों संसाराची आटी । सर्वकाळ पोटीं । चिंतेची हळहळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम । उफराटा भ्रम । गोवी विषय माजिरा ॥ ध्रु ॥ कळतां न कळे । उघडे झाकियेले डोळे । भरलें त्याचे च ळे । अंगीं वारें मायेचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जन । ऐसें नांवबुद्धिहीन । बहुरंगें भिन्न । एकीं एक निर्मालें[८] ॥ ३ ॥

३७७६. मंगळाचा मंगळ सांटा । विट तोटा नेणे तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें भरा सातें आलें । भलें भलें ह्मणवावें ॥ ध्रु ॥ जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥ ३ ॥

३७७७. नामाचा महिमा बोलिलों[९] उत्कर्ष । अंगा कांहीं रसें[१०] न ये चि तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कैसें समाधान राहे पांडुरंगा । न लगे चि अंगा आणी कांहीं ॥ ध्रु ॥ लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचें तें फिकें वेवसावें[११] ॥२॥ तुका ह्मणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरि माझ्या ॥ ३ ॥

---

१ पं शोभे –२ दे. आसातें. त. असा तं.–३ दे. त. साहे –४ पं. टळना –५ पं. असे नाम । –६ पं. न देखेचि लासा.–७ दे. कठिणें कठिणे –८ दे. निमलें – पं. निर्मिलें –९ पं. बोलतों –१० पं. रस.– ११ त. व्येवसाव. पं. व्यवसाव.

३७७८. हें चि वारंवार । पडताळुनी उत्तर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करितों पायांसी विनंती । लुपेक्षावें कमळापती ॥ छ ॥ गंगोदकें गंगे । अर्घ्य द्यावें पांडुरंगे ॥ २ ॥ जोडोनियां हात । करी तुका प्रणिपात ॥ ३ ॥

३७७९. अवचित या तुमच्या पायां । देवराया पावलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरवें जालें देशाउर । आल्या दुर सारिखें ॥ छ ॥ राहोनियां जातों ठाया । आलियाची निशाणी[3] ॥ २ ॥ तुका ह्मणे चरणसेवा । जोडी हेवा लाधली ॥ ३ ॥

३७८०. आतां पाविजेल घरा । या दातारा संगती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पायावरि ठेवूं[4] माथा । सर्वथा हा लुपेक्षी ॥ छ ॥ येथून तेथवरि आतां । नाहीं सत्ता आणिकांची ॥ २ ॥ तुका ह्मणे चक्रपाणी । शिरोमणी वळियांचा ॥ ३ ॥

३७८१. बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अभयें च जावें ठाया । देवराया प्रतापें ॥ छ ॥ साधनाचा न लगे पांग । अवघें सांग कीर्तन ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ॥ ३ ॥

३७८२. मागें पुढें नाहीं । दुजें यावेगळें कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं उरलें आणीक । केला झाडा सकळिक ॥ छ ॥ विश्वासावांचून । नांवें दुजियाचें शून्य ॥ २ ॥ देवाविणें कांहीं । तुका ह्मणे उरी नाहीं ॥ ३ ॥

३७८३. वैराग्याचा अंगीं जालासे संचार । इच्छीं वनांतर सेवावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां जी यांचें करूं नये समाधान । वियोगानें मन सिणतसे ॥ छ ॥ नये चि न्यावया पंढरीचें मूळ । न देवे चि माळ कंठींची ही ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें अप्रीतीचें जिणें । लाजिर हें वाणें सेवा करी ॥ ३ ॥

३७८४. आळिकरा कोठें साहातें कठिण । आपुला तें[10] प्राण देऊं पाहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांभाळावें मायबापें कृपादृष्टी । पीडितां तों[11] दृष्टी देखों नये ॥ छ ॥ अंतरलों मागें संवसारा हातीं । पायांपें सरतीं जालों नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी विचारा जी देवा । ठेवाल तें ठेवा कोणे परी ॥ ३ ॥

३७८५. स्वप्नींचें हें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आजुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी ॥ छ ॥

---

१ पं. गंगोदक—२ पं. आर्घ्ये—३ दे. पं. निशानी—४ पं. ठेउनी.—५ पं. सत्ताधारी.—६ दे. देवाविण काहीं। बोलायाची उरी नाहीं। पं. तुका ह्मणे काहीं। बोलायाची उरी नाहीं ॥. देहूच्या पाठांत या अभंगांत 'तुका' असें नेहमींच्या शैलीप्रमाणें कोठें नाहीं.—७ पं. माझें.—८ त. दु:खी होतें.—९ दे. यावया.—१० पं. तो.—११ पं. ते.

डोलोनियां फेडा जीवींची काजळी । पाहेन कोमळीं चरणांबुजें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥ ३ ॥

३७८६. येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझा जीव घेउनियां बळी । वैसवावें कोळी संतांचिये ॥ ७१ ॥ विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडे चि बोल फोस वांझे ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों निर्वाणा च दरी । राहों नेदीं उरी नारायणा ॥ ३ ॥

३७८७. ह्मणउनि काय जीऊं[1] भक्तपणें[2] । जायाचीं भूषणें अळंकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुल्या कष्टाची करूनियां जोडी । मिरवीन उघडी इच्छावसें ॥ ७१ ॥ तुके तरि तुकीं खऱ्याचे उत्तम । मुलाम्याचा श्रम कोठवरि ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढें आणि मागें[3] फांस । पावें ऐसा नास न करीं देवा ॥ ३ ॥

३७८८. आपण चि व्हाल साहे । कैंसियाला[4] हे धांवणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाकिली ते उरली कींव । आहे जीव जीवपणें ॥ ७१ ॥ आहाच कैंचा बीजा मोड । प्रीति कोड वांचूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे दंडिन काया । याल तया धांवणिया ॥ ३ ॥

३७८९. निश्चितीनें होतों करुनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनंत उठती चित्ताचे तरंग । करावा हा त्याग वाटतसे ॥ ७१ ॥ कोण तुह्मांविण मनाचा चाळक । दुजें सांगा एक नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा मांडिला विनोद । करऊं नेणें छंद कराल काइ ॥ ३ ॥

३७९०. आश्वासावे[5] दास । तरी घडे[6] तो विश्वास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं चुकत चाकरी । फुटे[7] लाडस्याचे थोरी ॥ ७१ ॥ स्वामीच्या उत्तरें । सुख वाटे अभयें[8] करें ॥ २ ॥ न मगें परि भातें । तुका ह्मणे निढळ[9] वाटे ॥ ३ ॥

३७९१. जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज नेंको[10] लावूं तैसें । वांयां जायें ऐसें पिसें ॥ ७१ ॥ धरितोसी[11] सत्ता । होसी सकळ जाणता ॥ २ ॥ चतुराच्या राया । अंगीकारावें[12] तुकया ॥ ३ ॥

---

१ त. जेऊं दे. 'जीऊ' असतां 'जेऊ' केलें आहे.—२ दे. भक्तपण.—३ पं. 'मागें' हा शब्द नाहीं.—४ दे. मुळात दिला आहे असा पाठ होता तोच चागला आहे. परंतु पुढें कोणीं त. प्रतीवरून 'करीयला हें निर्वाणी' असा केला आहे. पं. कार्य आहे निर्वाणीचें—५ 'आश्वासावे०' हा अभग त. दुवार (अ ३८०३ व ३९९२ हे पाहा) आहे व दे. ही दुवार (भा. २, अ. ७२६ व ९३७ पाहा) आहे. त्यांत दुसऱ्या ठिकाणीं ह्मणजे ३९९२ व ९३७ यांत 'आश्वासा देवास' आहे.—६ दे. पहिल्या ठिकाणीं ह्मणजे ७२६ यांत 'घडे विश्वास' असें आहे.—७ दे. (७२६) पुट लाटे शोचे थोरी—८ त. (दोहीं ठिकाणीं) अभयकरें—९ दे. (९३७) निटछि रितें.—१० पं. लाऊं नको.—११ पं. धरितो मी—१२ पं. जागी करावे.

३७९२. राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सांपडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ल्व्हाळ्यासी कोठें बळ । करिल जळ आपुलें ॥ छ ॥ कठिणासी वळजोडा । नम्र[1] पीडा देखेना ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ॥ ३ ॥

३७९३. ह्मणउनि जाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दाखाविलें देवें वर्म । अवघा[2] श्रम नासला ॥ छ ॥ हातें मुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ॥ २ ॥ तुका ह्मणे एकांतसुखें । अवघें गोतें गुंतलें ॥ ३ ॥

३७९४. न पडो आतां हाडीं घात्र । मध्यें कींव नासक[3] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करविली आत्महत्या । जीवा कां[4] त्या द्वंदाच्या ॥ छ ॥ आशापाशीं गुंतला गळा । तेणें कळाहीन जालों ॥ २ ॥ तुका ह्मणे लावूं मुळी । जीवकुळी थारेसी[5] ॥ ३ ॥

३७९५. सामावे कारण । नाहीं सोसत धरणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लांदी[6] थींके लाजिरवाणी । हीनकमाईची धाणी[7] ॥ छ ॥ पुष्प[8] जवळी नाका । दुर्गंधीच्या नांवें थुंका[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । उपदेशहीन जाती ॥ ३ ॥

३७९६. असाल ते तुह्मी असा । आह्मी सहसा निवडों ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनुसरलों एका चित्तें । हातोंहातें गींवसीतें[10] ॥ छ ॥ गुणदोष काशासाटीं । तुमचे पोटीं वागवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजें आतां । कोठें चित्ता आतळों ॥ ३ ॥

३७९७. सोंवळा होऊं तों वोंवळें जडलें । सांडीमांडी बोलतोंडीं बीजीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकसरीं केलीं कळिवरें साटी । आतां नका तुटी पायांसवें ॥ छ ॥ संकल्पीं[11] विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मूळ मरणाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे हें[12] तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥ ३ ॥

३७९८. आहे[13] तैसा आतां आहें ठायीं बरा । ठेविलों[14] दातारा उचितें त्या ॥१॥ ॥ ध्रु. ॥ वचनाचा भार पडिलिया शिरीं । जालें मग भारी उतरेना ॥ छ ॥ अबोल्याची सवे लावुनियां मना । फोंकों नेदीं[15] गुणा ऐसें करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां गोंवळ्याचा संग । राखतें[16] तें अंग जाणतसों ॥ ३ ॥

३७९९. तूं माझा कोंवसा । परी न कळे या घसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कूट खाती मागें पुढें । जाती निरयगांवा[17] पुढें ॥ छ ॥ मर्ज[18] ह्मणताती कवी । निषेधुनि पापी जीवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । आतां कोण लेखी जगा ॥ ३ ॥

---

१ दे. त. नर्म –२ पं आवघ्या –३ पं. नाशक.–४ दे. का द्वयाचा. त. कां त्या द्वयाचा – ५ दे. त. थोरेसी –६ पं. लाही थीके.–७ त. धणी. पं. वाणी.–८ पं. पुष्पा –९ पं. थु – १० दे. गींवसित त. गींवसीत –११ संकल्प.–१२ पं. त. तू हे –१३ दे. आहे तैसा आता आहे०. त. आहे तैसा आतां आहें०.–१४ पं. ठेविले –१५ त. फाकू नेदू –१६ पं. राखावे –१७ दे. त. नरये०.–१८ दे. त. माझी ह्मणती कवी.

३८००. दर्पणासी बुजे । नेखटें तोंड पळवी लाजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गुण ज्याचे जो अंतरीं । तो चि त्यासी पीडा करी ॥ छ ॥ चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥ २ ॥ तुका ह्मणे जन । देवा असे भाग्यहीन ॥ ३ ॥

३८०१. ह्मणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा उतरील पार । भवदुस्तरनदीचा ॥ छ ॥ बहु आहे करुणावंत । अनंत हें नाम ज्या ॥ २ ॥ तुका ह्मणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥ ३ ॥

३८०२. ऐसीं वर्मे आह्मां असोनियां हातीं । कां होऊं नेणतीं दिशाभुली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोटाळुनी पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदीं ॥ छ ॥ आपुले इच्छेसी घालीन संपुष्टीं । श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु सांडियेलीं मतें । आपुल्या पुरतें धरुनी ठेलों ॥ ३ ॥

३८०३. रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । आव्हेरुनी दुरी अधिकारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातिस्वभाव आला डोळ्यां आड । तया घडे नाड न कळतां ॥ छ ॥ कामधेनु देखे जैशा गाईह्मैसी । आणिकांतें ऐसी करोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे काय बोलोनियां फार । जयाचा वेव्हार तया साजे ॥ ३ ॥

३८०४. तरी चे हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐकें एका शोभवावें । केलें कवतुक देवें ॥ छ ॥ काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ॥ २ ॥ तुका ह्मणे धुरें । डोळे भेरिले परि खरें ॥ ३ ॥

३८०५. अंधळें तें सांगे सांगितल्या खुणा । अनुभव देखणा प्रगट त्या ॥ १ ॥ नांदणुक सांगे वडिलाचें बळ । कैसा तो दुर्बळ सुख पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे नांदों आपल्या प्रतापें । तयासी लोकांपें स्तुती सांगों ॥ ३ ॥

३८०६. कैरी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण । तया देतां दान । नरका जाती उभयतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें जालें दोघांजणां । मागतिया यजमाना । जाळियेलें वनां । आपणासहित कांचणी ॥ छ ॥ घडितां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव । तरता नाहीं ठाव । बुडवी तारूं तरतीया ॥ २ ॥ चोरा दिधला सांटा । तेणें मारियेल्या वाटा । तुका ह्मणे तोटा । हें तंव दोघे नाडती ॥ ३ ॥

---

१ पं. नक्टें.—२ पं. 'च' नाहीं.—३ दे. येक येक. पं. येक येका.—४ पं. भरी.—५ पं. 'करी' नाहीं.—६ त. पं. नर्का.—७ पं. ताटा.

३८०७. जळो ते जाणींव जळो ते शाहाणींव । राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥१॥ ॥ ध्रु. ॥ जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ॥ ध्रु ॥ जळो हा लौकिक जळो दंभमान । लागो जीवों ध्यान विठ्ठलाचें ॥ २ ॥ जळो हें शरीर जळो हा संबंध । राहो परमानंद [2]माझ्या कंठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें[3] अवघें चि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥ ४ ॥

३८०८. विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठेवूनियां चित्त तुझे पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरावें बुडावें तुझिया वचनें । निर्धार हा मनें केला [4]माझ्या ॥ ध्रु ॥ न कळे हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेइन देवा ॥ २ ॥ मागणें तें सरे ऐसें करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥ ३ ॥ [5]करावें कांहीं कीं पाहावें उगलें । तुका ह्मणे बोलें पांडुरंगा ॥ ४ ॥

३८०९. कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥१॥ ॥ ध्रु. ॥ बुझविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ ध्रु ॥ तैसें [6]नको करूं [7]मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापाचें उचित । करावें हें हित बाळकाचें ॥ ३ ॥

३८१०. देवाचिये पायीं देईं मना बुडी । नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व सुखें तेथें होती एकवेळे । न सरती काळें कल्पांतीं ही ॥ ध्रु ॥ जाणें येणें खुंटे धांवे[8] येरजार । न लगे डोंगर उसंतावे ॥ २ ॥ [9]सांगणें तें तुज इतुलें चि आतां । [10]मानीं धन कांता विषतुल्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे होती उपकार । उतरों हा पार भवसिंधु ॥ ४ ॥

३८११. आह्मी विठ्ठलाचे दास जालों आतां । न चले हे सत्ता आणिकांची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [11]नांवरे तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ॥ ध्रु ॥ कोठें तुज ठाव घ्यावयासी धांवा । मना तूं विसावा घेईं आतां ॥ २ ॥ इंद्रियांची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार [12]चाली तुज ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ॥ ४ ॥

३८१२. [13]सांगतों तरि तुह्मी भजा रे विठ्ठला । नाहीं तरि गेला जन्म वांयां ॥ १ ॥ करितां भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरीं वाहावसी ॥ २ ॥ कांहीं न लगे एक भाव चि कारण । तुका ह्मणे आण विठ्ठलाची ॥ ३ ॥

---

१ पं. मना. दे. जीव.–२ दे. त. माझा.–३ पं. तेथें.–४ दे. माझा.–५ पं. करावे ते काही की०.–६ पं. करूं नको.–७ पं. स्व.–८ पं. धाव येरझार.–९ दे. सांगन.–१० दे. त. पं. मानी.–११ त. न वारे.–१२ दे. चाळी.–१३ पं. सांगतों तुह्मांसी भजा०.

३८१३. [1]शब्दज्ञानी येऊं नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥ १ ॥ जळो ते जाणींव जळो त्याचे दंभ । जळो त्याचें तोंड दुर्जनाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती दाटूनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥ ३ ॥

३८१४. [2]अन्यायासी राजा [3]जरि न करी दंड । [4]बहु च ते लंड पीडिती जना ॥ १ ॥ [5]न करी निगा कुणबी न काढितां तण । [6]कैंचे येती कण हातासी ते ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां करूं नये [7]अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां ॥ ३ ॥

३८१५. भले लोक नाहीं सांडीत ओळखी । हे तों झाली देखी दुसऱ्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ असो आतां यासी काय चाले बळ । आपुलें कपाळ वोडवलें ॥ ध्रु ॥ समर्थासी काय कोणें हें ह्मणावें । आपुलिया जावें भोगावरि ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां बोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥ ३ ॥

३८१६. [8]मुर्के होतां तुझ्या पदरीचें जातें । [9]काय तें भोगितें मीमीपण ॥ १ ॥ आपुलिये घरीं [10]मैंद होउनी वसे[9] । कवण कवणासी बोलों नका ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां सांगतों मी खुण । देवासी तें ध्यान लावुनि वैसा ॥ ३ ॥

३८१७. आषाढी निकट । [11]आणी कार्तिकीचा हाट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरे दोन्ही च बाजार । न लगे आणीक व्यापार ॥ ध्रु ॥ तें चि [12]ध्यावें तें चि घ्यावें । कैवल्याच्या रासी भावें ॥ २ ॥ कांहीं कोणा नेणे । विठो वांचूनि तुका ह्मणे ॥ ३ ॥

३८१८. देऊनियां प्रेम मागितलें चित्त । जाली फिटाफिट तुह्मां आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काशानें उदार तुह्मांसी ह्मणावें । एक नेसी [13]भावें एक देसी ॥ ध्रु ॥ देऊनियां थोडें नेसील हें[14] फार । कुंटिसी विचार अवघियांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां भांडवल चित्तें[15] । देउनी दुश्चित पाडियेलें ॥ ३ ॥

३८१९. तातडीची धांव अंगा आणि भाव । खोळंबा तो [16]वोर्व निश्चयाचा[17] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि बरी विचारावी चाली । [18]उरीचि ते बोली कामा येते ॥ ध्रु ॥ कोरडें वैराग्य माजिरा वडिवार । उतरे तो शूर अंगींचें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरी झऱ्याची ते चाली । सांचवण्या [19]खोली कैसीयांची ॥ ३ ॥

---

१ पं. शब्द ज्ञणी.–२ हा अभग दे. भा. २ ( ७५८ व १०६६ ), त. ( ३८२७ व ४०९५ ) असा दुवार आहे. दे. पहिल्या ठिकाणीं आनयासें. त. पहिल्या ठिकाणीं आनयासे. दे. व त. ( दुसऱ्या ठिकाणीं ) अन्यायासी.–३ दे. व त. ( दुसऱ्या ) न करिता दड ।.–४ दे. वहुचक ते लंड. त. वहुचक लंड.–५ दे. त. ( दुसऱ्या ठिकाणीं ) न करिता –६ दे. त. ( दुसऱ्या ठिकाणीं ) अनूत.–७ पं. काय. ८ पं. मूर्ख. दे. पूर्वी मूर्ख असा पाठ होता.–९ पं. वैसे –१० पं. वैसा.–११ पं. आला – १२ पं. घ्यावें० यावें ।.–१३ पं. भाव.–१४ पं. वो –१५ पं. उचित.–१६ दे. मन – १७ पं. निश्चितीचा.–१८ पं. उरली –१९ पं. चाली.

३८२०. मी तों बहु सुखी आनंदभरिता । आहें साधुसंतां मेळीं सदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं[1] व्हावें ऐसें नाहीं माझ्या जिवा । आणीक केशवा तुजविण ॥ ध्रु ॥ न लगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसें ॥ २ ॥ मृत्युलोकीं कोण धरिलें[2] वासना । पावावया जनासवें दुःख ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझा दास ऐसें लोकां । कांहीं सकळिकां कळों यावें ॥ ४ ॥

३८२१. घ्या रे लुटी प्रेम सुख । फेडा आजि धणी । चुकला तो मुकला । जाली वेरझार ह्मणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घाला घातला वैकुंठीं । करूनियां जीवें साटी । पुरविली पाठी । वैष्णवीं कौळाची[3] ॥ ध्रु ॥ अवघें आणिलें अंबर । विठोसहित तेथें धुर । भेदूनि जिव्हार । नामबाणीं धरियेला ॥ २ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघीं जालीं गहन । केलीं पापपुण्यें । देशधडी बापुडीं ॥ ३ ॥ आनंदें गर्जती निर्भर । घोष करिती निरंतर । कांपती असुर । वीर कवणा नांगवती ॥ ४ ॥ जें दुर्लभ ब्रह्मादिकां । आजि सांपडलें फुका । घ्या रे ह्मणे तुका । सावचित्त होउनी ॥ ५ ॥

३८२२. तुझिया दासांचा हीनें[4] जालों दास । न धरीं उदास मायबापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजविण प्राण कैसा राहों पाहे । वियोग न साहे क्षणभरि ॥ ध्रु ॥ आणिक माझ्या जीवें मोकलिली आस । पाहे तुझी वास पांडुरंगा ॥ २ ॥ सर्वभावें तुज आणिला उचित । राहिलों निश्चिंतें[5] तुझे पायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज असो माझा भार । बोलतों मी फार काय जाणें ॥ ४ ॥

३८२३. ते चि करीं मात । जेणें होइल तुझें हित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय वडवड अमित[6] । सुख जिव्हारीं सिणविसी ॥ ध्रु ॥ जो मुळव्याधी पीडिला । त्यासी देखोन हांसे खरजुला ॥ २ ॥ आरथकरी[7]* सोसी । त्यासि हांसे तो आळसी ॥ ३ ॥ क्षयरोगी ह्मणे परता । सर रोगिया तूं[8] आतां ॥ ४ ॥ वडस दोहीं डोळां वाढले । आणिकां[9] कानें कोंचें ह्मणे ॥ ५ ॥ तुका[10] ह्मणे लागों पायां । शुद्ध करा आपणियां ॥ ६ ॥

३८२४. कळों आला भाव माझा मज देवा । वांयांविण जीवा आटविलें[11] ॥ १ ॥ जोडूनि अक्षरें केलीं तोंडपिटी । न लगे शेवटीं हातीं कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे गेले दोन्ही ठाय । संसारें[12] ना पाय तुझे मज ॥ ३ ॥

---

१ दे. देवा कांहीं०.–२ दे. धरिले–३ पं. काळीचि.–४ त. हीण. पं. नाहीं.–५ पं. त. निश्चीत–६ दे. आमित्य. त. आमित्ये. पं. निमित्य.–७ पं. आराथकरी दे. 'आराथकरी' याच 'आरथकरी' केलें आहे–८ पं. कुष्टता.–९ पं. "आणीकाचे कोचे चोले" यांतील 'चोले' हे यमकास जुळतें खरें, परतु तें दे. व त. यांत आढळत नाहीं.–१० पं. तुका लागे पाया ।.–११ दे. त. आठविलें पं. आटी केली.–१२ दे. सवसार.

* आरथकरी = आर्तकरी ?

३८२५. आतां तरी मज सांगा साच भावें[1] । काय म्यां करावें ऐसें देवा ॥ १ ॥ चुकावया कर्म नव्हतें कारण । केला होय सीण अवघा चि ॥ २ ॥ तुका[2] ह्मणे नको[3] पाहूं निरवाण । देईं कृपादान याचकासी ॥ ३ ॥

३८२६. बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आह्मी[4] अविश्वासी सर्वभावें ॥ १ ॥ दंभें करी भक्ती सोंग दावी जना । अंतरीं भावना वेगळिया ॥ २ ॥ तुका[5] ह्मणे देवा तूं काय करिसी । कर्मा[6] दुस्तरासी आमुचिया ॥ ३ ॥

३८२७. नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळ[7] ही हेम ॥ ध्रु ॥ पर्जन्य[8] वर्षतां जीवना वाहावट । तें समसकट गंगे मिळे ॥ २ ॥ सर्व तें हें जाय गंगा चि होऊन । तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥ ३ ॥ महांपुरीं जैसें[9] जातसे उदक । मध्यें तें तारक नाव जैसी ॥ ४ ॥ तये नावेसंगें ब्राह्मण तरती । केवीं ते बुडती अनामिक ॥ ५ ॥ नाना काष्ठजात पडतां हुताशनीं । ते जात होउनी एकरूप ॥ ६ ॥ तेथें निवडेना घुरे कीं चंदन । तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ७ ॥ पूर्वानुवेळख तें चि पैं मरण । जरि पावे जीवन नामामृत[10] ॥ ८ ॥ नामामृतें जालें मुळीचें स्मरण । सहज साधन तुका ह्मणे ॥ ९ ॥

३८२८. काय वांचोनियां जालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जातां भलें काय डोळियांचें कर्म । जरि पुरुषोत्तम न देखती ॥ ध्रु ॥ काय मुख बिळ श्वापदाचें धांमें[11] । नित्य तुझें नांमें[12] नुच्चारितां ॥ २ ॥ तुका ह्मणे पैं[13] या पांडुरंगाविण । न वचे चि क्षण जीव भला ॥ ३ ॥

३८२९. सोई[14]यासी करी पाहुणेर वरा । कांडितो ठोंबरा संतांलोगीं[15] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गाईसी[16] देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ ध्रु ॥ पान[17] फुल नेतो वेश्येसी उदंड । ब्राह्मणासी खांड देऊं नेदी ॥ २ ॥ पर्वकाळीं धर्म न करी नैसरी[18] । वेची राजद्वारीं उदंड[19] चि ॥ ३ ॥ कीर्त्तनीं[20] जावया होतसे

---

१ दे. त. भाव.–२ पं. या कडव्याच्या पूर्वी ' कळे ह्मणऊन करीतसें वाद । दिसे भेदाभेद अंतरांचा ॥ ' हें कडवें आहे.–३ दे. नको पानिखाण. त. देवा नको पाणी खाण. या दोन्ही पाठांत अर्थ दिसत नसून हे लेखकप्रमादानें होण्याचा फारच संभव दिसतो–४ दे. आह्मां नष्टांसि.–५ पं. याच्यापूर्वी ' चित्ता तू रे साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आता पुढें ॥ ' हें कडवें आहे.–६ दे. कर्म दुष्ट रासि०. पं. कर्म दुस्तराशी.–७ पं. ' ही ' नाहीं.–८ दे. त. प्रजन्य.–९ पं. जैसेंतैसें.–१० पं. नामामृतें.–११ दे. त. धांव –१२ दे. त. नांव –१३ पं. आतां पांडु० –१४ पं. सोयऱ्यासी.–१५ दे. संता साटीं.–१६ पं. गाई देखोनियां.–१७ पं. पान फुल वेश्येसी नेतसे उदंड । देखों नेदी खांड ब्राह्मणासी ॥.–१८ दे. कवडी.–१९ पं. द्रव्यराशी ।.–२० पं. पुराणीं बैसावया नाहीं रिकामटी ।.

हींपुष्टी । खेळतो सोंकटीं रात्रंदिवस ॥ ४ ॥ वाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितियासी दवडितो ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ६ ॥

३८३०. कां हो पांडुरंगा न करा धांवणें । तरि मज कोणें सोडवावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझा ह्मणऊनि आणिकापें उभा । राहों हें तों शोभा नेदी आतां ॥ छ ॥ काळें पुरविली पाठी दुरवरी । पुढें पायां धीरी राहों नेदी ॥ २ ॥ नको आणूं माझें संचित मनासी । पावन आहेसी पतितां तूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चाले आणिकांची सत्ता । तुज आळवितां नवल हें ॥ ४ ॥

३८३१. कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणे ॥ छ ॥ बकापुढें सांगे भावार्थवचन । वाउगा चि सीण होय त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे अभाविक जन । त्यांसी वांयां सीण करूं नये ॥ ३ ॥

३८३२. आतां धरितों पदरीं । तुज मज करीन सरी ॥ १ ॥ जालों जीवासी उदार । उभा ठाकलों समोर ॥ २ ॥ तुका विनवीतसे संतां । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥ ३ ॥

३८३३. न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धुंडाळितां ॥ १ ॥ न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा वेदां पार ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा नाहीं अंतपार । ह्मणोनि विचार पडिला मज ॥ ३ ॥

३८३४. पायां लावुनियां दोरी । भृंग बांधिला लेंकुरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा पावसी बंधन । मग सोडवील कोण ॥ छ ॥ गळां बांधोनियां दोरी । वांनर हिंडवी घरोघरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहें । रीस धांपा देत आहे ॥ ३ ॥

३८३५. मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥ छ ॥ मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥ ३ ॥

३८३६. धन मेळवूनि कोटी । सवें नये रे लंगोटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पानें खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंडें ॥ छ ॥ पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगाती ॥ २ ॥ तुका ह्मणे राम । एक विसरतां श्रम ॥ ३ ॥

---

१ पं. दुरवर । पुढें पाय स्थिर राहों०.–२ पं. पतित तूं.–३ पं. आठविता.–४ दे. त. सोंग – ५ दे. भावार्थे वचन ।.–६ दे. या अभंगांत सर्वत्र 'कळसी' याच्याबद्दल 'कळेसि' असें आहे.– ७ पं. पान.–८ पं. तोंड.

३८३७. विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसी दातारा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें । आतां नव्हे भलें मोकलितां ॥ छ ॥ माझे गुणदोष कोण जाणे मात । पावनपतित नाम तुझें ॥ २ ॥ लोभ मोह माया आह्मां बांधवितां । तरि हा अनंता बोल कोणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों पतित चि खरा । परि आलों दातारा शरण तुज ॥ ४ ॥

३८३८. आहे आहे आहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक चि मागणें देईं तुझी गोडी । न लगे आवडी आणिकाची ॥ छ ॥ तुझें[2] नाम गुण वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगीं ॥ २ ॥ बापा विठ्ठलराया हें चि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ॥ ३ ॥ आवडीसारिखें मागितलें जरी । तुका ह्मणे करीं समाधान ॥ ४ ॥

३८३९. सुगरणीबाई थिता नास केला । गुळ तो घातला भाजीमध्यें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ । थितें चि वोंगळ कैसें[3] केलें ॥ छ ॥ दळण दळोनी भरूं गेली पाळी । भरडोनि वोंगळी नास केला ॥ २ ॥ कापुराचे सांते आणिला लसण । वागवितां सीण दुःख होय ॥ ३ ॥ रत्नाचा जोहारी रत्न चि पारखी । येर देखोदेखीं हातीं घेती ॥ ४ ॥ तुका ह्मणे जरी योग घडे निका । न घडतां थुंका तोंडावरी ॥ ५ ॥

३८४०. बाप माझा दिनानाथ । वाट भक्तांची पाहात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर ठेवुनियां कटीं । उभा चंद्रभागे तटीं ॥ छ ॥ गळां वैजयंतीमाळा । रूपें डोळस सांवळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥ ३ ॥

३८४१. माझें जीवन तुझे पाय । कृपाळु तूं माझी माय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेदीं दिसों किविलवाणें । पांडुरंगा तुझें तान्हें ॥ छ ॥ जन्ममरण तुजसाटीं । आणीक नेणें दुजी गोष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजविण । कोण हरिल माझा सीण ॥ ३ ॥

३८४२. कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ॥ छ ॥ युगें जालीं अठावीस । अजुनी न ह्मणसी बैस ॥ २ ॥ भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । तूं[11] चि वळिया एक निका ॥ ४ ॥

---

१ पं. ल्वीं.–२ पं. गुण नाम.–३ पं. नाश केला.–४ पं याच्या पूर्वी 'हीरयाच्या पेटे आणिल्या गारा । खांदीं शिरीं भारा व्यर्थ वाहे ॥' हे कडवें आहे.–५ पं. भरियेली–६ त. देखोदेखीं.–७ दे. करीं.–८ दे. तिरीं.–९ पं. प्रेमें.–१० त. हें सर्व कडवें नाहीं–११ पं. तूं चि भक्त वळिया निका

३८४३. तुज पाहातां समोरी । दृष्टि न फिरे माघारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥ छ ॥ नव्हे [1]सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । जीव दिला पायांतळीं ॥ ३ ॥

३८४४. उपदेश किती करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शुद्ध [2]कां वासना नव्हे चांडाळाची । होळी संचिताची केली तेणें ॥ छ ॥ नाहीं भाव मनीं नाइके वचन । आपला आपण [3]उणें घेतो ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी काय व्याली रांड । [4]करी बडबड रिती [5]दिले ॥ ३ ॥

३८४५. समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण [6]आल्याची लागे चिंता ॥१॥ ॥ ध्रु. ॥ न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचें ॥ छ ॥ मान भलेपण नाहीं फुकासाटीं । [7]जयावरि गांठी झीज साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे हें तूं सर्व ही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥ ३ ॥

३८४६. आनंदें कीर्तन कथा करीं घोष । आवडीचा रस प्रेमसुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज या आवडे वैष्णवांचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळा ॥ छ ॥ स्वल्प [8]मंत्र वाचे बैसलासे निका । राम कृष्ण सखा नारायण ॥ २ ॥ [9]विचारितां दुजें वाटे मज लाज । उपदेशें काज आणीक नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त रंगलेंसे ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ४ ॥

३८४७. ब्रह्मज्ञान जेथें आहे घरोघरीं । सर्व निरंतरी चतुर्भुज ॥ १ ॥ पापा नाहीं रीग काळाचें खंडण । हरिनामकीर्तन परोपरी ॥ २ ॥ तुका ह्मणे हा चि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिका गती चाड मज ॥ ३ ॥

३८४८. मज नाहीं कोठें उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडीं ही[10] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [11]कासया जिकीर करणें येविसीं । [12]भयाची मानसीं चिंता खंती ॥ छ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । संत नेती चाली आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें [13]पाळण पोषण । करी नारायण सर्वस्वेंसी ॥ ३ ॥

३८४९. नाहीं हित ठावें जननीजनका । दाविले लौकिकाचार तींहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंधळ्याचे काठी [14]लागले आंधळे । घात एकवेळे मागेंपुढें ॥ छ ॥

---

१ दे. सरितां.—२ पं. 'कां' नाहीं—३ पं. आपुल्या.—४ पं. नाडियेलें।.—५ पं. करितो बडबड रात्र दिवस।.—६ पं. आली त्याची.—७ पं. जवत्री—८ दे. त. मात्र.—९ दे. विचारिता मज दुजें वाटे लाज.—१० दे. त. हें—११ पं. कासया जिकर करणें०.—१२ पं. भयचि.—१३ दे. त. पाळणें पोषणें.—१४ दे. अधळे लागलें.

न ठेवावी चाली करावा विचार । वरील आहार गळीं लावी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला निवाडा रोकडा । राऊत हा घोडा हातोहातीं ॥ ३ ॥

३८५०. आतां पहाशील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं अंगीकार राखें पायांपाशीं । झणीं दिसों देसी कींविलवाणें ॥ ध्रु ॥ नाहीं आइकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥ ३ ॥

३८५१. होईल तो भोग भोगीन आपुला । न घलीं विठ्ठला भार तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मांपासाव हें इच्छीतसें दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम ॥ ध्रु ॥ नये काकुलती गर्भवासांसाटीं । न धरीं हें पोटीं भय कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज उदंड एवढें । न वांचावें पुढें मायबापा ॥ ३ ॥

३८५२. माझा तों स्वभाव आहे अनावर । तुज देतां भार कांहीं नव्हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृती हि स्वप्ना ताळ नाहीं ॥ ध्रु ॥ संपादिला तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्या नाहीं पोंठी पोट । असोनि निघोट काय जाती ॥ ३ ॥

३८५३. काय तुझी ऐसी वेचते गांठोळी । माझी टाळाटाळी करीतसां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चतुराच्या राया आहो पांडुरंगा । ऐसें तरि सांगा निवडूनि ॥ ध्रु ॥ कोण तुह्मां सुख असे या कवतुकें । भोगितां अनेकें दुःखें आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालासी निर्गुण । आह्मां येथें कोण सोडवील ॥ ३ ॥

३८५४. देवाची पूजा हे भूताचें पाळण । मत्सर तो सीण वहुतांचा ॥ १ ॥ रुसावें फुगावें आपुलियावरि । उरला तो हरि सकळ ही ॥ २ ॥ तुका ह्मणे संतपण यां चि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ ३ ॥

३८५५. नाहीं जप तप जीवांची आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निजलिया ठायीं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा निवारावें ॥ ध्रु ॥ नाहीं आणूनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं वेचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साच भावें ॥ ३ ॥

३८५६. देह तंव आहे प्रारब्धा अधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥ ध्रु ॥

१ पं. काय —२ पं. पाट.—३ पं. असे तें नीघोट एकजाती.- ४ दे. त. माहे.—५ त. नेणें.— ६ पं. जीवासी.—७ पं. तुज माझा। . दे. तुझें मज.—८ दे. त. देह तंव. पं. देह तव असे. हाच अभंग दे. (भा. २ अ ८०२—१३४६ पाहा) व त. (अ ३८६९—४३१३ पाहा) या दोन्ही प्रतींत दुबार आहे तेथें दोन्ही ठिकाणी 'देह तंव' असाच पाठ आहे व हाच चांगला आहे

लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणीक दातारा येणें जन्में ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा ॥ ३ ॥

३८५७. सकळ तुझे पायीं मानिला विश्वास । न करीं उदास आतां मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जीवीं[1] गातां गोड आइकतां कानीं । पाहातां लोचनीं मूर्ती तुझी ॥ ध्रु ॥ मन स्थिर माझें जालेंसे निश्चळ । वारिलीं सकळ आशापाश ॥ २ ॥ जन्मजराव्याधि निवारिलें दुःख । वोसंडलें सुख प्रेमें धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज जाला हा निर्धार । आतां वांयां फार काय बोलों ॥ ४ ॥

३८५८. नैये माझा तुह्मां होऊं शब्दस्पर्श । विप्रवृंदा तुह्मां ब्राह्मणांसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनियां तुह्मां करितों विनंती । द्यावें शेषें हातीं उरलें तें ॥ ध्रु ॥ वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित । करावी ते नीत विचारूनि ॥ २ ॥ तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका ह्मणे ॥ ३ ॥

३८५९. बहुत असती मागें सुखी केलीं । अनाथा माउली जिवांची तूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझिया संकटा न धरीं आळस । लावुनियां कास पार पावीं ॥ ध्रु ॥ कृपावंता करा ज्याचा अंगीकार । तया संवसार नाहीं पुन्हां ॥ २ ॥ विचारितां नाहीं दुजा बळिवंत । ऐसा सर्वगत व्यापी कोणी ॥ ३ ॥ ह्मणउनि दिला मुळीं जीवभाव । देह केला वाव समाधिस्थ ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं जाणत आणीक । तुजविण एक पांडुरंगा ॥ ५ ॥

३८६०. वैभवाचे धनी सकळ शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥ ध्रु ॥ जाणोनि नेणती अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणे चि ॥ २ ॥ तुका ह्मणे वरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥ ३ ॥

३८६१. आह्मां देणें धरा सांगतों तें कानीं । चिंता पाय मनीं विठोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें माझें चित्त होय समाधान । विलास मिष्टान्न न लगे सोनें ॥ ध्रु ॥ व्रत एकादशी दारीं वृंदावन । कंठीं ल्या रे लेणें तुळसीमाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचे घरींची उष्टावळी । मज ते दिवाळी दसरा सण ॥ ३ ॥

३८६२. आतां मी अनन्य येथें[9] अधिकारी । होईन कोणे परी नेणें देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुराणींचा अर्थ ऐकतां मानस । होतो कासावीस जीव माझा ॥ ध्रु ॥ इंद्रियांचे आह्मी पांगिलों अंकित । त्यांच्या संगें चित्त रंगलें तें ॥ २ ॥ एकाचें ही

---

१ पं. वाचे.—२ पं. प्रेम धणी—३ दे. यांत अक्षरावर अंक घालून 'होऊं शब्दस्पर्श नये माझा तुह्मां' असे केलें आहे—४ त. विप्र तुह्मी वृंदा ब्राह्मणासी. पं. विप्र तुह्मी विद्वांस ब्राह्मणासी —५ दे. उरा.—६ पं. हें कडवें नाहीं.—७ त. आपणाचिये.—८ पं माझ्या चित्ता.—९ पं. त. नव्हे.—१० पं. होईल

जेथें[1] न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी मोकलिसी आतां । तरी मी अनंता वांयां गेलों ॥ ४ ॥

३८६३. आवडी धरोनी आलेती आकारा । केला हा पसारा याजसाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें मी तुझें नाम गाईन आवडी । क्षण एक घडी विसंबेना ॥ छ्र ॥ वर्म जाणावें हा मुख्यधर्मसार । अवघे प्रकार तयापासीं ॥ २ ॥ वेगळ्या विचारें वेगळाले भाव । धरायासी ठाव बहु नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवतुकें धाकुटी मूर्ती जीवें ॥ ४ ॥

३८६४. भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आश्वासीजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें हीं दातारें निववावीं ॥ छ्र ॥ अमृताची दृष्टी घालूनियां वरी । शीतळ हा करीं जीव माझा ॥ २ ॥ घेई उचलूनि पुसें तानभूक । पुसीं माझें मुख पीतांबरें ॥ ३ ॥ बुंझावोनि माझी धरीं हनुवटी । ओवाळुनी दिठी करुनी सांडीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे बापा आहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥ ५ ॥

३८६५. न सरे लुटितां मागें बहुतां जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सिद्ध महामुनि साधक संपन्न । तिहीं हें जतन केलें होतें ॥ छ्र ॥ पायाळाच्या गुणें पडिलें ठाउकें । जगा पुंडलिकें दाखविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें[9] होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहु ॥ ३ ॥

३८६६. भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबुवेषा सहज स्थिति ॥ छ्र ॥ कोरोनियां भूमी करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगें चि ॥ ३ ॥

३८६७. धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य जालें मुख निवाली[12] रसना । नाम नारायणा घोंप करूं ॥ छ्र ॥ धन्य हें मस्तक सर्वांग[13] शोभलें । संताचीं पाउलें लागताती ॥ २ ॥ धन्य आजि पंथें चालती पाउलें । टाळियें[14] शोभले धन्य कर ॥ ३ ॥ धन्य तुका ह्मणे आह्मांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥ ४ ॥

---

१ पं. मज.–२ पं. राखू कैसी.–३ दे. धरावे–४ पं. तया पोटीं.–५ पं. वेगळाल्या.–६ पं. कवतुके–७ पं. वैसोनियां –८ दे. हनुवंटी –९ दे. येथें होतों मी दुबळें । आलें या कपाळें०.–१० दे. त. चटा –११ पं. मध्ये करी वास।. त. मध्यें करिती वास।.–१२ पं. रसली.–१३ पं. सर्वांगा.–१४ दे. 'टाळिया शोभले०' व 'पावलों पाउलें०' या चरणाच्या जागा परस्परांनीं बदलल्या आहेत

३८६८. बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य जाली बुद्धि संचितासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरुषण जालें संतां पायीं ॥ छ ॥ त्रासिलें दरिद्रें दोषा जाला खंड । त्या चि काळें पिंड पुनीत जाला ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला अवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ॥ ३ ॥

३८६९. आपणा[1] लागे काम वाण्याघरीं गुळ । त्याचे याति कुळ काय कीजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठायागुणें[2] ॥ छ ॥ गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तीचें दूध काय सेवूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे काय सैलपटासी[3] काज । फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥ ३ ॥

३८७०. जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीं[4] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ॥ छ ॥ मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं विघडी जीवप्राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ३ ॥

३८७१. वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण[6] । चिरगुटें घालून वाथयाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेवीं शब्दज्ञानी[7] करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूनियां ॥ छ ॥ बोलाचि च कढी बोलाचा चि भात । जेवुनियां तृप्त कोण जाला ॥ २ ॥ कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ४ ॥

३८७२. तुझिया पाळणा ओढे माझें मन । गेलों विसरोन देहभाव ॥ १ ॥ लागला पालट फेडणें उसणें । येणें चि प्रमाणें पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा जीव जैसा ओढे । तैसा चि तिकडे पाहिजेल ॥ ३ ॥

३८७३. मी दास तयांचा जयां चाड नाहीं । सुखदुःख दोहीं विरहित ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ राहिलासे उभा भीवरेच्या तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥ छ ॥ नवल काय तरी पाचारितां पावे । न स्मरत[9] धांवे भक्तकाजा ॥ २ ॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तो चि माझा दाता स्वहिताचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यासी गाईन मी गीतीं । आणीक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥ ४ ॥

३८७४. जुंझायाच्या गोष्टी ऐकतां चि सुख । करितां हें[10] दुःख थोर आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ छ ॥

१ पं. आपण्या —२ त. ठाया गुण.—३ पं. सालपटासी —४ पं. जन्मांतरिचा —५ पं. मेवटीची घडी.—६ दे. त. ० लक्षणें —७ पं. शब्द ज्ञाणी.—८ पं. निघुगाला.—९ त. न सवरत. पं. न श्वरीता.— १० पं. देहे दु.ख.

पिंड पोसिलियां विषयांचा पाइक । वैकुंठनायक कैंचा तेथें ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें देहासी उदार । रकुमादेवीवर जोडावया ॥ ३ ॥

३८७५. पाषाण प्रतिमा सोन्याच्या पादुका । हें हो[1] हातीं एका समर्थाचे ॥ १ ॥ अनामिका हातीं समर्थाचा सिक्का । न मानितां लोकां येइल कळों ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥ ३ ॥

३८७६. बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । टाकोनियां मनीं ठेविला सीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पायांपाशीं लपवावें देवा । नको पाहूं सेवा भक्ती माझी ॥ ध्रु ॥ बहु भय वाटे एकाच्या बोभाटें । आली[2] घायवटे फिरोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे सिगे भैरूं[3] आलें माप । वियोग संताप जाला तुझा ॥ ३ ॥

३८७७. धरूनियां मनीं बोलिलों संकल्प । होसी[4] तरि बाप सिद्धी पावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उत्कंठा हे आजी जाली माझे पोटीं । मोकळिजी गोष्टी टाळाटाळ ॥ ध्रु ॥ माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधि उत्तर न साहे पैं ॥ २ ॥ तुका ह्मणे जरि दिली आठवण । तरि अभिमान धरीं याचा[5] ॥ ३ ॥

३८७८. आजिवरी होतों संसाराचे हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुला शरणागत व्हावें नारायणा । अंगीकारा[7] दिना आपुलिया ॥ ध्रु ॥ विसरलों काम याजसाठीं धंदा । सकळ गोविंदा माझें[6] तुझें ॥ २ ॥ तुका ह्मणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं जाली तैसी ॥ ३ ॥

३८७९. धन्यधन्य ज्यास पंढरीसी वास । धन्य ते जन्मास प्राणी आले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चहु[8] खाणीमध्यें हो‍त कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ॥ ध्रु ॥ उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघे चि सकळ चतुर्भुज ॥ २ ॥ अवघा विठ्ठल तेथें दुजा नाहीं । भरला अंतर्बाहीं[9] सदोदीत ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें[10] होउनी राहेन । सांडोवी[11] पाषाण पंढरीचा ॥ ४ ॥

३८८०. असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखियापरी आपेंआप ॥ ध्रु ॥ संत ते समय वोळखती वेळ । चैतुष्ट[12] निर्मळ चित्त सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे हित उचित अनुचित । मज लागे नित[13] आचरावें ॥ ३ ॥

---

१ पं. तो.–२ पं. आलीया–३ पं. भरी आनें माप । आता चुकवा पाप मागील ते–४ पं. होसील–५ पं. नेई.–६ प. माझा.–७ पं. अंगीकारी.–८ दे. चहु–९ दे. अन्तर्बाहि त. अन्तरबाही.–१० दे. देथें–११ त. साटोवा पाषाण–१२ पं. संतुष्ट.–१३ पं. नित्य.

३८८१. आतां काय खावें कोणीकडे जावें । गावांत रहावें कोण्या बळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोपला पाटील ये गावींच्या[1] लोकां । आतां मज भिका कोण घाली ॥ ध्रु ॥ आतां येणें चवी सांडिली ह्मणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ २ ॥ भल्या लोकीं[2] यासी सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥ ४ ॥

३८८२. विठ्ठलावांचोनि ब्रह्म जें बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठलावांचूनि जेजे उपासना । अवघा चि जाणा संभ्र[3]मु तो ॥ ध्रु ॥ विठ्ठलावांचूनि सांगतील गोष्टी । वांयां ते हिंपुटी होत जाणा ॥ २ ॥ विठ्ठलावांचूनि जें कांहीं जाणती । तितुल्या[4] व्युत्पत्ति वाउगीया ॥ ३ ॥ तुका ह्मणे एक विठ्ठल चि खरा । येर तो पसारा वाउगा चि ॥ ४ ॥

३८८३. सर्व काळ डोळां बैसो नारायण । नयो अभिमान आड मध्यें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धाड पडो तुझ्या थोरपणावरि । वाचे नरहरि उच्चारीना ॥ ध्रु ॥ जळो अंतरींचें सर्व जाणपण । विवादवचन अहंतेचें ॥ २ ॥ सकळां चरणीं गाळित माझा जीव । तुका ह्मणे भाव एकविध ॥ ३ ॥

३८८४. मधुरा उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड भा[6]व असो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥ ध्रु ॥ जनानिंदा होय तो बरा विचार । थोरवीचा भार कामा नये ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं भाव निष्ठावंत । दया क्षमा शांत[9] सर्वां भूतीं ॥ ३ ॥

३८८५. झांडा वरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वल्कलें नेसुनि ठुंगी[11] गुंडाळुनी । सांडी जवळुनी देह[12]भान ॥ ध्रु ॥ लोकमान वै[13]मनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥ २ ॥ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ३ ॥ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका ह्मणे त्याचा पांग फिटे ॥ ४ ॥

३८८६. भक्तिभावें करी बैसोनि निश्चित । नको गोवूं चित्त प्रपंचासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका दृढ [14]करीं पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढिल सुचे ॥ ध्रु ॥ नको करूं कांहीं देवतापूजन । जप तप ध्यान तें ही नको ॥ २ ॥ मानिसील झ[15]णी [16]आपलिक कांहीं । येरझार पाहीं न चुके कदा ॥ ३ ॥ ऐसे जन्म किती पावलासी

१ त. पं. गावींचे हे लोक । आतां मज भीक०.–२ पं. लोकापासी सागि०.–३ पं. भ्रमचि – ४ पं. तितुक्या.–५ पं. माझ्या.–६ पं. प्रेम.–७ पं. तो न करावा व्यापार.–८ पं. भाव निष्टावत चित्तीं –९ पं. शांती –१० पं. झाडें वोरपोनि.–११ पं. चिंधिया वेढुनी.–१२ त. देहभाव. दे. देहमान जवळुनी –१३ पं. वमनसमान –१४ पं. धरीं.–१५ त. जनी.–१६ पं. आपलीया.

देहीं । अझूनि कां नाहीं [1]कळली सोय ॥ ४ ॥ सोय धरीं आतां होयें[2] पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ॥ ५ ॥ सहज कैसें आहे तेथींचें तें[3] गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां होई तूं सावध । तोडीं भवबंध एका जन्में ॥ ७ ॥

३८८७. दोराच्या आधारें पर्वत चढला । पाँउलासाठीं[4] केला अपघात ॥ १ ॥ ॥ ध्रु.॥ अष्टोत्तरशें व्याधि ज्यां[5] वैद्यें[6] दवडुनी । तो वैद्य मारूनि उत्तीर्ण[7] जाला ॥ ध्रु॥ नव मास माया वाइलें उदरीं । ते माता चौव्हारीं नग्न केली ॥ २ ॥ गायत्रीचें क्षीर पिळुनी घेउनी । उपवासी बांधोनी ताडन करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे [8]दासां निंदी त्याचें तोंड । पहातां नरककुंड पूर्वजांसी ॥ ४ ॥

३८८८. न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विश्वामित्री[9] पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चांडाळाचें ॥ ध्रु॥ द्रव्यइच्छेसाठीं करीतसे कथा । काय त्या पापिष्ठा न मिळे खाया ॥ २ ॥ पोट पोसावया तोंडें बडबडी । नाहीं घडफुडी ऐकें[10] गोष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया काय व्याली रांड । येउनियां भंडें[11] जनामध्यें ॥ ४ ॥

३८८९. नित्य उठोनियां खायाचीच[12] चिंता । आपुल्या तूं हिता नाठवीसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥ ध्रु॥ चातकां लागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ २ ॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरि । तयांलागीं हरि उपेक्षीना ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव धरुन राहें चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥ ४ ॥

३८९०. जेजे आळी केली तेते गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय समाधान केलें कोणे वेळे । [13]कोणे माझे लळे पाळियेले ॥ ध्रु॥ अभ्यासें[14] तो नाहीं स्वप्नीं ही दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कैंचा[15] चि तो ॥ २ ॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसें जगामाजी जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं भरवसा । मोकलिसी ऐसा वाटतोसी ॥ ४ ॥

३८९१. पूर्वीहूनि बहु भक्त सांभाळिले । नाहीं अव्हेरिले दास कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेजे शरण आले तेते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ॥ ध्रु॥

१ पं. नकळे.–२ पं. होईं तूं.–३ पं हें.–४ पं. पाउलासी.–५ दे. ज्य. त. जे. पं. 'ज्या' नाहीं.–६ पं. वैद्य –७ पं. "उत्तीर्ण जाला" याबद्दल "उत्तीर्णता '.–८ पं. गुणनिंदकाचें तोंड.–९ पं. विश्वामित्र०.–१० पं. येकी.–११ पं. भाड.–१२ पं. खावयाची चिंता. दे. खायाची चिंता.–१३ दे. त. कोणें.–१४ पं. आभास.–१५ पं. कैंचा तो.

३९०४. माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ राम कृष्ण ॥ १ ॥ अबद्ध चांगलें गाऊं भलतैसें । कैळलें हें जैसें मायबापा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज न लगे वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ ३ ॥

३९०५. यालागीं आवडी ह्मणा राम कृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ॥ ध्रु ॥ न लगती कष्ट न लगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥ २ ॥ न लगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरि ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाटीं ॥ ४ ॥

३९०६. झांकूनियां नेत्र काय जपतोसी । जों नाहीं मानसीं प्रेमभाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रामनाम ह्मणा उघड मंत्र जाणा । चुकती यातना गर्भवास ॥ ध्रु ॥ मंत्र यंत्र संध्या करिसी जडीबुटी । तेणें भूतसृष्टी पावसील ॥ २ ॥ तुका ह्मणे एक सुंदर मंत्र एक । भवसिंधुतारक रामनाम ॥ ३ ॥

३९०७. पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयालागीं आवडे गाणें त्याला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटीतसे ॥ ध्रु ॥ वीतभरि लंगोटी नेदी अतीताला । खीरम्याँ देतो शाला भोरप्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरि । जातो यमपुरीं भोगावया ॥ ३ ॥

३९०८. क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥ ध्रु ॥ मांजरें देखिला लोणियांचा गोळा । लावुनियां डोळा बैसलेंसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ३ ॥

३९०९. स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुःखवीना चित्त तुझें नारायणा । कांहीं च मागेना तुजपासीं ॥ ध्रु ॥ रिद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस याची जीवें ॥ २ ॥ तुका ह्मणे एके वेळे देईं भेटी । वोरसोनि पोटीं आलिंगावें ॥ ३ ॥

३९१०. देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास उपाधीचा ॥ १ ॥ पर्वपक्षी धातु धिःकारिलें जन । स्वयें जनार्दन ते चि जाले ॥ २ ॥ तुका ह्मणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येइल कळों ॥ ३ ॥

१ पं. वाकुडे.–२ पं. बाळ वदे जैसें मायबापा.–३ त. दे. जव.–४ पं. रामकृष्ण ह्मणा उघडा०.– ५ पं. विषयी आवडे.–६ पं. लुटी धन.–७ पं. भोरप्यासी शाला वाटीतसे ।.–८ दे. क्षुधारथी. पं. क्षधार्थी दुष्काळ अन्ने पीडियेले.–९ पं. सायास.–१० पं. पूर्वपक्ष.

३९११. भेटीवांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुलती याजसाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेटोनियां बोलें आवडीचें गुज । आनंदाच्या भोजें जेवूं संगें ॥ छ ॥ मायलेंकरासी नाहीं दुजी परि । जेऊं बरोबरी बैसोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें अंतरींचें आर्त । यावें जी त्वरित नारायणा ॥ ३ ॥

३९१२. आमिषाचे[1] आसे गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥ १ ॥ मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ २ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका ह्मणे सुखा पार नाहीं ॥ ३ ॥

३९१३. जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपिनाथ पावे चि ना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मी[2] संत सारे कृपेचे सागर । माझा निरोप फार सांगा देवा ॥ छ ॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला[3] । पायापें विठ्ठला ठेवीं मज ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें[4] करावें निर्वाण । मग तो रक्षण करिल माझें ॥ ३ ॥

३९१४. त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरि मिठी ॥ छ ॥ कइं तें सुंदर देखोनि[5] रूपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ॥ २ ॥ नाहीं पूर्व पुण्य मज पापराशी[6] । ह्मणोनी पायांसी अंतरलों ॥ ३ ॥ अलभ्य लाभ कैंचा संचितावेगळा । विनवी गोपाळा दास तुका ॥ ४ ॥

३९१५. मोलाचें आयुष्य वेचुनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अनंतजन्मींचे[7] शेवट पाहतां । नर देह हातां आला तुझ्या ॥ छ ॥ कराल ते जोडी येईल कार्यासी । ध्यावें विठ्ठलासी सुखालागीं ॥ २ ॥ सांचलिया धन होईल ठेवणें । तैसा नारायण जोडी करा ॥ ३ ॥ करा हरिभक्ती परलोकीं ये[8] कामा । सोडवील यमापासोनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे करा आयुष्याचें मोल । नका वेचूं बोल नामेंविण ॥ ५ ॥

३९१६. काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरिनाथा कष्ट नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वकाळ[9] वाचे उच्चारितां हरि । तया सुखा सरि पाड नाहीं ॥ छ ॥ रामकृष्णरंगीं[10] रसना रंगली । अमृताची उकळी नाम तुझें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥ ३ ॥

---

१ दे. त. पं. आविसाचे.–२ त दे. कृपेचे सागर तुह्मी संत सारे । निरोप हा फार सांगा देवा ॥ –३ दे. त्यासि.–४ पं. ऐसी करा निरवण ।.–५ पं. देखेन.–६ पं. पापराशी.–७ पं. अनंता जन्मींचा.–८ 'ये' नाहीं.–९ पं. 'सर्वकाळ'० हें कडवें 'रामकृष्ण रंगीं' या कडव्याच्या मागून आहे.–१० पं. रामकृष्ण रसीं.

३९१७. कीर्त्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भक्त जाय[1] सदा हरि कीर्ति गात । त्यासवें[2] अनंत हिंडतसे ॥ ध्रु ॥ त्रैलोक्य भ्रमण फिरत नारद । त्यांसंगें[3] गोविंद फिरतसे ॥ २ ॥ नारद मंजुळ सुस्वरें गीत गाये । मार्गीं चालताहे संगें हरि ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याला गोडी कीर्त्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥ ४ ॥

३९१८. बाळेंविण माय क्षणभरि न राहे । न देखतां होये कासाविस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणिक उदंड बुझाविती जरी । छंद त्या अंतरीं माउलीचा ॥ ध्रु ॥ नावडती तया बोल आणिकाचे । देखोनियां नाचे माय दृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । आणिकांचे बोलीं चाड नाहीं ॥ ३ ॥

३९१९. हरिचिया भक्ता नाहीं भयचिंता । दुःखनिवारिता नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे वाहणें संसारउद्वेग । जडों नेदी पांग देवरायां[4] ॥ ध्रु ॥ असों[5] द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळी च ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ३ ॥

३९२०. दसरा दिवाळी तो चि आह्मां सण[6] । सखे संतजन[7] भेटतील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आमुप जोडल्या सुखाचिया[8] राशी । पार या भाग्यासी न दिसे आतां ॥ ध्रु ॥ धन्य दिवस आजि जाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ॥ २ ॥ तुका[9] ह्मणे काय होऊं उतराई । जीव ठेऊं पांयीं संतांचिये ॥ ३ ॥

३९२१. खिस्तीचा उदीम[10] ब्राह्मण कलयुगीं । महारवाडीं मांगीं हिंडतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेवसाव करितां[11] पर्वत मांगासी । ते पैं विटाळासी न मानिती[12] ॥ ध्रु ॥ मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरि थुंका पडतसे ॥ २ ॥ आशा माया रांडा नांव हें कागदीं । आठवीना कधीं नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे देह जाला[13] पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ४ ॥

३९२२. अंगीं[14] ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघरें[15] चांडाळाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंत्यजीं[16] खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदानें[17] मायबहिणी ॥ ध्रु ॥

---

१ पं. जाई.–२ दे. त्रित्यसेवे.–३ पं. त्यासवें.–४ पं. देवराव –५ पं. 'असों द्यावा०' हें कडवें नाहीं.–६ दे. सन.–७ पं. हरिजन.–८ पं. पुण्याचिया रासी । पार त्या भाग्यानी नाहीं लेखा ।.–९ पं. 'तुका ह्मणे०' या कडव्याच्या अगोदर 'दुःख हें दारिद्र गेलें हारपोनी । मशक होउनि टेला काळ ॥' हें कडवें अधिक आहे.–१० पं. ०उदीम उदिमांत हीण । करिती ब्राह्मण कलयुगीं ।.–११ पं. करी –१२ पं. मानिती –१३ दे. पं. जालें.–१४ दे. जगीं.–१५ त. दागेदार.–१६ पं. अंत्यजाची. दे. आतेजा.–१७ दे. गाळिप्रधानि.

उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कुळ उभयतां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी कलयुगाची चाली । स्वार्थें बुडविलीं आचरणें ॥ ३ ॥

३९२३. हा चि माझा नेम धरिला हो[1] धंदा । यावरि गोविंदा भेटी द्यावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हा चि माझा ध्यास सदा सर्वकाळ । न्यावयासी मूळ येसी कधीं ॥ ध्रु ॥ डोळियांची भूक पहातां श्रीमुख । आलिंगणें सुख निवती भुजा ॥ २ ॥ बहु चित्त ओढे तयाचिये सोई । पुरला हा कांहीं[2] नवस नेणें ॥ ३ ॥ बहुबहु काळ जालों कासावीस । वाहिलें बहुवस कळेवर ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां पाडावें[3] हें ओझें । पांडुरंगा माझें इयावरि ॥ ५ ॥

३९२४. जेणें माझें हित होइल तो उपाव । करिसील भाव जाणोनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज नाहीं सुख दुःख तया खंती । भावना हे चित्तीं नाना छंदें ॥ ध्रु ॥ तोडीं हे संबंध तोडीं आशापाश । मज हो सायास न करितां ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों राहिलों निश्चिंतें[4] । कवळोनि एकांतसुख तुझें ॥ ३ ॥

३९२५. शिखा सूत्र तुझा गुंतला जमान । तंववरि तूं जाण श्रुतिदास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्याची तुज कांहीं चुकतां चि नीत । होसील पतित नरकवासी ॥ ध्रु ॥ बहुत[5] जालासी चतुर शाहणा । शुद्ध आचरणा चुकों नको ॥ २ ॥ शिखा सूत्र याचा तोडीं तूं संबंध । मग तुज बाध नाहीं नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरि वर्त्तूनि निराळा । उमटती कळा ब्रह्मींचिया ॥ ४ ॥

३९२६. पतिव्रता ऐसी जगामध्यें मात । भोगी पांच सात अंधारीं ते ॥ १ ॥ भ्रतारासी लेखी श्वानाचे समान । परपुरुषीं जाण संभ्रम तो ॥ २ ॥ तुका ह्मणे तिच्या दोषा नाहीं पार । [6]भोगील अघोर कुंभपाक ॥ ३ ॥

३९२७. सिंदळीसी नाहीं पोराची पैं आस । [7]राहे बीज त्यास काय करी ॥ १ ॥ अथवा सेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देइल कोण काका त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं [8]खायाची ते चाड । तरि कां लिगाड करुनी घेतों[9] ॥ ३ ॥

३९२८. संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाये विठोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश कांहीं ॥ ध्रु ॥ घेतील तयांसी सोपें आहे सुख । बोलियेले मुखें नारायण ॥ २ ॥ सांगितलीं सोय

---

१ पं. हा.–२ पं. काई दिवस.–३ पं. पडावे.–४ पं. निश्चिंत.–५ पं. बहु तं जालासी. दे. बहु जालासी.–६ पं. भोगीते.–७ दे. त. सांडविल्यावरि जाग.–८ पं. रानगायानी नाट.–९ दे. त. घेतोस.

करुणासागरें । तुह्मां[1] कां हो बरें न [2]वाटे तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेणें [3]उपकार केला । भोळ्याभाविकाला [4]तरावया ॥ ४ ॥

३९२९. चाले हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देखवी [5]दाखवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नका ॥ छ ॥ मानसाची देव चालवी अहंता । मी चि एक कर्त्ता [6]ह्मणोनियां ॥ २ ॥ [7]वृक्षाचें ही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठो भरला [8]सबाहीं । तया उणें कांहीं चराचरीं ॥ ४ ॥

३९३०. मायारूपें ऐसें मोहिलेंसे[9] जन । भोगिती पतन नानाकर्मैं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय [10]यांची प्रीती करितां आदर । दुरावितां दूर तें चि भलें ॥ छ ॥ नाना छंद अंगीं बैसती विकार । छळियेले फार तपोनिधि ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें सिकवितों तुज । आतां धरी लाज मना पुढें ॥ ३ ॥

३९३१. जेजे कांहीं मज होईल वासना । तेते नारायणा व्हावें तुह्मीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय भाव एक निवडूं निराळा । जाणसी तूं कळा अंतरीची ॥ छ ॥ तुजविण मज कोण आहे सखा । जें [11]सांगों आणिकां जीवभाव ॥ २ ॥ अवघें पिशुन जालें असे जन । आपपर कोण नाठवे हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं चि जीवांचें जीवन । माझें समाधान तुझे हातीं ॥ ४ ॥

३९३२. कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शब्दज्ञानें देवा नाश केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न संगेतां[12] [13]बुडूं पाहें ॥ छ ॥ संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासीं ह्मणती एक ॥ २ ॥ बुडविली भक्ति [14]ह्मणती पाषाण । पिंडाचें पाळण स्थापुनियां ॥ ३ ॥ न करावी कथा ह्मणती एकादशी । भजनाची [15]नासी मांडियेली ॥ ४ ॥ न जावें देउळा ह्मणती देवघरीं । बुडविलें या परी तुका ह्मणे ॥ ५ ॥

३९३३. नमोनमो तुज माझें हें कारण । काय जालें उणें करितां स्नान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संतांचा मारग चालतों [16]झाडूनि । हो का लाभ हानि कांहींतरि ॥ छ ॥ न करिसी तरि हेंचि कोडें मज । भक्ति गोड काज आणीक नाहीं ॥ २ ॥ करीं

१ दे. तुका ह्मणे बरें. त. तुह्माला कांहो बरें —२ पं. वाटतें.—३ दे. केला उपकार — ४ पं. तरावयासी.—५ पं. ऐकवी —६ पं. ह्मणों नये.—७ दे. त. वृक्षाचीं हीं पानें.—८ पं. सबाह्य । उणें काय आहे चराचरीं. त. सबाही । उणा कोठें आहे चराचरीं.—९ पं. मोहियेलें.—१० पं. त्याची.— ११ दे. सांगा —१२ पं. सांगतां.—१३ दे. वहु.—१४ दे. पं. ह्मणीते.—१५ पं. निशी.—१६ दे. सांडूनि

सेवा कथा नाचेन रंगणीं । प्रेमसुखधणी पुरेल तों ॥ ३ ॥ महाद्वारीं सुख वैष्णवांचे मेळीं । वैकुंठ जवळी वसे तेथें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं मुक्तिसवें चाड । हें चि जन्म गोड घेतां मज ॥ ५ ॥

३९३४. होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ॥ १ ॥ निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहाताती मान आदराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केवीं ॥ ३ ॥

३९३५. लांबवूनि जटा नेसोनि कासोटा । अभिमान मोटा करिताती ॥ १ ॥ सर्वांगा करिती विभूतिलेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥ ३ ॥

३९३६. कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ ह्मणविती जगामाजी ॥ १ ॥ घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परि शंकरासी नोळखती ॥ २ ॥ पोट भरावया शिकती उपाय । तुका ह्मणे जाय नर्क लोका ॥ ३ ॥

३९३७. कौडीकौडीसाटीं फोडिताती शिर । काढूनि रुधिर मलंग ते ॥ १ ॥ पांवरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांचा नव्हे चि स्वधर्म । न कळे चि वर्म गोविंदाचें ॥ ३ ॥

३९३८. दाढी डोई मुंडी मुंडुनियां सर्व । पांघुरति वरवें वस्त्र काळें ॥ १ ॥ उफराटी काठी घेऊनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रासी ॥ २ ॥ चाळवुनी रांडा देउनियां भेष । तुका ह्मणे त्यास यम दंडी ॥ ३ ॥

३९३९. होउनी जंगम विभूती लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥ १ ॥ शिवाचें निर्माल्य तीर्थ न सेविती । घंटा वाजविती पोटासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ॥ ३ ॥

३९४०. लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाटीं देशोदेशीं ॥ १ ॥ नेसोनि[2] कोपीन शुभ्रवर्ण जाण । पहाती पक्वान्न क्षेत्रींचें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

३९४१. ऐसे नाना भेष घेउनी हिंडती । पोटासाटीं घेती प्रतिग्रह ॥ १ ॥ परमार्थासी कोण त्यजी संवसार । सांगापां[3] साचार नांव त्याचें ॥ २ ॥ जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका ह्मणे ॥ ३ ॥

---

१ त. क्वडीखडीसाटीं. दे. कडवीकडीसाटीं.–२ पं. नेसोनिया कोपीन शुभ्र वस्त्र जाण ।.–
३ पं. सांगपां. दे. सागापां.

**३९४२.** स्त्रिया पुत्र कळत्र हें तंव मायावंत । शेवटींचा अंत नाहीं कोणी ॥ १ ॥ यमाचिये हातीं बांधोनियां देती । भूषणें ही घेती काढूनियां ॥ २ ॥ ऐसिया चोरांचा कैसा हा विश्वास । धरिली तुझी कास तुका ह्मणे ॥ ३ ॥

**३९४३.** नें लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणिकांचें ॥ ध्रु ॥ काय ते महत्त्वीं करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज दिधल्यावांचूनि । न राहे त्याहूनि होइन वेडा ॥ ३ ॥

**३९४४.** तुझा ह्मणोनियां दिसतों गा दीन । हा चि अभिमान सरे तुझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अज्ञान बाळका कोपली जननी । तयासी निर्वाणीं कोण पावे ॥ ध्रु ॥ तैसा विठो तुजविण परदेशी । नको या दुःखासीं गोऊं मज ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥ ३ ॥

**३९४५.** जन्म मृत्यु फार जाले माझ्या जीवा । ऐक माझा धांवा पांडुरंगा ॥ १ ॥ सिणलों बहुत करितां येरझारा । रखुमाईच्या वरा पावें वेगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं गा पतितपावन । घेई माझा सीण जन्मांतर ॥ ३ ॥

**३९४६.** आतां माझ्या दुःखा कोण हो सांगाती । रखुमाईचा पति पावे चि ना ॥ १ ॥ कायविधा त्यानें घातलीसे रेखा । सुटका या दुःखा न होय चि ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी विसरूं नको चिंता । अगा पंढरिनाथा पाव वेगीं ॥ ३ ॥

**३९४७.** पंढरीसी जावें ऐसें माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ॥ १ ॥ न लगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्निचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचे पाहिलिया पाय । मग दुःख जाय सर्व माझें ॥ ३ ॥

**३९४८.** तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥ १ ॥ अर्थचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥ २ ॥ तुका ह्मणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ॥ ३ ॥

**३९४९.** आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देह हें देवांचें धन कुबेराचें । तेथें[11] मनुष्याचें काय आहे ॥ ध्रु ॥ देता देवविता नेता नेवविता । येथें[12] याची सत्ता काय आहे ॥ २ ॥ निमित्याचा

१ त. पांडुरंगा.—२ पं. नलगे तें मज.—३ पं. महत्त्वें. दे. त. महत्वी.—४ पं. देतां.—५ पं. भेटल्या०.—६ पं. याहुनी.—७ दे. माझा.—८ पं. नका.—९ पं. आर्त चाड.—१० पं. काळाचें.—११ पं. येथें.—१२ दे. त. येथ.

धनी केला असे प्राणी[1] । माझेंमाझें[2] ह्मणोनि व्यर्थ गेला ॥ ३ ॥ तुका[3] ह्मणे कां रे नाशवंतासाटीं । देवासवें आटी पाडितोसी ॥ ४ ॥

३९५०. माय[4] वेंनीं[5] घाल्या धाये । गर्भ आंवतणें न पाहें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें पूजितां वैष्णव । सुखें संतोषतो देव ॥ ध्रु. ॥ पुत्राच्या विजयें । पिता सुखावें जाये ॥ २ ॥ तुका ह्मणे अमृतसिद्धि । हरे क्षुधा आणि व्याधि ॥ ३ ॥

३९५१. तुझें[6] अंगभूत । आह्मी जाणतों समस्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरा वाटतसे जना । गुढारसें नारायणा ॥ ध्रु. ॥ ठावा थारा मारा । घरचिया[7] संव चोरा ॥ २ ॥ तुका ह्मणे भेदा[8] । करुनि करितों संवादा ॥ ३ ॥

३९५२. तुज दिला देह । आजूनि वागवितों भय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥ ध्रु. ॥ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभविलें लंडें ॥ २ ॥ दंड लाहे केला । तुका ह्मणे जी विठ्ठला ॥ ३ ॥

३९५३. मातें[9] लेकरांत भिन्न । नाहीं उत्तरांचा सीणें[10] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धाडींधाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ ध्रु. ॥ करुनि नवल । याचे बोलिलों ते बोल ॥ २ ॥ तुका ह्मणे मातें । पांडुरंगे कृपावंते ॥ ३ ॥

३९५४. जरि न भरे[11] पोट । तरि सेवूं दरकूट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परि न घलूं तुज भार । हा चि आमुचा निर्धार ॥ ध्रु. ॥ तुझें नाम अमोलिक[12] । नेणती हे ब्रह्मादिक ॥ २ ॥ ऐसें नाम तुझें खरें । तुका ह्मणे भासे पुरें ॥ ३ ॥

३९५५. सर्वस्वाची साटी । तरि च देवासवें गांठी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तरी जया तैसा । भोग भोगवील इच्छा ॥ ध्रु. ॥ द्यावें तें चि घ्यावें । ह्मणउनि जीवें[13] जावें ॥ २ ॥ तुका ह्मणे उरी । मागें नुरवितां[14] वरी ॥ ३ ॥

३९५६. सुख पंढरीसी आलें । पुंडलिकें[15] साटविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां धांवा माझे बाप । जिव्हा घेउनियां[16] माप ॥ ध्रु. ॥ करा[17] एक खेप । मग न लगे हिंडावें ॥ २ ॥ विषय[18] गुंडूनि पसारा । धांव घ्या रे पंढरपुरा ॥ ३ ॥ आयुष्यें[19]

---

१ दे. ह्मणी.–२ पं. तुका ह्मणे मी ह्मणोनि व्यर्थ गेला ।.–३ पं. 'तुका ह्मणे कां रे०' हें कडवें नाहीं. त. 'तुका ह्मणे देव जोडलीया साटीं । न लगे आटाआटी करणें काहीं,' असें आहे.–४ त. माहे.–५ वणी.–६ त. तुझीं अंग भूतें । आह्मी जाणतों समस्तें ॥.–७ दे. परच्चिया. त. असे घरचिया०.–८ पं. भेदाभेद । करूनि करीतसे वाद ॥.–९ पं. मान.–१० दे. सीन.–११ पं. भरे नि–१२ पं. अलोलिक.–१३ दे. घ्यावें जीवें. पं. जीवेंभावें –१४ दे. उरविितां.–१५ दे. अवघें पुंडलिकें.–१६ पं.घेउनि खरें माप –१७ दे. करा एक खेप सनावें।.–१८ दे. विभव.–१९ पं. 'आहे आयुष्याचा लेश । करीं पंढरीचा वास ॥.'

वेचें जंत्र आहे। तों चि धांत्रोनियां जायें ॥ ४ ॥ आळस न करीं या लाभाचा। तुका
विनवी कुंणबियाचा[1] ॥ ५ ॥

३९५७. गाढव शृंगारिलें कोडें। कांहीं केल्या नव्हे घोडें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥
त्याचें भुंकणें न राहे। स्वभावासी करील काये ॥ ध्रु. ॥ श्वान शिबिके वैसविलें।
भुंकतां न राहे उगलें ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वभावकर्म। कांहीं केल्या न सुटे धर्म ॥ ३ ॥

३९५८. सेकीं[2] हें ना तेंसें जालें। बोलणें तितुकें वांयां गेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥
[3]स्वयें आपण चि रिता। रडे पुढिलांच्या हिता ॥ ध्रु. ॥ सुखसागरीं नेघे वस्ती।
अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे गाढव लेखा। जेथें भेटेल तेथें ठोका ॥ ३ ॥

३९५९. आवडे सकळां मिष्टान्न। रोग्या विषों[4] त्यासमान ॥ १ ॥ दर्पण[5] नावडे[6]
तया एका। ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ २ ॥ तुका ह्मणे तैशां[7] खळा। उपदेशाचा[8]
कांटाळा ॥ ३ ॥

३९६०. अखंड संत निंदी। ऐसी दुर्जनाची बुद्धि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय
ह्मणावें तयासी। तो केवळ पापरासि ॥ ध्रु. ॥ जो स्मरे रामराम[9]। तयासी ह्मणावें
रिकामें ॥ २ ॥ जो[10] तीर्थव्रत करी। तयासी ह्मणावें भिकारी ॥ ३ ॥ तुका
ह्मणे विंचवांची[11] नांगी। तैसा दुर्जन सर्वांगीं ॥ ४ ॥

३९६१. या रे नाचों अवघेजण[12]। भावें प्रेमें परिपूर्ण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥
गाऊं पंढरीचा राणा। क्षेम देउनि संतजना ॥ ध्रु. ॥ सुख[13] साधु सुखासाटीं। नाम
हरिनाम बोभाटीं ॥ २ ॥ प्रेमें[14] वाटितो उदार। देतां नाहीं सानाथोर ॥ ३ ॥ पापें
पळालीं बापुडीं। काळ झाला देशधडी ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य काळ। आजि
प्रेमाचा सुकाळ ॥ ५ ॥

३९६२. उपजलों[15] मनीं। हे तों स्वामीची करणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होइल
प्रसादाचें[16] दान। तरि हें कवतुक पाहेन ॥ ध्रु. ॥ येइल अभय जरि। तरि हे आज्ञा
वंदिन शिरीं ॥ २ ॥ भक्तिप्रयोजना। प्रयोजावें वंदिजना ॥ ३ ॥ यश स्वामिचिये
शिरीं। दास्य करावें किंकरीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे आळीकरा। त्यासी योजावें
उत्तरा ॥ ५ ॥

---

१ दे. कुणव्याचा.–२ पं. सेखी हेना तैसे –३ त. सेवीं –४ पं. विप ते –५ पं. 'दर्पण' याच्या पूर्वीं 'काय तया एक साटीं। काम केली अवघी खोटी ॥' हें कडवें जास्त आहे.–६ पं. न लगे एका.–७ पं. 'तैशा' नाहीं.–८ पं. उपदेशाचा तो कांटाळा.–९ पं. रामनामा। त्यासी ह्मणतो रिकामा ॥.–१० पं. तीर्थें व्रतें करी। त्यासी ह्मणतो भीकारी ॥ –११ पं. विचा नागी.–१२ पं. आवघे जन। भाव आनंदें करुन ॥.–१३ पं. सुख फुकासाटी। साधे हरिनाम बोभाटीं.–१४ पं. प्रेम वाटितो दे. प्रेमासाटीं तो.–१५ पं. उपजले.–१६ पं. प्रेमाचें.

३९६३. माझें मन पाहे कसून । चि[1]त्त न ढळे तुजपासून ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [2]कापुनि देइन शिर । पाहा कृपण कीं उदार ॥ ध्रु ॥ मजवरि घालीं घण । परि मी न सोडीं चरण ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । तुजवांचूनि नाहीं गति ॥ ३ ॥

३९६४. भूमीवरि कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें [3]नाचा हो कीर्त्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ॥ ध्रु ॥ काळा सुटे पळ । जाती दुरितें सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं । [4]साच माना हे निश्चिती ॥ ३ ॥

३९६५. जातीचा ब्राह्मण । न करितां संध्यास्नान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो एक नांवाचा ब्राह्मण । होय हीनाहूनि हीन ॥ ध्रु ॥ सांडुनियां शाळिग्राम । नित्य वेश्येचा समागम ॥ २ ॥ नेघे संतांचें जो तीर्थ । अखंड वे[5]श्येचा जो आर्थ ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे पापी । पाहूं नका पुनरपि ॥ ४ ॥

३९६६. [6]जाला जीवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीन आडवया घोंगडें । [7]उभें बाजारीं [8]उघडें ॥ ध्रु ॥ जोंजों धरिली भीड । तोंतों बहु केली चीड ॥ २ ॥ तुका ह्मणे मूळ । तुझें उच्चारीन कुळ ॥ ३ ॥

३९६७. [9]आह्मां हें चि काम । वाचे गाऊं तुझें नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आयुष्य मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ ध्रु ॥ अमृताची खाणी । याचे ठायीं वेचूं वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । माझ्या जि[10]वींच्या जिवलगा ॥ ३ ॥

३९६८. मिळे हरिदासांची दाटी । रीग न होय शेवटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें [11]म्यां काय करावें । माझें कोणें आइकावें ॥ ध्रु ॥ कैसें तुज लाजवावें । भक्त ह्मणोनियां भावें ॥ २ ॥ नाचतां नये ताळीं । [12]मंज वाजवितां टाळी ॥ ३ ॥ [13]अति मंडित भुषणें । शरीर माझें दैन्य वाणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे कमळापति । मज न यावें त्या हातीं ॥ ५ ॥

३९६९. जाणों नेणों काय । चित्तीं धरूं तुझे पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां हें चि [14]वर्म । गाऊं धरूनियां प्रेम ॥ ध्रु ॥ [15]काय सांडूं मांडूं । [16]भावें हृदयीं च कोंडूं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । जन्मोजन्मीं मागें सेवा ॥ ३ ॥

---

१ दे. परि चित्त –२ त. तुज कापुनि.–३ पं. नाचावें कीर्तनीं ।.–४ दे. गांगू मानाची हे निति.–५ पं. वैश्या जोडे अर्थ.–६ दे. जालों.–७ त. उभे.–८ पं. रोकडे –९ त. आतां आम्हा.–१० पं. जीविच्या.–११ पं. काय म्यां.–१२ पं. वाजवितां नये टाळी –१३ दे. त. अंतीं मांडिली भुषणें भूषणे –१४ त. एक वर्म –१५ दे. कामया.–१६ दे. भाव.

३९७०. जाळें घातलें सागरीं । विंदु न राहे भीतरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें पापियाचें मन । तया नावडे कीर्त्तन ॥ छ्रु ॥ गाढव गंगेसी न्हाणिलें । जाउनि [2]उकरड्यावरि लोळे ॥ २ ॥ [3]प्रीती पोसिलें काउळें । जाउनि विष्ठेवरी लोळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसी हरी । कीरव्या नावडे कस्तुरी ॥ ४ ॥

३९७१. तरलों [4]ह्मणुनि धरिलों ताठा । त्यासी चळ जाला फांटा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांयांविण तुटे दोड । मान सुख इच्छी भांड ॥ छ्रु ॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली [6]संतत ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसीं किती । नरका गेलीं अधोगती ॥ ३ ॥

३९७२. आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होईल तैसी हो[7] आबाळी । देह निमित्त या बळी ॥ छ्रु ॥ तुह्मांसवें गांठीं । देहजित्राचिये साटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे लंड । करूं चौघांमध्यें भंड ॥ ३ ॥

३९७३. कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरी तें चांग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा करीं कां विचार । शुद्ध कारण अंतर ॥ छ्रु ॥ वरि कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥ २ ॥ ऊंस बाहेरी कठिण काळा । माजी रसाचा जिव्हाळा ॥ ३ ॥ मिठें रुचविलें अन्न । [10]नये सतंत कारण ॥ ४ ॥

३९७४. [11]सकळतीर्थांहूनि । पंढरीनाथ मुगुटमणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्यधन्य पंढरी । जे मोक्षाची अक्षय पुरी ॥ छ्रु ॥ विश्रांतीचा ठाव । तो हा माझा पंढरीराव ॥ २ ॥ तुका ह्मणे [12]सांगें स्पष्ट । दुजी पंढरी वैकुंठ ॥ ३ ॥

३९७५. भाते भरूनि हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [13]अनंतनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ छ्रु ॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचे अंकित त्यावांचून ॥ २ ॥ रिद्धि सिद्धि ज्या कामारी । तुका ह्मणे ज्याचे घरीं ॥ ३ ॥

३९७६. ज्याची जया आस । तयाजवळी त्या वास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येरें[14] जवळी तें दुरी । धेनु वत्स सांडी घरीं ॥ छ्रु ॥ गोडी प्रियापाशीं । सुख उपजे येरासी ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । घडे तयाठायीं मोल ॥ ३ ॥

---

१ त. अंतरीं.–२ पं. उकरंड्या लोळे.–३ पं. 'प्रीती पोसिलें॰' हें कडवें नाहीं.–४ दे. त. ह्मणउनि.–५ पं. धरियेला.–६ दे. स्वतत्र. त. सतंत.–७ दे. त. 'हो' नाहीं.–८ खड.–९ पं. 'ऊंस बाहेरी' हें कडवें नाहीं–१० त. तुका ह्मणे नये दे. पं. यांत नेहेमींप्रमाणें या अभंगांत 'तुका ह्मणे' असें नाहीं. त. तीं अक्षरें आहेत तरी छंदास जास्त होत आहेत.–११ पं. सर्वा.–१२ दे. सांगतों.–१३ पं. सहस्रनामाची.–१४ पं. येरे.

३९७७. बाळ माते निष्ठुर होये । परि ते[1] स्नेह करीत आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा तूं गा पुरुषोत्तमा । घडी न विसंबेसि[2] आह्मां ॥ ध्रु ॥ नेणती भागली । कडे घेतां अंग घाली ॥ २ ॥ भूक साहे तान्ह[3] । त्याचें राखे समाधान ॥ ३ ॥ त्याच्या दुःखें धाये । आपला जीव देऊं पाहे ॥ ४ ॥ नांवें घाली उडी । तुका ह्मणे प्राण काढी ॥ ५ ॥

३९७८. हे[4] तों टाळाटाळी । परि भोवतों[5] हा कळी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बरें नव्हेल शेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥ ध्रु ॥ [6]मुरगाळिल कान । गोसमाळी सावधान ॥ २ ॥ धन्य[7] ह्मणे आतां । येथें नुधवा माथां ॥ ३ ॥ अबोलणीं[8] तुका । ऐसें कांहीं लेखूं नका ॥ ४ ॥

३९७९. किती लाजिरवाणा । मरे उपजोनि शाहाणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एका घाई न करीं तुटी । न निघे देवासोई भेटी ॥ ध्रु ॥ सोसूनि आबाळी । घायाळ तें ढुंग चोळी ॥ २ ॥ सावध करी तुका । ह्मणे निजले हो आइका ॥ ३ ॥

३९८०. दाता लक्ष्मीचा पति । माझे मागणें तें किती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जाणे तान्हेल्याची तान । पितां गंगा नव्हे न्यून ॥ ध्रु ॥ कल्पतरु जाला देता । तेथें पोटाचा मागता ॥ २ ॥ तुका ह्मणे संतत ध्यातां । परब्रह्म चि आलें हातां ॥ ३ ॥

३९८१. कुरुवंडी करीन काया । वेरोनि[10] पायां गोजिरिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ ध्रु ॥ परतें न सरवे दुरि । आवडी पुरी बैसली ॥ २ ॥ तुका ह्मणे विसावलों । येथें[11] धालों[12] धणीवरि ॥ ३ ॥

३९८२. साधनाचे कष्ट मोटे । भेयें[13] वाटे थोर हें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुखें गावें भावें गीत । सर्व हित बैसलिया ॥ ध्रु ॥ दासा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥ २ ॥ तुका ह्मणे आत्मनिष्ठा[14] । भागे चेष्टा[15] मनाची ॥ ३ ॥

३९८३. घेतां आणिकांचा जीव । तेव्हां कींव कराना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपलें तें वरदळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥ ध्रु ॥ सेवा तरी इच्छा सांग । चोरिलें अंग साहेना ॥ २ ॥ तुका ह्मणे अरे धन्या । निसंतान्या विठोबा ॥ ३ ॥

---

१ दे. तें.–२ दे. विसवेसि. त. विसंभसी –३ दे. पं. ताहान –४ त. हांते.–५ दे. भोवतारे कळी.–६ दे. मुरगाळिला कान । समांडिलें समाधान ॥ –७ त. 'धन्य ह्मणे' हें कडवें नाहीं.–८ दे. 'अबोलणा०' हें कडवें नाहीं. पं. 'हे तो टाळाटाळी०' हा अभंगच आटळत नाहीं –९ त. सतत पं. संता.–१० पं. वरी.–११ त. वेथें.–१२ दे. आलों.–१३ दे. देयें.–१४ दे. आत्मनिष्ट.–१५ दे. चेष्ट.

३९८४. आह्मां केलें गुणवंत । तें उचित राखावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मांसी तों चाड नाहीं । आणिका[1] कांहीं सुखदुःखा ॥ छ ॥ दासांचें तें देखों नये । उणें काय होइल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरा । दृष्टि करा सामोरी ॥ ३ ॥

३९८५. अगत्य ज्या नरका जाणें । कीर्तनीं[2] तो वीट मानी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नावडेसा जाला बाप । आलें पाप वस्तीसि ॥ छ ॥ नारायण नाहीं वाचे । ते यमाचे अंदण ॥ २ ॥ तुका ह्मणे अभक्तासी । माता दासी जग झोडी ॥ ३ ॥

३९८६. आह्मी हरिचे हरिचे । शूर[3] कळिकाळा यमाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामघोष बाण साचे । भाले तुळसी मंजुरेचे ॥ छ ॥ आह्मी[4] हरिचे हरिचे दास । कळिकाळावरि घालूं कास ॥ २ ॥ आह्मी[5] हरिचे हरिचे दूत । पुढें पळती यमदूत ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मांवरी । सुदर्शन[6] घरटी करी ॥ ४ ॥

३९८७. देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती । होतील विपत्ति ज्याज्या कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेघे[7] माझी वाचा पुढें कांहीं वाव । आणि दुजे भाव बोलायाचे ॥ छ ॥ मनाची[8] वांटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे घेईं विठ्ठलाचा छंद । आनंदाचा कंद विस्तारेल[9] ॥ ३ ॥

३९८८. पांडुरंगा आतां ऐका हे विनंती । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं आइकिलें संतांचिया मुखें । तें या मज लोकें भेडसांविलें[10] ॥ छ ॥ विष्णुदासां गति नाहीं तरावया । ह्मणती[11] गेले वांयां कष्टत[12] ही ॥ २ ॥ धिक्कारिती मज करितां कीर्तन । काय सांगों शीण ते काळिचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥ ४ ॥

३९८९. वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातिरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चलाचला संत जन । करा देवासी भांडण ॥ छ ॥ लुटालुटा पंढरपुर । धरा रखुमाईचा वर ॥ २ ॥ तुका ह्मणे चला । घाव निशाणी[13] घातला ॥ ३ ॥

३९९०. पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ प्रल्हादासी[14] पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥ छ ॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगों[15] ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर जाले तरी ॥ ३ ॥

---

१ पं. आणीक.—२ पं. विट माननें कीर्तनीं—३ दे. सुर त. शुर.—४ त. पं. आह्मी हरिचे दास ।.—५ त. पं. आह्मी हरिचे दूत ।.—६ दे. सुद्रसेन.—७ दे. न घेईं.—८ त. दे. मनाचे.—९ पं. विस्तारला.—१० दे. भडसाविलें.—११ पं. ह्मणतील वांयां.—१२ त. पं. कष्टति.—१३ दे. पं. निशानी.—१४ पं. प्रन्हादासी.—१५ दे. पांडुरंग.

३९९१. निजसेजेची अंतुरी । पादलिया कोण मारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसीं आह्मासी उबगतां । तुका विनवितो संतां ॥ ध्रु ॥ मूल मांडीवरी हागलें । तें बा कोणें रे त्यागिलें ॥ २ ॥ दासी कामासी चुकली । ते बा कोणें रे विकली ॥ ३ ॥ पांडुरंगाचा तुका पापी । संतसाहें काळासि दापी ॥ ४ ॥

३९९२. श्वानाचियापरी लोळें तुझ्या द्वारीं । भुंकों हरिहरि नाम तुझें ॥ १ ॥ भुंकीं उठीं बैसें न वजायें वेगळा । लुडबुडीं गोपाळा पायांपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां वर्म आहे ठावें । मागेन तें द्यावें प्रेमसुख ॥ ३ ॥

३९९३. सोइरे धाइरे दिल्याघेतल्याचे । अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सख्या गोत्रबहिणी सुखाचे संगेंती । मोकलुनी देती अंतकाळीं ॥ ध्रु ॥ आपुलें शरीर आपणा पारिखें । पैरावीं होतील नवल काई ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां सोड यांची आस । धरीं रे या कास पांडुरंगा ॥ ३ ॥

३९९४. जन्ममरणांची कायसी चिंता । तुझ्या शरणागतां पंढरीराया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय कैंवणा ॥ ध्रु ॥ हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार । तेथें कोण पार संसाराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझ्या चरणांची पाखर । असतां कळिकाळ पायां तळीं ॥ ३ ॥

३९९५. क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥ १ ॥ तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥ ३ ॥

३९९६. यातिगुणें रूपें काय ते वानर । तयांच्या विचारें वर्ते राम ॥ १ ॥ ब्रह्महत्यारासि पातकी अनेक । तो वंद्य वाल्मीक तिहीं लोकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे चोरीचा व्यापार । ह्मणा रघुवीर वेळोवेळां ॥ ३ ॥

३९९७. पानें जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तमाखू ओढूनि काढला जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ॥ ध्रु ॥ कीर्तनीं वडवड करील जो कोणी । बेडूक होउनी येइल जन्मा ॥ २ ॥ जयाचिये मनीं कथेचा कंटाळा । होती त्या चांडाळा बहु जाच ॥ ३ ॥ जाच होती पाठी उडती यमदंड । त्याचें काळें तोंड तुका ह्मणे ॥ ४ ॥

---

१ पं. तुह्मी.–२ पं. सांगाति–३ दे. त. आपुल्यासी–४ पं. परावे नागिले नवल०.–५ पं. काय–६ पं. नामाची–७ पं. "तेथें" नाहीं.–८ दे. त. पेट.–९ पं. याति न्य गुणे. दे. याति गुणें रूप.–१० पं. नाम हें चि सार विठोबाचें.

**३९९८.** कामांमध्यें काम । कांहीं ह्मणा रामराम । जाइलें भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥ छ ॥ जीतां जीसी जैसा तैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवुनि फांसा । काय करणें तें करीं ॥ २ ॥ केलें होतें[2] या चि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । तुका ह्मणे कर्में[3] । जाळोनियां तरसी ॥ ३ ॥

**३९९९.** तुज मज ऐसी परी । जैसे[4] तरंग सागरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोहींमाजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा ॥ छ ॥ देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥ २ ॥ तंतु पट जेवीं एक । तैसा विश्वेंसीं व्यापक ॥ ३[5] ॥

**४०००.** कोठें गुंतलासी योगीयांचे ध्यानीं । आनंदकीर्तनीं पंढरीच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय काज कोठें पडलीसे गुंती । कानीं न पडती बोल माझे ॥ छ ॥ काय शेषशयनीं सुखनिद्रा आली । सोय कां सांडिली तुह्मी देवा ॥ २ ॥ तुका[6] ह्मणे कोठें गुंतलेती सांगा । किती पांडुरंगा वाट पाहूं ॥ ३ ॥

**४००१.** माउलीसी सांगे कोण । प्रेम वाढवी ताहानें[8] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ॥ छ ॥ मायबापाची उपमा । तुज देऊं मेघश्यामा ॥ २ ॥ ते ही साजेना पाहातां । जीवलगा पंढरिनाथा ॥ ३ ॥ माय पाळी संसारीं । परलोक राहे दुरी ॥ ४ ॥ तैसा नव्हेसी अनंता । काळावरी तुझी सत्ता ॥ ५ ॥ तुका ह्मणे नारायणा । तुह्मां बहुत करुणा ॥ ६ ॥

**४००२.** कोडें आवडीचें । पुरवीना बाळकाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेव्हां कैसी ते माउली । जाणा काशासाटीं व्याली ॥ छ ॥ वत्साचिये आसे । धेनु धांवेना गोरसें[10] ॥ २ ॥ तुका ह्मणे घेरीं[11] । बाळ टाकिलें वानरीं ॥ ३ ॥

**४००३.** भक्तांचीं सांकडीं स्वयें सोसी देव । त्यांपाशीं केशव सर्वकाळ ॥ १ ॥ जये ठायीं कीर्तन वैष्णव करिती । तेथें हा श्रीपति उभा असे ॥ २ ॥ तुका ह्मणे देव सर्वाठायीं जाला । भरुनी उरला पांडुरंग ॥ ३ ॥

**४००४.** तुझिया नामाचा विसर न पडावा । ध्यानीं तो राहावा पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगितला मंत्र श्रीरामनामाचा । सर्वकाळ वाचा हें चि बोले ॥ छ ॥

---

१ दे. होइल.—२ पं. होय.—३ दे. कर्म—४ त. जैसा तरंग. पं. जैसे लवण—५ पं. 'एका जनार्दनीं कृपा । जगीं विश्रांति केली बापा ॥' हें कडवें अधिक आहे. या अभगांत नेहमींच्या शैलीप्रमाणें 'तुका' हीं अक्षरें शेवटच्या कडव्यांत नाहींत.—६ दे. 'तुका ह्मणे' हें कडवें नाहीं.—७ त. ये गा पांडुरंगा भेटी देई ।.—८ त. पं. तान्हे.—९ दे. कोडें.—१० पं. वोरसे.—११ दे. धरि.

उफराटें नाम वाल्मीक बोलीला । तो ही वंद्य केला नारायणें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तुझा चि भरवसा । धांवुनियां कैसा येसी देवा ॥ ३ ॥

४००५. अवघ्यां पातकांची मी एक रासी । अवघा तूं[1] होसी सर्वोत्तमु[2] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसा तैसा लागे करणें अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥ छ ॥ अवघें चि मज गिळियेलें काळें । अवघीं[3] च वळें तुझे अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां खुंटला उपाय । अवघे चि पाय तुझे मज ॥ ३ ॥

४००६. मूर्तिमंत देव नांदतो पंढरी । येर ते[4] दिगांतरीं प्रतिमारूप ॥ १ ॥ जाउनियां वना करावें कीर्तन । मानुनी पाषाण विठ्ठलरूप ॥ २ ॥ तुका ह्मणे मुख्य पाहिजे[5] हा भाव । भावापाशीं देव शीघ्र उभा ॥ ३ ॥

४००७. धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लावीन निशान जावया वैकुंठा । माजवीन पेठा कीर्तनाच्या ॥ छ ॥ नामाचिया नौका करीन सहस्रवरि । नावाडा श्रीहरि पांडुरंग ॥ २ ॥ भाविक हो येथें धरा रे आवांका । ह्मणे दास तुका शुद्धयाति ॥ ३ ॥

४००८. अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें । राहे[6] समागमें अंगसंगें ॥ १ ॥ अंगसंगें असे कर्मसाक्ष देव । जैसा ज्याचा भाव तैसा राहे ॥ २ ॥ फळपाकीं देव देतील[7] प्राणीयें । तुका ह्मणे नये सर्वे कांहीं ॥ ३ ॥

४००९. संसारीं असतां हरिनाम घेसी । तरीं च उद्धरसी पूर्वजेंसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघीं च इंद्रियें न येतील[8] कामा । जिव्हे रामनामा उच्चारीं वेगीं ॥ छ ॥ शरीरसंपत्ति नव्हे रे आपुली । भ्रांतीची साउली अवघी व्यर्थ ॥ २ ॥ तुका ह्मणे सार हरिनामउच्चार । येऱ्हवी येरझार हरीविण ॥ ३ ॥

४०१०. सावळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदयीं माझे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणीक[9] कांहीं इच्छा आम्हां[10] नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगे ॥ छ ॥ जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आह्मांसी सहज द्यावें आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज ऐसे[11] दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आह्मां ॥ ३ ॥

४०११. हिरोनियां नेला मुखींचा उच्चार । पाडिलें[12] अंतर जवळीच ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ द्वैताचिये कैसा पाडियेलों हातीं । वहुत करिती ओढाओढी ॥ छ ॥

---

१ पं. तूं चि.–२ त. सर्वोत्तम.–३ पं. अवघे चि वळ.–४ त. पं. 'ते' नाहीं –५ पं. पाहिजे तो भाव. दे. पाहिजे भाव –६ दे. राहें –७ दे. त. देती.–८ पं. नाम्या –९ त. आणिक –१० त. नाहीं मज चाड.–११ पं. असाजि दयाळा । धुंडितां सकळा०.–१२ त. पं. पडिलें.

काय करूं मज नागविलें आळसें । वहुत या सोसें पीडा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुलिया सवा । करूनियां देवा राखें मज ॥ ३ ॥

४०१२. भक्तांहूनि देवा आवडतें काइ । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नावडे वैकुंठ क्षीराचा सागर । धरोनि अंतर राहे दासा ॥ ध्रु ॥ सर्वभावें त्याचें सर्वस्वें[3] ही गोड । तुळसीदळ कोड करुनी घ्यावें ॥ २ ॥ सर्वसें त्याचा ह्मणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तिसुखाचा बांधिला । आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥ ४ ॥

४०१३. राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लक्ष्मीनिवासा पाहें दिनबंधु । तुझा लागो छंदु सदा मज ॥ २ ॥ तुझे नामीं प्रेम देईं अखंडित । नेणें तप व्रत दान कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें हें चि गा मागणें । अखंड ही गाणें नाम तुझें ॥ ४ ॥

४०१४. हरी तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ॥ १ ॥ अंतरीं विश्वास अखंड नामाचा । कायामनेंवाचा देईं हें चि ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥ ३ ॥

४०१५. गाबाळाचे ग्रंथीं कां रे पडां सदा । मिथ्या भेदवादा वागवितां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संसारगावाळीं पडसी निखळ । जालासी तूं खळ तेणें मनीं ॥ ध्रु ॥ साधनसंकटीं गुंतसी कासया । व्यर्थ गा अपायामाजी गुंती ॥ २ ॥ निर्मळ फुकाचें नाम गोविंदाचें । अनंतजन्माचे फेडी मळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे नको करूं कांहीं कष्ट । नाम वाचे स्पष्ट हरि बोलें ॥ ४ ॥

४०१६. भाव धरिला चरणीं ह्मणवितों दास । अहिर्निशीं ध्यास करीतसें ॥ १ ॥ करीतसें ध्यास हृदयीं सकळ । भाव तो सबळ धरियेला ॥ २ ॥ धरिले निश्चळ न सोडीं ते पाय । तुका ह्मणे सोय करीं माझी ॥ ३ ॥

४०१७. तुझें नाम गाया न सोपें डवळा । गाऊं कळवळा प्रेमाचिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येईल आवडी जैसी अंतरींची । तैसी मनाची कीर्ती गाऊं ॥ २ ॥ माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ राम कृष्ण ॥ ३ ॥ अबद्ध चांगलें गाऊं जैसें तैसें । वाहे वाळ जैसें मायवापा ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज न लावीं वांकडें । मी तुझें बोवडें वाळ तान्हें ॥ ५ ॥

---

१ त. ठेवीं.—२ दे. आवडे तें.—३ पं. सर्वस्व.—४ पं. मना लागो छंदु तुझा मज।—५ पं. आतां तरी.—६ पं. माने.—७ पं. अनंता जन्मींचे मळ फेडी.—८ पं. येथील.—९ पं. नामाची.—१० पं. वांकडें गाऊं भलतैसें.

४०१८. आतां तुज मज नाहीं दुजेपण । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज रूप रेखा नाम गुण नाहीं । एक स्थान पाहीं गांव सिंव ॥ ध्रु ॥ नावडे संगती तुज दुजयाची । आपुल्या भक्तांची प्रीति तुह्मां ॥ २ ॥ परि आह्मांसाटीं होसील सगुण । स्तंभासी फोडून जयापरि ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसें तुज काय उणें । देई दरुषण चरणांचें ॥ ४ ॥

४०१९. करणें तें हें चि करा । नरका अघोरा कां जातां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ॥ ध्रु ॥ शरणागतां देव राखे । येरां वाखे विघ्नाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥ ३ ॥

४०२०. आणीक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा वैरपडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ॥ ध्रु ॥ अनाथाचा नाथ देव । अनुभव सत्य हा ॥ २ ॥ तुका ह्मणे वहुतां रिती । धरा चित्तीं सकळ ॥ ३ ॥

४०२१. मुखें सांगे ब्रह्मज्ञान । जन लोकाची कापितो मान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्ञान सांगतो जनासी । नाहीं अनुभव आपणासी ॥ ध्रु ॥ कथा करितो देवाची । अंतरीं आशा वहु लोभाची ॥ २ ॥ तुका ह्मणे तो चि वेडा । त्याचें हाणूनि थोबाड फोडा ॥ ३ ॥

४०२२. कांहीं दुसरा विचार । न लगे करावा चि फार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सेत्या ना चौधरी । पांडेपण वाहे शिरीं ॥ ध्रु ॥ पाप न लगे धुंडावें । पाहिजे तेंरि तेथें जावें ॥ २ ॥ जकातीचा धंदा । तेथें पाप वसे सदा ॥ ३ ॥ गाई हैंसी हेड । तुप विंकी महा द्वाड ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाहीं । तेथें पुण्या रीघ नाहीं ॥ ५ ॥

४०२३. तुझी माझी आहे जुनी सोयरीक । आधीं वंधु लेंक मग जाले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांटेकरी ह्मूंण न पुसती आतां । परि आहे सत्ता करीन ते ॥ ध्रु ॥ लेंकीचें लेंकरूं नातु जाल्यावरी । मंगळा ही दुरि अंतरलों ॥ २ ॥ वाइलेचा भाऊ पिसुनीं सोयरा । ह्मणउनि करा विनोद हा ॥ ३ ॥ आकुळीं तों करूं नये तें चि केलें । न वोलावें भलें तों चि आतां ॥ ४ ॥ न ह्मणसी लेंकी माउसी वहिणी । आह्मां केलें धणी पापाचें त्या ॥ ५ ॥ वहु पांचांजणी केली विटंवना । नये दाऊं

१ दे. सगाति—२ दे. शुद्धपण.—३ पं. वरपडे.—४ पं. करणें नलगे चि फार.—५ पं. ते.— ६ दे. ह्मसी.—७ पं. विकिती —८ पं. रिंग.—९ पं. लोक.—१० दे. ह्मून पुसती० पं. ह्मूनी पुसति०.— ११ पं. पिसुन.

जना तोंड ऐसें ॥ ६ ॥ तुका ह्मणे आधीं मूळ तें चि धरूं । मागील तें करूं उरी आतां ॥ ७ ॥

४०२४. मागें बहुत जाले खेळ । आतां बळ वोसरलें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ हालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ॥ छ्र ॥ भाजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहतां घडी । जगा जोडी अंगारा ॥ ३ ॥

४०२५. आळस आला अंगा । धांव घालीं पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ सोसूं शरीराचे भाव । पडती अवगुणाचे घाव ॥ छ्र ॥ करावीं व्यसनें । दुरी येऊनि नारायणें ॥ २ ॥ जवळील दुरी । जालों देवा धरीं करीं ॥ ३ ॥ ह्मणउनि देवा । वेळोवेळां करीं धावा ॥ ४ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । दुरी धरूं नेका अंगा ॥ ५ ॥

४०२६. झंवविली[2] महारें । त्याची व्याली असे पोरें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ करी संताचा मत्सर । कोपें उभारोनि कर ॥ छ्र ॥ बीज तैसें फळ । वरी आलें अमंगळ ॥ २ ॥ तुका ह्मणे ठावें । ऐसें जालें अनुभवें ॥ ३ ॥

४०२७. पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंता वरी बोल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेईना करितां पापाचे डोंगर । दुर्जन पामर दुराचारी ॥ छ्र ॥ नाठवी तो खळ आपुली करणी । देवासी निंदोनि बोलतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडा लागो काटी । नाहीं जगजेठी जया चित्तीं ॥ ३ ॥

४०२८. आधीं देह पाहता वाव । कैचा प्रारब्धासी ठाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे रडतोसी माना । लागें विठ्ठलचरणा ॥ छ्र ॥ दुजेपण जालें वाव । त्रिभुवनासि[3] नाहीं ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे खरे पाहें । विठ्ठल पाहोनियां राहें ॥ ३ ॥

४०२९. स्त्रिया धन बों[4] हें खोटें । नागवले मोठे मोठे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि सांडा दोन्ही । सुख पावाल निदानीं ॥ छ्र ॥ सर्वदुःखासी कारण । हीं च दोन्हींचीं[5] प्रमाण ॥ २ ॥ आशा सर्वस्वें सांडावी । तेणें निजपदवी पावावी ॥ ३ ॥ देह लोभें नाडला ॥ घाला यमाचा पडला ॥ ४ ॥ तुका ह्मणे निरापेक्षा । कांहीं न धरावी अपेक्षा ॥ ५ ॥

४०३०. जेंजें[6] व्हावें संकल्पें । तें चि पुण्य होय पाप ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कारण तें मनापासीं । मेळविल्या मिळे रसीं ॥ छ्र ॥ सांडी मांडी हाली चाली । राहे तरि भली बोली ॥ २ ॥ तुका ह्मणे सार । नांव जीवनाचे सागर ॥ ३ ॥

---

१ पं नको.–२ दे. 'झवविलें' असें मागाहून केलें आहे पं. झविली.–३ पं. त्रिभुवनीं.–४ पं. वहु खोटें । नागविले०.–५ पं. दोन्ही च प्रमाण.–६ दे. त. होआवे.

**४०३१.** ओले मातीचा भरवसा । कां रे धरिशी मानसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळे चिरीव चांगले । वृद्धपणीं सरक्या जाले ॥ छ्र ॥ नाक सरळ चांगलें । येउन [1]हेनवटी लागलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें नाहीं । [2]तंवें हरिला भज रे कांहीं ॥ ३ ॥

**४०३२.** तुह्मां सांगतों कलयुगा फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां ह्मणतील कंटक । ऐसा पाडिती दंडक ॥ छ्र ॥ [3]स्त्रियां पूजुनि सरे देती । भलते स्त्रियेसि भलते जाती ॥ २ ॥ श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस । [4]अंगीकारी मद्यमांस ॥ ३ ॥ चारी वर्ण अठरा याती । कवळ करिती एक पंक्ती ॥ ४ ॥ ह्मणती अंबेचा क्रीडाकल्लोळ । शिवरूप प्राणी सकळ ॥ ५ ॥ ऐसें [5]होईल शकुन देतों । अगोदर सांगुन [6]जातों ॥ ६ ॥ तुका सद्गुरुदास्य करी । सिद्धि पाणी वाहे घरीं ॥ ७ ॥

**४०३३.** त्या हरिदासांची भेटी घेतां । नर्का उभयतासी जातां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माते परीस थोरी कथा । भाड घेतां न लाजे ॥ छ्र ॥ देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ॥ २ ॥ तुका ह्मणे नरकगांवा । जाती हांवा धरोनि ॥ ३ ॥

**४०३४.** देव [7]गांवा ध्यावा ऐसें जालें । परदेशी नाहीं [8]उगलें । वडील [9]आणि धाकुलें । नाहीं ऐसें जालें दुसरें तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं लागत मुळीहूनि । सुहृदजन आणि जननी । [10]लागल्या लागें त्यागें सांडूनि । लोभीये मांडणी संयोगाची ॥ छ्र ॥ [11]शिवें [12]बोटला जीवदशे । बहुत ओतत आलें ठसें । हीन जालें भूषणाचें इच्छे । निवडती कैसे गुणागुण ॥ २ ॥ [13]आतां हे [14]हुतांश तों वरें । अवघे एक च मोहरें । पिटिलियाविण नव्हे खरें । निवडे वरें जातिशुद्ध ॥ ३ ॥ तुका उतावेळ याजसाटीं । आहे तें निवेदीन पोटीं । आवडी द्यावी जी येथें लाटी । तुझी जगजेठी कीर्ती [15]वोखाणीन ॥ ४ ॥

**४०३५.** भोगी जाला त्याग । गीती गातां पांडुरंग । इंद्रियांचा लाग । आह्मांवरूनि चुकला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करुनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं [16]तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥ छ्र ॥ तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंची चारा धरी । आणुनियां घरीं । मुखीं घाली बाळका ॥ २ ॥ तुका ह्मणे ये[17] आवडी । आह्मीं पांयीं दिली बुडी । आहे तेथें जोडी । [18]जन्मांतरीचें ठेवणें ॥ ३ ॥

---

१ दे. हनटी. पं. हानुवटी –२ पं. तवरी लाभ विचारी काहीं.–३ पं. 'स्त्रिया'० याच्या पूर्वी पुढील कडवें जास्त आहे :–'भक्ति भाविका उच्छेद । ब्रह्मज्ञानें करिती छंद ॥'.–४ पं. अंगीकारिति.–५ दे. त. होल.–६ त. जाणें.–७ पं. 'गावा' नाहीं –८ पं. उगवलें.–९ पं. 'आणि' नाहीं.–१० दे. लावल्या.–११ त. जीव.–१२ पं. वाटला –१३ पं. 'आतां हे' हें कडवें नाहीं.–१४ त. उतांग.–१५ पं. वाखाणी.–१६ दे. नळमळ –१७ त. पं. 'ये' नाहीं.–१८ दे. त. जन्मांतरी च ठेवणें.

४०३६. कुंकवाची ठेवाठेवी । बोडकादेवी काशाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दिवस गमा भरा पोट । कों[1] गे नेट[2] नटावा ॥ छ ॥ दिमाख हा कोणां दावा । लटकी जीवा चरफड ॥ २ ॥ तुका ह्मणे झोंडगीं हो । फुंदा कां हो कोरडी ॥ ३ ॥

४०३७. तुझें प्रेम माझ्या हृदयीं आवडी । चरण न सोडीं पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कासया सिं[3]णविसी थोरिवाकारणें । काय तुझें उणें होइल देवा ॥ छ ॥ चातकाची चिंता हरली जळधरें । काय त्याचें सरे थोरपण ॥ २ ॥ चंद्र चकोरांचा पुरवी सोहळा । काय त्याची कळा न्यून होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहें ॥ ४ ॥

४०३८. आह्मी आइते जेवणार । न लगे सोसावे डोंगर । सुखाचा वेव्हार । तेणें चि वाढलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवा जोडला मिरासी । ठाव जाला पायांपासीं । नव्हे आणिकांसी । रीघ तेथें यें[4]ावया ॥ छ ॥ बळी दिला जीवभाव । नेणें आणिकांचें नांव । धरिला एकें[5] भाव । [6]तो विश्वास फळला ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों वळी । आह्मी निकट जवळी । बोलिलों तें पाळीं । वचन स्वामी आमचें ॥ ३ ॥

४०३९. न लगावी दिठी । माझी तुझे मुखवटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आधीं पाउलें पाउलें । ते मी पाहेन तें भलें ॥ छ ॥ देईन हे काया । वरि सांडणें सांडाया ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । बहु आवडसी जीवा ॥ ३ ॥

४०४०. कोण आमचीं योगतपें । करूं बापें जाणावीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गीत संतसंगें गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ॥ छ ॥ आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ॥ २ ॥ तुका ह्मणे इंद्रियांसी । ये चि रसीं रंगवूं ॥ ३ ॥

४०४१. नाम तारक भवसिंधु । विठ्ठल तारक भवसिंधु ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामधारक तया अरि मित्रु । समता त्यागुनियां क्रोधु ॥ छ ॥ नामधारक तया । कदापि न घडे विषयाचा वाधु ॥ २ ॥ ज्या नामें तरले शुकादिक । नारद संत मुनिजन साधु ॥ ३ ॥ जाणूनियां जे नसरें । ते नेणति जैसा गज अंधु ॥ ४ ॥ सहज तुकया । नाम चि जपतां स्वरुपीं वेधु ॥ ५ ॥

४०४२. आह्मां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा एका भावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरी च हरिचे[7]दास ह्मणवितां श्लाघीजे । निर्वासना कीजे चित्त

१ त. कोणे—२ दे. नेटनेटावा.—३ दे. सिनासि थोरिवां कारणें. त. सिणावें थोरिवा कारणें. पं. सिणविसी थोडिया कारणे ।.—४ त. जावया. पं. व्हावया —५ पं. एकविध.—६ पं. तो चि.—७ पं. भक्त.

आधी ॥ ध्रु० ॥ गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मागों[1] तुज ॥ २ ॥ तुका[2] ह्मणे देवा ऐसी यांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

**४०४३.** पावलों हा देह काकतालिन्यायें[3] । न घडे उपायें घडों आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां माझीं खंडीं देह देहांतरें । अभय दातारें देऊनियां ॥ ध्रु० ॥ अंधळ्याचे पाठीं धनाची चरवी । अघटित तैंवि घडों आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे योग घडला बरवा । आतां कास देवा न सोडीं मी ॥ ३ ॥

**४०४४.** कळे परि न सुटे गांठी । जालें पोटीं कुपथ्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अहंकाराचें आंदणें जीव । राहे कींव केली ते ॥ ध्रु० ॥ हेंकुडाची एकी च वोढी । ते ही खोडी सांगती ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगों किती । कांहीं चित्तीं न राहे ॥ ३ ॥

**४०४५.** सांडावी हे भीड अधमाचे चाळे । मद्यपी[4] बरळे भलत्या छंदें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे तंव तुह्मी नाहीं जी दिसत । कां हें अनुचित वदलेत[5] ॥ ध्रु० ॥ फांटा जाला[6] त्यासी नाहीं वोढा वारा । वेरसा चि खरा हाटो[7] गुण ॥ २ ॥ तुका[8] ह्मणे नाहीं ज्याच्या बापा ताळा । तो देखे विटाळा संतां अंगीं ॥ ३ ॥

**४०४६.** आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहातां लोचनें[9] सुखावले[10] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दृष्टीपुढें ऐसा चि तूं राहीं । जों मी तुज पाहें पांडुरंगा[11] ॥ ध्रु० ॥ लाचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडीं ऐसें जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे आम्ही केली जे लडिवाळी । पुरवावी आळी मायबापें ॥ ३ ॥

**४०४७.** तिळ एक अर्ध राई । सीतबुंदें[12] पावे काई । तया सुखा नाहीं । अंतपार पाहतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी करा लाहो । नका मागें पुढें पाहों । अवघ्यामध्यें आहों । अवघे[13] सावचित्त तों ॥ ध्रु० ॥ तीर्थें न येती तुळणी । आजिया सुखाची धणी । जे कासी गयेहुनी । जीं आगळीं असती ॥ २ ॥ येथें धरी लाज । वर्णा अभिमान काज । नाडला सहज । तुका ह्मणे तो येथें ॥ ३ ॥

**४०४८.** विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती[14] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठ्ठलविठ्ठल भावें ह्मणे वाचे । तरी तो काळाचे दांत टेंसी[15] ॥ ध्रु० ॥

---

१ त. मागों.–२ पं. 'तुका ह्मणे' याच्या पूर्वी 'सगुणीं निर्गुणीं एक चि आवडी । चित्तें दिली बुडी चिदानंदी ॥ वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोहीं । नाठवती देहीं देहभाव ॥' हीं दोन कडवीं नवीन आहेत व 'तुका ह्मणे' याच्या बद्दल 'नामा ह्मणे' असें आहे.–३ पं.०टाळिन्यायें–४ दे. त. मद्यपीर.–५ पं. वदलेती.–६ पं. आला.–७ पं. हा तो.–८ त. तुका ह्मणे ज्याच्या बापा नाहीं ताळा ।.–९ पं. हें मन.–१० दे. सुखावलें.–११ पं. वेळोवेळां.–१२ पं. सीतबिंदु.–१३ पं. अवघे भाव चित्त जों. दे. त. सावचित्त तों.–१४ दे. उद्धरिलि.–१५ पं. टेचि.

बहुत[1] तारिले सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥
तुका ह्मणे ऐसा ही ऐकोनियां कीर्ती । धरिला एकांतीं हृदयामाजी ॥ ३ ॥

४०४९. ओळे भक्त[2] भाव धरिती मानसीं । त्यासी[3] हृषीकेशी जवळी च ॥ ॥ ध्रु. ॥ भाव नाहीं मनीं अभाविक सदा । त्याचिया मी खेदा काय सांगों ॥ १ गणिकेसारिकीं[4] नामें उद्धरिलीं । सज्ञानें पडिलीं खटाटोपीं ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध माझी जाति । थोर केली ख्याती हरिनामें ॥ ३ ॥

४०५०. आड पडे काडी । तरि ते बहुत[5] पाणी खोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. दुर्जनाचे[6] संगती । बहुतांचे घात होती ॥ ध्रु ॥ एक पडे मासी । तरी ते बहु नासी ॥ २ ॥ तुका ह्मणे रांड । ऐसी कां ते व्याली भांड ॥ ३ ॥

४०५१. पंढरीचें बां[7] भूत मोटें । आल्या गेल्या झडपी वाटे[8] ॥ १ ॥ तेथें[9] ज नका कोणी । गेले नाहीं आले परतोनि ॥ २ ॥ तुका पंढरीसी गेला । पुन्हा ज नाहीं आला ॥ ३ ॥

४०५२. बरवे दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. सारअसाराचीं[10] पोतीं । ग्राहिक पाहोनि करा[11] रितीं ॥ ध्रु ॥ उगे चि फुंगवूं[12] न गाल । पूर्ण सांठवावा माल ॥ २ ॥ सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रि विकरा ॥ ३ ॥ तुका जाला वाणी । चुकवुनि चौऱ्यासीच्या खाणी ॥ ४ ॥

४०५३. काय करूं आतां या मना । न संडी विषयांची[14] वासना । प्रार्थितां राहेना । आदरें पतना नेऊं पाहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां धांवें[15] धावें श्रीहरी । गेलों वांयां नाहीं तरी । न दिसे कोणी आवरी । आणीक दु तयासी ॥ ध्रु ॥ न राहे एके ठायीं एकी घडी । चित्त तडतडा तोडी । भरं[16] विषयभोवडीं । घालूं पाहे उडी भवडोहीं ॥ २ ॥ आशा तृष्णा कल्पना पापिणी[17] घात मांडला माझा यांणीं । तुका ह्मणे चक्रपाणी । काय अजोनि पाहातोसी ॥ ३ ॥

४०५४. पाषाण परिस भूमि जांबूनंद[18] । वंशाचा संबंध घातयाचा ॥ १ ॥ ध्रु. ॥ सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गांढा[19] राक्षसांचा ॥ ध्रु

---

१ पं. वहुता –२ दे. त. भक्तिभाव.–३ पं. तया.–४ पं. गणिकेसारिखी –५ पं. वहु पाणी कोंडी.–६ पं. एसी दुर्जनाची सगती ।.–७ पं. "वा" नाहीं.– ८ त. नेटें.–९ पं. 'तेथे जाऊं नका०' या कडव्याच्या पूर्वी 'वहु खेचरींचे रान । जातां वेडें होय मन ॥' हें कडवें अधिक आहे – १० दे. त. सारासाराचीं –११ पं. "करा रितीं" यावद्दल "करीसी".–१२ दे. पं. फुगों. त. फुगऊ – १३ दे. त. कुडत्रिम.–१४ पं. विपयवासना.–१५ दे. त. धांवधावें.–१६ त. भग्ले विपयाचे वोढीं । देऊं पाहे वुडी भवडोहीं ॥ दे. घालू पाहे या हे वुडि । या भवडोहीं.–१७ पं. पापाणी – १८ पं. त. जांवुनद.–१९ पं. रोकडा

ऐसी सहस्र त्या सुंदरा कामिनी । माजी मुख्य[1] राणी मंदोदरी ॥ २ ॥ पुत्रपौत्राचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरी इंद्रा आणी ॥ ३ ॥ चौदा चौकडियाँ आयुष्यगणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्याचे देव वांदवडी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ५ ॥

४०५५. पापाचीं संचितें देहासी दंडणां[2] । तुज नारायणा बोल नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पेरी कडू जिरें मागे अमृ[3]तफळें । अर्का वृक्षा केळें कैसीं येती ॥ छ ॥ सुख अथवा दुःख भोग हा[4] देहाचा । नास हा ज्ञानाचा न[5] करावा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां देवा कां रुसावें । मनासी पुसावें काय केलें ॥ ३ ॥

४०५६. लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी भक्ताची माउली । करी कृपेची साउली ॥ छ ॥ माय बाळकासी । जीव भाव वेची तैसी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाड । नाहीं शरणागता आड ॥ ३ ॥

४०५७. आपुलेंसें करुनी घ्यावें । आश्वासावें नाभीसें[6] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि धरिले पाय । आवो माय विठ्ठले ॥ छ ॥ कळ[7]लासे सीर्ण चित्ता । शम आतां करावा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवीं वसें । मज नसें वेगळा[9] ॥ ३ ॥

४०५८. तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळों आलें बहुता रीती । पांडुरंगा माझ्या चित्तीं ॥ छ ॥ सोकलिली आस । सर्वभावें जालों दास ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं चि खरा । येर[10] वाउगा पसारा ॥ ३ ॥

४०५९. खोंकरी ओं[11]धण होय पाकसिद्धि । हें तों घडों कधीं शके चि ना ॥ १ ॥ खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलिया ॥ २ ॥ पालथे घागरी रिचवितां जळ । तुका ह्मणे खळ तैसे कथे ॥ ३ ॥

४०६०. नागलें देखोनि चांगलें बोले । आपुलें वेचूनि त्याजपुढें खुले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अधमाचे ओंगळ गुण । उचित नेणें तो धर्म कोण ॥ छ ॥ आर्तभूता न घों[12]ली पाण्याचा चुळ । न मां[13]गे त्यासी घाली साखर गुळ ॥ २ ॥ एं[14]कासी आड पडोनि होंकरी । एकासी देखोनि लपवी भाकरी ॥ ३ ॥ एकासी धड न बोले

---

१ पं. मुख्य राणी –२ दे. दडण –३ त. अमतफळ । आर्की वृक्षा केळ०. दे. अमृतफळ । आर्का वृक्षफळे०.–४ दे. त. हो देहेचा.–५ पं. करु नये.–६ त. नाभीसी –७ त. बाटविली हे तळमळ चित्ता.–८ दे. सीन चिंता –९ दे. त. वेगळे –१० पं. येका उगा० –११ दे. आवन. पं. आंधण.– १२ दे. घली –१३ पं. न मागत्यास देई साकर गुळ –१४ पं. 'एकासी आड०' याच्या आधीं पुढचें कडवें 'एकासी धड' हें आहे; आणि 'एकासी आड' हें कडवें 'येका देखोनी लपवी भाकरी । येकासी आड पडोनी हो करी ।' असें आहे.

वाचा । एकासी ह्मणे मी तुझे[1] बांदीचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ते गाढव[2]पशु । लाभेंविण केला आयुष्यनाशु ॥ ५ ॥

४०६१. पिंडपोषकाच्यां[3] जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टिभेटी न हो त्याची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशालागीं पात्र जाला ॥ छ ॥ पोहों नेणें[4] कासे लावितो आणिका । ह्मणावें त्या मूर्खा काय आतां[5] । ॥ २ ॥ सिणलें तें गेलें सिणलियापासीं । जाली त्या दोघांसी एक गति ॥ ३ ॥ तुका ह्मणे अहो[6] देवा दिनानाथा । द[7]रुषण आतां नको त्याचें ॥ ४ ॥

४०६२. संतचिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पडिले दुःखाचे सागरीं । वहावले ते[8] भवपुरीं ॥ छ ॥ कामक्रोधलोभ चित्तीं । वरि[9]वरि दाविती विरक्ती ॥ २ ॥ आशापाशीं बांधोनि चित्त । ह्मणती जालों[10] आह्मी मुक्त ॥ ३ ॥ त्यांचे लागले संगती । जाली त्यांसी[11] ते चि गति ॥ ४ ॥ तुका ह्मणे शब्दज्ञानें । जग नाडियेलें तेणें ॥ ५ ॥

४०६३. दोष करूनि आह्मी पतित सिद्ध जालों । पावन मागों आलों ब्रीद तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां पतिता तारावें कीं ब्रीद हें[12] सोडावें । यांत जें पुरवे तें चि सांगा ॥ छ ॥ उद्धार तुमच्यानें नव्हे हो[13] श्रीहरि । सोडा झडकरी ब्रीद आतां ॥ २ ॥ तें ब्रीद घेउनी हिंडों दारोदारीं । सांगूं तुझी[14] कीर्ती रे पांडुरंगा ॥ ३ ॥ देवें हारविलें ब्रीद हें सोडिलें । पतितें जिंकिलें आह्मीं देवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मीं उठलों[15] दैन्यवरि । विचारा श्रीहरी तुह्मी आतां ॥ ५ ॥

४०६४. राम कृष्ण ऐसीं उच्चारितां[16] नामें । नाचेन मी प्रेमें संतांपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय घडेल तें घडो ये[17] सेवटीं । लाभ हाणी[18] तुटी देव जाणे ॥ छ ॥ चिंता मोह आशा ठेवुनि[19] निराळीं । देईन हा बळी जीव पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं उरों नेदीं उरी । सांडीन हे थोरी ओवाळोनी ॥ ३ ॥

४०६५. देव धरी नाना सोंगें[20] । नाम श्रेष्ठ पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो हा गवळियाचे घरीं । नाम सारितो मुरारि ॥ छ ॥ धन्य यशोदेचें[21] प्रारब्ध । नाचे अंगणीं गोविंद ॥ २ ॥ ऐशीं[22] भक्तांसाटीं देवें । नाना धरियेलीं नांवें ॥ ३ ॥ होय दासांचा जो दास । तुका ह्मणे विठ्ठलास ॥ ४ ॥

---

१ पं. तुमच्या वंदीचा.—२ पं. गावपशु.—३ पं. पोसकाच्या. दे. त. पोशकाच्या.—४ दे. नये.—५ पं. ऐसें—६ पं. देवा अहो.—७ पं. दर्शन मागुता नको०.—८ पं. 'ते' नाहीं—९ पं. वरी दाविती.—१० पं. आह्मी जालों.—११ पं. त्यांची.—१२ पं. त. 'हें' नाहीं—१३ पं. तो.—१४ पं. तुझी हरि कीर्ति जगा.—१५ पं. उठों.—१६ पं. उच्चारीन.—१७ पं. या सेवटीं.—१८ पं. आणि.—१९ पं. टेवीन—२० पं. सोंग.—२१ पं. यशोदा प्रारब्ध.—२२ दे. ऐशा.

४०६६. आइत्या भाग्या धणी व्हावें । केणें[2] घ्यावें न सरे तें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केणें[2] आलें[3] पंढरपुरीं[4] । उधाराचें लाभीक ॥ ध्रु ॥ बाखराची करुनी रीती । भरा पोतीं लवलाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे संतांपाडें । करूं पुढें बाखती ॥ ३ ॥

४०६७. जन्मोजन्मीं दास । व्हावें हे[5] चि माझी आस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरीचा वारकरी । वारी चुको नेदीं हरी ॥ ध्रु ॥ संतसमागम । अंगीं स्थिरावलें[6] प्रेम ॥ २ ॥ स्नान चंद्रभागे । तुका ह्मणे हें चि मागें ॥ ३ ॥

४०६८. कांगा कोणी न ह्मणे पंढरीची आई । बोलाविते पाहीं चाल नेटें ॥ १ ॥ तेव्हां माझ्या मना होइलें[7] समाधान । [8]जाइल सर्व शीण जन्मांतरिंचा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी होशील[9] माउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥ ३ ॥

४०६९. वेद [10]अनंत बोलिला । अर्थ इतका चि साधिलों[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विठोबासी[12] शरण जावें । निजनिष्ठा[13] नाम गावें ॥ ध्रु ॥ सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतका चि निर्धार ॥ २ ॥ अठरापुराणीं सिद्धांत । तुका ह्मणे हा चि हेतें[14] ॥ ३ ॥

४०७०. मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखें तरी लव धडधडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लभे हा काळें[15] न सुटे हातींचा । न बोलवे वाचा खोडावली[16] ॥ ध्रु ॥ न पवे धांवणें नें[17] पवे चि लाग । नें[17] चलती माग धरावया ॥ २ ॥ भेणें तरि अंगा लावियेल्या राखा । [18]परी त्यासी वाखा करीतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेदी हाका मारूं देवा । लोकापाठी हेवा लागलासे ॥ ४ ॥

४०७१. धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माया प्रसवली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कठिण हृदय तया चांडाळाचें । जो[19] नेणे[20] पराचें दुःख कांहीं ॥ ध्रु ॥ आपुला हा प्राण तैसे सकळ लोक । न करी विवेक पशु जैसीं[21] ॥ २ ॥ तुका ह्मणे [22]सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे[23] रडतसे ॥ ३ ॥

४०७२. गरुडावारि बैसोनि येतो जगजेठी । त्याचे चरणीं मिठी घालूं चला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांवळें रूपडें देखिलें लोचनीं । शंख चक्र दोन्ही शोभताहे ॥ध्रु॥ पीतांबर झळके हे चि त्याची खूण । वाकी रुणझुण करिताती ॥२॥

---

१ पं. भागाधीन व्हावें । कोणे घ्यावें मस्तकीं ॥ –२ दे. केनें.–३ दे. आहे.–४ पं. पटरपुरा.–५ पं. 'हे' नाहीं.–६ दे. त. थिरावलें –७ पं. होय.–८ पं. जाय.–९ पं. होईल.–१० दे. त. अनंता –११ दे. त. शोधिला.–१२ पं. विठोवाला.–१३ दे. निजनिट.–१४ त. होत.–१५ पं. कळ.–१६ पं. वेडावली.–१७ पं. न लपवे चि लाग । न लगे च माग०.–१८ पं. तरी याची –१९ त. दे. 'जो' नाहीं.–२० त. नेणे चि पराचें –२१ त. हीण पं. काहीं.–२२ पं. सुरा कापीतसे गळा ।.–२३ पं. वेळा.

गरुडाचा चपेटा येत असे नेटें । कस्तुरीमळवट शोभताहे ॥ ३ ॥ पदक[1] एकावळी शोभताहे कंठीं । तुका ह्मणे मिठी घालूं चला ॥ ४ ॥

४०७३. नाहीं पाक होत उफराटे चाली । बोलिली ते केली व्हावी नीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं मानूं येत वांजटाचे[2] बोल । कोरडे च फोल चवी नाहीं ॥ ध्रु ॥ तरुवरा[3] आधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ ह्मणा त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे किती ठेंकलीं[4] वापुडीं । गव्हा आहे गोडी मांडें पुऱ्या ॥ ३ ॥

४०७४. जाली हरिकथा रंग वोरसला । उचितासी आला पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांटितो[6] हें प्रेम उचिताचा दाता । घेई रे तूं आतां धणीवरि ॥ ध्रु ॥ प्रेम देऊनियां अवघीं सुखीं केलीं । जीं[7] होतीं रंगलीं विटलीं तीं[8] ॥ २ ॥ तुकें हें दुर्बळ देखियलें संतीं । ह्मणउनि पुढती आणियेलें ॥ ३ ॥

४०७५. संकलिपला तुज सकळ[9] ही भाव । कोण एक ठाव उरला तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इंद्रियव्यापार जेंजें कांहीं कर्म । करितों[10] ते धर्म सकळ तुझे ॥ ध्रु ॥ माझें हित फार लागला विचार । तुज सर्व भार चालवणें ॥ २ ॥ जो कांहीं लौकिक करिसी तो तुझा । अपमान पूजा कांहींतरि ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों राहिलों निश्चिंतें[11] । तुज कळे हित तैसें करीं ॥ ४ ॥

४०७६. भय नाहीं भेव । अनुतापीं नव्हतां जीव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें देवाची तळमळ । तेथें काशाचा विटाळ ॥ ध्रु ॥ उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तें[12] । होय आवडी मिश्रित ॥ ३ ॥

४०७७. ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित[13] पालटे काया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण जाला हरि ॥ ध्रु ॥ चित्तचैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगों काय । एकाएकीं हरिव्याप्तिमय ॥ ३ ॥

४०७८. कोणा ही केडावें[14] हा आह्मां अधर्म । जोजो पावे श्रम तोतो देव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि चित्ता सिकविलें वोजें । आतां हें चि दुजें न बोलावें ॥ ध्रु ॥ होलविलें[15] जरि परउपकारें । जिव्हे पाप खरें उपाधीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव प्रारब्धा आधीन । कोण वाहे सीण करुणा शोभे ॥ ३ ॥

---

१ पं. पद –२ पं. वाजटाचे –३ पं. तरुवरामधीं कोट०। चावाटा० –४ पं. टकिली तानटी। –५ पं. नाहीं –६ पं. वाटीता –७ दे. त. जें –८ त. वीठली रंगली तीं –९ पं. सकळ देहभाव –१० पं. सुख दुख धर्म० –११ पं. निश्चित.–१२ पं. चित्ता। होय आवडी मिश्रिता ॥ –१३ पं. मनेसहित.–१४ पं. केडाव –१५ पं. बोलविले जरी परउपकारे.

४०७९. देव तिळीं आला । गोडें[1] गोड जीव धाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साधला हा पर्वकाळ । गेला अंतरींचा मळ ॥ ध्रु ॥ पापपुण्य गेलें । एका स्नानें चि खुंटेलें[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । शुद्ध जनार्दनीं जनीं[3] ॥ ३ ॥

४०८०. काय उणें मज पांडुरंगा पायीं । रिद्धिसिद्धि ठायीं वोळगती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण पाहे सुखा नासिवंताकडे । तृष्णेचें बापुडें[4] न्हों आह्मी ॥ ध्रु ॥ स्वर्गसुखें[5] आह्मीं केलीं पावटणी । पापपुण्यें दोन्ही उलंडिलीं[6] ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं आणिलें वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवांची ॥ ३ ॥

४०८१. माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा[7] पति ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तान्हेल्यानें पीतां पाणी । तेणें[8] गंगा नव्हे उणी ॥ ध्रु ॥ कल्पतरु जाला देतां । तेथें पोटाचा मागता ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां[10] ध्यातां । परब्रह्म आलें हाता ॥ ३ ॥

४०८२. अर्भकाचे साटीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ ध्रु ॥ बालकाचे चाली । माता जाणुनि पाउल घाली ॥ २ ॥ तुका ह्मणे नाव । जनासाटीं उदकीं ठाव ॥ ३ ॥

४०८३. [11]जन्मोजन्मींची संगत । भेटी जाली अकस्मात ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां सोडितां सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥ ध्रु ॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । तुझी माझी एक [12]गति ॥ ३ ॥

४०८४. सांग पांडुरंगा मज हा उपाव । जेणें तुझे पाव आतुडति ॥ १ ॥ न कळे हा निर्धार[13] ब्रह्मादिकां पार । कायसा विचार माझा तेथें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां धरुनियां धीर । राहूं कोठवर मायबापा ॥ ३ ॥

४०८५. काय फार जरी जालों मी शाहाणा । तरी नारायणा नातुडसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय [14]जालें जरी मानी मज जन । परि नातुडति चरण तुझे देवा ॥ ध्रु ॥ काय [15]जालें जरी जालों उदासीन । [16]परि वर्म भिन्न तुझें देवा ॥ २ ॥ काय [17]जालें जरी केले भ्यां सायास । ह्मणवितों दास भक्त तुझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज दाविल्यावांचून । तुझें वर्म कोण जाणे देवा ॥ ४ ॥

४०८६. जातां पंढरीच्या मार्गें । काय वर्णूं सुखा मग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घडे लाभ लक्षकोटि । परब्रह्मीं होइल भेटी ॥ ध्रु ॥ नाम गर्जत येती संत ।

---

१ दे. गोडगोड.–२ पं. खंडलें–३ पं. 'जनीं' नाहीं.–४ दे. नहों.–५ पं. सर्व सुखें–६ पं. उडविलीं.–७ दे. लक्ष्मीचा.–८ पं. तेव्हां.–९ पं. दाता– १० त. संतन –११ पं. जन्मोजन्मं चें संचित.–१२ पं. ज्योति.–१३ त. पार –१४ त. काय जालों जरी. पं. काय जाले तरी –१५ त. जालों जरी०. पं. जालों तरी –१६ पं. तरी –१७ पं. जालों तरी.

त्यांच्या दर्शनें[1] होईजे मुक्त ॥ २ ॥ जो अलक्ष्य ब्रह्मादिकां । आला संनिध ह्मणे तुका ॥ ३ ॥

**४०८७.** [2]सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयाच्या चिंतनें निरसलें[3] संकट । तरलों दुर्घट भवसिंधु ॥ ध्रु ॥ जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हा चि नेम अहिर्निशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कोटी कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचे ॥ ३ ॥

**४०८८.** मोलें[4] घेऊनियां कथा जरी करीं । तरी भंगो हरी देह माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझी कथा करा ऐसें ह्मणें कोणा । तेरी[5] झडो जाणा जिव्हा माझी ॥ ध्रु ॥ साह्य तूं जालासी काय उणें तुपें । आणीक भूतांपें काय मागों[6] ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व सिद्धि तुझे पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥ ३ ॥

**४०८९.** जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हें चि ज्ञान ब्रह्म होय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोठोनियां कांहीं न लगे आणावें । न लगे कोठें जावें तरावया ॥ ध्रु ॥ जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हे चि होती दिव्य चक्षु[7] ॥ २ ॥ तुका ह्मणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥ ३ ॥

**४०९०.** पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरिसील सत्ता सकळ ही ॥ १ ॥ कां जी आह्मांवरी आणिकांची सत्ता । [8]तुह्मासी असतां जवळिक ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं केलें निवेदन । उचित हें दान करीं आतां ॥ ३ ॥

**४०९१.** रात्री दिवस आह्मां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥ १ ॥ जीवा ही आगोज पडती आघात । येऊनियां नित्यें[9] नित्य करी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझ्या नामाचिया बळें । अवघीयांचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥

**४०९२.** होइन खडे गोटे । चरणरज साने मोटे । पंढरीचे वाटे । संतचरणीं लागेन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आंणीक[10] काय दुजें । [11]स्यां मागणें तुजपासीं । [12]अविट तें सुख । भय नास नाहीं ज्यासी ॥ ध्रु ॥ होइन मोचे वाहणा । पायीं सकळां[13] संतजनां । मांजर सूकर[14] सुणा । जवळी शेप घ्यावया ॥ २ ॥ सांडोवा पायरी । वाहळ वावी गंगातिरी । होइन तयावरी । संतसज्जन चालती ॥ ३ ॥ लागें[15] संतां पांयीं । ऐसा ठेवीं भलते[16] ठायीं । तुका ह्मणे देईं । धाक नाहीं जन्माचा ॥ ४ ॥

---

१ पं. दर्शनें चि मुक्त.—२ दे. 'सारासार०' हें कडवें नाहीं.—३ पं. निरसेल० । तराल दुर्घट०.—४ पं. द्रव्य—५ पं. तरी नारायणा जिव्हा झडो।.—६ पं. मागों—७ पं. वस्तु—८ पं. तु होसी.—९ पं. नित्या नित्य वार।—१० पं. आणि—११ पं. मी मागेन तुजपासी।.—१२ पं. आठवितों सुख.—१३ त. सकळ—१४ दे. पं. शुकर.—१५ त. लागेन.—१६ दे. त. भलना.

४०९३. माझिया जीवाचा मज निरधार । नें करीं उत्तर जनासवें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलें कारण साधों जी विचार । करावा हा धीर धरूनियां ॥ ध्रु. ॥ काय कराविया आणिकां[3] या युक्ति । काय नव्हे भक्ति विठोबाची ॥ २ ॥ एक पुढें गेले वाट दावूनियां । मारग तो वांयां कोण सांडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी विठोबासी चिंता । भेईना सर्वथा न घडे तें ॥ ४ ॥

४०९४. कासयासी व्हावें जीतांचि मुक्त । सांडुनियां थीतें प्रेमसुख ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वैष्णवांचा दास जाला नारायण । काय त्या मिळोन असे काम ॥ ध्रु. ॥ काय त्या गांठीचें पडलें सुटोन । उगलां चि बैसोन धीरु धरीं ॥ २ ॥ सुख आह्मांसाटीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण हाणे लाता ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज न लगे सायुज्यता । राहेन या संतां समागमें ॥ ४ ॥

४०९५. आवडे पंढरी भीमा पांडुरंग । चंद्रभागा लिंग पुंडलीक ॥ १ ॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरवीती ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवा थोर जालें सुख । नाठवे हे भूक तान कांहीं ॥ ३ ॥

४०९६. लेंडें भाकितों करुणा । तूं रे उदाराचा राणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिसी आमुचा सांभाळ । तूं रे माउली स्नेहाळ ॥ ध्रु. ॥ नाहीं चिंता रे आह्मांसी । तूं चि भार चालविसी ॥ २ ॥ आह्मी जालों उदासीन । तूं चि करिसी जतन ॥ ३ ॥ आह्मां नाहीं जीवनासें । तूं चि पुरविसी घांस ॥ ४ ॥ तुका ह्मणे भलते सवें । जातां मागें मागें धांवे ॥ ५ ॥

४०९७. आह्मां हें सकळ । तुझ्या पायांचें चि बळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करूं अमृताचें पान । दुजें नेणों कांहीं आन ॥ ध्रु. ॥ जयाचा जो भोग । सुख दुःख पीडा रोग ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुझे पायीं माझा ठेवा ॥ ३ ॥

४०९८. प्रपंच परमार्थ संपादोनि[13] दोन्ही । एक ही निदानीं नें[14] घडे त्यासी ॥ १ ॥ दोहीं पेंवावरी ठेवूं जातां हात । शेवटीं[15] अपघात शरीराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तैंया[16] दोहींकडे धका । शेवटीं तो नरकामाजी पडे ॥ ३ ॥

४०९९. संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाय विठोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येणें होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश कांहीं ॥ ध्रु. ॥

---

१ पं. मनाचा.–२ पं. 'न करीं०' व 'आपुलें कारण०' हे दोन चरण नाहींत.–३ पं. आणिकाच्या युक्ति.–४ त कासया होआवें दे. कासया व्हावें –५ दे. पं. थीतें –६ पं. असों सुखी ।.७–पं. उगेचि वैसोन धीर धरू ।–८ दे. त. पं. सायोज्यता.–९ दे. पांडुरंग.–१० त. [illegible]–११ पं. जीवानास.–१२ पं. आस.–१३ पं. सपादिन.–१४ पं. नव्हे त्यासी.–१५ पं. होय.–१६ पं. त्यासी.

घेईल तयासी सोपें आहे सुख । बोलियेलें मुखें नारायण ॥ २ ॥ सांगितली सोय करुणासागरें । तुह्मां कांहो बरें न वाटतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेणें उपकार केला । भोळ्या भाविकाला तरावया ॥ ४ ॥

४१००. आह्मां भय धाक कोणाचा रे पाहें । काळ मशक काय मानव हे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मांसी ते काय चिंता या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ध्रु० ॥ काय करावी हे कोणाची मान्यता । करितां अनंता कोण वारी ॥ २ ॥ नाहीं शीण आह्मां जालें कवतुक । पुनीत हे लोक करावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे खातों आनंदाचे लाडू । नका चरफडूं घ्या रे तुह्मी ॥ ४ ॥

४१०१. तांबियांचें नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करणीचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ॥ ध्रु० ॥ हिरिया[2]सारिखा दिसे [3]शिंगोळा । पारखी ते डोळां न पाहाती ॥ २ ॥ देऊनियां भिंग कामाविलें मोतीं । पारखिया हातीं घेतां नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥ ४ ॥

४१०२. चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर । [4]क्षोभवितां दूर तों चि भलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी परंपरा आलीसे चालत । [5]भलत्याची नीत त्यागावरी ॥ ध्रु० ॥ होकां पिता पुत्र बंधु कोणी तरि । [6]विजाति संग्रहीं धरूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥ ३ ॥

४१०३. [7]आपुली कसोटी शुद्ध राखी कारण । आगीनें भूषण अधिक [8]पुट ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं कोणासवें बोलणें लागत । [9]निश्चिंतीनें चित्तसमाधान ॥ ध्रु० ॥ लपविलें तें ही ढेंकरें उमटे । खोटियाचें खोटें उर फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे निंदा स्तुति दोन्ही वाव । आपुलाला भाव [10]फळा येतो ॥ ३ ॥

४१०४. आणिकांच्या घातें मानितां संतोष । सुखदुःख दोष [11]अंगीं लागे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें मनीं वाहूं [12]नयेती संकल्प । करूं नये पाप भांडवल ॥ ध्रु० ॥ क्लेशा[13]ची हे[14] चित्तीं राहाते कांचणी । [15]अग्नींत टाकोनी ठाव जाळी ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें[16] घडे पुण्यक्षय । होणार तें होय [17]प्रारब्धें चि ॥ ३ ॥

---

१ दे. तावगी हें नाणें.–२ दे. पं. हिरया० –३ पं. ब्रह्मगोळा.–४ पं. क्षोभविनें दुर ते चि.–५ पं. भले त्या०.–६ त. इजा ती. दे. इजाति.–७ पं. आपुलिया.–८ पं. पुढा.–९ दे. निश्चितीनें.–१० पं. कळों.–११ पं. आणी.–१२ पं. न ये चि –१३ पं. किल्मिषाची चित्तीं राहतां०.–१४ दे. 'हे' नाहीं.–१५ पं. आगीतें.–१६ पं. कोपें –१७ पं. प्रारब्धीचें ।.

४१०५. अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये मेंती[1] बोध कैंचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥ ध्रु. ॥ अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ॥ २ ॥ अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें वेंड वाढविती ॥ ४ ॥

४१०६. गुळें माखोलियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥ ध्रु. ॥ ऐसिया डांभिकां[2] कैंची हरिसेवा । नेणे चि सद्भावा कोणे काळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें कैसा[3] होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥ ३ ॥

४१०७. आयुष्य वेचूनि कुटुंब पोसिलें । काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुकाचा चाकर जालासी काबाडी । नाहीं सुख घडी भोगावया ॥ ध्रु. ॥ दुर्लभ मनुष्यजन्म[4] कष्टें पावलासी । दिला कुटुंबासी कामभोग ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें आयुष्य नासिलें । पाप तें सांचिलें पतनासी ॥ ३ ॥

४१०८. अनंत लक्षणें वाणितां अपार । संताचें तें घर सांपडेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जये घरीं संत राहती आपण । तें तुह्मां ठिकाण आतुडेना ॥ ध्रु. ॥ ठिकाण धरूनी पाहवे ते संत । उगा च अकांत करूं नये ॥ २ ॥ संत होऊनियां संतांसी पाहावें । तरि च तरावें तुका ह्मणे ॥ ३ ॥

४१०९. संतांचा पढीयां[5] कैशापरि लाहो । नामाचा आठवो कैसा राहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हे चि थोर चिंता लागली मनासी । निजतां निद्रेसी न लगे डोळा ॥ ध्रु. ॥ जेवितां जेवणीं न लगे गोड धड । वाटतें काबाड विषयसुख ॥ २ ॥ ऐसिया संकटीं पाव कृपानिधी । लावीं संतपदीं प्रेमभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी नेणों कांहीं हित । तुजविण अनाथ पांडुरंगा ॥ ४ ॥

४११०. पंढरीचा वास धन्य ते चि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देहीं[6] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरी दयारूप ॥ ध्रु. ॥ शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । वैराग्य निर्मळ नारी नर ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं वर्णा अभिमान । अवघे[7] जीवनमुक्त लोक ॥ ३ ॥

४१११. जेणें तुझी कास भावें धरियेली । त्याची नाहीं केली सांडी देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुह्मी डोळे झांका देवा[8] ॥ ध्रु. ॥

---

१ पं. चित्तीं.—२ पं. दांभिका.—३ पं. कैसा.—४ पं. मनुष्यदेह —५ दे. त. पढीया यो कैसा०.—६ पं. देहे. दे. त. देहो —७ पं. अवघेचि.—८ पं. वांया.

राव रंक तुह्मां सारिके चि जाणा । नाहीं थोर साना तुह्मांपासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं आपंगिलें भक्तां । माझिया संचिता कृपा नये ॥ ३ ॥

४११२. देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ इंद्रियांचे[1] गोडी ठकलीं वहुतें । सोडितां मागुतें आवरेना ॥ छ ॥ युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥ २ ॥ नाव रेवाळितां[2] घाला घाली वारां[3] । तैसा तो पसारा[4] अहंतेचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बुद्धि आपुले अधीन । करी नारायण आतुडे तों ॥ ४ ॥

४११३. नर नारी वोळें[5] अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न यो काम क्रोध द्वेष निंदा द्वंद । अवघा गोविंद निःसंदेह ॥ छ ॥ असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पायीं ॥ २ ॥ करोनियां साह्य पुरवीं[6] मनोरथ । व्हावें कृपावंत तुका ह्मणे ॥ ३ ॥

४११४. आपुल्या पोटासाटीं । करी लोकांचिया गोष्टी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें घातलें संसारीं । विसरला तो चि हरी ॥ छ ॥ पोटा घातलें[7] अन्न । न ह्मणे पतितपावन ॥ २ ॥ मी कोठील[8] आणि कोण । हें न कळे ज्यालागून ॥ ३ ॥ तुका ह्मणे नरस्तुति । करितो भाट त्रिजगतीं ॥ ४ ॥

४११५. स्वयें आपण चि रिता । रडे पुढिलांच्या हिता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सेकीं[9] हें ना तेंसें जालें । बोलणें तितुकें वांयां गेलें ॥ छ ॥ सुखसागरीं नेघे वस्ती । अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे गाढव लेखा । जेथें भेटेलें[10] तेथें ठोका ॥ ३ ॥

४११६. जगीं कीर्ति व्हावी । ह्मणोनी जोलासी[11] गोसावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुत केलें पाठांतर । वर्म रोहिलेंसे[12] दूर ॥ छ ॥ चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥ २ ॥ तुका ह्मणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ३ ॥

४११७. प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ॥१॥ ॥ ध्रु. ॥ उभी कामधेनु मांगांचे[13] अंगणीं । तिसी काय ब्राह्मणीं वंदूं नये ॥ छ ॥ कोढियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र ह्मणोन घेऊं नये ॥ २ ॥ यातिहीन जाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ॥ ३ ॥ भावारूढ तुका मुद्रा विठोवाची । न मनी तयांचीं तोंडें काळीं ॥ ४ ॥

---

१ पं. इद्रियांची.–२ त. पं. नाव नावळितां.–३ पं. वर –४ पं. पसर.–५ पं. याळ.–६ पं. करवीं.–७ पं. घाली.–८ पं. कोटील –९ पं. सेखी.–१० त. देखाल. पं. आढ्ळ.–११ पं. जालासे.–१२ पं. राहिलें ते –१३ दे. मागिले.

४११८. बोलिलों उत्कर्षें । प्रेमरस दासत्वें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ साच करिता नारायण । जया शरण गेलों तो ॥ छ ॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवी ॥ २ ॥ तुका ह्मणे लडिवाळाचें । द्यावें साचें करूनियां ॥ ३ ॥

४११९. विचा केला ठोबा । ह्मणोनि नांव तो विठोबा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां रे नेणां त्याचें नांव । काय वेदासि नाहीं ठावें ॥ छ ॥ शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग जाला ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । ज्याची काळाचिये माथा ॥ ३ ॥

४१२०. भ्रतारअंगसंगें सुखाची वेवस्था । आधीं तों सांगतां नये कोणा ॥१॥ ॥ ध्रु. ॥ तथापि सांगणें कुमारिकेपाशीं । ते काय मानसीं सुख मानी ॥ छ ॥ तैसा आत्मबोध आधीं बोलों नये । बोलासी तो काय सांपडेल ॥ २ ॥ तथापि सांगणें बहिर्मुखापाशीं । तो काय संतोषासी मूळ होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत सुखाचे विभागी । ब्रह्मानंद जगीं साधुरूपें ॥ ४ ॥

४१२१. कलयुगामाजी थोर जालें बंड । नष्ट लोक लंड जाले फार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न धरिती सोय न पुसती कोणा । येतें जैसें मना तैसें चाले ॥ छ ॥ सज्जनाचा वारा टेकों नेदी द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥ २ ॥ विश्वास तयाचा बैसेना कोठें ही । स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैसें केलें नारायणें । जाणावें हें कोणें तयाविण ॥ ४ ॥

४१२२. आपुली बुटबुट घ्यावी । माझी परताप द्यावी ॥ १ ॥ आपुला मंत्र नव्हे वरा । माझा बईल चुकला मोरा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा नरा । परिस न झोंबे खापरा ॥ ३ ॥

४१२३. भावभक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अन्न पाणी धन द्रव्य नारायण । विठ्ठला वांचून बोलूं नये ॥ छ ॥ सप्रेम करावें देवाचें कीर्तन । भय द्या सोडून शरीराचें ॥ २ ॥ तरी मग जोडे विठ्ठलनिधान । केलिया कीर्तन सिद्धि पावे ॥ ३ ॥ देव जोडिलिया तया काय उणें । तुका ह्मणे मन धीट करा ॥ ४ ॥

---

१ पं. दास्यत्वें. दे. त. दागत्वें.–२ पं. पुरवितो–३ पं. करूनि–४ त. ठावें–५ पं. जीवि धरा–६ पं. तयाविणें–७ पं. 'आपुली' याच्या पूर्वी 'गुरु त्या केला घरवाली। माझ्या चुकल्या दोनी ह्मैसी ॥' हें कडवें आहे.–८ पं. 'आपुला मंत्र' याबद्दल 'तुझा मंत्र' असें आहे व या कडव्याच्या पूर्वी 'तुझा मंत्र घेतां कानीं। माझ्या पेवांत शिरलें पाणी ॥ गुरु त्या भाग्यासाठीं केला। कांहीं फळासि नाहीं आला ॥' हीं दोन कडवीं जास्त आहेत.–९ दे. त. आशाबद्धी.

४१२४. चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसेंसी खापर काय होय ॥ १ ॥ दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥ २ ॥ तुका ह्मणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरि च राहे बुद्धि संतसंगीं ॥ ३ ॥

४१२५. रोगिया मिष्टान्न मर्कटा चंदन । कागासी लेपन कर्पूराचें ॥ १ ॥ निर्नासिका जैसा नावडे आरिसा । मूर्खालागीं तैसा शास्त्रबोध ॥ ध्रु ॥ दास तुका ह्मणे विठ्ठलउदारें । अज्ञानअंधारें दूरी केलें ॥ २ ॥

४१२६. मथनासाटीं धर्माधर्म । त्याचें वर्म नवनीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें चि तें घाटूं नये । आलें जाय नासूनि ॥ ध्रु ॥ सांभाळावें बरावर । वर्म दूर न वजावें ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें पोट । मग बोटचांटणी[१] ॥ ३ ॥

४१२७. माझा घात पात अथवा हित फार । अवघा[२] विचार तुझ्या हातीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ठेवुनि जीव भाव तुझ्या ठायीं चित्त । राहिलों निवांत पांडुरंगा ॥ ध्रु ॥ चित्ताचा चाळक बुद्धीचा जनिता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे काय करिसी तें पाहीन । ठेविसी राहीन सुखें तेथें ॥ ३ ॥

४१२८. संतपाउलें साजिरीं । गंगा आली आह्मांवरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें पडे रजधुळी । तेथें करावी अंघोळी ॥ ध्रु ॥ स्वेतबंद[३] वाराणसी । अवघीं तीर्थें तयापासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । संतसागरीं मिळालों ॥ ३ ॥

४१२९. न[४] घडे मायबापें बाळकाचा घात । आपणादेखत होऊं नेदी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कां मी मनीं चिंता वाहूं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ॥ ध्रु ॥ वर्म जाणे त्याच्या हिताचे उपाय । तान भूक वाहे कडिये खांदीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ॥ ३ ॥

४१३०. करावें कीर्तन । मुखीं[५] गावे हरिचे गुण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाच्या[६] क्रोधा ॥ ध्रु ॥ शांतिखड्ग हातीं । काळासी ते नागविती ॥ २ ॥ तुका ह्मणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ॥ ३ ॥

४१३१. तुझी कीर्ती सांगों तुजपुढें जरी । ब्रैह्मांडीं[७] ही हरी माईना ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरे चि ॥ ध्रु ॥ अनंत अपार आपंगिले भक्त । माझें चि संचित ओडवेना ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां बोल नाहीं देवा । पामरें म्यां सेवा केली नाहीं ॥ ३ ॥

---

१ दे. बोटचाचणी पं. बोटटाचणी –२ पं. अवघाची विचार॰.–३ त. श्वेतबंद.–४ पं. न घडे बाळकाचा मायबापा घात । –५ पं. मुखे –६ पं. दुर्जनाची. त. दुर्जनाचा –७ पं. ब्रह्मांडा.

४१३२. काय साधनाच्या कोटी । केल्या आटी होती[2] त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव कृपा करी जरी । होय उजरी स्वरूपीं ॥ ध्रु ॥ केले होते [3]व्यर्थ श्रम । [4]उपरम न होतां ॥ २ ॥ तुका ह्मणे कळों आलें । सर्व जालें आपरूप ॥ ३ ॥

४१३३. तुज काय करूं मज एक सार । [5]अमृतनागर नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय येणें[6] उणें आह्मां [7]तयापोटीं । गोवितां हे कंठीं कामधेनु ॥ ध्रु ॥ नोळखे तानुलें माय ऐसी कोण । वोरसे देखून शोक त्याचा ॥ २ ॥ जों नाहीं देखिला याचक नयनीं । तो पावे घेउनि लज्जा दार्न[8] ॥ ३ ॥ नामासाटीं प्राण सांडियेला रणीं । शूर ते भांडणीं न फिरती ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी गातां गीतीं भला । भेटूनी विठ्ठला काय चाड ॥ ५ ॥

४१३४. कृपेचे सागर हे चि[9] साधुजन । तिंहीं कृपादान केलें मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोबडे वाणीचा केला अंगीकार । तेणें माझा स्थिर केला जीव ॥ ध्रु ॥ तेणें सुखें मन स्थिर जालें ठायीं । संतीं दिला पायीं ठाव मज ॥ २ ॥ नाभी नाभी ऐसें [10]बोलिले वचन । तें माझें कल्याण सर्वस्व ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों [11]आनंदनिर्भर । नाम निरंतर घोष करूं ॥ ४ ॥

४१३५. भक्तीचें तें[12] वर्म जयाचिये हातीं । तया घरीं [13]शांति क्षमा दया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [14]अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं । न वंजती[15] दुरी दवडितां ॥ ध्रु ॥ तेथें दुष्ट गुण न मिळे निशेष । चैतन्याचा वास जयामाजी ॥ २ ॥ संतुष्ट हें[16] चित्त सदा सर्वकाळ । तुटली हळहळ त्रिगुणाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें काय तो संदेह । आमचें गौरव आह्मी करूं ॥ ४ ॥

४१३६. साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जें वचनें बोलियेले ॥ १ ॥ साच तें स्वहित साच ते मचित । साच वेद नीत [17]सांगतील ॥ २ ॥ तुका ह्मणे घेती साच साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ॥ ३ ॥

४१३७. संगें वाढे सीण नें[18] घडे भजन । त्रिविध हें जन बहु देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ [19]यों चि मुळें आला संगाचा कांटाळा । दिसताती डोळां नानाछंद ॥ ध्रु ॥

---

१ त. पं. 'काय' नाहीं –२ पं. होत्या त्या ।.–३ दे. चिता –४ त. पं. चित्ता उपरम न होतां ।–५ त. अमृतसागर. दे. '० सागर' खोडून '०नागर' केलें आहे.–६ पं. 'येणें' नाहीं.–७ पं. तयाचिये.–८ दे. दाना.–९ दे. त. 'चि' नाहीं.–१० दे. बोल्लिों.–११ पं. आनंदें निर्भर.–१२ त. दे. 'तें' नाहीं –१३ दे. होति.–१४ दे. अष्टमासिद्धि वोळगती करीं ।.–१५ पं. वजाती.–१६ दे. त. 'हें' नाहीं –१७ पं. सांगितली –१८ पं. संगें वाढे भजन.–१९ दे. त. याचि दुरें या या जनाचा कांटाळा ।.

एकविध भाव राहावया ठाव । नेदी हा संदेह राहों चित्तीं ॥ २ ॥ शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणीक देखिलें नावडे त्यां ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां एकलें चि भलें । बैसोनि उगलें राहावें तें ॥ ४ ॥

४१३८. तुझें वर्म आह्मां कळों आलें सुखें । संतांचिया मुखें पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अवघा चि नेट[2] वाउगा पसारा । चेईला तूं[3] खरा तूं चि एक ॥ ध्रु ॥ ह्मणउनि देहबुद्धि नासिवंतों[4] । नातळे या चित्तों[5] नेदावया ॥ २ ॥ सोय हे लागली पुढिलांची वाट । पावले[6] जे नीट तुजपाशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं कोणासवें काज । बोलाँयाचें[7] मज अंतरींचें ॥ ४ ॥

४१३९. पुण्यपापा[8] ठाव नाहीं सुखदुःखा । हानिलाभशंका नासलिया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जितां मरण आलें आप पर गेलें । मूळ[9] छेदियेलें संसाराचें ॥ ध्रु ॥ अधिकार[10] जाती वर्णधर्मयाती । ठाव नाहीं सत्य[11]असत्याशी ॥ २ ॥ जन वन भिन्न आचेत चळण । नाहीं दुजेपण ठाव यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देहें[12] वाहिलें[13] विठ्ठलीं । तेव्हां च घडली सर्व पूजा ॥ ४ ॥

४१४०. संकोचेंतो[14] जीव महत्वाच्या भारें । दासत्व चि बरें बहु वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कळावी जी माझी आवडी हे संतां । देणें तरि आतां हें चि द्यावें ॥ ध्रु ॥ तुमचे चरण पावविलों सेवा । ह्मणउनि हेवा हा चि करीं ॥ २ ॥ विनउनी तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणींचें[15] ॥ ३ ॥

४१४१. देव कैंचा तया दुरी । भाका बरी करुणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आळवित्या न लगे धर । माय जाणे रे भातुकें ॥ ध्रु ॥ नावे[16] तरी ज्याचा भार । पैल पार जवळी त्या ॥ २ ॥ आतां[17] परदेशी तुका । जाला लोकांवेगळा ॥ ३ ॥

४१४२. भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयांची गोडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो नर चि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ॥ ध्रु ॥ भजन पूजन ही नेणे । काय स्वरूपासी जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याला । भोवंडून बाहेर घाला ॥ ३ ॥

४१४३. समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा । भगिनी ते रमा शंखाची या ॥ १ ॥ मेहुणा जयाचा द्वारकेचा हरि । शंख दारोदारीं भीक मागे ॥ २ ॥ दुष्ट[18] हें जाणावें आपुलें स्वहित । तुका ह्मणे मात ऐसी आहे ॥ ३ ॥

---

१ पं. ज्या —२ पं. नठावाउगा —३ पं. तो —४ पं. नाशिवंत —५ पं. चित्त —६ पं. पाविंनें नीट०.—७ पं. वोलावया.—८ पं. पुण्यपाप.—९ पं. मूळ हे छेदिलें.—१० पं. अध.कार ज्योनी कुळधर्म यात ।.—११ पं. सतीं —१२ पं. देव.—१३ त. वाहिला.—१४ दे. सकोचोनो. पं. मकोनित.—१५ पं. चरणींचा.—१६ पं. नावेवरी.—१७ पं. जातां.—१८ पं. त. दृष्ट.

४१४४. भवाचिया संगें बहु च नाडिले । कळिकाळें पाडिले तोंडघसीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया भवसंगें गुंतलासी वांयां । धन पुत्र जाया झुलों नको ॥ छ ॥ जेजे घडी जाय तेते काळ खाय । प्रोण्या तरणोपाय काय केला ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं सर्व ही तूं त्याग । अर्पी हें सर्वांग जगदीशीं ॥ ३ ॥

४१४५. रुचे सकळा मिष्टान्न । रोग्या विखाच्या समान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि कां तया एकासाटीं । कामें अवघीं करणें खोटीं ॥ छ ॥ दर्पण नावडे एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ २ ॥ तुका ह्मणे खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ ३ ॥

४१४६. जागा घरटी फिरे तस्कराची दिवसाराती । नीदसुरें नाडिलीं असो ऐसीं मागें किती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हाट करी सकळ जन । वस्तु करा रे जतन ॥ छ ॥ हुशार ठायीं । निजनिजेलिया पाहीं ॥ २ ॥ सावचित्त असे खरा । लाभ घेउन जाये घरा ॥ ३ ॥ तैराळ बोंबे उतराई । राखा आपुलिया भाई ॥ ४ ॥ हरिच्या नामीं घालूं जागा । तुका ह्मणे हुशार गा ॥ ५ ॥

४१४७. संतांनीं सरता केलों तैसेपरी । चंदनीं ते बोरी व्यापियेली ॥ १ ॥ गुण दोष याती न विचारितां कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ॥ ३ ॥

४१४८. चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान । अखंड मुखीं नाम वर्णावे गुण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें[9] चि एक देवां तुह्मां मागणें दातारा । उचित तें करा माझी[11] भाव जाणूनि[12] ॥ छ ॥ खुंटली जाणींव माझें बोलणें[13] आतां । करूं यावी तैसी करावी बाळकाची चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां नको देऊं अंतर । न कळे पुढें काय बोलों विचार ॥ ३ ॥

४१४९. संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भजनविधी नेणें साधन उपाय । सकळ[14] सिद्धि पाय हरिदासांचे ॥ छ ॥ ध्यानगति मति आसन समाधि । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥ २ ॥ नेणता निर्लज्ज नेणें[15] नादभेद । सुखें हा गोविंद गाऊं [16]गीतीं ॥ ३ ॥ सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका ह्मणे संतमहंतपाय ॥ ४ ॥

---

१ पं. प्राणतरणो० –२ दे. काम अवघें.–३ पं. जगा.–४ दे. असो मागों किती न. असा मागा किती –५ दे. तराळ राळ बोंबे –६ पं. होगा –७ दे. चडन.–८ पं. विचारी –९ पं. हें चि तुह्मां एक मागतो मी दातारा। –१० दे. तुह्मा देवा –११ पं. 'माझा' नाहीं –१२ पं. जाणुनि पुरा। –१३ पं. बोलणें तें आतां.–१४ पं. सकळ हि सिद्धि –१५ पं. नेणो –१६ दे. गीत

४१५०. हरिजनीं प्राण विकली हे काया । अंकिला मी तया घरीं जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणियें सत्वर करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ॥ छ ॥ आस करूनियां राहेन अंगणीं । उंच्छिष्टाची धणी घ्यावयासी ॥ २ ॥ चालतां ते मार्गीं चरणींचे रज । उडती सहज घेइन आतां ॥ ३ ॥ दुरि त्यांपासूनि न वजें दवडितां । तुका ह्मणे लाता घेइन अंगीं ॥ ४ ॥

४१५१. पुण्य फळलें वहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । जालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सावळें ॥ छ ॥ आलिंगणें संतांचिया । दिव्य जाली माझी काया । मस्तक हा पाया । वरी त्यांच्या ठेविंतां ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य झालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥ ३ ॥

४१५२. ठाव देऊनियां राखें पायापासीं । मी तों आहें रासी पातकाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पातकाची रासी ह्मणतां लागे वेळ । ऐके तो कृपाळ नारायण ॥ छ ॥ नारायणनामें अवघें सांग जालें । असंग चि केलें एकमय ॥ २ ॥ एकमय जालें विठोबाच्या नामें । भेदाभेद कर्में आणिक कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्तीं चिंतिलें जें होतें । तें होय आपैतें नामें याच्या ॥ ४ ॥

४१५३. आतां आह्मां भय नाहीं वा कोणाचें । वळ विठोबाचें जालें असे ॥ १ ॥ धीर दिला आह्मां येणें पांडुरंगें । न पांगों या पांगें संसाराच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा कैवारी हा देव । नाहीं भय भेव त्याच्या संगें ॥ ३ ॥

४१५४. भक्ति आह्मी केली सांडुनी उद्वेग । पावलों हें सांग सुख याचें ॥ १ ॥ सुख आह्मां जालें धरितां यांचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख वहु जालें जिवा । घडली या सेवा विठोवाची ॥ ३ ॥

४१५४-अ. शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती वहुत । परि नाहीं चित्त हाता आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ क्षणा एका साटीं न धरवे धीर । तेणें हा रघुवीर अंतरतो ॥ छ ॥ तोळाभर सोनें रतिभार राई । मेळविल्या पाहीं नास होतो ॥ २ ॥ हरीचे अंकित असती विरळागत । तयांसी अच्युत कृपा करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय धुंडवण्या गोष्टी । जंव नाहीं गांठी चित्त आलें ॥ ४ ॥

---

१ पं. हरिजना.–२ पं. त. दे. उचिष्टाचीं –३ पं. जालो.–४ दे. पुढें । ब्रह्म सावळें ॥.–५ दे. 'हा' नाहीं.–६ पं. ठविंतों.–७ दे. कर्म –८ त. उद्येग –९ दे. शास्त्रीं.–१० पं. उडवण्या.

**४१५५.** इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम ह्मणोनि काई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेविं मासीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ छ ॥ कीर्तन करावें । तैसें करूनी दावावें ॥ २ ॥ हें तों अंगीं नाहीं चिन्हें । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥ ३ ॥ तुका ह्मणे[1] रागा । संत शिवूं नेदिती[2] अंगा ॥ ४ ॥

**४१५६.** न लगे देवा तुझें आह्मांसी वैकुंठ । सायुज्याचा[3] पट न लगे मज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देईं तुझें नाम मज सर्वकाळीं । मागेन[4] वनमाळी हें चि तुज ॥ छ ॥ नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ॥ २ ॥ सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी देईं तुझें नाम । अखंडित प्रेम हें चि द्यावें ॥ ४ ॥

**४१५७.** पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । जालें या चित्तासी समाधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मायबाप माझा उभा कृपादानी । विटे सम जोडूनि पादांबुजें ॥ छ ॥ सांभाळासी येऊं नेदी चें उणीव । अधिकारगौरव राखे तैसें ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळूनी ॥ ३ ॥

**४१५८.** होतें तैसें पायीं केलें निवेदन । अंतरलों दिन[6] बहुत होतों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ संबोखुनी केलें समाधान चित्त । बोगरूनि[7] भातें प्रेमरस ॥ छ ॥ नामरत्नमणी करूनी भूषण । अळंकारमंडण माळा दिली ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें जालों[8] निरामय । नामीं नामसोय निमग्नता ॥ ३ ॥

**४१५९.** स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खुण पावूनियां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीळित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥ छ ॥ चित्त चाकाटलें स्वरूपा माझारी । न निघे बाहेरी सुखावलों ॥ २ ॥ सुनीळ प्रकाश[9] उदैजला दिन । अमृताचें पान जीवनकळा ॥ ३ ॥ शशिसूर्या जाली जीवें ओंवाळणी । आनंदीं[10] दाटणी[11] आनंदाची[12] ॥ ४ ॥ तुका ह्मणे सुखें प्रेमासी डुलत[13] । वीरालों[14] निश्चिंतें निश्चितीनें[15] ॥ ५ ॥

**४१६०.** बौध्यअवतारीं[16] माझिया अदृष्टा । मौन्य मुखें[17] निष्ठा धरियेली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लोकांचियेसाटीं शाम चतुर्भुज । संतांसवें गुज बोलतसां ॥ छ ॥ आलें कलियुग माझिया संचिता । डोळां हाकलितां न [18]पडेसी ॥ २ ॥ म्यां च तुझें काय केलें नारायणा । कां नये करुणा तुका ह्मणे ॥ ३ ॥

---

१ दे. त. ह्मणे नका रागा ।.–२ पं. नेदी –३ पं. सायुज्यताप्ट –४ न. मागे पं. मागों.– ५ पं. हा –६ त. पं. दीन –७ दे. बोगरुणि भात.–८ पं. जालें –९ पं. प्रकाशला –१० पं. आनंदें – ११ दे. दाटली.–१२ पं. आनंदची.–१३ त. पं. डुल्त –१४ पं. वीरलो –१५ दे. निश्चित निश्चितीनें त. निश्चित निश्चितीनें –१६ त. दे. बोध्य.–१७ पं. मुख –१८ पं. पडेसी.

४१६१. मुखीं विठ्ठलाचें नाम । मग कैचा भवभ्रम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चालतां बोलतां खातां । जेवितां निद्रा करितां ॥ छ्र ॥ सुखें असों संसारीं । मग जवळी च हरि ॥ २ ॥ मुक्तिवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥ ३ ॥ मग देवभक्त जाला । तुका तुकीं उतरला ॥ ४ ॥

४१६२. प्रेम जडलें तुझे पायीं । आणीक न सुचे मजला कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रात्रीदिवस[1] तुझें ध्यान । तें चि माझें अनुष्ठान ॥ छ्र ॥ नामापरतें नेणें दुजें । ऐसें कळलें मजला निज ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतकाळीं । आह्मां सोडवीं तात्काळीं ॥ ३ ॥

४१६३. तुझे पाय माझी काशी । कोण जाय माझें काशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझें रूप तें चि ध्यान । तें चि माझें अनुष्ठान ॥ छ्र ॥ तुझे चरण ते चि गया । जालें गयावर्जन देहा ॥ २ ॥ तुका ह्मणे सकळ तीर्थें । तुझे पायीं वसती येथें ॥ ३ ॥

४१६४. क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नावडे । पहावया धांवे[2] कोल्हाटासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कथेसी साक्षेपें पाचारिला[3] जरी । ह्मणे माझ्या घरीं कोणी नाहीं ॥ छ्र ॥ बलात्कारें[4] जरी आणिला कथेसी । निद्रा घे लोडेंसी टेंकूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ३ ॥

४१६५. श्रीराम सखा ऐसा धरीं भाव । मीपणाचा ठाव पुसीं मना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरण निरंतर ह्मण तूं गोविंदा । वाचे लावीं धंदा नारायण ॥ छ्र ॥ यापरि सोपान नाहीं रे साधन । वाहातसें आण तुझी मना ॥ २ ॥ नको कांहीं करूं अळस अंतरीं । जपें निरंतरीं[5] रघुपती ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोठा लाभ नरदेहीं । देहीं[6] च विदेही होती नामें ॥ ४ ॥

४१६६. सर्वांपरी तुझे गुण गौ[7] उत्तम । तुझेठायीं प्रेम राहो माझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माउलीपरिस आहेसी उदार । तरि कां निष्ठुर मन केलें ॥ छ्र ॥ गजेंद्राकारणें केलें त्वां धांवणें । तरि कां निर्वाण पाहातोसी ॥ २ ॥ प्रल्हादा संकटीं[8] रक्षिलें त्वां[9] देवा । तरि कां केशवा सांडी केली ॥ ३ ॥ अन्यायी अजामेळ तो जाला पावन । ऐसें हें पुराण हाका मारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझे थोर अपराध । नाम करी छेद क्षणमात्रें ॥ ५ ॥

४१६७. आतां वांटों नेदीं आपुलें हें मन । न सोडीं चरण विटोबाचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुजियाचा संग लागों नेदीं वारा । आपुल्या शरीरावरूनियां ॥ छ्र ॥

---

१ पं. रात्रदिवस.–२ दे. धावें. पं. धांवडे.–३ पं. पाचारिलें.–४ दे. बलात्कारीं–५ दे. निरंतर.–६ दे. त. देहीं.–७ दे. गाऊ–८ दे. प्रल्हादास कष्टीं–९ दे. तों.

यावें जावें आह्मीं देवा च सांगातें । मागूनी करीत हें चि आलों ॥ २ ॥ काय वांयां गेलों तो करूं उद्वेग । उभा पांडुरंग मागें पुढें ॥ ३ ॥ तुका ह्मणे प्रेम मागतों आगळें । येथें भोगूं फळें वैकुंठींचीं ॥ ४ ॥

४१६८. आतां आह्मां हें चि काम । वाचे स्मरों रामराम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ ध्रु ॥ अमृताची खाणी । तये ठायीं वेचूं वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । माझ्या जीवींच्या जिवलगा ॥ ३ ॥

४१६९. आतां जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेथें चंद्रभागातिरीं । आह्मी नाचों पंढरपुरीं ॥ ध्रु ॥ जेथें संतांची दाटणी । त्याचें घेऊं पायवणी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी बळी । जीव दिधला पायां तळीं ॥ ३ ॥

४१७०. आह्मी नरका जातां काय येइल तुझ्या हाता । ऐसा तूं अनंता विचारीं पां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुज शरण आलियाचें काय हें चि फळ । विचारा दयाळ कृपानिधी ॥ ध्रु ॥ तुझें पावनपण न चले आह्मांसीं । ऐसें हृषीकेशी कळों आलें ॥ २ ॥ आह्मी दुःख पावों जन्ममरण व्यथा । काय तुझ्या हाता येत असे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी खादली हो रडी । आह्मी धरली सेंडी नाम तुझें ॥ ४ ॥

४१७१. पांडुरंगे पाहा खादलीसे रडी । परि नामसेंडी धरिली आह्मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां संतांनीं करावी पंचाइत । कोण हा फजितखोर येथें ॥ ध्रु ॥ कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आह्मी पातकी ही ॥ २ ॥ याचें पावनपण सोडवा चिं तुह्मी । पतितपावन आह्मी आहों खरें ॥ ३ ॥ आह्मी तंव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥ ५ ॥

४१७२. घालूनियां मध्यावर्ती । दाटुनि उपदेश देती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे पोटभरे संत । तयां कैंचा भगवंत ॥ ध्रु ॥ रांडापोरांतें गोविती । वर्षासन ते लाविती ॥ २ ॥ जसे बोलती निरोपणी । तैसी न करिती करणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया । तमोगुणियाची क्रिया ॥ ४ ॥

४१७३. वैभर्व तें राज्य संपत्ती टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलें तें आधीं करावें स्वहित । ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥ ध्रु ॥

---

१ दे. स्मरा –२ दे. त. वेया –३ पं. धरिले –४ दे. परिणाम.–५ पं. जि० –६ त. असों दे. 'असों' नाहीं.–७ पं. मध्यवर्ती.–८ त. दे. वैभव राज्य० –९ पं. मधोकरी

वर्ण कुळ जाति[1] याचा अभिमान । त्यजावा[2] सन्मान लौकिकाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे एकाकी निःशंक । देऊनियां हाक कंठीं काळ ॥ ३ ॥

४१७४. हातपाय मिळोनि मेळा । चला ह्मणती पाहों डोळा ॥ १ ॥ देखणी नव्हे देखती[3] कैसे । सकळांचा देखणा डोळा चि असे ॥ २ ॥ डोळ्याचा डोळा पाहों गेला । तुका ह्मणे तो पाहों ठेला ॥ ३ ॥

४१७५. मुखें संती[4] इंद्रियें जती । आणिक नेणे भाव भक्ती ॥ १ ॥ देवा हे चि दोन्ही पदें । येर गाइलीं विनोदें ॥२॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्त्तन ॥३॥

४१७६. धांवोनियां आलों पहावया मुख । गेलें माझें दुःख जन्मांतरिंचें ॥ १ ॥ ऐकिलें ही होतें तैसें चि पाहिलें । मन स्थिरावलें तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी इच्छा पूर्ण जाली । कांहीं न राहिली वासना हे ॥ ३ ॥

४१७७. गावलोकिकांहीं लावियेलें पिसें । काय सांगों ऐसें तुजपासीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तोंड काळें केलें फिरविलें मज । नाहीं धरिली लाज पांडुरंगा ॥ ध्रु ॥ काय तुजपासीं सांगों हें गाऱ्हाणें । मग काय जिणें तुझें माझें ॥ २ ॥ कोणासाटीं आतां करावा संसार । केली वारावार आपण[5] चि ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी मोडिला घरचार । धरियेला धीर तुझ्या पायीं ॥ ४ ॥

४१७८. जीवें जीव नेणे पापी सारिका[6] चि । नळी दुजयाची कापूं बैसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आत्मा नारायण सर्वा घटीं आहे । पशुमध्यें काय कळों नये ॥ ध्रु ॥ देखत हा जीव हुंबरे वरडत[7] । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तया चांडाळासी नर्क[8] । भोगिती अनेक[9] महादुःखें ॥ ३ ॥

४१७९. मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती[10] पाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ ध्रु ॥ शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं[11] वसे देव ॥ २ ॥ तुका ह्मणे विठोबासी । ठाव देई चरणापासीं ॥ ३ ॥

४१८०. भागल्याचें तारूं शिणल्याची साउली[12] । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥१॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी हे कृपाळू अनाथांची वेशी । सुखाची च राशी पांडुरंग ॥ ध्रु ॥ सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहे बहु भेटी उतावीळा ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें[13] आतां उरला कैंचा । अनंता जन्मींचा शीण भाग ॥ ३ ॥

---

१ पं. याति.–२ दे. त. तजावा –३ पं. देखणी कैसी.–४ दे. सति.–५ दे. आपणें चि.–६ पं. सारिखा चि –७ पं. वरडेत –८ पं. नर्का –९ पं. अनेका.–१० दे. यति.–११ त. हृदई चि –१२ त. साउली –१३ त. आतां येथें

**४१८१.** काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुह्मांपें ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ आह्मुची तों न पुरे इच्छा । पितां[1] ऐसा मस्तकीं ॥ छ्र ॥ कैसी तुह्मां होय सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ॥ २ ॥ आश्चर्य चि करी तुका । हे नायका वैकुंठिंचिया ॥ ३ ॥

**४१८२.** चित्त गुंतलें प्रपंचें । जालें वेडें ममतेचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां सोडवीं पांडुरंगा । आलें निवारीं तें आंगा ॥ छ्र ॥ गुंतली चावटी । नामीं रूपीं जाली तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चाली । पुढें वाट खोळंबली ॥ ३ ॥

**४१८३.** किंती[3] एका दिवशीं । बुद्धि जाली होती ऐसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कांहीं करावें स्वहित[4] । तों हें न घडे उचित ॥ छ्र ॥ अवलंबुनी भीक । लाज सांडिली लौकिक ॥ २ ॥ तुका ह्मणे दीन । जालों मनुष्यपणा[5] हीन ॥ ३ ॥

**४१८४.** आतां बरें जालें । सकाळीं च कळों आलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज न ठेवीं इहलोकीं । आलों तेव्हां जाली चुकी ॥ छ्र ॥ युगमहिमा ठावा । नव्हता ऐसा पुढें देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवीं । भोगासाटीं निरयगांवीं ॥ ३ ॥

**४१८५.** परि आतां माझी परिसावी विनंती । रखुमाईच्या पती पांडुरंगा ॥ १ ॥ चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा ह्मणताती मज । आतां आहे लाज हे चि तुह्मां ॥ ३ ॥

**४१८६.** पापाचिया मुळें । जालें सत्याचें वाटोळें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोष जाले बळिवंत । नाहीं ऐसी[6] जाली नीत ॥ छ्र ॥ मेघ पडों भीती । पिकें सांडियेली[7] क्षिती ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । वेदा वीर्य शक्ति नाहीं ॥ ३ ॥

**४१८७.** ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर ॥ छ्र ॥ मायाममतेचे भोवरे । घेती भयानक फेरे ॥ २ ॥ वासनेच्या लहरी[8] येती । उद्योगहेलकावे वसती ॥ ३ ॥ तरावया एक युक्ति असे । तुका नामनावेमधीं[9] बैसे ॥ ४ ॥

**४१८८.** देव जडला जाइना अंगा । यासी काय करूं सांगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वरकड देव येती जाती । हा देव जन्माचा सांगाती ॥ छ्र ॥ अंगीं भरलें देवाचें वारें । देव जग चि दिसे सारें ॥ २ ॥ भूत न बोले निरुतें । कांहीं केल्या न सुटे तें ॥ ३ ॥ जीव खादला दैवतें[10] । माझा आणि[11] पंचभूतें ॥ ४ ॥ तुका ह्मणे वाडें कोडें । उभें पुंडलिकापुढें ॥ ५ ॥

---

१ दे. पीता त. पीता.–२ दे. भेटी.–३ दे. त. किना एका दिसीं ।.–४ पं. स्वचित.–
५ पं. मरयकपण. त. मनुष्यपणें –६ पं. जाली एसी –७ पं. नाटिकेले.–८ दे. ल्हरा –९ दे. तुझागन
नावे०.–१० त. देवते.–११ पं. येणें महाभूतें.

४१८९. हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणसी कांहीं मागा । हें चि देगा पांडुरंगा ॥ छ ॥ संतां लोटांगणीं । जातां लाजों नको मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं । शक्ती देईं नाचें[1] रंगीं ॥ ३ ॥

४१९०. लटिक्याचें[2] आंवतणें जेविलिया साच । काय त्या विश्वास तो चि खरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोल्हांटिणी लागे[3] आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥ छ ॥ जळमंडपयाचे[4] घोडे राउत नाचती । ते काय तडवती युद्धालागीं[5] ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसें मतवादीयांचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतां चि ॥ ३ ॥

४१९१. काय आह्मीं केलें ऐसें । धुद्धरीजेसें[6] सांगावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरण कोल्हें[7] वैकुंठवासी । कोण त्यासी अधिकार ॥ छ ॥ गजा नाड्या सरोवरीं । नाहीं हरी विचारिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे गणिका नष्ट । माझे कष्ट त्याहूनि ॥ ३ ॥

४१९२. भाग्यासाटीं गुरु केला । नाहीं आह्मांसी फळला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ याचा मंत्र पडतां कानीं । आमच्या पेवांत गेलें पाणी ॥ छ ॥ गुरु केला घरवाग्री । आमच्या चुकल्या गाईम्हसी ॥ २ ॥ स्वामी आपुली बुटबुट घ्यावी । आमुची प्रताप टाकुन द्यावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे नष्ट । त्यांसी दुणे होती कष्ट ॥ ४ ॥

४१९३. गुणा आला विटेवरी[8] । पीतांबरधारी सुंदर[9] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हें ॥ छ ॥ निवारोनी जाय माया । ऐसी छाया जयासी ॥ २ ॥ तुका ह्मणे समध्यान । हे[11] चरण सकुमार ॥ ३ ॥

४१९४. रंगीं रंगें नारायण[12] । उभा करितों कीर्त्तन[13] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हातीं घेउनियां वीणा । कंठीं राहें[14] नारायणा ॥ छ ॥ देखिलीसे मूर्ती । माझ्या हृदयाची[15] विश्रांति ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । देईं कीर्त्तनाचा हेवा ॥ ३ ॥

४१९५. तुझा भरवसा आम्हां । फार होता पुरुषोत्तमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भवसागरसंकटीं । तारिशील जगजेठी ॥ छ ॥ नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजड ॥ २ ॥ सिलंगणीचें सोनें । त्यासी गाहाण ठेवी[16] कोण ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । ब्रिद सोडूनियां ठेवा ॥ ४ ॥

---

१ त. नाचों –२ पं. लटिकियाचे आवंतणे जेविल्या साच । –३ पं. लागी –४ पं. जटम० –५ पं. त. युध्यालागी –६ दे. त. धुनरी०.–७ पं. कोल्हीं –८ दे. पं. इटेवरी –९ दे. सुदर जो –१० त. गेली –११ पं. ते हे.–१२ पं. नारायणा.–१३ पं. कीर्तना –१४ पं. रोग –१५ पं. ह्रदंनि –१६ पं. टेविल.

**४१९६.** जालों आतां दास । माझी पुरवीं हे आस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरीचा वारकरी । वारी चुको नेदीं हरी ॥ छ्र ॥ संतसमागम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान । तुका ह्मणे हें चि दान ॥ ३ ॥

**४१९७.** यासाटीं करितों निष्ठुर भाषण । आहेसी तूं जाण सर्वदाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें दुःख कोण आहे निवारिता । तों[1] मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ छ्र ॥ बैसलासी[2] केणें करुनि एक घरीं । नाहीं येथें उरी[3] दुसऱ्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें अवघें पायांपें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ३ ॥

**४१९८.** पोरा लागलीसे चट । धरी वाट देवळाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगितलें नेघे कानीं । दुजें मनी विठ्ठल ॥ छ्र ॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित्त ॥ २ ॥ आमुचे कुळीं नव्हतें ऐसें । हें चि पिसें निवडलें ॥ ३ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नरका जाणें । यों[4] या वचनें दुष्टाचे[5] ॥ ५ ॥

**४१९९.** देवा बोलें आतां बोला । त्वां कां धरिला अबोला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भेऊं नको देईं भेटी । तूं कां पडिलासी संकटीं ॥ छ्र ॥ तुझ्या जीवींचें मी जाणें । ह्मणसी मुक्ती आह्मां देणें ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे कांहीं । चित्त राहो[6] तुझे पायीं ॥ ३ ॥

**४२००.** यमधर्म आणिक ब्रह्मादिक देव । त्यांचा पूर्ण भाव तुझे पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करिती स्मरण पार्वतीशंकर । तेथें मी किंकर कोणीकडे ॥ छ्र ॥ सहस्रमुखेंसी घोष फणिवराचा । मज किंकराचा पाड काय ॥ २ ॥ चंद्र सूर्य आणि सर्व तारांगणें । करिती भ्रमण प्रदक्षिणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांसी स्वरुप कळेना । तेथें मज दीना कोण पुसे ॥ ४ ॥

**४२०१.** विठोबाचे पायीं जीव म्यां ठेविला । भक्तिभावें केला देव ऋणी ॥१॥ ॥ ध्रु. ॥ देव माझा ऋणी आहे सहाकारी । परस्परें[7] वारी भवभय ॥ छ्र ॥ भवभयडोहीं बुडों नेदी पाहीं । धरुनियां बाही तारी मज ॥ २ ॥ तारियेले दास पडिल्या संकटीं । विष केलें पोटीं अमृतमय ॥ ३ ॥ अमृतातें[8] सेवीतसे नामरसा । तोडियेला फांसा बंधनाचा ॥ ४ ॥ बंधनाचा फांसा आह्मीं कांहीं नेणों । पाय तुझे जाणों पद्मनाभा ॥ ५ ॥ पद्मनाभा नाभिकमळीं ब्रह्मादिक । त्रैलोक्यनायक ह्मणविसी ॥ ६ ॥ ह्मणविसी देवा दासाचा[9] अंकित । मनाचा संकेत पाहोनियां ॥ ७ ॥

---

१ दे. त. तें –२ दे. बैसलासे. पं. बैसलासी कोण–धरुनियां धीर ।.–३ पं. उर –४ दे. पं. 'या वचनें' याबद्दल 'त्या वचनें'.–५ त. दे. दुष्टाची. त. दुष्टाची –६ पं. राहे.–७ दे. परस्परवरि.–८ पं. अमृतते.–९ त. दासांचे.

पाहोनियां दृढ निश्चय तयाचा । तो चि दास साचा जवळीक ॥ ८ ॥ जवळीक जाली ब्रह्मीं सुखावले । मार्ग दाखविले मूढा जना ॥ ९ ॥ मूढा जनामाजी दास तुझा मूढ । कास तुझी दृढ धरियेली ॥ १० ॥ धरियेले तुझे पाय रे विठ्ठला । तुका सुखी जाला तुझ्या नामें ॥ ११ ॥

४२०२. बहु क्लेशी जालों या हो[3] नरदेहीं । कृपादृष्टी पाहीं पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंगा सर्वदेवांचिया देवा । घ्यावी माझी सेवा दिनानाथा ॥ छ ॥ दिनानाथ ब्रिद त्रिभुवनीं तुझें । मायबापा ओझें उतरावें ॥ २ ॥ उतरीं सत्वर पैलथडी नेईं । पूर्णसुख देईं पायांपाशीं ॥ ३ ॥ पायांपाशीं मज ठेवीं निरंतर । आशा तुझी फार दिवस केली ॥ ४ ॥ केली आस तुझी वाट मी पाहातों । निशिदिनीं ध्यातों नाम तुझें ॥ ५ ॥ नाम तुझें गोड स्वभक्ता आवडे । भक्तांलागीं कडे खांदा घेसी ॥ ६ ॥ घेसी खांद्यावरी खेळविसी लोभें । पाउल तें[5] शोभे विटेवरि ॥ ७ ॥ विटेवरि उभा देखिलासी डोळां । मनाचा सोहळा पुरविसी ॥ ८ ॥ पुरवीं सत्वर त्रैलोक्यस्वामिया । मिठी घाली पायां तुका भावें ॥ ९ ॥

४२०३. एक वेळे तरी जाईन माहेरा । बहुजन्म फेरा जाल्यावरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चित्तीं हे बैसली अविट आवडी । पालट ती घडी नेघे एकी ॥ छ ॥ करावें ते करी कारणशरीर । अंतरीं त्या धीर जीवनाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तरि होइल विलंब । परि माझा लाभ खरा जाला ॥ ३ ॥

४२०४. सांग त्वां कोणासी तारिलें । संतांविगळें उद्धरिलें ॥ १ ॥ संत शब्द उपदेशी । मग तूं हो ह्मणशी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं तुझा उपकार । करूं संतांचा उच्चार ॥ ३ ॥

४२०५. उमा रमा एकी सरी । वाराणसी ते पंढरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोघे सारिखे सारिखे । विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ छ ॥ तेथें असे भागीरथी । येथें जाणा भीमरथी ॥ २ ॥ वाराणशी त्रिशुलावरि । सुदर्शनावरि पंढरी ॥ ३ ॥ मनकर्णिका मनोहर । चंद्रभागा सरोवर ॥ ४ ॥ वाराणशी भैरवकाळ । पुंडलीक क्षेत्रपाळ ॥ ५ ॥ धुंडिराज दंडपाणी । उभा गरुड कर जोडुनी ॥ ६ ॥ गया ते चि गोपाळपुर । प्रयाग निरानरसिंपुर ॥ ७ ॥ तेथें असती गयावळ । येथें गाई आणि गोपाळ ॥ ८ ॥ शमीपत्रपिंड देती । येथें काला निजसुखप्राप्ति ॥ ९ ॥ संतसज्जनीं केला काला । तुका प्रसाद लाधला ॥ १० ॥

---

१ पं. मूढ.–२ पं. मूट.–३ त. 'हो' नाहीं –४ त. वास.–५ दे. "ती" नाहीं. पं. त. पाउलें ती –६ दे. चिता.–७ दे. एक –८ दे. सुद्रसेनावरि. त. सुदर्शणावरि.

४२०६. फव्याचे बडबडे चवी ना सवाद । आपुला चि वाद आपणासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणें या शब्दाचे मरावें घेसणी[1] । अंतरें शाहाणी राहिजे हो ॥ छ्र ॥ गाढवाचा थुंकें[2] आइकतां कानीं । काय कोडवाणी ऐसियेचें ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यासी करावें वचन । त्याचे येती गुण अंगास ते ॥ ३ ॥

४२०७. दिवसा व्यापारचावटी । रात्री कुटुंबचिंता मोटी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय करूं या मनासी । नाठवे कां[3] हृषीकेशी ॥ छ्र ॥ वेश्येपाशीं रात्रीं जागे । हरिकीर्त्तनीं निद्रा लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालासी । वृथा संसारा आलासी ॥ ३ ॥

४२०८. अहो कृपावंता । होईं बुद्धीचा ये दाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ छ्र ॥ वदवी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझें अंतर वसवा ॥ ३ ॥

४२०९. निंदक तो परउपकारी । काय वर्णूं त्याची थोरी । जो[4] रजकाहुनि भेला[5] परि । सर्व गुणें आगळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेघे मोल धुतो फुका । पाप वरच्यावरि देखा । करीतसे[6] साधका । शुद्ध सरते तिहीं लोकीं ॥ छ्र ॥ मुखसंवदणी[7] सांगाते[8] । अवघें सांटविलें तेथें । जिव्हा साबण निरुतें । दोष काढी जन्माचे ॥ २ ॥ तया ठाव यमपुरीं । वास करणें अघोरीं । त्यासी दंडणें[9] करी । तुका ह्मणे न्हांणी[10] ते ॥ ३ ॥

४२१०. विद्या अल्प परी गर्वशिरोमणि । मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंगीं भरला ताठा कोणातें मानिना । साधूची छळणा स्वयें करी ॥ छ्र ॥ साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं[11] चांडाळ तो चि एक ॥ २ ॥ संतांची जो निंदा करी[12] मुखें जपे । खतेला सकळ पापें तो चि एक ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मैंद[13] । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

४२११. प्रपंचाची पीडा सोसिती[14] अघोरी । जया क्षणभरी नाम नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाम नोंठविती[15] आतमया रामाचें । धिगें[16] जिणें त्याचें भवा मूळ ॥ छ्र ॥ मूळ तें पापाचें आचरण तयाचें । नाहीं राघवाचें स्मरण त्या ॥ २ ॥ स्मरण भजन नावडे जयासी । आंदणीया दासी यमदूतां ॥ ३ ॥ चिंतन रामाचें न करी

---

१ दे. घाणी—२ दे. भुक.—३ दे. पं. "कां" नाहीं—४ दे. जे पं. 'जो' नाहीं.—५ दे. भले.—६ दे. करी. त. करितो.—७ पं. मुख्य०.—८ दे. सागते.—९ पं. दट.—१० पं. यमधर्म.—११ पं. त्रैलोकीं.—१२ पं. करितो या मुखें.—१३ पं. मैंद. दे. गोविद.—१४ पं. सोसी तो.—१५ त. न आठविती. दे. आठविती.—१६ त. 'धिग जिणें त्याचें भवा मूळ ॥ मूळ तें पापाचें आचरण तयाचें ।' हे दोन कडव्यातील दोन चरण नाहींत.

तो दोषी । एकांत तयासीं बोलों नये ॥ ४ ॥ नये त्याचा संग धरूं ह्मणे तुका। धरितां पातका वांटेकरी ॥ ५ ॥

**४२१२.** अर्थेविणे[1] पाठांतर कासया करावें । व्यर्थ चि मरावें घोकूनियां ॥ १ ॥ घोकूनियां काय वेगीं अर्थ पाहे । अर्थरूप राहे होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याला अर्थी आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलों नका ॥ ३ ॥

**४२१३.** बसतां[2] चोरापाशीं तैसी होय बुद्धि । देखतां चिं[3] चिंधी मन धांवे ॥१॥ ॥ ध्रु. ॥ व्यभिचाऱ्यापासीं बैसतां क्षणभरी । देखतां चि नारी मन धांवे ॥ ध्रु ॥ प्रपंचाचा छंद टाकुनियां गोवा । धरावें केशवा हृदयांत ॥ २ ॥ सांडुनियां देई संसाराची बेडी । कीर्तनाची गोडी धरावी गा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुला सांगतों मी एक । रुक्मिणीनायक मुखीं गावा ॥ ४ ॥

**४२१४.** मस्तकीं सहावें ठांकियासी जाणें[4] । तेव्हां देवपण भोगावें गा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आपुलिये स्तुती निंदा अथवा मान । टाकावा थुंकोन पैलीकडे ॥ ध्रु ॥ सद्गुरुसेवन तें चि अमृतपान । करुनी प्राशन बैसावें[5] गा ॥ २ ॥ आपुल्या मस्तकीं पडोत डोंगर । सुखाचें माहेर टाकूं नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां[6] सांगूं तुला किती। जिण्याची फजीती करूं नये ॥ ४ ॥

**४२१५.** स्वामिसेवा गोड । माते बाळकाचें कोड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जेंजें मागावें भातुकें । तेंतें पुरवी कौतुकें ॥ ध्रु ॥ खेळैविलें[7] कोडें । हरुषें बोले कीं बोबडें ॥ २ ॥ तुका ह्मणे लाड । तेथें[8] पुरे माझें कोड ॥ ३ ॥

**४२१६.** तुझें नाम पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दाहां नये विसां नये । पंनासां साटां नये ॥ ध्रु ॥ शां नये सहस्रा नये । लक्षकोडीलागीं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ ३ ॥

**४२१७.** संतांपायीं विन्मुख जाला । तो जरि संगति मागों आला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरि त्याहुनि दुरी जावें । सुखें एकांतीं बैसावें ॥ ध्रु ॥ आत्मचर्चा नाहीं जेथें । अगी लावुनि द्यावी तेथें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ३ ॥

**४२१८.** हिरा ठेवितां काळें गोहाण । मोल न तुटे दुकाळीं जाण ॥ १ ॥ तैसे संतजन पाहीं । विनटले श्रीहरिपायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे भक्त । तयांसी जन हें[9] निंदित ॥ ३ ॥

---

१ पं. अर्थाविण.–२ त. पं. बैसता –३ पं. "चि" नाहीं –४ पं. जाणा –५ पं. करावें.–
६ त. तुला सांगूं आतां किती ।.–७ पं. खेळवि लाटें कोडें ।.–८ पं. येथें.–९ दे. त. गहन.

४२१९. परिसें गे सुनेबाई । नको वेचूं दूध दहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवा चालिली पंढरपुरा । वेसीपासुनि आली घरा ॥ छ्र ॥ ऐकें गोष्टी सादर वाळे । करीं जतन फुटकें पाळें ॥ २ ॥ माझे हातींचा कलवड्ड । मजवांचुनि नको फोडूं ॥ ३ ॥ वेळवटक्षिरीचें लिंपन । नको फोडूं मजवांचून ॥ ४ ॥ उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥ ५ ॥ भिक्षुकें[2] आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ६ ॥ भक्षीं पँरिमित[3] आहारु । नको फारसी वरो सारूं ॥ ७ ॥ सून ह्मणे वहुत निकें । तुह्मी यात्रेसि जावें सुखें ॥ ८ ॥ सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ ९ ॥ सुनमुखीचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥ १० ॥ सवतीचे चाळे खोटे । इयां जावेंसें इला वाटे ॥ ११ ॥ आतां कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ॥ १२ ॥ मुलें लेंकरें घर दार । माझें येथें चि पंढरपूर ॥ १३ ॥ तुका ह्मणे ऐसें जन । गोवियेलें मायेंकरून ॥ १४ ॥

४२२०. एक ते गाढव मनुष्याचे वेषें । हालविती पुंस पुढें दाढी ॥ १ ॥ निंदा हें भोजन जेवण तयांसी । जोडी घँरीं रासी पातकांच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें वैसोनियां खाती । कुंभपाकीं होती नर्कवासी ॥ ३ ॥

४२२१. मागत्याची टाळाटाळी । झिंज्या वोढूनि कपाळीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा तंव भोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ छ्र ॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ३ ॥

४२२२. संसार करिती मोठ्या महत्वानें । दिसे लोका उणें न कळे त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पवित्रपण आपुलें घरच्यासी च दिसे । वाहेर उदास निंदिताती ॥ छ्र ॥ आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलाचे दोषगुण वाखाणिती ॥ २ ॥ विषयाचे ध्यासें जग बांधियेलें । ह्मणोनी लागले जन्ममृत्यु ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें संचितें चि असें । देवाजीचें पिसें सहजगुण ॥ ४ ॥

४२२३. गव्हाराचें ज्ञान अवघा रजोगुण । सुखवासी होऊन विषय भोगी ॥ १ ॥ त्यांसी[11] जेरी[12] ज्ञानउपदेश केला । संगेंविण त्याला राहावेना ॥ २ ॥ तुका ह्मणे संग उत्तम असावा । याविण उपावा काय सांगों ॥ ३ ॥

४२२४. भाग्यालागीं लांचावले । देहधर्म ते राहिले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कथे जातां अळसे मन । प्रपंचाचें मोटें ज्ञान ॥ छ्र ॥ अखंडप्रीति जाया । नेणे

---

१ पं. वळकट क्षाराचें.–२ पं. 'भिक्षुक०' हें कडवें नाहीं.–३ दे. त. मपित –४ पं. वेशे. त. वेशे –५ पं. 'पुस' नाहीं –६ पं. पर.–७ पं. आला –८ पं. करिती.–९ पं. जन्मामृत्य.–१० पं. कपाळीचें ऐसें.–११ पं. त्यासी ज्ञानउपदेश जरी पूर्ण केला ।.–१२ दे. 'जरी' नाहीं.

भजनाच्या ठाया ॥ २ ॥ कथाकीर्त्तन धनाचें । सर्वकाळ विषयीं नाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरिराया । ऐसे जन्मविले वांयां ॥ ४ ॥

४२२५. पतिव्रतेची कीर्त्ती वाखाणितां । सिंदळीच्या माथां तिडिक उठे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आमुचें तें आहे सहज बोलणें । नाहीं विचारुन केलें कोणीं ॥ ध्रु ॥ अंगें उणें त्याच्या बैसे टाळक्यांत । तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी काय करणें त्यासी । ढका खवंदासी लागतसे ॥ ३ ॥

४२२६. आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आवडी आवडी कळिवराकळिवरी । वरिली अंतरी ताळी पडे ॥ ध्रु ॥ अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडूं मागे तुटी हर्षयोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे एकें कळतें दुसरें । वैरियाचें[1] बरें आहाचाचें आहाच ॥ ३ ॥

४२२७. हे चि माझे[2] चित्तीं । राहो[3] भावप्रीति । विठ्ठल सुषुप्ती । जागृति स्वप्नासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आणिक नाहीं तुज मागणें । राज्यचाड संपत्ति धन । जिव्हे सुख तेणें । घेतां देहीं नाम तुझें ॥ ध्रु ॥ तुझें रूप सर्वां ठायीं । देखें ऐसें प्रेम देईं । नै[4] ठेवावा ठायीं । अनुभव चित्ताचा ॥ २ ॥ जन्ममरणाचा बाध । समूळूनि तुटे कंद । लागो हा चि छंद । हरि गोविंद वाचेसी ॥ ३ ॥ काय पालटे दरुषणें । अवघें कोंदाटे[5] चैतन्य । जीवशिवा खंडण । होय तैरे[6] चिंतितां ॥ ४ ॥ तुका ह्मणे या चि भावें । आह्मीं धालों तुझ्या नांवें[7] । सुखें होत जन्में[8] । भलते याती भलतैसीं ॥ ५ ॥

४२२८. मौनें[9] कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देईं माझ्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तूं माझें संचित तूं चि पूर्वपुण्य । तूं माझें प्राचीन पांडुरंगा ॥ ध्रु ॥ तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूं चि नित्यनेम नारायणा ॥ २ ॥ कृपावचनाची वाट पाहातसें । करुणा वोरसें वोल कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । वोल सर्वोत्तमा मजसवें ॥ ४ ॥

४२२९. काय करूं आतां धरुनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोनी नव्हे हित ॥ ध्रु ॥ आलें तें उत्तर वोलें स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे मना समर्थासीं गांठी । घालावी हे मांडी थापटूनि ॥ ३ ॥

---

१ दे. वरियानें –२ दे. त. माझा.–३ पं. राहो आतां भाव०.–४ पं. ठेवावा हा पायीं.– ५ त. कोंघाटे.–६ दे. त. ते रे.–७ दे. नामें.–८ दे. त. जन्म.–९ त. पं मौन्य.

४२३०. माझिया तो जीवें घेतलों हा सोस । पाहें तुझी वास भेटावया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मातेविण बाळ न मेनी आणिका । सर्वकाळ धोका स्तनपाना ॥ ध्रु ॥ वोसंगा निघाल्या वांचूनि न राहे । त्याचें आर्त माय पुरवीते ॥ २ ॥ तुका ह्मणे माते भक्तां तूं कृपाळ । गिळियेले [3]जाळ वनांतरीं ॥ ३ ॥

४२३१. ते काय पवाडे नाहीं म्यां ऐकिले । गोपाळ रक्षिले वनांतरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मावेचा वोणवां होऊनि राक्षस । लागला वनास चहूंकडे ॥ ध्रु ॥ गगनासी ज्वाळा लागती तुंबळ । गोधनें गोपाळ वेडावलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें पळावया वाट । नाहीं बा निपट ऐसें जालें ॥ ३ ॥

४२३२. धडकला अग्नि आह्मा येती वरी । गोपाळ श्रीहरी विनविती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अरे कृष्णा काय विचार करावा । आला रे वोणवा जळों आतां ॥ ध्रु ॥ अरे कृष्णा तुझें नाम बळिवंत । होय कृपावंत राख आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे अरे कृष्णा नारायणा । गोपाळ करुणा [6]भाकितिले ॥ ३ ॥

४२३३. अरे कृष्णा आह्मी तुझे निज गडी । नवनीत आवडी देत होतों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अरे कृष्णा आतां राखें कैसें तरी । संकटाभीतरीं पडियेलों ॥ ध्रु ॥ वरुषला इंद्र जेव्हां शिळाधारीं । गोवर्धन गिरी उचलिला ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझे पवाडे गोपाळ । वर्णिती सकळ नारायणा ॥ ३ ॥

४२३४. अरे कृष्णा तुवां काळया नाथिला । दाढे रगडिला रिठासुर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अरे कृष्णा तुवां पूतना शोषिली । दुर्बुद्धि कळली अंतरींची ॥ ध्रु ॥ गोपाळ करुणा ऐसी नानापरी । भाकिती श्रीहरी तुजपुढें ॥ २ ॥ तुझें नाम कामधेनु करुणेची । तुका ह्मणे त्यांची आली कृपा ॥ ३ ॥

४२३५. चहुंकडूनियां येती ते [10]कल्लोळ । सभोंवते [11]जौळ जवळि आले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सकुमार मूर्ति श्रीकृष्ण धाकुटी । घोंगडी आणि काठी खांद्यावरि ॥ ध्रु ॥ लहान लेंकरूं होतें तें[12] सगुण । विक्राळ वदन पसरिलें ॥ २ ॥ चाभाड तें एक गगनीं लागलें । एक तें ठेविलें भूमीवरि ॥ ३ ॥ तये वेळे[13] अवघे गोपाळ ही भ्याले । [14]तुकें ही लपालें भेऊनियां ॥ ४ ॥

१ त. घेतलासे सोस.–२ त. मानी.–३ पं. ज्वाळ–४ पं. वोनवा.–५ पं. जळों.– ६ त. भाकतील पं. भाकतील.–७ दे. राखें राखे कैसें तरी ।.–८ त. जेव्हां इंद्र–९ पं. कालिया.– १० दे. कलोळ.–११ पं. ज्वाळ.–१२ दे. होत ते. त. जालें तें–१३ पं. वेळीं –१४ त. तुका ही लपाला.

**४२३६.** श्रीमुख वोणवा[1] गिळीत चालिलें । भ्यासुर वासिलें वदनांबुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विक्राळ त्या दाढा भ्यानें पाहावेना । धाउनी रसना ज्वाळ गिळी ॥ छ ॥ जिव्हा लांब धांवे गोळा करी ज्वाळ । मोटें[2] मुखकमळ त्यांत घाली ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघा वोणवा गीळिला । आनंद जाहाला गोपाळांसी ॥ ३ ॥

**४२३७.** गोपाळ प्रीतीनें कैसे विनविती । विक्राळ श्रीपती होऊं नको ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको रे बा कृष्णा धरूं ऐसें रूप । आह्मां चळकांप सुटलासे ॥ छ ॥ होंई बा धाकुटा शाम चतुर्भुज । बैसोनियां गुज सुखें बोलों ॥ २ ॥ वोणव्याच्या रागें गिळिशील आह्मां । तुका मेघशामा पायां लागे ॥ ३ ॥

**४२३८.** सांडियेलें रूप विक्राळ भ्यासुर । झालें सकुमार कोडिसवाणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शाम चतुर्भुज मुकुट कुंडलें । सुंदर दंडलें नव बाळ ॥ छ ॥ गोपाळ ह्मणती कैसेंरे[3] बा कृष्णा । रूप नारायणा धरियेलें ॥ २ ॥ कैसा वाढलासी विक्राळ जालासी । गटगटा ज्वाळांसी गिळियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें पुसती गोपाळ । अनाथवत्सल[4] ह्मणोनियां ॥ ४ ॥

**४२३९.** बा रे कृष्णा तुझें मुख कीं कोमळ । कैसे येवढे ज्वाळ ग्रासियेले[5] ॥१॥ ॥ ध्रु. ॥ बा रे कृष्णा तुझी जिव्हा कीं कोवळी । होईल पोळली[6] नारायणा ॥ छ ॥ बैसें कृष्णा तुझें पाहूं मुखकमळ । असेल पोळलें कोणे ठायीं ॥ २ ॥ घोंगडिया खालीं[7] घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें आकळिला देव । कृपासिंधुराव त्रैलोक्याचा ॥ ४ ॥

**४२४०.** एक ह्मणती मुख वासीं नारायणा । पाहों दे वदना डोळेभरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वासुनियां मुख पहाती सकळ । अवघे गोपाळ व्योमाकार ॥ छ ॥ ह्मणती गोपाळ वेटे हो हा देव । स्वरूपाचा ठाव न कळे याच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे विठोबाभोंवते । मिळाले नेणते लहानथोर ॥ ३ ॥

**४२४१.** एक ह्मणती कृष्णा वासिलें त्वां मुख । तेव्हां थोर धाक पडिला आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गिळों लागलासी अग्नीचे कल्लोळ । आह्मी चळचळां[8] कांपतसों ॥ छ ॥ ज्वाळांबरोबरि गिळशील आह्मां । ऐसें मेघशामा भय वाटे ॥२॥ तुका ह्मणे ऐसे भाग्याचे गोपाळ । फुटकें कपाळ आमुचें चि ॥ ३ ॥

**४२४२.** गोपाळांचें कैसें केलें समाधान । देऊनि आलिंगन निवविले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्वाळाबरोबरि तुह्मां कां ग्रासीन । अवतार घेणें तुह्मांसाटीं ॥ छ ॥

---

१ पं. वोनवा.–२ पं. मोट.–३ पं. कैसे वारे कृष्णा.–४ त. पं. अनाथवछळ.–५ त. गिळियेले.–६ पं. पोवळी.–७ दे. घालीं. त. घडी.–८ त. चळचळ.

निर्गुण निर्भय मी सर्वांनिराळा । प्रकृतिवेगळा गुणातीत ॥ २ ॥ चिन्मय चिद्रूप अवघें चिदाकार । तुका ह्मणे पार नेणे ब्रह्मा ॥ ३ ॥

४२४३. ऐसा मी अपार पार नाहीं अंत । परि कृपावंत भाविकांचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुर्जनां चांडाळां करीं निर्दाळण । करीं संरक्षण अंकिताचें ॥ ध्रु ॥ भक्त माझे सखे जिवलग सांगाती । सर्वांग त्यांप्रति वोडवीन ॥ २ ॥ पीतांबरछाया करीन त्यांवरी । सदा त्यांचे घरीं दारीं उभा ॥ ३ ॥ माझे भक्त मज सदा जे रातले । त्यांघरीं घेतलें धरणें म्यां ॥ ४ ॥ कोठें हें वचन ठेविलें ये वेळे । तुका ह्मणे डोळे झांकियेले ॥ ५ ॥

४२४४. भ्रतारेंसी भार्या बोले गुज गोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥ ध्रु ॥ जोडितसां तुह्मी खाती हेरेंचोरें[3] । माझीं तंव पोरें हळहळीती ॥ २ ॥ तुमची व्याली माझे डाई हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ३ ॥ दुष्टवृत्ति नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्यां सुखें ॥ ४ ॥ भावा दीर कांहीं धड हा न बोले । नांदों कोणां खालें कैसी आतां ॥ ५ ॥ माझ्या अंगसंगें तुह्मांसी विश्रांति । मग धडगति नाहीं तुमची ॥ ६ ॥ ठाकतें ठमकतें जीव मुठी धरूनि । परि तुह्मी अजूनि न धरा लाज ॥ ७ ॥ वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥ ८ ॥ तुका ह्मणे जाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसें वर्ते ॥ ९ ॥

४२४५. कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित्त निरंतर ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझीं मायबापें बंधु हो बहिण । तुज करीं सीण त्यागीन मी ॥ ध्रु ॥ त्यांचें जरि तोंड पाहेन मागुता । तरि मज हत्या घडो तुझी ॥ २ ॥ सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहातों तुझी आण निश्चयेंसी ॥ ३ ॥ वेगळें निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥ ४ ॥ ताईत सांकळी गळांचि दुलडी । बाजुबंदजोडी हातसर ॥ ५ ॥ वेणीचे जे नग सर्व ही करीन । नको धरूं सीण मनीं कांहीं ॥ ६ ॥ नेसावया साडी सेलारी चुनडी । अंगींची[11] कांचोळी जाळिया फुलें ॥ ७ ॥ तुका ह्मणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥ ८ ॥

४२४६. उजळितां उजळे दीपकाची वाती । स्वयंभ ते ज्योति हिर्‍या अंगीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकीं महाकष्टें मेळविलें धन । एकासी जतन दैवयोगें ॥ ध्रु ॥ परिमळें

---

१ पं. भ्रतारासीं – २ त. दुजी नाहीं – ३ पं. चोरेंपोरें. – ४ पं. पटली – ५ दे. दुष्टुनि त. दृष्टवृत्ति – ६ पं. कोणा – ७ त. तैसें – ८ पं. करिती – ९ पं दोरचुडा. – १० पं. गळ्यांची दुलडी. – ११ पं. आगाची.

केलें चंदनाचें चिन्ह । निवडी ते भिन्न गाढव तो ॥ २ ॥ तुका ह्मणे जया अंगीं हरिठसा । तो तरे सहसा वंद्य होय ॥ ३ ॥

४२४७. बारावर्षें बाळपण । तें ही वेचलें अज्ञानें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा जन्म गेला वांयां । न भजतां पंढरिराया ॥ छ ॥ बाकी उरलीं आठ्याशीं । तीस वेचलीं कामासी ॥ २ ॥ बाकी उरलीं आठावन्न । तीस वेचलीं ममतेनें ॥ ३ ॥ बाकी उरलीं आठावीस । देहगेह विसरलास ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसा झाडा । संसार हा आहे थोडा ॥ ५ ॥

४२४८. सोवळा तो जाला । अंगीकार देवें केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येर करिती भोजन । पोट पोसाया दुर्जन ॥ छ ॥ चुकला हा भार । तयाची च येरझार ॥ २ ॥ तुका ह्मणे दास । जाला तया नाहीं नास ॥ ३ ॥

४२४९. आजि शिवला मांग । माझें विटाळलें आंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठलविठ्ठल हृदयांत ॥ छ ॥ जाली क्रोधासी भेटी । [5]तोंडावाटे नर्क लोटी ॥ २ ॥ [6]अनुतापीं न्हाऊं । तुका ह्मणे रवी पाहूं ॥ ३ ॥

४२५०. ठाव तुह्मांपाशीं । जाला आतां हृषीकेशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न लगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ॥ छ ॥ चोरट्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे मनें । आह्मां जालें समाधान ॥ ३ ॥

४२५१. पाळियेले लळे । माझे विठ्ठले कृपाळे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहुजन्माचें पोषणें । सरतें पायांपाशीं तेणें ॥ छ ॥ सवे दिली लागों । भातें आवडीचें मागों ॥ २ ॥ तुका ह्मणे भिन्न । नाहीं दिसों दिलें क्षण ॥ ३ ॥

४२५२. जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न [7]मैनी तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥ छ ॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । वारी त्यासी [8]पंढरी ॥ २ ॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडें दाटे गहिवरें ॥ ३ ॥ दधिमंगळभोजन सारा । ह्मणती करा मुरडींव ॥ ४ ॥ मागुता हा पाहों ठाव । पंढरिराव दर्शनें ॥ ५ ॥ तुका ह्मणे भूवैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥ ६ ॥

४२५३. न मिळती एका एक । जये नगरीचे लोक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भलीं तेथें राहूं नये । क्षणें होईल [9]न कळे काय ॥ छ ॥ न करितां अन्याय । वर्के

१ पं. नामठसा.–२ पं. तैसा.–३ पं. राहिली–४ पं. कोधियासी–५ न. तोंडावाटा– ६ पं. अनुतापें–७ दे. मानी–८ पं. पटरीची.–९ पं. नेणो काय ।

करीती[1] अपाय ॥ २ ॥ नाहीं पुराणाची प्रीति । ठायींठायीं पंचाइती ॥ ३ ॥ भल्या बुऱ्या[2] मारी । होतां कोणी न निवारी[3] ॥ ४ ॥ अविचाऱ्या हातीं । देऊनि प्रजा नागविती ॥ ५ ॥ तुका ह्मणे दुरी । सुखें सेवावी ते बरी ॥ ६ ॥

४२५४. शिकवणें नाक झाडी । पुढील[4] जोडी कळेना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निरयगांवीं भोग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥ छ्र ॥ अवगुणांचा सांटा करी । ते चि धरी जीवासी[5] ॥ २ ॥ तुका ह्मणे जडबुद्धि । कर्मशुद्धी सांडवी ॥ ३ ॥

४२५५. गोपीचंदन मुद्रा धरणें[6] । आह्मां लेणें वैष्णवां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मिरवूं अळंकार लेणें । हीं[7] भूषणें स्वामीचीं ॥ छ्र ॥ विकलों तें[8] सेवाजीवें । एकया भावें एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे शूर जालों । बाहेर आलों संसारा ॥ ३ ॥

४२५६. विषयांचे लोलिंगत । ते फजीत होतील ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळबीज व्हावें ॥ छ्र ॥ शिखासूत्र सोंग वरि । दुराचारी दंड पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे अभिमाना[9] । नारायणा न सोसे ॥ ३ ॥

४२५७. वंडिलें[10] दिलें भूमिदान । तें जो मागे अभिळासून ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दंड यमा घरीं ॥ छ्र ॥ उभयकुल समवेत । नर्कीं प्रवेश[11] अद्भुत ॥ २ ॥ तप्तलोहें भेटी । तुका ह्मणे कल्पकोटी ॥ ३ ॥

४२५८. लटिकी ग्वाही सभेआंत । देतां[12] पतित आगळा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कुंभपाकीं वस्ती करूं । होय धुरु कुळेंसी ॥ छ्र ॥ रजस्वला रुधिर स्रवे । तें चि ध्यावें तृषेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे जन्मा आला । काळ जाला कुळासी ॥ ३ ॥

४२५९. आचरे दोष न धरी धाक । परीपाक दुःखाचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चांडाळ तो दुराचारी । अंगीकारी कोण त्या ॥ छ्र ॥ नव्हे संतान वोस घर । अंधकार कुळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें दान । घेतां पतन दुःखासी ॥ ३ ॥

४२६०. कींविलवाणा जाला आतां । दोष करितां न विचारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अभिळाषी नारी धन । झकवी जन लटिकें चि ॥ छ्र ॥ विश्वासिया करी[13] घात । न धरी चित्ता कांटाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥ ३ ॥

४२६१. घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिळाषी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तो[14] ही येथें कामा नये । नर्का जाय ह्मणोनि ॥ छ्र ॥ विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलांचें ॥ २ ॥ तुका ह्मणे दांभिक तो । नर्का जातो स्वइच्छा ॥ ३ ॥

---

१ दे. त. करी.–२ पं. बुरा –३ पं. विचारी.–४ पं. पुढीळ ते जोडी.–५ त. जीवेंसी.–६ पं. धारणें.–७ पं. हे.–८ पं. तो सेवे जीव । एका भावें०.–९ पं. अभिमान.–१० पं. वडिलीं –११ पं. प्रवेशे –१२ त. पं. देतो –१३ पं. करितो.–१४ पं. “ही” नाहीं

४२६२. सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वसुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुलतसों ॥ ध्रु ॥ असों ऐसों कोठें आठव ही नाहीं । देहीं च विदेही भोगूं दशा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य आतां ॥ ३ ॥

४२६३. वरिवरि बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं जाली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पैराव्याचे भार पाहुनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरां ॥ ध्रु ॥ मनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥ २ ॥ धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे साधु बोले खर्गधार । खोंचतें अंतर दुर्जनाचें ॥ ४ ॥

४२६४. गंधर्वनगरीं क्षण एक राहावें । तें चि पैं करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥ ध्रु ॥ वंध्यापुत्राचीं लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ २ ॥ मृगजळा पोहीं घालुनि सज्ञाना । तापलिया जना निववावें[13] ॥ ३ ॥ तुका ह्मणे मिथ्या देहेंद्रियकर्म । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ४ ॥

४२६५. तुझा ह्मणविलों[14] दास । केली उच्छिष्टाची आस ॥ १ ॥ मुखीं घालावा कवळ । जरी तूं होशील कृपाळ ॥ २ ॥ सीण भाग माझा पुसें । तुका ह्मणे न करीं हांसें ॥ ३ ॥

४२६६. काय मागें आह्मी गुतलों काशानीं । पुढें वाहों मनीं धाक देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कीर्त्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटोनियां काय घ्यावें आह्मां ॥ ध्रु ॥ घेउनी धरणें बैसती उपवासी । हट[16] आह्मांपासीं नाहीं तैसा ॥ २ ॥ तातडी तयांनीं केली विटंबणा । आह्मां नारायणा काय उणें ॥ ३ ॥ नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा । जीव भाव आमुचा देऊं तुज ॥ ४ ॥ तुका ह्मणे काय मानेल तें आतां । तूं घेई अनंता सर्व माझें ॥ ५ ॥

४२६७. जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ केला घरांत रिघावा । ठायीं पाडियेला ठेवा ॥ ध्रु ॥ हाता चढे धन । ऐसें रचलें कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे मिटी । पायीं देउनि केली लुटी ॥ ३ ॥

---

१ पं. डुल्लतसों–२ पं. आतां.–३ पं. अंगा.–४ दे. त. पं युध्याचिया.–५ पं. पारीख्याचे–६ दे. फिरंगेचा (पूर्वी 'फिरंगीचा' होतें).–७ दे. त. खोचती अंतरें–८ दे. पं. मुळक्षेत्र–९ त. बाधावी.–१० पं. वंध्यापुत्रा घरीं लग्ना०.–११ पं. पाहा.–१२ दे. "मृगजळा०" हे चरण नाहीं–१३ पं. तोषवावें–१४ त. ह्मणविले–१५ दे. घ्यावें.–१६ पं. हा हट.

४२६८. दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कां[1] द्वारीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसे सांगों जातां जना । नये कोणाचिया मना ॥ छ ॥ बरें विचारूनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥ २ ॥ तुका ह्मणे रांडलेंका । अंतीं जासिल यमलोका ॥ ३ ॥

४२६९. गुळ सांडुनि गोडी घ्यावी । मीठ सांडुनि चवि चाखावी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा प्रपंच सांडुनि धांवा । मग परमार्थ जोडावा ॥ छ ॥ साकरेचा नव्हे ऊंस । आह्मां कैंचा गर्भवास ॥ २ ॥ बीज भाजुनि केली लाही । जन्ममरण आह्मां नाहीं ॥ ३ ॥ आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष जाला वाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघें जग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ५ ॥

४२७०. आस्तुचें दंडवत पायांवरि डोई । व्हावें उतराई ठेवूनियां ॥ १ ॥ कराल तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी लडिवाळें अनाथें । ह्मणोनि दिनानाथें सांभाळावें ॥ ३ ॥

४२७१. भाग्यवंत आह्मी विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं तें पुरवीत आणुनि जवळी । गाउनी साउली गीतें सुखें ॥ छ ॥ प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । बोलली सकळ सुखें ठायीं ॥ २ ॥ आपुल्या स्वभावें जैसें जेथें असों । तैसे तेथें दिसों साजिरे चि ॥ ३ ॥ वासनेचा कंद उपडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे भक्तजनाची माउली । करील साउली विठ्ठल आह्मां ॥ ५ ॥

४२७२. तीर्थें फळती काळें जन्में आगळिया । संतदृष्टी पाया हेळामात्रें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुखाचे सुगम वैष्णवांचे पाय । अंतरींचा जाय महाभेव ॥ छ ॥ काळें हि न सरे तपें समाधान । कथे मूढजन समाधिस्थ ॥ २ ॥ उपमा द्यावया सांगतां आणीक । नाहीं तिन्ही लोक धुंडाळितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी राहिलों येणें सुखें । संतसंगें दुःखें नासावया ॥ ४ ॥

४२७३. संतजना माझी यावया करुणा । ह्मणउनी दीनें हीन जालों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नेणें योग युक्ती नाहीं ज्ञान मति । गातसें या गीती पांडुरंगा ॥ छ ॥ भाव भक्ती नेणें तप अनुष्ठान । करितों किर्त्तन विठ्ठलाचें ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान ध्यान न कळे धारणा । एका नारायणा वांचूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोझा विटोबासी भार । जाणे हा विचार तो चि माझा ॥ ४ ॥

---

१ त. नर्कद्वारीं.–२ दे. घ्यावा.–३ दे. त. आकारासि.–४ पं. गान.–५ न. पं. जेथें जेथें.–६ पं. अंतरीं.–७ त. महाभव.–८ पं. हीन दीन.–९ पं. गातसें.–१० पं. माझा.

४२७४. ऐसें काय उणें जालें तुज देवा । भावेंविण सेवा घेसी माझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय मज धांवा न लगे सुशारा । पहावें दातारा विचारूनि ॥ छ ॥ करितों पाखांडें जोडूनि अक्षरें । नव्हे ज्ञान खरें भक्तिरस ॥ २ ॥ गुणवाद तुझे न वोलवे[1] वाणी । आणिकां[2] छळणी वाद सांगें[3] ॥ ३ ॥ तरी आतां मज राखें तुझे पायीं । देखसील कांहीं प्रेमरस ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुज हांसतील लोक । निष्कामें[4] सेवक ह्मणोनियां ॥ ५ ॥

४२७५. भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनुष्याचे परी बोले[5] रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥ छ ॥ तिमयाचा बैल करी सिंकविलें[6] । चित्रींचें वाहुलें गोष्टी सांगे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ॥ ३ ॥

४२७६. अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्ता हातीं चोट आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव्हारा[7] वैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिंपताती ॥ छ ॥ एकीवेकीन्यायें होतसे प्रचित । तेणें लोक समस्त भुलताती ॥ २ ॥ तयाचे स्वाधीन दैवतें असती । तरी कां मरती त्यांचीं[8] पोरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होवाचा तो ही नव्हे ॥ ४ ॥

४२७७. कोणा एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागें देखी ॥१॥ ॥ ध्रु. ॥ वुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ छ ॥ तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मायवापाचें उचित । करावें तें हित वाळकाचें ॥ ३ ॥

४२७८. पंढरपुरींचें दैवत भजावें । काया वाचा जावें शरण त्या ॥ १ ॥ ॥ ध्रु ॥ मनीं ध्यान करी अहंता धरूनी । तया चक्रपाणी दूर ठेला ॥ छ ॥ मान अभिमान सांडुनियां द्यावे । अवघ्यां नीच व्हावें तरी भेटी[9] ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि कोणासी सांगावें । सादर होउनि भावें भजें देवा ॥ ३ ॥

४२७९. अधमाचें चित्त अहंकारीं मन । उपदेश शीण तया केला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पापियाचें मन न[11] करी आचार । विधवे[12] शृंगार व्यर्थ केला ॥ छ ॥ अधमाचें चित्त दुश्चित्त ऐकेना । वांयां सीण मना करूं काय ॥ २ ॥ गर्धवासी दिली चंदनाची उटी । केशर लल्हाटीं शुकराच्या ॥ ३ ॥ पतिवंचकेसी सांगतां

१ पं. न लगे धावा.–२ पं. आणीक–३ पं. सांगों–४ दे. निकाम. पं. नीःकाम–५ त. बोल–६ त. नागिनले.–७ पं. देव ते–८ पं. त्याची–९ पं. दुरी–१० पं. भ्रामीः–११ पं. 'न' नाहीं.–१२ पं. विधवेनी.

उदंड । परि तें पाषांड तिचे मनीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसें अभाविका[1] सांगतां । वाउगा चि चित्ता[2] सीण होय ॥ ५ ॥

४२८०. किती उपदेश करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शुद्ध हे वासना नाहीं चांडाळाची । होळी आयुष्याची केली तेणें ॥ ध्रु ॥ नाहीं शुद्ध भाव नायके वचन । आपण्या आपण नाडियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी काय व्याली रांड । करितो बडबड रात्रंदिस[3] ॥ ३ ॥

४२८१. संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वीट ये कर्णासी संतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥ ध्रु ॥ कथेमाजी निज वाटे नित्यक्षणीं । स्त्रियेचे कीर्त्तनीं प्रेमें जागे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥ ३ ॥

४२८२. मणि पडिला दाढेसी मकरतोंडीं । सुखें हस्तें चि काढवेल प्रौढीं ॥१॥ ॥ ध्रु. ॥ परि मूर्खाचें चित्त बोधवेना । दुधें कूर्मीच्या पाळवेल सेना ॥ ध्रु ॥ सकळ पृथ्वी हिंडतां कदाचित । ससीसिंगाची प्राप्त होय तेथें ॥ २ ॥ अतिप्रयत्नें गाळितां वाळुवेतें । दिव्य तेलाची प्राप्त होय तेथें ॥ ३ ॥ अतिक्रोधें खवळला फणी पाहीं । धरूं येतो मस्तकीं पुष्पप्रायी ॥ ४ ॥ पहा ब्रह्मानंदें चि एकीं हेळा । महापातकी तो[4] तुका मुक्त केला ॥ ५ ॥

४२८३. भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें केलें भक्तिभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि चिंता नाहीं आह्मां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥ ध्रु ॥ आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें[5] ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां देवाचा सांगात । नाहीं विसंवत येर येरां ॥ ३ ॥

४२८४. आतां तरी माझी परिसा[6] विनंती । रखुमाईच्या पति पांडुरंगा ॥ १ ॥ चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा ह्मणताती मज । आतां आहे लाज हे चि तुह्मां ॥ ३ ॥

४२८५. नाहीं बळयोग अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगीं । नाहीं बळ अंगीं भजनाचें ॥ ध्रु ॥ काय पांडुरंगा करूं वा विचार । झुरतें अंतर भेटावया ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगा वडिलपणें बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणां ॥ ३ ॥

१ दे. त. अभावीं.–२ दे. चिता–३ पं. रात्रदिवस–४ त. 'तो' नाहीं.–५ पं. सुख.–
६ दे. परिसा वीनवती पं. परिसावी विनती.–७ त. सोयरिया

**४२८६.** जिहीं तुझी कास भावें धरियेली । त्यांची नाहीं केली सांड देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुह्मी डोळे झांकियेले ॥ छ ॥ राव रंक तुज सारिखे चि जन । नाहीं थोर लहान तुजपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें आपंगिलें भक्तां । माझिया संचिता कृपा नये ॥ ३ ॥

**४२८७.** कोणतें कारण राहिलें यामुळें । तें म्यां तुज बळें कष्टवावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं जात जीव नाहीं होत हानि । सहज तें मनीं आठवलें ॥ छ ॥ नाहीं चिंतीं कांहीं मरतों उपासी । अथवा त्या ह्मैसी गाई व्हाव्या ॥ २ ॥ हें तों तुज कळों येलसे अंतरीं । लौपणीक वरी साच भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा नासिवंतासाटीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥ ४ ॥

**४२८८.** पहावया तुझा जरि बोलें अंत । तरि माझे जात डोळे देवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ स्तंवीं तुज नाहीं घातलें भल्हादें । आपुल्या आनंदें अवतार ॥ छ ॥ भक्ताचिया काजा जालासी सगुण । तुज नाहीं गुण रूप नाम ॥ २ ॥ ऐसा कोण देवा अधम यातीचा । निर्धार हा साचा नाहीं तुझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोले कवतुकें गोष्टी । नेदीं येऊं पोटीं राग देवा ॥ ४ ॥

**४२८९.** प्रगट व्हावें हे अज्ञानवासना । माझी नारायणा हीनबुद्धि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खाणीवाणी होसी काष्टीं तूं पाषाणीं । जंतु जीवांजनीं प्रसिद्ध हा ॥ छ ॥ ज्ञानहीन तुज पाहें अल्पमति । लहान हा चित्तीं धरोनियां ॥ २ ॥ परि तूं कृपाळ होसी देवराणा । ब्रिदें तुझीं जना प्रसिद्ध हें ॥ ३ ॥ उतावीळ बहु भक्तांचिया काजा । होसी केशीराजा तुका ह्मणे ॥ ४ ॥

**४२९०.** जरी तुझा मज नसता आधार । कैसा हा संसार दुन्हावता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसीं[११] बळी कोण होईल पुरता । जो हे वारी चिंता आशापाश ॥ छ ॥ मायामोहफांसा लोकलाजवेडी । तुजवीण तोडी कोण एक ॥ २ ॥ हें तों मज कळों आलें अनुभवें । बरें माझ्या जीवें पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे यास तूं चि माझा ग्वाही[१२] । पुरि भाव नाहीं जैना[१३] लोका ॥ ४ ॥

**४२९१.** तुजविण चाड आणिकांची कांहीं । धरीन हें नाहीं तुज ठावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तरणउपाय योगक्षेम माझा । ठेवियेला तुझ्या पायीं देवा ॥ छ ॥

---

१ पं. माटी –२ दे. मारिके.–३ दे. हाणि. न. पं. हाणी.–४ न. पं. चिंता –५ न. उतवागि. ६ दे. त. लाखणीक.–७ पं. भावें –८ पं. स्तंभीं –९ त. नाहीं तुज –१० पं. जीवजनीं –११ पं. ऐसा हा बळी०.–१२ दे. गोही पं. गाही –१३ पं. जनलोका

कोण मज आळी काय हे तांतडी । सोनियाची घडी जाय दिस ॥ २ ॥ तुझिया नामाचें ल्यालोंसें भूषण । कृपा संतजन करितील ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाला आनंदाचा वास । हृदया या नास नेव्हे कधीं ॥ ४ ॥

४२९२. हें चि सुख [3]पुढें मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जन्मजन्मांतरीं तुझा चि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥ छ ॥ दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥ २ ॥ [4]अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी जेजे इच्छा करूं । ते ते कल्पतरु पुरविसी ॥ ४ ॥

४२९३. तुज केलिया नव्हे ऐसें काई । डोंगराची राई क्षणमात्रें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मज या लोकांचा न साहे आघात । देखणें प्रचित जीव घेती ॥ छ ॥ सहज विनोदें बोलियेलों गोष्टी । [6]आरंभी तों पोटीं न धरावी ॥ २ ॥ दीनरूप मज करावें नेणता । याहुनी अनंता आहें तैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेणें मज तूं भोगसी । तें करीं जनासीं चाड नाहीं ॥ ४ ॥

४२९४. ऐसा सर्व भाव तुज निरोपिला । तूं मज एकला सर्वभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंतरींची कां हे नेणसील गोष्टी । परि सुखासाटीं बोलविसी ॥ छ ॥ सर्व माझा भार तुज चालवणें । तेथें[8] म्यां बोलणें काय एक ॥ २ ॥ स्वभावें स्वहित हिताचें कारण । कौतुक करून निवडिसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं हें जाणसी गा देवा । आमुच्या स्वभावा अंतरींच्या ॥ ४ ॥

४२९५. लोखंडाचे न पाहे दोष । शिवोन परीस सोनें करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जैसी तैसी[10] तरी वाणी । मना आणी माउली ॥ छ ॥ लेकराचें स्नेहे गोड । करी कोड त्यागुणें ॥ २ ॥ मागें पुढें रिघे लोटी । साहे खेटी [11]कैरी तें ॥ ३ ॥ तुका [12]विनवी पांडुरंगा । ऐसें सांगा आहे हें ॥ ४ ॥

४२९६. पर्वकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा । [13]कांडवी ठोंबरा संतांलागीं ॥ छ ॥ [14]बाइलेचीं सर्व आवडीनें पोसी । [15]मातापितरांसी दवडोनी ॥ २ ॥ श्राद्धीं कष्टी होय

१ पं. कोण –२ पं. नाहीं –३ पं. पुडती –४ पं. 'अभय देऊनि' हें कडवें नाहीं – ५ पं. पुरवावे –६ दे. अरभी –७ पं. ऐसा तुज भाव सर्व निरोपिला ।.–८ पं. 'तेथें म्यां० कारण ।' हे दोन चरण नाहींत.–९ दे. 'न' नाहीं –१० पं. 'तैसी' नाहीं.–११ पं. कौतुकें – १२ दे. त. विनंती.–१३ पं. काडितो –१४ पं. बाइलेच्या गोता आवडीनें०.–१५ पं. मातापितयांसी दवडितो ।.

सांगतां ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥ ३ ॥ नेतो पानें फुलें वेश्येला उदंड । ब्राह्मणासी खांड नेदी एक ॥ ४ ॥ हातें मोऱ्या शोधी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कांटाळतो ॥ ५ ॥ सारा वेळ धंदा करितां श्रमेना । साधूच्या दर्शना जातां कुंथे ॥ ६ ॥ हरिच्या कीर्तनीं गुंगायासि लागे । येरवीं तो जागे उगला चि ॥ ७ ॥ पुराणीं बैसतां नाहीं रिकामटी । खेळतो सोंगटी अहोरात्रीं ॥ ८ ॥ देवाच्या विभुती न पाहे सर्वथा । करी पानवथा नेत्रभिक्षा ॥ ९ ॥ गाईला देखोनी वदबदां मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥ १० ॥ ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोटा । प्रेमें घेतो घोंटा घटघटां ॥ ११ ॥ तुका ह्मणे ऐसे प्रपंचीं गुंतले । जन्मोनि मुकले विठोबासी ॥ १२ ॥

४२९७. आपुल्या पोटासाटीं लोकांची मौढी वाणी । संतांची वदनीं निंदा करी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पोटा घातलें जेणें अन्न । न ह्मणे पतितपावन ॥ छ ॥ जेणें घातलें संसारीं । विसरला तया हरी ॥ २ ॥ मी कोठील आणि कोण । हें न कळे जयालागून ॥ ३ ॥ तुका ह्मणे नरस्तुती । करितो भाट त्रिजगतीं ॥ ४ ॥

४२९८. आह्मी रामाचे राऊत । वीर झुंझार बहुत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मनपवनतुरंग । हातीं नामाची फिरंग ॥ छ ॥ वारू चालवूं चहूंखुरीं । घाला घालूं यमपुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे पेणें । आह्मां वैकुंठासी जाणें ॥ ३ ॥

४२९९. पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास घेती[5] जन्म ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर्मधर्म त्याचे जाला नारायण । त्याचेनी पावन तिन्ही लोक ॥ छ ॥ वर्णअभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ २ ॥ अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाट जालीं ॥ ३ ॥ वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥ ४ ॥ कबीर मोमीन लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥ ५ ॥ कान्होपात्र खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेदू हरिचे पायीं ॥ ६ ॥ चोखामेळा बंका जातीचा माहार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥ ७ ॥ नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव[11] तियेसवें ॥ ८ ॥ मैराळा[12] जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें[13] काय सांगों ॥ ९ ॥ यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ १० ॥ तुका ह्मणे तुह्मी विचारावे[14] ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥ ११ ॥

---

१ पं. सांगाया.–२ त. करी कष्ट.–३ पं. अहोरात्र.–४ पं. पोटासाटीं प्रौढि लोकांसी वाणी–५ पं. जन्म घेती.–६ पं. वर्णअभिमान.–७ पं. हरिभजनीं.–८ दे. त. लतिब–९ दे. त. सेना–१० पं. कान्होपात्रा. दे. कागोपात्र.–११ पं. तिच्यासवें.–१२ पं. मैराळ.–१३ पं. नामाचें–१४ त. विचारावे.

४३००. नामासारिखी करणी । हे तों न दिसे त्रिभुवनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सिलंगणींचें सोनें । ठेवूं नये तें गाहाण ॥ छ्र ॥ आदित्याचीं झाडें । काय त्याचा उजड पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ब्रिदें सोडोनियां ठेवा ॥ ३ ॥

४३०१. येऊनि संसारा काय हित केलें । आयुष्य नासिलें शिश्नोदरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ विषय सेवितां कोण तृप्त जाला । इंधनीं निवाला अग्नि कोठें ॥ छ्र ॥ देखोनी मृगजळ भांबावलीं वेडीं । विचाराची थडी न टाकिती ॥ २ ॥ ऐसियां जीवांसी सोय न लाविसी । निष्ठुर कां होसी कृपाळुवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा अगाध पैं थोरी । सर्वांचे अंतरीं पुरलासी ॥ ४ ॥

४३०२. समर्थाचे सेवे वहु असे हित । विचार हृदयांत करुनी पाहें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वरकडाऐसा नव्हे हा समर्थ । क्षणें चि घडित सृष्टी नासे ॥ छ्र ॥ ज्याची कृपा होतां आपणा ऐसें करी । उरों नेदी उरी दारिद्राची ॥ २ ॥ ऐशालागीं मन वोळगे अहर्निशीं । तेणें वंद्य होशी ब्रह्मादिकां ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें चि आहे पैं मुद्दल । सत्य माझा बोल हा चि माना ॥ ४ ॥

४३०३. पिकलिये सेंदे कडुपण गेलें । तैसें आह्मां केलें पांडुरंगें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काम क्रोध लोभ निमाले ठायीं चि । सर्व आनंदाची सृष्टि जाली ॥ छ्र ॥ आठव नाठव गेले भावाभाव । जाला स्वयमेव पांडुरंग ॥ २ ॥ तुका ह्मणे भाग्य या नांवें ह्मणीजे । संसारीं जन्मीजे या चि लागीं ॥ ३ ॥

४३०४. येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजनमार्गी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चंचळ चित्तासी ठेवूनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥ छ्र ॥ भावाचा पैं हात धरावा निश्चयें । तेणें भवभय देशधडी ॥ २ ॥ नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं । आवडीनें गाई सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य वंश त्या नराचा । ऐसा निश्चयाचा मेरु जाला ॥ ४ ॥

४३०५. षड्रसीं रांधिलें खापरीं घातलें । चोहोटां ठेविलें मध्यरात्रीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यासी सदाचारी लोक न शिवती । श्वानासी निश्चिती फावलें तें ॥ छ्र ॥ तैसें दुष्टकर्म जालें हरिभक्ता । त्यागिली ममता विषयासक्ति ॥ २ ॥ इहपरलोक उभय विटाळ । मानिती केवळ हरिचे दास ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा आवडे हे सेवा । अनुदिनीं व्हावा पूर्ण हेतु ॥ ४ ॥

---

१ दे. नागें. त. नासें.–२ पं. पिकल्या. दे. पिकल्य.–३ न. वाटिलें–४ पं. चोहाट त. चोहटा.–५ पं. त. दुष्कर्म.

**४३०६.** बीज भाजुनि केली लाही । आह्मां जन्ममरण नाहीं ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ आकाराशी कैंचा ठाव । देहप्रत्यक्ष जाला देव ॥ छ ॥ साकरेचा नव्हे उस । आह्मां कैंचा गर्भवास ॥ २ ॥ तुका ह्मणे औघा जोग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ३ ॥

**४३०७.** वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥ छ ॥ पितृसेवा पुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥ २ ॥ अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥ ३ ॥ धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याति । तुका ह्मणे मुक्ति पायीं लोळे ॥ ४ ॥

**४३०८.** मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे[1] ठावा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भाग्यवंत घेती वेचूनियां [2]मोलें । भारवाही मेले वाहतां ओझें ॥ छ ॥ चंद्रामृतें तृप्तिपारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ २ ॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षवंता दृष्टी रत्न जैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय अंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वांयां जाय ॥ ४ ॥

**४३०९.** आलिया संसारीं देखिली पंढरी । कीर्ति महाद्वारीं वाणूं[3] तुझी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पताकांचे भार नामाचे गजर । देखिल्या संसार सफळ जाला ॥ छ ॥ साधुसंतांचिया धन्य जाल्या भेटी । सांपडली लुटी मोक्षाची हे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां हें चि पैं [4]मागणें । पुढती नाहीं येणें संसारासी ॥ ३ ॥

**४३१०.** ऐसे[5] कैसे जाले भोंदू । कर्म करोनि ह्मणती साधु ॥१॥ ॥ ध्रु. ॥ अंगा लावूनियां राख । डोळे झांकुनी करिती पाप ॥ छ ॥ दावुनि वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ॥२॥ तुका ह्मणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥३॥

**४३११.** कोणी निंदा कोणी वंदा । आह्मां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तुह्मांसी गरज । आह्मी भजूं पंढरिराज ॥ छ ॥ तुह्मांसारिखें चालावें । तेव्हां स्वहिता मुकावें ॥ २ ॥ तुका ह्मणे हो कां कांहीं । गळ दिला विठ्ठल पायीं ॥ ३ ॥

**४३१२.** तुझे नामें दिनानाथा । आह्मी उघडा घातला माथा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां न धरावें दुरी । बोल येईल ब्रीदावरी ॥ छ ॥ पतित होतों ऐसा ठावा । [6]आधीं कां न विचारावा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझे पायीं । आह्मी मिरास केली पाहीं ॥ ३ ॥

---

१ त. ठावा नाहीं.–२ पं. मोल.–३ दे. त. वानूं.–४ पं. मागेन.–५ पं. 'ऐसे कैसे०' हे कडवें नाहीं.–६ पं. आधी च कां०.

४३१३. रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न। चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि जाली। कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥ छ्रु ॥ देशकालवस्तुभेद मावळला। आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ २ ॥ न जाला प्रपंच आहे परब्रह्म। अहंसोहं ब्रह्म आकळलें ॥ ३ ॥ तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग। तें चि जाला अंगें तुका आतां ॥ ४ ॥

४३१४. नीत सांडोनि अवनीत चाले। भंडउभंड भलतें चि बोले ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यांत कोणाचें काय बा गेलें। ज्याचें तेणें अनहित केलें ॥ छ्रु ॥ ज्यासि वंदावें त्यासी निंदी। मैत्री सांडोनि होतसे दंदी ॥ २ ॥ आन यातीचे संगती लागे। संतसज्जनामध्यें ना वागे ॥ ३ ॥ केल्याविण पराक्रम सांगे। जेथें सांगे तेथें चि भीक मागे ॥ ४ ॥ करी आपुला चि संभ्रम। परि पुढें कठीण फार यम ॥ ५ ॥ तुका ह्मणे कांहीं नित्यनेम। चित्तीं न धरी तो अधम ॥ ६ ॥

४३१५. मानूं कांहीं आह्मी आपुलिया ईच्छा। नाहीं तरि सरिसा रंकरीवो ॥१॥ आपुल्या उदास आहों देहभावीं। मग लज्जाजीवीं चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे खेळों आह्मी सहजलीळे। ह्मणोनी निराळे सुखदुःखा ॥ ३ ॥

४३१६. बोले तैसा चाले। त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अंगें झाडीन अंगण। त्याचें दासत्व करीन ॥ छ्रु ॥ त्याचा होईन किंकर। उभा ठाकेन जोडोनि कर ॥ २ ॥ तुका ह्मणे देव। त्याचे चरणीं माझा भाव ॥ ३ ॥

४३१७. पाण्या निघाली गुजरी। मन ठेविलें दो घागरीं। चाले मोकळ्या पदरीं। परी लक्ष तेथें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वावडी उडाली अंबरीं। हातीं धरोनियां दोरी। दिसे दुरिच्या दुरी। परी लक्ष तेथें ॥ छ्रु ॥ चोर चोरी करी। ठेवी वनांतरीं। वर्ततसे चराचरीं। परी लक्ष तेथें ॥ २ ॥ व्यभिचारिणी नारी। घराश्रम करी। परपुरुष जिव्हारीं। परी लक्ष तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे असों भलतिये व्यापारीं। लक्ष सर्वेश्वरीं। चुकों नेदी ॥ ४ ॥

४३१८. जनाचिया मनीं जावें कासियेसी। माझी वाराणसी पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें भागीरथी येथें भीमरथी। अधिक ह्मणती चंद्रभागा ॥ छ्रु ॥ तेथें माधवराव येथें यादवराव। जाणोनियां भाव पुंडलिकाचा ॥ २ ॥ विष्णुपद गया ते

१ त. क्वळ्लें.–२ दे. त. स्वइच्छा.–३ त. रंकराव–४ त. कळों–५ दे. सुख दुःख. त. सुखदु.खें.–६ त. संगें जावें कासियासी ।.–७ त. अधिक हा भाव पुंडलीक। पं. अधिक तो भाव पुडलीक ।.

चि येथें आहे। प्रत्यक्ष हें पाहे विटेवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे हे चि प्रपंच उद्धरी। आतां पंढरपुरी[1] घडो बापा ॥ ४ ॥

४३१९. नको येऊं लाजे होय तूं परती। भजों दे श्रीपती सखा माझा ॥ १ ॥ तुझे संगतीनें मोटा जाला घात। जालों मी अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे रांडे घेइन काठीवरी। धनी सहाकारी राम केला ॥ ३ ॥

४३२०. भक्तिऋण घेतलें माझें। चरण गाहाण आहेत तुझे ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ प्रेम व्याज देई हरी। माझा हिशेब लवकरी करीं ॥ ध्रु ॥ माझें मी न सोडीं धन। नित्य करितों कीर्त्तन ॥ २ ॥ तुझें नाम[2] आहे खत। सुखें करीं पंचाइत ॥ ३ ॥ तुका ह्मणे गरुडध्वजा। यासी साक्ष श्रीगुरुराजा[3] ॥ ४ ॥

४३२१. फिरविलें देऊळ जगामाजी ख्याति। नामदेवा हातीं दुध प्याला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भरियेली हुंडी नरसी मेहत्याची[4]। धनाजीजाटाचीं सेतें पेरी ॥ ध्रु ॥ मिराबाईसाटीं घेतो विष प्याला। दामाजीचा जाला पाडेवार[5] ॥ २ ॥ कवीराचे मागीं विणूं लागे सेले। उठविलें मूल कुंभाराचें ॥ ३ ॥ आतां तुह्मी दया करा पंढरिराया। तुका विनवी पायां वेळोवेळां ॥ ४ ॥

४३२२. हे चि वेळ[7] देवा नका मागें घेऊं। तुह्मांविण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायणा ये रे पाहें विचारून। तुजविण कोण आहे मज ॥ ध्रु ॥ रात्र[8] दिवस तुज आठवूनि आहें। पाहातोसी काये सत्त्व माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे किती येऊं काकुलती। कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ३ ॥

४३२३. वृंदावनीं[9] केलें साकरेचें आळें। न संडे[10] वेगळें कडूपण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कावळ्याचें पिलूं[11] कौतुकें पोशिलें। न राहे उगलें विष्टेविण ॥ ध्रु ॥ क्षेम देतां अंगा गांधेलोंची[12] पोळी। करवी नादाळी मेहाशब्द[13] ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे न होती ते भले। घालिती ते घाले साधुजना ॥ ३ ॥

४३२४. मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा। पाषाण पिळितां रस कैंचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वांझे बाळा जैसें दुध नाहीं स्तनीं। गारा त्या अधणीं न सिजती ॥ ध्रु ॥ नवखंड पृथ्वी पिके मृगजळें। डोंगर भेटे वळें अँसमानासी[14] ॥ २ ॥ नश्वरें देह तेंसें[15] तेव्हां होय ब्रह्म। तुका ह्मणे श्रम करुनी काय ॥ ३ ॥

---

१ पं. पढरपुर.—२ पं. नामीं.—३ त. सद्गुरुराजा. पं. गुरुराजा.—४ पं. महंत्याची —५ दे. पाढेवार.—६ दे. त. नमीतसे.—७ पं. वेळा —८ दे. त. रात्रदि दिवस —९ दे. त. वृंदावणा.—१० दे. त. गाडी.—११ त. पिलें.—१२ त. गांधणाची.—१३ त. महाशब्दे.—१४ पं. आसमानीं.—१५ दे. त. नश्वर ब्रह्म तेव्हां०.

**४३२५.** धन्या[1] आतां काय करूं । माझें तान्हुलें लेकरूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्या[2] अवचित मरण आलें । मज कोणासी निरविलें ॥ ध्रु. ॥ माझें दार[3] नका पाहूं । त्याचे हात पाय तोडूं ॥ २ ॥ ऐके[4] हातीं धरली दाढी । घे कुऱ्हाडी दुजे हातीं ॥ ३ ॥ येरी घाव घालूं पाहे । तंव तो उठोनि उभा राहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघीं चोरें । सेखीं[5] रामनाम सोइरें ॥ ५ ॥

**४३२६.** निरंजनीं आह्मीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलों[6] आह्मी ॥ १ ॥ निराभासीं पूर्ण जालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं अहंकार । जालों[7] तदाकार नित्य शुद्ध ॥ ३ ॥

**४३२७.** पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥ १ ॥ जीवशिवा सेज रचिली आनंदें । आउठावे[8] पदीं आरोहण ॥ २ ॥ निर्जीं निजरूपीं निजविला तुका । अनुहाते बाळका हलरु[9] गाती ॥ ३ ॥

**४३२८.** नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति[10] । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ ध्रु. ॥ यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ २ ॥ तुका ह्मणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागें ॥ ३ ॥

**४३२९.** नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो[11] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हर्षामर्षें अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा सांडियेलें ॥ ध्रु. ॥ न सरे ते[12] भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चित्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख देहनिरसनें[13] । चिंतनें चिंतनें[14] तद्रूपता ॥ ३ ॥

**४३३०.** शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्यें अभिषेक ॥ ध्रु. ॥ एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनुहातें[15] ध्वनी गगन गर्जे ॥ २ ॥ तुकया स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनि उल्हासा सप्रेमता ॥ ३ ॥

**४३३१.** प्रवृत्तिनिवृत्तीचे आटूनियां भाग । उतरिलें चांग रसायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्ञानाग्निहुताशीं कडशिले वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ॥ ध्रु. ॥

---

१ त. धण्या.–२ धण्या.–३ दे. त. दारवंड.–४ पं. 'एके हातीं०' हें कडवें नाहीं. त. एके हाती घे कुऱ्हाडी । दुजे हाती धरली दाढी ॥.–५ दे. सेकी.–६ पं. राहिलोंनें.–७ पं. जाला –८ दे. सौठावे. पं. औटावे.–९ त. हाऱ्रुगाति –१० दे. पं. त्रित्पत्ति त. वीन्पती.–११ पं. "तो" नाहीं –१२ पं. हे.–१३ त. देहे निरसणें.–१४ दे. त. चितन.–१५ दे. त. अनुहातान्च्या ध्वनी.

ब्रह्मीं ब्रह्मरस शीघ्रं जाला पाक। घेतला रुचक प्रतीतीमुखें ॥ २ ॥ स्वानुभवें अंगीं जाला समरस। साधनी निजध्यास ग्रासोग्रासीं ॥ ३ ॥ अरोग्यता तुका पावला अष्टांगीं। मिरविला रंगीं निजात्मरंगें ॥ ४ ॥

४३३२. काय वा करिशी सोवळें ओवळें। मन नाहीं निर्मळ वाउगें चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय वा करीसी पुस्तकांची मोट। घोकितां हृदयस्फोट हाता नये ॥ ध्रु.॥ काय वा करीसी टाळ आणि मृदंग। जेथें पांडुरंग रंगला नाहीं ॥ २ ॥ काय वा करीसी ज्ञानाचिया गोष्टी। करणी नाहीं पोटीं बोलण्याची ॥ ३ ॥ काय वा करीसी दंभलौकिकातें। हित नाहीं मातें तुका ह्मणे ॥ ४ ॥

४३३३ स्वामी तूं ही कैसा न पडसी डोळां। सुंदर सांवळा घवघवीत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चतुर्भुज माळा रुळे एकावळी। कस्तुरी निडळीं रेखिलीसे ॥ ध्रु. ॥ शंख चक्र गदा रुळे वैजयंती। कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वामी आतां दावीं पाय। पांडुरंग माय कृपावंते ॥ ३ ॥

४३३४. आणीक कोणापुढें वासूं मुख सांग। माझें अंतरंग कोण जाणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहें तुजकडे येऊनी जाऊनी। पांडुरंगा मनीं विचारावें ॥ ध्रु. ॥ भय चिंता अवघे उद्योग सांडिले। आठवुनी पाउलें असें तुझीं ॥ २ ॥ नका विसरूं मज वैकुंठनायका। विनवितो[10] तुका बंदीजन ॥ ३ ॥

४३३५. सद्गुरूचे चरणीं ठेविला मस्तक। देउनियां हस्तक उठविलें ॥ १ ॥ उठविलें मज देऊनियां प्रेम। भावार्थें सप्रेमें[11] नमस्कारीं ॥ २ ॥ नमस्कारीं त्याला सद्गुरुरायाला। तुका ह्मणे बोला नाम वाचे ॥ ३ ॥

४३३६. सद्गुरूनें मज आशीर्वाद दिला। हरुष भरला हृदयीं माझे ॥ १ ॥ हृदयींचा भाव कळला गुरूसी। आनंदउल्हासीं बोले मज ॥ २ ॥ बोले मज गुरु कृपा तो करूनि। तुका ह्मणे मनीं आनंदलों ॥ ३ ॥

४३३७. आनंदाचा कंद गाइयेला गीतीं। पाहियेला चित्तीं देवराव ॥ १ ॥ देवराव तो ही आहे निश्चयेसीं। अखंड नामासी बोलवितो ॥ २ ॥ बोलवितो मज कृपा तो करूनि। तुका ह्मणे मनीं धरा भाव ॥ ३ ॥

४३३८. सातादिवसांचा जरी जाला उपवासी। तरीं कीर्तनासी टाकूं नये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ फुटो हा मस्तक तुटो हें शरीर। नामाचा गजर सोडूं नये ॥ ध्रु. ॥

---

१ पं. सिद्ध.—२ त. निजात्मरंगीं—३ पं. ज्ञान आणि गोष्टी—४ दे. मातें. पं. मात—५ पं. स्वप्नीं तोही.—६ पं. गळा.—७ त. दे. कीं माझें०.—८ दे. चित्तीं.—९ पं. आहे.—१० पं. विनवितमे—११ दे. त. सप्रेमें.

शरीराचे होत दोनी ते ही भाग । परि कीर्त्तनाचा रंग सोडों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥ ३ ॥

४३३९. चला आळंदीला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ होतिल संताचिया भेटी । सुखाचिया सांगों गोष्टी ॥ छ ॥ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं ह्मणतां चुकती फेर ॥ २ ॥ तुह्मां जन्म नाहीं एक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ३ ॥

४३४०. चरणीं नमन सद्गुरूच्या पूर्ण । नित्य हरिगुण गाऊं सदा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गोवर्धन जेणें नखीं हो धरिला । काळया नाथिला[1] महाबळी ॥ छ ॥ ऐसे हरिगुण गातो वाचेवरि । पतितासी तारी जनार्दन ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि सज्जना जीवन । वाचेसी स्मरण गोविंदाचें ॥ ३ ॥

४३४१. सद्गुरुवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यासऋषि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तयाचें पाहूं नये तोंड । निगुरा अखंड सुतकाळा ॥ छ ॥ कोणे परी तया नव्हे चि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसीं बोलती पुराणें । संतांचीं वचनें मागिलां हो[2] ॥ ३ ॥

४३४२. डिवेना डसेना बुजेना[3] निर्मळ । परि अमंगळ स्त्रीकारीना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ परंतु गर्धव अपवित्र जाणा । पर्वकाळीं दाना देऊं नये ॥ छ ॥ डिवी लात्री बुजे बहु नेदी दुध । मुखीं नाहीं शुद्ध विष्ठा खायें[4] ॥ २ ॥ परंतु ते गाय पवित्र हो जाणा । पर्वकाळीं दाना देऊंजेते[5] ॥ ३ ॥ ब्राह्मणें ब्राह्मणा सद्गुरु करावा । परि न करावा शूद्रादिक ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवें सांगितली सोय । ह्मणोनि त्याचे पाय धरिले जीवें ॥ ५ ॥

४३४३. संसारींचें[6] ओझें वाहता वाहाविता । तुजविण अनंता नाहीं कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे । योगक्षेमकाज करणें त्याचें ॥ छ ॥ चतुर्भुजा करीं वारू शृंगारावे । सारथ्य करावें अर्जुनाचें ॥ २ ॥ [7]श्वपच अंत्यज भक्तिस्नेहें जाला । अचळपदीं केला ध्रुव तुका ॥ ३ ॥

४३४४. कवणादिस येइल कैसा । न कळे संपत्तीचा भरंवसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चौदा चौकडिया लंकापति । त्याची कोण जाली गती ॥ छ ॥ लंकेसारिखें भुवन । त्याचें त्यासी पारखें जाण ॥ २ ॥ तेहतीस कोटि बांदवडी । राज्य जातां न लगे घडी ॥ ३ ॥ ऐसे अहंतेनें नाडिले । तुका ह्मणे वांयां गेले ॥ ४ ॥

---

१ दे. मथिला.–२ त. ही.–३ दे. दुजेना.–४ त. भक्षी.–५ त. देऊं जेते –६ पं. संसाराचें.–
७ पं. स्वपच.

४३४५. लटिका प्रपंच वांझेची[1] संतति । तत्वज्ञा हे भ्रांति बाधूं नेणे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सूर्यबिंबीं काय अंधार रिघेल । मृगजळें तिंबेल नभ काई ॥ ध्रु ॥ तैसा दृश्यभास नाडळे चि डोळां[2] । प्रकाशसोहळा भोगीतसे ॥ २ ॥ भोग भोग्य भोक्ता नाडळे चि कांहीं । चैतन्यविग्रहीं पूर्णकाम ॥ ३ ॥ तुका ब्रह्मानंदीं आहे तुकब्रह्म । प्रपंचाचें[3] बंड न देखे डोळां ॥ ४ ॥

४३४६. न ह्मणे वो आह्मी आपुलेनि चित्तीं । निःशेष अतिप्रीति विषयीं[4] तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खोटा तो विटाळ खोटा[5] तो विटाळ । ह्मणोनि गावाळ सांडियेलें ॥ ध्रु ॥ भांगतमाखूचा चित्ताचा आदर । कोरडें उत्तर चाटावें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी नव्हों फजितखोर । तुटीचा व्यापार करावया ॥ ३ ॥

४३४७. अनाथाचा नाथ पतितपावन । दीनाचें रक्षण करीतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें जाणोनियां नामीं विश्वासलों । भीमातिरा आलों धांवत चि ॥ ध्रु ॥ स्नान हें करितां त्रिताप निवाले । महाद्वारा आलें मन माझें ॥ २ ॥ तेथें अनुमात्र[6] रीग नव्हे याचा । परतत्रों साचा तेथूनियां ॥ ३ ॥ पुंडलिकापाशीं येऊनि पुसिलें । चिन्मय दाटलें जनार्दन ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां दुजा देव नाहीं । वाप तरी आई तो चि विठो ॥ ५ ॥

४३४८. ढालतरवारे गुंतले हे कर । ह्मणे तो[7] जुंझार कैसा झुंजों ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पेटी[9] पैंदळे[10] सिले टोप ओझें । हें तों जालें दुजें मरणमूळ ॥ ध्रु ॥ बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ॥ २ ॥ असोनि उपाय ह्मणे हे अपाय । ह्मणे हायहाय काय करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ४ ॥

४३४९. किडा अन्नाचें मौणुस[11] । त्याचा ह्मणविल्या दास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तें ही त्यासी उपेक्षीना । बोल आपुला सांडीना ॥ ध्रु ॥ तो तूं नराचा नरेंद्र । तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभर । तुज वर्णी फणीवर ॥ ३ ॥

४३५०. कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें । तेणें हाता आलें हरिदास्य ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन । कायावाचामनें[12] भगवंतीं ॥ ध्रु ॥ ऐसिया प्रेमळा ह्मणताती वेडा । संसार रोकडा बुडविला ॥ २ ॥ एकवीस कुळें

---

१ दे. त. वांजेची.–२ पं. 'डोळा । प्रकाश० नाडळे चि' इतकें नाहीं.–३ पं. प्रपंच हें–४ पं. विषयी.–५ दे. 'खोटा तो विटाळ' हें पुन: नाहीं–६ न. अनुमानु मात्र –७ दे. ह्मणे जुंझार कैसा झुंजे–८ पं. मौ.–९ पं. पोटी.–१० न. पडदाळे–११ दे. मानुस. न. मनुष्य–१२ दे. कायावाचामनें.

जेणें उद्धरिलीं । हे तों न कळे खोली भाग्यमंदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याची पायधुळी मिळे । भवभय पळे वंदितां चि ॥ ४ ॥

४३५१. उपजला प्राणी न राहे संसारीं । बैसला सेजारी काळ उसां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका । तैसा काळ लोका नेत असे ॥ छ ॥ खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहें । कसाबाची गाय वांचे कैसी ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं करा काढाकाढी । जाती ऐसी घडी पुन्हा नये ॥ ३ ॥

४३५२. पंढरीस जाऊं ह्मणती । यम थोर चिंता करि ती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ या रे नाचों ब्रह्मानंदें । विठ्ठलनामाचिया छंदें ॥ छ ॥ धरिली पंढरीची वाट । पापें रिगालीं कपाट ॥ २ ॥ केलें भीमरेचें स्नान । यमपुरी पडिले खान ॥ ३ ॥ दुरोनि देखिली पंढरी । पापें गेलीं दुरच्यादुरी ॥ ४ ॥ दुरोनि देखिलें राउळ । हरुषें नाचती गोपाळ ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाहीं जाणें । अखंड पंढरिये राहाणें[1] ॥ ६ ॥

४३५३. पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कनकाचे पाहीं अलंकार केले । कनकत्वा आले एकपणें ॥ छ ॥ मृत्तिकेचे घट जाले नानापरी । मृत्तिका अवघारीं एकपणें[2] ॥ २ ॥ तुका ह्मणे एक एक ते अनेक । अनेकत्वीं एक ऐकपणा ॥ ३ ॥

४३५४. पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार जाला । विठोबा भेटला निराकार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ भांबगिरिपाठारीं वस्ति जाण केली । वृत्ति थिरावली परब्रह्मीं ॥ छ ॥ निर्वाण जाणोनि आसन घातलें । ध्यान आरंभिलें देवाजींचें ॥ २ ॥ सर्प विंचू व्याघ्र आंगासी झोंबले । पीडूं जे लागले सकळिक ॥ ३ ॥ दीपकीं कर्पूर कैसा तो विराला । तैसा देह जाला तुका ह्मणे ॥ ४ ॥

४३५५. अज्ञान ह्या देह स्वरूपीं मीनला । सर्व वोसावला[3] देहपात ॥ १ ॥ ज्ञानस्वरूपाची सांगड मिळाली । अंतरीं पाहिली ज्ञानज्योती ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त स्वरूपीं राहिलें । देह विसावलें तुझ्या पायीं ॥ ३ ॥

४३५६. दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तयाचें चरित्र परिसा हो सादरें । करितों नमस्कार संतजना ॥ छ ॥ मंगळवेढा असे वस्ति कुटुंबेंसी । व्यापारी सर्वांसी मान्य सदा ॥ २ ॥ कर्म काय करी ठाणाचा हवाला । तों कांहीं पडला कठिण काळ ॥ ३ ॥ धान्याचीं भांडारें होतीं तीं फोडिलीं । पंढरी रक्षिली दुष्काळांत ॥ ४ ॥ दुर्बळीं[4] अनाथ तीं[5] हीं

---

१ दे. पंढरिराहणें.–२ त. एक्पणे.–३ पं. वोसरला.–४ दे. दुबळे अनाथ नें हि वांचविलें ।.–५ त. ते.

वांचविलीं । राष्ट्रांत ते जाली कीर्त्ति मोठी ॥ ५ ॥ मुजुम करीत होता कानडा ब्राह्मण । फिर्याद लिहून पाठविली ॥ ६ ॥ अविंदाचें राज्य बेदरीं असतां । कागद पाहतां तलब केली ॥ ७ ॥ दामाजीपंतासी धरोनि चालविलें । इकडे या विठ्ठलें माव केली ॥ ८ ॥ विकते धारणे सवाईचें मोलें । धान्याचें सकळ द्रव्य केलें ॥ ९ ॥ दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त । लिहून खैलेती मुद्रा केली ॥ १० ॥ विठो पाडेवार भक्तां साह्य जाला । बेदरासी गेला रायापासीं ॥ ११ ॥ जोहार मायबाप पुसती कोठील । तंव तो ह्मणे स्थळ मंगळवेढें ॥ १२ ॥ दामाजीपंतांनीं रसद पाठविली । खैलेती ओतिली अर्जदास्त ॥ १३ ॥ देखोनियां राजा संतोष पावला । ह्मणे व्यर्थ त्याला तलब केली ॥ १४ ॥ काय तुझें नांव पुसती यंत्रधारी । तो ह्मणे बेगारी विठा कैंीं जी ॥ १५ ॥ पावल्याचा जाब द्यावा मायबाप । करोनि घेतों माप ह्मणती ते ॥ १६ ॥ पावलयाचा जाब दिधला लिहून । तसरीफ देऊन पाठविला ॥ १७ ॥ छत्री घोडा शिबिका आभरणांसहित । दिला सवें दूत पाठवूनि ॥ १८ ॥ वाटे चुकामुक जाली याची त्यांची । ते आले तैसे चि मंगळवेढा ॥ १९ ॥ दामाजीपंतासी बेदरासी नेलें । राजा ह्मणे जालें कवतुक ॥ २० ॥ काल गेला विठा बेगारी देऊन । तसरीफ देऊन जाब दिला ॥ २१ ॥ काय तुमचें काज सांगों जी सत्वर । बोलाजी निर्धार वचनाचा ॥ २२ ॥ कैंचा विठा कोण पाठविला कधीं । काढोनियां आधीं जाब दिला ॥ २३ ॥ पहातां चि जाव हृदय फुटलें । नयन निडारले राजा देखे ॥ २४ ॥ सावळें सकुमार रूप मनोहर । माथां तेणें भार वाहियेला ॥ २५ ॥ दामाजीपंतासी रायें सन्मानिलें । तो ह्मणे आपुलें कर्म नव्हे ॥ २६ ॥ आतां तुमची सेवा पुरे जी स्वामिया । शिणविलें सखया विठोबासी ॥ २७ ॥ निरोप घेऊनि आला स्वस्थळासी । उदास सर्वांसीं होता जाला ॥ २८ ॥ दामाजीपंतांनीं सेविली पंढरी । ऐसा त्याचा हरि निकटवृत्ति ॥ २९ ॥ तुका ह्मणे विठो अनाथ कैवारी । नुपेक्षी हो हरि दासालागीं ॥ ३० ॥

४३५७. पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥ ध्रु ॥ तिसरी माझी ओवी तिळा नाहीं ठाव । अवघा चि देव जनीं वनीं ॥ २ ॥ चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निधान पांडुरंग ॥ ३ ॥ पांचवी माझी ओवी माझिया

१ त. मोलें.—२ त. खलीतीस.—३ त. खलीतीस.—४ दे. कां.—५ दे. घोटा.—६ त. बोल्याचा.—७ त. वो.—८ पं. 'वैरिलें दळण० पांडुरंग।' हे पुढील कडव्यांतलें 'तिसरी०' या कडव्यांत असून या कडव्यांतील 'तिळा नाहीं० जनीं वनीं।' हे पुढच्या कडव्यांत आहे.—९ दे. चोवी ते माझिया०

माहेरा । गाईन[1] निरंतरा पांडुरंगा ॥ ४ ॥ साहावी माझी ओवी साहा ही आटले[2] । गुरुमूर्त्ति[3] भेटले पांडुरंग ॥ ५ ॥ सातवी माझी ओवी आठवे वेळोवेळां । बैसलासे डोळां पांडुरंग ॥ ६ ॥ आठवी माझी ओवी आठावीस युगें[4] । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥ ७ ॥ नववी माझी ओवी सरलें दळण । चुकलें मरण संसारींचें ॥ ८ ॥ दाहावी माझी ओवी दाहा[5] अवतारा । न यावें संसारा तुका ह्मणे ॥ ९ ॥

४३५८. धरोनियां फरश करी । भक्तजनाचीं विघ्नें वारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा गजानन महाराजा । त्याचें चरणीं हालो लागो माझा ॥ छ ॥ सेंदुर शमी बहुप्रिय ज्याला । तुरा दुर्वांचा शोभला ॥ २ ॥ उंदिर असे जयाचें वहन । माथां जडितमुगुट पूर्ण ॥ ३ ॥ नागयज्ञोपवीत रुळे । शुभ्र वस्त्र शोभित साजिरें ॥ ४ ॥ भावमोदक हराभरी । तुका भावें हे पूजा करी ॥ ५ ॥

४३५९. नाम आहे जयापाशीं । जेथें राहे तेथें चि[6] काशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा नामाचा महिमा । जाणे वाल्मीक शंकर उमा ॥ छ ॥ नाम प्रऱ्हादबाळ । जाणे पापी आजामेळ ॥ २ ॥ नाम जाणे तो नारद । नामें ध्रुवा अक्षय पद ॥ ३ ॥ नाम गणिकेतें तारी । पशु गजेंद्र उद्धारी[7] ॥ ४ ॥ नाम जाणे हणुमंत । जाणताति महासंत ॥ ५ ॥ नाम जाणे शुकमूर्ति । जाणे राजा परिक्षिती ॥ ६ ॥ [8]नाम जाणे तुका । नाहीं संसाराचा धोका ॥ ७ ॥

४३६०. बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोइरा करीं आतां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ[9] सांडीं आतां ॥ छ ॥ [10]सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥ २ ॥ पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरि ॥ ३ ॥ विटेवरि नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंद नामघोषें ॥ ४ ॥

४३६१. किती सांगों तरि नाइकति वटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ १ ॥ नका नका करूं रांडेची संगती । नेवोनी[11] [12]अधोगती घालिल यम ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनि थोबाड फोडिलें[13] यम ॥ ३ ॥

४३६२. उधानु काटीवरि चोपडुची आस । नवरा राजस मिरवतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जिन्हाळ्याच्यीं[14] काठी उवाळ्याच्या मोटा । नवरा चोहटा मिरवतसे ॥ छ ॥

---

१ पं. गार्यी.–२ दे. सार्विअटेली. त. सावीआटेलो.–३ दे. त. गुरुमूर्त्त–४ दे. त. योगे–५ त. दाही. ६ पं. "चि" नाहीं.–७ पं. त. उद्धरी.–८ पं. नाम जाणे तुका वाणी। दिलें संसाराला पाणी ॥ ६ ॥.– ९ त. सार्थ.–१० दे. सांडि.–११ पं. नेयील अधोगती घाली यम ।–१२ दे. त. अधोपाती.–१३ पं. फोडी काळ.–१४ दे. जिन्हाळ्याचा.

तुळसीची माळ नवरीचे कंठीं । नोवरा वैकुंठीं वाट पाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी नोवऱ्याची कथा । परमार्थ वृथा बुडविला ॥ ३ ॥

४३६३. न कळे महिमा वेद मौनावले[1] । जेथें पांगुळले मनपवन ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चंद्र सूर्य ज्याचें तेज वागविती । तेथें माझी मती कोणीकडे ॥ ध्रु ॥ काय म्यां वाणावें तुझ्या थोरपणा । सहस्रवदना वर्णवेना ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी बाळ तूं माउली । कृपेची साउली करीं देवा ॥ ३ ॥

४३६४. संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ ध्रु ॥ कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ २ ॥ तुका ह्मणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ३ ॥

४३६५. विधवेसि एक सुत । अहर्निशीं तेथें चित्त ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा तूं मज एकला । नको मोकलूं विठ्ठला ॥ ध्रु ॥ सुपुत्रालागीं बाप । अवघे तेथें चि संकल्प ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं । पतिव्रते जैसा पति ॥ ३ ॥

४३६६. ह्मणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरि वाहाण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नको नको दर्शन त्याचें[2] । गलितकुष्ट भरो वांचे ॥ ध्रु ॥ शाळिग्रामासि ह्मणे धोंडा । किडे[3] पडोत त्याच्या तोंडा ॥ २ ॥ भावी सद्गुरु मनुष्य । त्याचें खंडो का आयुष्य[4] ॥ ३ ॥ हरिभक्ताच्या करी चेष्टा । त्याचे तोंडीं पडो विष्टा[5] ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती ऐकों । कोठवरी मर्यादा राखों ॥ ५ ॥

४३६७. स्वर्गींचे अमर इच्छिताति देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारायणनामें होऊं जीवन्मुक्त[6] । किर्त्तनीं अनंत गाऊं गीती ॥ ध्रु ॥ वैकुंठींचे जन सदा चिंतिताति । कइं येथें येती हरिचे दास ॥ २ ॥ यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाववया पैल पार । नाममंत्र सार भाविकासि ॥ ४ ॥

४३६८. व्यापक हा विश्वंभर । चराचर यांचेनी[7] ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरिराव विटेवरि । त्याचीं[8] धरीं पाउलें ॥ ध्रु ॥ अवघियांचा हा चि ठाव । देवोदेवीं[9] सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे न करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥ ३ ॥

---

१ दे. मोनावले.–२ त. वाचे–३ दे. कीड पडो त्याच्या तोंडा. पं. कीडे पडो त्याच्या तोंडा.–४ दे. आयुष्य.–५ न. वीटा पं. ईष्ठा –६ दे. जिवनमुक्त.–७ न. यांचेनि पं. ज्यांचेनि.–८ दे. न त्याचींच धरीं०.–९ न. देवोदेवी.

४३६९. पसरोनि मुखें । कैसे घालों बा हारीखें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ब्रह्मादिका दुर्लभ वांटा । आह्मां फावला राणटां ॥ ध्रु ॥ गोड लागे काय तरि । कृपावंत जाला हरि ॥ २ ॥ उडती थेंबुटें । अमृताहुनि गोमटें ॥ ३ ॥ गोडाहुनि गोड । जिव्हा नाचे वाटे कोड ॥ ४ ॥ खुणावुनि तुका । दावी वर्म बोलों नका ॥ ५ ॥

४३७०. आमुची मिरास पंढरी । आमुचें घर भीमातिरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पांडुरंग आमुचा पिता । [1]रुकुमाबाई आमुची माता ॥ ध्रु ॥ [2]भाऊ पुंडलीक मुनि । चंद्रभागा आमुची बहिणी ॥ २ ॥ तुका जुन्हाट मिराशी । ठाव दिला पायांपाशीं ॥ ३ ॥

४३७१. गंगा गेली सिंधुपाशीं । जरी तो ठाव नेदी तिशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तिणें[3] जावें कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥ ध्रु ॥ जळ क्षोभलें जलचरां । [4]माता बाळा नेदी थारा ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों शरण । देवों त्त्वां कां धरिलें मौन्य ॥ ३ ॥

४३७२. बैसो आतां मनीं । [6]आलें तैसें चि वदनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मग अवघें चि गोड । पुरे सकळ हि कोड ॥ ध्रु ॥ बाहेरील भाव । तैसा अंतरीं हि वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे मणि । शोभा दाखवी कोंदणीं ॥ ३ ॥

४३७३. वेठी ऐसा भाव । न करी अहाच उपाव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रूप डसवी न जिवा । अवघा ये च ठायीं हेवा ॥ ध्रु ॥ कृपणाचेपरि । लेखा [7]पॅळनिमिषेवरि ॥ २ ॥ तुका ह्मणे [8]असा । संनिध चि जगदीशा ॥ ३ ॥

४३७४. सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्वांगें तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ॥ ध्रु ॥ ऐशी उभारिली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरवसा ॥ ३ ॥

४३७५. जो का निर्गुण निराकार । तेणें[9] धरियेले अवतार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निर्गुण होता तो सगुणासि आला । भक्तिसाटीं प्रगटला ॥ ध्रु ॥ जो का त्रिभुवनचाळक । तो हा नंदाचा बाळक ॥ २ ॥ सोडविलें वसुदेवदेवकीसि । अवतार धरिला तिचे कुशीं ॥ ३ ॥ मारियेला कंसराणा । राज्यीं स्थापिलें उग्रसेना ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवादिदेव । तो हा उभा पंढरिराव ॥ ५ ॥

---

१ त. "रकुमाबाई" याबद्दल "रखुमाई".–२ दे. त. भाव.–३ पं. "तिणें जावें०" या कडव्याबद्दल "तरि म्यां जावें कवण्या ठायां । सांगा वेगीं पंढरीराया ॥" असें आहे.–४ प. माय –५ पं. "देवा त्वां कां" याच्याबद्दल "कां गा विठो".–६ दे. आले.–७ त. पळनिमिषेवरी.–८ दे. आस.–९ दे. तेथ

४३७६. जुनाट हें धन अंत नाहीं पार । खात आले फार सरलें नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नारद हा मुनि शुक सनकादिक । उरलें आमुप तुह्मां आह्मां ॥ ध्रु ॥ येथूनियां धना खाती बहुत जन । वाल गुंज उणें जालें नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे धना नाहीं अंतपार । कुंटित हे[3] चार वाचा तेथें[4] ॥ ३ ॥

४३७७. कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारीज्ञान ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यासि अंतरीं रिझे कोण । जवळी जातां चिळसवाण ॥ ध्रु ॥ प्रेतदेह गौरविलें । तैसें विटंबवाणें जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धिचेष्टा ॥ ३ ॥

४३७८. पाया जाला नारू । तेथें बांधला कापूरु । तेथें बिबव्याचें काम । अधमासि तों अधम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रुसला गुलाम । धणी करीतो सलाम । तेथें चाकराचें काम । अधमासि तों अधम ॥ ध्रु ॥ रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसि । तेथें बटकीचें काम । अधमासि तों अधम ॥ २ ॥ देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला । तेथें पैजारेचें काम । अधमासि तों अधम ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाती । जातीसाटीं खाती माती ॥ ४ ॥

४३७९. ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गंवसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ लहानथोरासि करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥ ध्रु ॥ सर्वांप्रति माझी हे चि असे विनंती । आठवा श्रीपती मनामाजी ॥ २ ॥ केशव नारायण करितां आचमन । ते चि संध्या स्नान कर्म क्रिया ॥ ३ ॥ नामें करा नित्य भजन भोजन । ब्रह्मकर्म ध्यान याचे पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हें चि निर्वाणींचें शस्त्र । ह्मणोनि सर्वत्र स्मरा वेगीं ॥ ५ ॥

४३८०. नरदेह वांयां जाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांडोनियां अहंभाव । धरीं भक्ती पूजीं देव ॥ ध्रु ॥ थोराचिये वाटे । जातां भवशोक आटे ॥ २ ॥ प्रल्हादातें तारी । तुका ह्मणे तो कंठीं धरीं ॥ ३ ॥

४३८१. संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धि नव जाय ॥ १ ॥ ज्याचा जैसा ठेवा तो त्यापाशीं धांवे । न लगती करावे उपदेश ॥ २ ॥ घेऊन उठती आपुलाले गुण । भविष्याप्रमाणें तुका ह्मणे ॥ ३ ॥

४३८२. कुरंगीपाडस चुकलेंसे वनीं । फुटे दुःखेंकरोनि हृदय त्याचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसा परदेशी जालों तुजविण । नको हो निर्वाण पाहूं माझें ॥ ध्रु ॥

१ दे. बहु जनन.–२ दे. त. "नाहीं अंतपार" याबद्दल "धन नाहीं पार".–३ दे. "हे" नाहीं.–४ पं. तेथें.–५ दे. अहं करी ज्ञान. त. आहंकारी ज्ञान.–६ पं. जातां.–७ पं. प्रेतदेहा.–८ त. करीतें.–९ त. धरीं.

अपराधाच्या कोटि घालीं सर्व पोटीं । नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥ २ ॥ तुका ह्मणे असों द्यावी माझी चिंता । कृपाळु अनंता पांडुरंगा ॥ ३ ॥

**४३८३.** धन्य जालों हो संसारीं । आह्मी देखिली पंढरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ चंद्रभागे करूं स्नान । पुंडलीकाचें दर्शन ॥ छ ॥ करूं क्षेत्रप्रदक्षिणा । भेटूं संत या सज्जनां ॥ २ ॥ उभे राहूं गरुडपारीं । डोळेंभरुनी पाहों हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाळवंटीं । महालाभ फुकासाटीं ॥ ४ ॥

**४३८४.** पंढरीचा वारकरी । खेपा वैकुंठबंदरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तया नाहीं आणखी पेणें । सदा वैकुंठीं राहाणें ॥ छ ॥ आला गेला केल्या यात्रा । उद्धरिलें कुळा सर्वत्रा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । यासि संदेह कल्पांतीं ही ॥ ३ ॥

**४३८५.** सोडियेल्या गाई नवलक्ष गोपाळीं । सवें वनमाळी चालियेला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सुदीनसुवेळीं भाग्याच्या उदयीं । चारावया गाई वनामाजी ॥ छ ॥ गाईगोपाळांच्या संगें चाले हरि । क्रीडा नानापरि खेळताति ॥ २ ॥ काठी कांबळीया मोहरीया पोंवा । सिदोरी गांजिवा खांद्यावरि ॥ ३ ॥ गोधनें संवगडे खेळे नानापरी । आले भीमातीरीं वेणुनादा ॥ ४ ॥ तेथें उभा ठेला गोपाळांसहित । सिदोरिया सोडीत बैसे तेथें ॥ ५ ॥ तुका ह्मणे ज्यांनीं आणिल्या भाकरी । नेऊनियां हरीपुढें देती ॥ ६ ॥

**४३८६.** ज्यां जैसी आवडी त्यां तैसा विभाग । देत पांडुरंग तृप्ति जाली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुखींचें उच्छिष्ट हिरोनियां खातां । विस्मित विधाता देखोनियां ॥ छ ॥ दिलें जें गोपाळां तें नाहीं कोणासि । विस्मित मानसीं सुरवर ॥ २ ॥ देव ऋषि मुनि सिद्ध हे चारण । शिव मरुद्गण चंद्र सूर्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे आले सकळ हि सुरवर । आनंदें निर्भर पाहावया ॥ ४ ॥

**४३८७.** आले सुरवर नानापक्षी जाले । सकळ अवतरले श्वापदवेषें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ श्वानखररूपी होऊनियां आले । उच्छिष्ट कवळ वेचिताति ॥ छ ॥ होऊनियां दीन हात पसरिती । मागोनियां घेती उष्टावळी ॥ २ ॥ अभिमान आड घालोनि बाहेरि । तयां ह्मणे हरि घ्या रे धणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे धणी लाधली अपार । तया सुखा पार काय सांगों ॥ ४ ॥

**४३८८.** एकमेकां घेती धडका । पाडी धडकों देऊनि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकमेका पाठीवरि । बैसोनि करिती ढवाळी ॥ छ ॥ हाता हात हाणे लाही ।

---

१ दे. सुदीन समय भाग्याचा उदय ।–२ दे. चाली.–३ दे. खात.–४ न. श्वापदवेषें.–५ त. धका.

पळतां घाई चुकविती ॥ २ ॥ तुका ह्मणे लपणी चपणी । एका हाणी पाठीवरी ॥ ३ ॥

४३८९. चला वळूं गाई । दूर अंतरल्या भाई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ खेळ खेळतां जाला शीण । कोण करी वणवण ॥ छ ॥ गाई हकारी कान्हया । ह्मणोनि लागती ते पायां ॥ २ ॥ तुका ह्मणे द्यावें । नाम संकीर्तन बरवें ॥ ३ ॥

४३९०. नाहीं संसाराची चाड । गाऊं हरिचें नाम गोड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हो का प्राणाचा ही घात । परि हा न सोडीं[1] अनंत ॥ छ ॥ जन्मोजन्मीं हा चि धंदा । संतसंग राहो सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । तो हा जाणा पंढरिराव ॥ ३ ॥

४३९१. हरीविण जिणें व्यर्थ चि संसारीं । प्रेत अळंकारीं मिरवत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देवाविण शब्द व्यर्थ चि कारण । भांड रंजवण सभेसि गा ॥ छ ॥ आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वहु वोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ॥ ३ ॥

४३९२. जालासि पंडित पुराण सांगसी । परि तूं नेणसी मी हें कोण ॥ १ ॥ गाढवभरी पोथ्या उलथिशी पानें । परि गुरुगम्यखुणे नेणशी वापा ॥ २ ॥ तुका कुणवियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरीनाथ विसंबेना ॥ ३ ॥

४३९३. स्वप्नींच्या व्यवहारा काळांतर लेखा । जागृतीसि रुका गांठी[2] नाहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेवीं शब्दज्ञानें करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकों नये ॥ छ ॥ वोलाची च कढी बोलाचा ची भात । जेवूनियां तृप्त कोण जाला ॥ २ ॥ कागदीं लिहिली नांवाची साकर । चाटितां मधुर केवीं लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो जळो त्याचें ज्ञान । यमपुरी कोण दंड साहे ॥ ४ ॥

४३९४. भूत नावरे कोणासी । पुंडलीकें खिळिलें त्यासी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ समचरण असे विटे । कटिकर उभें नीट ॥ छ ॥ वाळुवंटीं नाचती संत । प्रेमामृतें डुल्लत ॥ २ ॥ तुका ह्मणे पुंडलीका । [3]भक्तिवळें तूं चि निका ॥ ३ ॥

४३९५. आपुलें वरदळ नेदा । एवढी गोविंदा कृपणता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यावर वा तुमचा मोळा । हा गोपाळा कळेना ॥ छ ॥ सेवा तरी घेतां सांग । चोरिलें अंग मढावेना ॥ २ ॥ तुका जरी क्रियानष्ट । तरी कां कष्ट घेतसां ॥ ३ ॥

---

१ त. सोडीं.—२ दे. गांठ.—३ दे. भक्तिबळें

४३९६. भीमातिरींचा नाटक । यानें लावियेलें चेटक ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मन बुद्धि जाली ठक । नेणे संसाराची टुक ॥ छ्रु ॥ कैशी प्रसंगीक वाणी । प्रत्यादर कडसणी ॥ २ ॥ तुका ह्मणे मोठा ठक । जेथें तेथें उभा ठाके ॥ ३ ॥

४३९७. कां रे दाटोन होतीं[1] वेडे । देव आहे तुह्मांपुढें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्यासि पाठ नाहीं पोट । करी त्रैलोक्याचा घोंट ॥ छ्रु ॥ तुमची तुह्मां नाहीं सोय । कोणाचें बा[2] काय जाय ॥ २ ॥ तुका गातो नामीं । तेथें नाहीं आह्मी तुह्मी ॥ ३ ॥

४३९८. नव्हे हें कवित्व टांकसाळी नाणें । घेती भले जन भले लोक ॥ १ ॥ लागलासे झरा पूर्ण नवनीतें । सेविलियां हित फार होय ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा केला बलात्कार । अंगा आलें फार महंतपण ॥ ३ ॥

४३९९. सांवळें सुंदर पाहे दृष्टीभरि । ऐसें कांहीं करीं मन माझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मना तुज ठाव दिला त्याचे पायीं । राहें विठाबाईसवें सदा ॥ छ्रु ॥ मना नको धरूं आणिकांचा संग । नाहीं पांडुरंग जयां मनीं ॥ २ ॥ वरपंग भाव नको ह्मणे तुका । करीं प्राणसखा नारायण ॥ ३ ॥

४४००. एकली वना चालली राना । चोरुनि जना घराचारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोणी नाहीं संगीसवें । देहभावें उदास ॥ छ्रु ॥ जाउनि पडे दुर्घटवनीं । श्वापदांनीं वेढिली ॥ २ ॥ मार्ग न चले जातां पुढें । भय गाढें उदेलें ॥ ३ ॥ मागील मार्गे अंतरलीं । पुढील चाली खोळंबा ॥ ४ ॥ तुका ह्मणे चिंतीं[3] यासि । हृदयस्थासी आपुल्या ॥ ५ ॥

४४०१. पडली घोर रजनी । संगी कोणी नसे चि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पहा हो कैसें चालविलें । पिसें गोवलें लावूनि ॥ छ्रु ॥ कोठें लपविलें तें अंग । होता सग दिला तो ॥ २ ॥ मज कधीं नव्हतें ठावें । दोही भावें वाटोळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैंची उरी । दोहीपरि नाडिलें ॥ ४ ॥

४४०२. उदार कृपाळ पतितपावना[4] । ब्रिदें नारायणा जाती वांयां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वर्णिलासि श्रुति नेणे तुझा पार । राहे मौनाकार नेति ऐसें ॥ छ्रु ॥ तेथें माझा धांवा पावे कोणीकडे । अदृष्ट हें पुढें वोडवलें ॥ २ ॥ कोण ऐसा भक्त लाधला भाग्यासी । आठवण ऐसी घ्यावी तुज ॥ ३ ॥ तुका ह्मणे नको पाहों माझा अंत । जाणोनि हे मात उडी घालीं ॥ ४ ॥

---

१ दे. होतों.–२ दे. "बा" नाहीं.–३ दे. चिंतीं.–४ दे. पतितपावन.

४४०३. ज्याचें जैसें भावी मन । त्यासि देणें दरुषण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पुरवूं जाणे मनिंची खूण । समाधान करोनि ॥ छ्रु ॥ आपणियातें प्रगट करी । छाया वरी कृपेची ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें[1] दान । मन उन्मन हरिनामीं ॥ ३ ॥

४४०४. कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वस्ति क्षीरसागरवासीं । आला उभा पंढरीसि ॥ छ्रु ॥ भक्ती देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । तूं चि एक भूमंडळीं ॥ ३ ॥

४४०५. शेवटींची विनंती । ऐका ऐका कमळापती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काया वाचा मन । चरणीं असे समर्पण ॥ छ्रु ॥ जीवपरमात्मा ऐक्यासि । सदा वसो हृदयेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कंठीं वसावें केशवा ॥ ३ ॥

४४०६. माझे परिसावें गाऱ्हाणें । चित्त द्यावें नारायणें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझे हृदयींचें वर्म । देवा जाणशी तूं कर्म ॥ छ्रु ॥ सबाह्यअंतरसाक्ष । ऐसा वेदीं केला पक्ष ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ३ ॥

४४०७. गुरुचिया मुखें होइल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखुण विठोबाची ॥ १ ॥ वेदांतें विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥ ३ ॥

४४०८. देव आतां आह्मीं केला असे ऋणी । आणिका वांचूनि काय गुंता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एकाचें आर्जव करूं एकनिष्ठ । आणिकांचा बोभाट कामा नये ॥ छ्रु ॥ बहुतांचें आर्जव केलिया खटपट । नाहीं हा शेवट शुद्ध होत ॥ २ ॥ पुरता विचार आणोनी मानसीं । अंतरलों सर्वांसि पई देखा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा चरणीं असो भाव । तेणें माझा जीव संतोषे हा ॥ ४ ॥

४४०९. पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहुनि अंधळा बराच मी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनि ठेवीं देवा ॥ छ्रु ॥ अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहुनि मुका बराच मी ॥ २ ॥ नको मज कधीं परस्त्रीसंगति । जनांतुन माती उठतां भली ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज अवघ्याचा कांटाळा । तूं एक गोपाळा आवडसी ॥ ४ ॥

४४१०. कीर्त्तनाचा विकरा मातेचें गमन । भाड खाई धन विटाळ तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हरिभक्ताची माता हे हरिगुणकीर्त्ति । इजवर पोट भरिती चांडाळ ते ॥ छ्रु ॥ अंत्यज हा ऐसें कलांतीं करीना । भाड हे खाईना जननीची ॥ २ ॥ तुका ह्मणे[2] त्याचें दर्शन ही खोटें । पूर्वजासि नेटें नरका धाडी ॥ ३ ॥

---

[1] त. दे. केले.—[2] न. ह्मणे (?)

४४११. पंढरी पावन जालें माझें मन । आतां करूं ध्यान विठोबाचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां ऐसें करूं नाम गाऊं गीतीं । सुखाचा सांगाती विठो करूं ॥ ध्रु ॥ संग करूं त्याचा तो सखा आमचा । अनंतां जन्मांचा मायबाप ॥ २ ॥ परतोनि सोई धरीं कां रे मना । विठ्ठलचरणा घालीं मिठी ॥ ३ ॥ घातलीसे मिठी नाहीं भक्तिभाव । उदार पंढरिराव तुका ह्मणे ॥ ४ ॥

४४१२. येईं गे विठ्ठले विश्वजीवनकले । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ येईं गे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ॥ ध्रु ॥ न लगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव घालीं कृष्णाबाई । क्षेम चहूंबाहीं देईं मज ॥ ३ ॥

४४१३. कटावरी कर कासया ठेविले । जननी विठ्ठले जीवलगे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शंखचक्रगदाकमळमंडित । आयुधें मंडित कृष्णाबाई ॥ ध्रु ॥ क्षण एक धीर होत नाहीं चित्ता । केव्हां पंढरिनाथा भेटशील ॥ २ ॥ तुका ह्मणे हें चि करीं देईं क्षेमा । तईं च विश्रामा पावईन ॥ ३ ॥

४४१४. आतां मोकलावें नव्हे हें उचित । तरी कृपावंत ह्मणवावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पूर्वीं भक्त जाले सर्व आपंगिले । नाहीं उपेक्षिले तुह्मीं कोणी ॥ ध्रु ॥ माझिया वेळेसि कां गा लपालासि । विश्व पोसितोसि लपोनियां ॥ २ ॥ करावी ह्मणावी सर्वां भूतीं दया । तरी भेटावया येईन मी ॥ ३ ॥ तरी माझे हातीं देईं मनबुद्धि । जरि दयानिधि येशील तूं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं चि अवघा सूत्रधारी । माझी सत्ता हरी काय आहे ॥ ५ ॥

४४१५. माझें कोण आहे तुजविण देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाट पाहतसें कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ ध्रु ॥ साच करीं हरी आपुली ब्रिदावळी । कृपेनें सांभाळीं महाराजा ॥ २ ॥ क्षमा करीं सर्व अपराध माझा । लडिवाळ मी तुझा पांडुरंगा ॥ ३ ॥ साह्य होसी तरी जाती साही वैरी । मग सुखें अंतरीं ध्यान तुझें ॥ ४ ॥ कृपा करोनि देईं दया क्षमा शांती । तेणें तुझी भक्ति लाभईल ॥ ५ ॥ माझें हें सामर्थ्य नव्हे नारायणा । जरी कांहीं करुणा येइल तुज ॥ ६ ॥ तुका ह्मणे मज कैसें आपंगा जी । आपुलेंसें करा जी पांडुरंगा ॥ ७ ॥

४४१६. अपराध जाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझें लडिवाळ तुज कृपा यावी । म्यां वाट पाहावी कवणाची ॥ ध्रु ॥

१ त. विठ्ठलाचें.–२ त. कळवळें.–३ त. विठ्ठलें जीवलगें.–४ दे. 'क्षेमा' नाहीं.

मायबाप माझा रुक्मादेवीवर । हा दृढ निर्धार अंतरींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणे गोष्टीचें संकष्ट । न घालीं मज भेट नारायणा ॥ ३ ॥

४४१७. आधीं कां मज लावियेली सवे । आतां न राहावे तुजविण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पहिलें चि तोंडक कां गा नाहीं केलें । आतां उपेक्षिलें न सोडीं मी ॥ ध्रु ॥ कृपेच्या सागरा न पाहें निर्वाण । जालों तुजवीण कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें गुंतलेति हरी । येईं झडकरी पांडुरंगा ॥ ३ ॥

४४१८. वा रे पांडुरंगा केव्हां येशी भेटी । जाहालों हिंपुटी तुजवीण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजवीण सखें न वटे मज कोणी । वाटतें चरणीं घालूं मिठी ॥ ध्रु ॥ ओवाळावी काया चरणांवरोनि । केव्हां चक्रपाणी भेटशील ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी पुरवीं आवडी । वेगीं घालीं उडी नारायणा ॥ ३ ॥

४४१९. पंचाग्निसाधन करूं धूम्रपान । काय तीर्थाटण करूं सांग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांग कोणे देशीं आहे तुझें गांव । घेऊनियां धांव येऊं तेथें ॥ ध्रु ॥ सांग कांहीं वृत्त कोण करूं व्रत । जेणें कृपावंत होशील तूं ॥ २ ॥ वाटतें सेवटीं जालासि निष्ठुर । न देसी उत्तर तुका ह्मणे ॥ ३ ॥

४४२०. तुजवीण तीळभरी रिता ठाव । नाहीं ऐसें विश्व बोलतसे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बोलियेले योगी मुनी साधु संत । आहेसि या आंत सर्वांठायीं ॥ ध्रु ॥ मी तया विश्वासें आलों शरणागत । पूर्वीचें अपत्य आहें तुझें ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें भरोनि उरलासि । मजला जालासि कोठें नाहीं ॥ ३ ॥ अंतपार नाहीं माझिया रूपासि । काय सेवकासि भेट देऊं ॥ ४ ॥ ऐसें विचारिलें ह्मणोनि न येशी । सांग हृषीकेशी मायबापा ॥ ५ ॥ तुका ह्मणे काय करावा उपाय । जेणें तुझे पाय आतुडति ॥ ६ ॥

४४२१. काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नुलंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ ध्रु ॥ आतां कैंचा मज सखा नारायण । गेला अंतरोन पांडुरंग ॥ २ ॥ तुका ह्मणे व्यर्थ मोलाचें शरीर । गेलें हा विचार कळों आला ॥ ३ ॥

४४२२. नव्हे निष्ठावंत तुज काय बोल । सेवेविण मोल मागतसें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ न घडे भजन शुद्ध भावनिष्ठा । आपुल्या अदृष्टावरी बोल ॥ ध्रु ॥ पूर्वी जाले भक्त असंख्य विरक्त । काम क्रोध अहंते निर्दाळिलें ॥ २ ॥ ऐसी अंगवण नाहीं मज देवा । करीतसें हेवा भेटावयाचा ॥ ३ ॥ कृपा करोनियां पुरवीं असोसी ।

१ त. मायबापा माझ्या.—२ त. पोट करूं धरीं माग काहीं वृत्त.—३ त. बोलतसे.

आपुल्या ब्रिदासी राखावया ॥ ४ ॥ तुका ह्मणे एक बाळक अज्ञातें । त्यासि हे पोसित मायबापें ॥ ५ ॥

## नाटाचे अभंग २.

४४२३. अगा ये मधुसूदना माधवा । अगा ये कमळापती यादवा । अगा श्रीधरा केशवा । अगा बांधवा द्रौपदीच्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अगा विश्वव्यापका जनार्दना । गोकुळवासी गोपिकारमणा । अगा गुणनिधि गुणनिधाना । अगा मर्दना कंसाचिया ॥ छ ॥ अगा सर्वोत्तमा सर्वेश्वरा । गुणातीता विश्वंभरा । अगा निर्गुणा निराकारा । अगा आधारा दीनाचिया ॥ २ ॥ अगा उपमन्यसहाकारा । अगा शयना फणिवरा । अगा काळकृतांत असुरा । अगा अपारा अलक्षा ॥ ३ ॥ अगा वैकुंठनिवासा । अगा आयोघ्यापति राजहंसा । अगा ये पंढरिनिवासा । अगा सर्वेशा सहजरूपा ॥ ४ ॥ अगा परमात्मा परमपुरुषा । अगा अव्यया जगदीशा । अगा कृपाळुवा आपुल्या दासा । तोडीं भवपाशा तुका ह्मणे ॥ ५ ॥

४४२४. कैसी करूं तुझी सेवा । ऐसें सांगावें जी देवा । कैसा आणूं अनुभवा । होशी ठावा कैशापरी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कर्मभ्रष्ट माझें मन । नेणें जप तप अनुष्ठान । नाहीं इंद्रियांसि दमन । नव्हे मन एकविध ॥ छ ॥ नेणें यातीचा आचार । नेणें भक्तीचा विचार । मज नाहीं संतांचा आधार । नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ २ ॥ न सुटे मायाजाळ । नाहीं वैराग्याचें बळ । न जिंकवती सबळ । काम क्रोध शरीरीं ॥ ३ ॥ आतां राख कैसें तरि । मज नुपेक्षावें हरी । तुझीं ब्रिदें चराचरीं । तैसीं साच करीं तुका ह्मणे ॥ ४ ॥

४४२५. भीमातीरवासी । तेथें निश्चयेंसी काशी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ मुख्यमुक्तीचें माहेर । ऐसें जाणा पंढरपुर ॥ छ ॥ घडे भींवरेशीं स्नान । त्यासि पुन्हा नाहीं जन्म ॥ २ ॥ भाव धरोनि नेटका । मोक्ष जवळी ह्मणे तुका ॥ ३ ॥

४४२६. जाली गाढवी दुधाळ । महिमा गाईची पावेल ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ श्वान जालेंसे चांगलें । तरी कां सांगातें जेवील ॥ छ ॥ जाली सिंदळा चांगली । तरि कां पतिव्रता जाली ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा जाति । काय उंचपण पावती ॥ ३ ॥

४४२७. काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काशी देह विटंबणें द्वारके जाळणें । पंढरीशी होणें ब्रह्मरूप ॥ छ ॥ अठरापगडयाती सकळ हि वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसि ॥ २ ॥ तुका ह्मणे असो अथवा नसो भाव । दर्शनें पंढरिराव मोक्ष देतो ॥ ३ ॥

**४४२८.** हें चि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शांति दया अंतःकरणीं । रंगो रामनामीं वाणी ॥ छ ॥ मूळ द्वंद्वाचें विघडो। निजानंदीं वृत्ति जडो ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । आतां आपुलेंसें करीं ॥ ३ ॥

**४४२९.** करोनि स्नानविधि आणि देवधर्म । क्रिया नित्यनेम तुजसाटीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें । सकळ ही व्रतें तुजलागीं ॥ छ ॥ सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती । आवडशी प्रीती नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे याहो पवित्राच्या राया । प्राणविसावया पांडुरंगा ॥ ३ ॥

**४४३०.** पहावा नयनीं विठ्ठल चि एक । कांहीं तरी सार्थक संसाराचें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोठें पाहों तुज कां गा लपालासि । कांहीं बोल मशीं नारायणा ॥ छ ॥ वाटतें उदास मज दाही दिशा । तुजविण हृषीकेशा वांचोनियां ॥ २ ॥ नको ठेवूं मज आपणा वेगळें । बहुत कळवळें तुजलागीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी देईं नारायणा । घडी कंठवेना तुजविण ॥ ४ ॥

**४४३१.** पूर्वीं बहुतांचे केले प्रतिपाळ । तें मज सकळ श्रुत आहे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अज अविनाश निर्गुण निरामय । विचारिलें काय त्यांचे वेळे ॥ छ ॥ तयांचिये वेळे होशी कृपावंत । माझा चि कां अंत पहातोसि ॥ २ ॥ नारद प्र्ल्हाद उपमन्यु धुरू । त्यांचा अंगीकारु कैसा केला ॥ ३ ॥ अंबऋषीसाटीं गर्भवास जाले । कां गा मोकलिलें कृपासिंधु ॥ ४ ॥ धर्माचें उच्छिष्ट अर्जुनाचीं घोडीं । आणीक सांकडीं कितीएक ॥ ५ ॥ जालासि लुगडीं तया द्रौपदीचीं । न ये कां आमुची कृपा कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कां गा जालासि कठीण । माझा भाग सीण कोण जाणे ॥ ७ ॥

**४४३२.** कासयासि व्यर्थ घातलें संसारीं । होतें तैसें जरी तुझे चित्तीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुझिये भेटीची थोर असे आस । दिसोनी निरास आली मज ॥ छ ॥ आतां काय जिणें जालें निरर्थक । वैकुंठनायक भेटे चि ना ॥ २ ॥ आइलासि काय कृपेच्या सागरा । रुक्मादेवीवरा सोइरिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे देईं चरणाची सेवा । नुपेक्षीं केशवा मायबापा ॥ ४ ॥

**४४३३.** पक्षीयाचे घरीं नाहीं सामुगरी । त्यांची चिंता करी नारायण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अजगर जनावर वारुळांत राहे । त्याजकडे पाहे पांडुरंग ॥ छ ॥ चातक हा पक्षी नेघे भूमिजळ । त्यासाटीं घननीळ नित्य वर्षे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी पिप्पलिकांची जात । पुरवीं मनोरथ पांडुरंगा ॥ ३ ॥

४४३४. रामनाम हा चि मांडिला दुकान । आहे वानोवाण घ्यारे कोणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नका कोणी करूं घेतां रे आळस । वांटितों तुह्मांस फुकाचें हें ॥ छ्र ॥ संचितासारिखें पडे त्याच्या हाता । फारसें मागतां तरी न ये ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं सांठविलें सार । [१]उरलिया थार विचारितां ॥ ३ ॥

४४३५. बहुजन्मां शेवटीं स्वामी तुझी भेटी । बहु मोह पोटीं थोर जाला ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बहु पुरें पाहिलीं बहु दिशा शोधिली । बहु चिंता वाहिली दुर्भराची ॥ छ्र ॥ बहु काळ गेले अनुचित केलें । बहु नाहीं गाइलें नाम तुझें ॥ २ ॥ ऐसा मी अपराधी अगा कृपानिधि । बहु संतां संनिधि ठेवीं तुका ॥ ३ ॥

४४३६. कोण तो[२] उपाव करूं भेटावया । जाळावी हे काया ऐसें वाटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सोडोनियां गांव जाऊं वनांतरा । रुकुमादेवीवरा पहावया ॥ छ्र ॥ करूं उपवास शोधूं हें शरीर । न धरवे धीर नारायणा ॥ २ ॥ जाती आयुष्याचे दिवस हे चारी । मग केव्हां हरी भेटशील ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं सांगा विचारोनि । विठो तुझे मनीं असेल तें ॥ ४ ॥

४४३७. माय बाप बंधु सोयरा सांगाती । तूं चि माझी प्रीति गण गोत ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शरण आलीं त्यांचीं वारिलीं दुरितें । तारिले पतित असंख्यात ॥ छ्र ॥ इतर कोण जाणे पावलें विश्रांति । न येतां तुजप्रति शरणागत ॥ २ ॥ तयामध्यें मज ठेवीं नारायणा । लक्षुमीरमणा सोइरिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे देईं दर्शनाचा लाभ । जे पाय दुर्लभ ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

४४३८. पाप ताप माझे गुणदोष निवारीं । कृष्णा विष्णु हरी नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काम क्रोध वैरी घालोनि बाहेरी । तूं राहें अंतरीं पांडुरंगा ॥ छ्र ॥ करिशील तरी नव्हे कांइ एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ २ ॥ समर्थासि काय आह्मीं शिकवावें । तुका ह्मणे यावें पांडुरंगा ॥ ३ ॥

४४३९. ये गा महाविष्णु अनंतभुजाच्या । आह्मां अनाथांच्या माहेरा ये ॥१॥ ॥ ध्रु. ॥ भेटावया तुज ओढे माझा जीव । एकवेळा पाय दावीं डोळां ॥ छ्र ॥ आणीक हें आर्त नाहीं नारायणा । ओढे हे वासना भेटावया ॥ २ ॥ वाटे चित्तीं काय करावा विचार । चरण सुंदर पहावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझे पुरवीं मनोरथ । येईं गा न संवरीत पांडुरंगा ॥ ४ ॥

४४४०. काय पाहतोसि कृपेच्या सागरा । नराच्या नरेंद्रा पांडुरंगा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामाचा प्रताप ब्रिदाचा वडिवार । करावा साचार नारायणा ॥ छ्र ॥

---

१ त. उरलियाची –२ दे. "तो" नाहीं.

कलीमाजी देव बौध्यरूप जाला । जगाचिया बोला लागूं नका ॥ २ ॥ माय पुत्रा काय मारूं पाहे कळी । जगाची ढवाळी काय काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे या हो कृपेच्या सागरा । रुकुमादेवीवरा मायबापा ॥ ४ ॥

**४४४१.** रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ ध्रु ॥ रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे रामनामीं । कृतकृत्य जालों आह्मी ॥ ३ ॥

**४४४२.** येइल घरा देव न धरीं संदेहा । फकिराचा यावा व्हावा जेव्हां ॥ १ ॥ होइल फकीर योगी महानुभाव । घडीघडी देव सांभाळील ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें बोलती बहुत । येणें गुणें संत जाले राम ॥ ३ ॥

**४४४३.** भक्तीवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वीसलक्ष योनि वृक्षामाजी घ्याव्या । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ॥ ध्रु ॥ अकरालक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या । दशलक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें ॥ २ ॥ तीसलक्ष योनि पशूंचीये घरीं । मानवाभीतरीं चारलक्ष ॥ ३ ॥ एकएक योनि कोटिकोटि फेरा । मनुष्यदेहाचा वारा मग लागे ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ५ ॥

**४४४४.** तुजवांचून कोणा शरण । जाऊं आतां कर जोडून ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ कोण करील माझें साहे । चित्तीं विचारूनि पाहें ॥ ध्रु ॥ तूं तंव कृपेचा सागर । दीनबंधु जगदोद्धार ॥ २ ॥ तुका ह्मणे निका । भवसिंधु तारक नौका ॥ ३ ॥

**४४४५.** हातीं धरिलियाची लाज । देवा असोंदे गा तुज ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आहें अमंगळ दुर्बळ । होईं दीन तूं दयाळ ॥ ध्रु ॥ बाळ सेंबडें मातेसि । काय नावडे तियेसि ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणें । करीन देहाचें सांडणें ॥ ३ ॥

**४४४६.** जळोजळो तें गुरुपण । जळोजळो तें चेलेपण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ गुरु आला वेशीद्वारीं । शिष्य पळतो खिडोरीं ॥ ध्रु ॥ काशासाटीं जालें येणें । त्यानें आलें वर्षासन ॥ २ ॥ तुका ह्मणे चेला । गुरु दोघे हि नरकाला ॥ ३ ॥

**४४४७.** अगा पंढरीच्या राया । वेगीं येईं तूं सखया ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दीनबंधु तुझें नाम । देईं आपुलें आह्मां प्रेम ॥ ध्रु ॥ जीवनकळा तूं विश्वाचीं तूं चि माउली अनाथाची ॥ २ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । देवीं मस्तकीं पादुका ॥ ३ ॥

४४४८. विटेवरी समचरण । तो हा रुक्मिणीरमण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेदशास्त्रा माहेर । केले दासा उपकार ॥ ध्रु ॥ नामापाशीं चारी मुक्ति । पहा हृदयीं प्रतीति ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ३ ॥

४४४९. सकळ हे माया नागवे कवणा । भांबाविलें जना दाही दिशा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आशा तृष्णा दंभ लागलीं हीं पाठी । नेदी बैसों हाटीं मोह ठायीं ॥ ध्रु ॥ काम क्रोध घरा लावितील आगी । निंदा हिंसा दोघी पळतां खाती ॥ २ ॥ लाज पुढें उभी राहिली आडवी । ते करी गाढवी थोर घात ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता घाली गर्भवासीं । ओढोनियां पाशीं चहूंकडे ॥ ४ ॥

४४५०. सकळतीर्थांहुनि । पंढरी हे मुगुटमणि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय सांगों तेथिल शोभा । रमावल्लभ जेथें उभा ॥ ध्रु ॥ न लभे व्रततीर्थदानीं[1] । तें या विठ्ठलदर्शनीं ॥ २ ॥ साधु संत गाती नाम । सकळ भूतांचा विश्राम ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्तुती । करूं काय सांगों किती ॥ ४ ॥

४४५१. गव्हांच्या घुगऱ्या । नाचण्यांच्या पुऱ्या । बऱ्या त्या चि बऱ्या । पाधाणी त्या पाधाणी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय थोरपण । वांयां जाळावा तो शीण । कारणापें भिन्न । निवडे तें निराळें ॥ ध्रु ॥ रुचि वोजेपाशीं । गरज ते जैशीतैशी । करूं नका नाशी । खावें खाणें जालें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मोठा । काय करावा तो ताठा । नाहीं वीण नीटा[2] । पाविजेत मारग ॥ ३ ॥

४४५२. आपुलिया ऐसें करी । संग धरी ज्याचा हो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनि परपरते । वरवरते पळतसें ॥ ध्रु ॥ लोभिक तें लोभा लावी । बांधल्या गोवी वांचूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे नामगोठी । पुरे भेटी तुझी देवा ॥ ३ ॥

४४५३. बरें जालीयाचे अवघे सांगाती । वाइटाचे अंतीं कोणी नाहीं ॥ १ ॥ नोहे मातापिता नोहे कांतासुत । इतरांची मात काय सांगों ॥ २ ॥ तुका ह्मणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी ॥ ३ ॥

४४५४. मिथ्या आहे सर्व अवघें हें मायिक । न कळे विवेक मज कांहीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सर्व बाजागिरी वाटती ही खरी । पहातां येथें उरी कांहीं नाहीं ॥ ध्रु ॥ आतां मज दुःख वाटतें अंतरीं । उपाय झडकरी सांग कांहीं ॥ २ ॥ पुढें कोण गति न कळे सर्वथा । तुझे पायीं माथा ठेवियेला ॥ ३ ॥ करणें तें करी सुखें आतां हरी । तुज म्यां निर्धारीं धरियेलें ॥ ४ ॥ स्वहित तें काय न कळे सर्वथा । तारीं[3] तूं अनंता तुका ह्मणे ॥ ५ ॥

---

१ त. तीर्थव्रतदानीं –२ दे. निटा.–३ दे. तरी तुज अनंता०

४४५५. अवघ्या कोल्ह्यांचें वर्म अंडीं । धरितां तोंडीं खीळ पडे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थुंकूं नका थुंकूं नका । आला तुका विष्णुदास ॥ छ्र ॥ कवणे ठायीं सादर व्हावें । नाहीं ठावें गाढवा ॥ २ ॥ दुर्जनासि पंचानन । तुका रजरेणु संतांचा ॥ ३ ॥

४४५६. तुझे ह्मणों आह्मां । मग उणें पुरुषोत्तमा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसा धर्म काय । अमृतानें मृत्यु होय ॥ छ्र ॥ कल्पवृक्षा तळीं । गांठी बांधलिया झोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे परीस । सांपडल्या उपवास ॥ ३ ॥

४४५७. कोरडिया गोष्टी नावडती मना । नाहीं ब्रह्मज्ञानाविण चाड ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दाखवीं आपुलें सगुण रूपडें । वंदीन मी कोडें पाय तुझे ॥ छ्र ॥ न लगे तो मोक्ष मज सायुज्यता । नावडे हे वार्ता शून्याकारी ॥ २ ॥ तुका ह्मणे चाड धरीन श्रीमुखें । येशिल कवतुकें जवळीक ॥ ३ ॥

४४५८. गणेश सारजा करिती गायना । आणि देवांगना रंभे ऐशा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें आह्मीं मानवांहीं विनवावें तें काय । सुरवर पाय वंदिति जेथें ॥ छ्र ॥ ज्याच्या गायनासी तटस्थ शंकर । त्या हि परि पार न कळे तुझा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी किंकर ते किती । इंद्राची हि मति नागविशी ॥ ३ ॥

४४५९. डोळियांचें दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीये ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय तें वानावें वाचेचे पालवें । वेदा न बोलवे रूप ज्याचें ॥ छ्र ॥ आनंदाच्या रसें ओंतीव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों सगळाच विरालों । विठ्ठल चि जालों दर्शनानें ॥ ३ ॥

४४६०. भोगियेल्या नारी । परि तो बाळब्रह्मचारी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी ज्याचे अंगीं कळा । पार न कळे वेदाला ॥ छ्र ॥ बळीबळी थोरथोर । मोडोनियां केले चूर ॥ २ ॥ वांकडी कुब्ज्या । सरसी आणियेली वोजा ॥ ३ ॥ मल्ल रगडिला पायीं । गज झुगारिला बाहीं ॥ ४ ॥ जित्रें मारियेला मामा । धांवे भक्ताचिया कामा ॥ ५ ॥ तुका ह्मणे पूर्ण । दावी भक्तीचीं विंदानें ॥ ६ ॥

४४६१. वृद्धपणीं आली जरा । शरीर कांपे थरथरा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आयुष्य गेलें हें कळेना । स्मरा वेगीं पंढरिराणा ॥ छ्र ॥ दांत दाढा पडिल्या ओस । हनुवटि भेटे नाकास ॥ २ ॥ हात पाय राहिले कान । नेत्रा पाझर हाले मान ॥ ३ ॥ अंगकांति परतली । चिरगुटा ऐसी जाली ॥ ४ ॥ आड पडे जिव्हा लोटे । शब्द नये मुखा वाटे ॥ ५ ॥ लांब लोंबताती अंड । भरभरा वाजे गांड ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां तरी । स्मरा वेगीं हरी हरी ॥ ७ ॥

---

१ त. हे.

४४६२. वृद्धपणीं न पुसे कोणी । विटंबणी देहाची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नव द्वारें जाली मोकळीक । गांड सरली वाजती ॥ छ ॥ दंत दाढा गळे थुंका । लागे नाका हनुवटी ॥ २ ॥ शब्द नये मुखावाटा । करिती चेष्टा पोरें तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अजून तरि । स्मरें श्रीहरी सोडवील ॥ ४ ॥

४४६३. अतित्याई देतां जीव । नये कींव देवासि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ थोड्यासाटीं राग आला । जीव दिला गंगेंत ॥ छ ॥ त्यासि परलोकीं नाहीं मुक्ति । अधोगति चुकेना ॥ २ ॥ तुका ह्मणे कृष्णराम । स्मरतां श्रम वारती ॥ ३ ॥

४४६४. तुझें रूप पाहतां देवा । सुख जालें माझ्या जीवा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हें तों वाचे बोलवेना । काय सांगों नारायणा ॥ छ ॥ जन्मोजन्मींचें सुकृत । तुझे पायीं रमे चित्त ॥ २ ॥ जरी योगाचा अभ्यास । तेव्हां तुझा निजध्यास ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्त । गोड गाऊं हरिचें गीत ॥ ४ ॥

४४६५. तुजवीण मज कोण आहे देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जोडोनियां कर कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ छ ॥ साच करीं हरी आपुली ब्रिदावळी । कृपेनें सांभाळीं मायबापा ॥ २ ॥ साह्य होसी जरी जाती सहा वैरी । मग ध्यान करीं आवडीनें ॥ ३ ॥ सर्व अपराध क्षमा करीं माझा । लडिवाळ तुझा पांडुरंगा ॥ ४ ॥ कृपा करोनियां द्यावी क्षमा शांति । तेणें तुझी भक्ति घडेल देवा ॥ ५ ॥ ऐसें तों सामर्थ्य नाहीं नारायणा । जरी तुज करुणा येइल कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां आपंगावें मज । राखें माझी लाज पांडुरंगा ॥ ७ ॥

४४६६. नको विद्या वयसा आयुष्य फारसें । नाहीं मज पिसें मुक्तीचें ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ रामकृष्ण ह्मणतां जावो माझा प्राण । हें चि कृपादान मागतसें ॥ छ ॥ नको धन मान न वाढो संतान । मुखीं नारायण प्राण जावा ॥ २ ॥ तुका ह्मणे दीन काकुलती येतों । तुज निरवितों पांडुरंगा ॥ ३ ॥

४४६७. शिष्या सांगे उपदेश । गुरुपूजा हे विशेष ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दावी आचार सोवळे । दंड कमंडलु माळे ॥ छ ॥ छाटी भगवी मानसीं । व्यर्थ ह्मणवी संन्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे लोभ । न सुटे नाहीं लाभ ॥ ३ ॥

४४६८. जिकडे पाहें तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ डोळां बैसलें बैसलें । रूप राहोनि संचलें ॥ छ ॥ न वर्जितां दाही दिशा । जिकडे पाहें तिकडे सरिसा ॥ २ ॥ तुका ह्मणे समपदीं । उभा दिठीचिये आधीं ॥ ३ ॥

४४६९. आपटा संवदड रानचारा । दसऱ्याचा होय तुरा ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ तैसा देवाम्रुळें मान । नाहीं तरी पुसे कोण ॥ छ्रु ॥ मृत्तिकेची ते घागरी । पाण्यासाटीं बैसे शिरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे घाप जाण । दाण्यासवें घेणें देणें ॥ ३ ॥

४४७०. काळ सार्थक केला त्यांणीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ नाम वाचे श्रवण कीर्त्ति । पाउलें चित्तीं समान ॥ छ्रु ॥ कीर्त्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामीं ॥ ३ ॥

४४७१. आह्मीं जातों आपुल्या गांवा । आमुचा रामराम घ्यावा ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ तुमची आमची हे चि भेटी । येथुनियां जन्मतुटी ॥ छ्रु ॥ आतां असों द्यावी दया । तुमच्या लागतसें पायां ॥ २ ॥ येतां निजधामीं कोणी । विठ्ठलविठ्ठल बोला वाणी ॥ ३ ॥ रामकृष्ण मुखीं बोला । तुका जातो वैकुंठाला ॥ ४ ॥

४४७२. कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ ऐसें आह्मां मांडियेलें । विठो त्वां कां सांडियेलें ॥ छ्रु ॥ बैसोनि कल्पद्रुमातळीं । पोटासाटीं तळमळी ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणा । बरें लोकीं हें दीसेना ॥ ३ ॥

४४७३. तुझें नाम माझे मुखीं असो देवा । विनवितों राघवा दास तुझा ॥ १ ॥ तुझ्या नामबळें तरले पतित । ह्मणोनि माझें चित्त तुझे पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें नाम हें सादर । गातां निरंतर सुख वाटे ॥ ३ ॥

४४७४. उभय भाग्यवंत तरी च समान । स्थळीं समाधान तरी च राहे ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा । सांचवणी जळा परी नाश ॥ छ्रु ॥ लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ । नांवाचा पालट दगड खरा ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे विनोदाचे ठाव । एकात्मक भाव नाहीं तेथें ॥ ३ ॥

४४७५. दो दिवसांचा पाहुणा चालतो उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥ १ ॥ तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचिता । मग पंढरीनाथा भजसी केव्हां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे आहेत उदंड । तया केशव प्रचंड केवीं भेटे ॥ ३ ॥

४४७६. तुझे पाय माझें भाळ । एकत्रता सर्वकाळ ॥ १ ॥ ॥ध्रु.॥ हे चि देई विठाबाई । पांडुरंगे माझे आई ॥ छ्रु ॥ नाहीं मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड ॥ २ ॥ सदा संग सज्जनांचा । नको वियोग पंढरीचा ॥ ३ ॥ नित्य चंद्रभागे स्नान । करीं क्षेत्रप्रदक्षण ॥ ४ ॥ पुंडलीक पाहोन दृष्टि । हर्षें नाचों वाळवंटीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । तुझें स्वरूप चंद्रभागा ॥ ६ ॥

**४४७७.** बाईल चालिली माहेरा । संगें दिधला म्हातारा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सिधा सामग्री पोटाची । सवें स्वारी बइलाची ॥ छ्रु ॥ जातां पाडिली ढोरानें । सिव्या देती अन्योविन्ये ॥ २ ॥ न सावरी आपणातें । नग्न सावलें वरतें ॥ ३ ॥ फजित केलें जनलोकीं । मेला म्हणे पडे नरकीं ॥ ४ ॥ गोहाची हे गेली लाज । गांजितां कां तुम्ही मज ॥ ५ ॥ तुका म्हणे जनीं । छी[1] थू केली विटंबणी ॥ ६ ॥

**४४७८.** तुळसीवृंदावनीं उपजला कांदा । नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसे वंशामध्यें जाले जे मानव । जाणावे दानव अभक्त ते ॥ छ्रु ॥ केवड्यामधील निर्गंध कणसें । तैशीं तीं मौणसें[2] भक्तिहीन ॥ २ ॥ तुका म्हणे जेवीं चंदनांतिल आळी । न चढे[3] निढळीं देवाचिया ॥ ३ ॥

**४४७९.** संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धी नव जाय ॥ १ ॥ ज्याचा जैसा ठेवा तो त्याप्रति धांवे । न लगती करावे उपदेश ॥ २ ॥ घेउनियां उठे आपुलाला गुण । भविष्य प्रमाण तुका म्हणे ॥ ३ ॥

**४४८०.** शिव शक्ति आणि सूर्य गणपति । एक चि म्हणती विष्णूस ही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ हिरा गार दोनी मानिती समान । राजस भजनें वांयां जाती ॥ छ्रु ॥ अन्य देवतांसि देव म्हणऊन । तामस जीवन तमोयोग्या ॥ २ ॥ वांयां जायासाठीं केलासे हव्यास । अन्य देवतांस देवपण ॥ ३ ॥ आपुलिया मुखें सांगतसे धणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ ४ ॥ धन्य ते वैष्णव भजती केशव । सात्विक हे जीव मोक्षा योग्य ॥ ५ ॥ तुका म्हणे मोक्ष नाहीं कोणापासीं । एका गोविंदासी शरण व्हा रे ॥ ६ ॥

**४४८१.** तुम्ही साधु संत कैवल्यसागर । मोक्षाचे आगर तुम्हां घरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें मतिमंद काय बोलों वाणी । अमृताचे धणी पाणी कां घ्या ॥ छ्रु ॥ कोटी भानु तेजीं खद्योत बापुडें । तैसा तुम्हांपुढें काय बोलों ॥ २ ॥ तुम्ही अवघे चिंतामणि कल्पतरूचीं वनें । त्यापुढें धांवणें मैशकांनीं[4] ॥ ३ ॥ वाराणशीक्षेत्र गंगा वाहे कोड । काय तेथें पाड कोकणाचे ॥ ४ ॥ पल्लवाचा वारा हिमकरीं काय । गगनावरी छाय कोण करी ॥ ५ ॥ समुद्राची तृपा हरी ऐसा कोण । जगाची जी तान्ह निववीतो ॥ ६ ॥ मेरूचा पाठार अवघी ते क्षिति । मैंगकाचे[5] हातीं मुष्टि फावे ॥ ७ ॥ सिंहापुढें काय जंबूक आरोळी । मोतियांचे वोळी कांच काय ॥ ८ ॥ कापुरासि काय लावूनि उटावें । काय ओवाळावें दीपकासि ॥ ९ ॥ तैसे[6] तुम्ही निरे ज्ञानाचे भरींव । तेथें म्यां बोलावें पाड कैंाय[7] ॥ १० ॥ कृपानिधि तुम्हीं

१ त. चीथु–२ त. मानसें–३ त. चले.–४ दे. मषकांनीं.–५ दे. मशकाचे–६ दे. तैसीं–
७ त. कायी.

बोलविलें बोला । सुखें न्याय केला तुमचा मीं ॥ ११ ॥ अज्ञान मी वेडें ह्मणवितों बाळ । माझा प्रतिपाळ करणें तुह्मां ॥ १२ ॥ बोबडें बोलणें न धरावा कोप । क्षमा करा बाप कृपासिंधु ॥ १३ ॥ तुका ह्मणे तुह्मी संत बापमाय । भेयें धरिले पाय कृपानिधि ॥ १४ ॥

४४८२. देहीं असोनियां देव । वृथा फिरतो निदैंव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ देव आहे अंतर्यामीं । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ छ ॥ नाभी मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥ २ ॥ साखरेचें मूळ ऊंस । तैसा देहीं देव दिसे ॥ ३ ॥ दुधीं असतां नवनीत । नेणे तयाचें मथित ॥ ४ ॥ तुका सांगे मूढजना । देहीं देव कां पाहाना ॥ ५ ॥

४४८३. जयजय ह्मणा राम । हातें टाळी वाचे नाम ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आटाआटी नाहीं ज्यास । न वेचे मोल न पडे खांस ॥ छ ॥ आपण ह्मणे आणिकां हातीं । यज्ञादिकीं नेये ते गति ॥ २ ॥ आसन भोजन करितां काम । ध्यानसमाधि ह्मणतां राम ॥ ३ ॥ मंत्र जपा हा चि सार । वर्णा यातीं जयजयकार ॥ ४ ॥ ह्मणतां राम ह्मणे तुका । वेळोवेळां चुकों नका ॥ ५ ॥

४४८४. शिकवणेसाटीं वाटते तळमळ । पुढें येईल काळ फोडों डोई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेव्हां त्यासि काय देशील उत्तर । मेळउनी अंतर ठेवितोसि ॥ छ ॥ येथींचिया संगें भोरपियाचे परि । होईल तें दुरि शृंगारिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे राखिलें खरकटें । रागेल्याचे तंट रागेलें का ॥ ३ ॥

४४८५. होईं आतां माझ्या भोगाचा भोगिता । सकळ अनंता शुभाशुभ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आठवुनी पाय राहिलों हृदयीं । निवारली तईं सकळ चिंता ॥ छ ॥ अचळ न चळे देहाचें चळण । आहे हें वळण प्रारब्धें चि ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें एक चि वचन । केलिया कीर्त्तन आराणुक ॥ ३ ॥

४४८६. लेखी दुखण्यासमान । वेचला नारायणीं क्षण । उद्यांचें आजि न मरण । आणोनि ह्मणे हरि भोक्ता ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं कांहीं पडों येत तुटी । जाणें तो आहे सेवटीं । लाभ विचारोनि पोटीं । होईं सेवटीं जागृत ॥ छ ॥ आहे ते उरे कटा । लावुनि चळ आपुला फाटा । पुरे हें न पुरे सेवटा । तृष्णा चळकटा सदा वास ॥ २ ॥ ह्मणोनि मोडावा कांटाळा । अविद्यात्मक कोंवळा । होतील प्रबळा । आशा तृष्णा माया ॥ ३ ॥ क्षण या देहाच्या अंतीं । जड होउनि

१ दे॰ मढे.—२ न. नंदनें—३ न. भोरपीयाचें

राहेल माती । परदेश ते परवर होती । चिळसविती नाकडोळे ।। ४ ।। जंव या नाहीं पातल्या विपत्ति । आयुष्य भविष्य आहे हातीं । लाभ विचारोनि गुंती । तुका ह्मणे अंतीं सर्व पिसुनें ।। ५ ।।

४४८७. आसावलें मन जीवनाचें ओढी । नामरूपीं गोडी लावियेली ।। १ ।। ।। ध्रु. ।। काय तुझे पायीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ।। ध्रु ।। काय लोखंडाचे पाहे गुणदोष । सिवोन परीस सोनें करी ।। २ ।। तुका ह्मणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ।। ३ ।।

४४८८. पंढरीची वारी जयांचिये घरीं । पायधुळी शिरीं वंदिन त्यांची ।। १ ।। ।। ध्रु. ।। दासाचा मी दास पोसणा डोंगर । आतां बहु फार काय बोलों ।। ध्रु ।। जातींचें मी हीन न कळे भजन । ह्मणोनि संतचरण इच्छीतसें ।। २ ।। तुका ह्मणे मज ह्मणावें आपुलें । बहुतां तारिलें संतजनीं ।। ३ ।।

४४८९. नाम पावन पावन । त्याहून पवित्र आहे कोण ।। १ ।। ।। ध्रु. ।। शिव हालाहालें[1] तापला । तो ही नामें शीतळ जाला ।। ध्रु ।। शिवास नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर ।। २ ।। मरण जालें काशीपुरी । तेथें नाम चि उद्धरी ।। ३ ।। तुका[2] ह्मणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरें[3] ।। ४ ।।

४४९०. अल्प विद्या परि गर्वशिरोमणि । मजहूनि ज्ञानी कोणी[4] आहे ।। १ ।। ।। ध्रु. ।। अंगीं भरे ताठा कोणासी मानीना । साधूची हेळणा स्वयें करी ।। ध्रु ।। सज्जनाच्या[5] देहीं मानी जो विटाळ । त्रैलोकीं चांडाळ तो चि एक ।। २ ।। संतांची जो निंदा करी मुखीं जप । खतेलें तें पाप वज्रलेप ।। ३ ।। तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ।। ४ ।।

४४९१. नाहीं संतांशीं शरण । काय वाचोनि पुराण ।। १ ।। ।। ध्रु. ।। ह्मणे विठ्ठलाचा दास । देखोनी परनारीस हांसे ।। ध्रु ।। करिती विठोबाची भक्ति । दयाधर्म नाहीं चित्तीं ।। २ ।। तेथें नाहीं माझा देव । व्यर्थ श्रमवी हा जीव ।। ३ ।। अंगीं नाहीं क्षमा दया । ह्मणती भेट पंढरिराया ।। ४ ।। नाहीं धर्माची वासना । काय करोनि प्रदक्षिणा ।। ५ ।। ऐसें नव्हे भक्तिवर्म । तेथें नाहीं माझा राम ।। ६ ।। नये कृपा कांहीं केल्या । नये घाम जीव गेल्या ।। ७ ।। जैसी खड्गाची धार । विठ्ठलचरणीं तुका शूर ।। ८ ।।

४४९२. नाहीं रिकामीक परी वाहे मनीं । तया चक्रपाणि साह्य होय ।। १ ।। ।। ध्रु. ।। उद्वेग जीवासि पंढरीचें ध्यान । तया नारायण साह्य करी ।। ध्रु ।।

---

१ त. हळहाळे.–२ त. नामा ह्मणे०.–३ त. साइरें.–४ दे. कोणी.–५ त. सज्जनाचा.

शरीरासि बळ नाहीं स्वता भाव । तया पंढरिराव साह्य करी ॥ २ ॥ असो नसो बळें[1] राहे पराधीन । तरी अनुमान करूं नका ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें करोनि चिंतनें[2] । तया नारायण जवळीक ॥ ४ ॥

४४९३. दारिद्रानें विप्र पीडिला अपार । तया पोटीं पोर एक असे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ बाहेरी मिष्टान्न मिळे एके दिशीं । घेऊनी छंदासि त्या चि बैसे ॥ छ्र ॥ क्षुधाकाळीं रडे देखिलें तें मागे । कांहीं केल्या नेघे दुजें कांहीं ॥ २ ॥ सहज कौतुकें बोले बापमाये । देवापाशीं आहे मागशी तें ॥ ३ ॥ तेव्हां तुजलागीं स्मरे नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ ४ ॥ लागली हे क्षुधा जात असे प्राण । काय हें निर्वाण पाहातोसि ॥ ५ ॥ ब्रह्मांडनायक विश्वाचा पाळक । वरी तिन्ही लोक पोसितोसि ॥ ६ ॥ प्राण हा उत्कर्ष जाहला विव्हळ । तेव्हां तो कृपाळ धांव घाली ॥ ७ ॥ सांडूनि वैकुंठ धांव घाली तई । आळंगिला बाहीं कृपावंतें[3] ॥ ८ ॥ तुका ह्मणे दिला क्षीराचा सागर । राहे निरंतर तयापासीं ॥ ९ ॥

४४९४. अनाथाचा सखा ऐकिला प्रताप । होसि कृपावंत मजवरि ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझिया गा चित्ता करिं शिकवण । जेणें तुझे चरण जोडतील ॥ छ्र ॥ जोडोनियां कर येतों काकुलती । रकुमाईच्या पति कृपावंता ॥ २ ॥ हरुषें निर्भर करीं माझें मन । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ ३ ॥ तुझे भेटीविण जन्म गेला वांयां । भजन कराया शक्ति नाहीं ॥ ४ ॥ न घडे तुझी सेवा न घडे पूजन । जन्मोनि निष्कारण जाऊं पाहे ॥ ५ ॥ तुका ह्मणे हरि करावें या काय । भजनासि साह्य होईं बापा ॥ ६ ॥

४४९५. हीनवर बीजवर दोघी त्या गडणी । अखंड कहाणी संसाराची ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ माझा[4] पति बहु लहान चि आहे । खेळावया जाय पोरांसवें ॥ छ्र ॥ माझें दुःख जरी ऐकशील सई । ह्मातारा तो बाई खोकतसे ॥ २ ॥ खेळे सांजवरी बाहेरी तो राहे । वाट मी वो[5] पाहें सेजेवरी ॥ ३ ॥ पूर्व पुण्य माझें नाहीं बाई[6] नीट । बहु होती कष्ट सांगों कांई[7] ॥ ४ ॥ जवळ मी जातें अंगा अंग लावूं । नेदी जवळ येऊं कांटाळतो ॥ ५ ॥ पूर्व सुकृताचा हा चि बाई ठेवा । तुका ह्मणे देवा काय बोल ॥ ६ ॥

४४९६. स्वामीच्या सामर्थ्यें । चाले बोलिला पुरुषार्थ ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पाठी देवाचें हें बळ । मग लाभे हातीं काळ[8] ॥ छ्र ॥ देव ज्यासी साह्य । तेणें केलें सर्व होय ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वामीसत्ता । मग नाहीं भय चिंता[9] ॥ ३ ॥

---

१ दे. बाळ.–२ दे. चितनीं.–३ त. कृपावते.–४ दे. माझे.–५ दे. 'वो' नाहीं.–६ दे. बा.–७ दे. काहीं.–८ त. फळ.–९ दे. चिंता.

४४९७. नामांचा डांगोरा फिरवीं घरोघरीं । ह्मणा हरीहरी सर्वभावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नामें हरती कर्में वैकुंठींची पै वस्ति । संनिध श्रीपति सदोदित ॥ छ ॥ नामाचा महिमा बहुतां कळला । नामें उद्धारिला अजामेळ ॥ २ ॥ गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती । नामें चि श्रीपति पावलासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम[1] घेतां मुक्ति आहे । नामें सर्व पाहें आकळिलें ॥ ४ ॥

४४९८. यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आह्मां दिनानाथें रक्षियेलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ यम नेतां तुह्मां रक्षील हें कोण । तुह्मां धन्यधन्य कोण ह्मणती ॥ छ ॥ संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति । त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ॥ २ ॥ तें चि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासि पांपरी हाणे आतां ॥ ३ ॥

४४९९. देवासीं पैं भांडों एकचित्त करूनि । आह्मांसि सज्जनीं सांगितलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आह्मां काय आतां देवें आडो परी । भेटी नेदी तरी सुखें नेदो ॥ छ ॥ तो चि नांदो सदा हरि पैं वैकुंठीं । आह्मां देशवटी देवो सुखें ॥ २ ॥ देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी तो एकला राहो आतां ॥ ३ ॥ चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षें गाऊं गीत गोविंदाचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे सर्व देवाची नष्टाई । आह्मी सुखें पाहीं[2] डुलतसों ॥ ५ ॥

४५००. भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातीचे ॥ छ ॥ येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ॥ ३ ॥

४५०१. ग्रासोग्रासीं भाव । तरी देहिं च जेवी देव ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ धरीं स्मरण तें सार । नाहीं दुरी तें अंतर ॥ छ ॥ भोगितां तूं भावें । देव जेऊं बैसे सवें ॥ २ ॥ तुज पावो देवा । भावें अंतरींची सेवा ॥ ३ ॥ गुंतला साधनीं । देव नाहीं त्रिभुवनीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हातीं । न धरितां गमाविती ॥ ५ ॥

४५०२. कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलिया नाहीं गर्भवास ॥ छ ॥ दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ॥ २ ॥ कामातुर जैसा भय लज्जा सांडोनि । आवडे कामिनी सर्वभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ४ ॥

---

१ दे. 'नाम' नाहीं.–२ दे. 'पाहीं' नाहीं

४५०३. ॐ तत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥ १ ॥ हरि:ॐ सहित [1]उदत्त अनुदत्त । प्रचुरीश्वरासहित पांडुरंग ॥ २ ॥ गोब्राह्मणहिता होऊनि निराळे । वेदाचें तें मूळ तुका ह्मणे ॥ ३ ॥

४५०४. सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उष्ण तान भूक एवढिये आकांतीं । ओसंगा लाविती काय ह्मूण ॥ ध्रु ॥ खांद्यावरि शूळ मरणाचिये वाटे । अन्याय ही मोठे केले साच ॥ २ ॥ हातींचा हिरोनि घातला पोठीसी । तुका ह्मणे ऐसी परी जाली ॥ ३ ॥

---

## ओंव्या प्रारंभ* २३१ अभंग ३+.

४५०५. पांडुरंगा करूं प्रथम [3]नमनौं । दुसरें चरणा संतांचिया ॥ १ ॥ [4]यांच्या कृपादानें कथेचा [5]विस्तारुं । बावाजीसद्गुरुदास तुका ॥ २ ॥ काय माझी वाणी मानेल संतांसी । रंजवूं चित्तासी आपुलिया ॥ ३ ॥ या मनासी लागो हरिनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥ ४ ॥ सीण जाला मज [6]संसारसंभ्रमें । सीतळ या नामें जाली काया ॥ ५ ॥ या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आलें आकारासी निर्विकार ॥ ६ ॥ नित्य धांवे तेथें नामाचा गजर । घोष जयजयकार आइकतां ॥ ७ ॥ तांतडी ते काय हरिगुण गाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ८ ॥ सूळ नरकाचें [7]राज्यँ मदें माते । अंतरे बहुत देव दुरी ॥ ९ ॥ दुरी अंतरला नामानिंदकासी । जैसें गोंचिडासी क्षीर राहे ॥ १० ॥ हे वाट गोमटी वैकुंठासी जातां । रामकृष्णकथा दिंडी ध्वजा ॥ ११ ॥ [8]जाणते तयांनीं सांगितलें करा । अंतरासी वारा आह्वनियां ॥ १२ ॥ [9]यांसी आहे ठावें परि अंध होती । विषयाची खंती वाटे जना ॥ १३ ॥ नाहीं त्या [10]सुटलीं द्रव्य लोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची ॥ १४ ॥ चित्त ज्याचें पुत्रपत्नीबंधूवरी । सुटेल हा परि कैसें जाणा ॥ १५ ॥ [11]जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥ १६ ॥ माझी मज असे घडली प्रचित । नसेल पतित ऐसा कोणी ॥ १७ ॥ कोणीं तरी कांहीं [12]केलें आचरण । मज या कीर्तनेंविण नाहीं ॥ १८ ॥ नाहीं भय भक्ता तराया [2]पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥ १९ ॥ लागे पाठोवाटी पाहे पायांकडे । [13]पीतांबरें खडे वाट [14]झाँडी ॥ २० ॥ डिंकोनियां [15]काँ रे राहिले हे लोक । हें चि कवतुक

---

१ " उदत अनुदत । प्रचुरीश्वरासहित " हें " उदात्त अनुदात्त । प्रचयस्वरासहित " या अर्थी आहे असें दिसतें.–२ दे. पोटासी –३ दे. त. नमन.–४ पं. त्याच्या.–५ दे. त. विस्तार –६ दे. सवसार०.– ७ दे. राज्यमंदमाते –८ दे. जाणतयांनीं.–९ पं. तयासी –१० दे. सुटल. त. सुटला –११ दे. जाणत नेणत.–१२ पं. केलीं आचरणें.–१३ दे. पं. पीतांबर.–१४ दे. सांडी.–१५ पं. 'कां रे' याबद्दल 'काय'.

* त. ११०० हा अंक आहे. + त. १०३ हा अंक आहे.

वाटे मज ॥ २१ ॥ जयानें तारिले पाषाण सागरीं । तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा ॥ २२ ॥ माझिया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळु हा ॥ २३ ॥ हा चि माझा नेम हा चि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें ॥ २४ ॥ चेतवला अग्नि तापत्रयज्वाळे । तो करी शीतळ रामनामें ॥ २५ ॥ मना धीर करीं दृढ चित्तीं धरीं । तारील श्रीहरि मायबाप ॥ २६ ॥ बाप हा कृपाळु भक्तां भाविकांसी । घरीं होय दासी कामारी त्यां ॥ २७ ॥ त्याचा भार माथां चालवी आपुला । जिहीं त्या दिधला सर्व भाव ॥ २८ ॥ भावेंविण जाणा नाहीं त्याची प्राप्ति । पुराणें बोलती ऐसी मात ॥ २९ ॥ मात त्याची जैया आवडे जीवासी । तया गर्भवासीं नाहीं येणें ॥ ३० ॥ योवें गर्भवासीं तरी च विष्णुदासीं । उद्धार लोकांसी पूज्य होती ॥ ३१ ॥ होती आवडते जीवाचे ताइत । त्यां घडी अच्युत न विसंभे[7] ॥ ३२ ॥ भेदाभेद नाहीं चिंता दुःख कांहीं । वैकुंठ त्या ठायीं सदा वसे ॥ ३३ ॥ वसे तेथें देव सदा सर्वकाळ । करिती निर्मळ नामघोष ॥ ३४ ॥ संपदा तयांची न सरे कल्पांतीं । मेळविला भक्तीं देवलाभ ॥ ३५ ॥ लाभ तयां जाला संसारा येऊनी । भगवंत ऋणी भक्तीं केला ॥ ३६ ॥ लागलेंसे पिसें काय मूढजनां । कैाय नारायणा विसरलीं ॥ ३७ ॥ विसरलीं तयां थोर जाली हाणी । पंचविलया खाणी चौऱ्यासीच्यें ॥ ३८ ॥ शिकविलें तरी नाहीं कोणा लाज । लागलीसे भाज धन गोड ॥ ३९ ॥ गोड एक आहे अविट गोविंद । आणीक [11]तो छंद नासिवंत ॥ ४० ॥ तळमळ त्याची कांहीं तरी करा । कां रे निदसुरा बुडावया ॥ ४१ ॥ या जनासी भय यमाचें [12]कां नाहीं । [13]सांडियेलीं तिहीं एकराज्यें ॥ ४२ ॥ जेणें अग्निमाजी घातलासे पाव । नेणता तो राव जनक होता ॥ ४३ ॥ तान भूक जिहीं साहिले आघात । तया पाय हात काय नाहीं ॥ ४४ ॥ नाहीं ऐसा तिहीं केला संवसार । दुःखाचे डोंगर तोडावया ॥ ४५ ॥ याच जन्में घडे देवाचें भजन । आणीक हें ज्ञान नाहीं कोठें ॥ ४६ ॥ कोठें[14] पुढें नाहीं ध्यावया विसांवा । फिरोनि या गांवा आल्याविण ॥ ४७ ॥ विनवितां दिवस बहुत लागती । ह्मणउनि चित्तीं देव धरा ॥ ४८ ॥ धरा पाय तुह्मी संतांच जीवें[15]सी । वियोग तयांसी देवा नाहीं ॥ ४९ ॥ नाहीं चाड देवा आणीक सुखाची । आवडी [16]नामाची त्याच्या तया ॥ ५० ॥ त्याची च उच्छिष्ट बोलतों उत्तरें । सांगितलें खरें

---

१ पं. जाळ.–२ त. पं. रामनामें.–३ दे. 'जाणा नाहीं' नाहीं.–४ पं. सदा आवडे जयासी.–५ पं. यावे विष्णुदासी तरीच गर्भवासीं ।.–६ दे. आवडत.–७ पं. विसवे–८ पं. कां रे.–९ पं. पचतील.–१० दे. चौऱ्यासी.–११ पं. ते–१२ दे. 'कां' नाहीं.–१३ पं. साडियेले तिही एक राज्य.–१४ पं. नाहीं कोठें पुढें.–१५ पं. जीवेसी.–१६ पं. तयाची तैसी तया.

व्यासादिकीं ॥ ५१ ॥ व्यासें सांगितलें भक्ति हें[1] चि सार । भवसिंधु[2] पार तरावया ॥ ५२ ॥ तरावया जना केलें भागवत । गोवळ गोपी भक्त माता पिता ॥ ५३ ॥ तारुनियां खरे[3] नेली ऐक्यासरें[4] । निमित्तें उत्तरें ऋषीचियों ॥ ५४ ॥ यासी वर्म ठावें भक्तां तरावया[6] । जननी बाळ माया राखे[7] तान्हें ॥ ५५ ॥ तान्हेलें भुकेलें ह्मणे वेळोवेळां । न मगतां ळा[8] जाणोनियां ॥ ५६ ॥ जाणोनियां वर्म[9] देठ लावियेला । द्रौपदीच्या बोलासवें धांवे ॥ ५७ ॥ धांवे[10] सरवता[11] धेनु जैसी वत्सा । भक्तालागीं तैसा नारायण ॥ ५८ ॥ नारायण व्होवा[12] हांव ज्याच्या जीवा । धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ॥ ५९ ॥ पार नाहीं सुखा तें दिलें तयासी । अखंड वाचेसी रामनाम[13] ॥ ६० ॥ रामनाम[13] दोनी उत्तम अक्षरें । भवानीशंकरें[14] उपदेशिलीं ॥ ६१ ॥ उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसी प्राणी मध्यें मरे ॥ ६२ ॥ मरणाचे अंतीं राम ह्मणे जरी । न लगे यमपुरी जावें[15] तया ॥ ६३ ॥ तयासी[16] उत्तम वास[17] वैकुंठीं । वसे नाम चित्तीं[18] सर्वकाळ ॥ ६४ ॥ सर्वकाळ वसे वैष्णवांच्या घरीं । नसे क्षणभरी स्थिर[19] कोठें ॥ ६५ ॥ कोठें नका पाहों करा हरिकथा । तेथें अवचिता सांपडेल ॥ ६६ ॥ सांपडे हा देव भाविकांचे हातीं । शाहाणे मरती तरी नाहीं ॥ ६७ ॥ नाहीं भले[20] भक्ती केलियावांचूनि । अहंता पापिणी नागवण ॥ ६८ ॥ नागवलों[21] ह्मणे देव मी आपणा । लाभ दिला जना ठकलों[22] तो ॥ ६९ ॥ तो चि देव येर नव्हे ऐसें कांहीं । जनार्दन ठायीं चहूं खाणी ॥ ७० ॥ खाणी भरूनियां राहिलासे आंत । बोलावया मात ठाव नाहीं ॥ ७१ ॥ ठाव नाहीं रिता कोणी देवाविण । ऐसी ते सज्जन संतवाणी ॥ ७२ ॥ वाणी बोलूनियां गेलीं[23] एक पुढें । तयासी वांकुडें जातां ठके[24] ॥ ७३ ॥ ठका[25] नाहीं अर्थ ठाउका वेदांचा । होऊनि भेदाचा दास ठेला ॥ ७४ ॥ दास ठेला पोटीं[26] अर्थ दंभासाटीं । ह्मणउनि तुटी देवासवें ॥ ७५ ॥ सवें देव द्विजातीही दुराविला । आणिकांचा आला कोण पाड ॥ ७६ ॥ पाड करूनियां नागविलीं[27] फार । पंडित वेव्हार खळवादी ॥ ७७ ॥ वादका निंदका देवाचें दर्शन[28] । नव्हे जाला पूर्ण षड्कर्मी[29] ॥ ७८ ॥ षड्कर्मी हीन रामनाम कंठीं । तयासवें भेटी सवें[30] देवा ॥ ७९ ॥ देवासी आवडे[31] भाविक जो भोळा । शुद्ध त्या

---

१ दे. त. हे विचार –२ पं. तरावया पार भवसिंधु ।.–३ पं. पुढें.–४ पं. एक मेरे.–५ दे. रुसिया –६ पं. तारावया.–७ दे. त. राख.–८ पं. कळ.–९ पं. देठ वर्म.–१० धावे सवें तान्ही धेनु जैसी वत्सा ।.–११ दे. पं. सर्वता.–१२ दे. व्होवा पं. व्हावा हे हांव.–१३ पं. रामराम.–१४ पं. भवानीशंकर उपदेशी.–१५ त. पं. जाणें –१६ पं. तयासी तो ठाव केलासे वैकुंठीं ।.–१७ दे. ठाव वैकुंठीं.–१८ पं. कंठीं –१९ दे. त. थिर.–२० पं. भोळी.–२१ त. नागवेल –२२ पं. ठकला.–२३ पं. एक गेले पुढ.–२४ दे. त. ठक.–२५ पं. ठकला.–२६ त. पाट –२७ पं. नागवले.–२८ दे. दरुशन. त. दरुषण –२९ त. पड्कर्मी.–३० पं. सत्य.–३१ दे. आवडे.

चांडाळा करुनि मानी ॥ ८० ॥ मानियेला[1] नाहीं विश्वासें या बोला । नाम घेतां मला युक्ति[2] थोडी ॥ ८१ ॥ युक्ति[3] थोडी मज दुर्बळाची वाचा । प्रताप नामाचा बोलावया ॥ ८२ ॥ बोलतां पांगल्या श्रुति नेति नेति । खुंटलिया युक्ति पुढें त्यांच्या[4] ॥८३॥ पुढें[5] पार त्याचा न कळे चि जातां । पाउलें देखतां ब्रह्मादिकां ॥८४॥ काय भक्तीपिसें[6] लागलें देवासी । इच्छा ज्याची जैसी तैसा होय ॥ ८५ ॥ होय हा सगुण निर्गुण आवडी । भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥८६॥ या[7] बापासी बाळ बोले लाडें कोडें । करुनि वांकुडें मुख तैसें ॥८७॥ तैसें याचकाचें समाधान दाता । होय हा राखता सत्त्वकाळीं[8] ॥८८॥ सत्त्वकाळीं कामा न येती आयुधें । बळ[9] हा संबंध सैन्यलोक ॥८९॥ सैन्यलोक तया दाखवी प्रताप । लोटला हा कोप कोपावरी ॥९०॥ कोपा मरण नाहीं शांत होय त्यासी । प्रमाण भल्यासी सत्त्वगुणीं[10] ॥ ९१ ॥ सत्त्वरजतम[11] आपण नासती । करितां हे[12] भक्ति विठोबाची ॥ ९२ ॥ चित्त रंगलिया चैतन्य चि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥९३॥ सुखाचा सागरु आहे विटेवरी । कृपादान करी तो चि एक ॥ ९४ ॥ एक चित्त धरूं विठोबाचे पायीं । तेथें उणें कांहीं एक आह्मां ॥ ९५ ॥ आह्मांसी विश्वास याचियाँ[13] नामाचा । ह्मणउनि वाचा घोष करूं ॥ ९६ ॥ करूं हरिकथा सुखाची समाधि । आणिकाची बुद्धि दुष्ट नासे[14] ॥ ९७ ॥ नासे संवसार लोकमोहो माया । शरण जों[15] रे तया विठोबासी ॥ ९८ ॥ सिकविलें मज मूढा संतजनीं । दृढ या वचनीं राहिलोंसें ॥ ९९ ॥ राहिलोंसें दृढ विठोबाचे पायीं । तुका ह्मणे कांहीं न लगे आतां ॥ १०० ॥

४५०६. गाईन ओंविया पंढरिचा देव । आमुचा तो जीवें[16] पांडुरंग ॥ १ ॥ रंगलें हें चित्त माझें तया पायीं । ह्मणउनि[17] येई हा चि लाहो ॥ २ ॥ लाहो करीन मी हा चि संवसारीं । राम कृष्ण हरि नारायण ॥ ३ ॥ नारायण नाम घालितां तुकासी । न येती या रासी तपतीर्थें ॥ ४ ॥ तीर्थें रज[18] माथां वंदिती संतांचे । जे गाती हरिचे गुणवाद ॥ ५ ॥ गुणवाद ज्याचे गातां पूज्य जाले । वदिन्नौरें[19] बोले कोण त्यांचा ॥ ६ ॥ त्याचा नाहीं पार[20] कळला वेदांसी । आणीक ही ऋपि विचारितां ॥ ७ ॥ विचारितां तैसा होय त्यांच्या भावें । निजसुखें[21] टावें नाहीं

१ दे. मानियेल्या.–२ पं. उधार –३ दे. युक्त.–४ पं. त्यांची.–५ पं. त्याचा पार पुढें न कळे०.–६ पं. भक्तपिसें –७ पं. मायबापासी बाळ बोले लाडें ।.–८ पं. 'सत्त्वकाळीं' याबद्दल 'सर्वकाळी' असें नवीन केलें आहे, ती चूक आहे –९ पं. 'बळ' याबद्दल 'न्मेद्री'.–१० पं. सत्त्वगुण.–११ दे. सत्त्वरजतमा.–१२ पं. या –१३ पं. त्याचिया.–१४ दे. नास –१५ पं. जातां या०.–१६ पं. भाव –१७ पं. ह्मणोनियां.–१८ पं. माया रज.–१९ त. बटिभार.–२० त. अन –२१ पं. निजरुप.

कोणा ॥ ८ ॥ कोणा कवतुक न कळे हे माव । निजलिया जीवें[1] करी धंदा ॥ ९ ॥ करुनि कवतुक खेळे हा चि लीळा । व्यापूनि वेगळा पाहातसे[2] ॥ १० ॥ सेवटीं आपण एकलाँ[3] चि खरा । सोंग हा पसारा नट केला ॥ ११ ॥ लाँवियेलें[4] चाळा मीपणें हें जन । भोग तैया[5] कोण भोगविशी ॥ १२ ॥ विषयीं गुंतलीं विसरलीं तुज । कन्या पुत्र भाज धनलोभें[6] ॥ १३ ॥ लोभें गिळी फांसा आमिषाच्याँ[7] आशा । सांपडोनि[8] मासा तळमळी ॥ १४ ॥ तळमळ यांची[9] तरी[10] शम होईल । जरी हा विठ्ठल आठविती ॥ १५ ॥ आठवे[11] हा तरी संतांच्या सांगातें[12] । किंवा हें संचित जन्मांतर[13] ॥ १६ ॥ जन्मांतरें तीन भोगितां कळती । केलें तें पावती करितां[14] पुढें ॥ १७ ॥ पुढें जाणोनियां करावें संचित । पुजावे अतीत देव द्विज ॥ १८ ॥ जन्म तुटे ऐसें नव्हे तुह्मां जना । पुढिल्या पावना धर्म करा ॥ १९ ॥ करा जप तप अनुष्ठान याग । संतीं हीं[15] मारग स्थापियेला ॥ २० ॥ लावियेलीं कर्मे शुद्ध आचरणें । कोणें[16] एका तेणें काळें पावे ॥ २१ ॥ पावला[17] सत्वर निष्काम उदार । जिंकिली अपार वासना हे ॥ २२ ॥ वासनेचें मूळ छेदिल्या वांचून । तरलोंसें[18] कोणी न ह्मणावें ॥ २३ ॥ न ह्मणावें जाला पंडित वाचक । करो[19] मंत्रघोष अक्षरांचा ॥ २४ ॥ चाळविलीं एकें ते चि आवडीनें । लोक दंभमानें देहसुखें ॥ २५ ॥ सुख तरी चैं[20] घडे भजनाचें सार । वाचे निरंतर रामनाम ॥ २६ ॥ राम हा उच्चार तरी च वैसे वाचे । अनंता जन्माचें पुण्य[21] होय ॥ २७ ॥ पुण्य ऐसें काय[22] रामनामापुढें । काय ते बापुडे यागयज्ञ ॥ २८ ॥ यागयज्ञ तप संसार दायकें । न तुटती एके नामेंविण ॥ २९ ॥ नामेंविण भवसिंधु पावे पार । ऐसा[23] विचार नाहीं दुजा ॥ ३० ॥ जाणती हे भक्तराज महामुनि । नाम सुखधणी अमृताची ॥ ३१ ॥ अमृताचें सार निजतत्त्व बीज । गुह्याचें तें गुज रामनाम ॥ ३२ ॥ नामें असंख्यात तारिले अपार । पुराणीं हें सार प्रसिद्ध हे ॥ ३३ ॥ हें चि सुख आह्मी घेऊं सर्वकाळें[24] । करूनि निर्मळ हरिकथा ॥ ३४ ॥ कथाकाळीं लागे सकळा समाधि । तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ॥ ३५ ॥ नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया । गातां गुण तया विठोबाचे ॥३६॥ विठोबाचे गुण मज आवडती । आणीक हे चित्तीं न लगे

१ दे. जिवें.–२ दे. त पाहातुसे–३ पं. वेगळा–४ पं. लावियेला–५ पं. तयाकुना.–६ दे. धनलोभा.–७ दे. त. आविसाच्या. पं. आविशाच्या–८ दे. पडोनि. त. पडोनिया.–९ पं. त्याची.–१० पं. तरीच शमेल ।–११ दे. आठव. पं. अठवे हा देव.–१२ पं. सांगात.–१३ दे. जन्मांतरें.–१४ पं. करी.–१५ पं. हे मारग स्थापियेले.–१६ पं. कोण्यायेक्या जन्मे केलें पावो.–१७ पं. पावेल.–१८ दे. तरलेंसें.–१९ दे. करू. पं. करुनि.–२० पं. 'च' नाहीं–२१ पं. होय पुण्य–२२ पं. कोण.–२३ पं. ऐसा हा.–२४ दे. सदाकाळ.

कांहीं ॥ ३७ ॥ कांहीं कोणी नका सांगों हे[1] उपाव। माझ्या[2] मनीं भाव नाहीं दुजा ॥ ३८ ॥ जाणोनियां आह्मी दिला जीवभाव। दृढ याचे पांव[3] धरियेले ॥ ३९ ॥ धरियेले आतां न सोडीं जीवेंसी। केलों[4] ये च विशीं निरधार ॥ ४० ॥ निरधार आतां[5] राहिलों ये नेटीं। संवसारतुटी करूनियां ॥ ४१ ॥ येणें अंगीकार केला पाडुरंगें। रंगविलों[6] रंगें आपुलिया ॥ ४२ ॥ आपुली पाखर घालुनियां वरि। आह्मांसी तो करी यत्न देव ॥ ४३ ॥ देव राखे तया आणिकांचें काय। करितां उपाय चाले तेथें ॥४४॥ तेथें नाहीं रिघ कळिकाळासी जातां[7]। दास ह्मणवितां विठोबाचे ॥४५॥ विठोबाचे आह्मी लाडिके डिंगर। कांपती असुर काळ धाकें ॥ ४६ ॥ धाक तिहीं लोकीं जयाचा दरारा। स्मरण हें करा त्याचें तुह्मी ॥ ४७ ॥ तुह्मी निदसुरें[8] नका राहूं कोणी। चुकावया[9] खाणी गर्भवास ॥ ४८ ॥ गर्भवासें[10] दुःख यमाचें दंडणें[11]। थोर होय शीण येतां जातां ॥ ४९ ॥ तान भूक पीडा जीतां ते आघात। मेल्या यमदूत जाच करिती ॥ ५० ॥ जाच[12] करिती हें कोणा आहे ठावें। नरकीं कौरवें बुडी दिली ॥ ५१ ॥ बुडी दिली कुंभपाकीं दुर्योधनें। दाविना लाजेनें मुख धर्मा ॥ ५२ ॥ धर्म हा कृपाळु आलासे जवळी। बैसला पाताळीं वरि नये ॥ ५३ ॥ न ये वरि कांहीं करितां उपाव। भोगवितो देव ज्याचें[13] त्यासी ॥ ५४ ॥ त्यांसी अभिमान गर्व या देहाचा। नुच्चारिती वाचा नारायण ॥ ५५ ॥ नारायण विसरलीं[14] संवसारीं। तयांसी[15] अघोरीं वास सत्य ॥ ५६ ॥ सत्य मानूनियां संतांच्या वचना। जा रे नारायणा शरण तुह्मी ॥ ५७ ॥ तुह्मी नका मानूं कोणी[16] विसवास। पुत्र पत्नी आस धन वित्त ॥ ५८ ॥ धन वित्त लोभ माया मोहपाश। मांडियले फांसे[17] यमदूतीं ॥ ५९ ॥ दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण। वाचे नारायण येऊं नेदी ॥ ६० ॥ नेदी शुद्धबुद्धि आतळों चित्तासी। नाना कर्मे[18] त्यासी दुरावती ॥ ६१ ॥ दुराविलीं एकें[19] जाणतीं च फार। निंदा अहंकार वादभेद ॥ ६२ ॥ वाद भेद निंदा हे फंद काळाचे[20]। गोवितील वाचे रिकामिके[21] ॥ ६३ ॥ रिकामिक देवा होय नव्हे[22] मना। चिंतेचिये[23] घाणा जुंपिजेसी ॥ ६४ ॥ सेवटीं हे गळा लावुनियां दोरी। सांभाळ ये करीं[24] वासनेचा ॥ ६५ ॥ वासनेचा संग होय अंतकाळीं। तरी तपोवळी जन्म धरी ॥ ६६ ॥ धरूनियां देव राहतील चित्तीं।

---

१ पं. हा.—२ दे. त. माझा.—३ दे. पाये.—४ पं. केला हा सेवेसी निरधार.—५ पं. आह्मी.—६ दे. रगविला.—पं. रंगविलें.—७ पं. येता.—८ पं. निदसुरे.—९ पं. चुक्वा जाचणी गर्भवास।.—१० पं. गर्भवा·ीं.—११ दे. दडणें—१२ दे. जाच करिती हे ह्मणसी कोणा।०.—१३ दे. त्याचें. पं. तो चि.—१४ पं. जीवी विसरे ससारीं.—१५ दे. तया.—१६ पं. कोणाचा विश्वास.—१७ दे. त. फासे.—१८ दे. पं. कर्म.—१९ पं. एक.—२० दे. त. काळाचें.—२१ पं. रिकामिक—२२ पं. नाहं.—२३ पं. चितेच्चिया घाणा जुपियेलें।—२४ दे. त. पं. करी.

आर्धीचिया गती आठवायो ॥ ६७ ॥ आठवावा देव मरणाचे काळीं । म्हणउनि बळी जीव दिले[2] ॥ ६८ ॥ दिले टाकूनियां भोग ऋषेश्वरीं । खाती वनांतरीं कंदमूळें ॥ ६९ ॥ मुळें सुखाचिया देव अंतरला । अल्पासाटीं नेलों[3] अधोगती ॥ ७० ॥ गति हे उत्तम व्हावया उपाव । आहे धरा पाव विठोबाचे ॥ ७१ ॥ विठोबाचे पायीं राहिलिया भावें । न लगे कोठें जावें वनांतरा ॥ ७२ ॥ तरती दुबळीं विठोबाच्या नांवें । संचित ज्या सर्वे नाहीं शुद्ध ॥ ७३ ॥ शुद्ध[4] तेरे याचें काय तें नवल । म्हणतां विठ्ठल वेळोवेळां ॥ ७४ ॥ वेळों कांहीं नाहीं कवणाचे हातीं । न कळे हे[6] गति भविष्याची ॥ ७५ ॥ भविष्य न सुटे भोगिल्यावांचूनि । संचित जाणोनि शुद्ध करा ॥ ७६ ॥ करावे सायास आपुल्या हिताचे । येथें आलियाचे[7] मनुष्यपण ॥ ७७ ॥ मनुष्यपर्णे तरी[8] साधी नारायण । नाहीं तरी हीन पशुहूनी ॥ ७८ ॥ पशु पाप पुण्य काय ते[10] जाणती । मनुष्या या गति ठाउकिया ॥ ७९ ॥ ठाउकें हें[11] असे पाप पुण्य लोका । देखेंती[12] ते एकां भोगितिया ॥ ८० ॥ भोगतील एक दुःख संवसारीं[13] । काय सांगों परी वेगळाल्या ॥ ८१ ॥ ल्यावें खावें बरें असावें सदैव । हे चि करी हांव संवसारीं[14] ॥ ८२ ॥ संवसारें[15] जन गिळिले सकळें[16] । भोगवितो[17] फळें[18] गर्भवासा ॥ ८३ ॥ वासनेचें मूळ छेदिल्यावांचून । नव्हे[19] या खंडण गर्भवासा ॥ ८४ ॥ सायास केलियावांचुनि तें[20] कांहीं । भोगावरी पोंहीं[21] घालूं नये ॥ ८५ ॥ नये बळें धड घालूं कांव्यावरि । जाये जीवें धरी सर्प हातीं ॥ ८६ ॥ हातीं[22] आहे हित करिल तयासी । म्हणउनि ऋषीं सांगितलें ॥ ८७ ॥ [23]सांगती या लोकां फजित करूनि । आपण जे कोणी तेरले[24] ते ॥ ८८ ॥ तेणें[25] वाळवंटीं उभारिले कर । कृपेचा सागर पांडुरंग ॥ ८९ ॥ गंगाचरणीं करी पातकांची धुनी । पाउलें तीं मनीं चिंतिलिया ॥ ९० ॥ चिंतनें जयाच्या तेरिले[26] पाषाण । उद्धरी[27] चरण लावूनियां ॥ ९१ ॥ लावूनियां टाळी नलगे बैसावें । प्रेमसुख घ्यावें संतसंगें ॥ ९२ ॥ संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें साधन रामराम[28] ॥ ९३ ॥ मग[29] कोठें देव जाऊं नें[30] सके दुरी । बैसोनि भीतरी राहे कंठीं ॥ ९४ ॥ राहे व्यापुनियां सकळ शरीर । आपुला विसर पडों नेदी ॥ ९५ ॥ नेदी दुःख देखों आपुलिया दासा । वारी गर्भवासा यमदूता ॥ ९६ ॥

१ त. आठवाव्या. पं. अठवितां.–२ पं. दिल्हा.–३ पं. गेला.–४ दे तरी याचे. पं. तरायाचें–५ पं. वेळकाळ नाहीं विठोबाचे हातीं ।–६ त. या.–७ पं. नरपण.–८ पं. नरपणें.–९ पं. साधे–१० त. तीं. पं. हे.–११ पं. आहे–१२ पं. देखतिल एका०.–१३ पं. ससारीं.–१४ पं. संसाराची–१५ पं. संसारे.–१६ त. सगळे–१७ पं. भोगतील.–१८ त. पं. फळे.–१९ पं. नव्हे चि खंडण.–२० पं. नाहीं.–२१ पं. काई.–२२ पं. हित आहे.–२३ पं. सांगितलें.–२४ त. तरले जे.–२५ पं. जेणें.–२६ त. तरले. पं. तरती.–२७ पं. उद्धरिले–२८ पं. रामनाम–२९ पं. मग देव कोठें–३० पं. "न" नाहीं.

तान भूक त्यासी वाहों नेदी चिंता । दुश्चित हे घेतां नाम होती ॥ ९७ ॥ होती जीव त्यांचे सकळ ही जंत । परि ते अंकित संचितीचें ॥ ९८ ॥ चेवले जे कोणी देहअभिमानें । त्यांसी नारायणें कृपा केली ॥ ९९ ॥ कृपाळू हा देव अनाथा कोंवसा । आह्मी त्याच्या आशा लागलोंसों ॥ १०० ॥ लावियेले कांसे येणें पांडुरंगें । तुका ह्मणे संगें संतांचिया ॥ १०१ ॥

४५०७. विचार करिती बैसोनि गौळणी । ज्या कृष्णकामिनी कामातुरा ॥ १ ॥ एकांत एकल्या एका[3] च सुखाच्या । आवडती त्यांच्या गोष्टी त्यांग ॥ २ ॥ तर्कवितर्किणी दुराविल्या दुरी । मौन त्यां[4] परिचारी आरंभिलें ॥ ३ ॥ कुशळा कवित्या कथित्या लोभिका । त्याही येथें नका आह्मांपाशीं ॥ ४ ॥ बोलक्या वाचाळा कृष्णरता नाहीं । यां चोरोनि तींहीं खेट केली ॥ ५ ॥ भेऊनियां[5] जना एकी सवा जाल्या । वाती विझविल्या दाटोबळें ॥ ६ ॥ कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं । निंदिती त्या त्यासी कृष्णरता ॥ ७ ॥ तो नये जवळी देखोनि कोल्ह.ळ । ह्मणउनि समेळ मेळविला ॥ ८ ॥ अंतरीं कोमळा बाहेरी निर्मळा । तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं ॥ ९ ॥ हरिरूपीं दृष्टि कानीं त्या च गोष्टी । आळंगिती कंठीं एका एकी ॥ १० ॥ न साहे वियोग करिती रोदना । भ्रमिष्ट भावना देहाचिया ॥ ११ ॥ विसरल्या मागें गृह सुत पती । अवस्था याचिती गोविंदाची ॥ १२ ॥ अवस्था लागोनि निवळ चि ठेल्या । एका एकी जाल्या कृष्णरूपीं[6] ॥ १३ ॥ कृष्णा[7] ह्मणोनियां देती आलिंगन । विरहताप तेणें निवारेना ॥ १४ ॥ ताप कोण वारी गोविंदावांचूनि । साच तो नयनीं न देखतां ॥ १५ ॥ न देखतां त्यांचा प्राण रिघों पाहे । आजि कामास ये उसिर केला[8] ॥ १६ ॥ रित्या ज्ञानगोष्टी तयां नावडती । आळिंगण प्रीती कृष्णाचिया ॥ १७ ॥ मागें कांहीं आह्मी चुकलों त्याची[9] सेवा । असेल या देवा राग आला ॥ १८ ॥ आठविती मागें पापपुण्यदोष । परिहार एकीस एक देती ॥ १९ ॥ अनुतापें जाल्या संतप्त त्या बाळा । टाकुनि[10] विव्हळा धरणी अंग ॥ २० ॥ जाणोनि चरित्र जवळी च होता । आली त्या अनंता कृपा मग ॥ २१ ॥ होउनी प्रगट दाखविलें रूप । तापत्रय ताप निववीले ॥ २२ ॥ निवालेयां[11] देखोनि कृष्णाचें श्रीमुख । शोक मोह दुःख दुरावला ॥ २३ ॥ साच भाव त्यांचा आणुनियां मना । आळंगितो राणा वैकुंठींचा ॥ २४ ॥ हरिअंगसंगें हरिरूप जाल्या । बोलों विसरल्या तया सुखा ॥ २५ ॥ व्यभिचारभावें भोगिलें अनंता । वर्तोनि असतां घराचारी ॥ २६ ॥

---

१ त. सचितांचें.–२ पं. आशे.–३ पं. एकाच्या सुखाच्या –४ त. मौन्य त्यापरि चोरी.–५ पं. त्या चोरोनियां.–६ पं. कृष्णरूर.–७ पं. कृष्ण.–८ पं. जाला.–९ त. यांची.–१० पं. टाकिती वेल्हाळा.–११ पं. 'या' नाहीं.

सकळा चोरोनि हरि जयां चित्तीं । धन्य त्या नांदती तयामध्यें ॥ २७ ॥ उणें पुरें त्यांचें पडों नेंदी कांहीं । राखे सर्वां ठायीं देव तयां ॥ २८ ॥ न कळे लाघव ब्रह्मादिकां भाव । भक्तिभावें देव केला तैसा ॥ २९ ॥ तुका ह्मणे त्यांचा धन्य व्यभिचार । साधिलें अपार निजसुख ॥ ३० ॥

## बाळक्रीडा प्रारंभ अभंग—१००.

४५०८. देवा आदिदेवा जगत्रयजीवा[2] । परियेसीं केशवा विनंती माझी ॥ १ ॥ माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम । ऐसें[3] देईं प्रेम कांहीं कळा ॥ २ ॥ कळा तुजपाशीं आमुचें जीवन । उचित करून देईं आह्मां ॥ ३ ॥ आह्मां शरणागतां तुझा चि आधार । तूं तंव सागर कृपासिंधु ॥ ४ ॥ सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जाळीं[4] महाकर्में दुस्तरें तीं ॥ ५ ॥ तीं[5] फळें उत्तमें तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ॥ ६ ॥ सेविलिया राम कृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ॥ ७ ॥ संसार तें काय तृणवतमय । अग्नि त्यासी खाय क्षणमात्रें ॥ ८ ॥ क्षणमात्रें जाळी दोषांचिया रासी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ॥ ९ ॥ करीं ब्रिदें[6] साच आपलीं आपण । पतितपावन दिनानाथ ॥ १० ॥ नाथ अनाथाचा पति[7] गोपिकांचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ॥ ११ ॥ चित्तीं जें धरावें तुका ह्मणे दासीं । पुरविता होसी मनोरथ ॥ १२ ॥

४५०९. मनोरथ जैसे गोकुळींच्या जना । पुरवावी वासना तयापरी ॥ १ ॥ रिण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी ॥ २ ॥ सीण जाला वसुदेवदेवकीस । वधी बाळें[8] कंस दुराचारी ॥ ३ ॥ दुराचारियासी नाहीं भूतदया । आप पर तया पाप पुण्य ॥ ४ ॥ पुण्यकाळ त्याचा राहिलासे उभा । देवकीच्या गर्भा देव आले ॥ ५ ॥ गर्भासी तयांच्या आला नारायण । तुटलें[9] बंधन आपेंआप ॥ ६ ॥ आपेंआप बेड्या तुटल्या शृंखळीं[10] । वंदाच्या आगळीं[11] किलिया कोंडे ॥ ७ ॥ कोंडमार केला होता बहु[12] दिस । सोडवी निमिष्य नलगतां ॥ ८ ॥ न कळे तो त्यांसी[13] सांगितला भाव । आपणासी ठाव नंदाघरीं ॥ ९ ॥ नंदाघरीं जातां येतां वसुदेवा । नाहीं जाला गोवा सर्वें देव ॥ १० ॥ सर्वें देव तया आड नये कांहीं । तुका ह्मणे नाहीं भय चिंता ॥ ११ ॥

---

१ पं. सखे—२ त. जनत्रयजीवा. दे. जगत्रया जीवा.—३ दे. ऐसी.—४ पं. जळतील कर्म दुस्तर तें.—५ पं. ते फळ उत्तम. त. तीं फळें उत्तम.—६ पं. ब्रीद साच आपुलें.—७ त. गोपिकांचा पति.—८ त. पं. बाळ—९ पं. तुटलीं बंधनें—१० दे. त. शंकळा.—११ पं. आगळा किल्यंकडि.—१२ त. बहुत दिवस.—१३ पं. तया.

४५१०. चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरी केला देवें ॥ १ ॥ देव आला घरा नंदाचिया गांवा । धन्य त्याच्या दैवा दैव आलें ॥ २ ॥ आलें अविनाश धरूनि आकार । दैत्याचा संहार करावया ॥ ३ ॥ करावया भक्तजनाचें पालण । आले रामकृष्ण गोकुळासी ॥ ४ ॥ गोकुळीं आनंद प्रगटलें सुख । निर्भर हे[1] लोक घरोघरीं ॥ ५ ॥ घरोघरीं जाला लक्षुमीचा[2] वास । दैन्यदारिद्रास[3] त्रास आला ॥ ६ ॥ आला नारायण तयांच्या अंतरा । दया क्षमा नरा नारीलोकां ॥ ७ ॥ लोकां गोकुळींच्या जालें ब्रह्मज्ञान । केलियावांचून जपतपें[4] ॥ ८ ॥ जपतपें काय करावीं साधनें । जंवें नारायणें कृपा केली ॥ ९ ॥ केलीं नारायणें आपुलीं अंकित । तो चि त्यांचें हित सर्व जाणे ॥ १० ॥ सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाहींनाहीं ॥ ११ ॥ नाहीं भक्ता दुजें तिहीं त्रिभुवनीं । एका चक्रपाणीवांचूनियां ॥ १२ ॥ याच्या[5] सुखसंगें घेती गर्भवास । तुका ह्मणे आस त्यजूनियां ॥ १३ ॥

४५११. यांच्या[6] पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारी खेळविला ॥ १ ॥ खेळविला जिहीं अंतर्बाह्यसुखें । मेळवूनि मुखें चुंबन दिलें ॥ २ ॥ दिलें त्यांसी[7] सुख अंतरीचें देवें । जिहीं एका भावें जाणितला ॥ ३ ॥ जाणितला तिहीं कामातुरें[8] नारी । कृष्णभोगावरी चित्त ज्यांचें ॥ ४ ॥ ज्यांचें कृष्णीं तन मन जालें रत । गृह[9] पति सुत विसरल्या ॥ ५ ॥ विष तयां जालें धन मान जन । वसविती वन एकांतीं[10] त्या ॥ ६ ॥ एकांतीं त्या जाती हरीसी घेऊनि । भोगइच्छाधणी फेडावया ॥ ७ ॥ वयाच्या संपन्ना तैसा त्यांकारणें । अंतरींचा देणें इच्छाभोग ॥ ८ ॥ भोग त्याग नाहीं[11] दोन्ही जयापासीं । तुका ह्मणे जैसी स्फटिकशिळा ॥ ९ ॥

४५१२. शिळा स्फटिकाची न पालटे भेदें[12] । दाऊनियां छंदें[13] जैसी तैसी ॥ १ ॥ जैसा केला तैसा होय क्षणक्षणा । फेडावी वासना भक्तिभावें ॥ २ ॥ फेडावया आला अवघियांची धणी । गोपाळ गौळणी मायबापा ॥ ३ ॥ मायबापा सोडविलें बंदीहुनि । चाणूर मर्दुनी कंसादिक ॥ ४ ॥ दिक नाहीं देणें अरिमित्रा एक । पूतना कंटक मुक्त केली ॥ ५ ॥ मुक्त केला मामा कंस महादोषी । बाळहत्या रासी पातकांच्या ॥ ६ ॥ पाप कोठें राहे हरी आठवितां । भक्ती द्वेषें चिंता जैसा तैसा ॥ ७ ॥ साक्षी तयापाशीं पूर्वीलकर्माच्या । बांधला सेवेच्या ॠणें[14] देव ॥ ८ ॥

१ पं. ते–२ दे. लक्ष्मीचा.–३ दे. ०दाळिद्रास. पं. ०दारिद्यास–४ त. जपतप.–५ पं. जे त्या.–६ पं. त्याच्या.–७ पं. त्याच्या–८ पं. सुख त्यांसी.–९ पं. कामातुरा.–१० दे. त. पं. ग्रह.–११ त. एकांत.–१२ दोन्ही नाहीं.–१३ पं. भेद.–१४ पं. छंद.–१५ दे. ऋणी. त. पं. ऋणें.

देव भोळा धांवे भक्ता पाठोवाठी । उच्चारितां कंठीं मार्गेमार्गें ॥ ९ ॥ मानाचा कंटाळा तुका ह्मणे त्यासी । [1]धांवे तो घरासी भाविकांच्या ॥ १० ॥

४५१३. चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणिती । बांधवी तो हातीं गौळणीच्या ॥ १ ॥ गौळणिया गळा बांधिती धारणीं । पायां चक्रपाणी लागे तया ॥ २ ॥ तयाघरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतूनि शिरे माजी ॥ ३ ॥ माजी शिरोनियां नवनीत खाये । कवाड तें आहे जैसें तैसें ॥ ४ ॥ जैसा तैसा आहे अंतर्बाह्यात्कारीं । ह्मणउनि चोरी नसंपडे ॥ ५ ॥ नसंपडे तयां करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ ६ ॥ वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसतील वाटा निरोधूनि ॥ ७ ॥ निवांत राहिल्या निःसंग होऊनि । निश्चळ [2]ज्या ध्यानीं [3]कृष्णध्यान ॥ ८ ॥ न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणी भाविका त्या ॥ ९ ॥ भाविका तयांसी येतो काकुलती । शाहाण्या मरती नसंपडे ॥ १० ॥ नलगे वेचावी टों[4]ली धनानांवें । तुका ह्मणे भावें चाड एका ॥ ११ ॥

४५१४. चाड अनन्याची धरी नारायण । आपणासमान करी रंका ॥ १ ॥ रंक होती राजे यमाचिये घरीं । आचरणें बरीं नाहीं ह्मूणें ॥ २ ॥ नसंपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां । [6]अभिमानें एका तिळमात्रें ॥ ३ ॥ तिळमात्र जरी होय अभिमान । मेरु तो समान भार देवा ॥ ४ ॥ भार पृथिवीचा वाहिला सकळ । जड होती खळ दुष्ट लोक ॥ ५ ॥ दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ॥ ६ ॥ [8]यमदूत त्यांसी करिती यातना । नाहीं नारायणा भजिजेलें ॥ ७ ॥ जे [9]नाहीं भजले एका भावें हरी । तयां दंड करी यमधर्म ॥ ८ ॥ यमधर्म ह्मणे तयां दोषियांसी । कां रे केशवासी चुकलेती ॥ ९ ॥ चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुह्मां कान डोळे मुख ॥ १० ॥ कान डोळे मुख संतांची संगति । न धरा च चित्तीं सांगितलें ॥ ११ ॥ सांगितलें संतीं तुह्मां उगवूनि । [10]गर्भासी येऊनि यमदंड ॥ १२ ॥ दंडूं आह्मीं रा ह्मणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनाचा ॥ १३ ॥ दुर्जनाचा येणें[11] करूनि संहार पूर्णअवतार रामकृष्ण ॥ १४ ॥ रामकृष्णनामें रंगले जे नर । तुका ह्मणे घ वैकुंठीं त्यां ॥ १५ ॥

४५१५. वैकुंठींच्या लोकां दुर्लभ हरिजन । तया नारायण समागमें ॥ १ ॥ समागम त्यांचा धरिला अनंतें । जिहीं[12] चित्तवित्तें[13] समर्पिलें ॥ २ ॥ [14]समर्थ त

१ त. पं. धांवतो.—२ पं. त्या ध्यानीं.—३ त. कृष्णध्यानें.—४ दे. टोळी.—५ दे. ह्मणवोनि. पं. ह्मणोनी.—६ पं. अभिमान.—७ त. यमपुरी.—८ त. जे भजले. पं. भजले जे —९ पं. नाहीं जे — १० त. गर्भांद. दे. 'गर्भाद' असतां 'गर्भासी' केलें आहे.—११ दे. याणें.—१२ त. जीं त्या.— १३ त. चित्तवित्तें —१४ पं. समर्थ ते.

गातीं हरीचे पवाडे । येर ते बापुडे रावराणे ॥ ३ ॥ रामकृष्णें केलें कौतुक गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारी ॥ ४ ॥ गाई चारी मोहोरी पांवा वाहे पाठीं । धन्य जाली काठी कांवळी ते ॥ ५ ॥ काय गौळियांच्या होत्या पुण्यरासी । आणीक त्या हैसी गाई पशु ॥ ६ ॥ सुख तें अमुप लुटिलें सकळीं । गोपिका गोपाळीं धणीवरि ॥ ७ ॥ धणीवरि त्यांसी सांगितली मात । जैयाचें जें आर्त तयापरी ॥ ८ ॥ परी यैांचें तुह्मी आइका नवळ । दुर्गम जो खोल साधनासि ॥ ९ ॥ शिक लावूनियां घालिती बाहेरी । पाहाती भीतरी सर्वे चि तो ॥ १० ॥ तोंडाकडे त्यांच्या पाहे कवतुकें । शिव्या देतां सुखें हांसतसे ॥ ११ ॥ हांसतसे शिव्या देतां त्या गौळणी । मरतां जपध्यानीं न बोले तो ॥ १२ ॥ तो जेंजें करिल तें दिसे उत्तम । तुका ह्मणे वर्म दावी सोपें ॥ १३ ॥

४५१६. दावी वर्म सोपें भाविकां गोपाळां । वाहे त्यांच्या गळां पाले माळा ॥ १ ॥ मान देती आधीं मागतील डाव । देवा तें[11] गौरव माने सुख ॥ २ ॥ मानती ते मंत्र ह्मामा हुंबरी । सिंतोडिती वरि स्नान तेणें ॥ ३ ॥ वस्त्रें घोंगडिया घालुनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ४ ॥ तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना । तो धांवे गोधना वळतियां ॥ ५ ॥ यांच्यैा वचनाचीं पुष्पें वाहे शिरीं । नैवेद्य त्यांकरीं कवळ मागे ॥ ६ ॥ त्यांचिये मुखींचें हिरोनियां घ्यावें । उच्छिष्ट तें खावें धणीवरी ॥ ७ ॥ वरी माथां गुंफे मोरपिसांवेटी[13] । नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ॥ ८ ॥ छंदें नाचतील जयासवें हरी । देहभाव वरी विसरलीं ॥ ९ ॥ विसरली वरी देहाची भावना । ते चि नारायणा सर्वपूजा ॥ १० ॥ पूजा भाविकांची न कैळतां घ्यावी । न मागतां दावी निज ठाव ॥ ११ ॥ ठाव पैांवावया हिंडे मागें मागें । तुका ह्मणे संगें भक्तांचिया ॥ १२ ॥

४५१७. भक्तजनां दिलें निजसुख देवें । गोपिका त्या भावें आळंगिल्या ॥ १ ॥ आळंगिल्या गोपी गुणवंता नारी । त्यांच्या जन्मांतरीं हरि ऋणी ॥ २ ॥ रुसलिया त्यांचें करी समाधान । करविता आँण क्रिया करी ॥ ३ ॥ क्रिया करी तुह्मां न वजे पासुनि । अवघियाजणीं गोपिकांसी ॥ ४ ॥ गोपिकांसी ह्मणे वैकुंठींचा पति ।

---

१ त. चरित्र –२ त. वाये.–३ त. जाले.–४ त. 'कांवळीचे' दे. 'कांवळीचें' असतां 'कावळीतें' केलें आहे.–५ दे. 'गोपिका गोपाळीं' असतां 'गोपिका गौळणी' केलें आहे –६ पं. ज्याचें जैसें आर्त०.–७ दे. याचि. त. याची.–८ दे. त. हासतुसे.–९ पं. वर्म दावी –१० पं. मागती ते डाव –११ पं. तो.–१२ पं. त्यांच्या –१३ त. मोरविसांवेठीं.–१४ पं. कळून.–१५ पं. पाहावया.–१६ पं. आपण.

तुह्मीं माझ्या चित्तीं सर्वभावें ॥ ५ ॥ भाव जैसा माझ्याठायीं[1] तुह्मी धरा । तैसा
चि मी खरा तुह्मांलागीं ॥ ६ ॥ तुह्मां[2] कळों द्या हा माझा साच भाव । तुमचा
चि जीव तुह्मां ग्वाही ॥ ७ ॥ ग्वाही तुह्मां आह्मां असे नारायण । आपली च
आण वाहातसे ॥ ८ ॥ सत्य बोले देव भक्तिभाव जैसा । अनुभवें[3] रसा
आणूनियां ॥ ९ ॥ यांसी बुझावितो वेगळाल्या भावें । एकीचें हें[4] ठावें नाहीं
एकी ॥ १० ॥ एकी क्रिया नाहीं आवघियांचा भाव । पृथक हा देव घेतों[5]
तैसें ॥ ११ ॥ तैसें कळों नेदी जो मी कोठें नाहीं । अवघियांचे ठायीं जैसा
तैसा ॥ १२ ॥ जैसा मनोरथ जये चित्तीं काम । तैसा मेघश्यामें[6] पुरवितो ॥ १३ ॥
पुरविले मनोरथ गोपिकांचे । आणीक लोकांचे गोकुळींच्या ॥ १४ ॥ गोकुळींच्या
लोकां लावियेला छंद । वैसला गोविंद त्यांचे[7] चित्तीं ॥ १५ ॥ चित्तें[8] ही चोरूनि
घेतलीं सकळा । आवडी गोपाळांवरी तयां ॥ १६ ॥ आवडे[9] तयांसी वैकुंठनायक ।
गेलीं सकळिक विसरोनि ॥ १७ ॥ निंदा स्तुती कोणी न करी कोणाची । नाहीं
या देहाची शुद्धि कोणा ॥ १८ ॥ कोणासी नाठवे कन्या पुत्र माया । देव
ह्मणुनि[10] तया चुंबन देती ॥ १९ ॥ देती[11] या टाकून भ्रतारांसी घरीं । लाज
ते[12] अंतरीं आथी च ना ॥ २० ॥ नाहीं कोणीं[13] धाक कोणासी कोणाचा ।
तुका ह्मणे वाचा काया मनें ॥ २१ ॥

४५१८. मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास यें[14] सुना गौळियांच्या ॥ १ ॥
यांच्यें[15] भ्रतारांचीं धरूनियां रूपें । त्यांच्या घरीं त्यांपें भोग करी ॥ २ ॥ करी
कवतुक त्याचे तयापरी । एकां दिसे हरि एकां लेंक ॥ ३ ॥ एक भाव नाहीं
सकळांच्या चित्तीं । ह्मणऊनि प्रीति तैसें रूप ॥ ४ ॥ रूप याचें आहे अवघें चि एक ।
परि कवतुक दाखविलें ॥ ५ ॥ लेंकरूं न कळे स्थूल कीं लहान । खेळे नारायण
कवतुकें ॥ ६ ॥ कवतुक केलें सोंग वहुरूप । तुका ह्मणे वाप जगाचा हा ॥ ७ ॥

४५१९. जगाचा हा वाप दाखविलें माये । माती खातां जाये मारावया ॥ १ ॥
मारावया तिणें उगारिली काठी । भुवनें त्या पोटीं चौदा देखे ॥ २ ॥ देखे
भयानक झांकियेले डोळे । मागुता तो खेळे तियेपुढें[16] ॥ ३ ॥ पुढें रिघोनियां घाली[17]
गळां कव । कळों नेदी माव मायावंता ॥ ४ ॥ मायावंत विश्वरूपें[18] काय जाणे ।

---

१ पं. तुह्मी माझाठायीं.–२ पं. तुह्मांसी कळों द्या माझा०.–३ पं. अनुभव.–४ पं. तें.–
५ पं. देतो.–६ दे. त. ०शाम.–७ दे. त्याचा.–८ पं. चित्त चोरुनियां घेतलें०.–९ पं. तयासी
आवडे–१० त. ह्मग. पं. ह्मणूनिया चु०.–११ पं. देती टाकोनियां–१२ पं. त्या.–१३ पं. धाक
कोणा.–१४ पं. त्या.–१५ पं. त्यांच्या.–१६ त. माये०. दे. तये०.–१७ पं. गळां घाली–
१८ पं. हरिरूप.

माझें माझें ह्मणे बाळ देवा ॥ ५ ॥ बाळपणीं रीठा रगडिला दाढे । मारियेले गाढे कागबग ॥ ६ ॥ गळां बांधऊनि उखळासी दावें । उन्मळी त्या भावें विमळार्जुन ॥ ७ ॥ न कळे जुनाट जगाचा जीवन । घातलें मोहन गौळियांसी ॥ ८ ॥ सिंकीं उतरूनि खाय नवनीत । न कळे बहुत होय तरी ॥ ९ ॥ तरीं दुंधें[1] डेरे भरले रांजण । खाय ते भरून दावी दुणी ॥ १० ॥ दुणी जालें त्याचा मानिती संतोष । दुभत्याची आस धरूनियां ॥ ११ ॥ आशाबद्धा देव असोनि जवळी । नेणती ते काळीं स्वार्थामुळें ॥ १२ ॥ मुळें[2] याच देव न कळे तयांसी । चित्त आशापाशीं गोवियेलें ॥ १३ ॥ लेंकरूं आमचें ह्मणे दसवंती । नंदाचिये चित्तीं तो चि भाव ॥ १४ ॥ भाव जाणावया[3] चरित्र दाखवी । घुसळितां रवी डेरियांत ॥ १५ ॥ डेरियांत लोणी खादलें रिघोनि । पाहे तों जननी[4] हातीं लागे ॥ १६ ॥ हातीं धरूनियां काढिला[5] बाहेरी । देखोनियां करी चोज त्यासी ॥ १७ ॥ सिकवी विचार नेणे त्याची गती । होता कोणे रीती डेरियांत ॥ १८ ॥ यांसी पुत्रलोभें न कळे हा भाव । कळों नेदी माव देव त्यांसी ॥ १९ ॥ त्यांसी मायामोहजाळ घाली फांसे[6] । देव आपणास[7] कळों नेदी ॥ २० ॥ नेदी भाव राहों[8] लोभिकांचे चित्तीं । जाणतां चि होती अंधळीं तीं ॥ २१ ॥ अंधळीं तीं तुका ह्मणे संवसारीं[9] । जिहीं नाहीं हरि ओळखिला ॥ २२ ॥

४५२०. ओळखी तैयांसी[10] होय एका भावें । दुसरिया देवें न पविजे ॥ १ ॥ न पविजे कदा उन्मत्त जालिया । डंबु[11] तो चि वांयां नागवण ॥ २ ॥ वनवास देवाकारणें एकांत । करावीं हीं व्रततपें[12] याग ॥ ३ ॥ व्रत याग यांसी फळलीं[13] बहुतें । होतीं या संचितें गौळियांची ॥ ४ ॥ यांसी देवें तारियेलें न कळतां । मागील अनंता ठावें होतें ॥ ५ ॥ होतें तें द्यावया आला नारायण । मायबापां रीण गौळियांचें ॥ ६ ॥ गौळियांचें सुख दुर्लभ आणिकां । नाहीं ब्रह्मादिकां तुका ह्मणे ॥ ७ ॥

४५२१. नेणतियांसाटीं नेणता लाहान । थिंकोनि भोजन मागे माये ॥ १ ॥ माया दोनी यास बाप नारायणा । सारखी[14] भावना तयांवरी ॥ २ ॥ तयांवरी त्याचा समचित्त भाव । देवकीवसुदेव नंद दोघे ॥ ३ ॥ घेऊनियां एके ठायीं अवतार । एकीं केला थोर वाढवूनि ॥ ४ ॥ उणा पुरा यासी नाहीं कोणी ठाव ।

---

१ दे. दुधडेरे.—२ पं. मुळयाचा. दे. 'मुळें याच' असतां 'मुळें याचा' केलें आहे.—३ पं. दावावया.—४ पं. गौळणी.—५ पं. काढिती.—६ पं. फासा.—७ पं. आपणसा.—८ दे. राहों भाव—९ पं. संसारीं—१० पं. तयाची.—११ पं. दंभ.—१२ त. व्रतें तपें.—१३ दे. त. फळलीं.—१४ पं. सारिख्या.

सारिखा चि देव अवघियांसी ॥ ५ ॥ यासी दोनी ठाव सारिखे अनंता । आधील मागुता वाढला तो ॥ ६ ॥ वाढला तो सेवाभक्तिचिया गुणें । उपचारमिष्टान्नें करुनियां[1] ॥ ७ ॥ करूनि सायास मेळविलें धन । तें ही कृष्णार्पण केलें तींहीं ॥ ८ ॥ कृष्णासी सकळ गाई घोडे म्हैसी । समर्पिल्या दासी जीवें भावें[2] ॥ ९ ॥ जीवें भावें त्याची करितील सेवा । न विसंबती नांवा क्षणभरी ॥ १० ॥ क्षणभरी होतां वेगळी[3] तैयांस[4] । होती कासावीस प्राण त्यांचे ॥ ११ ॥ त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरि । देह काम करी चित्त त्यापें ॥ १२ ॥ त्याचें चि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ॥ १३ ॥ कृष्ण आला घरा कृष्ण गेला दारा । कृष्ण हा सोयिरों[5] भेटों कृष्णीं[6] ॥ १४ ॥ कृष्ण गातां ओंव्या दळणीं कांडणीं । कृष्ण हा भोजनीं पाचारिती ॥ १५ ॥ कृष्ण तयां ध्यानीं आसनीं शयनीं । कृष्ण देखे स्वप्नीं कृष्णरूप ॥ १६ ॥ कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चितां । धन्य मातापिता तुका ह्मणे ॥ १७ ॥

४५२२. कृष्ण हा परिचारी कृष्ण हा वेव्हारी । कृष्ण घ्या वो नारी आणिकी[7] ह्मणे ॥ १ ॥ ह्मणे कृष्णाविण कैसें[8] तुह्मां गमे । विळ हा करमे वांयांविण ॥ २ ॥ वांयांविण तुह्मीं पिटितां[9] चावटी । घ्या गे जगजेठी क्षणभरी ॥ ३ ॥ क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा । पहा एकवेळा घेऊनियां ॥ ४ ॥ याचें सुख तुह्मां कळलियावरि । मग दारोदारीं न फिराल ॥ ५ ॥ लटिकें हें तुह्मां वाटेल खेळणें । एका कृष्णाविणें आवघें चि ॥ ६ ॥ अवघ्यांचा तुह्मीं टाकाल सांगात । घेऊनि अनंत जाल राना ॥ ७ ॥ नावडे तुह्मांस आणीक बोलिलें । मग हें लागलें हरिध्यानें[10] ॥ ८ ॥ न करा हा मग या जीवा वेगळा । टोंकवाल बाळा आणिका[11] ही ॥ ९ ॥ आणिका ही तुह्मा येती काकुलती । जवळी इच्छिती क्षण बैसों ॥ १० ॥ बैसों चला पाहों गोपाळाचें मुख । एकी एक सुख सांगतील ॥ ११ ॥ सांगे जंव ऐसी मात[12] दसवंती । तंव त्या[13] धरिती चित्तीं बाळा ॥ १२ ॥ बाळा एकी घरा घेउनियां जाती । नाहीं त्या परती तुका ह्मणे ॥ १३ ॥

४५२३. तुका ह्मणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासीं खेळतां दिवस गमे ॥ १ ॥ दिवस राती कांहीं नाठवे तयांसी । पाहातां मुखासी कृष्णाचिया ॥ २ ॥ याच्या मुखें नये डोळयासी वीट । राहिले हे नीट तटस्त[14] चि ॥ ३ ॥ तादस्थ राहिलें सकळ

१ दे. त. करोनियां.—२ दे. भाव.—३ त. वेगळे.—४ पं. तयासी । होती कासाविसी०.—५ पं. सोयरा.—६ पं. कृष्ण.—७ पं. आणिका.—८ पं. तुह्मां कैसें.—९ न. पीटीन्या. दे. पिटीतया चास्टी—१० पं. कृष्णध्यान—११ पं. आणीक ही.—१२ पं. माता—१३ दे. धरिती चित्तीं बाळा । त. तव धरी चि नी चित्तीं बाळा.—१४ दे. त. ताटस्थ चि.

शरीर । इंद्रियें व्यापार विसरलीं ॥ ४ ॥ विसरल्या तान भुक घर दार । नाहीं हा विचार असो कोठें ॥ ५ ॥ कोठें असों कोण जाला वेळ काळ । नाठवे सकळ विसरल्या ॥ ६ ॥ विसरल्या आह्मीं कोणीये जातीच्या । वर्णा ही चहूंच्या एक जाल्या ॥ ७ ॥ एकें जाल्या तेव्हां कृष्णाचिया सुखें । निःशंकें भातुकें खेळतील ॥ ८ ॥ खेळती भातुकें कृष्णाच्या सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ॥ ९ ॥ चित्तीं तो गोविंद लटिकें दळण । करिती हें जन करी तैसें ॥ १० ॥ जन करी तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करूनियां ॥ ११ ॥ करिती आपला आवघा गोविंद । जना साच फंद लटिका त्यां ॥ १२ ॥ त्याणीं केला हरि सासुरें माहेर । बंधु हे कुमर दीर भावें ॥ १३ ॥ भावना राहिली एकाचिये ठायीं । तुका ह्मणे पायीं गोविंदाचे ॥ १४ ॥

४५२४. गोविंद भ्रतार गोविंद मुळहारी । नामें भेद परि एक चि तो ॥ १ ॥ एकाचीं च नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावें जावें ॥ २ ॥ जावें यावें तिहीं घरींचिया घरीं । तेथिची सिदोरी तेथें न्यावी ॥ ३ ॥ विचारितां दिसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोका ऐसें ॥ ४ ॥ लोक करूनियां साच वर्तताती । तैशा त्या खेळती लटिक्याची ॥ ५ ॥ लटिकीं करिती मंगळदायकें । लटिकीं च एकें एकां व्याही ॥ ६ ॥ व्याही भाई हरि सोयरा जावायी । अवघियांच्या ठायीं केला एक ॥ ७ ॥ एकासि च पावे जें कांहीं करिती । उपचार संपत्ति नाना भोग ॥ ८ ॥ भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ॥ ९ ॥ लटिका च त्यांणीं केला संवसार । जाणती साचार वेगळीं त्या ॥ १० ॥ त्यांणीं मृत्तिकेचें करूनि अवघें । खेळतील दोघें पुरुषनारी ॥ ११ ॥ पुरुषनारी त्यांणीं ठेवियेलीं नावें । कवतुकभावें विचरती ॥ १२ ॥ विचरती जैसे साच भावें लोक । तैसें नाहीं सुख खेळतीया ॥ १३ ॥ यांणीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वांयां खेळतों तें ॥ १४ ॥ खेळतों ते आह्मी नव्हों नारीनर । ह्मणोनि विकार नाहीं तयां ॥ १५ ॥ तशा ठावें आहे आह्मी अंतरीं एक । ह्मणोनि निःशंक खेळतील ॥ १६ ॥ तयां ठावें नाहीं हरिचिया गुणें । आह्मी कोणकोणें काय खेळों ॥ १७ ॥ काय खातों आह्मी कासया सांगातें । कैसें हें लागतें नेणों

---

१ पं. विसरली.–२ दे. त. आहों.–३ त. वेळाकाळ–४ त. एको–५ त. निशंक.–६ त. कृष्णा त्या सहित.–७ त. करीती हीं जन–८ त. करिती.–९ त. करूनि.–१० त. त्या.–११ त. कळविती.–१२ त. वरतती.–१३ त. सोइरा.–१४ पं. अवघीयाठाई.–१५ त. वेगळे त्या.–१६ पं. खेळतिल्या.–१७ पं. तो.–१८ पं. न हो–१९ पं. अवघे.

मुखीं ॥ १८ ॥ मुखीं चवी नाहीं वरी अंगी लाज । वर्ण याती काज न धरिती ॥ १९ ॥ न धरिती कांहीं संकोच त्या मना । हांसतां या जना नाइकती ॥ २० ॥ नाइकती बोल आणिकांचे कानीं । हरि चिंतीं मनीं बैसलासे ॥ २१ ॥ बैसलासे हरि जयांचिये चित्तीं । तयां नावडती मायबापें ॥२२॥ मायबापें त्यांचीं नेती पाचारुनि । बळें परि मनीं हरि वसे ॥ २३ ॥ वसतील बाळा आपलाले घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ॥ २४ ॥ गोविंदाचें ध्यान निजलिया जाग्या । आणीक वाउग्या न बोलती ॥ २५ ॥ न बोलती निजलिया हरिविण । जागृति सपन एक जालें ॥ २६ ॥ एकविध सुख घेती नित्यें बाळा । भ्रमर परिमळालागीं तैसा ॥ २७ ॥ तैसा त्यांचा भाव घेतला त्यांपरी । तुका ह्मणे हरी बाळलीला ॥ २८ ॥

४५२५. लीलाविग्रही तो लेववी खाववी । यशोदा बैसवी मांडीवरी ॥ १ ॥ मांडीवरी भार पुष्पाचिये परी । बैसोनियां करी स्तनपान ॥ २ ॥ नभाचा ही साक्षी पाताळापरता । कुर्वाळिते माता हातें त्यासि ॥ ३ ॥ हातें कुर्वाळुनी मुखीं घाली घांस । पुरे ह्मणे तीस पोट धालें ॥ ४ ॥ पोट धालें मग देतसे ढेंकर । भक्तीचें तें फार तुळसीदळ ॥ ५ ॥ तुळसीदळ भावें सहित देवापाणी । फार तें त्याहुनि क्षीरसागरें ॥ ६ ॥ क्षीराचा कांटाळा असे एकवेळ । भक्तीचें तें जळ गोड देवा ॥ ७ ॥ देवा भक्त जिवाहुनि आवडती । सकळ ही प्रीति त्यांच्याठायीं ॥ ८ ॥ [11]त्यांचा हा अंकित सर्व भावें हरि । तुका ह्मणे करी सर्व काज ॥ ९ ॥

४५२६. [12]जेयेवेळीं चोरूनियां नेलीं वत्सें । तयालागीं तैसें होणें लागे ॥ १ ॥ लागे दोहीं ठायीं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ॥ २ ॥ माय [13]जैल्यावरी अवघ्या वत्सांची । घरीं वत्सें जीचीं तैसा जाला ॥ ३ ॥ जाला तैसा[14] जैसे घरिंचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पांवे ॥ ४ ॥ मोहरी पांवे सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहाळा ब्रह्मादिकीं[15] ॥ ५ ॥ ब्रह्मादिकां सुख स्वप्नीं ही नाहीं । तेंसें दोहीं ठायीं वोसंडलें ॥ ६ ॥ वोसंडल्या क्षीर अमुप त्या गायी । जैसी ज्याची आई तैसा जाला ॥ ७ ॥ लाघव कळलें ब्रह्मयासी याचें । परब्रह्म साचें अवतरलें ॥ ८ ॥ तरले हे जन सकळ ही आतां । ऐसें तो विधाता बोलियेला ॥ ९ ॥ लागला हे स्तुती करूं अनंताची । चतुर्मुख वाची भक्ती स्तोत्रें ॥ १० ॥ भक्तिकाज[16]

---

१ दे. वरणा०.–२ दे. त. धरितील.–३ पं. ध्यानीं.–४ पं. जागृती हे स्वप्न –५ पं. नित्या–६ दे. तैशा. पं. जैसा.–७ पं. त्या भाव घेतील.–८ त. एश्वदा.–९ दे. त. "तें" नाहीं–१० पं. त. क्षीरसागर.–११ त तयाचा अंकित. दे. त्यांचा अंकित.–१२ पं. जिये.–१३ पं. त. जाला वरि.–१४ पं. जैसातसा.–१५ पं. ब्रह्मादिका.–१६ पं. भक्तिकाजा.

देवें[1] केला अवतार । पृथ्वीचा भार फेडावया ॥ ११ ॥ पृथिवी दाटीली होती या असुरीं । नासाहावे वरी भार तेथें ॥ १२ ॥ तया काकुलती आपल्या दासांची । तयालागीं वेची सर्वस्व ही ॥ १३ ॥ स्वहित दासांचें करावयालागीं । अव्यक्त हें[2] जगीं व्यक्ती आलें ॥ १४ ॥ लेखा कोण करी त्यांचियां[3] पुण्याचा । जयांसवें वाचा बोले हरी ॥ १५ ॥ हरी नाममात्रें पातकांच्या रासी । तो आला घरासि गौळियांच्या ॥ १६ ॥ गौळियें अवघीं जालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ॥ १७ ॥ तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहुत ज्यांपाशीं होइल पाप ॥१८॥ पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तो चि पाहे कृष्णमुख ॥ १९ ॥ मुख माझें काय जों[4] मी वर्णू पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ॥ २० ॥ ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासि हा चि देव ॥ २१ ॥ देव चि अवघा जालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्सें तेथें ॥ २२ ॥ तेथें पाहाणें जें आणीक दुसरें । मूर्ख त्या अंतरें दुजा नाहीं ॥ २३ ॥ दुजा भाव तुका ह्मणे जया चित्तीं । रवरव भोगिती कुंभपाक ॥ २४ ॥

४५२७. कुंभपाक लागे तयासि भोगणें । अवघा चि नेणे देव ऐसा ॥ १ ॥ देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासि यातना यम करी ॥ २ ॥ कळला हा देव तयां साच खरा । गाई वत्सें घरा धाडी ब्रह्मा ॥ ३ ॥ ब्रह्मादिकां ऐसा देव अगोचर । कैसा त्याचा पार जाणवेल ॥ ४ ॥ जाणवेल देव गौळियांच्या भावें । तुका ह्मणे व्हावें संचित हें ॥ ५ ॥

४५२८. संचित उत्तम भूमि कसूनियां । जाऊं नेणे[11] वांयां परि त्याचें ॥ १ ॥ त्याचिया पिकासि आलिया घुमरी । आल्या गाईवरी आणिक गाई ॥ २ ॥ गाई दवडुनि घौलिती बाहेरी । तंव ह्मणे हरि बांधा त्यां ही ॥ ३ ॥ त्याही तुह्मी बांधा तुमच्या सारिख्या । भोवंडा पारिख्या वाड्यांतुनि ॥ ४ ॥ पारिख्या न येती कोणाचियें घरा । सूत्रधारी खरा नारायण ॥ ५ ॥ नारायण नांदे जयाचिये ठायीं । सहज तेथें नाहीं घालमेली ॥ ६ ॥ मेलीं हीं शाहाणीं करितां सायास । नाहीं सुखलेश तुका ह्मणे ॥ ७ ॥

४५२९. तुका ह्मणे सुख घेतलें गोपाळीं । नाचती कांवळी करुनि ध्वजा ॥ १ ॥ करूनियां टिरी आपुल्या[16] मांदळ । वाजविती टाळ दगडाचे ॥ २ ॥

---

१ पं. तया.—२ पं. ही.—३ त. दे. यांचिया.—४ पं. जें मी वर्णू पामर ।.—५ पं. जें पाहाणें.—६ पं. मूर्ख तो चि खरें नाहीं दुजा.—७ पं. तयासीच खरा ।.—८ पं. वत्स—९ पं. देव ऐसा.—१० दे. सेवे.—११ पं. नये.—१२ त. घालितील दुरी.—१३ पं. त्याही ।.—१४ पं. बांधा तुह्मी.—१५ पं. आणिकांच्या.—१६ पं. आपले.

दगडाचे टाळ कोण त्यांचा नाद । गीतें[1] गातां छंद ताल नाहीं ॥ ३ ॥ तालें[2] नाहीं गातां नाचतां गोपाळां । घननीळ सावळा तै[3]यामध्यें ॥ ४ ॥ मध्यें[4] जयां हरि तें सुख आगळें । देहभाव काळें नाहीं तयां ॥ ५ ॥ तयांसि आळंगी आपुलिया करीं । जाती[5] भूमीवरी लोटांगणीं ॥ ६ ॥ निजभाव देखे जयांचिये अंगीं । तुका ह्मणे संगीं क्रीडे तयां ॥ ७ ॥

४५३०. तयांसवें करी काला दहींभात । सिदोऱ्या अनंत मेळवुनी ॥ १ ॥ मेळवुनी अवघियांचे एके ठायीं । मागें पुढें कांहीं उरों नेदी ॥ २ ॥ नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें । आपलें ही साचें द्यावें तेथें ॥ ३ ॥ द्यावा दहींभात [6]आपले प्रकार । तयांचा वेव्हार सांडवावा ॥ ४ ॥ वांटी सकळांसि हातें आपुलिया । जैसें मागे तया तैसें द्यावें ॥ ५ ॥ द्यावें सांभाळुनी सम तुकभावें । आपण हि खावें त्यांचें तुंक[7] ॥ ६ ॥ तुक सकळांचें गोविंदाचे हातीं । कोण कोणे[8] गति भला बुरा ॥ ७ ॥ राखे[9] त्यासि तैसें आपलाल्या भावें । विचारुनि द्यावें जैसें तैसें ॥ ८ ॥ तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिलें भाविकां गोपाळांसि ॥ ९ ॥ गोपाळांचे मुखीं देउनी कवळ । घांस मागे लाळ खाय त्यांची ॥ १० ॥ त्यांचिये मुखींचे काढूनियां[10] घांस । झोंबतां हातांस खाय वळें ॥ ११ ॥ वळें जयांचिया ठेंगणें सकळ । तयातें गोपाळ पींडितील[11] ॥ १२ ॥ पाठी उचलूनि वाहातील खांदीं । नाचतील मांदीं मेळवुनी ॥ १३ ॥ मांदीं मेळवुनी धणी दिली आह्मां । तुका ह्मणे जमा केल्या गाई ॥ १४ ॥

४५३१. केला पुढें हरि अस्तमाना दिसे[12] । मागें त्यासरिसा[13] थाट चाले ॥ १ ॥ थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्ण[14] राम तयां सोयी ॥ २ ॥ सोयी लागलिया तै[15]यांची अनंतीं । न बोलावितां येती मागें तया ॥ ३ ॥ तयांचिये चित्तीं बैसला अनंत । घेती नित्यानित्य तें चि सुख ॥ ४ ॥ सुख नाहीं कोणा हरिच्या वियोगें । तुका ह्मणे जुगें घडी जाय ॥ ५ ॥

४५३२. जाय फाकोनियां निवडोनि[16] गाई । आपलाल्या[17] सोयी घराचिये ॥ १ ॥ घराचिये सोयी अंतरला देव । गोपाळांचे[18] जीव गोविंदापे ॥ २ ॥ गोविंदें वेधिलें तुका ह्मणे मन । वियोगें ही ध्यान संयोगाचें ॥ ३ ॥

---

१ पं. गीतें.–२ दे. त. नाहीं ताळ.–३ त. दे. मधीं.–४ त. दे. मधीं.–५ त. जाते त्या अंतर्गाचे.–६ पं. आपुला.–७ पं. तुकें–८ पं. कोणा.–९ पं. राखी त्यास तैसें •.–१० पं. हिरोन्यिां.–११ पं. पाडिताती.–१२ पं. दिसे.–१३ दे. पं. त्यासरिसे.–१४ पं. रामकृष्ण.–१५ पं. देवाची आवृत्ति.–१६ दे. त. निवडितां.–१७ पं. आपलाली.–१८ पं. गोपाळाचा.

४५३३. संयोग सकळां असे सर्वकाळ । दुश्चित्तें[1] गोपाळ आला दिसे ॥ १ ॥ गोपाळ गुणाचा ह्मणे गुणमय । निंबलोण माये उतरिलें ॥ २ ॥ उतरूनि हातें[2] धरि हनूवटी । ओंवाळूनि दिठी सांडियेली ॥ ३ ॥ दिठी घाली माता विश्वाच्या जनका । भक्तिचिया सुखा गोडावला ॥ ४ ॥ लहान हा थोर जीवजंतु[3] भूतें । आपण दैवतें[4] जाला देवीं ॥ ५ ॥ देवी ह्मैसासुर मुंजिया खेचर । लहान हिं[5] थोर देव हरि ॥ ६ ॥ हरि तुका ह्मणे अवघा एकला । परि याँ[6] धाकुला भक्तीसाटीं[7] ॥ ७ ॥

४५३४. भक्तीसाटीं केली यशोदेसी आ'ळी । थिंकोनिया चोळी डोळे देव ॥ १ ॥ देव गिळूनियां धरिलें मोहन । माय ह्मणे कोण येथें दुजें ॥ २ ॥ दुजें येथें कोणी नाहीं कृष्णाविण । निरुते जाणोन पुसे देवा ॥ ३ ॥ देवापाशीं पुसे देव काय जाला[8] । हांसें आलें बोला याचें हरि ॥ ४ ॥ यांचे मी जवळी देव तो नेणती । लटिकें मानिती साच खरें ॥ ५ ॥ लटिकें तें साच साच तें लटिकें । नेणती लोभिकें आशाबद्ध[9] ॥ ६ ॥ सांगे[10] ह्मणे माय येरु वासी तोंड । तंव तें ब्रह्मांड देखे माजी ॥ ७ ॥ माजी जया चंद्र सूर्य तारांगणें । तो भक्तांकारणें बाळलीळा ॥ ८ ॥ लीळा कोण जाणे याचें महिमान । जगाचें[11] जीवन देवादिदेव[12] ॥ ९ ॥ देवें कवतुक दाखविलें तयां । लागतील[13] पायां मायबापें ॥ १० ॥ मायबाप ह्मणे हा चि देव खरा । आणीक पसारा लटिका तो ॥ ११ ॥ तो हि त्यांचा देव दिला नारायणें । माझें हें करणें तो हि मी च ॥ १२ ॥ मीं च ह्मणउनि जें जें जेथें ध्याती । तेथें मी श्रीपति भोगिता तें ॥ १३ ॥ तें मज वेगळें मी तया निराळा । नाहीं या सकळा ब्रह्मांडांत ॥ १४ ॥ तद्भावना[14] तैसें भविष्य तयाचें । फळ देता साचें मी च एक ॥ १५ ॥ मी च एक खरा बोलें नारायण । दाविलें निर्वाण निजदासां ॥ १६ ॥ निजदासां खूण दाविली निरुती । तुका ह्मणे भूतीं नारायण ॥ १७ ॥

४५३५. नारायण भूतीं न कळे जयांसि । तयां गर्भवासीं येणें जाणें ॥ १ ॥ येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें । न कळतां खरें देव ऐसा ॥ २ ॥ देव ऐसा जया कळला सकळ । गेली तळमळ द्वेषबुद्धि ॥ ३ ॥ बुद्धीचा पालट नव्हे कोणे[16] काळीं । हरि जळीं स्थळीं तयां चित्तीं ॥ ४ ॥ चित्त तें निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजी ॥ ५ ॥ तयामाजी हरि जाणिजे त्या भावें । आपलें परावें सारिखें

---

१ पं. दुष्चिता.–२ पं. हाति.–३ त. दे. जीवजंत.–४ पं. दैवत.–५ त. ती पं. हा.–६ पं. हा.–७ त. दे. भक्तासाटीं.–८ पं. जाले.–९ पं. आशाबद्ध.–१० पं. सांगे.–११ पं. जगाचा.–१२ पं. त. देवा देव.–१३ पं. लागती ते पाया मायबाप.–१४ दे. न. ततभावना. पं. तद्भावना इच्छा भावि तैसें त्याचें ।.–१५ दे. त. होय.–१६ पं. कदा.–१७ त. जया.

चि ॥ ६ ॥ चिंतनें तैयाच्या तरती आणीक । जो हें सकाळिक देव देखे ॥ ७ ॥ देव देखे तो ही देवें कसा नव्हे । उरला संदेहे काय त्यासि ॥ ८ ॥ काया वाचा मनें पूजावे वैष्णव । ह्मणउनि भाव धरूनियां ॥ ९ ॥ यांसि कवतुक दाखविलें रानीं । वोणवा गिळूनि गोपाळांसि ॥ १० ॥ गोपाळांसि डोळे झांकविले हातें । धरिलें अनंतें विश्वरूप ॥ ११ ॥ पसरूनि मुख गिळियेलें ज्वाळ । पहाती गोपाळ बोटां सांदी ॥ १२ ॥ संधि सारूनियां पाहिलें अनंता । ह्मणती ते आतां कळलासी ॥ १३ ॥ कळला हा तुझा देह नव्हे देवा । गिळिला वोणवा आणीक तो ॥ १४ ॥ तो तयां कळला आरुषां गोपाळां । दुर्गम सकळां साधनांसि ॥ १५ ॥ सीण ऊरे तुका ह्मणे साधनाचा । भाविकांसि साचा भाव दावी ॥ १६ ॥

४५३६. भाव दावी शुद्ध देखोनियां चित्तें । आपल्या अंकित निजदासां ॥१॥ सांगे गोपाळांसि काय पुण्य होतें । वांचलों जेंळते आगी हातीं ॥ २ ॥ आजि आह्मां येथें रांखियेलें देवें । नाहीं तरी जीवें न वांचेतों ॥ ३ ॥ न वांचत्यों गाई जळतों सकळें । पूर्वपुण्यबळें वांचविलें ॥ ४ ॥ पूर्वपुण्य होतें तुमचिये गांठी । बोले जगजेठी गोपाळांसि ॥ ५ ॥ गोपाळांसि ह्मणे वैकुंठनायक । भले तुह्मी एक पुण्यवंत ॥ ६ ॥ करी तुका ह्मणे कैरवी आपण । द्यावें थोरपण सेवकांसि ॥ ७ ॥

४५३७. काय आह्मां चाळविसी वायांविण । ह्मणती दुरून देखिलासि ॥ १ ॥ लावूनियां डोळे नव्हतों दुश्चित । तुज पराचित्त मौव होती ॥ २ ॥ होती दृष्टि आंतें उघडी आमची । बाहेरी ते[18] वांयां चि कुंची झाकूं ॥ ३ ॥ जालासि थोरला थोरल्या तोंडाचा । गिळियेलों वाचा धूर आगी ॥ ४ ॥ आगी खातो ऐसा आमचा सांगाती । आनंदें नाचती भोंवताली ॥ ५ ॥ भोंवतीं आपणा मेळविलीं देवें । तुका ह्मणे ठावें नाहीं ज्ञान ॥ ६ ॥

४५३८. नाहीं त्यांची शंका वैकुंठनायका । नेणती ते एकाविण दुजा ॥ १ ॥ जाणतियां सवें येऊं नेदी हरि । तर्कवादी दुरी दुरविले ॥ २ ॥ वादियासि भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दुराविले ॥ ३ ॥ दुरावले दूर आशाबद्ध देवा । [21]कैरितां या सेवा कुटुंबाची ॥ ४ ॥ चित्तीं द्रव्यदारा पुत्रादिसंपत्ती । समान ते होतीं

---

१ पं. जयाच्या.–२ पं. तो.–३ त. दे. कसा देव –४ पं. मुळचें “ ह्मणउनि ” असें असतां तें खोडून “ मनीं शुद्ध ” असें केलें आहे.–५ त. मुखें.–६ पं. गिळियेली ज्वाळा । पाहाती गोपाळा –७ पं. ह्मणीतलें आतां०.–८ पं. अरुप.–९ पं. चित्ता ।० अंकिता.–१० पं. जळत –११ पं. वांचविलें –१२ त. दे. वंचतों.–१३ त. दे. वंचत्या.–१४ पं. करविता.–१५ त. दे. ह्मणवी –१६ त. मान –१७ पं. आता.–१८ पं. तेव्हां साचि कुची०. त. ते वांचि कुची०.–१९ पं. गिळियेली –२० पं. शका त्यांची.–२१ पं. करिती.

पशु नर ॥ ५ ॥ नरक साधिले[1] विसरोनि देवा । बुडाले[2] ते भवा नदीमाजी ॥ ६ ॥ जीहीं हरिसंग केला संवसारीं[3] । तुका ह्मणे खरी खेपें[4] त्यांची ॥ ७ ॥

**४५३९.** खेळीमेळीं ओले[5] घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ॥ १ ॥ मातेपाशीं एक नवल सांगती । जाली तैसी ख्याती वोणव्याची ॥ २ ॥ ओवाळिलें[6] तिनें करूनि आरती । पुसे दसवंती गोपाळांसि ॥ ३ ॥ पुसे पडताळुनी मागुती मागुती । गोपाळ सांगती कैवतुक[7] ॥ ४ ॥ कवतुक कानीं आइकतां[8] त्यांचे । बोलतां ये वाचे वीट नये ॥ ५ ॥ नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ॥ ६ ॥ तेव्हां कवतुक कळों आलें कांहीं । हळहळ दोहीं मायबापां ॥ ७ ॥ हळहळ त्यांचें[9] पुण्य जालें वाड । वारलें हें जाड तिमिरांचें[10] ॥ ८ ॥ तिमिरें[11] हें तेथें राहों शके कैसें । जालियां प्रकाशें[12] गोविंदाच्या ॥ ९ ॥ दावी तुका ह्मणे देष ज्या आपणा । पालटे तें क्षणामाजी एका ॥ १० ॥

**४५४०.** काय आतां यासि ह्मणावें लेंकरूं । जगाचा हा गुरु मायबाप ॥ १ ॥ माया याची यासि राहिली व्यापून[13] । कळों नये क्षण एक होतां ॥ २ ॥ क्षण एक होतां विसरलीं त्यासि । माझेंमाझें ऐसें[14] करी बाळा ॥ ३ ॥ कैरी[15] कवतुक कळों नेदी कोणा । योजूनि कारणा तें चि खेळे ॥ ४ ॥ तें सुख लुटिलें[16] घरिचिया घरीं । तुका ह्मणे परी आपुलाल्या ॥ ५ ॥

**४५४१.** आपुलाल्यापरी करितील सेवा । गीतें[17] गाती देवा खेळवूनि ॥ १ ॥ खेळे[18] मांडियेला यमुने पावळीं । या रे चेंडुफळी खेळूं आतां ॥ २ ॥ आणविल्या डांगा चवगुणां काठी । वैसोनियां वांटी गाढिया गडी ॥ ३ ॥ गडी जंत्र पाहे आपणासमान । नाहीं नारायण ह्मणे दुजा ॥ ४ ॥ जाणोनि गोविंदें सकळांचा भाव । तयांसि उपाव तो चि सांगे ॥ ५ ॥ सांगे सकळांसि व्हा रे एकीकडे[19] । चेंडू रासा गडे[20] तुह्मी माझी ॥ ६ ॥ मजे[21] हा न लगे आणीक सांगाती । राखावी बहुतीं हाल माझी[22] ॥ ७ ॥ माझे हाके हाक मेळवा सकळ । नव जा वरळ ऐकमेकां[23] ॥ ८ ॥ एका समतुकें अवघेचि राहा । जाईल तो पाहा धरा चेंडू ॥ ९ ॥ चेंडू धरा ऐसें सांगतो सकळां । आपण निराळा एकला चि ॥ १० ॥ चिंतुनियां चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें । ठेलीं सकाळिक[24] पाहात चि ॥ ११ ॥ पाहात[25] चि ठेलीं न

---

१ पं. साधिला.–२ पं. "बुडाले ते" याबद्दल "बुडालेती".–३ पं. संसारी.–४ पं. त्याची खेप.–५ पं. घरा आले.–६ त. ओवाळिला.–७ त. कवतुक तें–८ त. ऐकतां.–९ पं. त्यांच्या पुण्या जाली वाड । वारिलें.–१० त. पं. त्रिमिराचें–११ त. पं. त्रिमिर.–१२ पं. प्रवेशें.–१३ पं. लपोन.–१४ त. ऐसी करी बाळ.–१५ पं. करनि–१६ पं. लोटिलें.–१७ पं. गीति.–१८ पं. खेळ.–१९ पं. एकेठायीं.–२० पं. भाई.–२१ त. मज.–२२ पं. मग.–२३ पं. एकएक–२४ त. सकळिकें पाहाते चि.–२५ त. पाहाते चि.

चलतां कांहीं । येरू लवलाहीं ह्मणे धरा ॥ १२ ॥ धरावा तेयानें[1] त्याचें बळ ज्यासि[2] । येरा आणिकांसि लाग नव्हे ॥ १३ ॥ नव्हे काम बळ बुद्धि नाहीं[3] त्याचें । न धरवे निंचें उंचाविर्णे ॥ १४ ॥ विचारीं पडिले देखिले गोपाळ । या ह्मणे सकळ मजमागें ॥ १५ ॥ मार्ग[4] देवाविण न दिसे आणिका । चतुर होत का बहुत जन ॥ १६ ॥ चतुर चिंतिती बहुत मारग । हरि जाय लाग[5] पाहोनियां ॥ १७ ॥ यामागें जे गेलें गोविंदा गोपाळ । ते नेले सीतळ पंथ ठायां ॥ १८ ॥ पंथ जे चुकले आपले मतीचे । तयांमागें त्यांचे ते चि हाल ॥ १९ ॥ हाल दोघां एक मोहेरां मागिलां । चालतां चुकलां वाट पंथ ॥ २० ॥ पंथ पुढिलांसी चालतां न कळे । मागिलांनीं डोळे उघडावे ॥ २१ ॥ वैगाचा[11] प्रबोध विचार ज्या नाहीं । समान तो देहीं बाळकांसी ॥ २२ ॥ सिकविलें हित नायिके जो कोनीं[12] । त्यामागें भल्यांनीं जाऊं नये ॥ २३ ॥ नये तें चि करी श्रेष्ठाचिया मना । मूर्ख एक जाणा तो चि खरा ॥ २४ ॥ रानभरी जाले न कळे मारग । मग तो श्रीरंग आठविला ॥२५॥ लाज सांडूनियां मारितील हाका । कळलें नायका वैकुंठींच्या ॥२६॥ चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणीती । तया अति प्रीति गोपाळांची ॥ २७ ॥ गोपाळांचा धांवा आइकिला कानीं । सोयी चक्रपाणि पालविलें ॥ २८ ॥ साया धरूनियां आले हरिपासीं । लहान थोरांसी सांभाळिलें ॥ २९ ॥ सांभाळिलें तुका ह्मणे सकळ हि । सुखी जाले ते ही हरिमुखें ॥ ३० ॥

४५४२. मुखें सांगे त्यांसि पैल चेंडू पाहा । उदकांत डोहाचिये माथां ॥ १ ॥ माथां कळंबाचे अवघडा ठायीं । दावियेला डोहीं जळामाजी ॥ २ ॥ जळांत पाहातां हींडति[13] या दृष्टि । ह्मणे जगजेठी ऐसें नव्हे ॥ ३ ॥ नव्हे[14] साच चेंडू छाया दिसे आंत । खरा तेथें चित्त लावा वरी ॥ ४ ॥ वरी देखियेला अवघ्यांनीं डोळां । ह्मणती गोपाळा आतां कैसें ॥ ५ ॥ कैसें करूनियां उतरावा खालीं । देखोनियां भ्यालीं अवघीं डोहो ॥ ६ ॥ डोहो बहु खोल काळया भीतरी । सरलीं माघारीं अवघीं जणें ॥ ७ ॥ जयाचें कारण तयासी च ठावें । पुसे त्याच्या भावें त्यास हरि ॥ ८ ॥ त्यासि नारायण ह्मणे राहा तळीं । चढे वनमाळी झाडावरी ॥ ९ ॥ वरि जातां वेरि[15] पाहाती गोपाळें[16] । ह्मणती सकळें[17] आह्मी नेणों ॥ १० ॥ नेणों ह्मणती हें करितोसि काई । आह्मां तुझी आई देइल सिव्या ॥ ११ ॥ आपुलिया

१ पं. तयांनीं.–२ त. त्यासी.–३ पं. नव्हे –४ पं. उंचेविण –५ पं. देखोनि –६ त. माग –७ पं. माग.–८ पं. आले.–९ पं. गोविंद.–१० त. मोहेरे –११ पं. वगाच्या प्रबोध –१२ पं. कोणी –१३ पं. आहतीये दृष्टि.–१४ पं. खरे.–१५ पं. हरि.–१६ पं. गाळ.–१७ पं. गोपाळ.

कानां ठेवुनियां हात । सकळीं निमित्य टाळियेलें ॥ १२ ॥ निमित्याकारणें रेचिलें[2] कारण । गेला नारायण खांदीवरी ॥ १३ ॥ खांदीवरी पाव ठेवियेला देवें । पाडावा त्या भावें चेंडू तळीं ॥ १४ ॥ तळील नेणती तुका ह्मणे भाव । अंतरींचा[3] देव जाणों नेदी ॥ १५ ॥

४५४३. नेदी कळों केल्याविण तें कारण । दाखवी आणून अनुभवा ॥ १ ॥ न पुरेसा हात घाली चेंडूकडे[4] । ह्मणीतलें गडे सांभाळावें ॥ २ ॥ सांभाळ करितां सकळां जिवाचा । गोपाळांसि वाचा ह्मणे बरें ॥ ३ ॥ बरें विचारुनी करावें कारण । ह्मणे नारायण बऱ्या बरें ॥ ४ ॥ बरें ह्मणउनि तयांकडे पाहे । सोडविला जाय चेंडू तळा ॥ ५ ॥ तयासवें उडी[6] घातली अनंतें । गोपाळ रडते[7] येती घरा ॥ ६ ॥ येतां त्यांचा[8] लोकीं देखिला कोल्हाळ । सामोरीं सकळ आलीं पुढें ॥ ७ ॥ पुसती ते[9] मात आपआपल्यासि । हरिदुःखें त्यांसी न बोलवे ॥ ८ ॥ न बोलवे हरि बुडालासें मुखें । कुटिील दुःखें उर माथे ॥ ९ ॥ मायबापें[11] तुका ह्मणे न देखती । ऐसें दुःख चित्तीं गोपाळांच्या ॥ १० ॥

४५४४. गोपाळां उभडु नावरे दुःखाचा । कुंटित हे वाचा जाली त्यांची ॥ १ ॥ जालें काय ऐसें न कळे कोणासी । ह्मणती तुह्मांपासीं देव होता ॥ २ ॥ देवासवें दुःख न पवंते[12] ऐसें । कांहीं अनारिसें दिसे आजी ॥ ३ ॥ आजि दिसे हरि फांकला यांपाशीं । ह्मणउनि ऐशी परि जाली ॥ ४ ॥ जाणविल्याविण कैसें कळे त्यांसि[13] । शाहाणे[14] तयांसि कळों आले ॥ ५ ॥ कळों आलें तीहीं फुंद शांत केला । ठायींचा च त्यांला थोडा होता ॥ ६ ॥ होता तो विचार सांगितला जना । गोपाळ शाहाणा होता त्याणें ॥ ७ ॥ सांगे आतां हरि तुह्मां आह्मां नाहीं । बुडाला[15] तो डोहीं यमुनेच्या ॥ ८ ॥ यैसी[16] अवकाश नव्हे चि पुसतां । जालिया अनंता कोणें[17] परि ॥ ९ ॥ परि त्या दुःखाची काय सांगों आतां । तुका ह्मणे माता लोकपाळां[18] ॥ १० ॥

४५४५. पाषाण फुटती तें दुःख देखोनि । करितां गौळणी शोक लोकां ॥ १ ॥ काय ऐसें पाप होतें आह्मांपासीं । बोलती एकासी एक एकीं[19] ॥ २ ॥ एकांचिये डोळां असुं बाह्यात्कारीं । नाहीं तीं अंतरीं जळतील ॥ ३ ॥ जळतील एकें अंतर्बाह्यात्कारें । टाकिलीं लेकुरें कडियेहूनि ॥ ४ ॥ निवांत चि एकें राहिलीं निश्चितें[20] । बाहेरी ना

१ त. दे. देउनियां.–२ दे. त. वेचिलें –३ पं. अतरींचें देव क्लों नेदी।.–४ दे. त. चेंडाकडे.–५ त. ह्मणतील.–६ दे. दडी.–७ पं. रडत.–८ पं. लोकीं त्यांचा.–९ त. दे. पुसतील मान०.–१० पं. तया गोपाळासी.–११ पं. मायबाप –१२ पं. पवती –१३ त. यासी.–१४ त. शाहाण्या.–१५ पं. बुडालासे.–१६ पं. त्यासि.–१७ त. काय.–१८ त. दे. लोकपाळ –१९ त. एक.–२० पं. निश्चितें.

आंत जीव त्यांचे ॥५॥ त्यांचे जीवें वरी आले त्या सकळां। एका त्या गोपाळांवांचूनियां ॥ ६ ॥ वांचणें तें आतां खोटें[1] संवसारीं। नव्हे भेटी जरी हरिसवें ॥ ७ ॥ सवें घेऊनियां चालली गोपाळां। अवघीं च बाळा नर नारी ॥ ८ ॥ नर नारी नाहीं मनुष्याचें नांव[3]। गोकुळ हें गांव सांडियेलें ॥ ९ ॥ सांडियेलीं अन्नें संपदा सकळ। चित्तीं तो गोपाळ धरुनि जाती ॥ १० ॥ तिरीं[4] माना घालूनियां उभ्या गाई। तटस्थ या डोहीं यमुनेच्या ॥ ११ ॥ यमुनेच्या तिरीं झाडें वृक्ष वल्ली। दुःखें कोमाइलीं कृष्णाचिया ॥ १२ ॥ यांचें त्यांचें दुःख एक जालें तिरीं। मग शोक करी मायबाप ॥ १३ ॥ मायबाप तुका ह्मणे सहोदर। तोंवरी च तीर न पवतां ॥ १४ ॥

४५४६. तीर देखोनियां यमुनेचें जळ। कांठीं च कोल्हाळ करिताती ॥ १ ॥ कइवाड नव्हे घालावया उडी। आपणासि ओढी भय मागें ॥ २ ॥ मागें सरे माय पाउला पाउलीं। आपलें[5] च घाली धाकें अंग ॥ ३ ॥ अंग राखोनियां माय[6] खेद करी। अंतरीचें हरी जाणवलें ॥ ४ ॥ जाणवलें मग देवें दिली बुडी। तुका ह्मणे कुडी भावना हे ॥ ५ ॥

४५४७. भावनेच्या मुळें अंतरला देव। शिरला संदेह भयें पोटीं ॥ १ ॥ पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें। वोलिल्या सरिसें न करवे ॥ २ ॥ न करवे त्याम यां[7] जीवाचा नास[8]। नारायण त्यास अंतरला ॥ ३ ॥ अंतरला बहु बोलतां वाउगें। अंतरींच्या त्यागेंविण गोष्टी ॥ ४ ॥ गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें। कोण कोण्याभावें रडती तीं ॥ ५ ॥ तीं गेलीं घरास आपल्या सकळ। गोधनें गोपाळ लोक माय ॥ ६ ॥ मायबापांची तों ऐसी जाली गति। तुका ह्मणे अंतीं फळों आलें ॥ ७ ॥

४५४८. आला त्यांचा[9] भाव देवाचिया मना। अंतरीं कारणांसाटीं होता ॥ १ ॥ होता भाव त्यांचा पाहोनि निराळा। नव्हता पाताळा गेला आधीं ॥ २ ॥ आधीं पाठीमोरीं जालीं तीं सकळें। मग या गोपाळें बुडी दिली ॥ ३ ॥ दिली हाक त्यांनें[10] जाऊनि पाताळा। जागविलें काळा भुजंगासि ॥४॥ भुजंग हा होता निजला मंदिरीं। निर्भर अंतरीं गर्वनिधि ॥ ५ ॥ गर्व हरावया आला नारायण। मिस या करून चेंडुवाचें ॥ ६ ॥ चेंडुवाचे मिसें काळया नाथावा। तुका ह्मणे देवा कारण हें ॥ ७ ॥

---

१ पं. जीवावरी.–२ कोठें.–३ दे. नावें.–४ पं. तीरी उभ्या माना घालूनियां गाई.–५ त. दे. आपल्या.–६ पं. माया.–७ दे. त. जीवाचा ना.–८ पं. नाश.–९ दे. त. यांचा भाव.– पं. भाव त्यांचा.–१० पं. तेणें.

४५४९. काळयाचे मागे चेंडु पत्नीपाशीं । तेजःपुंज राशी देखियेला ॥ १ ॥ लावण्यपूतळा सुखप्रभाराशी । कोटि रवि शशी उगवले ॥ २ ॥ उगवला खांबें कर्दळीचा गाभा । प्रौढें वांकी नभा देखे पायीं ॥ ३ ॥ पाहिला सकळ तिनें न्याहाळूनि । कोण या जननी विसरली ॥ ४ ॥ विसरु हा तीस कैसा याचा जाला । जीवाहुनि वाला दिसतसे ॥ ५ ॥ दिसतसे रूप गोजिरें लाहान । पाहातां लोचन सुखावले ॥ ६ ॥ पाहिलें पर्तोनि काळा दुष्टाकडे । मग ह्मणे कुडें जालें आतां ॥ ७ ॥ आतां हा उठोनि खाईल या बाळा । देईल वेल्हाळा माय जीव ॥८॥ जीव याचा कैसा वांचे ह्मणे नारी । मोहिली अंतरीं हरिरूपें ॥ ९ ॥ रूपें अनंताचीं अनंतप्रकार । न कळे साचार तुका ह्मणे ॥ १० ॥

४५५०. ह्मणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलों पुरवाया कोड त्याचें ॥ १ ॥ त्याचें आइकोन निष्ठुर वचन । भयाभीत मन जालें तीचें ॥ २ ॥ तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥ ३ ॥ वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आलें कांहीं आह्मांवरी ॥ ४ ॥ वरि उदकास अंत नाहीं पार । अक्षोभ सागर भरलासे ॥ ५ ॥ संचार करूनि कोण्या वाटे आला । ठायीं च देखिला अवचिता ॥ ६ ॥ अवचिता नेणों येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ॥ ७ ॥ मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवूनी काळ जागा ॥ ८ ॥ जागविला काळसर्प तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचिये ॥ ९ ॥ यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळ्याकृतांतेंधुधुकारें ॥ १० ॥ कारणें ज्या येथें आला नारायण । जालें दरुषण दोघांमध्यें ॥ ११ ॥ दोघांमध्यें जाले बोल परस्परें । प्रसंग उत्तरें युद्धाचिया ॥ १२ ॥ चिंतावला चित्तीं तोंडें बोले काळ । करीन सकळ ग्रास तुझा ॥ १३ ॥ जाला सावकाश झेंप घाली वरी । तंव हाणे हरि मुष्टिघातें ॥ १४ ॥ तेणें काळें त्यासि दिसे काळ तैसा । हरावया जैसा जीव आला ॥ १५ ॥ आठवले काळा हाकारिलें गोत । मिळालीं बहुत नागकुळें ॥ १६ ॥ कल्हारीं संधानीं वेष्टियेलों हरि । अवघा विखारीं व्यापियेला ॥ १७ ॥ यांस तुका ह्मणे नाहीं भक्ताविण । गरुडाचें चिंतन केलें मनीं ॥ १८ ॥

---

१ पं. खांबा.–२ दे. त. विसंबली.–३ दे. त. वाल्हा.–४ पं. आता उठोनियां खाईल.–५ पं. हरिरूपीं.–६ पं. अनंत अपार.–७ पं. नाहीं अंतपार.–८ पं. दिसतो.–९ दे. धूत्कारें.–१० त. दे. मधीं.–११ पं. बोल जाले.–१२ पं. प्रसंगें.–१३ पं. हाणी.–१४ दे. बहुतें.–१५ दे. त. धरियेला.–१६ त. अवघ्या.

४५५१. निजदास उभा तात्काळ पायांपें । स्वामी देखे सर्पें वेष्टियेलों ॥ १ ॥ लहानथोरें होतीं मिळालीं अपारें । त्याच्या धुंधुकारें निवारलीं ॥ २ ॥ निघतां आपटी धरूनि धांत्रामधीं । एकाचें चि वधी माथें पायें ॥ ३ ॥ एकीं जीव दिले येतां च त्या धाकें । येतील तीं एकें काकूळती ॥ ४ ॥ यथेष्ट भक्षिलीं पोट धाये वरी । तंव ह्मणे हरि पुरे आतां ॥ ५ ॥ आतां करूं काम आलों जयासाटीं । हरी घाली मिठी काळयासि ॥ ६ ॥ यासि नाथूनियां नाकीं दिली दोरी । चेंडू भार शिरीं कमळांचा ॥ ७ ॥ चालविला वरी बैसे नारायण । गरुडा आलिंगुन बहुडविलें ॥ ८ ॥ विसरु न पडे संवगड्या गाई । यमुनेच्या डोहीं लक्ष त्यांचें ॥ ९ ॥ त्याच्या गोष्टी कांठीं बैसोनि सांगती । बुडाला दाविती येथें हरि ॥ १० ॥ हरीचें चिंतन करितां आठव । तुका ह्मणे देव आला वरी ॥ ११ ॥

४५५२. अवचित त्यांणीं देखिला भुजंग । पळतील मग हाउ आला ॥ १ ॥ आला घेऊनियां यमुनेबाहेरी । पालवितो करीं गाडियांसि ॥ २ ॥ गाडियांसि ह्मणे वैकुंठनायक । या रे सकळिक मजपाशीं ॥ ३ ॥ मजपाशीं तुह्मां भय काय करी । जवळि या दुरी जाऊं नका ॥ ४ ॥ कानीं आइकिले गोविंदाचे बोल । ह्मणती नवल चला पाहों ॥ ५ ॥ पाहों आले हरीजवळ सकळ । गोविंदें[11] गोपाळ आलिंगिले ॥ ६ ॥ आल्या गाई वरी घालितील माना । वोरसेलें[12] स्तनीं[13] क्षीर लोटें ॥ ७ ॥ लोटती सैंकळें[14] एकावरी एक । होउनि पृथक कुर्वाळेलीं[15] ॥ ८ ॥ कुर्वाळे[16]श्रीं आनंदें घेती चारापाणी । तिहीं चक्रपाणी देखियेलें ॥ ९ ॥ त्यां च पाशीं होता परि केली माव । न कळे संदेह पडलिया ॥ १० ॥ याति वृक्ष वल्ली होत्या कोमेलिया । त्यांसि कृष्णें काया दिव्य दिली ॥ ११ ॥ दिलें गोविंदें त्या पदा नाहीं नाश । तुका ह्मणे आस निरसली ॥ १२ ॥

४५५३. आस निरसली गोविंदाचे भेटी । संवसारीं[17] तुटी पुढिलिया ॥ १ ॥ पुढें पैंठविलें गोविंदें गोपाळां । देउनि चपळां हातीं गुढी ॥ २ ॥ हाका आरोळिया देउनि नाचती । एक सादाविती हरि आला[18] ॥ ३ ॥ आरंधीं पडिलीं होतीं तयां घरीं । संकीर्ण त्या नारी नरलोक ॥ ४ ॥ लोका भूक तान नाहीं निद्रा डोळां । रूप वेळोवेळां आठविती ॥ ५ ॥ आहाकटा मग करिती गेलिया । आधीं ठावा तयां नाहीं कोणा ॥ ६ ॥ आधीं चुकी मग घडे आठवण । तुका ह्मणे जन परिचयें ॥ ७ ॥

---

१ पं. वेढियेला.–२ त. अपार–३ दे. धुदकारें.–४ दे. त. आफटी.–५ पं. एका तें चि वरी माथां पाये.–६ पं. भक्षिले.–७ पं. भारा.–८ आलिंगण.–९ पं. अवचिता.–१० पं. हरि–११ पं. गोधनें.–१२ पं. वोरमल्या.–१३ त. स्थना.–१४ पं. सकळ.–१५ त. कृर्वाळिलीं. पं. कुरवाळिलीं.–१६ त. देखिलिया.–१७ त. संवसार तुटी०.–१८ पं. पाठविले गोविंदें गोपाळ। ०चपळहातीं०.–१९ त. दे. आले.

४५५४. जननी हे ह्मणे आहा काय जालें । शरीर रक्षिलें काय काजें[1] ॥ १ ॥ काय काज आतां हरिविण जिणें । नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥ २ ॥ हें दुःख न सरे हरि न भेटे तों । त्यामागें चि जातों एका वेळे ॥ ३ ॥ एकवेळ जरी देखतें मी आतां । तरी जीवापरता न करितें ॥ ४ ॥ करितां हे मात हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका ह्मणे ॥ ५ ॥

४५५५. शुभ मात तिहीं आणिली गोपाळीं । चेंडू वनमाळी घेउनि आले ॥ १ ॥ आली दारा देखे हरुषाची गुढी । सांगेतली[2] पुढी हरुषें[3] मात ॥ २ ॥ हरुषलीं माता केलें निंबलोण । गोपाळांवरून कुरवंडी ॥ ३ ॥ गोपाळां भोवतें मिळालें गोकुळ । अवघीं सकळ लहान थोरें ॥ ४ ॥ थोर सुख जालें ते काळीं आनंद । सांगती[4] गोविंद वरि आला ॥ ५ ॥ आले वरि बैसोनियां नारायण । काळया नाथून वहन केलें ॥ ६ ॥ नगराबाहेरी निघाले आनंदें । लावूनियां वाद्यें नाना घोष ॥ ७ ॥ नारायणापुढें गोपाळ चालती । आनंदें नाचती गाती गीत ॥ ८ ॥ तंव तो देखिला वैकुंठींचा पती । लोटांगणीं जाती[5] सकळ ही ॥ ९ ॥ सकळ ही एका भावें आलिंगिले । अवघियां जाले अवघे हरि ॥ १० ॥ हरि आलिंगनें[6] हरिरूप जालीं । आप विसरलीं आपणास ॥ ११ ॥ सकळांसी सुख एक दिलें देवें । मायबापभावें[7] लोकपाळां ॥ १२ ॥ मायबाप देवा नाहीं लोकपाळ । सारिखीं सकळ तुका ह्मणे ॥ १३ ॥

४५५६. नेणें वर्ण[8] धर्म जीं आलीं सामोरीं । अवघीं च हरी आळिंगिलीं[9] ॥ १ ॥ हरि लोकपाळ आले नगरांत । सकळांसहित मायबाप[10] ॥ २ ॥ पारणें तयांचें जालें एका वेळे । देखिलें सावळें परब्रह्म ॥ ३ ॥ ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढिया उभविती घरोघरीं ॥ ४ ॥ घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंग माळा चौकदारीं ॥ ५ ॥ दारीं वृंदावनें तुळसीचीं वनें । रामकृष्णगाणें नारायण ॥ ६ ॥ नारायण तिहीं पूजिला बहुतीं । नाना पुष्पयाती करूनियां ॥ ७ ॥ यांचें ऋण नाहीं फिटलें मागील । पुढें भांडवल जोडिती हीं ॥ ८ ॥ हीं नव्हतीं कधीं या देवा वेगळीं । केला वनमाळी सेवाऋणी ॥ ९ ॥ सेवाऋणें तुका ह्मणे रूपधारी । भक्तांचा कैवारी नारायण ॥ १० ॥

४५५७. नारायण आले निजमंदिरासि । जाले या लोकांसि बहुडविते ॥ १ ॥ बहुडविले बहु केलें समाधान । विसरु[11] तो क्षण नका माझा ॥ २ ॥ मात सांगितली

१ त. काजे.–२ त. सागतील–३ पं. हरुष.–४ त. सांगतां.–५ पं. देती.–६ पं. आलिंगनीं.–
७ दे. त. मायबापां भावें.–८ त. वर्णी.–९ पं. आलिंगिला.–१० त. मायबाप.–११ पं. हा.

सकळ वृत्तांत । केलें दंडवत सकळांनीं ॥ ३ ॥ सकळां भातुकें वांटिल्या साखरा । आपलाल्या घरा लोक गेले ॥ ४ ॥ लोक गेले कामा गाईपें गोपाळ । वारली सकळ लोभापाठीं ॥ ५ ॥ लोभ दावुनियां आपला विसर । पाडितो कुमर धनआशा ॥ ६ ॥ आशेचे बांधले तुका ह्मणे जन । काय नारायण ऐसों जाणे ॥ ७ ॥

४५५८. जाला कवतुक करितां रोकडें । आणीक ही पुढें नारायण ॥ १ ॥ येउनियां पुढें धरिला मारग । हरावया भाग इंद्रयाँजीं ॥ २ ॥ इंद्रा दहीं दुध तूप नेतां लोणी । घेतलें हिरोनि वाटे त्यांचें ॥ ३ ॥ हिरोनि घेतल्या कावडी सकळा । ह्मणती गोपाळा बरें नव्हे ॥ ४ ॥ नव्हे तें चि करी न भे कळिकाळा । तुका ह्मणे लीळा खेळे देव ॥ ५ ॥

४५५९. खेळ नव्हे बरा इंद्र कोपलिया । देव ह्मणे तयां भेऊं नका ॥ १ ॥ नका धरूं भय धाक कांहीं मनीं । बोले चक्रपाणि गौळियांसि ॥ २ ॥ गौळियांसि धीर नाहीं या वचनें । आशंकितमनें वेडावलीं ॥ ३ ॥ वेडावलीं त्यांसि न कळतां भाव । देवाआदिदेव नोळखतां ॥ ४ ॥ नोळखतां दुःखें वोंहाती शरीरीं । तुका ह्मणे वरि भारवाही ॥ ५ ॥

४५६०. भारवाही नोळखती या अनंता । जवळी असतां अंगसंगें ॥ १ ॥ अंगसंगें तया न कळे हा देव । कळोनि संदेह माँगुताला ॥ २ ॥ मागुती पडती चिंतेचिये डोहीं । जयाची हे नाहीं बुद्धी स्थिर ॥ ३ ॥ बुद्धी स्थिर होउं नेदी नारायण । आशाबद्ध जन लोभिकांची ॥ ४ ॥ लोभिकां न साहे देवाचें करणें । तुका ह्मणे तेणें दुःखी होती ॥ ५ ॥

४५६१. दुःखी होती लोभें करावें तें काई । उडतील गाई ह्मैसी आतां ॥ १ ॥ आणीकही कांहीं होईल अरिष्ट । नायिके हा धीट सांगितलें ॥ २ ॥ सांगों चला याच्या मायबापांपाशीं । निघाले घरासि देवा रागें ॥ ३ ॥ रागें काला देतां न घेती कवळ । टोकवी गोपाळ क्रोधियांसि ॥ ४ ॥ क्रोध देवावरि धरियेला राग । तुका ह्मणे भाग न लभती ॥ ५ ॥

४५६२. भाग त्या सुखाचे वांकड्यां बोवड्यां । आपलिया गड्यां भाविकांसि ॥ १ ॥ भारवाही गेले टाकुनि कावडी । नवनीतगोडी भाविकांसि ॥ २ ॥ काला करूनियां वांटिला सकळां । आनंदें गोपाळांमाजी खेळे ॥ ३ ॥ खेळेमेळें

---

१ त. गेले आपलाल्या घरा लोक.–२ पं. जाणे ऐसा.–३ पं. दे. इंद्रापाशीं.–४ पं. वाहातीव शिरीं ।–५ त. भार पाठीं ।.–६ त. मागुताले.–७ पं. राहों.–८ पं. लोभिकांसी.–९ त. खेळां हे न०.

दहीं दुध तूप खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥ ४ ॥ कवणाचें चाले तुका ह्मणे बळ । जयासी गोपाळ साह्य जाला ॥ ५ ॥

४५६३. जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वांकुल्या गोपाळ दाविताती ॥ १ ॥ ताताडिया मेघां आज्ञा करी राव । गोकुळींचा ठाव उरों नेदौं[3] ॥ २ ॥ नेदावियां गाई ह्मसी वांचों लोक । पुरा सकळिक सिळाधारीं ॥ ३ ॥ धाक नाहीं माझा मोवळियां पोरां । सकळिक मारा ह्मणे मेघां ॥ ४ ॥ ह्मणविती देव आपणां तोंवेरी । जंव नाहीं वरी कोपलों मी ॥ ५ ॥ मीपणें ह्मा देव न कळे चि त्यांसी । अभिमानें रासि गर्वाचिया ॥ ६ ॥ अभिमानरासि जयाचिये ठायीं । तुका ह्मणे तई देव दुरी ॥ ७ ॥

४५६४. देव त्यां फावला भाविकां गोपाळां । नाहीं तेथें कळा अभिमान ॥ १ ॥ नाडलीं आपल्या आपण चि एकें । संदेहदायकें बहुफारें ॥ २ ॥ फारें चाळविलीं नेदी कळों माव । देवाआदिदेव विश्वंभर ॥ ३ ॥ विश्वासावांचुनि कळों नये खरा । अभक्तां अंधीरा जैसा तैसा ॥ ४ ॥ जैसा भाव तैसा जवळि त्या दुरि । तुका ह्मणे हरि देतो घेतो ॥ ५ ॥

४५६५. तो या साच भावें न कळे चि इंद्रा । ह्मणउनि धारा घाली सिळां ॥ १ ॥ घाली धारा मेघ कडाडिला माथा । वरि अवचिता देखियेला ॥ २ ॥ देखती पाऊस वोळला गोपाळ । भ्याले हे सकळ विचारिती ॥ ३ ॥ विचार पडला विसरले खेळ । अन्याय गोपाळ ह्मणती केला ॥ ४ ॥ लागलेंसे गोड न कळे ते काळीं । भेणें वनमाळी आठविती ॥ ५ ॥ आतां काय कैसें करावा विचार । गोधनासि थार आपणिया ॥ ६ ॥ यांचिया विचारें होणार तें काई । तुका ह्मणे ठायीं वेडावलीं ॥ ७ ॥

४५६६. वेडावलीं काय करावें या काळीं । ह्मणे वनमाळी गोपाळांसि ॥ १ ॥ शिरीं[11] धरूं गोवर्द्धन उचलूनि । ह्मणे तुह्मी कोणी भिऊं नका ॥ २ ॥ नका सांडूं कोणी आपला आवांका । मारितां या हाका आरोळिया ॥ ३ ॥ अशंकित चित्तें न [12]वंटे त्यां खरें । धाकें च ते वरें ह्मणती चला ॥ ४ ॥ चित्तीं धाक परि जवळी अनंत । तुका ह्मणे घात होऊं नेदी ॥ ५ ॥

४५६७. नेदी दुःख देखों दासा नारायण । ठेवी निवारून आल्या आधीं ॥ १ ॥ आधीं [13]पुंढें शुद्ध करावा मारग । [14]दोंसांमागें मग सुखरूप ॥ २ ॥ पर्वतासि हात

१ पं. लोणी.–२ त. वांकल्या.–३ त. नेदीं–४ पं. गौळियांच्या पोरां ।.–५ पं. तंववरी । नाहीं जंववरी०.–६ त. अंधारा.–७ पं. घेतो देतो.–८ पं. मेघा.–९ पं. घालीं मेघ धारा– १० त. ऐसा.–११ पं. शिरीं गोवर्धन धरा उचलूनि ।.–१२ पं. वाटे.–१३ पं. शुद्ध पुढें.– १४ पं. दासामागेंमागें.

लाविला अनंतें । तो[1] जाय वरतें आपेंआप ॥ ३ ॥ आपल्याआपण उचलिला गिरी । गोपाळ हे कैरी निमित्यासि ॥ ४ ॥ निमित्य करूनि करावें कारण । करितां आपण कळों नेदी ॥ ५ ॥ दिनाचा कृपाळु पतितपावन । हें करी वचन सांच खरें ॥ ६ ॥ सांगणें न लगे सुखदुःख दासा । तुका ह्मणे ऐसा कृपावंत ॥ ७ ॥

४५६८. कृपावंतें हाक दिली सकळिकां । माजिया रे नका राहों कोणी ॥ १ ॥ निघाले या भेणें पाउसाच्या जन । देखे गोवर्द्धन उचलिला ॥ २ ॥ लाविले गोपाळ फेरीं चहूंकडे । हांसे फुंदे रडे कोणी धाकें ॥ ३ ॥ धाकें हीं सकळ निघालीं[3] भीतरी । उचलिला गिरी तयाखालीं ॥ ४ ॥ तयाखालीं गाई वत्सें आलीं लोक । पक्षी सकळिक जीवजाति ॥ ५ ॥ जिहीं ह्मणविलें हरीचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी ॥ ६ ॥ जाति कुळ नाहीं तयासि प्रमाण । अनन्या अनन्य तुका ह्मणे ॥ ७ ॥

४५६९. त्यांसि राखे बळें आपुले जे दास । कळिकाळासि वास पाहों नेदी ॥ १ ॥ पाउस न येतां केली यांची थार । लागला तुषार येऊं मग ॥ २ ॥ येउनि दगड बैसतील गिरी । वरुषला धारीं शिळांचिये ॥ ३ ॥ शिळांचिये धारीं वरुषला आकांत । होता दिवस सात एक सरें ॥ ४ ॥ एक सरें गिरि धरिला गोपाळीं । होतों[4] भाव वळी आह्मी ऐसे ॥ ५ ॥ ऐसें कळों आलें देवाचिया चित्ता । ह्मणे तुह्मीं आतां हात सोडा ॥ ६ ॥ हांसती गोपाळ करूनि नवल । आइकोनि बोल गोविंदाचे ॥ ७ ॥ दावितील डोया गुडघे कोपर । फुटले तें[5] भार उचलितां ॥ ८ ॥ भार आह्मांवरि घालुनि निराळा । राहिलासि डोळा चुकवुनि ॥ ९ ॥ निमित्य अंगुळी लावियेली वरी । पाहों कैसा गिरी धरितोसि ॥ १० ॥ सिगले हे[6] होते ठायींच्या त्या भारें । लटिकें चि खरें मानुनियां ॥ ११ ॥ यांणीं अंत पाहों आदरिला याचा । तुका ह्मणे वाचा वाचाळ ते ॥ १२ ॥

४५७०. वाचाळ लटिके अभक्त जे खळ । आपुलें तें बळ वांखाणावें ॥ १ ॥ बळें हुंबरती सत्य त्यां न कळे । नुघडती डोळे अंधळ्यांचे ॥ २ ॥ आसुडिल्या माना हात पाय नेटें । तंव भार वोटें उचलिला ॥ ३ ॥ लटिका चि आह्मीं सीण केला देवा । कळों आलें तेव्हां सकळांसि ॥ ४ ॥ आलें कळों तुका ह्मणे अनुभवें । मग अहंभावें सांडवले ॥ ५ ॥

---

१ त. तें.–२ त. फेरी.–३ पं. निघाले.–४ होता भावचळी आह्मां ऐसा । न. होता भावचळी आह्मी ऐसा.–५ पं. तो –६ पं. ही होते ठायीं च त्या भारें ।.–७ दे. वाखाणीती.–८ दे. सांडवली.

४५७१. सांडवले सकळांचे अभिमान । आणिले शरण लोटांगणीं ॥ १ ॥ लोटांगणीं आले होऊनियां दीन । मग नारायण ह्मणे भलें ॥ २ ॥ भला [1]आजि तुह्मी केला साच पण । गिरि गोवर्धन उचलिला ॥ ३ ॥ लागती चरणा सकळ ते काळीं । आह्मांमध्यें बळी तूं चि एक ॥ ४ ॥ एका तुजविण न यों आह्मी कामा । कळों कृष्णा रामा आलें आजी ॥ ५ ॥ आजिवरि आह्मां होता अभिमान । नेणतां चरणमहिमा तुझा ॥ ६ ॥ तुझा पार आह्मी नेणों नारायणा । नखीं गोवर्द्धना राखियेलें ॥ ७ ॥ राखियेलें गोकुळ आह्मां सकळांसि । [2]देगडाच्या राशी वरुषतां ॥ ८ ॥ वर्णावें तें काय तुझें महिमान । धरिती चरण [3]सकळ ही ॥ ९ ॥ सकळ ही तान विसरलीं भूक । सकळ ही सुख दिलें त्यांसि ॥ १० ॥ त्यासि कळों आला वैकुंठनायक । तुका ह्मणे लोक निर्भर ते ॥ ११ ॥

४५७२. लोकां कळों आला देव आह्मांमधीं । टाकिली उपाधि तिहीं शंका ॥ १ ॥ शंका नाहीं थोरां लाहानां जीवांसि । [4]कळला हा हृषीकेशी मग ॥ २ ॥ मग मनीं जाले निर्भर सकळ । संगें लोकपाळ कृष्णाचिया ॥ ३ ॥ कृष्णाचिया ओंव्या गाणें गाती गीत । कृष्णमय चित्त जालें त्यांचें ॥ ४ ॥ त्यांसि ठावा नाहीं बाहेरिल भाव । [5]अंतरीं च वाव सुख जालें ॥ ५ ॥ [6]सुखें तया दीस न कळे हे राती । अखंड या ज्योती गोविंदाची ॥ ६ ॥ चिंतनें चि धालीं न लगे अन्नपाणी । तुका ह्मणे मनीं समाधान ॥ ७ ॥

४५७३. समाधान त्यांची इंद्रियें सकळ । जयां [7]तो गोपाळ समागमें ॥ १ ॥ गोविंदाचा जाला प्रकाश भीतरी । मग त्यां बाहेरी काय काज ॥ २ ॥ [8]काज काम त्यांचे सरले व्यापार । नाहीं आप पर माझें तुझें ॥ ३ ॥ माया सकळांची सकळां ही वरी । विषय तें हरि दिसों नेदी ॥ ४ ॥ दिसे तया आप [9]परावें सारिखें । तुका ह्मणे सुखें कृष्णाचिया ॥ ५ ॥

४५७४. कृष्णाचिया सुखें भुक नाहीं तान । सदा समाधान सकळांचें ॥ १ ॥ कळलें चि नाहीं [10]जाले किती दिस । बाहेरिल [11]वास विसरलीं ॥ २ ॥ [12]विसरले कामाचा तुका ह्मणे जाला । उद्वेग राहिला जावें यावें ॥ ३ ॥

४५७५. जावें बाहेरी हा नाठवे विचार । नाहीं समाचार ठावा कांहीं ॥ १ ॥ कांहीं न कळे तें कळों आलें देवा । मांडिला रिघावा कवतुक ॥ २ ॥ कवतुकासाठीं

१ पं. तुह्मी आजी –२ त. दगडाचे –३ त. दे. सकळिक.–४ पं. कळला हृषीकेशी तेव्हां मग ।–५ पं. अंतरींचें वाव०.–६ पं. सुख तया दीसे०.–७ पं. ते –८ पं. काम काज.–९ पं. पराने.–१० पं. किती जाले.–११ पं. यास –१२ पं. विसर.

भक्त देहावरि । आणिताहे हरि बोलावया ॥ ३ ॥ यासि नांव रूप नाहीं हा आकार । कळला साचार भक्ता मुखें ॥ ४ ॥ मुखें भक्तांचिया बोलतो आपण । अंगसंगें भिन्न नाहीं दोघे[2] ॥ ५ ॥ दोघे वेगळाले लेखिल जो कोणी । तयाचा मेदिनी बहु भार ॥ ६ ॥ तयासी घडलीं सकळ ही पापें । भक्तांचिया कोपें निंदा द्वेषें ॥ ७ ॥ द्वेषियाचा संग न घडावा कोणा । विष जेंवी प्राणां नाश करी ॥ ८ ॥ करितां आइके निंदा या संतांची । तया होती ते चि अधःपात ॥ ९ ॥ पतन उद्धार संगाचा महिमा । त्यजावें अधमा संत सेवीं ॥ १० ॥ संत[3]सेवीं जोडे महालाभरासी । तुका ह्मणे यासि नाश नाहीं ॥ ११ ॥

४५७६. नाहीं नाश हरि आठवितां मुखें । जोडतील सुखें सकळ ही ॥ १ ॥ सकळ ही सुखें बोळलीं अंतरीं । मग त्याबाहेरी काय काज ॥ २ ॥ येऊं विसरलीं बाहेरी गोपाळें । तल्लीन सकळें कृष्णसुखें ॥ ३ ॥ सुख तें योगियां नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशु जीवां ॥ ४ ॥ वारला पाऊस केव्हां नाहीं ठावा । तुका ह्मणे देवावांचूनियां ॥ ५ ॥

४५७७. यांसि समाचार सांगतों सकळा । चलावें गोकुंळा ह्मणे देव ॥ १ ॥ देव राखे तया आडलिया काळें । देव सुखफळें देतो दासां ॥ २ ॥ दासां दुःख देखों नेदी आपुलिया । निवारी आलिया न कळतां ॥ ३ ॥ नाहीं मेघ येतां जातां देखियेला । धारीं वरुषला शिळांचिये ॥ ४ ॥ एवढें भक्तांचें सांकडें अनंता । होय निवारिता तुका ह्मणे ॥ ५ ॥

४५७८. काकुलती एकें पाहाती बाहेरी । तया ह्मणे हरि वोसरला ॥ १ ॥ वोसरला मेघ आला होता काळ । बाहेरी सकळ आले लोक ॥ २ ॥ कवतुक जालें ते काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ॥ ३ ॥ भावें तयापुढें नाचती सकळें । गातील मंगळें[11] ओंव्या गीत ॥ ४ ॥ गीत गाती ओंव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहोरी वांती पांवे ॥ ५ ॥ वत्सें गाई पशू नाचती आनंदें । वेधलिया छंदें गोविंदाच्या ॥ ६ ॥ चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोणें तें दैवाचें तयाहुनि ॥ ७ ॥ तयाहुनि कोणी नाहीं भाग्यवंत । अखंड सांगात गोविंदाचा ॥ ८ ॥ गोविंदाचा संग तुका ह्मणे ध्यान । गोविंद ते जन गोकुळींचे ॥ ९ ॥

---

१ दे. त. भक्ती मुखें.–२ त. दे. दोघां.–३ त. सेवी संत.–४ पं. •विसरले बाहेरी गोपाळ । तल्लीन सकळ कृष्ण•.–५ पं. गोपाळा.–६ पं. जातां येतां.–७ पं. शिळांचिया.–८ पं. सांकडें भक्ताचें.–९ पं. एक.–१० पं. सकळ.–११ पं. मंगळ.–१२ पं. वाहाती.–१३ पं. वत्स.–१४ त. कोण दइवाचें.

४५७९. गोकुळींची गती कोण जाणे परि । पाहों आला वरी इंद्रराव[1] ॥ १ ॥ इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करुनि आलों ॥ २ ॥ आतां जीवें[2] नाहीं सांगाया ते रानीं । पुरिलें पाषाणीं शिळाधारीं ॥ ३ ॥ रिता कोठें नाहीं [3]राहों दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ॥ ४ ॥ न कळतां देव बळें हुंबरती । साच ते पावती अपमान ॥ ५ ॥ भाव न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टी पाहावया ॥ ६ ॥ पाहतां तें आहे जैसें होतें तैसें । नाचती विशेषें तुका ह्मणे ॥ ७ ॥

४५८०. नाचतां देखिलीं गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ॥ १ ॥ लागला पाऊस शिळांचिये[4] धारीं । वांचलीं हीं[5] परी कैसीं येथें ॥ २ ॥ येथें आहे नारायण संदेह नाहीं । विघ्न केलें ठायीं निर्विघ्नें[6] तें ॥ ३ ॥ विचारितां उचलिला गोवर्द्धन । अवतार पूर्ण कळों आला ॥ ४ ॥ आला गौळियांच्या घरा नारायण । करितो स्तवन इंद्र त्यांचें[7] ॥ ५ ॥ त्यांच्या[8] पुण्या पार कोण करी लेखा । न[9] कळे चतुर्मुखा ब्रह्मयासि ॥ ६ ॥ सीणतां जो ध्यानीं[10] न ये एकवेळा । तो तया गोपाळां समागमें ॥ ७ ॥ समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुरवाळितां[11] अंगसंग ॥ ८ ॥ संग जाला मायबापां लोकपाळां । आलिंगिती गळा कंठाकंठ ॥ ९ ॥ [12]करिते हे जाले स्तुती सकळिक । देव इंद्रादिक गोविंदाची ॥ १० ॥ करितील वृष्टी पुष्पवरुषाव । देवआदिदेव पूजियेला ॥ ११ ॥ पुष्पांजुळी मंत्र घोष जयजयकार । दुमदुमी अंबर तेणें नादें ॥ १२ ॥ [13]नामाचे गजर गंधर्वांचीं गाणीं । आनंद [14]भुवनीं न माये तो ॥ १३ ॥ तो सुखसोहळा अनुपम्य रासी । गोकुळीं देवासी दोहीं ठायीं ॥ १४ ॥ दोहीं ठायीं सुख दिलें नारायणें । गेला दरुषणें वैरभाव ॥ १५ ॥ भावना भेदाची जाय उठाउठी । तुका ह्मणे भेटी गोविंदाचे[15] ॥ १६ ॥

४५८१. गोविंदाचें नाम गोड घेतां वाचे । तेथें[16] हे कइंचे वैरभाव ॥ १ ॥ भावें नमस्कार घातले[17] सकळीं । लोटांगणें[18] तळीं महीवरि ॥ २ ॥ वरि हातबाहे उभारिली देवें । कळलीया भावें सकळांच्या ॥ ३ ॥ [19]सकळ ही वरि वहुडविले स्थळा । चलावें गोपाळा ह्मणे घरा ॥ ४ ॥ राहिलीं हीं[20] नाचों गोविंदाच्या बोलें । पडिलीया डोलें[21] छंदें हो तीं ॥ ५ ॥ छंद तो नावरे आपणा आपला । आनंदाचा

---

१ त. इद्रावो.–२ पं. ०नाहीं जीव सांगावया रानीं ।.–३ पं. उगों.–४ पं. शिळांचिया.–५ पं. हे.–६ त. निरविघ्न ।.–७ त. यांचें.–८ त. यांच्या.–९ पं. नव्हे चतु०.–१० पं. ध्यानीं.–११ त. कुवाळिता.–१२ पं. करिता हे स्तुती जाली सकळिक.–१३ पं. नामाचा.–१४ पं. त्रिभुवनीं नसमाये.–१५ पं. गोविंदाची.–१६ पं. तेथें राहे कैंचे देहभाव ।.–१७ पं. घातला.–१८ पं. लोटांगण.–१९ पं. सकळा.–२० पं. हे.–२१ पं. डोळे छंद०.

आला होता त्यांसि ॥ ६ ॥ त्यांच्यों तुका ह्मणे आनंदें सकळ । ठेंगणें गोपाळ समागमें ॥ ७ ॥

४५८२. समागमें असे हरि नेणतियां । नेदी जाऊं वांयां अंकितांसि ॥ १ ॥ अंकितां सावध केलें नारायणें । गोपाळ गोधनें सकळिकां ॥ २ ॥ सकळही जन आले गोकुळासि । आनंद मानसीं सकळांच्या ॥ ३ ॥ सकळांचा केला अंगीकार देवें[6] । न कळतां भावें वांचवी त्यां ॥ ४ ॥ त्यां जाला निर्धार हरि आह्मांपासीं । निवांत मानसीं निर्भर तीं[8] ॥ ५ ॥ निर्भर हे जन गोकुळींचे लोक । केले सकळिक नारायणें ॥ ६ ॥ नारायण भय येऊं नेदी गांवा । तुका ह्मणे नांवा अनुसरे त्या ॥ ७ ॥

४५८३. ये दशे चरित्र केलें नारायणें । रांगतां गोधनें राखिताहे ॥ १ ॥ हें सोंग सारिलें या रूपें अनंतें । पुढें हि वेहु तें करणें आहे ॥ २ ॥ आहे तुका ह्मणे धर्म संस्थापणें । केला ना[12]रायणें अवतार ॥ ३ ॥

४५८४. अवतार केला संहारावे[13] दुष्ट । करिती हे नष्ट परपीडा ॥ १ ॥ परपीडा करी दैत्य कंसराव । पुढें तो ही भाव आरंभिला ॥ २ ॥ लाविलें लाघव पाहोनियां संधी । स[14]कळांही वधी दु[15]ष्टजना ॥ ३ ॥ दुष्टजन परपीडक जे कोणी । ते[16] या चक्रपाणी न साहति ॥ ४ ॥ न साहवे दुःख भक्तांचें या देवा । अवतार घ्यावा लागे रूप ॥ ५ ॥ रूप हें चांगलें रामकृष्ण नाम । हरे भवश्रम उच्चारितां ॥ ६ ॥ उच्चारितां नाम कंसें[19] वैरभावें । हरोनियां जीवें[20] कृष्ण केला ॥ ७ ॥ कृष्णरू त्यासि दिसे अवघें जन । पाहे तों आपण कृष्ण जाला ॥ ८ ॥ पाहिलें दर्पण आंधिल मुखासि । चतुर्भुज त्यासि तो चि जाला ॥ ९ ॥ जाली कृष्णरूप कन्य पुत्र भाज । तुका ह्मणे राज्य सैन्य जन ॥ १० ॥

४५८५. सैन्य जन हांसे राया जालें काई । वोसपे तो ठायीं आपणासि ॥ १ ॥ आपणा आपण जै[23]यास तीं तैसीं । वैरभाव ज्यांसि भक्ति नाहीं ॥ २ ॥ नाहीं याचा त्याचा भाव एकविध । ह्मणउनि छंद वेगळाले ॥ ३ ॥ वेगळाल्या भावें तीं[24] तया हांसती । तयास दिसती अवघीं हरि ॥ ४ ॥ हरिला कंसाचा जीव भाव देवें । द्वेषाचिया भावें तुका ह्मणे ॥ ५ ॥

---

१ पं. त्यासी.–२ पं. आनद मकळा ।.–३ पं. गोपाळा.–४ पं. हरि असे.–५ पं. मकळही–६ त. कळे ते भावें०.–७ त. त्यांजला०.–८ पं. ते.–९ पं. यादृश्य चरित्र०.–१० पं. बहुत करणे०–११ पं. सस्थापन.–१२ पं. नारायण.–१३ पं. संहाराया.–१४ पं. मकळ–१५ पं. दुष्टजन.–१६ पं. तयां०.–१७ पं. साहे ते दु:ख०.–१८ त. नाम कृष्णराम ।.–१९ त. कौंसें.–२० पं. जीव–२१ पं. आंधिल्या.–२२ पं. वोसंगे.–२३ पं. जाय सर्वी तैसीं ।.–२४ पं. ते.

४५८६. द्वेषाचिया ध्यानें हरिरूप जाले । भाव हारपले देहादिक ॥ १ ॥ देहादिक कर्मे अभिमान वाढे । तया कंसा जोडे नारायण ॥ २ ॥ नारायण जोडे एकविध भावें । तुका ह्मणे जीवें जाणें लागे ॥ ३ ॥

४५८७. जीवभाव त्याचा गेला अभिमान । ह्मणऊनि जन हांसे कंसा ॥ १ ॥ सावध करितां नये देहावरि । देखोनियां दुरि पळे जनें[2] ॥ २ ॥ जन वन हरि जालासे आपण । मग हे लोचन झांकियेले ॥ ३ ॥ झांकुनि लोचन मौन्यें चि राहिला । नाहीं आतां बोलायाचें काम ॥ ४ ॥ बोलायासि[3] दुजें नाहीं हें उरलें[4] । जन कृष्ण जाले स्वयें रूप ॥ ५ ॥ रूप पालटलें गुण नाम याति । तुका ह्मणे भूतीं देव जाला ॥ ६ ॥

४५८८. जालों स्वयें कृष्ण आठव हा चित्तीं । भेद[6] भयवृत्ति उरली आहे ॥ १ ॥ उरली[7] आहे रूप नांव दिसे भिन्न । मी आणि हा कृष्ण आठवतो ॥ २ ॥ तोंवरि हा देव नाहीं तयापासीं । आला दिसे त्यासि तो चि देव ॥ ३ ॥ देवरूप त्याची[8] दिसे वरी काया । अंतरीं तो भयाभीत भेदें[9] ॥ ४ ॥ भेदें तुका ह्मणे अंतरे गोविंद । सांचें विण छंद वांयां जाय ॥ ५ ॥

४५८९. वांयां तैसे बोल हरिशीं अंतर । केले होती चार भयभेदें ॥ १ ॥ भेदभय गेलें नोळखे आपणा । भेटी नारायणा कंसा जाली ॥ २ ॥ जाली भेटी कंसा हरिशीं निकट । सन्मुख चि नीट येरयरां ॥ ३ ॥ येरयरां भेटी युद्धाच्या[11] प्रसंगीं[12] । त्याचें शस्त्र [13]अंगीं हाणितलें ॥ ४ ॥ त्याचें वर्म होतें ठावें या अनंता । तुका ह्मणे सत्तानायक हा ॥ ५ ॥

४५९०. नारायणें कंस चाणूर मर्दिलें[14] । राज्यीं बैसविलें उग्रसेन ॥ १ ॥ उग्रसेन स्थापियेला शरणागत । पुरविला अंत अभक्ताचा ॥ २ ॥ अवघें चि केलें कारण अनंतें । आपुलिया हातें सकळ ही ॥ ३ ॥ सकळ ही केलीं आपुलीं अंकित । राहे गोपीनाथ मथुरेसि ॥ ४ ॥ मथुरेसि आला वैकुंठनायक । जालें सकळिक एक राज्य ॥ ५ ॥ राज्य दिलें उग्रसेना शरणागता । सोडविलीं माता पिता दोन्ही ॥ ६ ॥ सोडवणे धांवे भक्ताच्या कैवारें । तुका ह्मणे करें शस्त्र धरी ॥ ७ ॥

४५९१. धरी दोही ठायीं सारखा चि भाव । देवकी वसुदेव नंद दोघे ॥ १ ॥ दोन्ही एके ठायीं केल्यां[16] नारायणें । वाढविला तिणें आणि व्याली ॥ २ ॥ व्याला

१ पं. भावें–२ त. जना.–३ त. बोलायास.–४ पं. राहिलें.–५ त. जाला.–६ पं. भयभेदवृत्ति.–७ पं. उरले असे.–८ पं. त्यानी.–९ पं. भयें.–१० पं. नादवीन.–११ त. योद्धयाच्या.–१२ पं. प्रसंगे.–१३ त. आंगा हांतिले त्या ।.–१४ पं. मर्दिले.–१५ पं. स्थापियेलें उग्रसेना.–१६ पं. केलीं.

वाढला हा आपल्यी आपण । निमित्या कारणें मायबाप ॥ ३ ॥ माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासि ॥ ४ ॥ कोण जाणे योचे अंतरींचा भाव । [3]कळों नेदी माव तुका ह्मणे ॥ ५ ॥

४५९२. दिनाचा कृपाळु दुष्टजना काळ । एकला सकळ व्यापक हा ॥ १ ॥ हांसे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये पराकृत ह्मणों यासि ॥ २ ॥ यासि कळावया एक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव धांडोळितां ॥ ३ ॥ धांडोळितां श्रुति राहिल्या निश्चित । तो करी संकेत गोपींसवें ॥ ४ ॥ गोपिकांची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखतां ॥ ५ ॥ न देखतां त्यांसि उठे बैसे पाहे । वेडावला राहे वेळोवेळां ॥ ६ ॥ वेळोवेळां पंथ पाहे गोपिकांचा । तुका ह्मणे वाचा नातुडे तों[4] ॥ ७ ॥

४५९३. तो बोले कोमळ निष्ठुर साहोनि । कोपतां गौळणी हास्य करी ॥ १ ॥ करावया दास्य भक्तांचें निर्लज्ज । कवतुकें रज माथां वंदी ॥ २ ॥ दिलें उग्रसेना मथुरेचें राज्य । सांगितलें काज करी त्याचें ॥ ३ ॥ त्यासि होतां कांहीं अरिष्टनिर्माण । निवारी आपण शरणागता ॥ ४ ॥ शरणागतां राखे सर्व भावें हरि । अवतार धरी तयांसाटीं ॥ ५ ॥ तयांसाटीं वाहे सुदर्शन गदा । उभा आहे सदा सांभाळित ॥ ६ ॥ तळमळ नाहीं तुका ह्मणे चित्ता । भक्तांचा अनंता भार माथां ॥ ७ ॥

४५९४. मारिले असुर दाटले मेदिनी । होते कोणाकोणी पीडित ते ॥ १ ॥ ते[10] हा नारायण पाठवी अघोरा । संतांच्या मत्सरा घांतावरी ॥ २ ॥ [11]वैरिले ते दूतीं यमाचिया दंडीं । नुचारितां तोंडीं नारायणें[12] ॥ ३ ॥ नारायण नाम नावडे [13]जयासि । ते जाले मिरासी कुंभपाकीं ॥ ४ ॥ कुंभपाकीं सेलें[14] मान तो तयांचा । तुका ह्मणे वाचा संतनिंदों[15] ॥ ५ ॥

४५९५. वास नारायणें केला मथुरेसि । वधूनि दुष्टांसि तये ठायीं ॥ १ ॥ ठायीं पितियाचे मानी उग्रसेना । प्रतिपाळी[16] जनांसहित लोकां ॥ २ ॥ लोकां दुःख नाहीं मागील आठव । देखियेला देव दृष्टी त्यांणीं ॥ ३ ॥ देखोनियां देवा विसरलीं कंसा । ठावा नाहीं ऐसा होता येथें ॥ ४ ॥ येथें दुजा कोणी नाहीं

---

१ पं. आपणा.—२ पं. त्याच्या.—३ पं. तुका ह्मणे माव कळों नेदी.—४ पं. जो —५ त. करावें या कामें भक्ताचे०.—६ पं. कांहीं होता —७ पं. असे.—८ पं. वाटल्या —९ पं. तया नाग०.—१० पं. "घातावारी" असतां "घातावारा" असें केलें आहे.—११ पं. वारिले ते दूतीं.—१२ त. नारायणा.—१३ त. तयासि —१४ पं. "सेल" असतां "सेले" असें केलें आहे.—१५ त. संत निंदी.—१६ दे. त. प्रतिपाळ.

कृष्णाविणें । ऐसें वाटे मनें काया वाचा ॥ ५ ॥ काया वाचा मन कृष्णीं रत जालें । सकळां लागलें कृष्णध्यान ॥ ६ ॥ ध्यान गोविंदाचें लागलें या लोकां । निर्भर हे तुका ह्मणे चित्तीं ॥ ७ ॥

४५९६. चिंतले पावलीं जयां कृष्णभेटी । एरवीं ते आटी वांयांविण ॥ १ ॥ वासना धरिती कृष्णाविणें कांहीं । सीण केला तिहीं साधनांचा ॥ २ ॥ चाळविले डंबें एक अहंकारें । भोग जन्मांतरें न चुकती ॥ ३ ॥ न चुकती भोग तपें दानें व्रतें । एका त्या अनंतेंवांचूनियां ॥ ४ ॥ चुकवुनि जन्म देईलें आपणा । भजा नारायणा तुका ह्मणे ॥ ५ ॥

४५९७. भजल्या गोपिका सर्वे भावें देवा । नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं॥१॥ दुजा छंदु नाहीं तयांचिये मनीं । जागृति सपनीं कृष्णध्यान ॥ २ ॥ ध्यान ज्यां हरीचें हरीसि तयांचें । चित्त ग्वाही ज्यांचें तैशा भावें ॥ ३ ॥ भाग्यें पूर्वपुण्यें आठविती लोक । अवघे सकळिक मथुरेचे ॥ ४ ॥ मथुरेचे लोक सुखी केले जन । तेथें नारायण राज्य करी ॥ ५ ॥ राज्य करी गोपीयादवांसहित । कर्मिलें बहुतकाळ तेथें ॥ ६ ॥ तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका ह्मणे ॥ ७ ॥

४५९८. रचियेला गांव सागराचे पोटीं । जडोनि गोमटीं नानारत्नें ॥ १ ॥ रत्न खणोखणी सोनियाच्या भिंती । लागलिया ज्योति रविकळा ॥ २ ॥ कळा सकळ ही गोविंदाचे हातीं । मंदिरें निगुतीं उभारिलीं ॥ ३ ॥ उभारिलीं दुर्गें दौरवंठे फांजी । कोटी[12] चर्या माजी शोभलियाँ[13] ॥ ४ ॥ शोभलें उत्तम गांव सागरांत । सकळांसहित आले हरि ॥ ५ ॥ आला नारायण द्वारकां[14] नगरा । उदार या शूरां[15] मुगुटमणि ॥ ६ ॥ निवडीना याति समान चि केलीं । टणक धाकुलीं नारायणें ॥ ७ ॥ नारायणें दिलीं अक्षई मंदिरें । अभंग साचारें सकळांसि ॥ ८ ॥ सकळ ही धर्मशीळ पुण्यवंत । पवित्र विरक्त नारीनर ॥ ९ ॥ रचिलें तें देवें न मोडे कवणा । बळियांचा राणा नारायण ॥ १० ॥ बळिबुद्धीनें[16] तीं देवा च सारिखीं । तुका ह्मणे मुखीं गाती ओंव्या ॥ ११ ॥

---

१ पं. मने –२ पं. लागलेंसे लोका । –३ पं. चिंतिलीं पावलें –४ पं. चाळविलीं दंभें एका – ५ पं. दाखवी.–६ पं. स्वपनीं.–७ पं. भाग्य पूर्वपुण्य –८ त. दैतीं.–९ पं. केला उपसर्ग – १० त. रचली.–११ पं. दारवंठ फांजी ।.–१२ त. कोठ.–१३ त. ० या.–१४ द्वारके नगरा.– १५ पं. सुरा.–१६ पं. बळ्बुद्धीनीति देवाची सा०.

४५९९. गाती ओंव्या कामें करितां सकळें । हालवितां बाळें देवावरि ॥ १ ॥ ऋद्धिसिद्धी दासी दारीं ओळंगती । सकळ संपत्ति सर्वा घरीं ॥ २ ॥ घरीं बैसलिया जोडलें निधान । करिती कीर्त्तन नरनारी ॥ ३ ॥ नारीनर लोक धन्य त्यांची याति । जयांसि संगति गोविंदाची ॥ ४ ॥ गोविंदें गोविंद केले लोकपाळ । चिंतनें सकळ तुका ह्मणे ॥ ५ ॥

४६००. कांहीं चिंता कोणा नाहीं कोणेविशीं । करी द्वारकेसि राज्य देव ॥ १ ॥ द्वारकेसि राज्य करी नारायण । दुष्ट संहारून धर्म पाळी ॥ २ ॥ पाळी वेदआज्ञा ब्राह्मणांचा मान । अतीतपूजन वैष्णवांचें ॥ ३ ॥ अतीत आलिप्त अत्रधियां वेगळा । नाहीं हा गोपाळा अभिमान ॥ ४ ॥ अभिमानें नाहीं तुका ह्मणे त्यासि । नेदी आणिकांसि धरूं देव ॥ ५ ॥

४६०१. धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथी । परब्रह्म क्षिती उतरलें ॥ १ ॥ उत्तम हें नाम राम कृष्ण जगीं । तरावयालागीं भवनदी ॥ २ ॥ दिनानाथब्रिदें रुळती चरणी । वंदितील मुनि देव ऋषि ॥ ३ ॥ ऋषीं मुनीं भेटी दिली नारायणें । आणीक कारणें बहु केलीं ॥ ४ ॥ बहु कासावीस जाला भक्तांसाटीं । तुका ह्मणे आटी सोसियेली ॥ ५ ॥

४६०२. सोसियेला आटी गर्भवास फेरे । आयुधांचे भारे वागवितां ॥ १ ॥ वाहोनि सकळ आपुलिये माथां । भार दासां चिंता वाहों नेदी ॥ २ ॥ नेदी काळाचिये हातीं सेवकांसि । तुका ह्मणे ऐसी ब्रिदावळी ॥ ३ ॥

४६०३. ब्रिदावळी ज्याचे रुळते चरणीं । पाउलें मेदिनी सुखावे त्या ॥ १ ॥ सुखावे मेदिनी कृष्णाचिये चालीं । कुंकुमें शोभलीं होय रेखा ॥ २ ॥ होउनि भ्रमर पाउलांचें सुख । घेती भक्त मुख लावूनियां ॥ ३ ॥ याचसाटीं धरियेला अवतार । सुख दिलें फार निजदासां ॥ ४ ॥ निज सुख तुका ह्मणे भक्तां ठावें । तींहीं च जाणावें भोगूं त्यासि ॥ ५ ॥

४६०४. भोगिलीं गोपिकां यादवां सकळां । गौळणीगोपाळां गाईवत्सां ॥ १ ॥ गाती धणीवरी केला अंगसंग । पाहिला श्रीरंग डोळेभरि ॥ २ ॥ भक्ति नवविधा तयांसि घडली । अवघीं च केलीं कृष्णरूप ॥ ३ ॥ रूप दाखविलें होतां भिन्न भाव ।

१ पं. सकळ.–२ पं. बाळ.–३ पं. सकळ.–४ पं. नारीनर.–५ पं. अभिमान तुका ह्मणे नाहीं त्यांनी । त. नाहीं मान तुका ह्मणे त्या देवासी ।.–६ पं. ज्यातें रुळती.–७ पं. भोगिल्या.–८ त. होतें भिन्नभावें । भक्ता आणि देवे भेद नाहीं ।.

भक्त आणि देव भिन्न नाहीं ॥ ४ ॥ नाहीं राहों दिलें जातां निजधामा । तुका ह्मणे आह्मांसहित गेला ॥ ५ ॥

४६०५. गेला कोठें[1] होता कोठुनियां आला । सहज व्यापला आहे नाहीं ॥ १ ॥ आहे साच भावें [2]सकळव्यापक । नाहीं अभाविक लोकां कोठें ॥ २ ॥ कोठें नाहीं ऐसा नाहीं रिता ठाव । [3]अनुभवी देव स्वयें [4]जाले ॥ ३ ॥ जातों येतों आह्मी देवाचे सांगातें[5] । तुका ह्मणे गात देवनाम ॥ ४ ॥

४६०६. मना वाटे तैसीं बोलिलों वचनें । केली धिटपणें सलगी देवा ॥ १ ॥ वाणी नाहीं शुद्ध याति एक ठाव । भक्ति नेणे भाव नाहीं मनीं ॥ २ ॥ नाहीं जालें ज्ञान पाहिलें अक्षर । [6]मानी जैसें थोर थोरी नाहीं ॥ ३ ॥ नाहीं मनीं लाज धरिली आशंका । नाहीं भ्यालों लोकां चतुरांसि ॥ ४ ॥ चतुरांच्या राया मी तुझें अंकित । जालों शरणागत देवदेवा ॥ ५ ॥ देवा आतां करीं सरती हीं[7] वचनें । तुझ्या कृपादानें बोलिलों तीं ॥ ६ ॥ तुझें देणें तुझ्यां[8] समर्पूनि पायीं । जालों उतरायी पांडुरंगा ॥ ७ ॥ रंकाहुनि रंक दास मी दासांचें । [9]सामर्थ्य हें कैचें बोलावया ॥ ८ ॥ बोलावया पुरे [10]वांचा माझी कायी । तुका ह्मणे पायीं ठाव द्यावा ॥ ९ ॥

४६०७. [11]चौरी वेद ज्याची कीर्ती वाखाणिती । प्रत्यक्ष ये मूर्ति विठोबाची ॥१॥ चहुंयुगांचें हें साधन साधिलें । अनुभवा आलें आपुलिया ॥ २ ॥ एवढें करूनि आपण निराळा । प्रत्यक्ष हें डोळां दाखविलें ॥ ३ ॥ दावुनि सकळ प्रमाणाच्या युक्ति । जयजयकार करिती अवघे भक्त ॥ ४ ॥ भक्ति नवविधा पावली मुळची । जनार्दननामाची संख्या जाली ॥ ५ ॥ नवसें ओंव्या आदरें वाचितां । त्याच्या मनोरथा कार्यसिद्धि ॥ ६ ॥ सीमा न करवे आणीक ही सुखा । तुका ह्मणे देखा पांडुरंगा ॥ ७ ॥

---

१ पं. होता कोठें.–२ पं. सक्ळा व्यापक.–३ पं. अनुभवें –४ त. जाले –५ त. सागातें.–६ पं. मानीजेसे.–७ पं. "हीं" नाहीं.–८ पं. तुज –९ पं. सामर्थ्य हें मज कैचें०.–१० पं. माझी वाचा –११ त. पं. या दोन्ही प्रतींत हा अभग नाहीं, फक्त देहूच्या प्रतींत आहे.

॥ इति बालक्रीडा संपूर्णमस्तु ॥



## देहू व तळेगांव या प्रतींत खालीं लिहिल्या प्रमाणें ज्यांचा आरंभ झालेला नाहीं असे पंढरपुरच्या प्रतींतले अभंग.

१. सिंदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चरमुरी रात्रदिवस ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसी ते वोंगळी जाय वो नरका । तिच्या दोषा देखा पति जाय ॥ छ्र ॥ आपण बुडती पती बुडविती । दोन्ही कुळें नेती अधःपाता ॥ २ ॥ तुका ह्मणे तिची न करावी संगती । होईल फजिती मागें पुढें ॥ ३ ॥

२. हे चि व्हावी माझी आस । जन्मोजन्मीं तुझा दास ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदीं हरी ॥ छ्र ॥ संतसंग सर्वकाळ । अखंड प्रेमाचा सुकाळ ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान । तुका मागे हें चि दान ॥ ३ ॥

३. आन नेघों देसी तरी । रिद्धि सिद्धि मुक्ति चारी ॥ १ ॥ संतसंग सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥ ३ ॥

४. दिवाळखोर नारायण । यावरी बहुतांचें ऋण ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ उठतां चि उभे द्वारीं । अवघे दे दे ह्मणती हरी ॥ छ्र ॥ माजघरीं दडे हरी । माया तडकी आड करी ॥ २ ॥ युगायुगींचें हें ऋण । ह्मणउनि धरिलेंसे मौन्य ॥ ३ ॥ रोखापत्र पाहीं । वेदशास्त्र देती ग्वाही ॥ ४ ॥ धनकोनाम तुका वाणी । रिणकोनाम विठ्ठल धणी ॥ ५ ॥

५. गरुडाचे पायीं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वेगीं आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरी ॥ छ्र ॥ पाय लक्ष्मीच्या हातीं । तिसी यावें काकुलती ॥ २ ॥ तुका ह्मणे शेषा । जागे करा हृषीकेशा ॥ ३ ॥

६. जाळीं महाकर्मै । दावी निजसुखवर्मै ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐसें कळलें आह्मां एक । जालों नामाचे धारक ॥ छ्र ॥ तपाचे सायास । नलगे घ्यावा वनवास ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें । कळिकाळ हें ठेंगणें ॥ ३ ॥

७. माझ्या वडिलांची मिराशी देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥ १ ॥ उपास पारणीं राखिला दारवंटा । केला भोगवटा आह्मांलागीं ॥ २ ॥ वंशपरंपरा दास मी अंकित । तुका मोकलितां लाज कोणा ॥ ३ ॥

८. आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां नित्य ध्येय योगियांचे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ते हे समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥ छ्र ॥ पुराणासी वाड श्रुति नेणती पार । तें जालें साकार पुंडलिका ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग ॥ ३ ॥

९. संतकृपा जाली । इमारत फळा आली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ज्ञानदेवें रचिला पाया । रचियेलें देवालया ॥ छ्र ॥ नामा तयाचा किंकर । तेणें केला हा

विस्तार ॥ २ ॥ जानार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥ ३ ॥ भजन करा सावकाश । तुका जालासे कळस ॥ ४ ॥

१०. त्याचिया चरणा माझें दंडवत । ज्याचें धन वित्त पांडुरंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तेथें माझा जीव पावला विसावा । ह्मणउनी हावा भरलोंसें ॥ छ ॥ चरणीचे रज लावीन कपाळा । जे पदें राउळा सोयी जाती ॥ २ ॥ आणीक तें भाग्य येथें कुरवंडी । करुनियां सांडी इंद्रा ऐसीं ॥ ३ ॥ वैष्णवांच्या घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सर्वभावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे सखे हरिचे ते दास । आतां पुढें आस दुजी नाहीं ॥ ५ ॥

११. पाळुनियां गोमटे । त्याच्या बोलें बोळखी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ जवळुनी न वजे दुरी । लाडें करी कवतुक ॥ छ ॥ खुण उभा इटेवरी । कट करीं धरियेले ॥ २ ॥ तुका ह्मणे घातली वरी । झुली थोरी मोलाची ॥ ३ ॥

१२. आतां काय विठो पाहासील अंत । आलों शरणागत तुजलागीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ करीं अंगीकार राखें पायांपाशीं । झणी दिसों देशी कीविलवाणें ॥ छ ॥ नाहीं ऐकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥ ३ ॥

१३. मीतूंपण ऐसी परी । जैसें लवण सागरीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ दोहीं माजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा ॥ छ ॥ देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥ २ ॥ तंतुपट जेंवी एक । जैसा विश्वेशीं व्यापक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपा । जगीं विश्रांति कैंची बापा ॥ ४ ॥

१४. नेणें जप तप जीवासी आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नाहीं आणुनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ छ ॥ बैसलिया ठायीं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा निवारावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी वेचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साचभावें ॥ ३ ॥

१५. जेणें देवा तुह्मी करा अंगीकार । हा नाहीं विचार मजमाजी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देवभक्तपण लाजविलें ॥ छ ॥ एकांत एकलें मन हें निश्चळ । न राहे चपळ एके ठायीं ॥ २ ॥ महत्वाची पायीं पडिली शृंखळा । बांधविला गळा स्नेहाहातीं ॥ ३ ॥ शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्न तें मुखा रुची नेदि ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाला अवगुणांचा थाग । वाढविली निद्रा आळस बहु ॥ ५ ॥

१६. कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटुनि त्वां काय घावें आह्मां ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ घेउनि धरणें बैसति उपवासी । हा हाट आह्मांसी नाहीं नेंसा ॥ छ ॥

तांतडी तयांनीं केली विटंवणा । आह्मां नारायणा काय उणें ॥ २ ॥ नाहीं मुक्ती चाड वास वैकुंठींचा । पिकलीसे वाचा रामनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय व्हावें उतराई । जीव ठेवूं पायीं संतांचिया ॥ ४ ॥

१७. आतां मज तरी सांगसील भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ॥ १ ॥ वर्म चुकलिया नव्हे तें कारण । केला होय शीण आवघा चि ॥ २ ॥ तुका ह्मणे नको पाहों हें निर्वाण । देईं कृपादान याचकासी ॥ ३ ॥

१८. कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंग ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ नये दाखवितां प्रेम बोलतां सांगतां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥ छ ॥ पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा । उपजत लपा ह्मणऊनी ॥ २ ॥ सांगों नेणे परी जाणे गोड क्षार । अंतरी विचार त्यासी ठावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें तों विचारावें मनीं । आणीक भल्यांनीं पुसूं नये ॥ ४ ॥

१९. एक ह्मणती आह्मी देव चि पैं जालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ एक ह्मणती आह्मीं देवाचीं पैं रूपें । तरी तुमचिया वापें न चुके जन्म ॥ छ ॥ देवें उचलिली स्वकरें मेदिनी । तुमचेनीं गोणी नुचलवे ॥ २ ॥ देवें मारियेले दैत्य दानव मोटे । तुमचेनीं न तुटे तृणमात्र ॥ ३ ॥ राया विठोबाचें पद जो अभिळाषी । पातकाची राशी तुका ह्मणे ॥ ४ ॥

२०. जयासी नावडे संतांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरिंचा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं तया ॥ छ ॥ मंजुळ वचनीं वचनागाची कांडी । सेवटींची घडी जीव माणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासि गोविंद अंतरला ॥ ३ ॥

२१. आंगीं भरला ताठा । वळणी नये जैसा खुंटा ॥ १ ॥ किती सांगावें त्या ढेंगा । हित आदळेना आंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे अनु । मुसळाचें नव्हे धनु ॥ ३ ॥

२२. मागितल्याची परती करा । उरी धरा कांहीं वाही ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणोनी सरिली आस । होती यास मूळ ते ॥ छ ॥ माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना वोरसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आळवणे । माझ्या देणें उत्तरा ॥ ३ ॥

२३. आंगीं लावुनियां राख । डोळे झाकुनी करिती पाप ॥ १ ॥ दाउनी वैराग्याची कळा । भोगिती विपयाचा सोहळा ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगों किती । जळो तयांची संगति ॥ ३ ॥

२४. पुराणीक ह्मणविती । जाणोनी कांदे भक्षिती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ अगस्तीचें मूत्र मळ । लाउनी ह्मणति कृष्णावळ ॥ छ ॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥ २ ॥ वदराहीच्या पाटी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥ ३ ॥

२५. जयाची वदे पूर्ण वेदांतवाणी । ह्मणावें कसें हो तयालागि वाणी ॥ परब्रह्मरूपी असा जो तुकावा । तयाचे तुकीं असा कोण तुकावा ॥ १ ॥ जयादर्शनें स्पर्शनें मुक्त होती । तुका नाम वाचे आणिताती ॥ पुनर्जन्म त्या प्राणियालागिं कैंचा । तुकाराम वाणी जया नाम वाचा ॥ २ ॥ परंधाम टाकून कैसा उडाला । जीवन्मुक्त होऊनी ब्रह्मीं बुडाला ॥ जयाची तनु ब्रह्मरूपीं बुडाली । भवभ्रांति हे जाण कैसी गळाली ॥ ३ ॥ तुका यासि कोठें तुकायासि दिसेना । जनीं हिंडतांना तुकावा दिसेना ॥ तुका वा तो कसा चतुर्भुज जाला । निराकार ब्रह्मीं स्वरूपीं निराळा ॥ ४ ॥ तुका ब्रह्मरूपी स्वरूपीं रहातो । जया दीपन्यायें जयासी पाहातो ॥ तुका बैसला ज्ञानवैराग्यधामीं । वसे चित्कळा पूर्णब्रह्मीं आरामीं ॥ ५ ॥ जयाचे मुखीं भारती वेदमाता । तया प्राप्तिची कायसी जाण चिंता ॥ निजानंदआनंद तो मग्न झाला । निराकार ब्रह्मस्वरूपीं मिळाला ॥ ६ ॥ कृपासागरें नाव निर्माण केली । असंख्यात बुद्धी तरोनी च गेली ॥ पुढें ही तरायासी उपाय केला । ह्मणोनी तुका मृत्यलोकासी आला ॥ ७ ॥ कसें भर्जिलें तें बीज उगवेना । तसें सर्व संपादिलें तें कळेना ॥ पाहा बोध त्या जाहला वामनाला । सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला ॥ ८ ॥

२६. मना या साक्षीसी जाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपुला तो ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तुह्मां परामृष घेतां सत्ताबळें । धारितां निराळे कैसीं वांचों ॥ ध्रु ॥ मी माझी सांडोनी यावया पसारा । आणीक दातारा काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तुज विणें एका । निढळ लौकिकामाजी असों ॥ ३ ॥

२७. उपजोनी मरों कीति वेळोवेळा । कोणा कळवळा येत माझा ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ह्मणउनी धांवा करीं कांकुलती । यावें वा श्रीपती सोडावया ॥ ध्रु ॥ बहुत या काळें केलों भयाभीत । येतों गिवसीत पाठिलागीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी दावितां स्वरूप । माझें कांहीं पाप निरसतें ॥ ३ ॥

२८. हाका मारी ज्याच्या नांवें । त्याचें गांव चि नाहीं ठावें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ काय गातों हें कळेना । राग आळवितों नाना ॥ ध्रु ॥ आशा धरूनियां मनीं । कांहीं देईल ह्मणउनी ॥ २ ॥ वितीभरी पोटासाटीं । तुका ह्मणे पडिली तुटी ॥ ३ ॥

२९. संतचरणीं नाहीं गोडी । ज्यासि विषयीं आवडी ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ त्यासि कैंचा भेटे देव । संतचरणीं नाहीं भाव ॥ ध्रु ॥ संतसेवेसि आंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी ॥ २ ॥ पाहे गुणदोष संतांचे । जळो काळें तोंड त्याचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसेवा । आमुच्या पूर्वजांचा ठेवा ॥ ४ ॥

३०. स्वप्नींचें धन चित्रींच्या ब्राह्मणा । जातकर्म जाणा वांटिती पैं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें शब्दज्ञान करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूनियां ॥ छ ॥ बोलाची च कढी बोलाचा चि भात । जेउनियां तृप्त कोण झाला ॥ २ ॥ कागदीं लिहीतां नामाची साकर । चाखतां मधुर कैंवि लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो तैसें ज्ञानवंड । यमपुरी दंड कठिण आहे ॥ ४ ॥

३१. आतां बरें धरीं । आपली उरी आपणापें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ वाईट बरें न पडे दृष्टी । मग कष्टी होईजे ना ॥ छ ॥ बोलों जातां वाढे बोल । वायां फोल खटपट ॥ २ ॥ काकुलती यावें देवा । तों तो सेवा इच्छितो ॥ ३ ॥ हिशेबाचें खोटें साटें । खटपट तुटेना ॥ ४ ॥ तुका ह्मणे कळों आलें । दुसरें भलें तें नव्हे ॥ ५ ॥

३२. कारणापें असतां दृष्टी । काम पोटीं नुपजे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणीं च संतोषे ॥ छ ॥ पाहिजे तो कळवळा । मग वळा काय उणें ॥ २ ॥ तुका ह्मणे उदारपणें । काय उणें मनासी ॥ ३ ॥

३३. कायेंकरुनि करी धंदा । चित्त गोविंदा तुझे पायीं ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ ऐशा संकल्पाची संधी । माझे बुद्धी धीर देवा ॥ छ ॥ कुटुंबाचा तुह्मां भार । मज व्यवहारनिमित्य ॥ २ ॥ तुका ह्मणे करितां काम । हृदयीं नाम धरीन ॥ ३ ॥

३४. आजि नव्हे कालिच्या ऐसें । अनारिसें पालटे ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ आतां लागवेग करा । ज्याचें धरा टाके तें ॥ छ ॥ नका सांगों वाउग्या गोष्टी । चाहुल खोटी येठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोडा माग । आपल्या लागवरूनी ॥ ३ ॥

३५. खाणोरियांचीं पुसों घरें । जीं हीं वरीं पाळती ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ सांगति त्या जावें वाटा । धरुनी पोटामध्यें गोष्टी ॥ छ ॥ आली गेली होती ठाया । सत्य छाया कळली ॥ २ ॥ तुका ह्मणे आपुलें वळ । युक्ति काळ कारण ॥ ३ ॥

३६. स्वगोत्रींचा पुत्र परगोत्रीं अर्पिला । विभागा मुकला पितृधना ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥ तैसें मजलागीं न धरावें दुरी । नव्हे परगोत्री पोटिंचा चि ॥ छ ॥ सुतकासी त्याचे नाहीं प्रयोजन । जनिता ह्मणोनि तीन दिवस ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ठावें हें कोणासी । पुसावें वेदांसी देती ग्वाही ॥ ३ ॥

३७. एक ब्रह्मचारी गाढवा झोंबतां । हाणोनियां लाता पळालें तें ॥ १ ॥ गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजी ॥ २ ॥ होणार तसें जालें हें नासें केलें । तुका ह्मणे गेलें वांयां चि तें ॥ ३ ॥

समाप्त.

# तुकारामबावांच्या अभंगांतील कठीण शब्दांचा कोश.

### अ

अकळ (अथवा आकळ)–न कळण्यासारखा.
अखम–अक्षम, पंगु.
अखय–अक्षय.
अगुणा–निर्गुण, गुणशून्य. २ द्वाड, खोडकर.
अंगुलें–अंगठी.
अंगेजणें–अंगीकारणें.
अघोरजप–पिशाचमंत्रजप.
अठरा–अठरा पुराणें.
अठोनी वेठोनी–अडवातिडवा, वेडावांकडा.
अडबद–करदोटा, कटदोरा.
अडांखा (अ. आडाखा)–धोरण, युक्ति. २ ताळा.
अत्यंत–प्रत्यक्ष अनुभव.
अधीलपणा–श्रेष्ठपणा, मुख्यपणा, पहिलेपणा.
अनर्गळ–निष्प्रतिबंध, स्वच्छंदी.
अनामिक–अंत्यज, महार इ०
अनारिसें (अ. आनारिसें)–वेगळें, अन्य.
अनु (अ. आणु)–अन्य, अणीक.
अनुहात (ध्वनि)–अविच्छिन्न योगादिधारणेनें जो दशनादांचा ध्वनि ऐकूं येतो तो. ('अनुहत' हें शुद्ध).
अबाळ–हाल, विपत्ति.
अबोलणा–न बोलण्यासारखा.
अभंड–विपुल, पुष्कळ.
अभिन्नव–नवल, अभिनव.
अभिळास–अभिलाष.
अभुक–भूक नाहीं अशी स्थिति, तृप्ति.
अरोथा–अपूर्व इच्छा.
अवकळा–तेजोहानि, तेजोभंग, फजीती, स्वरूपनाश.
अवगणी–सोंग.
अवगणें (अ. आवगणें)–ओळखणे.
अवश्वरा–अवसरा.
अशुद्ध–रक्त.
अशोभीं–अशुभीं.
असट–पातळ, पाणचट.
असमाई–असह्य.
असुक–असुख.
असेरया–आश्रया.
असोशी–हांव, उत्कंठा.
अहिक्य (अ. आहिक्य)–ऐक्य.

### आ

आइत (अ. आइती)–सामग्री, तयारी, सामान, साहित्य.
आउठावे (अ. औठावे)–(४३२७-२).=औटावे. 'औठडें' पहा.
आकळ–सत्यज्ञान, परब्रह्म. २ 'अकळ' पहा.
आगळा–अधिक, फार मोठा.
आगा–मोठा, श्रेष्ट.
आगोज–अगाध, भयंकर, मोठें.
आचावाचे–वडवड.
आट–आड, हरकत.
आटी–प्रयत्न, खटपट, पराकाष्टा.
आडांखा–'अडांखा' पहा.
आणी–टोंक, अग्र.
आणु–'अनु' पहा.

आतळणें–जवळ येणें, शिवणें, स्पर्श करणें.
आतुडणें–सांपडणें, प्राप्त होणें.
आत्रीतत्या–( ३९०४-ध्रु. ).
आथिलें–असलेलें.
आदा–जमा, उत्पन्न.
आन–अन्य, दुसरा.
आनारिसें–‘ अनारिसे ’ पहा.
आपसया–आपोआप.
आपैतें–आपोआप, ऐतें.
आयणी–तत्त्वनिर्णयेच्छा.
आरणें–उत्सुक अ. अधीर होणें. २ ओरडणे.
आरथ (अ आराथ किंवा आर्त)–(२८२३-३).
आरधें–दुःखाचा कोलाहल.
आराइणें–अनुकूल असणें.
आराणूक–शांति, सौख्य, उसंत.
आराथ–‘ आरथ ’ पहा.
आराला–उत्सुक झालेला.
आरालिया–आराधिल्या ?
आरुष–आर्ष, अडाणी.
आरोगणें–भक्षणें.
आर्त–उत्कट इच्छा. २ ‘ आरथ ’ पहा.
आर्थ–मागणें.
आलगट–अल्लड, हूड, अडाणी.
आवगणें–‘ अवगणं ’ पहा.
आवर्त–भोंवरा.
आवारा–खटाटोप.
आविस–आमिष.
आसडा–अंगास एकाएकीं हिसका बसतो तो व त्यानंतर होणारें दुःख.
आहाकटा–गडबड, ओरड, आक्रोश.
आहाच–वरवर.
आहाचपण–वरवरची कृति.
आहाचवाहाच–सामान्य. २ वरवर.
आहिक्य–‘ अहिक्य ’ पहा.
आळ–( अ. आळी )–छंद, नाद, हट्ट.
आळवण–विनवणें.
आळी–‘ आळ ’ पहा.
आळीकर–छांदिष्ट.

उ

उखता–अवघा.
उखतो–‘ उखितों ’ पहा.
उखर–खडबडीत.
उखितों (अ. उखतों)—अवघे. २ उदासीन.
उगटिलें–बाईट.
उगलें–उगें, व्यर्थ. २ दुसरे. ३ शांत.
उगवणें–उकलणें, सोडवणें.
उगळणे–ओकणे. २ माघारा घेणें.
उगाणा–सर्व दोष व पापे आपणावर घेऊन केलेली सोडवणूक. २ गणना.
उगिया–रिकामा, फुकटचा.
उजगरा–जागरण. २ उशीर, विलंब.
उजरी–उदय, उत्कर्ष.
उदेशीं–उद्देशीं.
उदैजणें–उगवणें.
उद्वेग–उद्विग्नपणा, उदासीनपणा, अस्वस्थपणा.
उधानु–तीन. ( नंदभाषा ).
उन्मन–लीन.
उन्मनी–मनाची लीनता होते अशी पांचवी अवस्था.–१ जागृति, २ स्वप्न, ३ सुषुप्ति, ४ तुरीया, ५ उन्मनी–अशा एकंदर पाच अवस्था आहेत.
उन्मळित–उघडलेला.
उन्हवणी–ऊन पाणी.

उपणणें—झडपणें, पाखडणें; धान्यांतील भूस, कोंडा इ० वाऱ्याच्या योगानें निराळें करण्याकरिता धान्य पाटींतून उंचावरून खालीं ओतणें.

उपेग—उपयोग.

उबग—कंटाळा, त्रास.

उभारा—स्थिरता, स्तिमितपणा.

उमस—अवकाश, उसंत. २ विस्तार. ३ उद्भव.

उमानें—उमजणें.

उरी—बाकी. २ ठाव, स्थिति.

उल्लंघ—उल्लंघणें. २ उल्लंघणारा.

उसंतणें—शेवटास नेणें, आटोपणें.

उसाळणें—हर्षविणें.

उसाळी—हर्षवितें.

## ऊ

ऊर्मी—मनाचे तरंग.

## ऋ

ऋणिया—ऋणकरी, देणेदार.

## ए

एकावळी—एकेरा हार.

एकीसवा—एके ठिकाणीं.

एक्याच—उग्याच, न बोलतां, स्तब्धपणें.

## औ

औट—साडेतीन (३॥.).

औठडें—औटपीठ—४ स्थान. (त्रिकूट, श्रियांट, गोलाट, औटपीठ) हीं महाकारणस्थानें.

औठावे—'आउठावे' पहा.

## क

कंकर—खडा. २ निखारा.

कडविड—खिडुकमिडूक, रजगीबिजगी (सोन्याची, रुप्याची इ०).

कडसणी—विचार.

कणव—करुणा.

कंदु—कांदा.

कप—कापूस अथवा त्यासारखा जलद पेटणारा पदार्थ.

कपाट देणें—दार लावणें, बंद करणें.

करवाडे—कडबा.

करमर—शस्त्रविशेष.

करमुर—कळा.

करवडी (अ. करवंडी)—पोटाची खांच. अतिक्षुधा लागली असतां "करवड वाळली" असें म्हणतात.

कर्णधार—नावाडी.

कर्दळी—केळ.

कलवड (अ. कलवडु)—गोवऱ्यांचा ढीग रचून त्याजवर लिंपण घाऊन ठेवतात तो. २ डेरे वगैरे मडक्यांचें लिंपण.

कलपणें—वाटणें.

कव—मिठी, वेंग.

कवळ—काविळीनें डोळ्यांवर पिवळेपणा येतो तो. २ ग्रास.

कवळणें—वास घालणें. २ कृपा करणें.

कळस—शेवट. २ कलश.

कळह—कलह, भांडण.

कळांतर—व्याज.

कळी—खडा.

कांचवटी—काच.

काचाकुची—काचकूच.

